# ॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं श्रीरामायणम् ।

## बालकाण्डम् ।

ॐतपःस्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदांवरम् । नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुंगवम् १ को न्वस्मिन्सांप्रतं लोके गुणवान्कश्च वीर्यवान् । धर्मज्ञश्च कृतज्ञश्च सत्यवाक्यो दृढव्रतः २ चारित्रेण च को युक्तः सर्वभूतेषु को हितः । विद्वान्कः कः समर्थश्च कश्चैकप्रियदर्शनः ३ आत्मवान्को जितक्रोधो द्युतिमान्कोऽनसूयकः । कस्य बिभ्यति देवाश्च जातरोषस्य संयुगे ४ एतदिच्छाम्यहं श्रोतुं परं कौतूहलं हि मे । महर्षे त्वं समर्थोऽसि ज्ञातुमेवंविधं नरम् । ५ श्रुत्वा चैतत्त्रिलोकज्ञो वाल्मीकेर्नारदो वचः । श्रूयतामिति

---

• ॐम् ॥ रामाय रामभद्राय रामचन्द्राय वेधसे । रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ॥ ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम् । भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यजसुरेप्सितराज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम् । मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम् । आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम् ॥ वेदाध्ययनरूप तपश्चर्येच्या ठिकाणीं तत्पर, शब्दब्रह्मतत्त्ववेत्त्यांमध्यें श्रेष्ठ आणि मुनींमध्यें वरिष्ठ अशा नारदांना वाल्मीकिमुनींनीं प्रश्न केला कीं, १ हे " (महर्षे, ) वर्तमानकालीं ह्या भूलोकावर बहुगुणसंपन्न असा कोण आहे? अर्थात्, वीर्यवान्, धर्मरहस्यवेत्ता, कृतज्ञ, सत्यवचनी, धर्माकरितां स्वीकारिलेल्या व्रताचा आपत्कालींही त्याग न करणारा २, सदाचरणसंपन्न, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर, तत्त्ववेत्ता, समर्थ, दर्शन झालें असतां लोकांना अत्यंत आनंद देणारा ३, मनोनिग्रही, क्रोधादिकांचें संयमन करणारा, तेजस्वी, परोत्कर्षाविषयीं मत्सर न धरणारा आणि युद्धकालीं क्रुद्ध झाला असतां देवांनाही भीति उत्पन्न करणारा ४ असा कोण आहे हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे; इतकेंच नव्हे परंतु, तें श्रवण करण्याविषयीं मला पराकाष्ठेची उत्सुकता आहे आणि,

चामन्त्र्य प्रहृष्टो वाक्यमब्रवीत् ६ बहवो दुर्लभाश्चैव ये त्वया कीर्तिता गुणाः। मुने वक्ष्याम्यहं बुद्ध्वा तैर्युक्तः श्रूयतां नरः ७ इक्ष्वाकुवंशप्रभवो रामो नाम जनैः श्रुतः। नियतात्मा महावीर्यो द्युतिमान्धृतिमान्वशी ८ बुद्धिमान्नीतिमान्वाग्मी श्रीमाञ्छत्रुनिबर्हणः। विपुलांसो महाबाहुः कम्बुग्रीवो महाहनुः ९ महोरस्को महेष्वासो गूढजत्रुररिंदमः। आजानुबाहुः सुशिराः सुललाटः सुविक्रमः १० समः समविभक्ताङ्गः स्निग्धवर्णः प्रतापवान्। पीनवक्षा विशालाक्षो लक्ष्मीवाञ्छुभलक्षणः ११ धर्मज्ञः सत्यसंधश्च प्रजानां च हिते रतः। यशस्वी ज्ञानसंपन्नः शुचिर्वश्यः समाधिमान् १२ प्रजापतिसमः श्रीमान्धाता रिपुनिषूदनः। रक्षिता जीवलोकस्य धर्मस्य परिरक्षिता १३ रक्षिता स्वस्य धर्मस्य स्वजनस्य च रक्षिता। वेदवेदाङ्गतत्त्वज्ञो धनुर्वेदे च निष्ठितः १४ सर्वशास्त्रार्थतत्त्वज्ञः स्मृतिमान्प्रतिभानवान्। सर्व-

हे महर्षे, आपणही अशा प्रकारचा पुरुष कोण आहे हें जाणण्यास समर्थ आहांत" ५ हें वाल्मीकि मुनींचें भाषण श्रवण करून तिन्ही लोकांतील वृत्तांत जाणणारे नारदमुनि आनंदित झाले आणि "ऐकावें" म्हणून सावधान होण्याविषयीं सुचवून त्यांस म्हणाले ६ "आपण विचारिलेले गुण बहुत असून दुर्लभच आहेत; तथापि, हे मुने, त्या [illegible] संपन्न कोण आहे ह्याचें स्मरण करून मी आपणांला कथन करितों; आपण [illegible] युक्त असलेला पुरुष कोण तो श्रवण करा ७. इक्ष्वाकुवंशांत जन्मलेला [illegible] राम ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला असा एक पुरुष लोकविख्यात आहे ( आणि त्याचेच ठिकाणीं एकसमयावच्छेदानें आपण विचारिलेले सर्व गुण आहेत ). तो मनोनिग्रही, महावीर[illegible], तेजस्वी, धैर्यवान्, जितेंद्रिय ८, बुद्धिमान्, नीतिज्ञ, वक्ता, वैभवशील आणि श[illegible] आहे व उन्नतस्कंध, महाबाहु, तीन रेषांनीं युक्त असलेला कंठ, मांसल [illegible]नुवटी ९, विशाल वक्षःस्थल, मोठें धनुष्य, अदृश्य स्कंधसंधि, आजानुबाहु, उत्कृष्ट मस्तक, उत्तम ललाट आणि प्रशस्त गति ह्यांनीं तो शत्रुविजयी संपन्न आहे १० आणि त्याचप्रमाणें तो प्रतापी व लक्ष्मीवान् असून प्रमाणांकित देह, परस्परांशीं समान आणि परस्परांपासून भिन्न असे नेत्रप्रभृति अवयव, स्निग्ध वर्ण, पुष्ट व उन्नत असें वक्षःस्थल आणि विशाल नेत्र ह्यांनीं युक्त आहे आणि म्हणूनच शुभ लक्षणांनीं संपन्न आहे ११. तसाच तो धर्मज्ञ, सत्यप्रतिज्ञ, प्रजाजनांच्या हिताविषयीं तत्पर, यशस्वी, ज्ञानसंपन्न आणि पवित्र व विनयी असून चित्तस्वास्थ्यानें युक्त आहे १२. त्याचप्रमाणें तो ब्रह्मदेवासमान असून ऐश्वर्यसंपन्न, प्रजापालक व शत्रुनाशक आहे आणि वर्णाश्रमधर्मरक्षक असून प्राणिसमूहाचें परिपालन करणारा आहे १३. इतकेंच नव्हे, परंतु, विशेषेंकरून स्वधर्म आणि भक्त ह्यांचें तो रक्षण करणारा असून वेद आणि वेदांगें ह्यांचें तत्त्व जाणणारा व धनुर्वेदामध्यें प्रवीण असा आहे १४. त्याच-

लोकप्रियः साधुरदीनात्मा विचक्षणः १५ सर्वदाभिगतः सद्भिः समुद्र इव सिन्धुभिः । आर्यः सर्वसमश्चैव सदैव प्रियदर्शनः १६ स च सर्वगुणोपेतः कौसल्यानन्दवर्धनः । समुद्र इव गाम्भीर्ये धैर्येण हिमवानिव । १७ विष्णुना सदृशो वीर्ये सोमवत्प्रियदर्शनः । कालाग्निसदृशः क्रोधे क्षमया पृथिवी-समः १८ धनदेन समस्त्यागे सत्ये धर्म इवापरः । तमेवंगुणसंपन्नं रामं सत्य-पराक्रमम् १९ ज्येष्ठं ज्येष्ठगुणैर्युक्तं प्रियं दशरथः सुतम् । प्रकृतीनां हितैर्युक्तं प्रकृतिप्रियकाम्यया २० यौवराज्येन संयोक्तुमैच्छत्प्रीत्या महीपतिः । तस्या-भिषेकसंभारान्दृष्ट्वा भार्याथ कैकयी २१ पूर्वं दत्तवरा देवी वरमेनमयाचत । विवासनं च रामस्य भरतस्याभिषेचनम् २२ स सत्यवचनाद्राजा धर्मपाशेन संयतः । विवासयामास सुतं रामं दशरथः प्रियम् २३ स जगाम वनं वीरः प्रतिज्ञामनुपालयन् । पितुर्वचननिर्देशात्कैकेय्याः प्रियकारणात् २४ तं

प्रमाणें स्मृति आणि समयस्फूर्ति ह्यांनी तो युक्त असून सर्व शास्त्रांचें अर्थतत्त्व जाणणारा, सर्व लोकांना हितावह, सौम्य, उदार आणि सर्व कर्मांमध्यें कुशल आहे १५. तसाच तो सर्वमान्य व सर्वांशीं सारखा वागणारा असल्यामुळें सर्वदां लोकांना त्याचें दर्शन प्रिय असतें आणि ह्मणूनच नद्या ज्याप्रमाणें समुद्राकडे येत असतात त्याचप्रमाणें सर्व कालीं सज्जन त्याचे संनिध जात असतात १६. सारांश, कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणारा तो राम सर्वगुणसंपन्न आहे. गंभीरपणामध्यें तो समुद्रासारिखा आहे; धैर्यांत हिमाल-यपर्वताप्रमाणें आहे १७; वीर्यासंबंधानें विष्णूशीं बरोबरी करणारा आहे; चंद्राप्रमाणें त्याचें दर्शन सर्वांना प्रिय आहे; क्रोधामध्यें प्रलयकालच्या अग्नीशीं त्याचें साम्य आहे; क्षमेंत तो पृथ्वीची बरोबरी करणारा आहे १८; धनाचा व्यय करण्याविषयीं तो कुबे-रासमान आहे आणि सत्यवचनासंबंधानें तर तो दुसरा मूर्तिमान् धर्मच आहे. ह्याप्र-माणें बहुगुणसंपन्न, अमोघपराक्रमी, श्रेष्ठ गुणांनीं युक्त आणि प्रजाजनांना हितावह असलेलीं कृत्यें करण्याविषयीं तत्पर असा जो ज्येष्ठ व प्रिय पुत्र राम त्याला—प्रजाजनांचा मनोरथ परिपूर्ण करण्याकरितां—दशरथ भूपतीनें यौवराज्याचा अभिषेक करण्याचें आनं-दानें मनामध्यें आणिलें. परंतु, त्याच्या अभिषेकाला अवश्य असलेलें साहित्य जुळ-विलेलें अवलोकन करून पूर्वी (इंद्राचें साहाय्य करण्याकरितां दैत्यांशीं युद्धप्रसंग प्राप्त झाला असतां आसुरी मायेचें निवारण केल्याबद्दल) जिला वर देण्याचें आश्वासन मिळालें होतें त्या कैकेयीनामक भार्येनें (राज्यभ्रंशपूर्वक) रामाला वनवास आणि भरताला अभिषेक असा वर त्या दशरथराजापाशीं मागितला १९,२०,२१,२२. तेव्हां, सत्य-वचनी असल्यामुळें धर्मपाशानें बद्ध होऊन त्या दशरथराजानें आपल्या प्रियपुत्र रामाला वनामध्यें पाठविलें २३ आणि तो वीर रामही पित्यानें कैकेयीला वर देण्याविषयीं

व्रजन्तं प्रियो भ्राता लक्ष्मणोनुजगाम ह । स्नेहाद्विनयसंपन्नः सुमित्रानन्दवर्धनः । २५ भ्रातरं दयितो भ्रातुः सौभ्रात्रमनुदर्शयन् । रामस्य दयिता भार्या नित्यं प्राणसमा हिता २६ जनकस्य कुले जाता देवमायेव निर्मिता । सर्वलक्षणसंपन्ना नारीणामुत्तमा वधूः २७ सीताप्यनुगता रामं शशिनं रोहिणी यथा । पौरैरनुगतो दूरं पित्रा दशरथेन च २८ शृङ्गवेरपुरे सूतं गङ्गाकूले व्यसर्जयत् । गुहमासाद्य धर्मात्मा निषादाधिपतिं प्रियम् २९ गुहेन सहितो रामो लक्ष्मणेन च सीतया । ते वनेन वनं गत्वा नदीस्तीर्त्वा बहूदकाः ३० चित्रकूटमनु प्राप्य भरद्वाजस्य शासनात् । रम्यमावसथं कृत्वा रममाणा वने त्रयः ३१ देवगन्धर्वसंकाशास्तत्र ते न्यवसन्सुखम् । चित्रकूटं गते रामे पुत्रशोकातुरस्तथा ३२ राजा दशरथः स्वर्गं जगाम विलपन्सुतम् । गते तु तस्मिन्भरतो वसिष्ठप्रमुखैर्द्विजैः ३३ नियुज्यमानो राज्याय नेच्छद्राज्यं महाबलः ।

---

केलेली प्रतिज्ञा सत्य करण्याकरिता आणि कैकेयीचाही मनोरथ पूर्ण करण्याकरितां पित्याची कंठरवानें आज्ञा झाल्यावरून वनामध्यें गेला २४. तेव्हां, विनयसंपन्न, सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा, रामाचे ठिकाणीं स्वाभाविकच प्रेम करणारा, भ्रात्या रामालाही प्रिय असलेला आणि आपल्या वर्तनानें बंधुप्रेम दर्शविणारा भ्राता लक्ष्मण, आपला बंधु राम जाऊं लागला असतां ( पित्याची आज्ञा वगैरे नसतांना ) केवळ बंधुप्रेमामुळेंच त्याच्या मागोमाग वनामध्यें गेला. त्याचप्रमाणें जनकाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेली, देवमायेप्रमाणें निर्माण झालेली, सर्व लक्षणांनीं संपन्न असलेली, स्त्रियांमध्यें उत्कृष्ट असलेली आणि रामाला प्राणासमान प्रिय असून त्याचें हित करण्याविषयीं नित्य तत्पर असलेली जी रामाची भार्या २५,२६,२७ सीता तीही चंद्राच्या मागोमाग जाणाऱ्या रोहिणीप्रमाणें रामाच्या बरोबर गेली. राम वनांत जाऊं लागला असतां नगरवासी जन आणि पिता दशरथ, हे दूरपर्यंत त्याच्या मागोमाग गेले २८. नंतर, शृंगवेरपुरामध्यें इष्ट अशा गुहसंज्ञक निषादाधिपतीची भेट झाल्यावर रामानें ( वनवासांत पोंचविण्याकरितां रथ घेऊन आलेल्या ) सारथ्याला गंगातीरीं सोडिलें २९. नंतर, गुह, लक्ष्मण व सीता ह्यांसहवर्तमान राम वनामध्यें चालला. पुढें ते त्रिवर्ग ह्या वनांतून त्या वनांत अशा प्रकारें अगाध जलानें युक्त असलेल्या नद्या तरून चालले ३० आणि नंतर, भरद्वाजमुनींच्या आज्ञेवरून चित्रकूट पर्वताला प्राप्त झाल्यावर वनामध्यें आनंदानें विहार करणारे ते देवगंधर्वांसारखे असलेले त्रिवर्ग ( म्हणजे राम, सीता आणि लक्ष्मण ) रम्य पर्णशाला करून त्या ठिकाणीं सुखानें राहिले. राम चित्रकूटपर्वतावर गेला; तों इकडे पुत्रशोकानें व्याकुळ झालेला दशरथ राजा पुत्राकरितां विलाप करीत करीत स्वर्गलोकीं गेला. ह्याप्रमाणें तो दशरथ परलोकीं गेल्यानंतर वसिष्ठप्रभृति द्विज

स जगाम वनं वीरो रामपादप्रसादकः ३४ गत्वा तु स महात्मानं रामं सत्यपराक्रमम् । अयाचद्भ्रातरं राममार्यभावपुरस्कृतः ३५ त्वमेव राजा धर्मज्ञ इति रामं वचोऽब्रवीत् । रामोऽपि परमोदारः सुमुखः सुमहायशाः ३६ न चैच्छत्पितुरादेशाद्राज्यं रामो महाबलः । पादुके चास्य राज्याय न्यासं दत्वा पुनः पुनः ३७ निवर्तयामास ततो भरतं भरताग्रजः । स काममनवाप्यैव रामपादावुपस्पृशन् ३८ नन्दिग्रामेऽकरोद्राज्यं रामागमनकाङ्क्षया । गते तु भरते श्रीमान्सत्यसन्धो जितेन्द्रियः ३९ रामस्तु पुनरालक्ष्य नागरस्य जनस्य च । तत्रागमनमेकाग्रो दण्डकान्प्रविवेश ह ४० प्रविश्य तु महारण्यं रामो राजीवलोचनः । विराधं राक्षसं हत्वा शरभङ्गं ददर्श ह ४१ सुतीक्ष्णं चाप्यगस्त्यं च अगस्त्यभ्रातरं तथा । अगस्त्यवचनाच्चैव जग्राहैन्द्रं शरासनम् ४२ खड्गं

भरताला ३१, ३२, ३३ राज्याचा स्वीकार करण्याविषयीं सांगूं लागले. परंतु, महाबलाढ्य ( असल्यामुळें राज्य करण्यास समर्थ ) असूनही राज्याची इच्छा न धरितां रामचरणांचा प्रसाद प्राप्त करून घेण्यास तो वीर भरत वनामध्यें गेला ३४; नम्र वेषानें महात्म्या अमोघपराक्रमी रामासमीप गेल्यानंतर त्यानें वनांतून परत येण्याविषयीं आपल्या रामाची प्रार्थना केली ३५ " आणि तूंच राजा आहेस व धर्मज्ञ ( असल्यामुळें "सर्व गुणांनीं श्रेष्ठ असा ज्येष्ठ भ्राता असतांना कनिष्ठाला राज्याचा अधिकार नाहीं"- हेंही तूं जाणीतच ) आहेस " असेंही तो ह्मणाला. परंतु, प्रसन्न मुख, अपार यश आणि प्रचंड बळ ह्यांनीं संपन्न असलेला राम जरी ( याचकाची हवी ती इच्छा तृप्त करण्यासारखा ) पराकाष्ठेचा उदार होता तरी पित्याच्या आज्ञेमुळें ( भरताच्या प्रार्थनेप्रमाणें ) त्यानें राज्याचा स्वीकार करण्याचें मनांत न आणितां वारंवार वनांतून निवृत्त होण्याविषयीं प्रार्थना करीत असलेल्या भरताला राज्यरक्षणाचें सामर्थ्य यावें एतदर्थ ठेव ह्मणून आपल्या पादुका त्याला दिल्या ३६, ३७ आणि नंतर, भरताहून ज्येष्ठ असलेल्या त्या रामानें भरताला तेथून परत फिरविलें. ह्याप्रमाणें आपला मनोरथ पूर्ण न होतांच तो भरत रामचरणीं प्रणाम करून परत फिरला ३८ आणि ( चवदा वर्षेपर्यंत ) रामाच्या आगमनाची वाट पहात पहात त्यानें नंदिग्रामामध्यें राहून राज्य केलें. असो. भरत गेल्यानंतर ( चित्रकूट पर्वत फार दूर नसल्यामुळें कदाचित् ) नगरवासी जन आणि भरत ह्यांचें आगमन पुनरपि इकडे होण्याचा संभव आहे असें समजून तो सत्यवचनी, जितेंद्रिय व वैभवशाली राम दंडकारण्यामध्यें मोठ्या सावधपणानें प्रविष्ट झाला ३९, ४०. त्या महावनामध्यें प्रविष्ट झाल्यानंतर कमलनयन रामानें विराध राक्षसाचा वध केला. नंतर, शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्य आणि अगस्त्य नांवानेंच प्रसिद्ध असलेला अगस्त्यभ्राता ह्या मुनींची भेट झाली. नंतर इंद्रानें वरुणापासून अगस्त्य-

च परमप्रीतस्तूणी चाक्षयसायकौ । वसतस्तस्य रामस्य वने वनचरैः सह ४३ ऋषयोऽभ्यागमन्सर्वे वधायासुररक्षसाम् । स तेषां प्रतिशुश्राव राक्षसानां तदा वने ४४ प्रतिज्ञातश्च रामेण वधः संयति रक्षसाम् । ऋषीणामग्निकल्पानां दण्डकारण्यवासिनाम् ४५ तेन तत्रैव वसता जनस्थाननिवासिनी । विरूपिता शूर्पणखा राक्षसी कामरूपिणी ४६ ततः शूर्पणखा वाक्यादुद्युक्तान्सर्वराक्षसान् । खरं त्रिशिरसं चैव दूषणं चैव राक्षसम् ४७ निजघान रणे रामस्तेषां चैव पदानुगान् । वने तस्मिन्निवसता जनस्थाननिवासिनाम् ४८ रक्षसां निहतान्यासन्सहस्राणि चतुर्दश । ततो ज्ञातिवधं श्रुत्वा रावणः क्रोधमूर्छितः ४९ सहायं वरयामास मारीचं नाम राक्षसम् । वार्यमाणः सुबहुशो मारीचेन स रावणः ५० न विरोधो बलवता क्षमो रावण तेन ते । अनादृत्य तु तद्वाक्यं रावणः कालचोदितः ५१ जगाम सहमारीचस्तस्याश्रमपदं तदा । तेन मायाविना दूरम-

मुनींपाशीं आणून ठेविलेलें वैष्णव धनुष्य, खड्ग आणि अक्षय बाणांनीं भरलेले भाते ह्यांचा अगस्त्यमुनींच्या आज्ञेवरून रामानें मोठ्या आनंदानें स्वीकार केला. ह्याप्रमाणें तो राम वनचरांसहवर्तमान वनामध्यें वास्तव्य करूं लागला असतां ४१, ४२, ४३ ( कबंधप्रभृति ) असुर आणि ( खरदूषणप्रभृति ) राक्षस ह्यांच्या वधाविषयीं विनंति करण्याकरितां सर्व ऋषि त्याचे समीप आले व त्या रामानेंही त्या राक्षसांच्या वध करण्याविषयीं त्या ऋषींना वनामध्यें वचन दिलें ४४. सारांश, दंडकारण्यनिवासी अग्नितुल्य तेजस्वी ऋषींचे संनिध रामानें युद्धामध्यें राक्षसांचा वध करण्याची प्रतिज्ञा केली४५. पुढें त्या दंडकारण्य प्रदेशामध्येंच [1]( पंचवटीनामक आश्रमांत ) रहात असतांना जनस्थानांत वास्तव्य करणारी कामरूपिणी शूर्पणखा राक्षसी (कर्ण व नासिका ह्यांचा छेद करून ) त्यानें विरूप केली ४६. तदनंतर, शूर्पणखेच्या सांगण्यावरून युद्धार्थ युक्त झालेल्या सर्व जनस्थाननिवासी राक्षसांचा, खर, त्रिशिरस् व दूषण ह्या राक्षसांचा ४७ आणि त्यांच्या अनुयायांचा संग्रामामध्यें रामानें वध केला. सारांश, त्या वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या रामानें जनस्थाननिवासी ४८ चवदा हजार राक्षससैन्याचा वध केला. तेव्हां, त्या स्वजातीयांचा वध झाल्याचें श्रवण करून रावण क्रोधानें अगदीं व्याप्त झाला ४९ आणि मारीचनामक राक्षसाला सीताहरणार्थ आपणांला सहाय होण्याविषयीं विनंति करूं लागला. तेव्हां " हे रावणा, त्या बलवानाशीं विरोध धरणें तुला योग्य व हितकारक होणार नाहीं " असें सांगून मारीच राक्षस वारंवार त्याचा निषेध करीत असतांनाही कालाची प्रेरणा झाल्यामुळें त्याच्या सांगण्याचा अनादर करून

१ दंडकारण्यामध्यें रावणाचें सैन्य राहण्याचें जें ठिकाण त्याला जनस्थान अशी संज्ञा आहे.

प्रवाह्य नृपात्मजौ ५२ जहार भार्यां रामस्य गृध्रं हत्वा जटायुषम् । गृध्रं च निहतं दृष्ट्वा हृतां श्रुत्वा च मैथिलीम् ५३ राघवः शोकसंतप्तो विललापाकुलेन्द्रियः । ततस्तेनैव शोकेन गृध्रं दग्ध्वा जटायुषम् ५४ मार्गमाणो वने सीतां राक्षसं संददर्श ह । कबन्धं नाम रूपेण विकृतं घोरदर्शनम् ५५ तं निहत्य महाबाहुर्ददाह स्वर्गतश्च सः । स चास्य कथयामास शबरीं धर्मचारिणीम् ५६ श्रमणां धर्मनिपुणामभिगच्छेति राघव । सोऽभ्यगच्छन्महातेजाः शबरीं शत्रुसूदनः ५७ शबर्या पूजितः सम्यग्रामो दशरथात्मजः । पम्पातीरे हनुमता संगतो वानरेण ह ५८ हनुमद्वचनाच्चैव सुग्रीवेण समागतः । सुग्रीवाय च तत्सर्वं शंसद्रामो महाबलः ५९ आदितस्तद्यथावृत्तं सीतायाश्च विशेषतः । सुग्रीवश्चापि तत्सर्वं श्रुत्वा रामस्य वानरः ६० चकार सख्यं रामेण प्रीतश्चैवाग्निसाक्षिकम् । ततो वानरराजेन वैरानुकथनं प्रति ६१ रामायावेदितं सर्वं प्रणयाद्दुःखितेन च । प्रतिज्ञातं च रामेण तदा वालि-

तो रावण ५०, ५१ मारीचासहवर्तमान रामाच्या आश्रमस्थानाला गेला. नंतर त्या मायावी मारीच राक्षसाच्या योगानें राजकुमार रामलक्ष्मणांना आश्रमांतून दूर नेववून ५२ आणि जटायु गृध्राचा वध करून त्यानें रामाची भार्या हरण केली. तदनंतर मरणोन्मुख होऊन पडलेल्या गृध्र जटायूला अवलोकन करून आणि सीता हरण करून नेल्याचें त्याच्या मुखांतून श्रवण करून ५३ रघुवंशज राम शोकानें संतप्त झाला आणि अंतःकरण शोकाकुल झाल्यामुळें विलाप करूं लागला. तदनंतर, त्या शोकानें व्याप्त असतांनाच जटायु गृध्राचें त्यानें दहन केलें ५४ आणि वनामध्यें सीतेला तो शोधूं लागला; तों शरीरानें विद्रूप आणि दिसण्यांतही भयंकर असा कबंधनामक राक्षस त्याचे दृष्टीं पडला ५५. पुढें महापराक्रमी रामानें कबंधाचा वध केल्यावर तो स्वर्गास गेला व जातां जातां " हे राघवा, धर्मानें वागणाऱ्या आणि धर्मज्ञ अशा शबरीनामक तापसीची तूं भेट घे " म्हणून त्यानें त्याला सांगितलें ५६. तेव्हां तो महातेजस्वी शत्रुनाशक राम शबरीची भेट घेण्याकरितां गेला ५६.५७. पुढें शबरीनें उत्तम प्रकारें पूजन केल्यानंतर तो दशरथपुत्र राम पंपासरोवराचे तीरीं गेला असता हनुमान् वानराशीं त्याची भेट झाली ५८ आणि ( नंतर कबंधाप्रमाणें ) हनुमानानेंही सांगितल्यावरून सुग्रीवाची भेट घेतल्यावर बलाढ्य रामानें त्या सुग्रीवाला तें सर्व कांहीं कथन केलें ५९. सारांश, जन्मापासून जसें घडलें होतें तसें वर्तमान आणि विशेषतः सीतेसंबंधानें जें वर्तमान घडलें होतें तें सर्व रामानें सुग्रीवाला सांगितलें. तेव्हां रामाची ती सर्व हकीकत श्रवण करून सुग्रीव वानर प्रसन्न झाला व त्यानें प्रत्यक्ष अग्नीलाच साक्षी ठेवून रामाशीं सख्य केलें. तदनंतर ( वालीशीं पडलेल्या ) वैरासंबंधानें झालेल्या प्रश्नानें ६०,६१ सर्व उत्तर त्या

वधं प्रति ६२ वालिनश्च बलं तत्र कथयामास वानरः । सुग्रीवः शङ्कितश्चासीन्नित्यं वीर्येण राघवे ६३ राघवप्रत्ययार्थं तु दुन्दुभेः कायमुत्तमम् । दर्शयामास सुग्रीवो महापर्वतसंनिभम् ६४ उत्स्मयित्वा महाबाहुः प्रेक्ष्य चास्थि महाबलः । पादाङ्गुष्ठेन चिक्षेप संपूर्णं दशयोजनम् ६५ बिभेद च पुनः शालान्सप्तैकेन महेषुणा । गिरिं रसातलं चैव जनयन्प्रत्ययं तदा ६६ ततः प्रीतमनास्तेन विश्वस्तः स महाकपिः । किष्किन्धां रामसहितो जगाम च गुहां तदा ६७ ततो गर्जद्धरिवरः सुग्रीवो हेमपिङ्गलः । तेन नादेन महता निर्जगाम हरीश्वरः ६८ अनुमान्य तदा तारां सुग्रीवेण समागतः । निजघान

---

दुःखित सुग्रीवानें रामाला मन मोकळें करून सांगितलें असतां त्याचवेळीं रामानें वालीचा वध करण्याविषयीं प्रतिज्ञा केली ६२. तेव्हां त्या ( ऋष्यमूकपर्वताचे ) ठिकाणीं वालीचें बल किती हें सुग्रीवानें रामाला सांगितलें. रघुवंशज रामाचे ठिकाणीं वालीसारिखें वीर्य आहे किंवा नाहीं ह्याविषयीं सुग्रीवाला नेहमीं शंका येत असल्यामुळें ६३ रामा ( च्या बला ) ची प्रतीति पाहण्याकरितां मोठ्या पर्वतासमान असलेलें दुंदुभिनामक दैत्याचें ( वालीनें फेंकून दिलेलें ) प्रचंड शरीर त्यानें रामाला दाखविलें ६४. तेव्हां महापराक्रमी व महाबलाढ्य रामानें तो अस्थिपंजर अवलोकन करून हास्यपूर्वक पादांगुष्ठानेंच पक्कीं दहायोजनें ( ह्मणजे चाळीस कोसपर्यंत ) उडवून दिला ६५ आणि पुनरपि स्वबलाविषयीं सुग्रीवाचा विश्वास बसण्याकरितां रामानें एकच मोठा बाण सोडिला व त्याच्या योगानें सात सालवृक्ष, त्यांच्या समीप असलेला एक पर्वत आणि ( भूलोकाखालीं असलेल्या सप्तपाताललोकांपैकीं वरच्या पांचांसहवर्तमान सहावें ) रसातल भेदून दाखविलें. ( तात्पर्य, आपलें बल वालीपेक्षां कमी आहे किंवा काय अशी शंका सुग्रीवाला पुनरपि येऊं नये ह्मणून रामानें एक मोठा बाण मारिला असतां तो ओळीनें असलेल्या सात सालवृक्षांचा भेद करून त्यांच्याच पलीकडे असलेल्या पर्वतालाही फोडून गेला आणि पर्वत फोडून ज्या ठिकाणीं खालीं पडला तेथून खालीं जातजात तो अधःप्रदेशीं असलेल्या सप्तपातालांपैकीं सहाव्या रसातलालाही भेदून गेला ) ६६ ( ह्याप्रमाणें रामानें स्वसामर्थ्याची प्रतीति आणून दिल्यानंतर त्या कृत्यामुळें त्या महावानराला त्याच्या बलाविषयीं विश्वास आला व तो रामासहवर्तमान किष्किंधानगरीस व नंतर ( त्या नगरीसमीप असलेल्या ) गुहेमध्यें गेला ६७. किष्किंधानगरीला गेल्यावर सौवर्ण व पिंगटवर्णानें युक्त असलेल्या त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवानें गर्जना केली; तेव्हां तो महाध्वनि श्रवण करून वानरराज वाली बाहेर निघाला ६८ आणि निवतांना ( जाऊं नको ह्मणून निवारण करूं लागलेल्या ) तारेची ( मी अपकार केला नसतां राम विनाकारण मला अपकार करणार नाहीं इत्यादि भाषणानें ) अनुमति घेऊन तो ( युद्धाकरितां ) सुग्रीवाशीं येऊन भिडला.

च तत्रैनं शरेणैकेन राघवः ६९ ततः सुग्रीववचनाद्धत्वा वालिनमाहवे । सुग्रीवमेव तद्राज्ये राघवः प्रत्यपादयत् ७० स च सर्वान्समानीय वानरान्वानरर्षभः । दिशः प्रस्थापयामास दिदृक्षुर्जनकात्मजाम् ७१ ततो गृध्रस्य वचनात्संपातेर्हनुमान्बली । शतयोजनविस्तीर्णं पुप्लुवे लवणार्णवम् ७२ तत्र लङ्कां समासाद्य पुरीं रावणपालिताम् । ददर्श सीतां ध्यायन्तीमशोकवनिकां गताम् । ७३ निवेदयित्वाभिज्ञानं प्रवृत्तिं विनिवेद्य च । समाश्वास्य च वैदेहीं मर्दयामास तोरणम् ७४ पञ्च सेनाग्रगान्हत्वा सप्त मन्त्रिसुतानपि । शूरमक्षं च निष्पिष्य ग्रहणं समुपागमत् ७५ अस्त्रेणोन्मुक्तमात्मानं ज्ञात्वा पैतामहाद्वरात् । मर्षयन्राक्षसान्वीरो यन्त्रिणस्तान्यदृच्छया ७६ ततो दग्ध्वा पुरीं लङ्कामृते सीतां च मैथिलीम् । रामाय प्रियमाख्यातुं पुनरायान्महाकपिः ७७ सोभिगम्य महात्मानं कृत्वा रामं प्रदक्षिणम् । न्यवेदयदमेयात्मा दृष्टा सीतेति तत्त्वतः ७८ ततः सुग्रीवसहितो गत्वा तीरं महो-

---

तेव्हां युद्धामध्यें त्या वालीचा वध रामानें एका बाणानें केला ६९. सारांश, किष्किंधानगरीला गेल्यानंतर सुग्रीवाच्या सांगण्यावरून युद्धामध्यें रामानें वालीचा वध केला आणि त्या वालीच्या राज्यावर त्यानें सुग्रीवाचीच स्थापना केली ७०. तेव्हां त्या वानरश्रेष्ठ सुग्रीवानें सर्व वानर एकत्र जमविले आणि जनककन्या जी सीता तिचा शोध लावण्याकरितां त्यांना सर्वदिशेस पाठविलें ७१. तेव्हां ( त्या लंकेमध्यें सीता दीन होऊन वास्तव्य करीत आहे असें ) संपातिनामक गृध्रपक्ष्यानें सांगितल्यावरून बलाढ्य हनुमानानें शंभर योजनें विस्तीर्ण असलेल्या क्षारसमुद्राचें उल्लंघन केलें ७२ आणि रावणानें परिपालित असलेल्या लंकानगरीला गेल्यानंतर अशोकवनामध्यें रामाचें ध्यान करीत बसलेली सीता त्या ठिकाणीं त्यानें अवलोकन केली ७३. नंतर रामानें दिलेली खूण सीतेला देऊन, सुग्रीवाशीं रामाचें सख्य झाल्याचें वगैरे वर्तमान तिला कळवून आणि तिला धीर देऊन हनुमानानें तेथील वेशीचाही नाश केला ७४ आणि पांच सेनाधिपति व सात मंत्रिपुत्र ह्यांचा वध करून व त्याचप्रमाणें अक्षनामक शूर रावणपुत्राचें पीठ करून हनुमान् आपण होऊन इंद्रजितानें टाकिलेल्या ब्रह्मास्त्ररूप पाशाचे अधीन झाला ७५. पुढें ब्रह्मदेवाच्या वरानें अस्त्रापासून आपली सुटका झाल्याचें समजूनही बांधून नेणाऱ्या राक्षसांची क्षमा करीत असलेला तो वीर हनुमान् कांहीं दुसऱ्याच कार्याच्या उद्देशानें त्या राक्षसांबरोबर रावणासमीप गेला ७६. तदनंतर मिथिलाधिपति जनकराजाची कन्या सीता ज्या ठिकाणीं बसली होती तें ठिकाण वर्ज करून रावणाची लंका नगरी दग्ध केल्यावर रामाला प्रिय वार्ता कथन करण्याकरितां पुनरपि तो महाकपि हनुमान् रामासमीप गेला ७७ आणि महात्म्या रामासमीप जाऊन प्रदक्षिणा घातल्यावर त्या

दधः। समुद्रं क्षोभयामास शरैरादित्यसंनिभैः ७९ दर्शयामास चात्मानं समुद्रः सरितां पतिः। समुद्रवचनाच्चैव नलं सेतुमकारयत् ८० तेन गत्वा पुरीं लङ्कां हत्वा रावणमाहवे। रामः सीतामनुप्राप्य परां व्रीडामुपागमत् ८१ तामुवाच ततो रामः परुषं जनसंसदि। अमृष्यमाणा सा सीता विवेश ज्वलनं सती ८२ ततोऽग्निवचनात्सीतां ज्ञात्वा विगतकल्मषाम्। कर्मणा तेन महता त्रैलोक्यं सचराचरम् ८३ सदेवर्षिगणं तुष्टं राघवस्य महात्मनः। बभौ रामः संप्रहृष्टः पूजितः सर्वदैवतैः ८४ अभिषिच्य च लङ्कायां राक्षसेन्द्रं विभीषणम्। कृतकृत्यस्तदा रामो विज्वरः प्रमुमोद ह ८५ देवताभ्यो वरं प्राप्य समुत्थाप्य च वानरान्। अयोध्यां प्रस्थितो रामः पुष्पकेण सुहृद्वृतः ८६ भरद्वाजाश्रमं गत्वा रामः सत्यपराक्रमः। भरतस्यान्तिके रामो हनूमन्तं व्यसर्जयत् ८७ पुनराख्यायिकां जल्पन्सुग्री-

---

महात्म्या हनुमानानें "दिसली सीता" येवढेंच सार रामाला निवेदन केलें ७८. असो. पुढें सुग्रीवासहवर्तमान महासागराचे तीरीं गेल्यावर सूर्यासारख्या तेजस्वी बाणांनीं रामानें समुद्र क्षुब्ध करून टाकिला असतां ७९ नद्यांचा अधिपति जो समुद्र त्यानें रामाला दर्शन दिलें. तेव्हां त्या समुद्राच्या सांगण्यावरूनच रामानें नलाकडून सेतु बांधविला ८० आणि त्या सेतूनें लंकानगरीला जाऊन व त्या ठिकाणीं युद्धामध्यें रावणाचा वध करून रामानें सीता प्राप्त करून घेतली; परंतु, ( राक्षसाच्या घरीं पुष्कळ दिवस राहिलेल्या सीतेचा पुनरपि रामानें स्वीकार केला असा लोकापवाद आपणांकडे येण्याचा संभव आहे असें मनांत आल्या कारणानें ) तो अतिशय लज्जित झाला ८१. नंतर जनसमुदायामध्यें सीतेला उद्देशून रामानें मर्मभेदक भाषण केलें असतां तें सहन न झाल्यामुळें साध्वी सीता अग्नीमध्यें प्रविष्ट झाली ८२. तदनंतर सीता निष्कलंक आहे असें अग्नीच्या वचनावरून समजून आल्यावर रामानें तिचा स्वीकार केला. त्या महत् कृत्याच्या योगानें देवगण, ऋषिसमुदाय आणि चराचर प्राणी ह्यांसहवर्तमान सर्व त्रैलोक्य महात्म्या रघुवंशज रामावर संतुष्ट झालें आणि संतोष दाखविण्यानेंच सर्व देवतांनीं मान दिलेला तो राम आनंदित झाला ८३,८४. नंतर लंकेमध्यें राक्षसाधिपति बिभीषणाला अभिषेक करून राम कृतकृत्य झाला आणि निश्चिंत झाल्यामुळें आनंदित होऊं लागला ८५. ( युद्धांत पडलेले वानर झोंपेंतून उठल्याप्रमाणें जिवंत होऊन उठोत असा ) वर देवतांपासून प्राप्त झाल्यानंतर वानरांना उठवून सुहृज्जनांनीं परिवेष्टित असलेला राम पुष्पकविमानामध्यें बसून अयोध्या नगरीकडे निघाला ८६ आणि भरद्वाज मुनींच्या आश्रमाला गेल्यानंतर अमोघपराक्रमी रामानें भरताकडे हनुमानाला पुढें पाठविलें ८७. नंतर सुग्रीवादिकांसहवर्तमान पुनरपि

वमहितस्तदा । पुष्पकं तत्समारुह्य नन्दिग्रामं ययौ तदा ८८ नन्दिग्रामे जटां हित्वा भ्रातृभिः सहितोऽनघः । रामः सीतामनुप्राप्य राज्यं पुनरवाप्तवान् ८९ प्रहृष्टमुदितो लोकस्तुष्टः पुष्टः सुधार्मिकः । निरामयो ह्यरोगश्च दुर्भिक्षभयवर्जितः ९० न पुत्रमरणं केचिद्द्रक्ष्यन्ति पुरुषाः क्वचित् । नार्यश्चाविधवा नित्यं भविष्यन्ति पतिव्रताः ९१ न चाग्निजं भयं किंचिन्नाप्सु मज्जन्ति जन्तवः । न वातजं भयं किंचिन्नापि ज्वरकृतं तथा ९२ न चापि क्षुद्भयं तत्र न तस्करभयं तथा । नगराणि च राष्ट्राणि धनधान्ययुतानि च ९३ नित्यं प्रमुदिताः सर्वे यथा कृतयुगे तथा । अश्वमेधशतैरिष्ट्वा तथा बहुसुवर्णकैः ९४ गवां कोट्ययुतं दत्त्वा विद्वद्भ्यो विधि-

पूर्ववृत्तांतासंबंधानें भाषण करणारा तो राम त्याच पुष्पकविमानामध्यें आरूढ होऊन नंदिग्रामीं गेला ८८ आणि नंदिग्रामामध्यें जटा टाकिल्यावर व ह्मणूनच सीतेला अनुरूप असें रूप धारण केल्यावर भ्रात्यांसहवर्तमान असलेल्या त्या रामाला पुनरपि राज्य प्राप्त झालें ८९. असो. ह्याप्रमाणें रामावतारामध्यें वृत्तांत होणार आहे. राम राज्य करीत असतांना लोक हर्ष व आनंद ह्यांनीं युक्त, संतुष्ट, पुष्ट, मानसिक दुःख व शारीरिक व्याधि ह्यांपासून अलिप्त, दुर्भिक्षभयरहित आणि अत्यंत धर्मनिष्ठ असे होतील ९०. पुरुषांना कोठेंही पुत्रमरण पहाण्याची पाळी येणार नाहीं; स्त्रिया नेहमीं पतिव्रता व वैधव्यरहित होतील ९१; अग्नीपासून यत्किंचितूही भय उत्पन्न होणार नाहीं; उदकामध्यें बुडून प्राणी मरणार नाहींत; वात, ज्वर, क्षुधा आणि चोर ह्यांपासून भय उत्पन्न होणार नाहीं; नगरें व राष्ट्रें धनधान्यांनीं संपन्न होतील ९२,९३; कृतयुगाप्रमाणें सर्व लोक नित्य आनंदित राहतील; विपुलसुवर्णरूप दक्षिणांनीं युक्त असे शेंकडों अश्वमेध करून, विद्वान् ब्राह्मणांना विधिपूर्वक एक निखर्व गाई दान

१ रामचरित्रविषयक वृत्तांताचा भूतकालानें निर्देश केलेला आहे. तेव्हां श्रीरामचंद्रांचा अवतार होण्यापूर्वीं महर्षि वाल्मीकिंनीं रामायण करून ठेविलें होतें हें ह्मणणें जुळणार कसें ? ह्मणून एकाद्याला ह्या ठिकाणीं शंका येण्याचा संभव आहे. परंतु, होणारच अशी ज्याचद्दल वक्त्याची खात्री झालेली असते त्या गोष्टीचा निर्देश भूतकालच्या प्रयोगानें करण्याची पद्धति महाराष्ट्र भाषेंतही आहे असा विचार मनामध्यें आणिला ह्मणजे त्या शंकेचें समाधानही होणार आहे. मागेंकडे दृष्टि न देतां खड्याकडे पळत जाणारा मनुष्य अवलोकन करून तो खड्यांत पडण्यापूर्वींच शेजारचे लोक "पडला पडला" असें ह्मणतात. कौरवपांडवांमध्यें युद्धाला आरंभ होण्यापूर्वींच "मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च कर्णं तथान्यानपि योधवीरान् । मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा युध्यस्व जेतासि रणे सपत्नान्" असें भगवानांनीं अर्जुनाला सांगितलें असल्याचें भगवद्गीतेमध्यें प्रसिद्धच आहे. भूतकालदर्शक प्रयोग आढळतात ह्मणून त्या त्या गोष्टी घडल्यानंतर ती ती सूक्तें झालीं असें ह्मणून "वेद अनादि नाहींत" असें ह्मणणाऱ्या लोकांनींही ग्रंथांतील वरील वचनें लक्ष्यांत ठेवण्यासारखीं आहेत.

पूर्वकम् । असङ्ख्येयं धनं दत्वा ब्राह्मणेभ्यो महायशाः ९५ राजवंशाञ्छतगुणान्स्थापयिष्यति राघवः। चातुर्वर्ण्यं च लोकेस्मिन्स्वे स्वे धर्मे नियोक्ष्यति ९६ दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च । रामो राज्यमुपासित्वा ब्रह्मलोकं प्रयास्यति ९७ इदं पवित्रं पापघ्नं पुण्यं वेदैश्च संमितम् । यः पठेद्रामचरितं सर्वपापैः प्रमुच्यते ९८ एतदाख्यानमायुष्यं पठन्रामायणं नरः। सपुत्रपौत्रः सगणः प्रेत्य स्वर्गे महीयते ९९ पठन्द्विजो वागृषभत्वमीयात्स्यात्क्षत्रियो भूमिपतित्वमीयात्। वणिग्जनः पुण्यफलत्वमीयाज्जनश्च शूद्रोपि महत्त्वमीयात् १०० इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

नारदस्य तु तद्वाक्यं श्रुत्वा वाक्यविशारदः । पूजयामास धर्मात्मा सहशिष्यो महामुनिम् १ यथावत्पूजितस्तेन देवर्षिर्नारदस्तथा । आपृच्छ्यैवाभ्यनुज्ञातः स जगाम विहायसम् २ स मुहूर्ते गते तस्मिन्देवलोकं मुनिस्तदा । जगाम तमसातीरं जाह्नव्यास्त्वविदूरतः ३ स तु तीरं समा-

देऊन आणि इतरही असंख्य धन ब्राह्मणांना अर्पण करून महायशस्वी ९४,९५ रघुवंशज राम अनेकगुणांची वृद्धि होईल अशा रीतीनें राजवंशांची स्थापना करील; ह्या भूलोकांतील चारी वर्णांना आपापल्या धर्मांचे ठिकाणीं नियुक्त करील ९६ आणि अकरा हजार वर्षें राज्य करून तो राम ब्रह्मलोकाप्रत गमन करील ९७. पवित्र, पापनाशक, पुण्यकारक आणि ह्मणूनच वेदतुल्य असलेलें हें रामचरित्र जो पठण करितो तो सर्व पापांपासून मुक्त होतो ९८. सारांश, आयुर्वर्धक असलेलें हें रामायणरूप आख्यान पठण करणारा पुरुष ह्या लोकाचा त्याग केल्यानंतर सेवकगण व पुत्रपौत्र ह्यांसहवर्तमान स्वर्गामध्यें तेथील रहिवाशांच्या सत्काराला पात्र होऊन आनंदांत रहातो ९९. ब्राह्मण जर हें रामायण पठण करील तर तो शब्दब्रह्मामध्यें निष्णात होईल; क्षत्रिय पठण करील तर त्याला पृथ्वीचें आधिपत्य प्राप्त होईल; वैश्य पठण करील तर त्याला व्यापारामध्यें फलप्राप्ति होईल आणि श्रवण करणारे शूद्रप्रभृति लोकही महत्त्वास चढतील १००. ह्याप्रमाणें महर्षि वाल्मीकिप्रणीत आदिकाव्य रामायणांतर्गत बालकांडापैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥१॥

नारदमुनींचें तें भाषण श्रवण करून संभाषणामध्यें निष्णात व शिष्यगणांसहवर्तमान असलेल्या धर्मात्म्या वाल्मीकि मुनींनीं महामुनि नारदांचें पूजन केलें १ आणि त्या वाल्मीकिमुनींनीं यथाविधि पूजन केल्यानंतर देवर्षि नारदमुनींनीं त्यांना निरोप मागितला व जाण्याला आज्ञा मिळाल्यावर ते नारदमुनि आकाश मार्गानें चालते झाले २. ते नारदमुनि देवलोकीं गेल्यानंतर क्षणभर आश्रमामध्यें बसून वाल्मीकि महा-

साद्य तमसाया मुनिस्तदा। शिष्यमाह स्थितं पार्श्वे दृष्ट्वा तीर्थमकर्दमम् ४ अकर्दममिदं तीर्थं भरद्वाज निशामय। रमणीयं प्रसन्नाम्बु सन्मनुष्यमनो यथा ५ न्यस्यतां कलशस्तात दीयतां वल्कलं मम । इदमेवावगाहिष्ये तमसातीर्थमुत्तमम् ६ एवमुक्तो भरद्वाजो वाल्मीकेन महात्मना। प्रायच्छत मुनेस्तस्य वल्कलं नियतो गुरोः ७ स शिष्यहस्तादादाय वल्कलं नियतेन्द्रियः। विचचार ह पश्यंस्तत्सर्वतो विपुलं वनम् ८ तस्याभ्याशे तु मिथुनं चरन्तमनपायिनम्। ददर्श भगवांस्तत्र क्रौञ्चयोश्चारुनिःस्वनम् ९ तस्मात्तु मिथुनादेकं पुमांसं पापनिश्चयः। जघान वैरनिलयो निषादस्तस्य पश्यतः १० तं शोणितपरीताङ्गं चेष्टमानं महीतले। भार्या तु निहतं दृष्ट्वा रुराव करुणां गिरम् ११ वियुक्ता पतिना तेन द्विजेन सहचारिणा। ताम्रशीर्षेण मत्तेन पत्रिणा सहितेन वै १२ तथाविधं द्विजं दृष्ट्वा निषादेन निपा-

---

मुनि जान्हवीचे समीप असलेल्या तमसानदीच्या तीरीं गेले ३ आणि त्या नदीच्या तीरीं गेल्यानंतर तें निर्मल तीर्थ अवलोकन करून समीप असलेल्या शिष्याला ह्मणाले ४ " हे भरद्वाजा, कर्दमरहित असलेलें हें तीर्थ अवलोकन कर. अरे, सज्जनांच्या मनाप्रमाणें यांतील उदक स्वच्छ असल्यामळें हें रमणीय आहे ५. ह्यास्तव, बा भरद्वाजा, कलश खालीं ठेवून परिधान करण्याकरितां मला वल्कल दे. ( मध्यान्हकालाचें अतिक्रमण होत असल्यामुळें गंगातीरीं न जातां )आतां ह्या उत्कृष्ट तमसा तीर्थामध्येंच मी स्नान करितों ६. ह्याप्रमाणें महात्म्या वाल्मीकि मुनींनी भरद्वाजाला सांगितलें असतां सेवेविषयीं तत्पर असलेल्या त्या शिष्यानें आपल्या त्या गुरुस्वरूप वाल्मीकि मुनींना वल्कल दिलें ७. तेव्हां शिष्याच्या हातांतून वल्कल घेऊन ते जितेंद्रिय वाल्मीकि स्नानसंध्येला योग्य असा प्रदेश पाहण्याकरितां सर्व बाजूंनीं प्रचंड वन अवलोकन करीत करीत चालले असतां ८ त्या वनासमीप आधिव्याधिरहित आणि ह्मणूनच मधुर स्वरानें युक्त असें एक क्रौंचपक्ष्यांचें जोडपें संचार करीत असतांना त्या भगवान् वाल्मीकि मुनींच्या दृष्टीस पडलें ९. तेव्हां ते मुनि अवलोकन करीत असतां नाहीं त्यांची परवा न करितां पापबुद्धि आणि ह्मणूनच निष्कारण वैराचा आश्रय करणाऱ्या निषादानें त्या जोडप्यापैकीं एका नराला वेध केला १०. इकडे निषादानें वेध केल्यामुळें सर्वांग रक्तानें भरून जाऊन भूतलावर तडफडत असलेल्या त्या पतीला अवलोकन करून त्याची भार्या करुण स्वरानें ओरडूं लागली ११. कारण, मस्तकीं आरक्तवर्ण तुऱ्यानें युक्त, विषयोपभोगामध्यें गुंग झाल्यामुळें मत्त आणि ह्मणूनच पसारलेल्या पंखांनीं युक्त असा जो स्वतःशीं संगत झालेला व अहोरात्र आपल्याबरोबर असणारा आपला पति पक्षी त्याचा तिला वियोग

कुरु त्वमृषिसत्तम ३१ धर्मात्मनो भगवतो लोके रामस्य धीमतः । वृत्तं कथय धीरस्य यथा ते नारदाच्छ्रुतम् ३२ रहस्यं च प्रकाशं च यद्वृत्तं तस्य धीमतः । रामस्य सहसौमित्रे राक्षसानां च सर्वशः ३३ वैदेह्याश्चैव यद्वृत्तं प्रकाशं यदि वा रहः । तच्चाप्यविदितं सर्वं विदितं ते भविष्यति ३४ न ते वागनृता काव्ये काचिदत्र भविष्यति । कुरु राम कथां पुण्यां श्लोकबद्धां मनोरमाम् ३५ यावत्स्थास्यन्ति गिरयः सरितश्च महीतले । तावद्रामायणकथा लोकेषु प्रचरिष्यति ३६ यावद्रामस्य च कथा त्वत्कृता प्रचरिष्यति । तावदूर्ध्वमधश्च त्वं मल्लोकेषु निवत्स्यसि ३७ इत्युक्त्वा भगवान्ब्रह्मा तत्रैवान्तरधीयत । ततः सशिष्यो भगवान्मुनिर्विस्मयमाययौ ३८ तस्य शिष्यास्ततः सर्वे जगुः श्लोकमिमं पुनः । मुहुर्मुहुः प्रीयमाणाः प्राहुश्च भृशविस्मिताः ३९ समाक्षरैश्चतुर्भिर्यः पादैर्गीतो महर्षिणा । सोनुव्याहरणाद्भूयः शोकः श्लोकत्वमागतः ४० तस्य बुद्धिरियं जाता महर्षेर्भावितात्मनः । कृत्स्नं रामायणं काव्यमीदृशैः करवाण्यहम् ४१

ग्रथित केलेला श्लोक यशोरूपच होईल; ह्याविषयीं संशय घेण्याचें प्रयोजन नाहीं ३०. कारण, हे ब्रह्मन्, माझ्या इच्छेनेंच तुझ्या ठिकाणीं ही सरस्वती प्रवृत्त झाली आहे. करितां, हे ऋषिश्रेष्ठा, तूं रामाचें संपूर्ण चरित्र वर्णन कर ३१. कारण, जगतामध्यें ताच मनोहर असून विचारी, धर्मात्मा व भगवान् असा तोच आहे. ह्यास्तव, नारदापासून श्रवण केल्याप्रमाणें तूं त्या बुद्धिप्रेरक रामाचें वृत्त कथन कर ३२ लक्ष्मणासहवर्तमान तो विचारी राम, सर्व राक्षस आणि विदेहदेशाधिपतीची कन्या सीता ह्यांचें प्रसिद्ध अथवा अप्रसिद्ध असें जें कांहीं चरित्र असेल तें इतरांना जरी विदित नसलें तरी तुला विदित होईल ३३,३४. ह्यासंबंधानें तुझी वाणी यत्किंचित्‌ही असत्य होणार नाहीं. तस्मात् , मनोहर व पुण्यदायक अशी श्लोकबद्ध रामकथा तूं वर्णन कर ३५. जोंपर्यंत पर्वत व नद्या भूतलावर राहतील तोंपर्यंत रामायणकथेचा लोकांमध्यें प्रचार राहील३६ आणि जोंपर्यंत तूं ग्रथित केलेली रामकथा लोकामध्यें राहील तोंपर्यंत ( क्रोध केल्यामुळें ) अधोभागीं राहण्यासच योग्य असलेलाही तूं सर्वांचे ऊर्ध्वभागीं असलेल्या माझ्या लोकांमध्यें वास्तव्य करशील " ३७. ह्याप्रमाणें सांगून भगवान् ब्रह्मदेव तेथेंच अंतर्धान पावले असतां शिष्यांसहवर्तमान भगवान् वाल्मीकि मुनींना आश्चर्य वाटलें३८. तदनंतर वारंवार आनंदित होत असलेल्या त्या मुनींच्या सर्व शिष्यांनीं ( मा निषाद ) हा श्लोक पुनरपि ह्मटला आणि अत्यंत विस्मित होऊन ते ह्मणाले ३९ " सारख्या अक्षरांनीं युक्त अशा चार चरणांमध्यें जो गाइला तो अत्यंतशोकोत्पत्तीनंतर गाइल्यामुळें विपुल झालेला शोकच श्लोकत्व पावला ४० आणि " अशा प्रकारच्या

उदारवृत्तार्थपदैर्मनोरमैस्तदास्य रामस्य चकार कीर्तिमान् । समाक्षरैः श्लोकशतैर्यशस्विनो यशस्करं काव्यमुदारदर्शनः ४२ तदुपगतसमाससंधियोगं सममधुरोपनतार्थवाक्यबद्धम् । रघुवरचरितं मुनिप्रणीतं दशशिरसश्च वधं निशामयध्वम् ४३ [१४३]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

श्रुत्वा वस्तु समग्रं तद्धर्मार्थसहितं हितम् । व्यक्तमन्वेषते भूयो यद्वृत्तं तस्य धीमतः १ उपस्पृश्योदकं सम्यङ्मुनिः स्थित्वा कृताञ्जलिः । प्राचीनाग्रेषु दर्भेषु धर्मेणान्वेषते गतिम् २ रामलक्ष्मणसीताभी राज्ञा दशरथेन च । सभार्येण सराष्ट्रेण यत्प्राप्तं तत्र तत्त्वतः ३ हसितं भाषितं चैव गतिर्यावच्च चेष्टितम् । तत्सर्वं धर्मवीर्येण यथावत्संप्रपश्यति ४ स्त्रीतृतीयेन च तथा यत्प्राप्तं चरता वने । सत्यसंधेन रामेण तत्सर्वं चान्ववेक्षत ५ ततः पश्यति धर्मात्मा

श्लोकांनीं आपण संपूर्ण रामायण काव्य ग्रथित करावें " ही त्या शुद्धांतःकरणानें युक्त असलेल्या महर्षीला इच्छा झाली आहे ४१. असो. ब्रह्मदेवाची आज्ञा झाल्यानंतर उदारचरितरूप अर्थाचीं बोधक पदें आणि सम अक्षरें ज्यामध्यें आहेत अशा शेंकडो मनोहर श्लोकांच्या योगानें उदारबुद्धि व कीर्तिमान् वाल्मीकिमुनींनीं ह्या यशस्वी रामाची कीर्ति वृद्धिंगत करणारें असें काव्य ग्रथित केलें आहे ४२. करितां, समास व संधि ह्यांची योजना ज्यामध्यें यथाशास्त्र केलेली आहे व न्यूनाधिक्यदोषरहित, माधुर्यगुणप्रधान आणि प्रसादगुणानें संपन्न अशा अर्थाचा बोध करणाऱ्या वाक्यांनीं जें ग्रथित केलें आहे असें वाल्मीकिमहर्षिप्रणीत रघुकुलश्रेष्ठरामचरितरूप व दशाननवधरूप काव्य तुम्ही श्रवण करा ४३. ह्याप्रमाणें महर्षिवाल्मीकिप्रणीत आदिकाव्य रामायणांतर्गत बालकांडांतील दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

धर्म, अर्थ व काम ह्यांनीं युक्त व हितावह असें संपूर्ण चरित्र नारदांपासून वाल्मीकि मुनींनीं श्रवण केलें आणि नंतर तें प्रसिद्ध करण्याकरितां ते मुनि उद्युक्त झाले १. तदनंतर यथाविधि आचमन करून व हात जोडून वाल्मीकि मुनि पूर्वाग्र दर्भांवर बसले असतां योगधर्मामुळें श्रीरामचरित्राचें ज्ञान त्यांना होऊं लागलें २. राम, लक्ष्मण, सीता, राजा दशरथ, त्याच्या भार्या आणि त्याच्या राष्ट्रांतील लोक ह्यांच्या संबंधाचें जें खरें खरें वृत्त ३ ह्मणजे त्यांचें हास्य, भाषण, गमन व इतरही यच्चयावत् आचरण हें सर्व योगरूप धर्मबलानें अगदीं यथावत् वाल्मीकि मुनींनीं अवलोकन केलें ४. त्याचप्रमाणें दुसरा लक्ष्मण व तिसरी सीता यांसह रामानें वनामध्यें संचार करीत असलेल्या सत्यवचनी रामाचें जें चरित्र तेंही सर्व वाल्मीकि मुनींच्या ध्यानांत आलें ५.

तत्सर्वं योगमास्थितः । पुरा यत्तत्र निर्वृत्तं पाणावामलकं यथा ६ तत्सर्वं तत्त्वतो दृष्ट्वा धर्मेण स महामतिः । अभिरामस्य रामस्य तत्सर्वं कर्तुमुद्यतः ७ कामार्थगुणसंयुक्तं धर्मार्थगुणविस्तरम् । समुद्रमिव रत्नाढ्यं सर्वश्रुतिमनोहरम् ८ स यथा कथितं पूर्वं नारदेन महात्मना । रघुवंशस्य चरितं चकार भगवान्मुनिः ९ जन्म रामस्य सुमहद्वीर्यं सर्वानुकूलताम् । लोकस्य प्रियतां क्षान्तिं सौम्यतां सत्यशीलताम् १० नाना चित्राः कथाश्चान्या विश्वामित्रसहायने । जानक्याश्च विवाहं च धनुषश्च विभेदनम ११ रामरामविवादं च गुणान्दाशरथेस्तथा । तथाभिषेकं रामस्य कैकेय्या दुष्टभावताम् १२ विघातं चाभिषेकस्य रामस्य च विवासनम् । राज्ञः शोकं विलापं च परलोकस्य चाश्रयम १३ प्रकृतीनां विषादं च प्रकृतीनां विसर्जनम् । निषादाधिपसंवादं सूतोपावर्तनं तथा १४ गङ्गायाश्चापि संतारं भरद्वाजस्य दर्शनम । भरद्वाजाभ्यनुज्ञानाच्चित्रकूटस्य दर्शनम् १५ वास्तुकर्मनिवेशं च भरतागमनं तथा । प्रसादनं च रामस्य पितुश्च सलिलक्रि-

सारांश, त्या रामावतारामध्यें जें घडलें तें सर्व -योगाचें अवलंबन केलेल्या धर्मात्म्या-वाल्मीकिमुनींच्या लक्ष्यांत करतलामलकवत् पूर्वीच येऊन चुकलें ६ आणि सौंदर्यसंपन्न रामाचें तें सर्व चरित्र ह्याप्रमाणें योगरूप धर्माच्या योगानें महामति वाल्मीकि मुनींनीं यथार्थ अवलोकन केल्यावर कामरूपपुरुषार्थफलानें युक्त आणि धर्मार्थरूपफलानें विस्तृत ( म्हणजे धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गाचें प्रतिपादक व प्रापक ), समुद्राप्रमाणें रत्नांनीं भरलेलें व म्हणूनच कोणाच्याही कानाला मधुर लागणारें अशाप्रकारचें त्या सर्व चरित्रासंबंधानें एक काव्य करण्यास ते उद्युक्त झाले ७,८ आणि महात्म्या नारदांनीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें भगवान् वाल्मीकि मुनींनीं रघुवंशामध्यें अवतीर्ण झालेल्या रामाचें चरित्र ग्रथित केलें ९. सारांश, रामाची उत्पत्ति, प्रचंड पराक्रम, सर्वांशीं अनुकूल वर्तन, लोकप्रियता, सहनशीलता, सौम्यपणा, सत्यनिष्ठता १०, विश्वामित्रमुनींसहवर्तमान जातवेळीं झालेल्या आश्चर्यकारक गोष्टी व इतरही कथा, जानकीचा विवाह, धनुर्भंग ११, रामपरशुरामसंवाद, दाशरथिरामाचे गुण, रामाभिषेक, कैकेयीचा दुष्टपणा १२, अभिषेक हाणून पाडणें, रामाला वनामध्यें पाठविणें, दशरथ राजाचा शोक व विलाप आणि त्यानें केलेला परलोकाचा आश्रय १३, प्रजाजनांना झालेलें दुःख, त्यांस अयोध्येप्रत परावर्तन, गुहनामक निषादराजाशीं झालेला संवाद, सुमंत्रनामक सारथ्याला परत पाठविणें १४, गंगोल्लंघून जाणें, भरद्वाज मुनींचें दर्शन, त्यांच्या संमतीनें चित्रकूट पर्वताचें दर्शन १५, त्या पर्वतावर गृह निर्माण करून राहणें, भरताचें आगमन,

याम् १६ पादुकाऽयाभिषेकं च नन्दिग्रामनिवासनम् । दण्डकारण्यगमनं विराधस्य वधं तथा १७ दर्शनं शरभङ्गस्य सुतीक्ष्णेन समागमम् । अनसूयासमास्यां च अङ्गरागस्य चार्पणम् १८ दर्शनं चाप्यगस्त्यस्य धनुषो ग्रहणं तथा । शूर्पणख्याश्च संवादं विरूपकरणं तथा १९ वधं खरत्रिशिरसोरुत्थानं रावणस्य च । मारीचस्य वधं चैव वैदेह्या हरणं तथा २० राघवस्य विलापं च गृध्रराजनिबर्हणम् । कबन्धदर्शनं चैव पम्पायाश्चापि दर्शनम् २१ शबरीदर्शनं चैव फलमूलाशनं तथा । प्रलापं चैव पम्पायां हनूमद्दर्शनं तथा २२ ऋष्यमूकस्य गमनं सुग्रीवेण समागमम् । प्रत्ययोत्पादनं सख्यं वालिसुग्रीवविग्रहम् २३ वालिप्रमथनं चैव सुग्रीवप्रतिपादनम् । ताराविलापं समयं वर्षरात्रनिवासनम् २४ कोपं राघवसिंहस्य बलानामुपसंग्रहम् । दिशः प्रस्थापनं चैव पृथिव्याश्च निवेदनम् २५ अङ्गुलीयकदानं च ऋक्षस्य बिलदर्शनम् । प्रायोपवेशनं चैव संपातेश्चापि दर्शनम् २६ पर्वतारोहणं चैव सागरस्यापि लङ्घनम् । समुद्रवचनाच्चैव मैनाकस्य च दर्शनम् २७ राक्षसीतर्जनं चैव च्छायाग्राहस्य दर्शनम् । सिंहिकायाश्च निधनं लङ्का-

भरतानें रामाला प्रसन्न करून घेणें, पित्या दशरथाची उदकक्रिया १६, रामाच्या श्रेष्ठ पादुकांना भरतानें केलेला राज्याभिषेक, नंदिग्रामामध्यें वास्तव्य, दंडकारण्यामध्यें रामाचें गमन, विराधराक्षसाचा वध १७, शरभंगदर्शन, सुतीक्ष्णाशीं समागम, अनसूयेनें सीतेला उटणें देणें १८, अगस्त्यमुनींचें दर्शन, त्यांच्यापासून धनुष्याची प्राप्ति. शूर्पणखेशीं संवाद व तिला विरूप करणें १९, खर आणि त्रिशिरस् यांचा वध, रावणाचें उत्थान, मारीच राक्षसाचा वध, सीताहरण २०, रामविलाप, गृध्रराज जटायूचा वध, कबंधदर्शन, पंपासरोवराचें दर्शन २१, शबरीची भेट, तेथें फलमूलभक्षण, पंपासरोवरावर शोक, हनुमानाची भेट २२, ऋष्यमूकपर्वताप्रत गमन, सुग्रीवाची भेट, स्वसामर्थ्याविषयीं रामानें सुग्रीवाचे ठिकाणीं विश्वास उत्पन्न करणें, त्याच्याशीं सख्य, वालि आणि सुग्रीव यांचें युद्ध २३, वालीचा वध, सुग्रीवाला राज्यावर बसविणें, तारेचा विलाप, पर्जन्यकाल संपेपर्यंत मी त्या प्रस्रवण पर्वतावर वास्तव्य करीन ह्मणून रामानें सुग्रीवाशीं केलेला संकेत व त्याप्रमाणें पर्जन्यकाल संपेपर्यंत त्याचें प्रस्रवण पर्वतावर वास्तव्य २४, रघुवंशश्रेष्ठ रामाचा कोप, सेनासंग्रह, वानरांना चोहोंकडे पाठविणें व त्यांना पृथ्वीवरील स्थलें सांगणें २५, रामानें हनुमानाला अंगठी देणें, ऋक्षबिलदर्शन, वानरांचें प्रायोपवेशन ( ह्मणजे कांहीं एक न खातां समुद्रासमीप वास्तव्य ) संपातीची भेट २६, हनुमानानें महेंद्र पर्वतावर आरोहण, समुद्राचें उल्लंघन, समुद्राच्या सांगण्यावरून मैनाक

मलयदर्शनम् २८ रात्रौ लङ्काप्रवेशं च एकस्यापि विचिन्तनम् । आपानभूमिगमनमवरोधस्य दर्शनम् २९ दर्शनं रावणस्यापि पुष्पकस्य च दर्शनम् । अशोकवनिकायानं सीतायाश्चापि दर्शनम् ३० अभिज्ञानप्रदानं च सीतायाश्चापि भाषणम् । राक्षसीतर्जनं चैव त्रिजटास्वप्नदर्शनम् ३१ मणिप्रदानं सीताया वृक्षभङ्गं तथैव च । राक्षसीविद्रवं चैव किंकराणां निबर्हणम् ३२ ग्रहणं वायुसूनोश्च लङ्कादाहाभिगर्जनम् । प्रतिप्लवनमेवाथ मधूनां हरणं तथा ३३ राघवाश्वासनं चैव मणिनिर्यातनं तथा । संगमं च समुद्रेण नलसेतोश्च बन्धनम् ३४ प्रतारं च समुद्रस्य रात्रौ लङ्कावरोधनम् । विभीषणेन संसर्गं वधोपायनिवेदनम् ३५ कुम्भकर्णस्य निधनं मेघनादनिबर्हणम् । रावणस्य विनाशं च सीतावाप्तिमरेः पुरे ३६ विभीषणाभिषेकं च पुष्पकस्य च दर्शनम् । अयोध्यायाश्च गमनं भरद्वाजसमागमम् ३७ प्रेषणं वायुपुत्रस्य भरतेन समागमम् ३८ रामाभिषेकाभ्युदयं सर्वसैन्यविसर्जनम् । स्वराष्ट्ररञ्जनं चैव वैदेह्याश्च विसर्जनम् ३९ अनागतं च यत्किंचिद्रामस्य वसुधातले । तच्चका-

पर्वताचें दर्शन २७, सुरसानामक नागमातेनें राक्षसीचें रूप धारण करून हनुमानाला दाखविलेली भीति, छायेनें आकर्षण करण्यास प्रवृत्त झालेल्या सिंहिका राक्षसीचें हनुमानाला झालेलें दर्शन व त्याच्याकडून तिला आलेलें मरण, लंका आणि मलय पर्वत यांचें हनुमानाला झालेलें दर्शन २८, रात्रीं लंकेमध्यें त्याचा प्रवेश, एकटा असतांना त्याचा आपल्याशींच चाललेला विचार, पानभूमीप्रत गमन, अंतःपुरदर्शन २९, रावणदर्शन, पुष्पकविमानदर्शन, अशोक वनामध्यें गमन, त्या ठिकाणीं सीतेचें दर्शन ३०, रामानें दिलेली खूण सीतेला देणें, तिच्याशीं संभाषण, राक्षसींनीं सीतेला दाखविलेलें भय, त्रिजटानामक राक्षसीला पडलेलें स्वप्न ३१, खुणेकरितां हनुमानापाशीं सीतेनें केलेलें रत्नप्रदान, वृक्षभंग, राक्षसींची धावाधाव, रावणसेवकांचा वध ३२, रावणसेवकांनें मारुतीला धरणें, लंकादहन झाल्यामुळें तेथील रहिवाशांची रडारड, पुनरपि समुद्रोल्लंघन, मधुहरण ३३, रामाश्वासन, सीतेनें दिलेलें रत्न रामाला अर्पण करणें, समुद्राशीं समागम, नलकृत सेतुबंधन ३४, सेनेचें समुद्र तरून जाणें, रात्रीं लंकेला वेढा देणें, बिभीषणाची भेट, वधोपायकथन ३५, कुंभकर्णाचें मरण, मेघनादाचा वध, रावणाचा वध, रावणरूप शत्रूच्या नगरामध्यें सीतेची प्राप्ति ३६, बिभीषणाचा राज्याभिषेक, पुष्पकविमानदर्शन, अयोध्येकडे गमन, भरद्वाज मुनींचा समागम ३७, मारुतीला पुढें पाठविणें, भरतभेट ३८, रामाभिषेकोत्सव, सर्व सैन्याला जाण्याची अनुज्ञा

रोत्तरे काव्ये वाल्मीकिर्भगवानृषिः ४० [१८३]इत्यार्षे० तृतीयः सर्गः॥ ३॥

प्राप्तराज्यस्य रामस्य वाल्मीकिर्भगवानृषिः । चकार चरितं कृत्स्नं विचित्रपदमर्थवत् १ चतुर्विंशत्सहस्राणि श्लोकानामुक्तवानृषिः । तथा सर्गशतान्पञ्च षट्काण्डानि तथोत्तरम् २ कृत्वा तु तन्महाप्राज्ञः सभविष्यसहोत्तरम् । चिन्तयामास को न्वेतत्प्रयुञ्जीयादिति प्रभुः ३ तस्य चिन्तयमानस्य महर्षेर्भावितात्मनः । अगृहीतां ततः पादौ मुनिवेषौ कुशीलवौ ४ कुशीलवौ तु धर्मज्ञौ राजपुत्रौ यशस्विनौ । भ्रातरौ स्वरसंपन्नौ ददर्शाश्रमवासिनौ ५ स तु मेधाविनौ दृष्ट्वा वेदेषु परिनिष्ठितौ । वेदोपबृंहणार्थाय तावग्राहयत प्रभुः ६ काव्यं रामायणं कृत्स्नं सीतायाश्चरितं महत् । पौलस्त्यवधमित्येवं चकार चरितव्रतः ७ पाठ्ये गेये च मधुरं प्रमाणैस्त्रिभिरन्वितम् । जातिभिः सप्तभिर्युक्तं तन्त्रीलयसमन्वितम् ८ रसैः शृङ्गारकरुणहास्यरौद्रभयानकैः । वीरादिभी रसैर्युक्तं काव्यमेतदगायताम् ९ तौ तु गान्धर्वतत्त्वज्ञौ स्थानमूर्छन-

---

देणें, स्वराष्ट्राला आनंदित करणें व सीतेचा त्याग करणें ३९ हें आणि ह्या शिवायही भूतलावर जें कांहीं रामचरित्र व्हावयाचें होतें तें सर्व भगवान् वाल्मीकि मुनींनीं उत्कृष्ट काव्यामध्यें ग्रथित केलें ४०. ह्याप्रमाणें० बालकांडापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३॥

आश्चर्यकारक शब्दांनीं युक्त आणि अर्थानें भरलेलें असें भगवान् वाल्मीकिमुनींनीं राज्यावर आलेल्या रामाचें संपूर्ण चारित्र प्रतिपादन करणारें काव्य केलें १. त्या काव्यामध्यें वाल्मीकिमुनींनीं चोवीस हजार श्लोक ग्रथित करून त्यांचे पांचशें सर्ग, सहा कांडें आणि त्याचप्रमाणें सातवें उत्तरकांड असे विभाग केले २ आणि महाबुद्धिमान् वाल्मीकिमुनींनीं भविष्य आणि उत्तरकांड यांसहवर्तमान तें काव्य ग्रथित केल्यावर "हें पठण करून सभेमध्यें सभ्यांच्या कानावर घालण्यास कोण समर्थ आहे" ह्मणून तें चिंतन करूं लागले ३. असो. शुद्धांतःकरणानें युक्त असलेले महर्षि वाल्मीकि ह्याप्रमाणें त्याचें चिंतन करीत आहेत तोंच मुनिवेष धारण करणाऱ्या कुशलवांनीं "आह्मी गाणारे आहोंत" असें ह्मणून त्यांचे पाय धरिले असतां ४, धर्मज्ञ, यशस्वी, मधुर स्वरानें युक्त, बुद्धिमान् आणि वेदपारंगत असे ते आश्रमवासी राजपुत्र कुशलव असल्याचें अवलोकन करून समर्थ वाल्मीकिमुनींनीं वेदाचें पुष्टीकरण होण्याकरितां त्यांना हें रामायण काव्य पढविलें ५,६. सारांश, संपूर्ण रामचरित्र व सीताचरित्र प्रतिपादन करणारें असें पौलस्त्यवध या नांवाचें मोठें काव्य तपोनिष्ठ वाल्मीकिमुनींनीं केलें ७. पठण व गायन होऊं लागलें असतां मधुर लागणारें, द्रुत, मध्य व विलंबित हीं तीन प्रमाणें, सप्तस्वर तंतुवाद्यांचा मेळ आणि त्याचप्रमाणें शृंगार, करुण, हास्य,

कोविदौ । भ्रातरौ स्वरसंपन्नौ गन्धर्वाविव रूपिणौ १० रूपलक्षणसंपन्नौ मधुरस्वरभाषिणौ । बिम्बादिवोत्थितौ बिम्बौ रामदेहात्तथापरौ ११ तौ राजपुत्रौ कार्त्स्न्येन धर्म्यमाख्यानमुत्तमम् । वाचोविधेयं तत्सर्वं कृत्वा काव्यमनिन्दितौ १२ ऋषीणां च द्विजातीनां साधूनां च समागमे । यथोपदेशं तत्त्वज्ञौ जगतुस्तौ समाहितौ ॥ महात्मानौ महाभागौ सर्वलक्षणलक्षितौ १३ तौ कदाचित्समेतानामृषीणां भावितात्मनाम् । मध्येसभं समीपस्थाविदं काव्यमगायताम् १४ तच्छ्रुत्वा मुनयः सर्वे बाष्पपर्याकुलेक्षणाः । साधु साध्विति तावूचुः परं विस्मयमागताः १५ ते प्रीतमनसः सर्वे मुनयो धर्मवत्सलाः । प्रशशंसुः प्रशस्तव्यौ गायमानौ कुशीलवौ १६ अहो गीतस्य माधुर्यं श्लोकानां च विशेषतः । चिरनिर्वृत्तमप्येतत्प्रत्यक्षमिव दर्शितम् १७ प्रविश्य तावुभौ सुष्ठु तथा भावमगायताम् । सहितौ

रौद्र, भयानक, वीर इत्यादि रसांनीं युक्त असलेलें हें काव्य त्यांनीं गाइलें ८,९. सारांश, संगीतशास्त्रतत्त्वज्ञ, स्थानें व मूर्च्छना यांविषयीं निपुण, स्वरमाधुर्यसंपन्न, गंधर्वांप्रमाणें रूपवान् १०, देहस्थ शुभ लक्षणांनीं युक्त, मधुर वाणीनें भाषण करणारे आणि सूर्यादिकांच्या बिंबांपासून निघणाऱ्या प्रतिबिंबांप्रमाणें साक्षात् रामदेहापासून उत्पन्न झालेले प्रतिरामदेहच कीं काय ११ असे ते निर्दोष व तत्त्ववेत्ते राजपुत्र धर्माला अनुसरून असलेलें तें उत्कृष्ट काव्य सर्व तोंडपाठ करून ऋषि, द्विज आणि भगवद्भक्त यांच्या समाजामध्यें सावधानचित्तपूर्वक पढविल्याप्रमाणें गाऊं लागले १२, १३. एकदां शुद्धांतःकरणानें युक्त अशा एकत्र जमलेल्या ऋषींच्या सभेमध्यें ऋषींसमीप बसून ते सर्वलक्षणसंपन्न महात्मे व महाभाग्यवान् कुशलव हें काव्य गाऊं लागले १४. तेव्हां तें श्रवण करितांक्षणीं सर्व मुनींचे नेत्र अश्रूंनीं भरून आले आणि अत्यंत विस्मित होऊन " शाबास, शाबास " असें ते त्यांना ह्मणाले १५. तात्पर्य, अंतःकरणामध्यें प्रसन्न झालेल्या त्या सर्व धर्मनिष्ठ मुनींनीं " काअहो हें गायन मधुर आहे ! आणि विशेषेंकरून श्लोक तरी कितीहो मधुर आहेत ! अहो, या गोष्टी घडून आज पुष्कळ दिवस झाले आहेत तरी त्या जणु प्रत्यक्ष घडतच आहेत असें यांनीं दर्शविलें ! अहो, सभेमध्यें बरोबर प्रविष्ट झालेल्या या उभयतांनीं सप्त स्वरांमध्यें गाण्यास योग्य व मधुर असें ह्या काव्याचें इतक्या कांहीं रंगानें गायन केलें आहे कीं त्यांतील अभिप्राय श्रोत्यांच्या अंतःकरणांत ठसून त्यांचें अंतःकरण तन्मय होऊन गेलें आहे "

१ हृदयग्रीवा व कपोलफलक यांमध्यें असलेल्या प्राणसंचाराच्या जागेला स्थान असें ह्मणतात.
२ ज्या गानामध्यें स्वर पूर्ण असतात त्याला मूर्च्छना असें ह्मणतात.

मधुरं रक्तं संपन्नं स्वरसंपदा १८ एवं प्रशस्यमानौ तौ तपःश्लाघ्यैर्महर्षिभिः। संरक्ततरमत्यर्थं मधुरं तावगायताम् १९ प्रीतः कश्चिन्मुनिस्ताभ्यां संस्थितः कलशं ददौ। प्रसन्नो वल्कलं कश्चिद्ददौ ताभ्यां महायशाः २० अन्यः कृष्णाजिनमदाद्यज्ञसूत्रं तथापरः । कश्चित्कमण्डलुं प्रादान्मौञ्जीमन्यो महामुनिः २१ बृसीमन्यस्तदा प्रादात्कौपीनमपरो मुनिः । ताभ्यां ददौ तदा हृष्टः कुठारमपरो मुनिः २२ काषायमपरो वस्त्रं चीरमन्यो ददौ मुनिः। जटाबन्धनमन्यस्तु काष्ठरज्जुं मुदान्वितः २३ यज्ञभाण्डमृषिः कश्चित्काष्ठभारं तथापरः । औदुम्बरीं बृसीमन्यः स्वस्ति केचित्तदावदन् २४ आयुष्यमपरे प्राहुर्मुदा तत्र महर्षयः । ददुश्चैवं वरान्सर्वे मुनयः सत्यवादिनः २५ आश्चर्यमिदमाख्यानं मुनिना संप्रकीर्तितम् । परं कवीनामा-

अशा रीतीनें प्रशंसेस पात्र असलेल्या कुशलवांची गातांना स्तुति केली १६,१७,१८. ह्याप्रमाणें तपाच्या योगानें स्तुतीस पात्र झालेले महर्षि त्यांची प्रशंसा करूं लागले असतां त्यांनीं अत्यंत मधुर असें फारच खुलवून गायन केलें १९. तेव्हां तेथें बसलेल्या एका मुनींनीं संतुष्ट होऊन त्यांना आपला कलश अर्पण केला; दुसऱ्या एका महाकीर्तिमान् मुनींनीं प्रसन्न होऊन आपलें वल्कल त्यांना देऊन टाकिलें २०; एकांनीं कृष्णाजिन दिलें; एकांनीं यज्ञोपवीत अर्पण केलें; कोणी कमंडलु दिला; दुसऱ्या एका महर्षींनीं मौंजी देऊन टाकिली २१; एकांनीं आपलें आसनच दिलें; दुसऱ्या एका मुनींनीं आपली लंगोटीच त्यांना देऊन टाकिली; एका मुनींनीं आनंदित होऊन आपली कुऱ्हाडच त्यांना दिली २२; एकांनीं आपली छाटीच दिली; दुसऱ्या एका मुनींनीं आपणापाशीं असलेलें फडकेंच त्यांना देऊन टाकिलें; एकांनीं आपलें जटाबंधन दिलें; दुसऱ्या एकांनीं आनंदित होऊन आपली काष्ठें आणण्याची दोरी त्यांना दिली २३; एका ऋषींनीं आपलीं यज्ञपात्रेंच त्यांना अर्पण केलीं; एकांनीं आपल्यापाशीं असलेलें काष्ठांचें ओझेंच त्यांना दिलें आणि एकांनीं आपला बसावयाचा उंबराचा पाटच त्यांना देऊन टाकिला. ज्यांच्यापाशीं त्या समंतल्यासमंत देण्याला कांहीं नव्हतें त्यांनीं "कल्याण कल्याण" म्हणून नुसते आशीर्वादच दिले २४ आणि तशाच प्रकारच्या दुसऱ्या कांहीं अकिंचन महर्षींनीं "तुम्हांला दीर्घायुष्य प्राप्त होवो" म्हणून मोठ्या आनंदानें त्यांना सांगितलें. सारांश, ज्यांची वाणी कधींही असत्य होणारी नाहीं अशा सर्व मुनींनीं ह्याप्रमाणें त्यांना वर दिले आणि पुनरपि ते त्यांना म्हणाले २५ "हे कुमार हो, तुम्ही सर्व प्रकारच्या गायनांमध्यें निपुण आहां; वाल्मीकि मुनींनीं केलेलें हें आख्यान आश्चर्यकारक असून कवींना सर्वोत्कृष्ट आधार होण्याजोगें आहे. त्याचप्रमाणें

धारं समाप्तं च यथाक्रमम् २६ अभिगीतमिदं गीतं सर्वगीतिषु कोविदौ। आयुष्यं पुष्टिजननं सर्वश्रुतिमनोहरम् २७ प्रशस्यमानौ सर्वत्र कदाचित्तत्र गायकौ। रथ्यासु राजमार्गेषु ददर्श भरताग्रजः २८ स्ववेश्म चानीय ततो भ्रातरौ स कुशीलवौ। पूजयामास पूजार्हौ रामः शत्रुनिवर्हणः २९ आसीनः काञ्चने दिव्ये स च सिंहासने प्रभुः। उपोपविष्टैः सचिवैर्भ्रातृभिश्च समन्वितः ३० दृष्ट्वा तु रूपसंपन्नौ विनीतौ भ्रातरावुभौ। उवाच लक्ष्मणं रामः शत्रुघ्नं भरतं तथा ३१ श्रूयतामेतदाख्यानमनयोर्देववर्चसोः। विचित्रार्थपदं सम्यग्गायकौ समचोदयत् ३२ तौ चापि मधुरं रक्तं स्वचित्तायतनिःस्वनम्। तन्त्रीलयवदत्यर्थं विश्रुतार्थमगायताम् ३३ ह्लादयत्सर्वगात्राणि मनांसि हृदयानि च। श्रोत्राश्रयसुखं गेयं तद्बभौ जनसंसदि ३४ इमौ मुनी पार्थिवलक्षणान्वितौ कुशीलवौ चैव महातपस्विनौ। ममापि तद्भू-

---

गायनाला योग्य असेंच हें आख्यान आहे; तुह्मीही याचें चांगलें गायन करून क्रमानें समाप्त केलें आहेत व हें आख्यान कोणींही ऐकिलें असतां त्याला मनोहर लागणारें असून आयुर्वर्धक व अभ्युदयकारक असें आहे २६, २७. ह्याप्रमाणें लहान मोठ्या रस्त्यांतून सर्व ठिकाणीं अयोध्येमध्यें ज्यांची प्रशंसा होत आहे अशा त्या गायकांना भरताग्रज रामानें अवलोकन केलें २८ आणि पूजेला पात्र असलेल्या त्या भ्रात्या कुशलवांना आपल्या घरीं आणून शत्रुनाशक रामानें त्यांचें पूजनही केलें २९. नंतर समीप बसलेल्या मंत्र्यांनीं व भ्रात्यांनीं युक्त असलेला तो प्रभु राम सुवर्णमय अशा दिव्य सिंहासनावर बसला असतांना ३० नम्र व रूपवान् अशा त्या उभयतां भ्रात्यांना अवलोकन करून " देवांप्रमाणें तेजस्वी असलेल्या ह्या उभयतांचें-आश्चर्यकारक अर्थ व शब्द ह्यांनीं युक्त असलेलें—हें आख्यान श्रवण करा " ह्मणून लक्ष्मण, शत्रुघ्न व भरत ह्यांना ह्मणाला आणि तें गाण्याविषयीं त्यानें त्या गायकांना सांगितलें व त्यांनींही आपल्या बलाचें अतिक्रमण न होऊं देतां श्रोत्यांच्या चित्ताला आल्हाद होईल अशारीतीनें—मधुर, प्रसादानें परिपूर्ण, तंतुवाद्यांशीं जुळण्यास योग्य आणि अत्यंत उत्तान अर्थानें युक्त असें—तें आख्यान गाऊन दाखविलें ३१, ३२, ३३. गायनाला विषयभूत असलेलें तें आख्यान त्या जनसमाजामध्यें लोकांच्या गात्रांवर रोमांच उठविणारें, मनाला आणि आत्म्याला आनंद देणारें व श्रवणेंद्रियाला सुखावह असें झालें ३४. असो. गायन सुरू होण्याचे पूर्वी राम पुनरपि लक्ष्मणादिकांना ह्मणाला " राजचिन्हांनीं युक्त असलेले हे महातपस्वी कुशलव मुनि (शब्दार्थालंकारादिविषयक) महावैभवानें संपन्न असलेलें चरित्र गात आहेत आणि हें काव्य व ह्याचें

तिकरं प्रचक्षते महानुभावं चरितं निबोधत ३५ ततस्तु तौ रामवचः- प्रचोदितावगायतां मार्गविधानसंपदा । स चापि रामः परिषद्गतः शनैर्बुभूषयासक्तमना बभूव ३६ [ २१९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

सर्वापूर्वमियं येषामासीत्कृत्स्ना वसुंधरा । प्रजापतिमुपादाय नृपाणां जयशालिनाम् १ येषां स सगरो नाम सागरो येन खानितः । षष्टिपुत्रसहस्राणि यं यान्तं पर्यवारयन् २ इक्ष्वाकूणामिदं तेषां राज्ञां वंशे महात्मनाम् । महदुत्पन्नमाख्यानं रामायणमिति श्रुतम् ३ तदिदं वर्तयिष्यावः सर्वं निखिलमादितः । धर्मकामार्थसहितं श्रोतव्यमनसूयता ४ कोशलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान् । निविष्टः सरयूतीरे प्रभूतधनधान्यवान् ५ अयोध्या नाम नगरी तत्रासील्लोकविश्रुता । मनुना मानवेन्द्रेण

श्रवण माझ्याही अभ्युदयाला कारणीभूत होणारें आहे ह्मणून वृद्ध जन सांगत आहेत. करितां, आदरपूर्वक तुह्मी हें श्रवण करा " ३५. तदनंतर रामाच्या तोंडची आज्ञा झाल्यावर ते कुशलव मार्गसंज्ञक गायन पद्धतीला उपयुक्त अशा सामग्रीनें गायन करूं लागले असता आपलें चरित्र चिरकाल रहावें ह्या इच्छेनें सभेमध्यें असलेल्या रामाचेंही मन तें ( गायन ) श्रवण करण्याविषयीं आसक्त झालें ३६. ह्याप्रमाणें महर्षिवाल्मीकिप्रणीत रामायणरूप आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चवथा सर्ग समाप्त झाला ॥ ४ ॥

ऐहिक व आमुष्मिक असें सर्वप्रकारचें अपूर्व फल प्राप्त होण्याला साधन असलेली ही संपूर्ण पृथ्वी पूर्वी प्रजाधिपति वैवस्वत मनु आदिकरून होऊन गेलेल्या जयशाली राजांच्या ताब्यांत होती १. सागर खणलेला सगर हा त्यांच्या वंशामध्यें राजा होऊन गेला. तो जाऊं लागला असतां साठ हजार पुत्र त्याचे बरोबर जात असत २. असो. त्या महात्म्या इक्ष्वाकुवंशज राजांच्या वंशासंबंधानें रामायण ह्या नांवानें प्रसिद्ध असलेलें मोठें आख्यान उत्पन्न झालेलें आहे ३. व तेंच सर्वांगानीं परिपूर्ण असलेलें हें रामायण आह्मी अगदीं प्रथमपासून पूर्णपणें कथन करणार आहोंत. तें धर्म, काम व अर्थ. ह्यांसहवर्तमान मोक्षाला कारणीभूत होणारें असल्यामुळें निर्मत्सर पुरुषानें श्रवण करण्यास योग्य आहे ४. सरयू नदीचे तीरीं कोशल ह्मणून एक मोठा देश आहे. त्यांत धनधान्याची समृद्धि आहे; त्यांतील लोक आनंदित आहेत व उत्तरोत्तर त्या देशाची अभिवृद्धि होत आहे ५. त्या देशामध्यें मानवाधिपति मनूनें स्वतः निर्माण

१ देशी आणि मार्ग असें दोनप्रकारचें गायन असतें. पैकीं प्राकृत भाषेंतील गायनाला देशी असें ह्मणतात व संस्कृत गायनाला मार्ग असें ह्मणतात.

या पुरी निर्मिता स्वयम् ६ आयता दश च द्वे च योजनानि महापुरी । श्रीमती त्रीणि विस्तीर्णा सुविभक्तमहापथा ७ राजमार्गेण महता सुविभक्तेन शोभिता । मुक्तपुष्पावकीर्णेन जलसिक्तेन नित्यशः ८ तां तु राजा दशरथो महाराष्ट्रविवर्धनः । पुरीमावासयामास दिवि देवपतिर्यथा ९ कपाटतोरणवतीं सुविभक्तान्तरापणाम् । सर्वयन्त्रायुधवतीमुषितां सर्वशिल्पिभिः १० सूतमागधसंबाधां श्रीमतीमतुलप्रभाम् । उच्चाट्टालध्वजवतीं शतघ्नीशतसंकुलाम् ११ वधूनाटकसङ्घैश्च संयुक्तां सर्वतः पुरीम् । उद्यानाम्रवणोपेतां महतीं सालमेखलाम् १२ दुर्गगम्भीरपरिखां दुर्गामन्यैर्दुरासदाम् । वाजिवारणसंपूर्णां गोभिरुष्ट्रैः खरैस्तथा १३ सामन्तराजसङ्घैश्च बलिकर्मभिरावृताम् । नानादेशनिवासैश्च वणिग्भिरुपशोभिताम् १४ प्रासादै रत्नविकृतैः पर्वतैरिव शोभिताम् । कूटागारैश्च संपूर्णा-

---

केलेली अशी एक अयोध्या नांवाची जगद्विख्यात नगरी आहे ६. त्या मोठ्या नगरीची लांबी अठ्ठेचाळीस कोस असून रुंदी बारा कोस आहे आणि ती नगरी वैभवसंपन्न असून स्पष्ट अशा बाह्य मार्गांनीं युक्त आहे ७. प्रत्यहीं उदक सिंचन करून ज्यांवर मोतीं व फुलें उधळलीं जातात अशा मोठ्या भव्य राजमार्गांनें तिला शोभा आलेली आहे ८. स्वर्गामध्यें ज्याप्रमाणें देवाधिपति इंद्रानें अमरावती नगरी वसविली त्याप्रमाणें प्रचंड राष्ट्राचें पालनपोषण करणाऱ्या दशरथ राजानें त्या मनुनिर्मित नगरीमध्यें पूर्वीपेक्षा अधिक लोकवसति केली ( आणि तिला शोभा आणिली ) ९. त्या नगरीला ( सर्व बाजूंनीं ) वेशी व कमानी आहेत ; एकमेकापासून चांगल्या नियमित अंतरानीं युक्त असे बाजार तिच्यामध्यें आहेत आणि सर्वप्रकारचीं यंत्रें व आयुधें यांनीं ती युक्त असून सर्वप्रकारच्या कारागिरांनीं तिच्यामध्यें वास्तव्य केलेलें आहे १०. स्तुतिपाठक आणि भाट त्या भव्य नगरीमध्यें भरलेले आहेत; उंच उंच वाडे व ध्वज तिच्यामध्यें आहेत आणि अतुल शोभेनें युक्त असलेली ती नगरी शेंकडों तोफानीं गजबजलेली आहे ११. स्त्रियांच्या नृत्यशाला त्या नगरीमध्यें जिकडेतिकडे आहेत ; बागा आणि आंबराया ह्यांनीं ती युक्त आहे आणि सभोंवतीं त्या नगरीला तटबंदी आहे १२. किल्ले आणि अगाध खंदक ह्यांनीं ती युक्त असल्यामुळें स्वकीयांनाही प्रवेश करण्यास कठीण असून शत्रूंना तर समीप जाण्यासही अशक्य आहे; अश्व व गज ह्यांनीं ती भरलेली असून बैल, उंट, गर्दभ १३ आणि कर देण्याकरितां आलेले मांडलिक राजांचे समुदाय यांनीं गजबजलेली आहे, देशोदेशीच्या व्यापाऱ्यांनीं तिला शोभा आलेली असून १४ रत्नखचित अशा पर्वतप्राय देवालयांनीं ती सुशोभित आहे

मिन्द्रस्येवामरावतीम् १५ चित्रामष्टापदाकारां वरनारीगणायुताम् । सर्वरत्नसमाकीर्णां विमानगृहशोभिताम् १६ गृहगाढामविच्छिद्रां सम-भूमौ निवेशिताम् । शालितण्डुलसंपूर्णामिक्षुकाण्डरसोदकाम् १७ दुन्दु-भीभिर्मृदङ्गैश्च वीणाभिः पणवैस्तथा । नादितां भृशमत्यर्थं पृथिव्यां ताम-नुत्तमाम् १८ विमानमिव सिद्धानां तपसाधिगतं दिवि । सुनिवेशितवे-श्मान्तां नरोत्तमसमावृताम् १९ ये च बाणैर्न विध्यन्ति विविक्तमपराप-रम् । शब्दवेध्यं च विततं लघुहस्ता विशारदाः २० सिंहव्याघ्रवराहाणां मत्तानां नदतां वने । हन्तारो निशितैः शस्त्रैर्बलाद्बाहुबलैरपि २१ तादृ-शानां सहस्रैस्तामभिपूर्णां महारथैः । पुरीमावासयामास राजा दशरथ-स्तदा २२ तामग्निमद्भिर्गुणवद्भिरावृतां द्विजोत्तमैर्वेदषडङ्गपारगैः । सहस्रदैः सत्यरतैर्महात्मभिर्महर्षिकल्पैर्ऋषिभिश्च केवलैः २३ [२४२]इत्यार्षे श्रीम-

आणि इंद्राच्या अमरावतीप्रमाणें स्त्रियांच्या क्रीडाभवनांनीं ती परिपूर्ण आहे १५; तिचा आकार अष्टकोन असून उत्तम स्त्रीसमुदायांनीं ती युक्त आहे आणि त्याचप्रमाणें सर्व रत्नांनीं ती भरलेली असून सात सात मजली घरांनीं ती सुशोभित झालेली आहे १६. तिच्यामध्यें घरांची अगदीं खेचाखेच झाली असून मोकळी जागा कोठेंही राहिलेली नाहीं, सपाट भूमीवर तिची रचना केलेली आहे, शालि तंदुळांनीं ती परिपूर्ण आहे आणि इक्षुरसासारख्या स्वादिष्ट उदकानें ती युक्त आहे १७; दुंदुभि, मृदंग, विणे व नगारे ह्यांनीं ती एकसारखी अत्यंत नादित झालेली असते; तपश्चर्येनें स्वर्गामध्यें सिद्ध लोकांना प्राप्त झालेलें विमानच कीं काय अशा प्रकारें ती नगरी सर्व पृथ्वीमध्यें अनुपम असून तिच्यांतील घरांच्या अंतस्थ व बाह्य प्रदेशांची रचनाही चांगली व्यव-स्थित केलेली आहे आणि उत्तम पुरुषांच्या योगानें ती व्याप्त झालेली आहे १८,१९. इतकेंच नव्हे परंतु, मत्त होऊन अरण्यामध्यें गर्जना करणारे सिंह, व्याघ्र व वराह ह्यांचा, तीक्ष्ण शस्त्रांनींच केवळ नव्हे तर बाहुबलाचें अवलंबन करून, स्वसाम-र्थ्यानेंच वध करण्यास समर्थ आणि धनुर्विद्येमध्यें निपुण असल्यामुळें शीघ्रवेधी—परंतु, जो सहायरहित झालेला आहे, पुढें मागें कोणी नसल्यामुळें जो अनाथ आहे, भीतीनें दडून बसल्यामुळें केवळ शब्दानुमानावरूनच ज्याला वेध होण्याचा संभव आहे आणि युद्धांतून जो पलायन करीत आहे ह्यांवर बाण न टाकणारे—अशा प्रकारचे जे हजारों महारथि त्यांच्या योगानें ती नगरी परिपूर्ण होती व ती दशरथ राजानें आणखी जास्त वसविली २०,२१,२२. सारांश, आहिताग्नि व वेदवेदांगपारंगत असे गुण-वान् ब्राह्मण, सत्यनिष्ठ व आचरणानें महर्षीसारखे असून याचकांना हजारांनीं दान

द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

तस्यां पुर्यामयोध्यायां वेदवित्सर्वसंग्रहः। दीर्घदर्शी महातेजाः पौरजानपदप्रियः १ इक्ष्वाकूणामतिरथो यज्वा धर्मपरो वशी। महर्षिकल्पो राजर्षिस्त्रिषु लोकेषु विश्रुतः २ बलवान्निहतामित्रो मित्रवान्विजितेन्द्रियः। धनैश्च संचयैश्चान्यैः शक्रवैश्रवणोपमः ३ यथा मनुर्महातेजा लोकस्य परिरक्षिता। तथा दशरथो राजा लोकस्य परिरक्षिता ४ तेन सत्याभिसंधेन त्रिवर्गमनुतिष्ठता। पालिता सा पुरिश्रेष्ठा इन्द्रेणेवामरावती ५ तस्मिन्पुरवरे हृष्टा धर्मात्मानो बहुश्रुताः। नरास्तुष्टा धनैः स्वैः स्वैरलुब्धाः सत्यवादिनः ६ नाल्पसंनिचयः कश्चिदासीत्तस्मिन्पुरोत्तमे। कुटुम्बी यो ह्यसिद्धार्थोऽगवाश्वधनधान्यवान् ७ कामी वा न कदर्यो वा नृशंसः पुरुषः क्वचित्। द्रष्टुं शक्यमयोध्यायां नाविद्वान्न च नास्तिकः ८ सर्वे नराश्च नार्यश्च धर्मशीलाः सुसंयताः। मुदिताः शीलवृत्ताभ्यां मह-

---

करणारे महात्मे क्षत्रिय आणि श्रेष्ठ श्रेष्ठ ऋषि ह्यांनीं व्याप्त असलेली ती नगरी दशरथराजानें अधिक वसविली २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत रामायणरूप आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला.॥ ५ ॥

त्या अयोध्यानगरीमध्यें दशरथराजा होऊन गेला. तो वेदवेत्ता, सर्व वस्तूंचा संग्रह करणारा, दूरदर्शी, महाप्रतापी, लोकप्रिय १, इक्ष्वाकुवंशजांतील अतिरथि, यथाविधि यज्ञयाग केलेला, धर्मनिष्ठ, मनोनिग्रही, महर्षितुल्य, त्रैलोक्यामध्यें प्रख्यात असा राजर्षि २, बलाढ्य, शत्रुनाहींसे केलेला, मित्रांनीं युक्त व जितेंद्रिय असून द्रव्य व इतर धान्यादिसंचय ह्यांच्यायोगानें तर इंद्र व कुबेर ह्यांच्याशीं बरोबरी करणारा होता ३. तो दशरथ राजा महातेजस्वी मनूप्रमाणें लोकांचें सर्वस्वीं रक्षण करीत असे ४. सारांश, इंद्रानें रक्षण केलेल्या अमरावतीनगरीप्रमाणें धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गांचें अवलंबन करणाऱ्या त्या सत्यवचनी दशरथराजानें त्या श्रेष्ठ नगरीचें रक्षण केलें होतें ५. त्या श्रेष्ठ राजधानींतील लोक आनंदित, धर्मनिष्ठ, बहुश्रुत, स्वतःपाशीं असलेल्या द्रव्यानेंच संतुष्ट, निर्लोभी आणि सत्यवादी असे होते ६. अल्पसंचयी, ऐहिक व आमुष्मिक फल प्राप्त न झालेला आणि गायी, अश्व, वगैरे पशु व धनधान्य, ह्यांची समृद्धि नसलेला असा एकही कुटुंबी गृहस्थ त्या श्रेष्ठ नगरीमध्यें नव्हता ७ आणि त्याचप्रमाणें विषयलंपट, दुष्ट, अविद्वान् अथवा नास्तिक असाही कोणी पुरुष अयोध्येमध्यें कोठेंही दृष्टीं पडणें शक्य नव्हतें ८. कारण, तेथील सर्व पुरुष व स्त्रिया शील आणि आचरण ह्यांच्या योगानें महर्षींप्रमाणें निर्मळ असून

र्षय इवामलाः ९ नाकुण्डली नामुकुटी नास्रग्वी नाल्पभोगवान् । नामृष्टो न नलिताङ्गो नासुगन्धश्च विद्यते १० नामृष्टभोजी नादाता नाप्यनङ्गदनिष्कधृक् । नाहस्ताभरणो वापि दृश्यते नाप्यनात्मवान् ११ नानाहिताग्निर्नायज्वा न क्षुद्रो वा न तस्करः । कश्चिदासीदयोध्यायां न चावृत्तो न संकरः १२ स्वकर्मनिरता नित्यं ब्राह्मणा विजितेन्द्रियाः । दानाध्ययनशीलाश्च संयताश्च प्रतिग्रहे १३ नास्तिको नानृती वापि न कश्चिदबहुश्रुतः । नासूयको न चाशक्तो नाविद्वान्विद्यते क्वचित् १४ नाषडङ्गविदत्रास्ति नाव्रतो नाबहुश्रुतः । न दीनः क्षिप्तचित्तो वा व्यथितो वापि कश्चन १५ कश्चिन्नरो वा नारी वा नाश्रीमान्नाप्यरूपवान् । द्रष्टुं शक्यमयोध्यायां नापि राजन्यभक्तिमान् १६ वर्णेष्वग्र्यचतुर्थेषु देवतातिथिपूजकाः । कृतज्ञाश्च वदान्याश्च शूरा विक्रमसंयुताः १७ दीर्घायुषो नराः सर्वे धर्मं सत्यं च संश्रिताः।सहिताः पुत्रपौत्रैश्च नित्यं स्त्रीभिः पुरोत्तमे१८ क्षत्रं ब्रह्ममुखं चासीद्वैश्याः क्षत्रमनुव्रताः । शूद्राः स्वकर्मनिरतास्त्रीन्वर्णा-

---

धर्मनिष्ठ, उत्कृष्ट इंद्रियनिग्रही आणि आनंदित असत ९. कर्णकुंडलविरहित, मुकुटरहित, मालाहीन, घामट, चंदनाची वगैरे उटी न लाविलेला, सुगंधरहित अथवा भोग्य वस्तु ज्याच्यापाशीं कमी आहेत असा एकही पुरुष तेथें नसे १०. अस्वच्छ अन्न भक्षण करणारा, दातृत्वहीन, बाहुभूषणें आणि उरोभूषणें धारण न करणारा, हस्तभूषणरहित अथवा मनोनिग्रह न केलेला असा कोणीही त्या ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येत नसे ११. अग्नि सिद्ध न ठेविलेला, सोमयाग न केलेला, क्षुद्र, चोर, सदाचरणरहित अथवा परस्त्रीशीं गमन करणारा असा कोणीही अयोध्येमध्यें नव्हता १२. तेथील ब्राह्मण जितेंद्रिय, दान व अध्ययन ह्यांविषयीं तत्पर, प्रतिग्रह करण्याविषयीं संकोच धरणारे आणि नेहमीं स्वकर्मावर निष्ठा ठेवणारे असे होते १३. नास्तिक, असत्यभाषण करणारा, बहुश्रुत नसलेला, मत्सरी, अशक्त अथवा अविद्वान् असा कोणीही द्विज तेथें नसे १४. वेदांचीं सहा अंगें माहीत नसलेला, व्रतवैकल्यांचें अवलंबन न करणारा, थोडकें अध्ययन केलेला, दीन, अस्वस्थचित्त अथवा व्याधिग्रस्त असा कोणीही तेथें नव्हता १५. दरिद्री, कुरूप अथवा राजाचे ठिकाणीं भक्ति नसलेला असा कोणीही पुरुष अथवा स्त्री अयोध्येमध्यें दृष्टीं पडणें शक्य नव्हतें १६. ब्राह्मणप्रभृति चारी वर्णांतील लोक देव आणि अतिथि ह्यांचें पूजन करणारे, कृतज्ञ, उदार, शूर आणि पराक्रमी असे होते १७. त्या श्रेष्ठ राजधानींतील सर्व लोक दीर्घायु असून पुत्रपौत्र आणि स्त्रिया ह्यां सहवर्तमान सर्वच धर्म

नुपचारिणः १९ स तेनेक्ष्वाकुनाथेन पुरी सुपरिरक्षिता। यथा पुरस्तान्मनुना मानवेन्द्रेण धीमता २० योधानामग्निकल्पानां पेशलानाममर्षिणाम्। संपूर्णा कृतविद्यानां गुहा केसरिणामिव २१ काम्बोजविषयैर्जातैर्बाल्हीकैश्च हयोत्तमैः। वनायुजैर्नदीजैश्च पूर्णा हरिहयोत्तमैः २२ विन्ध्यपर्वतजैर्मत्तैः पूर्णा हैमवतैरपि। मदान्वितैरतिबलैर्मातङ्गैः पर्वतोपमैः २३ ऐरावतकुलीनैश्च महापद्मकुलैस्तथा। अञ्जनादपि निष्क्रान्तैर्वामनादपि च द्विपैः २४ भद्रैर्मन्द्रैर्मृगैश्चैव भद्रमन्द्रमृगैस्तथा। भद्रमन्द्रैर्भद्रमृगैर्मृगमन्द्रैश्च सा पुरी २५ नित्यमत्तैः सदा पूर्णा नागैरचलसंनिभैः। सा योजने द्वे च भूयः सत्यनामा प्रकाशते २६ तां पुरीं स महातेजा राजा दशरथो महान्। शशास शमितामित्रो नक्षत्राणीव चन्द्रमाः २७ तां

व सत्य ह्यांचा आश्रय करून राहणारे होते १८. क्षत्रिय ब्राह्मणांच्या आज्ञेंत असत, वैश्य क्षत्रियांना अनुसरून वागत आणि शूद्र स्वकर्माविषयीं तत्पर असत; ह्मणजे तीन वर्णांची सेवा करीत असत १९. सारांश, पूर्वीच्या विचारी मानवाधिपति मनूप्रमाणें त्या विवेकी इक्ष्वाकुकुलाधिपति दशरथराजानें त्या नगरीचें संरक्षण केलें होतें २०. तेजानें अग्नितुल्य, स्वभावानें सरळ, अपमान सहन न करणारे आणि शस्त्रास्त्रादिविद्येमध्यें प्रवीण अशा योद्ध्यांनीं भरलेली ती नगरी सिंहांची गुहाच कीं काय अशी भासत असे २१. कांबोज, बाल्हीक, वनायुज आणि सिंधुनदासमीपचा प्रदेश ह्या ठिकाणच्या उत्कृष्ट अश्वांनीं ती नगरी परिपूर्ण होती व ते अश्व इंद्राच्या उच्चैःश्रवानामक अश्वाप्रमाणें उत्तम होते २२. विंध्याद्रि व हिमालय ह्या प्रदेशांत उत्पन्न झालेल्या आणि मदस्राव चालला असल्यामुळे मत्त असलेल्या अशा पर्वतप्राय अतिबलाढ्य गजांनीं ती नगरी परिपूर्ण होती २३; ऐरावत, महापद्म, अंजन व वामन ह्या दिग्गजांच्या वगैरे कुळांत उत्पन्न झालेल्या गजांनींही ती नगरी भरलेली होती २४ आणि भद्र, मंद्र, मृग, भद्रमंद्रमृग, भद्रमंद्र, भद्रमृग व मृगमंद्र अशा २५ सर्वदा मत्त आणि पर्वतासारख्या धिप्पाड गजांनींही ती नगरी नेहमीं भरलेली असे; व (युद्धामध्यें जिकली जाणें सर्वस्वीं अशक्यच असल्यामुळें) अयोध्या हें नाम अगदीं यथार्थ धारण करणारी ती नगरी आसपास आठ आठ कोसपर्यंत प्रकाशत असे २६. असो. नक्षत्रलोकांवर अंमल करणारा चंद्रच कीं काय असा तो शत्रु नाहींसे झालेला महातेजस्वी दशरथराजा त्या नगरीवर

[१] हिमालय पर्वतावरील गज. २ विंध्याद्रीवरील गज. ३ सह्याद्रीवरील गज. ४ तिन्ही जातींतील गुण ज्यांचे मध्यें आढळतात असे गज. ५ दोन जातींतील गुण ज्यांमध्यें दृष्टोत्पत्तीस येतात असे गज.

सत्यनामां दृढतोरणार्गलां गृहैर्विचित्रैरुपशोभितां शिवाम् । पुरीमयोध्यां नृसहस्रसंकुलां शशास वै शक्रसमो महीपतिः २८ [ २७० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

तस्यामात्या गुणैरासन्निक्ष्वाकोः सुमहात्मनः । मन्त्रज्ञाश्चेङ्गितज्ञाश्च नित्यं प्रियहिते रताः १ अष्टौ बभूवुर्वीरस्य तस्यामात्या यशस्विनः । शुचयश्चानुरक्ताश्च राजकृत्येषु नित्यशः २ धृष्टिर्जयन्तो विजयः सुराष्ट्रो राष्ट्रवर्धनः । अकोपो धर्मपालश्च सुमन्त्रश्चाष्टमोऽर्थवित् ३ ऋत्विजौ द्वावभिमतौ तस्यास्तामृषिसत्तमौ । वसिष्ठो वामदेवश्च मन्त्रिणश्च तथापरे ४ सुयज्ञोऽप्यथ जाबालिः काश्यपोऽप्यथ गौतमः । मार्कण्डेयस्तु दीर्घायुस्तथा कात्यायनो द्विजः ५ एतैर्ब्रह्मर्षिभिर्नित्यमृत्विजस्तस्य पौर्वकाः । विद्याविनीता ह्रीमन्तः कुशला नियतेन्द्रियाः ६ श्रीमन्तश्च महात्मानः शस्त्रज्ञा दृढविक्रमाः । कीर्तिमन्तः प्रणिहिता यथा वचनकारिणः ७ तेजःक्षमायशःप्राप्ताः स्मितपूर्वाभिभाषिणः । क्रोधात्कामार्थहेतोर्वा न ब्रूयुर-

अधिकार चालवीत असे २७. सारांश, यथार्थ नाम धारण करणारी, बळकट कमानी व अडसर यांनी युक्त असलेली, चित्रविचित्र घरांनी सुशोभित झालेली आणि हजारों लोकांनी गजबजून गेलेली जी कल्याणकारक अयोध्या नगरी तिचें गुणांनी इंद्रसमान असलेल्या दशरथ भूपतीनें परिपालन केलें २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीरामायणरूप आदिकाव्यांतील बालकांडापैकी सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

त्या महात्म्या इक्ष्वाकुवंशज दशरथराजाचे अमात्य स्वकर्माला उपयोगीं पडणाऱ्या अशा गुणांनीं युक्त होते; ह्मणजे कोणत्यावेळीं काय करावें हें त्यांना चांगलें समजत असे; दुसऱ्याच्या मनांतील अभिप्राय ते ओळखीत असत आणि स्वतःला प्रिय जो दशरथ राजा त्याचें हित करण्याविषयीं ते तत्पर असत १. त्या यशस्वी व वीर दशरथराजाचे अमात्य आठ असून ते आचरणानें शुद्ध व राजकार्याविषयीं नित्य तत्पर असे असत २. धृष्टि, जयंत, विजय, सुराष्ट्र, राष्ट्रवर्धन, अकोप, धर्मपाल आणि आठवा सुमंत्र हे ते अमात्य होत ३. ऋषिश्रेष्ठ वसिष्ठ व वामदेव हे दोन त्याचे मुख्य ऋत्विज होते व वरील अमात्यांशिवाय इतरही मंत्री त्याचे होते ४. सुयज्ञ, जाबालि, काश्यप, गौतम, दीर्घायु मार्कंडेय आणि कात्यायन ५ ह्या ब्रह्मर्षीशीं त्याच्या परंपरागत ऋत्विजांचा नित्य समागम होत असे. त्या दशरथराजाचे अमात्य विद्या व विनय ह्यांनीं संपन्न, अब्रूची चाड बाळगणारे, राजकार्याविषयीं कुशल, जितेंद्रिय ६, वैभवशाली, मनाचे मोठे, शस्त्रवेत्ते, अमोघपराक्रमी, कीर्तिमान्, दक्ष, राजाज्ञानुरूप वर्तन करणारे ७,

नृतं वचः ८ तेषामविदितं किंचित्स्वेषु नास्ति परेषु वा। क्रियमाणं कृतं वापि चारेणापि चिकीर्षितम् ९ कुशला व्यवहारेषु सौहृदेषु परीक्षिताः। प्राप्तकालं यथादण्डं धारयेयुः सुतेष्वपि १० कोशसंग्रहणे युक्ता बलस्य च परिग्रहे। अहितं चापि पुरुषं न हिंस्युरविदूषकम् ११ वीराश्च नियतोत्साहा राजशास्त्रमनुष्ठिताः। शुचीनां रक्षितारश्च नित्यं विषयवासिनाम् १२ ब्रह्मक्षत्रमहिंसन्तस्ते कोशं समपूरयन्। सुतीक्ष्णदण्डाः संप्रेक्ष्य पुरुषस्य बलाबलम्। १३ शुचीनामेकबुद्धीनां सर्वेषां संप्रजानताम्। नासीत्पुरे वा राष्ट्रे वा मृषावादी नरः क्वचित् १४ क्वचिन्न दुष्टस्तत्रासीत्परदाररतिर्नरः। प्रशान्तं सर्वमेवासीद्राष्ट्रं पुरवरं च तत् १५ सुवाससः सुवेषाश्च ते च सर्वे शुचिव्रताः। हितार्थाश्च नरेन्द्रस्य जाग्रतो नयचक्षुषा १६ गुरोर्गुणगृहीताश्च प्रख्याताश्च पराक्रमैः। विदेशेष्वपि विज्ञाताः

---

तेज, कांति व यश ह्यांनीं युक्त, हास्यपूर्वक भाषण करणारे आणि काम, क्रोध अथवा द्रव्य (लोभ) ह्यांना वश होऊन कधींही अनृत भाषण न करणारे असे होते ८. स्वकीयांकडे अथवा परकीयांकडे काय चाललें आहे, काय झालें आहे आणि काय उद्दिष्ट आहे तें हेरांच्या योगानें त्यांना सर्व विदित असे ९. व्यवहारामध्यें ते निपुण होते, सौहृदाविषयीं ते राजाच्या परीक्षेला उतरलेले होते आणि वेळ आली ह्मणजे पुत्रांनाही यथायोग्य दंड करण्यास ते मागेंपुढें पाहणारे नव्हते १०. कोश व सैन्य ह्यांचा संग्रह करण्याविषयीं ते तत्पर असत आणि अपराधी नसेल तर शत्रूलाही धक्का लावीत नसत ११. ते दशरथराजाचे अमात्य शूर, उत्साहसंपन्न, नीतिशास्त्रानुसार वागणारे आणि आपल्या देशांत राहणाऱ्या सदाचरणी लोकांचें नित्य रक्षण करणारे असे होते १२. अपराध्याला चांगला कडक दंड करणारे जरी ते अमात्य होते तरी अपराधी पुरुषाचें बलाबल पाहून दंड करीत असत आणि ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे प्रजेला उपद्रव न देतां द्रव्यभांडाराची भर करीत असत १३. आचरणानें शुद्ध व एक मतानें वागणारे असे ते सर्व अमात्य राजधानींतील आणि राष्ट्रांतील वृत्तांताचा विचार करूं लागले असतां राष्ट्रांत अथवा राजधानींत कोणीही असत्यवादी पुरुष असल्याची हकीकत त्यांच्या निदर्शनास नसे १४. परस्त्रीविषयीं आसक्त असा कोणीही दुष्ट पुरुष त्या ठिकाणीं नव्हता. राजधानी व सर्व राष्ट्र ह्यामध्यें जिकडेतिकडे शांतता होती १५. दशरथराजाचे ते सर्वही अमात्य उज्ज्वल वस्त्रें व उत्तम वेष धारण करणारे असून आचरणानें सर्वही शुद्ध होते आणि राजाचें हित व्हावें हाच एक उद्देश मनांत धरून नीतिरूप दृष्टीनें ते सारखे जागत होते १६. गुरु व राजा ह्यांना ते गुणवान् ह्मणून अभिमत असत; स्वपराक्रमांनीं

सर्वतो बुद्धिनिश्चयाः १७ अभितो गुणवन्तश्च न चासन्गुणवर्जिताः । संधिविग्रहतत्त्वज्ञाः प्रकृत्या संपदान्विताः । १८ मन्त्रसंवरणे शक्ताः शक्ताः सूक्ष्मासु बुद्धिषु । नीतिशास्त्रविशेषज्ञाः सततं प्रियवादिनः १९ ईदृशैस्तैरमात्यैश्च राजा दशरथोनघः । उपपन्नो गुणोपेतैरन्वशासद्वसुंधराम् २० अवेक्षमाणश्चारेण प्रजा धर्मेण रक्षयन् । प्रजानां पालनं कुर्वन्नधर्मं परिवर्जयन् २१ विश्रुतस्त्रिषु लोकेषु वदान्यः सत्यसंगरः । स तत्र पुरुषव्याघ्रः शशास पृथिवीमिमाम् २२ नाध्यगच्छद्विशिष्टं वा तुल्यं वा शत्रुमात्मनः । मित्रवान्नतसामन्तः प्रतापहतकण्टकः ॥ स शशास जगद्राजा दिवि देवपतिर्यथा २३ तैर्मन्त्रिभिर्मन्त्रहिते निविष्टैर्वृतोनुरक्तैः कुशलैः समर्थैः । स पार्थिवो दीप्तिमवाप युक्तस्तेजोमयैर्गोभिरिवोदितोर्कः २४ [२९४] इत्यार्षे० आदिकाव्ये बालकाण्डे सप्तमः सर्गः॥७॥

ते प्रख्यात असत आणि कोणत्याही विषयासंबंधानें बुद्धीला संशय नसल्यामुळें परदेशामध्यें त्यांची ख्याति असे १७. ते कधींही गुणरहित नसून सर्वदां गुणवान् असत. संधि आणि विग्रह यांचें तत्त्व ते जाणीत असत आणि सात्विक, राजस व तामस अशा त्रिगुणसंपत्तीनें ते युक्त असत १८. सल्लामसलत अगदीं गुप्त ठेवण्याविषयीं ते दक्ष असत, सूक्ष्म विचार करण्यास ते समर्थ असत, नीतिशास्त्रांतील विशेष गोष्टी त्यांना चांगल्या अवगत असत आणि ते नेहमीं प्रिय भाषण करीत असत १९. अशाप्रकारच्या त्या गुणी अमात्यांनीं युक्त असलेल्या निष्पाप दशरथराजानें पृथ्वीचें राज्य केलें २०. त्रैलोक्यामध्यें विख्यात, उदार, सत्यवचनी आणि हेरांच्या योगानें चोहोंकडे दृष्टि देत असलेल्या त्या पुरुषश्रेष्ठ दशरथराजानें धर्मतः प्रजांचें रक्षण व्हावें एतदर्थ ह्मणजे अधर्मवर्जनपूर्वक प्रजापालन व्हावें एतदर्थ ह्या पृथ्वीचें राज्य केलें २१,२२. स्वतःची बरोबरी करणारा अथवा स्वतःपेक्षां अधिक असा एकही रिपु त्याच्या आढळण्यांत आला नाहीं; तो सुहृदांनीं युक्त असे, मांडलिक राजे त्याला नमून असत, त्याच्या प्रतापामुळें सर्व प्रजापीडकांचा नायनाट झालेला असे आणि ह्मणूनच स्वर्गामध्यें राज्य करणाऱ्या देवाधिपति इंद्राप्रमाणें तो राजा ह्या जगताचें राज्य करीत असे २३, व ह्यामुळें तेजोमय किरणांनीं युक्त असा उदय पावलेला सूर्यच कीं काय अशारीतीनें विचारसाध्य हिताविषयीं तत्पर, प्रभूविषयीं अनुरक्त, राजकार्यनिपुण आणि तें पार पाडण्याविषयीं समर्थ अशा मंत्र्यांनीं परिवेष्टित असलेला तो राजा देदीप्यमान दिसत असे २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

तस्य चैवंप्रभावस्य धर्मज्ञस्य महात्मनः । सुतार्थं तप्यमानस्य नासी-द्वंशकरः सुतः १ चिन्तयानस्य तस्यैवं बुद्धिरासीन्महात्मनः । सुतार्थं वाजिमेधेन किमर्थं न यजाम्यहम् २ स निश्चितां मतिं कृत्वा यष्टव्यमिति बुद्धिमान् । मन्त्रिभिः सह धर्मात्मा सर्वैरपि कृतात्मभिः ३ ततोऽब्रवीन्म-हातेजाः सुमन्त्रं मन्त्रिसत्तमम् । शीघ्रमानय मे सर्वान्गुरूंस्तान्सपुरोहि-तान् ४ ततः सुमन्त्रस्त्वरितं गत्वा त्वरितविक्रमः । समानयत्स तान्सर्वा-न्समस्तान्वेदपारगान् ५ सुयज्ञं वामदेवं च जाबालिमथ काश्यपम् । पुरो-हितं वसिष्ठं च ये चाप्यन्ये द्विजोत्तमाः ६ तान्पूजयित्वा धर्मात्मा राजा दशरथस्तदा । इदं धर्मार्थसहितं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् ७ मम लालप्यमा-नस्य सुतार्थं नास्ति वै सुखम् । तदर्थं हयमेधेन यक्ष्यामीति मतिर्मम ८ तदहं यष्टुमिच्छामि शास्त्रदृष्टेन कर्मणा । कथं प्राप्स्याम्यहं कामं बुद्धि-रत्रविचिन्त्यताम् ९ ततः साध्विति तद्वाक्यं ब्राह्मणाः प्रत्यपूजयन् । वसि-ष्ठप्रमुखाः सर्वे पार्थिवस्य मुखेरितम् १० ऊचुश्च परमप्रीताः सर्वे दशरथं

ह्याप्रमाणें प्रतापी, धर्मज्ञ आणि उदार अंतःकरणानें युक्त असा दशरथराजा पुत्राकरितां तपश्चर्या करीत असतांनाही त्याला वंश चालविणारा पुत्र प्राप्त झाला नाहीं १. तेव्हां पुत्रप्राप्तीकरितां मी अश्वमेध याग कां करूं नये अशी गोष्ट विचार करितां करितां त्याच्या मनामध्यें आली २ आणि शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या सर्व मंत्र्यांसहवर्तमान त्या धर्मात्म्या व विचारी दशरथ राजानें " अश्वमेध याग करावा " असा पक्का विचार केला ३ आणि नंतर " हे मंत्रिश्रेष्ठा, पुरोहितास-हवर्तमान त्या सर्व गुरूंना सत्वर माझ्याकडे घेऊन ये " ह्मणून सुमंत्रनामक अमात्याला त्या महातेजस्वी राजानें सांगितलें असतां ४ शीघ्र गमन करणारा सुमंत्र सत्वर गेला आणि त्या सर्व गुरूंना व इतरही वेदपारंगत ब्राह्मणांना घेऊन आला ५. सुयश, वाम-देव, जाबालि, काश्यप, पुरोहित वसिष्ठ आणि इतरही श्रेष्ठ द्विज तो बरोबर घेऊन आला ६. तेव्हां त्यांचें पूजन करून धर्मात्म्या दशरथ राजानें धर्म व अर्थ ह्यांना अनुलक्षून अस-लेलें हें स्पष्ट भाषण त्यांच्याशीं केलें कीं ७ " पुत्राकरितां शोक करीत असलेल्या मला सुख होत नाहीं. ह्यास्तव, पुत्रप्राप्ति होण्याकरितां अश्वमेध याग करावा असा माझा विचार आहे ८ व त्याप्रमाणें यथाशास्त्र अनुष्ठानानें याग शेवटास नेण्यास मी उत्सुकही झालों आहें. करितां, कोणत्या प्रकारानें माझा मनोरथ सिद्धीस जाईल याविषयीं आपण कांहीं विचार करा " ९. नंतर वसिष्ठप्रभृति सर्व ब्राह्मणांनीं " उत्तम उत्तम " ह्मणून राजाच्या मुखांतून निघालेल्या त्या भाषणाची प्रशंसा केली १० आणि अतिशय प्रसन्न

वचः ११ संभाराः संभ्रियन्तां ते तुरगश्च विमुच्यताम् । सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् १२ सर्वथा प्राप्स्यसे पुत्रानभिप्रेतांश्च पार्थिव। यस्य ते धार्मिकी बुद्धिरियं पुत्रार्थमागता १३ ततस्तुष्टोऽभवद्राजा श्रुत्वैतद्द्विजभाषितम्।अमात्यानब्रवीद्राजा हर्षव्याकुललोचनः १४संभाराः संभ्रियन्तां मे गुरूणां वचनादिह । समर्थाधिष्ठितश्चाश्वः सोपाध्यायो विमुच्यताम् १५ सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् । शान्तयश्चापि वर्धन्तां यथाकल्पं यथाविधि १६ शक्यः प्राप्तुमयं यज्ञः सर्वेणापि महीक्षिता। नापराधो भवेत्कष्टो यद्यस्मिन्क्रतुसत्तमे १७ छिद्रं हि मृगयन्ते स्म विद्वांसो ब्रह्मराक्षसाः । विधिहीनस्य यज्ञस्य सद्यः कर्ता विनश्यति १८ तद्यथा विधिपूर्वं मे क्रतुरेष समाप्यते । तथा विधानं क्रियतां समर्थाः साधनेष्विति १९ तथेति चाब्रुवन्सर्वे मन्त्रिणः प्रतिपूजिताः । पार्थिवेन्द्रस्य तद्वाक्यं यथापूर्वं निशम्य ते २० तथा द्विजास्ते धर्मज्ञा वर्धयन्तो नृपोत्त-

होऊन ते सर्व ब्राह्मण दशरथाला ह्मणाले ११ " यज्ञाच्या साहित्याची जुळवाजुळव होऊं द्या व अश्व सोडून सरयूनदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार होऊं द्या १२. हे राजा, ज्याअर्थी पुत्रप्राप्तीकरितां हा धार्मिक विचार तुझ्या मनामध्यें आला आहे त्याअर्थी तुला खरोखर मनाप्रमाणें पुत्र प्राप्त होतील " १३. ह्याप्रमाणें द्विजांचें भाषण श्रवण करून राजा संतुष्ट झाला आणि आनंदाश्रूंनीं डोळे भरून आले असतां आपल्या अमात्यांना ह्मणाला १४ " गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें साहित्याची जुळवाजुळव होऊं द्या, अश्व धरणाऱ्यांचा पराभव करण्यास समर्थ अशांच्या देखरेखीखालीं व उपाध्याय बरोबर देऊन अश्व सुटूं द्या १५, सरयूनदीचें उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार होऊं द्या आणि सूत्रांत सांगितल्याप्रमाणें ( विघ्ननिवारणार्थ ) शांतिकर्मे यथाविधि होऊं द्या १६. अहो, सर्वगुणसंपन्न जरी राजा झाला तरी त्याच्या हातून हा अश्वमेध याग शेवटास जाणें शक्य आहे काय ? ह्या श्रेष्ठ क्रतूच्या अनुष्ठानामध्यें जर मोठासा प्रमाद नच झाला तर मात्र कदाचित् तो शेवटास जाण्याचा संभव आहे १७. कारण, विद्वान् विद्वान् ब्रह्मराक्षस ह्या क्रतूमध्यें कांहीं न्यून पडेल हें पहात असतात आणि त्यामुळें यज्ञानुष्ठान अविधि झालें असतां कर्त्याचा तत्काल नाश होतो १८. ह्यास्तव, हा माझा याग यथाविधि शेवटास जाईल अशा रीतीनें तुह्मी यत्न करा; तुह्मी साधनें जुळविण्याविषयीं समर्थ आहांत " १९. वर सांगितल्याप्रमाणें नृपश्रेष्ठ दशरथ राजाचें भाषण श्रवण करून ते सर्व राजमान्य मंत्री " ठीक आहे " असें ह्मणाले २०. तदनंतर त्या सर्व धर्मवेत्त्या ब्राह्मणांनीं नृपश्रेष्ठ दशरथाला आशीर्वाद दिले आणि राजाची अनुज्ञा

मम्। अनुज्ञातास्ततः सर्वे पुनर्जग्मुर्यथागतम् २१ विसर्जयित्वा तान्विप्रान्सचिवानिदमब्रवीत्। ऋत्विग्भिरुपसंदिष्टो यथावत्क्रतुराप्यताम् २२ इत्युक्त्वा नृपशार्दूलः सचिवान्समुपस्थितान्। विसर्जयित्वा स्वं वेश्म प्रविवेश महामतिः २३ ततः स गत्वा ताः पत्नीर्नरेन्द्रो हृदयंगमाः। उवाच दीक्षां विशत यक्ष्येऽहं सुतकारणात् २४ तासां तेनातिकान्तेन वचनेन सुवर्चसाम्। मुखपद्मान्यशोभन्त पद्मानीव हिमात्यये २५ [३१९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

एतच्छ्रुत्वा रहः सूतो राजानमिदमब्रवीत्। श्रूयतां तत्पुरावृत्तं पुराणे च मया श्रुतम् १ ऋत्विग्भिरुपदिष्टोऽय पुरावृत्तो मया श्रुतः २ सनत्कुमारो भगवान्पूर्वं कथितवान्कथाम्। ऋषीणां संनिधौ राजंस्तव पुत्रागमं प्रति ३ काश्यपस्य च पुत्रोऽस्ति विभाण्डक इति श्रुतः। ऋष्यशृङ्ग इति ख्यातस्तस्य पुत्रो भविष्यति ४ स वने नित्यसंवृद्धो मुनिर्वनचरः सदा। नान्यं जानाति विप्रेन्द्रो नित्यं पित्रनुवर्तनात् ५ द्वैविध्यं ब्रह्मचर्यस्य भवि-

---

झाल्यावर ते सर्व पुनरपि आल्या मार्गानें चालते झाले २१. ह्याप्रमाणें त्या विप्रांना जाण्याची अनुज्ञा दिल्यावर " ऋत्विजांनीं सांगितल्याप्रमाणें, याग यथाविधि शेवटास नेण्याच्या उद्योगाला लागा " असें मंत्र्यांना त्या राजानें सांगितलें २२. समीप आलेल्या मंत्र्यांना ह्याप्रमाणें सांगून व जाण्याची अनुज्ञा देऊन तो महाविचारी नृपश्रेष्ठ दशरथ राजा आपल्या अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला २३. नंतर " मी पुत्रप्राप्तीकरितां अश्वमेध याग करणार आहे. ह्यास्तव, तुह्मी यज्ञदीक्षा घ्या " असें आपल्या प्रिय पत्नींना त्या दशरथ राजानें सांगितलें २४. तेव्हां आधींच उत्तम कांतीनें युक्त असलेल्या त्या स्त्रियांचीं मुखकमलें त्या अत्यंत प्रिय भाषणाच्या योगानें शीत काल संपल्यानंतर प्रफुल्लित होणाऱ्या पद्मांप्रमाणें शोभूं लागलीं २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

हें राजाचें भाषण श्रवण करून एकांतामध्यें सूतजातीय सुमंत्रनामक मंत्री त्याला ह्मणाला " पुराणामध्यें मीं श्रवण केलेला तो पुरातन इतिहास आपण श्रवण करा. १. ह्या इतिहास ऋत्विजांनीं सांगितलेला मीं पूर्वीं श्रवण केला आहे २. हे राजा, भगवान् सनत्कुमार मुनींनीं ऋषींचे संनिध तुझ्या पुत्रप्राप्तीविषयीं भविष्यद्विषयक कथा पूर्वींच सांगून ठेविली आहे ३. ( सनत्कुमार सांगतात ) काश्यपाचा पुत्र विभांडक ह्मणून प्रसिद्ध आहे. त्याला ऋष्यशृंग या नावानें प्रसिद्ध असा एक पुत्र होईल ४. तो जन्मापासून वनांत वाढणारा असल्यामुळें वनामध्येंच नित्य संचार करील आणि तो विप्रश्रेष्ठ मुनि

ष्यति महात्मनः । लोकेषु प्रथितं राजन्विप्रैश्च कथितं सदा ६ तस्यैवं वर्तमानस्य कालः समभिवर्तत । अग्निं शुश्रूषमाणस्य पितरं च यशस्विनम् ७ एतस्मिन्नेव काले तु रोमपादः प्रतापवान् । अङ्गेषु प्रथितो राजा भविष्यति महाबलः ८ तस्य व्यतिक्रमाद्राज्ञो भविष्यति सुदारुणा । अनावृष्टिः सुघोरा वै सर्वलोकभयावहा ९ अनावृष्ट्यां तु वृत्तायां राजा दुःखसमन्वितः । ब्राह्मणाञ्छ्रुतसंवृद्धान्समानीय प्रवक्ष्यति १० भवन्तः श्रुतकर्माणो लोकचारित्रवेदिनः । समादिशन्तु नियमं प्रायश्चित्तं यथा भवेत् ११ इत्युक्तास्ते ततो राज्ञा सर्वे ब्राह्मणसत्तमाः । वक्ष्यन्ति ते महीपालं ब्राह्मणा वेदपारगाः १२ विभाण्डकसुतं राजन्सर्वोपायैरिहानय । आनाय्य तु महीपाल ऋष्यशृङ्गं सुसत्कृतम् १३ विभाण्डकसुतं राजन्ब्राह्मणं वेदपारगम् । प्रयच्छ कन्यां शान्तां वै विधिना सुसमाहितः १४ तेषां तु वचनं श्रुत्वा राजा चिन्तां प्रपत्स्यते । केनोपायेन वै शक्यमिहानेतुं स वीर्यवान् १५ ततो

नित्य पित्याच्या अनुरोधानें वर्तन करणार असल्यामुळें ( व " येथून तूं कोठेंही जाऊं नकोस " अशी पित्याची त्याला आज्ञा होणार असल्यामुळें वनावांचून ) तो दुसरें कांहींही जाणणार नाहीं ५. ( अजिनादिधारणरूप मुख्य आणि ऋतुकालीं स्त्रीगमनरूप गौण असें ) दोन्हीं प्रकारचें ब्रह्मचर्य त्या महात्म्या ऋष्यशृंग मुनीचें लोकांमध्यें प्रसिद्ध होईल आणि, हे राजा, ब्राह्मण त्या ब्रह्मचर्याची नित्य प्रशंसा करितील ६. ह्याप्रमाणें अग्नि व यशस्वी पिता यांची शुश्रूषा करून असणाऱ्या त्या ऋष्यशृंग मुनीचा बराच काल जाईल ७. असो. ह्या ऋष्यशृंग मुनीच्याच वेळीं अंगदेशामध्यें रोमपाद ह्मणून एक प्रतापी व महाबलाढ्य असा राजा प्रसिद्धीस येईल ८ आणि त्या राजाच्या हातून होणाऱ्या धर्मातिक्रमणामुळें सर्व लोकांना भयावह, दुःसह व अत्यंत घोर असें अवर्षण पडेल ९. अशाप्रकारें अवर्षण पडलें असतां राजा दुःखी होईल आणि ज्ञानवृद्ध ब्राह्मणांना बोलावून आणून " आपण लोकव्यवहारज्ञ असल्यामुळें या अनावृष्टीला कारणीभूत असें जें माझें पापकर्म असेल तें आपण जाणतच आहांत; करितां, त्या माझ्या पातकाची निष्कृति होईल अशा रीतीनें आपण मला अनुष्ठान करण्यास सांगा " असें त्यांना ह्मणेल १०,११ व राजानें असें सांगितलें असतां ते सर्व श्रेष्ठ व वेदपारंगत ब्राह्मण त्या भूपालाला सांगतील कीं १२ " हे राजा, सर्व उपायांनीं विभांडक पुत्राला इकडे आण आणि, हे भूपाला नृपा, अत्यंत सत्कारपूर्वक त्या ऋष्यशृंगनामक विभांडकपुत्र वेदपारंगत ब्राह्मणाला आणवून अतिशय प्रसन्न मनानें आपली कन्या शांता त्याला यथाविधि अर्पण कर " १३,१४. ह्याप्रमाणें त्या ब्राह्मणांचें वचन श्रवण केल्यावर त्या

राजा विनिश्चित्य सह मन्त्रिभिरात्मवान् । पुरोहितममात्यांश्च प्रेषयिष्यति सत्कृतान् १६ ते तु राज्ञो वचः श्रुत्वा व्यथितावनताननाः । न गच्छेम ऋषेर्भीता अनुनेष्यन्ति तं नृपम् १७ वक्ष्यन्ति चिन्तयित्वा ते तस्योपायांश्च तान्क्षमान् । आनेष्यामो वयं विप्रं न च दोषो भविष्यति १८ एवमङ्गाधिपेनैव गणिकाभिर्ऋषेः सुतः । आनीतोवर्षयद्देवः शान्ता चास्मै प्रदीयते १९ ऋष्यशृङ्गस्तु जामाता पुत्रांस्तव विधास्यति । सनत्कुमारकथितमेतावद्व्याहृतं मया २० अथ हृष्टो दशरथः सुमन्त्रं प्रत्यभाषत । यथर्ष्यशृङ्गस्त्वानीतो येनोपायेन सोच्यताम् २१ [ ३४० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

सुमन्त्रश्चोदितो राज्ञा प्रोवाचेदं वचस्तदा । यथर्ष्यशृङ्गस्त्वानीतो येनोपायेन मन्त्रिभिः ॥ तन्मे निगदितं सर्वं शृणु मे मन्त्रिभिः सह १

---

जितेंद्रिय ऋष्यशृंगमुनीला कोणत्या उपायानें येथें आणणें शक्य आहे " असें तो राजा चिंतन करूं लागेल १५ आणि नंतर मंत्र्यांसहवर्तमान पक्का निश्चय करून त्या मुनीला आणण्याकरितां पुरोहित व अमात्य ह्यांना तो सत्कारपूर्वक पाठवून देईल १६. परंतु, राजाचें भाषण श्रवण केल्यावर ते अमात्यप्रभृति पंचाईतींत पडून आपल्या माना खालती घालतील आणि विभांडक मुनीला भीत असल्यामुळें " आह्मी तिकडे जाणार नाहीं "असें सांगून ती आज्ञा न पाळण्याबद्दल राजाचें मन वळवूं लागतील १७. ऋष्यशृंग मुनीला आणण्याविषयीं शक्य उपाय कोणते आहेत ह्याचा विचार करून ते शक्य उपाय ते अमात्यप्रभृति राजाला सांगतील आणि—ह्या उपायांनीं आह्मी त्या विप्राला येथें आणूं; ह्यांत चूक होणार नाहीं—असें राजाला ह्मणतील " १८. ह्याप्रमाणें अंगदेशाधिपति रोमपाद राजानें गणिकांकडून त्या ऋषिपुत्राला आणविलें असतां पर्जन्य वृष्टि झाली आहे आणि रोमपाद राजानें त्या ऋष्यशृंग मुनीला आपली शांतानामक कन्याही अर्पण केली आहे १९. आतां, तो जामाता ऋष्यशृंग तुला पुत्र प्राप्त होण्याची तजवीज करील. असो. ह्याप्रमाणें सनत्कुमार मुनींनीं ऋषींचें संनिध तुझ्या पुत्रप्राप्तीविषयीं सांगून ठेविलेलें भविष्य मीं तुला कथन केलें आहे २०. ह्याप्रकारें सुमंत्रनामक मंत्र्यानें सांगितलें असतां दशरथ राजा आनंदित झाला आणि " जो उपाय योजून ऋष्यशृंग मुनीला रोमपाद राजानें आणिलें त्याविषयींची हकीगत मला 'सांग " ह्मणून त्याला ह्मणाला २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

ह्याप्रकारें दशरथ राजानें सांगितलें असतां सुमंत्र मंत्री ह्मणाला " रोमपादराजाच्या

रोमपादमुवाचेदं सहामात्यः पुरोहितः । उपायो निरपायोऽयमस्माभिरभिचिन्तितः २ ऋष्यशृङ्गो वनचरस्तपःस्वाध्यायसंयुतः । अनभिज्ञस्तु नारीणां विषयाणां सुखस्य च ३ इन्द्रियार्थैरभिमतैर्नरचित्तप्रमाथिभिः । पुरमानाययिष्यामः क्षिप्रं चाध्यवसीयताम् ४ गणिकास्तत्र गच्छन्तु रूपवत्यः स्वलंकृताः । प्रलोभ्य विविधोपायैरानेष्यन्तीह सत्कृताः ५ श्रुत्वा तथेति राजा च प्रत्युवाच पुरोहितम् । पुरोहितो मन्त्रिणश्च तदा चक्रुश्च ते तथा ६ वारमुख्यास्तु तच्छ्रुत्वा वनं प्रविविशुर्महत् । आश्रमस्याविदूरेऽस्मिन्यत्नं कुर्वन्ति दर्शने ७ ऋषेः पुत्रस्य धीरस्य नित्यमाश्रमवासिनः। पितुः स नित्यसंतुष्टो नातिचक्राम चाश्रमात् ८ न तेन जन्मप्रभृति दृष्टपूर्वं तपस्विना । स्त्री वा पुमान्वा यच्चान्यत्सत्त्वं नगरराष्ट्रजम् ९ ततः कदाचित्तं देशमाजगाम यदृच्छया । विभाण्डकसुतस्तत्र ताश्चापश्यद्वराङ्गनाः १०

---

मंत्र्यांनीं ऋष्यशृंगमुनि कसा व कोणत्या उपायांनीं आणिला हें सर्व मीं सांगितलें असतां तूं मंत्र्यांसहवर्तमान श्रवण कर १. अमात्यांसहवर्तमान पुरोहित रोमपादराजाला ह्मणाला "हा निर्दोष उपाय आह्मीं मनामध्यें आणिला आहे २. तप व वेदाध्ययन ह्यांनीं युक्त असलेला ऋष्यशृंगमुनि केवल वनामध्यें संचार करणारा असल्यामुळें स्त्रीसंबंधीं शब्दादि विषय आणि सुख ह्यांची त्याला कांहींएक माहिती नाहीं ३. ह्याकरितां, पुरुषाच्या अंतःकरणाला मोह पाडणारे असे जे प्राणिमात्राला प्रिय असलेले विषय त्यांच्या योगानें आह्मी त्याला नगरामध्यें आणवूं. ह्यास्तव, आह्मी सांगतों तें करण्याचा सत्वर यत्न होऊं द्या ४. उत्तम उत्तम अलंकार घातलेल्या सुंदर सुंदर वेश्या त्या ठिकाणीं जाऊं द्या. कारण, त्यांना सत्कारपूर्वक तिकडे पाठविलें असतां नानाप्रकारच्या उपायांनीं त्याचे ठिकाणीं लोभ उत्पन्न करून त्या त्या मुनीला येथें घेऊन येतील" ५. ह्याप्रमाणें पुरोहिताचें भाषण श्रवण केल्यावर "ठीक आहे" ह्मणून राजानें त्याला प्रत्युत्तर दिलें असतां पुरोहित व मंत्री ह्यांनीं राजाच्या अनुज्ञेप्रमाणें केलें ६. तदनंतर मंत्र्यांचें ह्मणणें ऐकून घेऊन मुख्य मुख्य वेश्या त्या महावनामध्यें प्रविष्ट झाल्या आणि त्या ह्या शेजारच्या वनामध्यें विभांडकमुनींच्या आश्रमाचे संनिध उभ्या राहून त्या आश्रमामध्यें नित्य वास्तव्य करीत असलेल्या त्या ज्ञानी ऋषिपुत्राचें दर्शन घेण्याविषयीं यत्न करूं लागल्या. परंतु, पित्याच्या लालनादिकांमुळें नित्य संतुष्ट असलेला तो ऋषिपुत्र ऋष्यशृंग आश्रमांतून बाहेर आला नाहीं ७,८. स्त्री, पित्यावांचून इतर पुरुष आणि नगरांत व राष्ट्रांत असणारे इतर प्राणी ह्यांपैकीं त्या तपस्वी ऋषिपुत्रानें जन्मापासून कांहींच अवलोकन केलेलें नव्हतें ९. असो. असें होतां होतां त्या ठिकाणीं त्या वेश्या होत्या

ताश्चित्रवेषाः प्रमदा गायन्त्यो मधुरस्वरम् । ऋषिपुत्रमुपागम्य सर्वा वचनमब्रुवन् ११ कस्त्वं किं वर्तसे ब्रह्मञ्ज्ञातुमिच्छामहे वयम् । एकस्त्वं विजने दूरं वने चरसि शंस नः १२ अदृष्टरूपास्तास्तेन काम्यरूपा वने स्त्रियः । हार्दात्तस्य मतिर्जाता आख्यातुं पितरं स्वकम् १३ पिता विभाण्डकोस्माकं तस्याहं सुत औरसः । ऋष्यशृङ्ग इति ख्यातं नाम कर्म च मे भुवि १४ इहाश्रमपदोस्माकं समीपे शुभदर्शनाः । करिष्ये वोत्र पूजां वै सर्वेषां विधिपूर्वकम् १५ ऋषिपुत्रवचः श्रुत्वा सर्वासां मतिरास वै । तदाश्रमपदं द्रष्टुं जग्मुः सर्वाः स्म ताङ्गनाः १६ गतानां तु ततः पूजामृषिपुत्रश्चकार ह । इदमर्घ्यमिदं पाद्यमिदं मूलं फलं च नः १७ प्रतिगृह्य तु तां पूजां सर्वा एव समुत्सुकाः । ऋषेर्भीताश्च शीघ्रं तु गमनाय मतिं दधुः १८ अस्माकमपि मुख्यानि

---

त्या ठिकाणीं एकदां तो विभांडक मुनींचा पत्र ऋष्यशृंग सहज आला आणि तेथें त्यानें त्या उत्कृष्ट स्त्रिया अवलोकन केल्या १०. तेव्हां आश्चर्यकारक वेष धारण करून मधुर स्वरानें गायन करीत असलेल्या त्या सर्व तरुण वेश्या ऋषिपुत्रासमीप गेल्या आणि " तूं कोण ? काय करीत असतोस ? आणि एकटा असतांना ग्रामापासून दूर असलेल्या ह्या निर्जन वनामध्यें तूं कशाकरितां संचार करीत आहेस ? हें जाणण्याची आमची इच्छा आहे. ह्यास्तव, हे ब्रह्मन्, तें तूं आह्मांला कथन कर " असें त्याला विचारूं लागल्या ११,१२. पूर्वी अशा प्रकारच्या स्त्रिया वनामध्यें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आल्या नव्हत्या आणि त्या स्त्रियांनींही मोहक रूपें धारण केलेलीं होतीं. ह्मणून त्यांचे ठिकाणीं त्या ऋषिपुत्राचें प्रेम उत्पन्न झालें आणि त्यामुळें आपला पिता कोण हें त्यांना सांगण्याची त्याला इच्छा झाली असतां तो ह्मणाला १३ आमचा पिता विभांडक असून त्याचा मी औरस पुत्र आहें व ऋष्यशृंग हें माझें नांव आणि तपोरूप कर्म पृथ्वीमध्यें प्रसिद्ध आहे १४. हे शुभदर्शनी जनहो, येथें समीपच आमचा आश्रम आहे. करितां, तुह्मा सर्वांचें मी ह्या ठिकाणीं यथाविधि पूजन करितों " १५. ह्याप्रमाणें ऋषिपुत्राचें ह्मणणें ऐकून घेतल्यावर तो आश्रम अवलोकन करण्याविषयीं त्या सर्वांनाच इच्छा झाली आणि तेथून त्या सर्व स्त्रिया तो आश्रम अवलोकन करण्याकरितां चालत्या झाल्या १६. नंतर त्या आश्रमाला गेल्या असतां " हे अर्घ्य, हें पाद्य आणि हीं आमचीं फळेंमुळें तुह्मी स्वीकारा " असें ह्मणून ऋषिपुत्रानें त्यांचें पूजन केलें १७. तेव्हां मोठ्या उत्सुकतेनें त्या पूजेचा सर्व स्त्रियांनीं स्वीकार केला आणि विभांडक मुनींना भीत असल्यामुळें तेथून सत्वर गमन करण्याचें मनामध्यें आणून त्या ह्मणाल्या १८ " हे द्विज, आमचे पाशींही हीं उत्तम फलें आहेत. त्यांचा, हे विप्रा,

फलानीमानि हे द्विज । गृहाण विप्र भद्रं ते भक्षयस्व च मा चिरम् १९ ततस्तास्तं समालिङ्ग्य सर्वा हर्षसमन्विताः । मोदकान्प्रददुस्तस्मै भक्ष्यांश्च विविधाञ्छुभान् २० तानि चास्वाद्य तेजस्वी फलानीति स्म मन्यते । अनास्वादितपूर्वाणि वने नित्यनिवासिनाम् २१ आपृच्छ्य च तदा विप्रं व्रतचर्यां निवेद्य च । गच्छन्ति स्मापदेशात्ता भीतास्तस्य पितुः स्त्रियः२२ गतासु तासु सर्वासु काश्यपस्यात्मजो द्विजः । अस्वस्थहृदयश्चासीद्दुःखाच्च परिवर्तते २३ ततोऽपरेद्युस्तं देशमाजगाम स वीर्यवान् । विभाण्डकसुतः श्रीमान्मनसाचिन्तयन्मुहुः २४ मनोज्ञा यत्र ता दृष्टा वारमुख्याः स्वलंकृताः । दृष्ट्वैव च ततो विप्रमायान्तं हृष्टमानसाः २५ उपसृत्य ततः सर्वास्तास्तमूचुरिदं वचः । एह्याश्रमपदं सौम्य अस्माकमिति चाब्रुवन्२६ चित्राण्यत्र बहूनि स्युर्मूलानि च फलानि च । तत्राप्येष विशेषेण विधिर्हि भविता ध्रुवम् २७ श्रुत्वा तु वचनं तासां सर्वासां हृदयंगमम् । गमनाय

तूं स्वीकार कर आणि विलंब न करितां तूं तीं भक्षण कर; ह्मणजे तुझें कल्याण होईल १९. ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर हर्षयुक्त झालेल्या सर्व वेश्यांनीं त्याला आलिंगन दिलें आणि मोदक व इतरही नानाप्रकारचे शुभ भक्ष्य पदार्थ त्याला अर्पण केले २०. तेव्हां त्यांनीं दिलेलीं तीं फळें भक्षण केल्यावर वनामध्यें नित्य वास्तव्य करणाऱ्यांनीं पूर्वी या फलांचा कधींही आस्वाद घेतलेला नाहीं असें त्या तेजस्वी ऋष्यशृंगमुनीला वाटलें २१. ह्यानंतर त्या विप्र ऋष्यशृंगाचा निरोप घेऊन त्याच्या पित्याला भीत असलेल्या त्या स्त्रियांनीं "आह्मांला कांहीं व्रत कर्तव्य आहे" असें त्याला (खोटेंच) सांगितलें आणि त्या मिषानें त्या तेथून निघून गेल्या २२. ह्याप्रमाणें त्या सर्व स्त्रिया निघून गेल्या असतां त्या काश्यपपुत्र द्विज ऋष्यशृंगाचें अंतःकरण अस्वस्थ झालें आणि दुःखामुळें तो इकडे तिकडे फेऱ्या घालूं लागला २३. तदनंतर तो वैभवशाली व वीर्यवान् विभांडकपुत्र ऋष्यशृंग वारंवार मनामध्यें त्या स्त्रियांविषयीं चिंतन करीत करीत दुसऱ्या दिवशीं त्या ठिकाणीं आला असतां २४ त्या उत्कृष्ट व मनोहर वेश्या उत्तम प्रकारें भूषित झालेल्या त्या ठिकाणीं त्याच्या दृष्टीस पडल्या. तो विप्र ऋष्यशृंग इकडे येत आहे असें आढळून आल्याबरोबर त्या स्त्रियांच्या अंतःकरणाला आनंद झाला २५ आणि जवळ जाऊन त्या सर्व त्याला ह्मणाल्या "हे सौम्या, तूं आमच्या आश्रमाला चल २६. अरे, या ठिकाणीं जरी मुळें व फळें पुष्कळ असलीं तरी त्या आमच्या आश्रमांत तर हा प्रकार निःसंशय अधिक होईल. (मागांत, ह्या ठिकाणापेक्षां आमच्या आश्रमामध्यें तुला अधिक फळें व मुळें मिळतील)" २७. ह्याप्रमाणें अंतःकरणाला

मतिं चक्रे तं च निन्युस्तथा स्त्रियः २८ तत्र चानीयमाने तु विप्रे तस्मिन्महात्मनि । ववर्ष सहसा देवो जगत्प्रह्लादयंस्तदा २९ वर्षेणैवागतं विप्रं तापसं स नराधिपः । प्रत्युद्गम्य मुनिं प्राह शिरसा च महीं गतः ३० अर्घ्यं च प्रददौ तस्मै न्यायतः सुसमाहितः । वव्रे प्रसादं विप्रेन्द्रान्मा विप्रं मन्युराविशेत् ३१ अन्तःपुरं प्रवेश्यास्मै कन्यां दत्वा यथाविधि । शान्तां शान्तेन मनसा राजा हर्षमवाप सः ३२ एवं स न्यवसत्तत्र सर्वकामैः सुपूजितः । ऋष्यशृङ्गो महातेजाः शान्तया सह भार्यया ३३ इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे दशमः सर्गः [ ३७३ ]

भूय एव हि राजेन्द्र शृणु मे वचनं हितम् । यथा स देवप्रवरः कथयामास बुद्धिमान् १ इक्ष्वाकूणां कुले जातो भविष्यति सुधार्मिकः । नाम्ना दशरथो राजा श्रीमान्सत्यप्रतिश्रवः २ अङ्गराजेन सख्यं च तस्य राज्ञो भविष्यति । कन्या चास्य महाभागा शान्ता नाम भविष्यति ३ पुत्रस्त्व-

---

रुचणारें त्यांचें भाषण श्रवण करून त्या विप्रानेंही त्यांच्याबरोबर जाण्याचें मनामध्यें आणिलें व त्याच्या इच्छेप्रमाणें त्या स्त्रियाही त्याला तिकडे घेऊन गेल्या २८ आणि अंगदेशाकडे त्या स्त्रिया त्या महात्म्या विप्राला आणूं लागल्या असतां एकदम पर्जन्यवृष्टि होऊन जगताला आनंद झाला २९. इकडे पर्जन्यवृष्टि बरोबर घेऊन आलेल्या त्या विप्राला तो ( अंगदेशाधिपति रोमपाद) राजा नम्र होऊन सामोरा गेला आणि नंतर त्यानें त्याला साष्टांग नमस्कार घातला ३०. इतकेंच नव्हे परंतु, अगदीं स्वस्थचित्त होऊन त्यानें त्याचें यथाविधि पूजन केलें आणि " विप्रकोप होऊं नये एवढी कृपा व्हावी " असें त्या श्रेष्ठ विप्रापाशीं त्यानें मागणें मागितलें ३१. तदनंतर त्याला अंतःपुरांत नेऊन स्वस्थांतःकरणपूर्वक राजानें आपली शांता कन्या यथाविधि अर्पण केली आणि त्यामुळें त्या राजाला आनंद झाला ३२. असो. ह्याप्रमाणें सर्व इच्छा परिपूर्ण करून उत्तम प्रकारें मानमान्यतेनें राहत असलेला तो महातेजस्वी ऋष्यशृंग शांतानामक भार्येसहवर्तमान त्या ठिकाणीं राहिला ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं दाहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

हे राजाधिराज दशरथा, त्या बुद्धिमान् सुरश्रेष्ठ सनत्कुमारांनीं जें कथन केलें तें हितकारक भाषण माझ्यापासून तूं पुनरपि श्रवण कर १. ( सनत्कुमार ह्मणाले:— ) इक्ष्वाकुवंशजांच्या कुलांमध्यें अत्यंत धार्मिक, वैभवशाली आणि सत्यप्रतिज्ञ असा दशरथ ह्मणून राजा उत्पन्न होईल २ व त्या दशरथराजाचें अंगराजाशीं सख्य होईल. अंगराजाला शांता ह्मणून एक महाभाग्यवती कन्या होईल ३ आणि रोमपाद ह्मणून

ङ्गस्य राज्ञस्तु रोमपाद इति श्रुतः । तं स राजा दशरथो गमिष्यति महायशाः ४ अनपत्योस्मि धर्मात्मञ्छाताभर्ता मम क्रतुम् । आहरेत त्वयाज्ञप्तः संतानार्थं कुलस्य च ५ श्रुत्वा राज्ञोथ तद्वाक्यं मनसा च विचिन्त्य च । प्रदास्यते पुत्रवन्तं शान्ताभर्तारमात्मवान् ६ प्रतिगृह्य च तं विप्रं स राजा विगतज्वरः । आहरिष्यति तं यज्ञं प्रहृष्टेनान्तरात्मना ७ तं च राजा दशरथो यशस्कामः कृताञ्जलिः । ऋष्यशृङ्गं द्विजश्रेष्ठं वरयिष्यति धर्मवित् ८ यज्ञार्थं प्रसवार्थं च स्वर्गार्थं च नरेश्वरः । लभते च स तं कामं द्विजमुख्याद्विशांपतिः ९ पुत्राश्चास्य भविष्यन्ति चत्वारोमितविक्रमाः । वंशप्रतिष्ठानकराः सर्वभूतेषु विश्रुताः १० एवं स देवप्रवरः पूर्वं कथितवान्कथाम् । सनत्कुमारो भगवान्पुरा देवयुगे प्रभुः ११ स त्वं पुरुषशार्दूल समानय सुसत्कृतम् । स्वयमेव महाराज गत्वा सबलवाहनः १२ सुमन्त्रस्य वचः श्रुत्वा हृष्टो दशरथोभवत् । अनुमान्य वसिष्ठं च सूतवाक्यं निशाम्य च १३ सान्तःपुरः सहामात्यः प्रययौ यत्र

---

प्रसिद्ध असा एक पुत्रही त्याला होईल. त्या अंगराजाकडे महाकीर्तिमान् दशरथ राजा जाईल आणि ४ " हे धर्मात्म्या अंगराजा, मी निपुत्रिक आहें; ह्यास्तव, शांतिच्या भर्त्यानें माझ्या कुलाच्या संतानाकारितां तुझ्या अनुज्ञेनें माझ्या यज्ञाचें अनुष्ठान करावें " ( असें त्याला ह्मणेल ) ५. ह्याप्रमाणें दशरथराजाचें बोलणें एकून घेऊन व त्याविषयीं मनामध्यें विचार करून विचारी अंगराजा शांतिच्या पुत्रवान् भर्त्याला त्याचे स्वाधीन करील ६. नंतर त्याचा स्वीकार करून तो दशरथराजा निश्चिंत होईल आणि प्रसन्न मनानें तो पुत्रकामेष्टिरूप याग करील ७. प्रथमतः तो कीर्तीची इच्छा करणारा धर्मज्ञ दशरथराजा हात जोडून संतान आणि स्वर्ग ह्यांची प्राप्ति व्हावी एतदर्थ पुत्रकामेष्टिरूप यज्ञ करण्याविषयीं त्या द्विजश्रेष्ठ ऋष्यशृंगाला अध्वर्यु ह्मणून वरील आणि तदनंतर त्या द्विजश्रेष्ठाच्या योगानें त्या प्रजाधिपति दशरथराजाचा तो मनोरथ सिद्धीस जाईल ८,९. सारांश, ( तो पुत्रकामेष्टिरूप यज्ञ केल्यानंतर ) सर्व प्राण्यांमध्यें विख्यात व वंशाची अविच्छिन्नता कायम राखणारे असे अतुलपराक्रमी चार पुत्र त्या दशरथाला होतील १०. ह्याप्रमाणें पूर्वीच्या सत्ययुगामध्यें भगवान् सुरश्रेष्ठ सनत्कुमार प्रभूंनीं हा वृत्तांत कथन करून ठेविलेला आहे ११. करितां, हे पुरुषश्रेष्ठा महाराजा, तो तूं सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान स्वतः जा आणि उत्कृष्टसत्कारपूर्वक त्या ऋष्यशृंग मुनीला घेऊन ये १२. हे सुमंत्रनामक मंत्र्याचें भाषण श्रवण करून दशरथ आनंदित झाला आणि वसिष्ठांना तें त्या सूतजातीय मंत्र्याचें ह्मणणें कळवून व ऋष्य-

ततः काले बहुतिथे कस्मिंश्चित्सुमनोहरे। वसन्ते समनुप्राप्ते राज्ञो यष्टुं मनोभवत् १ ततः प्रणम्य शिरसा तं विप्रं देववर्णिनम् । यज्ञाय वरयामास संतानार्थं कुलस्य च २ तथेति च स राजानमुवाच वसुधाधिपम् । संभाराः संभ्रियन्तां ते तुरगश्च विमुच्यताम् ३ सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् । ततोऽब्रवीन्नृपो वाक्यं ब्राह्मणान्वेदपारगान् ४ सुमन्त्रावाहय क्षिप्रमृत्विजो ब्रह्मवादिनः। सुयज्ञं वामदेवं च जाबालिमथ काश्यपम् ५ पुरोहितं वसिष्ठं च ये चान्ये द्विजसत्तमाः । ततः सुमन्त्रस्त्वरितं गत्वा त्वरितविक्रमः ६ समानयत्स तान्सर्वान्समस्तान्वेदपारगान् । तान्पूजयित्वा धर्मात्मा राजा दशरथस्तदा ७ धर्मार्थसहितं युक्तं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् । मम तातप्यमानस्य पुत्रार्थं नास्ति वै सुखम् ८ पुत्रार्थं हयमेधेन यक्ष्यामीति मतिर्मम । तदहं यष्टुमिच्छामि हयमेधेन कर्मणा ९ ऋषिपुत्रप्रभावेण कामान्प्राप्स्यामि चाप्यहम् । ततः साध्विति तद्वाक्यं

---

ह्या गोष्टीला बरेच दिवस झाल्यानंतर एकदां अत्यंत मनोहर असा वसंतसमय प्राप्त झाला असतां पुत्रकामेष्टिरूप याग करण्याचें दशरथ राजाच्या मनामध्यें आलें व १ मनांत आल्यानंतर कुलसंतान व्हावें एतदर्थ याग करण्याकरितां देवांसारख्या तेजस्वी असलेल्या त्या ऋष्यशृंग विप्राला मस्तकानें प्रणाम करून याग शेंवटास नेण्याविषयीं राजानें त्याची प्रार्थना केली असतां २ " ठीक आहे " असें सांगून तो त्या पृथ्वीपति दशरथराजाला ह्मणाला " यज्ञाच्या सामग्रीची जुळवाजुळव करा, अश्व सोडा ३ आणि सरयूनदीचें उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार करा ". ह्याप्रमाणें ऋष्यशृंगानें सांगितल्यानंतर दशरथराजा सुमंत्रनामक मंत्र्याला ह्मणाला " हे सुमंत्रा, वेदपारंगत ब्राह्मणांना ४ आणि वेदवेत्त्या ऋत्विजांना, सत्वर निमंत्रण कर. सारांश, सुयज्ञ, वामदेव, जाबालि, काश्यप ५, पुरोहित वसिष्ठ व इतरही श्रेष्ठ द्विज ह्यांना निमंत्रण कर ". ह्याप्रमाणें राजाची आज्ञा झाल्यानंतर शीघ्र गमन करणारा सुमंत्र त्वरित गेला ६ आणि त्या सर्व वेदपारंगत ब्राह्मणांना घेऊन आला. तेव्हां, त्यांचें पूजन करून धर्मात्म्या दशरथ राजानें ७ धर्म व अर्थ ह्यांना अनुसरून असलेलें असें योग्य व स्पष्ट भाषण त्यांच्याशीं केलें. ( त्या वसिष्ठप्रभृति ब्राह्मणांना तो दशरथराजा ह्मणाला ) " पुत्राकरितां काळजी करीत असलेल्या मला सुख होत नाहीं ८. ह्यास्तव, पुत्रप्राप्ति होण्याकरितां अश्वमेध याग करण्याचा माझा विचार आहे. तात्पर्य, अश्वमेधाचें अनुष्ठान करण्याची माझी इच्छा आहे ९ आणि ऋष्यशृंगनामक ऋषिपुत्राच्या प्रभावानें माझे मनोरथ पूर्ण होणार आहेत ". ह्याप्रमाणें राजानें भाषण केल्यानंतर वसिष्ठप्रभृति सर्व ब्राह्मणांनीं

ब्राह्मणाः प्रत्यपूजयन् १० वसिष्ठप्रमुखाः सर्वे पार्थिवस्य मुखाच्च्युतम् । ऋष्यशृङ्गपुरोगाश्च प्रत्यूचुर्नृपतिं तदा ११ संभाराः संभ्रियन्तां ते तुरगश्च विमुच्यताम् । सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् १२ सर्वथा प्राप्स्यसे पुत्रांश्चतुरोऽमितविक्रमान् । यस्य ते धार्मिकी बुद्धिरियं पुत्रार्थमागता १३ ततः प्रीतोऽभवद्राजा श्रुत्वा तु द्विजभाषितम् । अमात्यानब्रवीद्राजा हर्षेणेदं शुभाक्षरम् १४ गुरूणां वचनाच्छीघ्रं संभाराः संभ्रियन्तु मे । समर्थाधिष्ठितश्चाश्वः सोपाध्यायो विमुच्यताम् १५ सरय्वाश्चोत्तरे तीरे यज्ञभूमिर्विधीयताम् । शान्तयश्चाभिवर्धन्तां यथाकल्पं यथाविधि १६ शक्यः कर्तुमयं यज्ञः सर्वेणापि महीक्षिता । नापराधो भवेत्कष्टो यद्यस्मिन्क्रतुसत्तमे १७ छिद्रं हि मृगयन्त्येते विद्वांसो ब्रह्मराक्षसाः । विधिहीनस्य यज्ञस्य सद्यः कर्ता विनश्यति १८ तद्यथा विधिपूर्वं मे क्रतुरेष समाप्यते । तथा विधानं क्रियतां समर्थाः करणेष्विह १९ तथेति च ततः सर्वे मन्त्रिणः प्रत्यपूजयन् ।

---

" उत्तम उत्तम " ह्मणून राजाच्या मुखांतून निघालेल्या त्या भाषणाची प्रशंसा केली. तदनंतर ऋष्यशृंगप्रभृति ऋत्विजांनीं त्या राजाला प्रत्युत्तर केलें १०,११. ( ते ह्मणाले अश्वमेध )" यज्ञाच्या साहित्याची जुळवाजुळव होऊं द्या व अश्व सोडून सरयूनदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार होऊं द्या १२. हे राजा, ज्याअर्थी पुत्रप्राप्तीकरितां हा धार्मिक विचार तुझ्या मनामध्यें आला आहे त्याअर्थी तुला अतुलपराक्रमी असे चार पुत्र निःसंशय प्राप्त होतील "१३. ह्याप्रमाणें द्विजांचें भाषण श्रवण करून दशरथ राजा संतुष्ट झाला आणि शुभ शब्दांनीं भरलेलें असें हें भाषण अमात्यांशीं करूं लागला १४. ( दशरथराजा ह्मणाला हे अमात्य हो, ) गुरूंनीं सांगितल्याप्रमाणें ( अश्वमेधक्रतूच्या ) साहित्याची जुळवाजुळव करा, अश्व भक्षणाऱ्यांचा पराभव करण्यास समर्थ अशांच्या देखरेखीखालीं व उपाध्याय बरोबर देऊन अश्व सोडा १५. सरयू नदीचे उत्तर तीरीं यज्ञभूमि तयार करा आणि सूत्रांत सांगितल्याप्रमाणें ( विघ्ननिवारणार्थ ) शांतिकर्में यथाविधि होऊं द्या १६. अहो, सर्वगुणसंपन्न जरी राजा झाला तरी त्याच्या हातून हा अश्वमेध यज्ञ शेवटास जाणें शक्य आहे काय? ह्या श्रेष्ठ क्रतूच्या अनुष्ठानामध्यें जर मोठासा प्रमाद नच झाला तर मात्र कदाचित् तो शेवटास जाण्याचा संभव आहे १७. कारण, विद्वान् विद्वान् ब्रह्मराक्षस ह्या क्रतूमध्यें कोठें न्यून पडेल हें पाहत असतात आणि त्यामुळें यज्ञानुष्ठान अविधि झालें असतां याग करणाऱ्याचा तत्काल नाश होतो १८. ह्यास्तव, हा माझा याग यथाविधि शेवटास जाईल अशा रीतीनें तुह्मी यत्न करा; ह्या यज्ञाला अवश्य असलेलीं साधनें जुळविण्याविषयीं तुह्मी समर्थ आहांत १९. ह्याप्रमाणें

पार्थिवेन्द्रस्य तद्वाक्यं यथाज्ञप्तमकुर्वत २० ततो द्विजास्ते धर्मज्ञमस्तुवन्पार्थिवर्षभम्। अनुज्ञातास्ततः सर्वे पुनर्जग्मुर्यथागतम् २१ गतानां तेषु विप्रेषु मन्त्रिणस्तान्नराधिपः। विसर्जयित्वा स्वं वेश्म प्रविवेश महामतिः २२ [ ४२६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

पुनः प्राप्ते वसन्ते तु पूर्णः संवत्सरोभवत्। प्रसवार्थं ततो यष्टुं हयमेधेन वीर्यवान् १ अभिवाद्य वसिष्ठं च न्यायतः प्रतिपूज्य च। अब्रवीत्प्रश्रितं वाक्यं प्रसवार्थं द्विजोत्तमम् २ यज्ञो मे क्रियतां ब्रह्मन्यथोक्तं मुनिपुङ्गव। यथा न विघ्नाः क्रियन्ते यज्ञाङ्गेषु विधीयताम् ३ भवान्स्निग्धः सुहृन्मह्यं गुरुश्च परमो महान्। वोढव्यो भवता चैव भारो यज्ञस्य चोद्यतः ४ तथेति च स राजानमब्रवीद्द्विजसत्तमः। करिष्ये सर्वमेवैतद्भवता यत्समर्थितम् ५ ततोब्रवीद्द्विजान्वृद्धान्यज्ञकर्मसु निष्ठितान्। स्थापत्ये निष्ठितांश्चैव वृद्धान्परमधार्मिकान् ६ कर्मान्तिकाञ्छिल्पकारान्वर्धकीन्खन-

---

नृपश्रेष्ठ दशरथराजानें आज्ञा केल्यानंतर राजाधिराजाच्या त्या भाषणाची सर्व मंत्र्यांनीं प्रशंसा केली आणि त्याच्या आज्ञेप्रमाणें त्यांनीं सर्व तयारी केली २० तदनंतर त्या ब्राह्मणांनींही त्या धर्मज्ञ नृपश्रेष्ठ दशरथाची स्तुति केली आणि त्याची अनुज्ञा घेऊन ते सर्व पुनरपि आल्या मार्गानें चालते झाले २१ व ते विप्र गेल्यानंतर त्या मंत्र्यांना निरोप देऊन तो महाविचारी दशरथराजाही आपल्या अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२ ॥

वसंतामध्यें अश्व सोडिल्यानंतर पुनरपि वसंतऋतु प्राप्त झाला असतां संवत्सर पूर्ण झाला. तेव्हां, तो वीर्यवान् दशरथराजा संतानप्राप्त्यर्थ अश्वमेध यागाची दीक्षा घेण्याकरितां वसिष्ठांकडे गेला १ आणि अभिवंदनपूर्वक प्रथमतः यथाविधि पूजन करून संतानाकरितां त्या द्विजश्रेष्ठ वसिष्ठ मुनींना विनयानें ह्मणाला २ " हे ब्रह्मन्, माझा याग आपण यथाशास्त्र शेवटास न्या आणि, हे मुनिश्रेष्ठ, यज्ञांगांमध्यें ब्रह्मराक्षसप्रभृति विघ्नें आणणार नाहींत अशा रीतीनें आपण तें अनुष्ठान पार पाडण्याची तजवीज ठेवा ३. स्नेहयुक्त असे माझे सुहृद् आपणच असून मुख्य गुरुही आपणच आहांत. करितां, हें हालीं घेतलेलें यज्ञाचें ओझें शेवटास नेण्याची जोखीम आपल्याच शिरावर आहे ४." ह्यावर ते द्विजश्रेष्ठ वसिष्ठमुनि ह्मणाले " ठीक आहे; तुझ्या प्रार्थनेप्रमाणें मी हें सर्व कांहीं करीन " ५. तदनंतर यज्ञानुष्ठानांमध्यें प्रवीण असे वृद्धवृद्ध द्विज, कलाकौशल्याच्या

कानपि । गणकाञ्छिल्पिनश्चैव तथैव नटनर्तकान् ७ तथा शुचीञ्छास्त्रविदः पुरुषान्सुबहुश्रुतान् । यज्ञकर्म समीहन्तां भवन्तो राजशासनात् ८ इष्टका बहुसाहस्रीः शीघ्रमानीयतामिति । उपकार्याः क्रियन्तां च राज्ञो बहुगुणान्विताः ९ ब्राह्मणावसथाश्चैव कर्तव्याः शतशः शुभाः । भक्ष्यान्नपानैर्बहुभिः समुपेताः सुनिष्ठिताः १० तथा पौरजनस्यापि कर्तव्याश्च सुविस्तराः । आगतानां सुदूराच्च पार्थिवानां पृथक्पृथक् ११ वाजिवारणशालाश्च तथा शय्यागृहाणि च । भटानां महदावासा वैदेशिकनिवासिनाम् १२ आवासा बहुभक्ष्या वै सर्वकामैरुपस्थिताः । तथा पौरजनस्यापि जनस्य बहुशोभनम् १३ दातव्यमन्नं विधिवत्सत्कृत्य न तु लीलया । सर्वे वर्णा यथा पूजां प्राप्नुवन्ति सुसत्कृताः १४ न चावज्ञा प्रयोक्तव्या कामक्रोधवशादपि । यज्ञकर्मसु येऽव्यग्राः पुरुषाः शिल्पिनस्तथा १५ तेषामपि विशेषेण पूजा कार्या यथाक्रमम् । ये स्युः संपूजिताः

कामामध्यें निपुण आणि अत्यंत धार्मिक असे वृद्ध वृद्ध ६ शिल्पी व निरवानिरव करणारे मजूर, सुतार, खणणारे, ज्योतिषी, कारागीर आणि त्याचप्रमाणें सूत्रधार, नृत्य करणारे ७ व तसेच चांगले बहुश्रुत, शास्त्रज्ञ व आचरणांनीं शुद्ध असे लोक ह्यांना ते ह्मणाले " तुह्मी राजाच्या आज्ञेवरून पुष्कळ यज्ञानुष्ठान पार पाडण्याची तजवीज ठेवा ८. पुष्कळ हजार विटा प्रथम आणा आणि बहुगुणसंपन्न असे राजवाडे तयार करा ९. त्याचप्रमाणें अनेक प्रकारच्या भक्ष्य, भोज्य व पेय पदार्थांनीं युक्त आणि ( पर्जन्याला वगैरे न जुमानण्यासारखीं ) बळकट अशीं ब्राह्मणाकरितां शेंकडों शुभ वसतिस्थानें तयार करा १० व नगरवासी जनांना राहण्याकरितांही चांगलीं विस्तृत घरें तयार करा. फार लांबून आलेल्या राजांकरितां पृथक् पृथक् ११ अश्वशाला, गजशाला आणि शय्यागृहें तयार ठेवा. मोठमोठ्या लोकांना राहण्याला योग्य अशीं वसतिस्थानें तयार करा आणि परदेशांतील योद्ध्यांकरितां १२ सर्व भोग्य वस्तूंनीं संपन्न आणि विपुल भक्ष्य पदार्थांनीं युक्त अशीं वसतिस्थानें तयार ठेवा आणि नगरवासी जन व इतर सामान्य लोक यांचीही वसतिस्थानें उत्तमप्रकारें बनवा १३. अनादर न करितां ह्मणजे सर्व वर्णांच्या लोकांची सत्कारपूर्वक मानमान्यता होईल अशा रीतीनें आदरपूर्वक यथाविधि अन्नदान करा १४. काम आणि क्रोध ह्यांचे तावडींत सांपडण्यासारिखा जरी प्रसंग असला तरी कोणाचीही अवज्ञा होतां उपयोगी नाहीं. यज्ञकर्मामध्यें जे पुरुष गढून गेलेले असतील त्यांचीच केवळ नव्हे परंतु शिल्पी लोकांचीही १५ योग्यतेच्या क्रमाला अनुसरून विशेषेकरून मानमान्यता राखिली पाहिजे. धन आणि भोजन ह्यांच्या योगानें

सर्वे वसुभिर्भोजनेन च १६ यथा सर्वं सुविहितं न किंचित्परिहीयते। यथा भवन्तः कुर्वन्तु प्रीतियुक्तेन चेतसा १७ ततः सर्वे समागम्य वसिष्ठमिदमब्रुवन्। यथेष्टं तत्सुविहितं न किंचित्परिहीयते १८ यथोक्तं तत्करिष्यामो न किंचित्परिहास्यते। ततः सुमन्त्रमाहूय वसिष्ठो वाक्यमब्रवीत् १९ निमन्त्रयस्व नृपतीन्पृथिव्यां ये च धार्मिकाः। ब्राह्मणान्क्षत्रियान्वैश्याञ्छूद्रांश्चैव सहस्रशः २० समानयस्व सत्कृत्य सर्वदेशेषु मानवान्। मिथिलाधिपतिं शूरं जनकं सत्यवादिनम् २१ तमानय महाभागं स्वयमेव सुसत्कृतम्। पूर्वं संबन्धिनं ज्ञात्वा ततः पूर्वं ब्रवीमि ते २२ तथा काशिपतिं स्निग्धं सततं प्रियवादिनम्। सद्वृत्तं देवसंकाशं स्वयमेवानयस्व ह २३ तथा केकयराजानं वृद्धं परमधार्मिकम्। श्वशुरं राजसिंहस्य सपुत्रं तमिहानय २४ अङ्गेश्वरं महेष्वासं रोमपादं सुसत्कृतम्। वयस्यं राजसिंहस्य सपुत्रं तमिहानय २५ तथा कोसलराजानं भानुमन्तं सुसत्कृतम्। मागधाधिपतिं शूरं सर्वशास्त्रविशारदम् २६ प्राप्तिज्ञं परमोदारं सत्कृतं

---

सर्वांची मानमान्यता राहील १६ अशा रीतीनें आनंदयुक्त अंतःकरणानें तुह्मी सर्व तजवीज ठेवा; ह्मणजे सर्व यथास्थित होऊन कशाचीही उणीव पडणार नाहीं" १७. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितल्यानंतर सर्वजण त्यांचे समीप येऊन ह्मणाले "आपण जसें मनामध्यें आणिलें आहे तसें सर्व यथास्थित होईल; कांहीं कमी पडणार नाहीं १८. सारांश, आपल्या आज्ञेप्रमाणें आह्मी तें सर्व करूं; कांहीं न्यून पडणार नाहीं." ह्याप्रमाणें त्यांनीं सांगितल्यानंतर वसिष्ठांनीं सुमंत्राला हाक मारून सांगितलें १९ "पृथ्वीमध्यें जे कोणी धार्मिक राजे असतील त्यांना निमंत्रण कर. हजारों ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र २० असे सर्व देशांतील लोक सत्कारपूर्वक ( यज्ञसमारंभाकरितां बोलावून ) आण. शूर आणि सत्यवादी असा जो महाभाग्यवान् मिथिलाधिपति जनक त्याला उत्तमसत्कारपूर्वक तूं स्वतः घेऊन ये. तो संबंधी होणार आहे असें पूर्वींच मला समजून आलें असल्यामुळें त्याला निमंत्रण करण्याविषयीं मी तुला प्रथम सांगत आहें २१,२२. त्याचप्रमाणें आपणांविषयीं प्रेम धरणारा प्रियवादी आणि सदाचरणी असा जो देवासारिखा तेजस्वी काशिराजा त्याला तूं स्वतःच घेऊन ये २३. त्याचप्रमाणें अत्यंत धार्मिक व वृद्ध असा जो नृपश्रेष्ठ दशरथाचा श्वशुर केकयराजा त्याला पुत्रांसहवर्तमान तूं येथें घेऊन ये २४. तसाच नृपश्रेष्ठ दशरथाचा मित्र जो महाधनुर्धारी अंगदेशाधिपति रोमपाद त्याला पुत्रांसहवर्तमान चांगल्या सत्कारानें तूं येथें आण २५. तसेंच कोसलदेशाधिपति भानुमानाला सत्कारपूर्वक घेऊन ये आणि त्याचप्रमाणें शूर, सर्व शास्त्रांमध्यें

पुरुषर्षभम् । राज्ञः शासनमादाय चोदयस्व नृपर्षभान् २७ प्राचीनान्सिन्धुसौवीरान्सौराष्ट्रेयांश्च पार्थिवान् । दाक्षिणात्यान्नरेन्द्रांश्च समस्तानानयस्व ह २८ सन्ति स्निग्धाश्च ये चान्ये राजानः पृथिवीतले । तानानय यथा क्षिप्रं सानुगान्सहबान्धवान् २९ एतान्दूतैर्महाभागैरानयस्व नृपाज्ञया ३० वसिष्ठवाक्यं तच्छ्रुत्वा सुमन्त्रस्त्वरितं तदा । व्यादिशत्पुरुषांस्तत्र राज्ञामानयने शुभान् ३१ स्वयमेव हि धर्मात्मा प्रयातो मुनिशासनात् । सुमन्त्रस्त्वरितो भूत्वा समानेतुं महामतिः ३२ ते च कर्मान्तिकाः सर्वे वसिष्ठाय महर्षये । सर्वं निवेदयन्ति स्म यज्ञे यदुपकल्पितम् ३३ ततः प्रीतो द्विजश्रेष्ठस्तान्सर्वान्मुनिरब्रवीत् । अवज्ञया न दातव्यं कस्यचिल्लीलयापि वा ३४ अवज्ञया कृतं हन्याद्दातारं नात्र संशयः । ततः कैश्चिदहोरात्रैरुपयाता महीक्षितः ३५ बहूनि रत्नान्यादाय राज्ञो दशरथस्य ह । ततो वसिष्ठः सुप्रीतो राजानमिदमब्रवीत् ३६ उपयाता नरव्याघ्र राजानस्तव शासनात् । मयापि सत्कृताः सर्वे यथार्हं राजसत्तम ३७

निपुण, समय जाणणारा आणि अत्यंत उदार अशा पुरुषश्रेष्ठ मगध राजालाही घेऊन ये व राजाची आज्ञा घेऊन इतरही नृपश्रेष्ठांना इकडे येण्याविषयीं प्रेरणा कर २६, २७. पूर्व देशांतील, दक्षिण देशांतील आणि त्याचप्रमाणें सिंधु, सौवीर व सौराष्ट्र ह्या देशांतील सर्व राजांना तूं घेऊन ये २८. त्याचप्रमाणें दशरथाशीं प्रेमानें वागणारे जे आणखी राजे भूतलावर असतील त्यांना सेवक आणि बांधव ह्यांसहवर्तमान तूं जसें सत्वर आणितां येईल तसें आण २९. सारांश, ह्यांना मोठ्या योग्यतेचे दूत पाठवून राजाच्या आज्ञेनें तूं घेऊन ये " ३०. तें वसिष्ठांचें भाषण श्रवण करून सुमंत्रानें राजांना आणण्याकरितां (आचरणानें) पवित्र अशा पुरुषांना सत्वर आज्ञा केली ३१ आणि वसिष्ठमुनींच्या आज्ञेप्रमाणें तो धर्मात्मा महाविचारी सुमंत्र (कांहीं राजांना आणण्याकरितां) सत्वर स्वतः गेला ३२. नंतर ते सर्व काम करणारे लोक वसिष्ठ महर्षींकडे आले व यज्ञासंबंधानें जें कांहीं साहित्य जुळविण्यास त्यांना सांगितलें होतें तें जुळविलें ह्मणून त्यांनीं त्यांना निवेदन केलें ३३. तेव्हां ते द्विजश्रेष्ठ वसिष्ठ मुनि संतुष्ट होऊन त्या सर्वांना ह्मणाले " अनादर करून अथवा अश्रद्धेनें कोणाला तुह्मी कांहींही देऊं नका (हें मी आणखी एकदां सांगून ठेवितों) ३४. कारण, अवज्ञेनें केलेलें दान दात्याचा नाश करितें ह्यांत संशय नाहीं ". ह्यानंतर बोलाविलेले राजे पुष्कळ कांहीं दिवसांनीं रत्नें बरोबर घेऊन दशरथ राजाकडे आले असतां वसिष्ठ सुप्रसन्न होऊन राजाला ह्मणाले ३५, ३६ " हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या आज्ञेवरून राजे आले आहेत व, हे राजाधिराज, योग्यतेनुरूप,

यज्ञियं च कृतं सर्वं पुरुषैः सुसमाहितैः। निर्यातु च भवान्यष्टुं यज्ञायतनमन्तिकात् ३८ सर्वकामैरुपहृतैरुपेतं वै समन्ततः। द्रष्टुमर्हसि राजेन्द्र मनसेव विनिर्मितम् ३९ तथा वसिष्ठवचनादृष्यशृङ्गस्य चोभयोः। दिवसे शुभनक्षत्रे निर्यातो जगतीपतिः ४० ततो वसिष्ठप्रमुखाः सर्व एव द्विजोत्तमाः। ऋष्यशृङ्गं पुरस्कृत्य यज्ञकर्मारभंस्तदा ४१ यज्ञवाटं गताः सर्वे यथाशास्त्रं यथाविधि। श्रीमांश्च सह पत्नीभी राजा दीक्षामुपाविशत् ४२ इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

अथ संवत्सरे पूर्णे तस्मिन्प्राप्ते तुरङ्गमे। सरय्वाश्चोत्तरे तीरे राज्ञो यज्ञोऽभ्यवर्तत १ ऋष्यशृङ्गं पुरस्कृत्य कर्म चक्रुर्द्विजर्षभाः। अश्वमेधे महायज्ञे राज्ञोऽस्य सुमहात्मनः २ कर्म कुर्वन्ति विधिवद्याजका वेदपारगाः। यथाविधि यथान्यायं परिक्रामन्ति शास्त्रतः ३ प्रवर्ग्यं शास्त्रतः कृत्वा तथैवोपसदं द्विजाः। चक्रुश्च विधिवत्सर्वमधिकं कर्म शास्त्रतः ४ अभिपूज्य तदा

---

मीं सर्वांचा सत्कारही केला आहे ३७. आपआपल्या कामांविषयीं अतिशय दक्ष असलेल्या लोकांनीं यज्ञाला लागणाऱ्या सर्व पदार्थांची सिद्धता ठेविली आहे. ह्यास्तव, यजन करण्याकरितां तूं यज्ञभूमीसमीप जा ३८ आणि इष्ट पदार्थांनीं (अत्यंत सत्वर) युक्त झालेली आणि ह्मणूनच मनाच्या योगानेंच निर्माण केल्यासारखी असलेली यज्ञभूमि, हे राजाधिराज, तूं चोहोंबाजूंनीं अवलोकन कर" ३९. तदनंतर वसिष्ठ आणि ऋष्यशृंग ह्या उभयतांनीं सांगितल्यावरून शुभ नक्षत्रांनीं युक्त अशा दिवशीं भूपति दशरथ (यज्ञभूमीकडे जाण्याकरितां) निघाला ४०. तव्हां वसिष्ठप्रभृति सर्व द्विजश्रेष्ठ ऋष्यशृंगाला पुढें करून यज्ञमंडपामध्यें गेले आणि त्या सर्वांनीं सूत्र आणि शास्त्र ह्यांना अनुसरून यज्ञकर्माला आरंभ केला असतां पत्न्यांसहवर्तमान त्या वैभवशाली राजानें यज्ञदीक्षा घेतली ४१,४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३ ॥

तदनंतर संवत्सर पूर्ण होऊन तो सोडिलेला अश्व पुनरपि प्राप्त झाला असतां सरयू नदीचे उत्तरतीरीं दशरथ राजाच्या यज्ञाला आरंभ झाला १. त्या महात्म्या दशरथ राजाच्या अश्वमेधनामक महाक्रतूमध्यें ऋष्यशृंग मुनींना मुख्य आर्त्विज्य देऊन (ह्मणजे ब्रह्मत्व देऊन) द्विजश्रेष्ठांनीं अनुष्ठान केलें २. वेदपारंगत याजक यज्ञाचें अनुष्ठान यथाविधि करूं लागले आणि श्रुति, (पूर्वमिमांसारूप) न्याय आणि शास्त्र ह्यांना अनुसरून आपआपलें अनुष्ठान करण्याविषयीं ते प्रवृत्त झाले ३. प्रवर्ग्य, उपसद इष्टि आणि इतरही जें कांहीं अधिक सांगितलेलें होतें तें सर्व कर्म, शास्त्र आणि श्रुति

हृष्टाः सर्वे चक्रुर्यथाविधि । प्रातःसवनपूर्वाणि कर्माणि मुनिपुङ्गवाः ५ ऐन्द्रश्च विधिवद्दत्तो राजा चाभिषुतोनघः । मध्यंदिनं च सवनं प्रावर्तत यथाक्रमम् ६ तृतीयसवनं चैव राज्ञोस्य सुमहात्मनः । चक्रुस्ते शास्त्रतो दृष्ट्वा यथा ब्राह्मणपुङ्गवाः ७ आह्वयांचक्रिरे तत्र शक्रादीन्विबुधोत्तमान् । ऋष्यशृङ्गादयो मन्त्रैः शिक्षाक्षरसमन्वितैः ८ गीतीभिर्मधुरैः स्निग्धैर्मन्त्राह्वानैर्यथार्हतः । होतारो ददुरावाह्य हविर्भागान्दिवौकसाम् ९ न चाहुतमभूत्तत्र स्खलितं वा न किंचन । दृश्यते ब्रह्मवत्सर्वं क्षेमयुक्तं हि चक्रिरे १० न तेष्वहःसु श्रान्तो वा क्षुधितो वा न दृश्यते । नाविद्वान्ब्राह्मणः कश्चिन्नाशतानुचरस्तथा ११ ब्राह्मणा भुञ्जते नित्यं नाथवन्तश्च भुञ्जते । तापसा भुञ्जते चापि श्रमणाश्चैव भुञ्जते १२ वृद्धाश्च व्याधिताश्चैव स्त्रीबालाश्च तथैवच । अनिशं भुञ्जमानानां न तृप्तिरुपलभ्यते १३ दीयतां दीयतामन्नं वासांसि विविधानि च । इति संचोदितास्तत्र तथा

---

ह्यांचें अतिक्रमण न करितां, ब्राह्मणांनीं केलें ४. ज्या ज्या कर्माची जी जी देवता तिचें तिचें पूजन करून आनंदित झालेल्या श्रेष्ठ मुनींनीं प्रातःसवनप्रभृति सर्व कर्मे यथाविधि केलीं ५. इंद्रदेवतेला उद्देशून यथाविधि हविर्भाग दिला; पवित्र सोमवल्ली कुटून तिचा रस काढिला आणि नंतर क्रमाला अनुसरून मध्यंदिनसवन ( ह्या नांवाचें अनुष्ठान ) सुरू झालें ६ व तें झाल्यावर त्या राजाच्या अश्वमेधसंबंधीं तृतीयसवनसंज्ञक कर्मही श्रेष्ठ ब्राह्मणांनीं शास्त्रांत अवलोकन करून यथाविधि केलें ७. शिक्षेनुरूप वर्णोच्चारानें युक्त असलेल्या मंत्रांच्या योगानें त्या क्रतूमध्यें ऋष्यशृंग ज्यांत मुख्य आहेत अशा ऋत्विजांनीं इंद्रप्रभृति श्रेष्ठ देवांचें आवाहन केलें ८. मधुर सामें आणि भक्तियुक्त समंत्रक आह्वानें ह्यांच्या योगानें आवाहनपूर्वक होत्यांनीं ज्याच्या त्याच्या मानाप्रमाणें देवांना हाविर्भाग दिले ९. त्या क्रतूमध्यें प्रमाद अथवा अविधि हवन यत्किंचित्ही न होतां ऋत्विजांनीं तें सर्व अनुष्ठान समंत्रक व निर्विघ्नपणें तडीस नेलें १०. तें अनुष्ठान जितकें दिवस चाललें होतें तितक्या दिवसांत त्या यज्ञमंडपामध्यें श्रांत, क्षुधित, अविद्वान् आणि शंभर खटपटी ज्याच्या हाताखालीं नाहींत असा कोणीही ब्राह्मण दृष्टोत्पत्तीस आला नाहीं ११. ब्राह्मण ज्यांना इतर प्रभु आहेत असे ( शूद्र ), तापस आणि श्रमण ( ह्मणजे बौद्ध संन्यासी ) हे त्या ठिकाणीं भोजन करीत असत १२. वृद्ध, व्याधिग्रस्त, स्त्रिया व बालक हे एकसारिखे भोजन करीत असतांनाही ( यजमान दशरथ राजाला त्यांना भोजन घालणें ) पुरेसें झालें नाहीं १३. अन्न द्या आणि नानाप्रकारचीं वस्त्रें देऊन टाका अशी आज्ञा अनेक वेळां त्या यज्ञमंडपामध्यें अधि-

चक्रुर्नैकशः १४ अन्नकूटाश्च दृश्यन्ते बहवः पर्वतोपमाः। दिवसे दिवसे तत्र सिद्धस्य विधिवत्तदा १५ नानादेशादनुप्राप्ताः पुरुषाः स्त्रीगणास्तथा। अन्नपानैः सुविहितास्तस्मिन्यज्ञे महात्मनः १६ अन्नं हि विधिवत्स्वादु प्रशंसन्ति द्विजर्षभाः। अहो तृप्ताः स्म भद्रं त इति शुश्राव राघवः १७ स्वलंकृताश्च पुरुषा ब्राह्मणान्पर्यवेशयन्। उपासन्ते च तानन्ये सुमृष्टमणिकुण्डलाः १८ कर्मान्तरे तदा विप्रा हेतुवादान्बहूनपि। प्राहुः सुवाग्मिनो धीराः परस्परजिगीषया १९ दिवसे दिवसे तत्र संस्तरे कुशला द्विजाः। सर्वकर्माणि चक्रुस्ते यथाशास्त्रं प्रचोदिताः २० नाषडङ्गविदत्रासीन्नाव्रतो नाबहुश्रुतः। सदस्यास्तस्य वै राज्ञो नावादकुशलो द्विजः २१ प्राप्ते यूपोच्छ्रये तस्मिन्षड्बैल्वाः खादिरास्तथा। तावन्तो बिल्वसहिताः पर्णिनश्च तथापरे २२ श्लेष्मातकमयो दिष्टो देवदारुमयस्तथा। द्वावेव

---

कारी पुरुषांना होत असे व ते त्याप्रमाणें करीत असत १४. पाकशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें तयार केलेल्या अन्नाचे पर्वतासारिखे असंख्य ढीग प्रत्यहीं त्या ठिकाणीं दृष्टीं पडत असत १५ आणि देशोदेशीहून आलेले पुरुष आणि स्त्रीसमुदाय ह्यांची त्या महात्म्या दशरथाच्या यज्ञामध्यें अन्नपानांच्या योगानें उत्तम प्रकारची व्यवस्था ठेविली जात असे १६. पाकशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें तयार केलेल्या मिष्ट अन्नाची द्विजश्रेष्ठ प्रशंसा करीत असत आणि त्यामुळें "हे राजा, आह्मी तृप्त झालों; तुझें कल्याण असो" असें रघुवंशज दशरथाच्या कानीं येत असे १७. उत्तम उत्तम भूषणें धारण केलेले पुरुष ब्राह्मणांना वाढीत असत आणि अत्यंत उज्ज्वल रत्नकुंडलें धारण केलेले असे इतर लोक त्यांचा समाचार घेत असत १८. एका कर्माची समाप्ति होऊन दुसऱ्या कर्माचा आरंभ होईपर्यंत असणाऱ्या मधल्या वेळांत एकमेकांना जिंकण्याच्या इच्छेनें मोठमोठ्या विद्वान् वक्त्यांचे हेतुपुरःसर अनेक प्रकारचे वाद चालत असत १९. त्या यज्ञामध्यें अनुष्ठानाविषयीं निपुण असलेले ब्राह्मण यथाशास्त्र (प्रेषप्रभृति) प्रेरणा झाली असतां प्रत्यहीं सर्व कर्मे करीत असत २०. त्या राजाच्या यज्ञमंडपामध्यें (अनुष्ठान पाहणारे) जे सदस्य होते त्यांत (शिक्षाप्रभृति) षडंगांचें ज्ञान नसणारा, व्रतस्थ न राहणारा, बहुश्रुत नसणारा आणि त्याचप्रमाणें वादामध्यें कुशल नसणारा असा कोणीही ब्राह्मण नव्हता २१. यूप उभारण्याचा समय प्राप्त झाला असतां सहा बेलाचे, सहा खैराचे आणि एकेका बेलाच्या यूपासमीप एकेक असे सहा पळसाचे यूप त्या ठिकाणीं आणिले होते २२. यूपांमध्यें श्लेष्मातक वृक्षाचा एक यूप होता; परंतु, देवदारु वृक्षाचा यूप केवळ एकच नसून

तत्र विहितौ बाहुब्यस्तपरिग्रहौ २३ कारिताः सर्व एवैते शास्त्रज्ञैर्यज्ञकोविदैः। शोभार्थं तस्य यज्ञस्य कांचनालंकृताभवन् २४ एकविंशतियूपास्त एकविंशत्यरत्नयः। वासोभिरेकविंशद्भिरेकैकं समलंकृताः२५ विन्यस्ता विधिवत्सर्वैः शिल्पिभिः सुकृता दृढाः॥ अष्टास्रयः सर्व एव श्लक्ष्णरूपसमन्विताः२६ आच्छादितास्ते वासोभिः पुष्पैर्गन्धैश्च पूजिताः।सप्तर्षयो दीप्तिमन्तो विराजन्ते यथा दिवि २७ इष्टकाश्च यथान्यायं कारिताश्च प्रमाणतः। चितोऽग्निर्ब्राह्मणैस्तत्र कुशलैः शिल्पकर्माणि २८ स चित्यो राजसिंहस्य संचितः कुशलैर्द्विजैः। गरुडो रुक्मपक्षो वै त्रिगुणोऽष्टादशात्मकः २९ नियुक्तास्तत्र पशवस्तत्तदुद्दिश्य दैवतम्। उरगाः पक्षिणश्चैव यथाशास्त्रं प्रचोदिताः ३० शामित्रे तु हयस्तत्र तथा जलचराश्च ये। ऋषिभिः सर्वमेवैतन्नियुक्तं शास्त्रतस्तदा ३१ पशूनां त्रिशतं तत्र यूपेषु नियतं तदा। अश्व-

वेगंत बसण्यासारिखे स्थूल असे दोन यूप होते २३. हे सर्व यूप यज्ञानुष्ठानामध्यें निष्णात अशा शिल्पशास्त्रवेत्त्यांकडून करविलेले होते आणि त्या ऋतूला शोभा येण्याकरितां त्यांना सुवर्णाचे अलंकार घातलेले होते २४. एकवीस एकवीस हात लांब असलेले ते यूप एकवीस एकवीस वस्त्रांनीं एक एक ह्याप्रमाणें अलंकृत केलेले होते २५. त्या सर्वच यूपांची ठेवण मनोहर असून ते सर्व अष्टकोणाकृति होते व शिल्पी लोकांनीं ते चांगले व मजबूत तयार केलेले होते. असो. त्यांची यथाविधि स्थापना करून वस्त्रांच्या योगानें त्यांचें आच्छादन व गंधपुष्पांनीं पूजन झालें असतां स्वर्गामध्यें शोभत असलेल्या देदीप्यमान सप्तर्षीप्रमाणें ते शोभूं लागले २६,२७. कल्पसूत्रांत सांगितल्याप्रमाणें प्रमाणाला अनुसरून इष्टका ( ह्मणजे विटा ) तयार करविल्या होत्या आणि त्यांच्या योगानें शिल्पकर्मामध्यें कुशल ब्राह्मणांनीं अग्नीला आधारभूत असें स्थान रचून तयार केलें होतें २८. नृपश्रेष्ठ दशरथ राजाचा, शिल्पकर्मामध्यें निष्णात असलेल्या ब्राह्मणांनीं तयार केलेला, तो त्रिगुणित व अष्टादशात्मक चयन सुवर्णपक्षांनीं युक्त अशा गरुडपक्ष्याच्या आकृतीसारिखा झाला २९. त्या त्या देवतेच्या उद्देशानें त्या ठिकाणीं पशु बांधून ठेविले होते व विधीनें सांगितल्याप्रमाणें सर्प व पक्षी ह्यांचीही त्या ठिकाणीं यथाशास्त्र योजना केलेली होती ३०. इतकेंच नव्हे परंतु, शामित्रसंज्ञक कर्माकरितां ( ह्मणजे मारणें, फाडणें इत्यादि कामांकरितां ) अश्व आणि त्याचप्रमाणें विहित असलेले जलचर प्राणी त्या ठिकाणीं योजून ठेविले होते. सारांश, ऋषींनीं शास्त्राच्या अनुरोधानें हें सर्व योजून ठेविलें होतें ३१. दशरथराजाच्या त्या यज्ञमंडपामध्यें यूपांचे ठिकाणीं तीनशें पशु बांधून ठेविले होते आणि

रत्नोत्तमं तत्र राज्ञो दशरथस्य ह ३२ कौसल्या तं हयं तत्र परिचर्य समन्ततः। कृपाणैर्विशशासैनं त्रिभिः परमया मुदा ३३ पतत्त्रिणा तदा सार्धं सुस्थितेन च चेतसा। अवसद्रजनीमेकां कौसल्या धर्मकाम्यया ३४ होताध्वर्युस्तथोद्गाता हयेन समयोजयन्। महिष्या परिवृक्त्याथ वावातामपरां तथा ३५ पतत्त्रिणस्तस्य वपामुद्धृत्य नियतेन्द्रियः। ऋत्विक्परमसंपन्नः श्रपयामास शास्त्रतः ३६ धूमगन्धं वपायास्तु जिघ्रति स्म नराधिपः। यथाकालं यथान्यायं निर्णुदन्पापमात्मनः ३७ हयस्य यानि चाङ्गानि तानि सर्वाणि ब्राह्मणः। अग्नौ प्रास्यन्ति विधिवत्समस्ताः षोडशर्त्विजः ३८ प्लक्षशाखासु यज्ञानामन्येषां क्रियते हविः। अश्वमेधस्य यज्ञस्य वैतसो भाग इष्यते ३९ त्र्यहोऽश्वमेधः संख्यातः कल्पसूत्रेण ब्राह्मणैः। चतुष्टोमसहस्तस्य प्रथमं परिकल्पितम् ४० उक्थ्यं द्वितीयं संख्यातमतिरात्रं तथोत्तरम्। कारितास्तत्र बहवो विहिताः शास्त्रदर्शनात् ४१

---

त्याचप्रमाणें उत्कृष्ट अश्वांमध्येंही उत्कृष्ट असा अश्वही बांधून ठेविला होता ३२. नंतर कौसल्येनें त्या मंडपामध्यें त्या अश्वाभोंवतीं प्रदक्षिणा केली; अतिशय आनंदानें तीन तरवारींनीं त्याला फाडिलें ३३ आणि नंतर धर्मकामना मनामध्यें आणून स्वस्थांतःकरणपूर्वक त्या गरुडासारख्या वेगवान् अश्वासमीप त्या कौसल्येनें एक रात्र वास्तव्य केलें ३४. होता, अध्वर्यु आणि उद्गाता ह्यांनीं महिषी ( ह्मणजे राजाची क्षत्रियजातीय स्त्री ), परिवृक्ती ( ह्मणजे राजाची वैश्यजातीय स्त्री ) आणि तिसरी वावाता ( ह्मणजे राजाची शूद्रजातीय स्त्री ) ह्यांचा त्या अश्वाशीं समागम कराविला ३५. नंतर त्या अश्वाची वपा ( अर्थात् चंद्रनामक मेद ) काढून प्रयोगचातुर्यानें संपन्न अशा एका जितेंद्रिय ऋत्विजानें यथाशास्त्र शिजविण्यास आरंभ केला असतां ३६ स्वतःच्या पापाचें निरसन करण्याकरितां त्या दशरथ राजानें योग्य कालीं यथाविधि वपेचा धूमगंध घेतला ३७. नंतर अश्वाचीं जीं हवनीय अंगें त्या सर्वांचें त्या संपूर्ण सोळाही ऋत्विज ब्राह्मणांनीं यथाविधि अग्नीमध्यें हवन केलें ३८. असो. इतर यज्ञांमध्यें प्लक्ष वृक्षाच्या शाखांवर पाशुक हवि ठेवून अवदान देत असतात. परंतु; अश्वमेध यज्ञामध्यें हविर्भाग वेतस वृक्षाच्या शाखेवर ठेऊन द्यावा लागतो ३९. कल्पसूत्रामध्यें आणि ब्राह्मणांमध्यें अश्वमेधाला त्र्यह ( ह्मणजे तीन सवनीय दिवसांनीं युक्त ) असें ह्मटलें आहे; तिहींपैकीं अग्निष्टोम हा त्यांतील प्रथम दिवस ठरविलेला आहे ४०. उक्थ्य क्रतु हा दुसरा दिवस सांगितला आहे आणि त्याचप्रमाणें अतिरात्र हा तिसरा दिवस उक्त आहेत व शास्त्रांत दृष्ट असल्यामुळें आणखीही पुष्कळ क्रतु विहित ह्मणून

ज्योतिष्टोमायुषी चैवमतिरात्रौ च निर्मितौ। अभिजिद्विश्वजिच्चैवमाप्तोर्यामौ महाक्रतुः ४२ प्राचीं होत्रे ददौ राजा दिशं स्वकुलवर्धनः। अध्वर्यवे प्रतीचीं तु ब्रह्मणे दक्षिणां दिशम् ४३ उद्गात्रे तु तथोदीचीं दक्षिणैषा विनिर्मिता। अश्वमेधे महायज्ञे स्वयंभूविहिते पुरा ४४ क्रतुं समाप्य तु तदा न्यायतः पुरुषर्षभः। ऋत्विग्भ्यो हि ददौ राजा धरां तां कुलवर्धनः ४५ एवं दत्वा प्रहृष्टोभूच्छ्रीमानिक्ष्वाकुनन्दनः। ऋत्विजस्त्वब्रुवन्सर्वे राजानं गतकिल्बिषम् ४६ भवानेव महीं कृत्स्नामेको रक्षितुमर्हति। न भूम्या कार्यमस्माकं न हि शक्ताः स्म पालने ४७ रताः स्वाध्यायकरणे वयं नित्यं हि भूमिप। निष्क्रयं किंचिदेवेह प्रयच्छतु भवानिति ४८ मणिरत्नं सुवर्णं वा गावो यद्वा समुद्यतम्। तत्प्रयच्छ नृपश्रेष्ठ धरण्या न प्रयोजनम् ४९ एवमुक्तो नरपतिर्ब्राह्मणैर्वेदपारगैः। गवां शतसहस्राणि दश तेभ्यो ददौ नृपः ५० दशकोटिं सुवर्णस्य रजतस्य चतुर्गुणम् ५१ ऋत्विजस्तु ततः सर्वे प्रददुः सहिता वसु। ऋष्यशृङ्गाय मुनये वसिष्ठाय च

---

उक्त आहेत ४१. ज्योतिष्टोम, आयुष्टोम, दोन अतिरात्र, दोन अप्तोर्याम, अभिजित् आणि विश्वजित् ह्या अश्वमेधामध्यें विहित असलेल्या महाक्रतूंचें अनुष्ठान झालें ४२. नंतर आपलें कुल वृद्धिंगत करणाऱ्या दशरथ राजानें होत्याला पूर्व दिशा दक्षिणा ह्मणून दिली, अध्वर्यूला पश्चिम दिशा दिली, ब्रह्म्याला दक्षिण दिशा अर्पण केली ४३ आणि उत्तर दिशा उद्गात्याच स्वाधीन केली. कारण, ब्रह्मदेवानें पूर्वी उत्पन्न केलेल्या अश्वमेध महाक्रतूला (कल्पसूत्रामध्यें) ही दक्षिणा विहित आहे ४४. ह्याप्रमाणें तो क्रतु यथाविधि समाप्त करून कुलवृद्धिंगत करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ दशरथ राजानें ती पृथ्वी ऋत्विजांना अर्पण केली ४५ आणि ह्याप्रमाणें पृथ्वी अर्पण केल्यावर तो वैभवशाली इक्ष्वाकुवंशज दशरथ राजा आनंदित झाला. तेव्हां त्या पापरहित झालेल्या राजाला सर्व ऋत्विज ह्मणाले ४६ "संपूर्ण पृथ्वीचें रक्षण करण्यास तूंच एक योग्य आहेस; आह्मीं पालन करण्यास समर्थ नाहीं आणि ह्मणूनच पृथ्वीशीं आह्मांला कांहीं कर्तव्य नाहीं ४७ हे भूपाला, वेदाध्ययन करण्याविषयीं ( मात्र ) आह्मीं नेहमीं तत्पर असतों. करितां, ह्या पृथ्वीबद्दल कांहीं तरी निष्क्रय तूं दे ह्मणजे झालें ४८. एकादें उत्कृष्ट रत्न, सुवर्ण, गाई अथवा जें कांहीं तुझ्यापाशीं देण्यासारिखें असेल तें आह्मांला दे. हे नृपश्रेष्ठा, पृथ्वीचें आह्मांला कारण नाहीं ४९". ह्याप्रमाणें वेदपारंगत ब्राह्मणांनीं त्या राजाला सांगितलें असतां दहा लक्ष गाई राजानें त्यांना दिल्या ५०. दहा कोटिभार सुवर्ण दिलें आणि चाळीस कोट रुपयेही त्यानें त्यांना दिले ५१. तेव्हां सर्व

नैनं सूर्यः प्रतपति पार्श्वे वाति न मारुतः। चलोर्मिमाली तं दृष्ट्वा समुद्रोऽपि न कम्पते १० तन्महन्नो भयं तस्माद्राक्षसाद्घोरदर्शनात्। वधार्थं तस्य भगवन्नुपायं कर्तुमर्हसि ११ एवमुक्तः सुरैः सर्वैश्चिन्तयित्वा ततोऽब्रवीत्। हन्तायं विदितस्तस्य वधोपायो दुरात्मनः १२ तेन गन्धर्वयक्षाणां देवतानां च रक्षसाम्। अवध्योऽस्मीति वागुक्ता तथेत्युक्तं च तन्मया १३ नाकीर्तयदवज्ञानात्तद्रक्षो मानुषांस्तदा। तस्मात्स मानुषाद्वध्यो मृत्युर्नान्योऽस्य विद्यते १४ एतच्छ्रुत्वाप्रियं वाक्यं ब्रह्मणा समुदाहृतम्। देवा महर्षयः सर्वे प्रहृष्टास्तेऽभवंस्तदा १५ एतस्मिन्नन्तरे विष्णुरुपयातो महाद्युतिः। शङ्खचक्रगदापाणिः पीतवासा जगत्पतिः॥ वैनतेयं समारुह्य भास्करस्तोयदं यथा १६ तप्तहाटककेयूरो वन्द्यमानः सुरोत्तमैः। ब्रह्मणा च समागत्य तत्र तस्थौ समाहितः १७ तमब्रुवन्सुराः सर्वे समभिष्टूय संनताः। त्वां नियोक्ष्यामहे विष्णो लोकानां हितकाम्यया १८ राज्ञो

गंधर्वांसहवर्तमान यक्ष, ब्राह्मण आणि असुर ह्यांचें अतिक्रमण करीत आहे ९. सूर्य ह्याला ताप देत नाहीं, वायु त्याचे समीप जोरानें वाहत नाहीं आणि चंचल तरंगसमुदायांनीं युक्त असलेला समुद्रही त्याला पाहून क्षुब्ध होत नाहीं १०. ह्यामुळें त्या दिसण्यांतही भयंकर असलेल्या राक्षसापासून आह्मांला मोठें भय उत्पन्न झालें आहे. करितां, हे भगवन्, त्याच्या वधाचा उपाय आपण योजा" ११. ह्याप्रमाणें सर्व देवांनीं प्रार्थना केली असतां (क्षणभर) विचार केल्यानंतर 'ब्रह्मदेव त्यांना ह्मणाले "अरे हो! त्या दुरात्म्याचा वध होण्याला हा एक उपाय सुचला आहे" १२. "गंधर्व, यक्ष, देव आणि राक्षस ह्यांना मी अवध्य असावें" असा त्यानें वर मागितला असतां मीं "ठीक आहे" ह्मणून त्याला ह्मटलें आहें १३. मनुष्यांची त्याला मुळींच पर्वा नसल्यामुळें त्यानें त्यावेळीं मनुष्यांचा उल्लेख केला नाहीं. तस्मात्, मनुष्यांपासूनच त्याचा वध होणें शक्य आहे; ह्याला मारणारा दुसरा कोणी नाहीं" १४. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं सांगितलेलें प्रिय भाषण श्रवण करून' ते सर्व देव आणि महर्षि आनंदित झाले १५. इतक्यांत पीतांबरधारी आणि महातेजस्वी जगदीश विष्णु उज्ज्वल सुवर्णानीं युक्त अशीं बाहुभूषणें व शंख, चक्र, गदा (हीं आयुधें) धारण करून मेघांवर आरोहण करणाऱ्या सूर्याप्रमाणेंच कीं काय गरुडावर आरूढ होऊन त्या ठिकाणीं आले; ते आले असतां सुरश्रेष्ठांनीं त्यांना वंदन केलें व नंतर ब्रह्मदेवांची भेट घेऊन ते त्या ठिकाणीं स्वस्थ बसले असतां १६, १७ सर्व देव प्रणामपूर्वक स्तुति करून त्यांना ह्मणाले "हे विष्णो, लोकांच्या हिताची इच्छा धरून आह्मी

दशरथस्य त्वमयोध्याधिपतेर्विभो । धर्मज्ञस्य वदान्यस्य महर्षिसमतेजसः १९ अस्य भार्यासु तिसृषु ह्रीश्रीकीर्त्युपमासु च । विष्णो पुत्रत्वमागच्छ कृत्वात्मानं चतुर्विधम् २० तत्र त्वं मानुषो भूत्वा प्रवृद्धं लोककण्टकम् । अवध्यं दैवतैर्विष्णो समरे जहि रावणम् २१ स हि देवान्सगन्धर्वान्सिद्धांश्च ऋषिसत्तमान् । राक्षसो रावणो मूर्खो वीर्योद्रेकेण बाधते २२ ऋषयश्च ततस्तेन गन्धर्वाप्सरसस्तथा । क्रीडन्तो नन्दनवने रौद्रेण विनिपातिताः २३ वधार्थं वयमायातास्तस्य वै मुनिभिः सह । सिद्धगन्धर्वयक्षाश्च ततस्त्वां शरणं गताः २४ त्वं गतिः परमा देव सर्वेषां नः परंतप । वधाय देवशत्रूणां नृणां लोके मनः कुरु २५ एवं स्तुतस्तु देवेशो विष्णुस्त्रिदशपुङ्गवः । पितामहपुरोगांस्तान्सर्वलोकनमस्कृतः २६ अब्रवीत्त्रिदशान्सर्वान्समेतान्धर्मसंहितान् । भयं त्यजत भद्रं वो हितार्थं युधि रावणम् २७ सपुत्रपौत्रं सामात्यं समन्त्रिज्ञातिबान्धवम् । हत्वा क्रूरं दुराधर्षं देवर्षीणां भयावहम् २८ दश वर्षसहस्राणि दश वर्षशतानि च ।

आपली एका कार्याकडे योजना करणार आहोंत १८. हे सर्वव्यापि विष्णो, धर्मवेत्ता, उदार आणि महर्षींप्रमाणें तेजस्वी अशा ह्या अयोध्याधिपति दशरथ राजाच्या अनुक्रमें ह्री, श्री आणि कीर्ति ह्यांप्रमाणें असलेल्या तीन भार्यांचे ठिकाणीं स्वतःचे चार अंश करून आपण पुत्ररूपानें अवतीर्ण व्हा १९,२०. सारांश, हे विष्णो, आपण मनुष्यरूपानें त्या ठिकाणीं अवतीर्ण होऊन देवांना अवध्य आणि ह्मणूनच ( मदानें ) चढून गेलेल्या ह्या लोककंटक रावणाचा तूं समरांगणामध्यें वध कर २१. तो मूर्ख राक्षस रावण वीर्याचा गर्व झाल्यामुळें गंधर्वांसहवर्तमान देव, सिद्ध आणि श्रेष्ठ ऋषि ह्यांना पीडा देत आहे २२. त्या भयंकर राक्षसानें नंदन वनामध्यें क्रीडा करीत असलेल्या गंधर्वांसहवर्तमान अप्सरांचा आणि ऋषींचा अगदीं नाश करून टाकिला आहे २३. करितां, त्याचा वध व्हावा ह्या उद्देशानें मुनींसहवर्तमान आह्मी आणि त्याचप्रमाणें सिद्ध, गंधर्व व यक्ष असे आपणांला शरण आलों आहोंत २४. हे महातेजस्वी देवा, आह्मां सर्वांचा मुख्य आधार आपणच आहांत. करितां, देवशत्रूंचा वध करण्यास्तव आपण मनुष्यलोकामध्यें अवतीर्ण होण्याचें मनांत आणा " २५. ह्याप्रमाणें सुरश्रेष्ठ देवाधिपति विष्णूंची देवांनीं स्तुति केली असतां ते सर्वलोकवंद्य विष्णु त्या यमधर्मासहवर्तमान जुळलेल्या ब्रह्मदेवप्रभृति सर्व देवांना ह्मणाले " तुमचें कल्याण असो; तुह्मी भय सोडा. देव आणि ऋषि ह्यांना भयावह आणि जिंकण्यास कठीण अशा त्या क्रूर रावणाचा—पुत्र, पौत्र, अमात्य, मंत्री आणि ज्ञातिबांधव ह्यांस-

दिव्याभरणभूषितम्। शैलशृङ्गसमुत्सेधं दृप्तशार्दूलविक्रमम् १३ दिवाकरसमाकारं दीप्तानलशिखोपमम्। तप्तजाम्बूनदमयीं राजतान्तपरिच्छदाम् १४ दिव्यपायससंपूर्णां पात्रीं पत्नीमिव प्रियाम्। प्रगृह्य विपुलां दोर्भ्यां स्वयं मायामयीमिव १५ समवेक्ष्याब्रवीद्वाक्यमिदं दशरथं नृपम्। प्राजापत्यं नरं विद्धि मामिहाभ्यागतं नृप १६ ततः परं तदा राजा प्रत्युवाच कृताञ्जलिः। भगवन्स्वागतं तेऽस्तु किमहं करवाणि ते १७ अथो पुनरिदं वाक्यं प्राजापत्यो नरोऽब्रवीत्। राजन्नर्चयता देवानद्य प्राप्तमिदं त्वया १८ इदं तु नृपशार्दूल पायसं देवनिर्मितम्। प्रजाकरं गृहाण त्वं धन्यमारोग्यवर्धनम् १९ भार्याणामनुरूपाणामश्नीतेति प्रयच्छ वै। तासु त्वं लप्स्यसे पुत्रान्यदर्थं यजसे नृप २०, तथेति नृपतिः प्रीतः शिरसा प्रतिगृह्य ताम्। पात्रीं देवान्नसंपूर्णां देवदत्तां हिरण्मयीम् २१ अभिवाद्य च तद्भूतमद्भुतं प्रियदर्शनम्। मुदा परमया युक्तश्चकाराभिप्रदक्षिणम् २२

स्वर दुंदुभीसारखा, (गंभीर) होता शरीरावरील लव मुखावरील श्मश्रु आणि मस्तकावरील केश हे सिंहाच्या केसाप्रमाणें तुळतुळीत होते १२. शुभलक्षणांनीं तो संपन्न होता, दिव्य भूषणांनीं तो भूषित झालेला होता, पर्वतशिखराप्रमाणें तो उंच होता आणि त्याची चालण्याची ढब मत्त व्याघ्राप्रमाणें होती १३. सूर्याप्रमाणें त्याची प्रभा होती, प्रदीप्त अग्नीच्या ज्वालेप्रमाणें त्याचें स्वरूप उग्र होतें आणि रुप्याचें झांकण घातलेली एक मोठी दिव्यपायसप्रपूरित सुवर्णमय स्थाली मायारूप प्रिय पत्नीच कीं काय अशी त्यानें स्वतः आपल्या हातामध्यें घेतली होती १४, १५. अशाप्रकारें पायस घेऊन अग्नींतून निघालेला तो पुरुष यज्ञमंडपामध्यें दृष्टि देऊन दशरथ राजाला ह्मणाला " हे राजा, प्रजाधिपति विष्णूनें पाठविलेला पुरुष मी येथें आलों आहें असें तूं समज " १६. ह्याप्रमाणें त्या पुरुषानें सांगितल्यानंतर " भगवन्, आपलें स्वागत असो. मीं आपलें काय (प्रिय) करावें ह्मणून दशरथ राजानें हात जोडून विचारिलें ?" असतां १७ तो प्रजाधिपतिसंबंधी पुरुष पुनरपि राजाला असें ह्मणाला कीं " हे राजा, देवांचें अर्चन करीत असल्यामुळें आज तुला हें प्राप्त झालें आहे १८. हे नृपश्रेष्ठा, धनदायक, आरोग्यवर्धक आणि संतानकारक असें हें देवनिर्मित पायस तूं ग्रहण कर १९ आणि " भक्षण करा " असें सांगून तूं आपल्या प्रिय पत्नींना तें अर्पण कर. ह्मणजे, हे राजा, ज्यांकरितां तूं याग करीत आहेस ते पुत्र तुला त्या पत्नींचे ठिकाणीं प्राप्त होतील " २०. ह्यावर " ठीक आहे " असें ह्मणून प्रसन्न झालेल्या दशरथ राजानें देवनिर्मित अन्नानें भरलेली ती देवदत्त सुवर्णमय स्थाली शिरसा

ततो दशरथः प्राप्य पायसं देवनिर्मितम् । बभूव परमप्रीतः प्राप्य वित्तमिवाधनः २३ ततस्तदद्भुतप्रख्यं भूतं परमभास्वरम् । संवर्तयित्वा तत्कर्म तत्रैवान्तरधीयत २४ हर्षरश्मिभिरुद्योतं तस्यान्तःपुरमाबभौ । शारदस्याभिरामस्य चन्द्रस्येव नभोंशुभिः २५ सोन्तःपुरं प्रविश्यैव कौसल्यामिदमब्रवीत् । पायसं प्रतिगृह्णीष्व पुत्रीयं त्विदमात्मनः २६ कौसल्यायै नरपतिः पायसार्धं ददौ तदा । अर्धादर्धं ददौ चापि सुमित्रायै नराधिपः २७ कैकेय्यै चावशिष्टार्धं ददौ पुत्रार्थकारणात् । प्रददौ चावशिष्टार्धं पायसस्यामृतोपमम् २८ अनुचिन्त्य सुमित्रायै पुनरेव महामतिः । एवं तासां ददौ राजा भार्याणां पायसं पृथक् २९ ताश्चैवं पायसं प्राप्य नरेन्द्रस्योत्तमस्त्रियः । संमानं मेनिरे सर्वाः प्रहर्षोदितचेतसः ३० ततस्तु ताः प्राश्य तमु-

मान्य करून २१ आश्चर्यकारक आणि मनोहर स्वरूपानें युक्त अशा त्या पुरुषाला अभिवंदन केलें आणि पराकाष्ठेच्या आनंदानें युक्त होऊन त्यानें त्याला प्रदक्षिणाही केली २२. तदनंतर संपत्ति प्राप्त झाली असतां ज्याप्रमाणें दरिद्री पुरुषाला पराकाष्ठेचा आनंद होतो त्याप्रमाणें तें देवनिर्मित पायस प्राप्त झालें असतां दशरथ राजा पराकाष्ठेचा आनंदित झाला २३. ह्यानंतर अद्भुत स्वरूपानें युक्त असलेला तो अत्यंत उज्ज्वल पुरुष तें ( पायस देण्याचें कार्य संपूर्ण झाल्यावर तेथेंच अंतर्धान पावला २४. असो. ह्याप्रमाणें ( पायस प्राप्त झालें असतां ) शरदृतंतील मनोहर चंद्राच्या किरणांनीं ज्याप्रमाणें आकाश प्रकाशित होतें त्याप्रमाणें दशरथ राजाच्या अंतःपुरांतील स्त्रिया हर्षजन्य मुखकांतीच्या योगानें चमकूं लागल्या २५. अंतःपुरांत प्रविष्ट झाल्याबरोबर तो दशरथ राजा " स्वतःला पुत्रप्राप्ति करून देणारें हें पायस तूं ग्रहण कर " असें कौसल्येला ह्मणाला २६ आणि त्या भूपतीनें संपूर्ण पायसांतील अर्धें पायस कौसल्येला दिलें व नंतर कौसल्येला दिलेल्या पायसांतील चवथा हिस्सा त्या भूपतीनें तिच्याकडून सुमित्रेला देवविला २७. तदनंतर प्रथम संपूर्ण पायसांतील अर्धें कौसल्येला दिल्यावर जें अर्धें पायस अवशिष्ट राहिलें होतें तें त्यानें पुत्रप्राप्तीकरितां कैकयीला दिलें आणि कैकयीला दिलेल्या अर्ध्या पायसांतील अमृतोपम असा चतुर्थांश भाग त्या महामति दशरथराजानें विचार करून पुनरपि सुमित्रेलाच देवविला. तात्पर्य, ( कौसल्येला तीन अष्टमांश, कैकयीला तीन अष्टमांश आणि सुमित्रेला दोन अष्टमांश ) ह्याप्रमाणें दशरथ राजानें त्या भार्यांना वेगळें वेगळें पायस दिलें २८,२९ व ह्याप्रकारें पायस प्राप्त झाल्यावर दशरथ राजाच्या त्या सर्व तिघीही उत्कृष्ट स्त्रियांचें अंतःकरण हर्षानें प्रफुल्लित झालें आणि आपला संमान झाला असें त्यांना वाटलें ३०.

तमस्त्रियो महीपतेरुत्तमपायसं पृथक्। हुताशनादित्यसमानतेजसोऽचिरेण गर्भान्प्रतिपेदिरे तदा ३१ ततस्तु राजा प्रतिवीक्ष्य ताः स्त्रियः प्ररूढगर्भाः प्रतिलब्धमानसः। बभूव हृष्टस्त्रिदिवे यथा हरिः सुरेन्द्रसिद्धर्षिगणाभिपूजितः ३२ [ ५९५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

पुत्रत्वं तु गते विष्णौ राज्ञस्तस्य महात्मनः। उवाच देवताः सर्वाः स्वयंभूर्भगवानिदम् १ सत्यसंधस्य वीरस्य सर्वेषां नो हितैषिणः। विष्णोः सहायान्बलिनः सृजध्वं कामरूपिणः २ मायाविदश्च शूरांश्च वायुवेगसमाञ्जवे। नयज्ञान्बुद्धिसंपन्नान्विष्णुतुल्यपराक्रमान् ३ असंहार्यानुपायज्ञान्दिव्यसंहननान्वितान्। सर्वास्त्रगुणसंपन्नानमृतप्राशनानिव ४ अप्सरःसु च मुख्यासु गन्धर्वीणां तनूषु च। यक्षपन्नगकन्यासु ऋक्षविद्याधरीषु च ५ किंनरीणां च गात्रेषु वानरीणां तनूषु च। सृजध्वं हरिरूपेण पुत्रांस्तुल्यपराक्रमान् ६ पूर्वमेव मया सृष्टो जाम्बवानृक्षपुंगवः। जृम्भमाणस्य सहसा

तदनंतर दशरथपत्नी ज्या त्या उत्कृष्ट स्त्रियांनीं तें उत्कृष्ट पायस वेगळें वेगळें प्राशन केलें आणि अग्नि व सूर्य ह्यांप्रमाणें तेजस्वी गर्भ त्यांना प्राप्त झाले ३१. तदनंतर ज्यांचे गर्भ वृद्धिंगत झाले आहेत अशा त्या आपल्या स्त्रियांना अवलोकन करून राजाचें अंतःकरण स्वस्थ झालें आणि स्वर्गामध्यें देवराज इंद्र, सिद्ध आणि ऋषिगण ह्यांनीं पूजित असलेल्या श्रीहरीप्रमाणें त्या राजाला आनंद झाला ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ १६ ॥

ह्याप्रमाणें विष्णूनें त्या महात्म्या दशरथराजाचें पुत्रत्व स्वीकारिलें असतां भगवान् ब्रह्मदेव सर्व देवतांना असें म्हणाले १:—" सत्यप्रतिज्ञ आणि वीर असा जो आपणासर्वांचें हित इच्छिणारा विष्णु त्याला यथेष्ट रूप धारण करणारे व बलाढ्य असे साहाय्यकर्ते तुम्ही उत्पन्न करा २. ते साहाय्यकर्ते राक्षसी माया जाणणारे, शूर, वेगामध्यें वायूच्या वेगाची बरोबरी करणारे, नीतिशास्त्रवेत्ते, बुद्धिमान, विष्णुसारिखे पराक्रमी ३, शत्रूंना अवध्य, सामादि उपाय जाणणारे, देवांप्रमाणें दिव्य शरीरानें युक्त व प्रयोग, उपसंहार इत्यादि अस्त्रसंबंधीं सर्व गुणांनीं संपन्न असे असावेत ४. सारांश, "मुख्य मुख्य अप्सरा, गंधर्वपत्न्या, यक्ष आणि नाग ह्यांच्या कन्या, ऋक्ष आणि विद्याधर ह्यांच्या स्त्रिया, ५ किन्नरांच्या स्त्रिया आणि वानरांस्त्रिया ह्यांचे ठिकाणीं हरिरूपानें तुम्ही एकसारिखे पराक्रमी पुत्र उत्पन्न करा ६. अस्वलांमध्यें श्रेष्ठ असा जांबवान् मीं

मम वक्त्रादजायत ७ ते तथोक्ता भगवता तत्प्रतिश्रुत्य शासनम् । जनयामासुरेवं ते पुत्रान्वानररूपिणः ८ ऋषयश्च महात्मानः सिद्धविद्याधरोरगाः । चारणाश्च सुतान्वीरान्ससृजुर्वनचारिणः ९ वानरेन्द्रं महेन्द्राभमिन्द्रो वालिनमात्मजम् । सुग्रीवं जनयामास तपनस्तपतांवरः १० बृहस्पतिस्त्वजनयत्तारं नाम महाकपिम् । सर्ववानरमुख्यानां बुद्धिमन्तमनुत्तमम् ११ धनदस्य सुतः श्रीमान्वानरो गन्धमादनः । विश्वकर्मा त्वजनयन्नलं नाम महाकपिम् १२ पावकस्य सुतः श्रीमान्नीलोऽग्निसदृशप्रभः । तेजसा यशसा वीर्यादत्यरिच्यत वीर्यवान् १३ रूपद्रविणसंपन्नावश्विनौ रूपसंमतौ । मैन्दं च द्विविदं चैव जनयामासतुः स्वयम् १४ वरुणो जनयामास सुषेणं नाम वानरम् । शरभं जनयामास पर्जन्यस्तु महाबलः १५ मारुतस्यौरसः श्रीमान्हनुमान्नाम वानरः । वज्रसंहननोपेतो वैनतेयसमो जवे १६ सर्ववानरमुख्येषु बुद्धिमान्बलवानपि १७ ते सृष्टा बहुसाहस्रा दशग्रीववधोद्यताः । अप्रमेयबला वीरा विक्रान्ताः कामरूपिणः १८ ते

पूर्वी उत्पन्न केला आहे. कारण, मी जांभई देऊं लागलों असतां एकाएकीं तो माझ्या मुखांतून उत्पन्न झाला आहे "७. ह्याप्रमाणें भगवान् ब्रह्मदेवांनीं सांगितल्यावर त्या देवांनीं त्यांची आज्ञा मान्य करण्याविषयीं वचन दिलें आणि त्याप्रमाणें त्यांनीं वानररूपी पुत्र उत्पन्न केले ८. महात्मे ऋषि, सिद्ध, विद्याधर, उरग आणि चारण ह्यांनीं वनामध्यें संचार करणार असे वीर ( वानर ) पुत्र उत्पन्न केले ९. दिसण्यांत इंद्रासारिखा आणि वानरांचा अधिपति असा वाली नांवाचा पुत्र इंद्रानें उत्पन्न केला आणि तेजस्व्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या सूर्यानें सुग्रीवनामक पुत्र उत्पन्न केला १०. बृहस्पतीनें तारनामक महान् वानर उत्पन्न केला; तो सर्व श्रेष्ठ श्रेष्ठ वानरांमध्यें अनुपम व बुद्धिमान् होता ११. गंधमादनसंज्ञक वैभवशाली वानर कुबेराचा पुत्र असून विश्वकर्म्यानें नलनामक श्रेष्ठ वानर उत्पन्न केला १२. प्रभेनें अग्नीसारखा असलेला वैभवशाली नील अग्नीचा पुत्र असून त्या वीर्यवान् नीलानें तेज, कीर्ति आणि वीर्य ह्यांमध्यें अग्नीलाही मागें सारिलें १३. सौंदर्यरूपसंपत्तीनें युक्त आणि रूपवान् ह्मणून सर्वलोकांना संमत अशा अश्विनीकुमारांनीं मैंद व द्विविद ह्या वानरांना स्वतः उत्पन्न केलें १४. सुषेणनामक वानर वरुणानें उत्पन्न केला आणि महाबलाढ्य पर्जन्यानें शरभाला जन्म दिला १५. सर्व मुख्य मुख्य वानरांमध्यें बुद्धिमान् आणि बलाढ्य, वेगामध्यें गरुडाची बरोबरी करणारा, कांतिमान् आणि वज्रदेही असा हनुमान् ह्मणून प्रसिद्ध असलेला वानर वायूचा पुत्र होय १६,१७. असो. अतुल बलानें युक्त, वीर

गजाचलसंकाशा वपुष्मन्तो महाबलाः । ऋक्षवानरगोपुच्छाः क्षिप्रमेवाभिजज्ञिरे १९ यस्य देवस्य यद्रूपं वेषो यश्च पराक्रमः । अजायत समं तेन तस्य तस्य पृथक्पृथक् २० गोलाङ्गूलेषु चोत्पन्नाः किंचिदुन्नतविक्रमाः । ऋक्षीषु च तथा जाता वानराः किंनरीषु च २१ देवा महर्षिगन्धर्वास्तार्क्ष्ययक्षा यशस्विनः । नागाः किंपुरुषाश्चैव सिद्धविद्याधरोरगाः २२ बहवो जनयामासुर्हृष्टास्तत्र सहस्रशः । चारणाश्च सुतान्वीरान्ससृजुर्वनचारिणः २३ वानरान्सुमहाकायान्सर्वान्वै वनचारिणः । अप्सरःसु च मुख्यासु तथा विद्याधरीषु च २४ नागकन्यासु च तदा गन्धर्वीणां तनूषु च । कामरूपबलोपेता यथाकामविचारिणः २५ सिंहशार्दूलसदृशा दर्पेण च बलेन च । शिलाप्रहरणाः सर्वे सर्वे पर्वतयोधिनः २६ नखदंष्ट्रायुधाः सर्वे सर्वे सर्वास्त्रकोविदाः । विचालयेयुः शैलेन्द्रान्भेदयेयुः स्थिरान्द्रुमान् २७ क्षोभयेयुश्च वेगेन समुद्रं

यथेष्ट रूप धारण करणारे आणि रावणाच्या वधाविषयीं उद्युक्त असे ते हजारों वानर उत्पन्न झाले १८. सारांश, ऋक्ष, वानर आणि गोपुच्छ ह्या योनींचें अवलंबन करून गज व पर्वत ह्यांप्रमाणें धिप्पाड व महाबलाढ्य असे ते देवपुत्र ब्रह्मदेवाची अनुज्ञा झाल्यानंतर सत्वर जन्मास आले १९. ज्या देवाचें जें रूप, जो वेष व जो पराक्रम असे त्यांसहवर्तमान त्या त्या देवापासून पृथक्पृथक् पुत्र उत्पन्न झाला २०. देवांपेक्षांही पराक्रमामध्यें किंचित् अधिक असे कांहीं गोलांगूलसंज्ञक वानरांमध्यें उत्पन्न झाले व त्याचप्रमाणें अस्वलाचें रूप धारण केलेल्या किन्नरस्त्रियांचे ठिकाणींही कांहीं उत्पन्न झाले २१. तात्पर्य, देव, यशस्वी महर्षि, गंधर्व, तार्क्ष्यवंशज आणि यक्ष, नाग, किन्नर, सिद्ध, विद्याधर आणि उरग इत्यादि २२ अनेकांनीं आनंदित होऊन हजारों पुत्र उत्पन्न केले व चारणांनींही वनामध्यें संचार करणारे असे वीर पुत्र उत्पन्न केले २३. ते वानर पुत्र शरीरानें फारच धिप्पाड असून सर्वही वनामध्यें संचार करणारे होते आणि वानररूप धारण केलेल्या मुख्य मुख्य अप्सरा, विद्याधरस्त्रिया २४. नागकन्या, आणि गंधर्वपत्न्या ह्यांचे ठिकाणीं ते उत्पन्न झाले होते. यथेष्ट रूप व बल ह्यांनीं ते युक्त असून इच्छेस येईल त्याप्रमाणें ते संचार करणारे होते २५ व प्रौढी आणि बल ह्यांच्या योगानें ते सिंह आणि व्याघ्र ह्यांची बरोबरी करणारे होते. ते सर्वही शिलांनीं प्रहार करणारे होते इतकेंच नव्हे परंतु सर्वही पर्वतांनीं युद्ध करणारे होते २६. नख आणि दंष्ट्रा हीं त्या सर्वांचीही आयुधें होतीं; इतकेंच नव्हे परंतु इतर सर्व प्रकारच्या अस्त्रांमध्येंही ते निष्णात होते. तात्पर्य,

सरितां पतिम् । दारयेयुः क्षितिं पद्भ्यामाप्लवेयुर्महार्णवान् २८ नभस्तलं विशेयुश्च गृह्णीयुरपि तोयदान् । गृह्णीयुरपि मातङ्गान्मत्तान्प्रव्रजतो वने २९ नर्दमानांश्च नादेन पातयेयुर्विहंगमान् । ईदृशानां प्रसूतानि हरीणां कामरूपिणाम् ३० शतं शतसहस्राणि यूथपानां महात्मनाम् । ते प्रधानेषु यूथेषु हरीणां हरियूथपाः ३१ बभूवुर्यूथपश्रेष्ठान्वीरांश्चाजनयन्हरीन् । अन्ये ऋक्षवतः प्रस्थानुपतस्थुः सहस्रशः ३२ अन्ये नानाविधाञ्छैलान्काननानि च भेजिरे । सूर्यपुत्रं च सुग्रीवं शक्रपुत्रं च वालिनम् ३३ भ्रातरावुपतस्थुस्ते सर्वे च हरियूथपाः । नलं नीलं हनूमन्तमन्यांश्च हरियूथपान् ३४ ते तार्क्ष्यबलसंपन्नाः सर्वे युद्धविशारदाः । विचरन्तोऽर्दयन्सर्वान्सिंहव्याघ्रमहोरगान् ३५ महाबलो महाबाहुर्वाली विपुलविक्रमः । जुगोप भुजवीर्येण ऋक्षगोपुच्छवानरान् ३६ तैरियं पृथिवी शूरैः सपर्वतवनार्णवा । कीर्णा विविधसंस्थानैर्नानाव्यञ्जनलक्षणैः ३७ तैर्मेघवृन्दाचलकूटसंनि-

---

मोठमोठ्या पर्वतांना हलवून सोडणारे, अचल वृक्षांना मोडून पाडणारे २७, नदीपति समुद्रालाही वेगानें क्षुब्ध करून टाकणारे, पायांनीं पृथ्वी विदारण करणारे, महासागरांतून पोहून जाणारे २८, आकाशामध्यें प्रविष्ट होऊन मेघांचाही निग्रह करणारे, वनामध्यें संचार करीत असलेल्या मदमत्त गजांनाही आंवरून धरणारे २९ आणि गर्जना करणाऱ्या पक्ष्यांना आपल्या गर्जनेनें खालीं पाडणारे असे कोटि वानर उत्पन्न झाले; ते महात्मे यथेष्ट रूप धारण करणारे असून समुदायांचें परिपालन करणारे होते. ते वानरांच्या मुख्यमुख्य समुदायांमध्यें वानरसेनांचे रक्षक होते ३०,३१ आणि वानरसमुदाय रक्षण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आणि शूर अशा इतर वानरांना त्यांनीं जिंकिलें होतें. हजारों वानर ऋक्षवान् पर्वताच्या शिखरांचा आश्रय करून राहिले ३२ आणि दुसरे नानाप्रकारचे पर्वत आणि वनें ह्यांना धरून राहिले. सूर्यपुत्र सुग्रीव आणि इंद्रपुत्र वाली ३३ ह्या उभयतां भ्रात्यांची ते सर्व वानरसेनानायक सेवा करूं लागले आणि त्याचप्रमाणें नल, नील, हनूमान् व इतरही वानरसेनानायक ह्यांची ते सेवा करूं लागले ३४. गरुडाप्रमाणें बलाढ्य असलेले ते सर्व युद्धामध्यें निपुण होते आणि संचार करितां करितां सिंह, व्याघ्र व मोठमोठे भुजंग ह्या सर्वांना ते पीडा देत होते ३५. महाबलाढ्य, महाबाहु आणि महापराक्रमी वालीनें आपल्या बाहुबलाच्या योगानें ऋक्ष आणि गोपुच्छ ह्या वानरजातींचें रक्षण केलें ३६. असो. नानाप्रकारच्या आकृतींनीं व नानाप्रकारच्या भेदव्यंजक लक्षणांनीं युक्त असलेल्या त्या शूर वानरांनीं पर्वत, वनें आणि समुद्र ह्यांसहवर्तमान ही सर्व पृथ्वी व्यापून

र्भैर्महाबलैर्वानरयूथपाधिपैः । बभूव भूर्भीमशरीररूपैः समावृता रामसहायहेतोः ३८ [ ६३३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तदशः सर्गः ॥ १७ ॥

निवृत्ते तु क्रतौ तस्मिन्हयमेधे महात्मनः । प्रतिगृह्यामरा भागान्प्रतिजग्मुर्यथागतम् १ समाप्तदीक्षानियमः पत्नीगणसमन्वितः । प्रविवेश पुरीं राजा सभृत्यबलवाहनः २ यथार्हं पूजितास्तेन राज्ञा च पृथिवीश्वराः । मुदिताः प्रययुर्देशान्प्रणम्य मुनिपुंगवम् ३ श्रीमतां गच्छतां तेषां स्वगृहाणि पुरात्ततः । बलानि राज्ञां शुभ्राणि प्रहृष्टानि चकाशिरे ४ गतेषु पृथिवीशेषु राजा दशरथः पुनः । प्रविवेश पुरीं श्रीमान्पुरस्कृत्य द्विजोत्तमान् ५ शान्तया प्रययौ सार्धमृष्यशृङ्गः सुपूजितः । अनुगम्यमानो राज्ञा च सानुयात्रेण धीमता ६ एवं विसृज्य तान्सर्वान्राजा संपूर्णमानसः । उवास सुखितस्तत्र पुत्रोत्पत्तिं विचिन्तयन् ७ ततो यज्ञे समाप्ते तु ऋतूनां षट् समत्ययुः । ततश्च द्वादशे मासे चैत्रे नावमिके

टाकिलें ३७. सारांश, मेघपटल अथवा पर्वतशिखर ह्यांप्रमाणें भयंकर शरीर व रूप ह्यांनीं युक्त अशा त्या रामाचें साहाय्य करण्याकरितां अवतीर्ण झालेल्या वानरसेनानायकांनीं पृथ्वी व्याप्त झाली ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

महात्म्या दशरथराजाचा तो अश्वमेध यज्ञ समाप्त झाल्यावर आपआपले हविर्भाग घेऊन देव आल्या मार्गानें परत गेले १ आणि यज्ञदीक्षेसंबंधीं नियम ज्यानें समाप्त केले आहेत असा तो राजा स्त्रिया आणि सेवक, सैन्य व वाहनें ह्यांसहवर्तमान राजधानीमध्यें प्रविष्ट झाला २. त्या राजानें इतर भूपतींचें यथायोग्य रीतीनें पूजन केलें व ते भूपति मुनिश्रेष्ठ वसिष्ठमुनींना व ऋष्यशृंग मुनींना प्रणाम करून आनंदानें स्वदेशीं परत गेले ३. ते वैभवशाली राजे दशरथराजाच्या नगरांतून आपआपल्या घरीं जाऊं लागले असतां उज्ज्वल आणि आनंदित अशीं त्यांचीं सैन्यें झळकूं लागलीं ४. असो. भूपति गेल्यानंतर वैभवशाली दशरथराजा द्विजश्रेष्ठांना पुढें करून आपल्या राजधानीमध्यें प्रविष्ट झाला ५. प्रथमतः अत्यंत मानमान्यता ज्यांची ठेविली आहे असे ऋष्यशृंग मुनि शांतेसहवर्तमान अयोध्येमध्यें प्रविष्ट झाले आणि त्यांच्याच मागोमाग विचारी दशरथराजा सैन्यासहवर्तमान प्रविष्ट झाला ६. असो. ह्याप्रमाणें त्या सर्वांना जाण्याची अनुज्ञा देऊन मनोरथ सिद्धीस गेलेला तो राजा पुत्रोत्पत्तीविषयीं विचार करीत करीत त्या ठिकाणीं सुखानें राहिला ७. अश्वमेधक्रतु समाप्त झाल्यानंतर सहा ऋतु लोटले असतां व

तिथौ ८ नक्षत्रे दितिदैवत्ये स्वोच्चसंस्थेषु पञ्चसु। ग्रहेषु कर्कटे लग्ने वाक्पताविन्दुना सह ९ प्रोद्यमाने जगन्नाथं सर्वलोकनमस्कृतम्। कौसल्याजनयद्रामं दिव्यलक्षणसंयुतम् १० विष्णोरर्धं महाभागं पुत्रमैक्ष्वाकुनन्दनम्। लोहिताक्षं महाबाहुं रक्तोष्ठं दुन्दुभिस्वनम् ११ कौसल्या शुशुभे तेन पुत्रेणामिततेजसा। यथा वरेण देवानामदितिर्वज्रपाणिना १२ भरतो नाम कैकेय्यां जज्ञे सत्यपराक्रमः। साक्षाद्विष्णोश्चतुर्भागः सर्वैः समुदितो गुणैः १३ अथ लक्ष्मणशत्रुघ्नौ सुमित्राजनयत्सुतौ। वीरौ सर्वास्त्रकुशलौ विष्णोरर्धसमन्वितौ १४ पुष्ये जातस्तु भरतो मीनलग्ने प्रसन्नधीः। सार्पे जातौ तु सौमित्री कुलीरेऽभ्युदिते रवौ १५ राज्ञः पुत्रा महात्मानश्चत्वारो जज्ञिरे पृथक्। गुणवन्तोनुरूपाश्च रुच्या प्रोष्ठपदोपमाः १६ जगुः कलं च गन्धर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः। देवदुन्दुभयो नेदुः

बारावा महिना प्राप्त झाला असतां चैत्रांतील नवमीचे दिवशीं ८ पुनर्वसु नक्षत्रावर पांच ग्रह उच्चीचे असतांना आणि त्यांतनही चंद्र व गुरु लग्नीं असतांना कर्क लग्नावर दिव्य लक्षणांनीं युक्त आणि सर्व लोकांना पूज्य असा जगदीश्वर राम कौसल्येचे ठिकाणीं उत्पन्न झाला ९,१०. तो इक्ष्वाकुवंशज महाभाग्यवान् पुत्र विष्णूचा जवळ जवळ अर्धा अंश होता; त्याचे नेत्र व ओठ आरक्तवर्ण होते आणि शब्द दुंदुभीप्रमाणें गंभीर असून त्याचे बाहु दीर्घ होते ११. असो. सुरश्रेष्ठ वज्रपाणि इंद्राच्या योगानें शोभणाऱ्या अदितीप्रमाणें त्या अत्यंत तेजस्वी पुत्राच्या योगानें कौसल्या शोभू लागली १२. कैकयीचे ठिकाणीं भरत ह्मणून अमोघपराक्रमी पुत्र झाला. तो साक्षात् विष्णूचा चवथा अंश असून सर्व गुणांनीं संपन्न होता १३. नंतर सुमित्रेला लक्ष्मण व शत्रुघ्न असे दोन वीर पुत्र झाले; ते विष्णूचे अंश असून सर्व अस्त्रांमध्यें प्रवीण होते १४. निर्मल बुद्धीनें युक्त असलेला भरत पुष्य नक्षत्र असतांना मीनलग्नावर उत्पन्न झाला आणि मघा नक्षत्र व उच्चीचा सूर्य असतांना कर्कलग्नावर सुमित्रेचे दोघे पुत्र जन्मास आले १५. महात्म्या दशरथराजाला वेगवेगळ्या गुणांनीं युक्त असे चार पुत्र प्राप्त झाले; ते गुणी, व राजाला अनुरूप असेच असून कांतीनें पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदा ह्या नक्षत्रांप्रमाणें होते १६. असो ह्याप्रमाणें दशरथराजाला पुत्र प्राप्त झाले असतां गंधर्व गायन

१ पूर्वाभाद्रपदा आणि उत्तराभाद्रपदा ह्या नक्षत्रांचे दोन दोन तारे असतात. ह्यास्तव, दोन दोन ताऱ्यांचे एकेक नक्षत्र असल्यामुळें चार तारे जसे दोन नक्षत्रांमध्यें विभागिलेले असतात तसे दशरथराजाचे चार पुत्र एकेका ठिकाणीं दोन दोन ह्याप्रमाणें ह्मणजे रामलक्ष्मण व भरतशत्रुघ्न ह्याप्रमाणें स्वभावतांच विभागिले असल्यामुळें त्यांना ताराचतुष्टयानें होणाऱ्या ह्या दोन नक्षत्रांची उपमा दिली आहे.

पुष्पवृष्टिश्च खात्पतत् १७ उत्सवश्च महानासीदयोध्यायां जनाकुलः । रथ्याश्च जनसंबाधा नटनर्तकसंकुलाः १८ गायनैश्च विराविण्यो वादनैश्च तथापरैः । विरेजुर्विपुलास्तत्र सर्वरत्नसमन्विताः १९ प्रदेयांश्च ददौ राजा सूतमागधवन्दिनाम् । ब्राह्मणेभ्यो ददौ वित्तं गोधनानि सहस्रशः २० अतीत्यैकादशाहं तु नामकर्म तथाकरोत् । ज्येष्ठं रामं महात्मानं भरतं कैकयीसुतम् २१ सौमित्रिं लक्ष्मणमिति शत्रुघ्नमपरं तथा । वसिष्ठः परमप्रीतो नामानि कुरुते तदा २२ ब्राह्मणान्भोजयामास पौरजानपदानपि । अददद्ब्राह्मणानां च रत्नौघममलं बहु ॥ तेषां जन्मक्रियादीनि सर्वकर्माण्यकारयत् २३ तेषां केतुरिव ज्येष्ठो रामो रतिकरः पितुः । बभूव भूयो भूतानां स्वयंभूरिव संमतः २४ सर्वे वेदविदः शूराः सर्वे लोकहिते रताः । सर्वे ज्ञानोपसंपन्नाः सर्वे समुदिता गुणैः २५ तेषामपि महातेजा रामः सत्यपराक्रमः । इष्टः सर्वस्य लोकस्य शशाङ्क इव निर्मलः २६

---

करूं लागले, अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले, देवदुंदुभि नादित होऊं लागल्या आणि आकाशापासून पुष्पवृष्टि होऊं लागली १७. अयोध्येमध्यें लोकांची अगदीं खेचाखेच होण्यासारिखा मोठा उत्सव झाला आणि त्यावेळीं, नट व नर्तक ह्यांनीं नगरांतील मार्ग व्याप्त झाल्यामुळें लोकांचीही त्या मार्गांतून फार गर्दी झाली १८. सारांश, गायन आणि वादन ह्यांच्या योगानें नादित झालेले आणि सर्व रत्नांनीं युक्त झालेले ते भव्य मार्ग शोभूं लागले १९. असो. ह्याप्रमाणें पुत्रप्राप्ति झाली असतां पौराणिक, भाट आणि स्तुतिपाठक ह्यांना राजानें देणग्या दिल्या आणि ब्राह्मणांनाही वित्तासहवर्तमान हजारों गाई त्यानें अर्पण केल्या २०. अकरा दिवस झाल्यानंतर दशरथराजानें महात्म्या ज्येष्ठ पुत्राचें राम असें नामकरण करून कैकयीच्या पुत्राचें भरत असें नांव ठेविलें २१ आणि त्याचप्रमाणें लक्ष्मण व शत्रुघ्न अशीं सुमित्रेच्या पुत्रांचीं त्यानें नांवें ठेविलीं. असो. अत्यंत आनंदित झालेल्या वसिष्ठ मुनींनीं त्या राजकुमारांचा नामकरण संस्कार करून २२ ब्राह्मणांना व नगरांत आणि राष्ट्रांत राहणाऱ्या इतरांनाही भोजन घातलें व उज्ज्वल असा मोठा रत्नसमुदाय त्यांनीं ब्राह्मणांना अर्पण केला. सारांश, वसिष्ठमुनींनीं त्या राजपुत्रांचे नामकरणप्रभृति सर्वसंस्कार राजाकडून करविले २३. त्या चारी पुत्रांमध्यें वंशध्वजच कीं काय असा ज्येष्ठ पुत्र राम पित्याला आनंद देणारा होऊन ब्रह्मदेवाप्रमाणें सर्व प्राण्यांना फारच मान्य झाला २४. ते सर्वही राजपुत्र वेदवेत्ते व शूर असून सर्वही लोकहिताविषयीं तत्पर होते आणि त्याचप्रमाणें सर्वही ज्ञानी असून सर्वही गुणी होते २५. त्यांमध्यें महातेजस्वी व अमोघ-

गजस्कन्धेऽश्वपृष्ठे च रथचर्यासु संमतः । धनुर्वेदे च निरतः पितुः शुश्रूषणे रतः २७ बाल्यात्प्रभृति सुस्निग्धो लक्ष्मणो लक्ष्मिवर्धनः । रामस्य लोकरामस्य भ्रातुर्ज्येष्ठस्य नित्यशः २८ सर्वप्रियकरस्तस्य रामस्यापि शरीरतः । लक्ष्मणो लक्ष्मिसंपन्नो बहिःप्राण इवापरः २९ न च तेन विना निद्रां लभते पुरुषोत्तमः । मृष्टमन्नमुपानीतमश्नाति न हि तं विना ३० यदा हि हयमारूढो मृगयां याति राघवः । अथैनं पृष्ठतोऽभ्येति सधनुः परिपालयन् ३१ भरतस्यापि शत्रुघ्नो लक्ष्मणावरजो हि सः । प्राणैः प्रियतरो नित्यं तस्य चासीत्तथा प्रियः ३२ स चतुर्भिर्महाभागैः पुत्रैर्दशरथः प्रियैः । बभूव परमप्रीतो देवैरिव पितामहः ३३ ते यदा ज्ञानसंपन्नाः सर्वे समुदिता गुणैः । ह्रीमन्तः कीर्तिमन्तश्च सर्वज्ञा दीर्घदर्शिनः ३४ तेषामेवंप्रभावाणां सर्वेषां दीप्ततेजसाम् । पिता दशरथो हृष्टो ब्रह्मा लोकाधिपो यथा ३५ ते चापि मनुजव्याघ्रा वैदिकाध्ययने रताः । पितृशुश्रूषणरता धनुर्वेदे च निष्ठिताः ३६ अथ

---

पराक्रमी असा राम निर्मल चंद्राप्रमाणें सर्व लोकांना प्रिय होता २६. गजारोहण, अश्वारोहण व रथचर्या ह्यांमध्यें तो निपुण असून धनुर्वेदाविषयीं आणि पितृशुश्रूषेविषयीं तो अगदीं तत्पर होता २७. लक्ष्मीला वृद्धिंगत करणारा लक्ष्मण लोकांना आनंद देणाऱ्या आपल्या रामनामक ज्येष्ठ भ्रात्याशीं बालपणापासून नेहमीं फारच प्रेमानें वागत असे २८. आपल्या शरीराचीही पर्वा न करितां रामाला प्रिय असलेली हवी ती गोष्ट तो वैभवशाली लक्ष्मण करीत असल्यामुळें तो त्या रामाचा एक दुसरा बाह्य प्राणच होऊन बसलेला होता २९. त्या लक्ष्मणावांचून त्या पुरुषश्रेष्ठ रामाला निद्रा येत नसे व समीप आणिलेलें मिष्टान्नही त्यावांचून तो भक्षण करीत नसे ३०. रघुवंशज राम जेव्हां अश्वावर आरुढ होऊन मृगयेला जात असे तेव्हां त्याचें रक्षण करण्याकरितां धनुष्य घेऊन त्याच्या मागोमाग लक्ष्मण जात असे ३१. लक्ष्मण ज्याप्रमाणें रामाला प्रिय होता त्याप्रमाणें लक्ष्मणाचा कनिष्ठ बंधु शत्रुघ्नही भरताला नेहमीं प्राणांपेक्षां प्रिय होता व त्याचप्रमाणें शत्रुघ्नालाही तो भरत तसाच प्रिय होता ३२. असो. त्या महाभाग्यवान् चार प्रिय पुत्रांच्या योगानें दशरथराजा, देवांच्या योगानें आनंदित होणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणें, अत्यंत आनंदित झाला ३३. ते सर्व ज्ञानसंपन्न झाले असतां गुणांनीं युक्त झाले आणि ते सर्वज्ञ व दूरदर्शी होऊन विनयशील आणि कीर्तिमान् झाले ३४. ह्याप्रमाणें प्रभावानें आणि उज्ज्वल तेजानें युक्त असे ते सर्व पुत्र प्राप्त झाल्यामुळें लोकाधिपति ब्रह्मदेवाप्रमाणें दशरथराजा आनंदित झाला ३५. ते पुरुषश्रेष्ठ वेदाध्ययनाविषयीं आणि पित्याच्या शुश्रूषेविषयीं तत्पर

राजा दशरथस्तेषां दारक्रियां प्रति । चिन्तयामास धर्मात्मा सोपाध्यायः सबान्धवः ३७ तस्य चिन्तयमानस्य मन्त्रिमध्ये महात्मनः । अभ्यागच्छन्महातेजा विश्वामित्रो महामुनिः ३८ स राज्ञो दर्शनाकाङ्क्षी द्वाराध्यक्षानुवाच ह । शीघ्रमाख्यात मां प्राप्तं कौशिकं गाधिनः सुतम् ३९ तच्छ्रुत्वा वचनं तस्य राज्ञो वेश्म प्रदुद्रुवुः । संभ्रान्तमनसः सर्वे तेन वाक्येन चोदिताः ४० ते गत्वा राजभवनं विश्वामित्रमृषिं तदा । प्राप्तमावेदयामासुर्नृपायेक्ष्वाकवे तदा ४१ तेषां तद्वचनं श्रुत्वा सपुरोधाः समाहितः । प्रत्युज्जगाम संहृष्टो ब्रह्माणमिव वासवः ४२ स दृष्ट्वा ज्वलितं दीप्त्या तापसं संशितव्रतम् । प्रहृष्टवदनो राजा ततोऽर्घ्यमुपहारयत् ४३ स राज्ञः प्रतिगृह्यार्घ्यं शास्त्रदृष्टेन कर्मणा । कुशलं चाव्ययं चैव पर्यपृच्छन्नराधिपम् ४४ पुरे कोशे जनपदे बान्धवेषु सुहृत्सु च । कुशलं कौशिको राज्ञः पर्यपृच्छत्सुधार्मिकः ४५ अपि ते संनताः सर्वे सामन्तरिपवो जिताः । दैवं च मानुषं चैव कर्म ते साध्वनुष्ठितम् ४६ वसिष्ठं च समागम्य कुशलं मुनि-

---

होऊन धनुर्वेदामध्यें पारंगत झाले असतां ३६ उपाध्याय आणि बांधव ह्यांसहवर्तमान दशरथराजाच्या मनामध्यें त्यांच्या विवाहाविषयीं विचार येऊं लागला ३७. तो महात्मा दशरथराजा मंत्रिमंडलामध्यें पुत्रांच्या विवाहाविषयीं विचार करीत आहे तोंच महातेजस्वी विश्वामित्र महर्षि तेथें आले ३८ आणि राजाची भेट घेण्याच्या उद्देशानें " मी गाधिपुत्र कौशिक प्राप्त झाल्याचें सत्वर कळवा " ह्मणून द्वारपालांना ह्मणाले ३९. तर्व्हां तें त्यांचें भाषण श्रवण केल्याबरोबर द्वारपाल मनामध्यें अगदीं गांधळून गेले आणि त्या आज्ञेनें प्रेरित होऊन ते सर्वही राजगृहाकडे सत्वर गेले ४० व राजगृहीं गेल्यानंतर इक्ष्वाकुवंशज दशरथराजाला विश्वामित्रमुनि प्राप्त झाल्याचें त्यांनीं निवेदन केलें असतां ४१ त्यांचें भाषण श्रवण करून ब्रह्मदेवाला सामोऱ्या जाणाऱ्या इंद्राप्रमाणें पुरोहितासहवर्तमान तो दशरथराजा स्वस्थांतःकरणपूर्वक मोठ्या आनंदानें त्यांना सामोरा गेला ४२. सारांश, तेजानें जाज्वल्यमान आणि निर्मल आचरणानें युक्त अशा त्या तपोनिधींना अवलोकन करण्याबरोबर दशरथराजाचें मुख ( हर्षानें ) आनंदित झालें व त्यानें ( वसिष्ठांकडून पूजा करविण्याकरितां ) पूजासाहित्य आणविलें ४३. नंतर राजाच्या पूजेचा शास्त्रविहित विधीनें स्वीकार केल्यावर विश्वामित्रमुनींनीं दशरथराजाला क्षेम आणि अभ्युदय ह्यांविषयीं प्रश्न केला ४४ आणि नंतर त्या अत्यंत धार्मिक कौशिकमुनींनीं नगर, कोश, देश, बांधव आणि मित्र ह्यांच्याही कुशलाविषयीं राजापाशीं विचारपूस केली ४५ आणि " संनिध असलेले तुझे सर्व जित

**पुङ्गवः । ऋषींश्च तान्यथान्यायं महाभाग उवाच ह ४७ ते सर्वे हृष्टमनसस्तस्य राज्ञो निवेशनम् । विविशुः पूजितास्तेन निषेदुश्च यथार्हतः ४८ अथ हृष्टमना राजा विश्वामित्रं महामुनिम् । उवाच परमोदारो हृष्टस्तमभिपूजयन् ४९ यथामृतस्य संप्राप्तिर्यथा वर्षमनूदके । यथा सदृशदारेषु पुत्रजन्माप्रजस्य वै ५० प्रणष्टस्य यथा लाभो यथा हर्षो महोदयः । तथैवागमनं मन्ये स्वागतं ते महामुने ५१ कं च ते परमं कामं करोमि किमु हर्षितः । पात्रभूतोसि मे ब्रह्मन्दिष्ट्या प्राप्तोसि मानद ५२ अद्य मे सफलं जन्म जीवितं च सुजीवितम् । यस्माद्विप्रेन्द्रमद्राक्षं सुप्रभाता निशा मम ५३ पूर्वं राजर्षिशब्देन तपसा द्योतितप्रभः । ब्रह्मर्षित्वमनुप्राप्तः पूज्योसि बहुधा मया ५४ तदद्भुतमभूद्विप्र पवित्रं परमं मम । शुभक्षेत्रगतश्चाहं तव संदर्शनात्प्रभो ५५ ब्रूहि यत्प्रार्थितं तुभ्यं कार्यमागमनं प्रति । इच्छाम्यनु-**

---

शत्रु तुला नमून आहेत नां ? आणि तुझें दैव व मानुष कर्म चांगल्या प्रकारें चाललें आहे नां ? " असेंही त्यांनीं त्याला विचारिलें ४६. नंतर त्या मुनिश्रेष्ठ महाभाग्यवान् विश्वामित्रांनीं वसिष्ठांची व इतर ऋषींची भेट घेऊन त्यांच्याशीं योग्यतेप्रमाणें भाषण केलें ४७. तदनंतर ते सर्व ऋषि आनंदानें त्या दशरथराजाच्या घरीं गेले आणि त्यांनीं पूजन केल्यावर ते योग्यतेप्रमाणें तेथें बसले ४८. नंतर पराकाष्ठेचा उदार असलेला दशरथराजा विश्वामित्र महर्षींची प्रशंसा करण्याकरितां मनामध्यें आनंदित होऊन त्यांना ह्मणाला ४९ " अमृताचा लाभ, निर्जल प्रदेशामध्यें पर्जन्यवृष्टि, आपणांला अनुरूप अशा स्त्रीचे ठिकाणीं निपुत्रिकाला झालेली पुत्रप्राप्ति ५०, हरवलेल्या वस्तूचा पुनरपि लाभ अथवा महोत्सवमूलक हर्ष ह्याप्रमाणें मी आपलें आगमन समजत आहें. करितां, हे महामुने, आपलें स्वागत असो ५१. आपलें मुख्य कार्य मी मोठ्या आनंदानें कोणतें करूं तें आपण मला सांगा. हे ब्रह्मन् , हे मान्य, सर्व प्रकारच्या सेवेला आपण पात्र आहांत. आपण आलां ही मोठी सुदैवाचीच गोष्ट आहे ५२. आज माझ्या जन्माचें व जिविताचें सार्थक झालें आणि आपणा विप्रश्रेष्ठांचें दर्शन झाल्यामुळें आज मला हा सुदिनच उगवला ५३. राजर्षि ही पदवी येण्यास कारणीभूत होणाऱ्या तपाच्या योगानें पूर्वीं आपण झळकत असून नंतर ब्रह्मर्षि झालां आहांत. करितां, आपण मला पुष्कळच प्रकारांनीं पूज्य आहांत ५४. अत्यंत पवित्र असें आपलें आगमन माझ्या घरीं झालें हें मोठें आश्चर्य आहे व, हे प्रभो, आपल्या दर्शनामुळें पुण्य क्षेत्राला गेल्याचें मला फल आलें आहे ५५. करितां, कोणत्या उद्देशानें आपलें आगमन झालें आहे हें कथन करा. आपण आपलें काय कार्य

गृहीतोहं त्वदर्थपरिवृद्धये ५६ कार्यस्य न विमर्शं च गन्तुमर्हसि सुव्रत । कर्ता चाहमशेषेण दैवतं हि भवान्मम ५७ मम चायमनुप्राप्तो महानभ्युदयो द्विज । तवागमनजः कृत्स्नो धर्मश्चानुत्तमो द्विज ५८ इति हृदयसुखं निशम्य वाक्यं श्रुतिसुखमात्मवता विनीतमुक्तम् । प्रथितगुणयशा गुणैर्विशिष्टः परम ऋषिः परमं जगाम हर्षम् ५९ [ ६०.२ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टादशः सर्गः ॥ १८ ॥

तच्छ्रुत्वा राजसिंहस्य वाक्यमद्भुतविस्तरम् । हृष्टरोमा महातेजा विश्वामित्रोऽभ्यभाषत १ सदृशं राजशार्दूल तवैव भुवि नान्यतः । महावंशप्रसूतस्य वसिष्ठव्यपदेशिनः २ यत्तु मे हृद्गतं वाक्यं तस्य कार्यस्य निश्चयम् । कुरुष्व राजशार्दूल भव सत्यप्रतिश्रवः ३ अहं नियममातिष्ठे सिद्ध्यर्थं पुरुषर्षभ । तस्य विघ्नकरौ द्वौ तु राक्षसौ कामरूपिणौ ४ व्रते तु बहुशश्चीर्णे समाप्त्यां राक्षसाविमौ । मारीचश्च सुबाहुश्च वीर्यवन्तौ सुशिक्षितौ ५ तौ मांसरुधिरौ-

---

असेल तें सांगून मजवर अनुग्रह करावा अशी माझी इच्छा आहे ५६. हे सदाचरणसंपन्न मुने, आपलें कांहींही कार्य असलें तरी तें मला सांगण्याला आपण मुळींच शंका मनामध्यें आणूं नका; मी तें सर्वस्वी शेवटास नेईन; आपण माझें दैवतच आहां ५७. हे द्विज, आपल्या आगमनामुळें माझें कांहीं पराकाष्ठेचें अत्युत्कृष्ट पुण्य संपूर्णपणें उदयाला आलें आहे " ५८. असो. जितेंद्रिय दशरथराजानें नम्रपणें केलेलें हें चित्ताल्हादकारक व कानाला मधुर लागणारें भाषण श्रवण करून शमदमादि गुणांनीं संपन्न आणि इतर गुण व यश ह्यांच्या योगानेंही विख्यात असलेल्या त्या महर्षींना पराकाष्ठेचा हर्ष झाला ५९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

तें अद्भुत अर्थविस्तारानें युक्त असलेलें नृपश्रेष्ठ दशरथराजाचें भाषण श्रवण करून महातेजस्वी विश्वामित्र मुनींच्या अंगावर आनंदानें रोमांच उठले आणि ते ह्मणाले १ " हे नृपश्रेष्ठा, थोर कुलांत जन्मास येऊन वसिष्ठांच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या तुलाच आज पृथ्वीमध्यें हें बोलणें योग्य आहे; इतर कोणालाही योग्य नाहीं २. करितां, हे राजेंद्रा, माझ्या मनांतून जें कांहीं सांगावयाचें आहे तें सिद्धीस नेण्याविषयीं तूं आधीं निश्चय कर आणि आपलें वचन खरें कर ३. हे पुरुषश्रेष्ठा, मी यज्ञाकरितां दीक्षा घेतली असतांना यथेष्ट रूप धारण करणारे दोन राक्षस त्या यज्ञाला विघ्न करीत आहेत ४. मी कनेक वेळां तें दीक्षाव्रत संपविण्याच्या बेतांत आणिलें असतांना समाप्तिसमयीं मारीच आणि सुबाहु असे हे पराक्रमी व सुशिक्षित राक्षस ५

घेण वेदिं तामभ्यवर्षताम् ६ अवधूते तथाभूते तस्मिन्नियमनिश्चये । कृतश्रमो निरुत्साहस्तस्माद्देशादपाक्रमे ७ न च मे क्रोधमुत्स्रष्टुं बुद्धिर्भवति पार्थिव । तथाभूता हि सा चर्या न शापस्तत्र मुच्यते ८ स्वपुत्रं राजशार्दूल रामं सत्यपराक्रमम् । काकपक्षधरं वीरं ज्येष्ठं मे दातुमर्हसि ९ शक्तो ह्येष मया गुप्तो दिव्येन स्वेन तेजसा । राक्षसा ये विकर्तारस्तेषामपि विनाशने १० श्रेयश्चास्मै प्रदास्यामि बहुरूपं न संशयः । त्रयाणामपि लोकानां येन ख्यातिं गमिष्यति ११ न च तौ राममासाद्य शक्तौ स्थातुं कथंचन । न च तौ राघवादन्यो हन्तुमुत्सहते पुमान् १२ वीर्योत्सिक्तौ हि तौ पापौ कालपाशवशं गतौ । रामस्य राजशार्दूल न पर्याप्तौ महात्मनः १३ न च पुत्रगतं स्नेहं कर्तुमर्हसि पार्थिव । अहं ते प्रतिजानामि हतौ तौ विद्धि राक्षसौ १४ अहं वेद्मि महात्मानं रामं सत्यपराक्रमम् । वसिष्ठोऽपि महातेजा ये चेमे तपसि स्थिताः १५ यदि ते धर्मलाभं तु यशश्च परमं भुवि । स्थिरमिच्छसि राजेन्द्र रामं मे दातुमर्हसि १६ यद्यभ्यनुज्ञां काकुत्स्थ ददते

---

मांस आणि रक्त ह्यांचा त्या वेदीमध्यें सडा करीत असतात ६ आणि ती यज्ञदीक्षा व तो यज्ञ ह्यांचा ह्याप्रमाणें नाश झाला असतां श्रांत व निरुत्साह होऊन मी त्या प्रदेशांतून निघून जात असतो ७. हे राजा, शाप देण्याला अयोग्य अशा प्रकारचें तें कर्म असल्यामुळें ( ह्मणजे तें यज्ञकर्म करणाऱ्या पुरुषानें शाप देण्यास उद्युक्त होणें योग्य नसल्यामुळें ) शाप दे ( ऊन राक्षसांचा नाश कर ) ण्याला माझें मन घेत नाहीं ८. करितां, हे नृपश्रेष्ठा, अमोघपराक्रमी आणि झुलपें धारण करणाऱ्या अशा आपल्या रामनामक वीर ज्येष्ठ पुत्राला तूं माझ्या स्वाधीन कर ९. मी ह्याचें रक्षण करीत असतांना स्वतःच्या दिव्य तेजानें हा त्या यज्ञविघातक राक्षसांचाही नाश करण्यास समर्थ आहे १० मी ह्याचें नानाप्रकारें निःसंशय कल्याण करीन व त्याच्या योगानें हा तिन्ही लोकांमध्यें प्रख्यात होईल ११. रामाची गांठ पडली असतां ते राक्षस त्याच्यापुढें टिकाव धरण्यास समर्थ होणार नाहींत आणि रामावांचून कोणाही इतर पुरुषाची त्यांच्याशीं युद्ध करण्याची छाती नाहीं १२. हे नृपश्रेष्ठा, कालपाशाच्या अधीन झालेले आणि वीर्याविषयीं गर्व वाहणारे ते दुष्ट राक्षस महात्म्या रामापुढें टिकाव धरण्यास समर्थ नाहींत १३. करितां, हे राजा, तूं ह्यावेळीं पुत्रसंबंधीं लोभ धरूं नको; मी तुला प्रतिज्ञेनें सांगतों कीं त्या राक्षसांचा वध झालाच असें तूं समज १४. अमोघपराक्रमी महात्म्या रामाला मी जाणीत असून महातेजस्वी वसिष्ठ व हे तपोधनही जाणीत आहेत १५. करितां, हे राजाधिराज, धर्म संपादन होऊन

तव मन्त्रिगः । वसिष्ठप्रमुखाः सर्वे ततो रामं विसर्जय १७ अभिप्रेतमसंसक्तमात्मजं दातुमर्हसि । दशरात्रं हि यज्ञस्य रामं राजीवलोचनम् १८ नात्येति कालो यज्ञस्य यथायं मम राघव । तथा कुरुष्व भद्रं ते मा च शोके मनः कृथाः १९ इत्येवमुक्त्वा धर्मात्मा धर्मार्थसहितं वचः । विरराम महातेजा विश्वामित्रो महामतिः २० स तन्निशम्य राजेन्द्रो विश्वामित्रवचः शुभम्। शोकेन महताविष्टश्चचाल च मुमोह च ॥ लब्धसंज्ञस्ततोत्थाय व्यषीदत भयान्वितः २१ इति सहृदयमनोविदारणं मुनिवचनं तदतीव शुश्रुवीन् । नरपतिरभवन्महान्महात्मा व्यथितमनाः प्रचचाल चासनात् २२ [७१४] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकोनविंशः सर्गः॥१९॥

तच्छ्रुत्वा राजशार्दूलो विश्वामित्रस्य भाषितम् । मुहूर्तमिव निःसंज्ञः संज्ञावानिदमब्रवीत् १ ऊनषोडशवर्षो मे रामो राजीवलोचनः । न युद्धयोग्यतामस्य पश्यामि सह राक्षसैः २ इयमक्षौहिणी सेना यस्याहं पति-

---

पृथ्वीवर आपली उत्कृष्ट कीर्ति चिरकाल रहावी अशी तुला इच्छा असेल तर तूं रामाला माझे स्वाधीन कर १६. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना दशरथा, तुझे वसिष्ठप्रभृति सर्व मंत्री जर अनुमोदन देत असतील तर तूं रामाला देऊन टाक १७. सारांश, प्रिय आणि तुझे ठिकाणीं विशेष आसक्ति न धरणारा कमलनयन राम यज्ञाचे दहा दिवस होईपर्यंत तूं मला दे १८. हे रघुकुलोत्पन्ना, माझ्या यज्ञाचा कालातिक्रम होणार नाहीं अशा रीतीनें तूं तजवीज कर आणि मनामध्यें वाईट वाटूं देऊं नकोस; असें करण्यांत तुझें कल्याण होईल १९. ह्याप्रमाणें धर्म आणि अर्थ ह्यांना धरून असलेलें संभाषण करून ते धर्मात्मे महातेजस्वी व महाविचारी विश्वामित्रमुनि स्वस्थ बसले २०. असो. ते विश्वामित्रमुनींचें शुभ भाषण श्रवण केल्याबरोबर राजाधिराज दशरथ फारच शोकाकुल झाल्यामुळें कंपित होऊन मूर्छित झाला आणि नंतर सावध झाल्यावर तो उठला. तथापि, राक्षसांच्या भीतीनें तो अगदींच हताश होऊन बसला २१. सारांश, हृदय आणि मन ह्यांना अगदीं विदीर्ण करून टाकणारें तें विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण करून महाबुद्धिमान् दशरथ महाराज मनामध्यें दुःखित झाला आणि मूर्छित होऊन स्वस्थानापासून खालीं पडला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

विश्वामित्रमुनींचें तें भाषण श्रवण करून नृपश्रेष्ठ दशरथराजा क्षणभर मूर्छितच झाला आणि सावध झाल्यावर म्हणाला १ " ह्या कमलनयन रामाचें वय सोळाव-

रीश्वरः । अनया सहितो गत्वा योद्धाहं तैर्निशाचरैः ३ इमे शूराश्च विक्रान्ता भृत्या मेस्त्रविशारदाः । योग्या रक्षोगणैर्योद्धुं न रामं नेतुमर्हसि ४ अहमेव धनुष्पाणिर्गोप्ता समरमूर्धनि । यावत्प्राणान्धरिष्यामि तावद्योत्स्ये निशाचरैः ५ निर्विघ्ना व्रतचर्या सा भविष्यति सुरक्षिता । अहं तत्र गमिष्यामि न रामं नेतुमर्हसि ६ बालो ह्यकृतविद्यश्च न च वेत्ति बलाबलम् । न चास्त्रबलसंयुक्तो न च युद्धविशारदः ७ न चासौ रक्षसां योग्यः कूटयुद्धा हि राक्षसाः । विप्रयुक्तो हि रामेण मुहूर्तमपि नोत्सहे ८ जिवितुं मुनिशार्दूल न रामं नेतुमर्हसि । यदि वा राघवं ब्रह्मन्नेतुमिच्छसि सुव्रत ९ चतुरङ्गसमायुक्तं मया सह च तं नय । षष्टिर्वर्षसहस्राणि जातस्य मम कौशिक १० कृच्छ्रेणोत्पादितश्चायं न रामं नेतुमर्हसि । चतुर्णामात्मजानां हि प्रीतिः परमिका मम ११ ज्येष्ठे धर्मप्रधाने च न रामं नेतुमर्हसि। किंवीर्या राक्षसास्ते च कस्य पुत्राश्च के च ते १२

र्षांपेक्षांही [ अजून चार वर्षें ] कमी आहे; ह्यास्तव, राक्षसांशीं युद्ध करण्यास हा योग्य आहे असें मला वाटत नाहीं २. हें एक अक्षौहिणी सैन्य असून ह्याचा रक्षक व अधिपति मी आहें. करितां, ह्या सैन्यासहवर्तमान जाऊन मी त्या राक्षसांशीं युद्ध करीन ३. हे शूर, पराक्रमी व अस्त्रांमध्यें निपुण असे माझे सेवक राक्षसांच्या सैन्यांशीं युद्ध करण्यास योग्य आहेत; करितां, आपण रामाला नेऊं नका ४. मीच समरांगणामध्यें हातांत धनुष्य घेऊन आपल्या यज्ञाचें रक्षण करीन आणि प्राण आहेत तोंपर्यंत राक्षसांशीं युद्ध करीन ५. मी तिकडे जातों म्हणजे ती आपली यज्ञदीक्षा सुरक्षित होऊन निर्विघ्नपणें पार पडेल; आपण रामाला नेऊं नका ६. हा अगदीं बाल असून ह्याची विद्याही संपलेली नाहीं; हा बलाबल जाणीत नसून अस्त्रबलानेंही युक्त नाहीं; युद्धामध्यें निपुण नाहीं ७ आणि म्हणूनच राक्षसांशीं युद्ध करण्यास हा योग्य नाहीं. राक्षस कपटानें युद्ध करणारे आहेत. रामाचा वियोग झाला असतां मला क्षणभरही जिवंत राहण्याची आशा नाहीं. ह्यास्तव, हे मुनिश्रेष्ठ, आपण रामाला नेऊं नका. अथवा, हे सदाचरणसंपन्न ब्रह्मनिष्ठ मुने, आपणाला जर रघुवंशज रामाला नेण्याची इच्छा असेल तर ८,९ चतुरंगसैन्यासहवर्तमान, मला बरोबर घेऊन, त्याला न्या. हे कौशिक मुने, माझ्या जन्माला साठ हजार वर्षें होऊन गेल्यानंतर १० मोठ्या दुःखानें मला हा प्राप्त झालेला आहे. ह्यास्तव, आपण ह्या रामाला नेऊं नका. चारी पुत्रामध्यें वयानें ज्येष्ठ आणि धर्मदृष्ट्याही श्रेष्ठ अशा रामाचे ठिकाणीं माझें पराकाष्ठेचें प्रेम आहे; करितां, आपण ह्या रामाला नेऊं नका. त्या राक्षसांचें सामर्थ्य किती

कथंप्रमाणाः के चैतान्रक्षन्ति मुनिपुङ्गव । कथं च प्रतिकर्तव्यं तेषां रामेण रक्षसाम् १३ मामकैर्वा बलैर्ब्रह्मन्मया वा कूटयोधिनाम् । सर्वं मे शंस भगवन्कथं तेषां मया रणे १४ स्थातव्यं दुष्टभावानां वीर्योत्सिक्ता हि राक्षसाः । तस्य तद्वचनं श्रुत्वा विश्वामित्रोऽभ्यभाषत १५ पौलस्त्यवंशप्रभवो रावणो नाम राक्षसः । स ब्रह्मणा दत्तवरस्त्रैलोक्यं बाधते भृशम् १६ महाबलो महावीर्यो राक्षसैर्बहुभिर्वृतः । श्रूयते च महाराज रावणो राक्षसाधिपः १७ साक्षाद्वैश्रवणभ्राता पुत्रो विश्रवसो मुनेः । यदा न खलु यज्ञस्य विघ्नकर्ता महाबलः १८ तेन संचोदितौ तौ तु राक्षसौ च महाबलौ। मारीचश्च सुबाहुश्च यज्ञविघ्नं करिष्यतः १९ इत्युक्तो मुनिना तेन राजोवाच मुनिं तदा। न हि शक्तोस्मि सङ्ग्रामे स्थातुं तस्य दुरात्मनः २० स त्वं प्रसादं धर्मज्ञ कुरुष्व मम पुत्रके । मम चैवाल्पभाग्यस्य दैवतं हि भवान्गुरुः २१ देवदानवगन्धर्वा यक्षाः पतगपन्नगाः। न शक्ता रावणं सोढुं

---

आहे ? ते कोण आहेत ? कोणाचे पुत्र आहेत ११, १२ ? त्यांच्या शरीराचें प्रमाण तरी काय आहे आणि, हे मुनिश्रेष्ठ, त्या राक्षसांचें रक्षण करणारे तरी कोण आहेत ? (हें समजूं द्या ). हे विप्र, कपटयुद्ध करणाऱ्या त्या राक्षसांचा प्रतीकार रामाच्या हातून, माझ्या सैन्यांच्या हातून अथवा माझ्या हातून कसा होणार ? कारण, हे भगवन् , राक्षस वीर्यानें मत्त झालेले असतात. तेव्हां त्या दुष्टबुद्धि राक्षसांच्या रणामध्यें मीं तरी कसा टिकाव धरावा ? हें सर्व आपण मला कथन करा. " ह्याप्रमाणें दशरथाचें भाषण श्रवण करून विश्वामित्रमुनि त्याला ह्मणाले १३,१४,१५ " रावणनामक राक्षस पौलस्त्यवंशामध्यें उत्पन्न झाला आहे व त्याला ब्रह्मदेवानें वर दिला असल्यामुळें तो त्रैलोक्याला अतिशय पीडा देत आहे १६. हे महाराज, तो राक्षसाधिपति रावण महाबलाढ्य, महावीर्यवान् आणि असंख्य राक्षसांनीं युक्त असल्याचें प्रसिद्ध आहे १७. तो प्रत्यक्ष कुबेराचा भ्राता असून विश्रवस्मुनींचा पुत्र आहे. ( स्वतः जाण्यांत विशेष महत्त्व नाहीं असें समजून ) जेव्हां तो महाबलाढ्य रावण स्वतः यज्ञाला विघ्न करण्याचें मनामध्यें आणीत नाहीं १८ तेव्हां, त्याची आज्ञा झालेले ते महाबलाढ्य राक्षस मारीच आणि सुबाहु यज्ञाला विघ्न करीत असतात १९. ह्याप्रमाणें त्या विश्वामित्रमुनींनीं सांगितलें असतां दशरथराजा त्या मुनींना ह्मणाला " संग्रामामध्यें त्या दुरात्म्यापुढें टिकाव धरण्यास मी समर्थ नाहीं २०. करितां, हे धर्मज्ञ, माझ्या पुत्रावर आपण दया करा. मज भाग्यहीनाचे गुरु व दैवत आपणच आहांत २१. देव, दैत्य, गंधर्व, यक्ष, पक्षी व पन्नग हेही युद्धामध्यें रावणाचा पराक्रम सहन करण्यास

किं पुनर्मानवा युधि २२ स तु वीर्यवतां वीर्यमादत्ते युधि रावणः । तेन चाहं न शक्तोस्मि संयोद्धुं तस्य वा बलैः२३ सबलो वा मुनिश्रेष्ठ सहितो वा ममात्मजैः । कथमप्यमरप्रख्यं सङ्ग्रामाणामकोविदम् २४ बालं मे तनयं ब्रह्मन्नैव दास्यामि पुत्रकम् । अथ कालोपमौ युद्धे सुतौ सुन्दोपसुन्दयोः २५ यज्ञविघ्नकरौ तौ ते नैव दास्यामि पुत्रकम् । मारीचश्च सुबाहुश्च वीर्यवन्तौ सुशिक्षितौ २६ तयोरन्यतरं योद्धुं यास्यामिससुहृद्गणः । अन्यथा त्वनुनेष्यामि भवन्तं सहबान्धवः २७ इति नरपतिजल्पनाद्द्विजेन्द्रं कुशिकसुतं सुमहान्विवेश मन्युः । सुहुत इव मखेग्निराज्यसिक्तः समभवदुज्ज्वलितो महर्षिवह्निः २८ [ ७४२ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे विंशः सर्गः ॥ २० ॥

तच्छ्रुत्वा वचनं तस्य स्नेहपर्याकुलाक्षरम् । समन्युः कौशिको वाक्यं प्रत्युवाच महीपतिम् १ पूर्वमर्थं प्रतिश्रुत्य प्रतिज्ञां हातुमिच्छसि । राघवाणामयुक्तोयं कुलस्यास्य विपर्ययः २ यदीदं ते क्षमं राजन्गमि-

---

समर्थ नाहींत; मग मानवांची तर गोष्ट कशाला पाहिजे २२? तो रावण युद्धामध्यें सामर्थ्यवानांचेंही वीर्य हरण करितो; ह्यास्तव, हे मुनिश्रेष्ठ, त्याच्याशीं अथवा त्याच्या सैन्याशीं युद्ध करण्यास मी सैन्यासहवर्तमान अथवा आपल्या पुत्रांसहवर्तमानही समर्थ नाहीं. तस्मात्, संग्रामांविषयीं अनभिज्ञ आणि बालवयी अशा आपल्या रूपानें देवतुल्य असलेल्या पुत्राला, हे ब्रह्मन्, मी देणारच नाहीं. त्यांतूनही युद्धामध्यें यमाप्रमाणें असलेले सुंदोपसुंदांचे पुत्र जे मारीच आणि सुबाहु २३,२४,२५ ते जर आपल्या यज्ञाला विघ्न करणारे असतील तर मी पुत्राला देण्याची गोष्टच नको आहे. कारण, मारीच आणि सुबाहु हे सामर्थ्यवान् असून युद्धाविषयीं चांगले शिकलेले आहेत २६. त्यांच्यापैकीं कोणाशींही युद्ध करण्याकरितां मी मित्रगणासहवर्तमान जाईन, आणि हें आपणांला जर रुचत नसेल तर रामाला नेण्याविषयीं बांधवांसहवर्तमान मी आपली प्रार्थना करीन" २७. ह्याप्रमाणें दशरथराजानें भाषण केल्यामुळें कुशिकपुत्र द्विजश्रेष्ठ विश्वामित्रांना फारच मोठा राग आला आणि यज्ञामध्यें घृतसिंचनपूर्वक हवन केलेल्या अग्नीप्रमाणें त्या विश्वामित्र महर्षींचे ठिकाणीं क्रोधरूप वन्हि प्रज्वलित झाला २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

पुत्रस्नेहामुळें ज्यांतील वर्णोच्चार नीट होत नाहींत असें त्याचें तें भाषण श्रवण केल्यावर क्रुद्ध झालेले विश्वामित्रमुनि त्या भूपतीला ह्मणाले १ " पूर्वीं प्रतिज्ञा करून

ष्यामि यथागतम् । मिथ्याप्रतिज्ञः काकुत्स्थ सुखी भव सुहृद्वृतः ३ तस्य रोषपरीतस्य विश्वामित्रस्य धीमतः । चचाल वसुधा कृत्स्ना देवानां च भयं महत् ४ त्रस्तरूपं तु विज्ञाय जगत्सर्वं महानृषिः । नृपतिं सुव्रतो धीरो वसिष्ठो वाक्यमब्रवीत् ५ इक्ष्वाकूणां कुले जातः साक्षाद्धर्म इवापरः । धृतिमान्सुव्रतः श्रीमान्न धर्मं हातुमर्हसि ६ त्रिषु लोकेषु विख्यातो धर्मात्मा इति राघवः । स्वधर्मं प्रतिपद्यस्व नाधर्मं वोढुमर्हसि ७ प्रतिश्रुत्य करिष्येति उक्तं वाक्यमकुर्वतः । इष्टापूर्तवधो भूयात्तस्माद्रामं विसर्जय ८ कृतास्त्रमकृतास्त्रं वा नैनं शक्ष्यन्ति राक्षसाः । गुप्तं कुशिकपुत्रेण ज्वलनेनामृतं यथा ९ एष विग्रहवान्धर्म एष वीर्यवतां वरः । एषविद्याधिको लोके तपसश्च परायणम् १० एषोऽस्त्रान्विविधान्वेत्ति त्रैलोक्ये सचराचरे । नैनमन्यः पुमान्वेत्ति न च वेत्स्यन्ति केचन ११ न देवा

तूं तिचा भंग करण्याची इच्छा करीत आहेस. परंतु, ह्या कुलाच्या नाशाला कारणीभूत होणारी ही गोष्ट रघुवंशजांना योग्य नाहीं २. हे राजा, हें असें करणें जर तुला योग्य असेल तर मी आल्या मार्गानें चालतां होतों. हे काकुत्स्था, तूं आपली प्रतिज्ञा असत्य करून सुहृदांसहवर्तमान सुखी हो " ३. ह्याप्रमाणें ते बुद्धिमान् विश्वामित्र मुनि क्रोधानें व्याप्त झाले असतां संपूर्ण पृथ्वी हलून गेली आणि देवांना मोठें भय प्राप्त झालें ४. तेव्हां सर्व जगत् अतिशय त्रस्त झाल्याचें अवलोकन करून ज्ञानवान् आणि सदाचारसंपन्न वसिष्ठ महर्षि दशरथाला ह्मणाले ५ " इक्ष्वाकुवंशजांच्या कुलामध्यें तूं साक्षात् दुसरा धर्मच कीं काय असा उत्पन्न झाला असून धैर्यवान्, सदाचारसंपन्न आणि वैभवशाली आहेस. ह्याकरितां, धर्माचा त्याग करणें तुला योग्य नाहीं ६. " हा रघुवंशज धर्मात्मा " ह्मणून त्रैलोक्यामध्यें तुझी ख्याति आहे, करितां. धर्माचें अवलंबन कर: अधर्माचें अवलंबन करूं नकोस ७. अरे, " करीन " अशी प्रतिज्ञा करून जो आपल्या ह्मणण्याप्रमाणें करीत नाहीं त्याला इष्ट ( ह्मणजे यज्ञयाग ) आणि पूर्त ( ह्मणजे वापी कोरे बांधणें ) ह्यांचें फल प्राप्त होत नाहीं. तस्मात्, तूं रामाला देऊन टाक् ८. अरे, अग्नीनें रक्षित असलेल्या अमृताप्रमाणें ह्या कुशिकपुत्रानें ह्याचें संरक्षण केलें असतां हा अस्त्रनिपुण असो वा नसो राक्षस ह्याचें तेज सहन करण्यास समर्थ होणार नाहींत ९. अरे, हा मूर्तिमान् धर्म असून वीर्यवानांमध्यें हा श्रेष्ठ आहे आणि त्याचप्रमाणें विद्येमध्यें हा सर्व जगतांत अधिक असून तपाचें तर हा मुख्य आश्रयस्थानच आहे १०. नानाप्रकारच्या अस्त्रांचें ह्याला ज्ञान आहे; ह्याच्यासारिखें अस्त्रज्ञान चराचर त्रैलोक्यामध्यें सांप्रत कोणालाही नाहीं व पुढेंही देव, ऋषि,

नर्षयः केचिन्नामरा न च राक्षसाः । गन्धर्वयक्षप्रवराः सकिंनरमहोरगाः १२ सर्वास्त्राणि कृशाश्वस्य पुत्राः परमधार्मिकाः । कौशिकाय पुरा दत्ता यदा राज्यं प्रशासति १३ तेपि पुत्राः कृशाश्वस्य प्रजापतिसुतासुताः । नैकरूपा महावीर्या दीप्तिमन्तो जयावहाः १४ जया च सुप्रभा चैव दक्षकन्ये सुमध्यमे । ते सूतेस्त्राणि शस्त्राणि शतं परमभास्वरम् १५ पञ्चाशतं सुताँल्लेभे जया लब्धवरा वरान् । वधायासुरसैन्यानामप्रमेयानरूपिणः १६ सुप्रभाजनयच्चापि पुत्रान्पञ्चाशतं पुनः । संहारान्नाम दुर्धर्षान्दुराक्रामान्बलीयसः १७ तानि चास्त्राणि वेत्त्येष यथावत्कुशिकात्मजः । अपूर्वाणां च जननं शक्तो भूयश्च धर्मवित् १८ तेनास्य मुनिमुख्यस्य धर्मज्ञस्य महात्मनः । न किंचिदस्त्यविदितं भूतं भव्यं च राघव १९ एवंवीर्यो महातेजा विश्वामित्रो महायशाः । न रामगमने राजन्संशयं गन्तुमर्हसि २० तेषां निग्रहणे शक्तः स्वयं च कुशिकात्मजः । तव पुत्र हितार्थाय त्वामुपेत्याभियाचते २१ इति मुनिवचनात्प्र-

---

अमर, राक्षस, श्रेष्ठ श्रेष्ठ गंधर्व आणि यक्ष, किंनर व महोरग ह्यांपैकीं कोणाला प्राप्त होण्याचा संभव नाहीं ११,१२. अत्यंत धार्मिक असे कृशाश्वाचे पुत्र सर्वप्रकारचीं अस्त्रें ह्मणून पूर्वी शिवानें, हा विश्वामित्र राज्य करीत असतांना, ह्याला दिले १३. दक्षकन्यांचे ठिकाणीं जन्मास आलेले ते कृशाश्वाचे पुत्रही देदीप्यमान, विजयशाली व महावीर्यवान् असून नानाप्रकारचीं रूपें धारण करणारे होते १४. जया आणि सुप्रभा ह्या उभयतां सौंदर्यसंपन्न स्त्रिया दक्षप्रजापतीच्या कन्या असून त्यांना ( पुत्ररूपानें ) अत्यंततेजस्वीं अशीं शंभर अस्त्रें व शस्त्रें प्राप्त झालीं १५. पैकीं वर प्राप्त झालेल्या जयेला असुरसैन्यांचा वध करण्याकरितां अचिंत्य आणि अदृश्य असे पन्नास श्रेष्ठ पुत्र प्राप्त झाले असून सुप्रभेला दुसऱ्यांना सहन होण्यास अशक्य व अजिंक्य असे संहारनामक पन्नास बलाढ्य पुत्र प्राप्त झाले १६,१७ असो. तीं अस्त्रें हा कुशिकपुत्र सांगोपांग जाणीत असून आणखीं दुसरीं अपूर्व अस्त्रें उत्पन्न करण्यासही हा धर्मवेत्ता समर्थ आहे १८. ह्यामुळें, हे रघुवंशजा दशरथा, ह्या महात्म्या धर्मवेत्त्या श्रेष्ठ मुनीला भूत आणि भविष्य ह्यांपैकीं अज्ञात असें कांहींही नाहीं १९. तात्पर्य, महातेजस्वी आणि महायशस्वी विश्वामित्रमुनींचें वीर्य अशाप्रकारचें आहे. करितां, हे राजा, रामाच्या गमनाविषयीं तुला संशय घेण्याचें कारण नाहीं २०. हा कुशिकनंदन विश्वामित्र त्या राक्षसांचें पारिपत्य करण्यास स्वतः समर्थ आहे; परंतु, केवळ तुझ्या पुत्रांवर अनुग्रह करण्याकरितां हा तुझ्यापाशीं येऊन त्यांची याचना करीत आहे" २१. ह्याप्रमाणें

मन्त्रचिन्तां रघुवृषभश्च मुमोद पार्थिवः। गमनमभिरुरोच राघवस्य प्रथितयशाः कुशिकात्मजाय बुद्ध्या २२ [७६४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकविंशः सर्गः ॥ २१ ॥

तथा वसिष्ठे ब्रुवति राजा दशरथः स्वयम्। प्रहृष्टवदनो राममाजुहाव सलक्ष्मणम् १ कृतस्वस्त्ययनं मात्रा पित्रा दशरथेन च। पुरोधसा वसिष्ठेन मङ्गलैरभिमन्त्रितम् २ स पुत्रं मूर्ध्न्युपाघ्राय राजा दशरथस्तदा। ददौ कुशिकपुत्राय सुप्रीतेनान्तरात्मना ३ ततो वायुः सुखस्पर्शो नीरजस्को ववौ तदा। विश्वामित्रगतं रामं दृष्ट्वा राजीवलोचनम् ४ पुष्पवृष्टिर्महत्यासीद्देवदुन्दुभिनिःस्वनैः। शङ्खदुन्दुभिनिर्घोषः प्रयाते तु महात्मनि ५ विश्वामित्रो ययावग्रे ततो रामो महायशाः। काकपक्षधरो धन्वी तं च सौमित्रिरन्वगात् ६ कलापिनौ धनुष्पाणी शोभयानौ दिशो दश। विश्वामित्रं महात्मानं त्रिशीर्षाविव पन्नगौ ७ अनुजग्म-

वसिष्ठमुनींनीं सांगितलें असतां रघुवंशजश्रेष्ठ दशरथराजाचें चित्त प्रसन्न होऊन त्याला आनंद झाला आणि रघुवंशज रामाचें गमन त्याला रुचून तो प्रसिद्धकीर्तिमान् दशरथ विश्वामित्र मुनींना रामाला देण्याविषयीं मनामध्यें विचार करूं लागला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २१ ॥

ह्याप्रमाणें वसिष्ठमुनि भाषण करूं लागले असतां दशरथ राजाचें मुख आनंदित झालें आणि त्यानें स्वतः लक्ष्मणासहवर्तमान रामाला बोलाविलें १. नंतर माता कौसल्या व पिता दशरथ ह्यांनीं त्याच्याकरितां मंगल केलें आणि पुरोहित वसिष्ठमुनींनीं मंगलसूचक मंत्रांच्या योगानें त्याचें अभिमंत्रण केलें २. तदनंतर दशरथराजानें मस्तकाचे ठिकाणीं पुत्राचें अवघ्राण केल्यावर सुप्रसन्न अंतःकरणानें रामाला विश्वामित्रमुनींच्या स्वाधीन केलें ३. तेव्हां कमलनयन राम विश्वामित्रमुनींबरोबर गेल्याचें अवलोकन करून स्पर्श झाला असतां सुखावह असा वायु निर्मल होऊन वाहूं लागला ४. तो महात्मा मार्गाला लागला असतां मोठी पुष्पवृष्टि झाली आणि देवदुंदुभींसहवर्तमान शंख व दुंदुभि ह्यांचा घोष सुरू झाला ५. विश्वामित्रमुनि पुढें जाऊं लागले, त्यांच्या मागोमाग झुलपें राखलेला आणि धनुष्य धारण केलेला असा महायशस्वी राम जाऊं लागला आणि सुमित्रापुत्र लक्ष्मण त्या रामाचे मागून चालला ६. धनुष्य आणि भाते हातांत घेतले असल्यामुळें तीन फणांनीं युक्त असलेल्या नागांप्रमाणें दिसणारे आणि आपल्या तेजाच्या योगानें दशदिशा प्रकाशित करणारे ते उदार रामलक्ष्मण महात्म्या

तुरक्षुद्रौ पितामहमिवाश्विनौ । अनुयातौ श्रिया दीप्तौ शोभयन्तावनिन्दितौ ८ तदा कुशिकपुत्रं तु धनुष्पाणी स्वलंकृतौ । बद्धगोधाङ्गुलित्राणौ खड्गवन्तौ महाद्युती ९ कुमारौ चारुवपुषौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ । अनुयातौ श्रिया दीप्तौ शोभयेतामनिन्दितौ ॥ स्थाणुं देवमिवाचिन्त्यं कुमाराविव पावकी १० अध्यर्धयोजनं गत्वा सरय्वा दक्षिणे तटे । रामेति मधुरां वाणीं विश्वामित्रोऽभ्यभाषत ११ गृहाण वत्स सलिलं मा भूत्कालस्य पर्ययः । मन्त्रग्रामं गृहाण त्वं बलामतिबलां तथा १२ न श्रमो न ज्वरो वा ते न रूपस्य विपर्ययः । न च सुप्तं प्रमत्तं वा धर्षयिष्यन्ति नैर्ऋताः १३ न बाह्वोः सदृशो वीर्ये पृथिव्यामस्ति कश्चन । त्रिषु लोकेषु वा राम न भवेत्सदृशस्तव १४ बलामतिबलां चैव पठतस्तात राघव । न सौभाग्ये न दाक्षिण्ये न ज्ञाने बुद्धिनिश्चये १५ नोत्तरे प्रतिवक्तव्ये समो लोके तवानघ । एतद्विद्याद्वये लब्धे न भवेत्सदृशस्तव १६ बला चातिबला चैव सर्वज्ञानस्य

---

विश्वामित्रमुनींच्या मागोमाग गेले आणि ब्रह्मदेवाच्या मागोमाग जाणारे अश्विनीकुमारच कीं काय अशा रीतीनें विश्वामित्रमुनींच्या मागोमाग गेलेले ते निर्दोष रामलक्ष्मण कांतीनें देदीप्यमान असून विश्वामित्र मुनींना शोभा देत होते ७,८. सारांश, अचिंत्य व स्वयंप्रकाश अशा शंकराला शोभा देणारे षडाननच कीं काय असे ते कांतीनें देदीप्यमान, मनोहर रूपानें युक्त, निर्दोषी, धनुष्य, खड्ग व गोधाचर्ममय अंगुलित्राण धारण केलेले आणि उत्तमप्रकारें भूषित झालेले महातेजस्वी बालवयी भ्राते रामलक्ष्मण कुशिकपुत्र विश्वामित्रमुनींना शोभवूं लागले ९,१०. असो. सुमारें दीड योजन गेल्यानंतर सरयूनदीच्या दक्षिण तीरावर विश्वामित्रमुनि मधुरवाणीनें ह्मणाले " वत्सा रामा, आचमन कर; कालातिक्रमण होणें योग्य नाहीं; बला आणि अतिबला एतत्संज्ञक मंत्रसमुदाय तूं ग्रहण कर ११,१२. ह्मणजे श्रम अथवा ज्वर तुला होणार नाहीं; तुझ्या स्वरूपामध्यें पालट पडणार नाहीं आणि निद्रिस्थ अथवा असावध असतांनाही राक्षस तुझ्यासमीप येणार नाहींत १३. बाहुबलामध्यें तुझी बरोबरी करणारा पृथ्वींत आज कोणीही नाहीं आणि, हे रामा, त्रैलोक्यांतही तुझी बरोबरी करणारा पुढें कोणी निघणार नाहीं १४. हे राघवा, बला आणि अतिबला ह्या विद्या तूं पठण करूं लागलास ह्मणजे भाग्य, सरलता, ज्ञान, ऐहिकविषय व प्रत्युत्तर ह्या गुणां ह्यांमध्यें तुझी बरोबरी करणारा जगतांत कोणीही उरणार नाहीं. सारांश, हे निष्पापा रामा, ह्या दोन विद्या प्राप्त झाल्या असतां तुझी बरोबरी कोणीही करणार नाहीं १५,१६.

मातरौ । क्षुत्पिपासे न ते राम भविष्येते नरोत्तम १७ बलामतिबलां चैव पठतस्तात राघव । विद्याद्वयमधीयाने यशश्चाथ भवेद्भुवि १८ पितामहसुते ह्येते विद्ये तेजःसमन्विते । प्रदातुं तव काकुत्स्थ सदृशस्त्वं हि पार्थिव १९ कामं बहुगुणाः सर्वे त्वय्येते नात्र संशयः । तपसा संभृते चैते बहुरूपे भविष्यतः २० ततो रामो जलं स्पृष्ट्वा प्रहृष्टवदनः शुचिः । प्रतिजग्राह ते विद्ये महर्षेर्भावितात्मनः २१ विद्यासमुदितो रामः शुशुभे भीमविक्रमः।सहस्ररश्मिर्भगवाञ्छरदीव दिवाकरः २२ गुरुकार्याणि सर्वाणि नियुज्य कुशिकात्मजः । ऊषुस्तां रजनीं तत्र सरय्वां ससुखं त्रयः २३ दशरथनृपसूनुसत्तमाभ्यां तृणशयनेनुचिते तदोषिताभ्याम् । कुशिकसुतवचानुलालिताभ्यां सुखमिव सा विबभौ विभावरी २४ [ ७८८ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वाविंशः सर्गः ॥२२॥

---

बला आणि अतिबला ह्या विद्या कोणत्याही प्रकारच्या ज्ञानाचें उगमस्थान आहेत; हे पुरुषश्रेष्ठा रामा, बला आणि अतिबला तूं पठण करूं लागलास ह्मणजे तुला क्षुधा व तृषा लागणार नाहींत. बा रघुवंशजा, ह्या दोन विद्यांचें तूं अध्ययन करूं लागलास ह्मणजे पृथ्वीमध्यें तुझी कीर्ति होईल १७,१८. तेजानें युक्त अशा ह्या विद्या ब्रह्मदेवाच्या कन्या आहेत आणि ह्यांचें दान करण्याला, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना राजपुत्रा, तूंच योग्य पात्र आहेस १९. कारण, ह्या विद्यांचें दान स्वीकारण्याला योग्य असे हे सर्व गुण तुझ्या ठिकाणीं पुष्कळ आहेत ह्यांत संशय नाहीं. ह्या विद्या तपानें युक्त झाल्या असतां नानाप्रकारें फलप्रद होतील " २०. ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींनीं सांगितल्यानंतर प्रसन्न मुद्रेनें युक्त झालेला राम आचमन करून शुचि झाला आणि त्या जितेंद्रिय महर्षींपासून त्यानें त्या विद्या ग्रहण केल्या २१. नंतर हजारों किरणांनीं युक्त असलेला भगवान् सूर्य ज्याप्रमाणें शरदृतूमध्यें शोभूं लागतो त्याप्रमाणें तो प्रचंड पराक्रम करणारा राम त्या विद्यांनीं युक्त झाला असतां शोभूं लागला २२. असो. त्या विद्यांचा उपदेश केल्यानंतर कुशिकनंदन विश्वामित्रमुनींनीं रामाला गुरुसंबंधीं सर्व कृत्यांविषयीं उपदेश केला आणि नंतर त्या तिघांनींही सरयूनदीचे तीरीं ती रात्र सुखानें घालविली २३. सारांश,( राजकुमार असल्यामुळें ) कधींही न अनुभविलेल्या अशा तृणमय शय्येवर ते दशरथ राजाचे सज्जनश्रेष्ठ पुत्र पडले असतांनाही विश्वामित्रमुनींच्या संभाषणानें त्यांचें लालन झाल्यामुळें त्यांची ती रात्र सुखानें गेली २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

प्रभातायां तु शर्वर्यां विश्वामित्रो महामुनिः । अभ्यभाषत काकुत्स्थौ शयानौ पर्णसंस्तरे १ कौसल्या सुप्रजा राम पूर्वा संध्या प्रवर्तते । उत्तिष्ठ नरशार्दूल कर्तव्यं दैवमाह्निकम् २ तस्यर्षेः परमोदारं वचः श्रुत्वा नरोत्तमौ । स्नात्वा कृतोदकौ वीरौ जेपतुः परमं जपम् ३ कृताह्निकौ महावीर्यौ विश्वामित्रं तपोधनम् । अभिवाद्यातिसंहृष्टौ गमनायाभितस्थतुः ४ तौ प्रयान्तौ महावीर्यौ दिव्यां त्रिपथगां नदीम् । ददृशाते ततस्तत्र सरय्वाः संगमे शुभे ५ तत्राश्रमपदं पुण्यमृषीणां भावितात्मनाम् । बहुवर्षसहस्राणि तप्यतां परमं तपः ६ तं दृष्ट्वा परमप्रीतौ राघवौ पुण्यमाश्रमम् । ऊचतुस्तं महात्मानं विश्वामित्रमिदं वचः ७ कस्यायमाश्रमः पुण्यः को न्वस्मिन्वसते पुमान् । भगवञ्छ्रोतुमिच्छावः परं कौतूहलं हि नौ ८ तयोस्तद्वचनं श्रुत्वा प्रहस्य मुनिपुङ्गवः । अब्रवीच्छ्रूयतां राम यस्यायं पूर्व आश्रमः ९ कंदर्पो मूर्तिमानासीत्काम इत्युच्यते बुधैः ।

---

रात्र उजाडल्यावर विश्वामित्र महर्षि पर्णास्तरणावर शयन करीत असलेल्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांना उद्देशून ह्मणाले १ " हे रामा, तुज पुत्राच्या योगानें कौसल्या उत्तमपुत्रवती झाली आहे. ह्यास्तव, प्रातःसंध्येचा काल सुरू झाला आहे अशा वेळीं निद्रिस्थ राहणें तुला योग्य नाहीं. करितां, हे पुरुषश्रेष्ठा, ऊठ आणि ईशचिंतन व आन्हिक कर " २. ह्याप्रमाणें त्या विश्वामित्र ऋषींचें तें अतिशय उत्कृष्ट भाषण श्रवण केल्यावर त्या पुरुषश्रेष्ठ वीरांनीं स्नान करून अर्घ्य दिलें आणि सर्वोत्कृष्ट असा गायत्री जप केला ३. तदनंतर आन्हिक आटोपल्यावर त्या महावीर्यवान् रामलक्ष्मणांनीं अतिशय आनंदित होऊन तपोधन विश्वामित्र ऋषींना अभिवंदन केलें आणि मार्गाचें आक्रमण करण्याकरितां ते त्यांच्या संमुख उभे राहिले ४. नंतर जातां जातां त्या महावीर्यवान् रामलक्ष्मणांना भागीरथीचें दर्शन झालें आणि सरयू व भागीरथी ह्यांच्या पवित्र संगमावर ५ अनेक सहस्र वर्षें उत्कृष्ट तपश्चर्या करीत असलेल्या जितेंद्रिय मुनींचें पुण्य आश्रमस्थान त्यांनीं अवलोकन केलें ६. तो पवित्र आश्रम अवलोकन केल्यावर ते रघुवंशज रामलक्ष्मण अत्यंत संतुष्ट झाले आणि त्या महात्म्या विश्वामित्र मुनींना विचारूं लागले कीं ७ " हे भगवन्, हा पवित्र आश्रम कोणाचा व ह्या आश्रमामध्यें कोण पुरुष वास्तव्य करीत असतो ? हें श्रवण करण्याची आमची इच्छा आहे आणि ह्याविषयीं आह्मांला पराकाष्ठेची उत्कंठा प्राप्त झाली आहे " ८. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ विश्वामित्र किंचित् हास्य करून ह्मणाले " हे रामा, हा प्राचीन आश्रम कोणाचा हें श्रवण कर ९.

तपस्यन्तमिह स्थाणुं नियमेन समाहितम् १० कृतोद्वाहं तु देवेशं गच्छन्तं समरुद्गणम्। धर्षयामास दुर्मेधा हुंकृतश्च महात्मना ११ अवध्यातश्च रुद्रेण चक्षुषा रघुनन्दन। व्यशीर्यन्त शरीरात्स्वात्सर्वगात्राणि दुर्मतेः १२ तत्र गात्रं हतं तस्य निर्दग्धस्य महात्मनः। अशरीरः कृतः कामः क्रोधाद्देवेश्वरेण ह १३ अनङ्ग इति विख्यातस्तदाप्रभृति राघव। सचाङ्गविषयः श्रीमान्यत्राङ्गं स मुमोच ह १४ तस्यायमाश्रमः पुण्यस्तस्येमे मुनयः पुरा। शिष्या धर्मपरा वीर तेषां पापं न विद्यते १५ इहाद्य रजनीं राम वसेम शुभदर्शन। पुण्ययोः सरितोर्मध्ये श्वस्तरिष्यामहे वयम् १६ अभिगच्छामहे सर्वे शुचयः पुण्यमाश्रमम्। इह वासः परोस्माकं सुखं वत्स्यामहे निशाम् १७ स्नाताश्च कृतजप्याश्च हुतहव्या नरोत्तम १८ तेषां संवदतां तत्र तपोदीर्घेण चक्षुषा। विज्ञाय परमप्रीता मुनयो हर्षमागमन् १९ अर्घ्यं पाद्यं तथातिथ्यं निवेद्य कुशिकात्मजे। रामलक्ष्मणयोः

---

ज्ञानी लोक ज्याला काम असें ह्मणतात तो कंदर्प पूर्वी मूर्तिमान् होता. पुढें ह्या आश्रमामध्यें एकाग्र चित्त करून नियमपूर्वक तपश्चर्या करीत असलेले १० देवाधिदेव रुद्र समाधि उतरल्यावर मरुद्गणासहवर्तमान जाऊं लागले असतां दुर्बुद्धि मदनानें मनामध्यें विकार उत्पन्न करून त्या देवाधिदेवाला घेरून टाकिलें. ह्यामुळें त्या महात्म्यानें त्याला हुंकारून टाकून ११, हे रघुनंदना रामा, त्याच्याकडे वक्र दृष्टीनें पाहिलें. तेव्हां त्या दुर्बुद्धि मदनाच्या शरीरापासून त्याचे सर्व अवयव तुकडे तुकडे होऊन खालीं पडले १२. सारांश, क्रोधाग्नीनें दग्ध झालेल्या त्या महात्म्या कामाचें शरीर ह्या आश्रमामध्यें नाहींसें झालें आणि ह्याप्रमाणें देवाधिदेवानें क्रोधामुळें काम शरीररहित केला असतां १३, हे रघुवंशजा रामा, तेव्हांपासून अनंग ह्या नांवानें तो मख्यात झाला व ज्या प्रदेशामध्यें कामानें शरीराचा त्याग केला तो वैभवसंपन्न प्रदेश अंगनामक देश झाला १४. त्या देवाधिदेव शंकराचा हा पवित्र आश्रम असून हे मुनि त्याचे पूर्वीचे धर्मनिष्ठ शिष्य होत. हे वीरा, ह्या मुनींचे ठिकाणीं पाप नाहीं १५. करितां, हे शुभदर्शना रामा, आज रात्रभर आपण ह्या पवित्र नद्यांमध्यें वास्तव्य करूं आणि उद्यां तरून पलीकडे जाऊं १६. अरे, ह्या पुण्य आश्रमाप्रत आपण सर्व शुचिर्भूत होऊन जाऊं. ह्या ठिकाणीं आपलें वास्तव्य उत्तम प्रकारचें होणार आहे. करितां, हे पुरुषोत्तमा स्नान, जप व होम आटोपून आपण ही रात्र ह्या ठिकाणीं सुखानें काढूं १७, १८. ह्याप्रमाणें त्यांचा संवाद चालला असतां तपःसामर्थ्यानें प्राप्त झालेल्या अतींद्रिय ज्ञानाच्या योगानें राम वगैरे आले आहेत असें समजल्यावर अत्यंत संतुष्ट

पश्चादकुर्वन्नतिथिक्रियाम् २० सत्कारं समनुप्राप्य कथाभिरभिरञ्जयन् । तथार्हमजपन्संध्यामृषयस्ते समाहिताः २१ तत्रवासिभिरानीता मुनिभिः सुव्रतैः सह । न्यवसत्स सुखं तत्र कामाश्रमपदे तथा २२ कथाभिरभिरामाभिरभिरामौ नृपात्मजौ । रमयामास धर्मात्मा कौशिको मुनिपुङ्गवः२३ [८११] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥

ततः प्रभाते विमले कृताह्निकमरिंदमौ । विश्वामित्रं पुरस्कृत्य नद्यास्तीरमुपागतौ १ ते च सर्वे महात्मानो मुनयः संशितव्रताः । उपस्थाप्य शुभां नावं विश्वामित्रमथाब्रुवन् २ आरोहतु भवान्नावं राजपुत्रपुरस्कृतः। अरिष्टं गच्छ पन्थानं मा भूत्कालस्य पर्ययः ३ विश्वामित्रस्तथेत्युक्त्वा तानृषीन्प्रतिपूज्य च । ततार सहितस्ताभ्यां सरितं सागरंगमाम् ४ तत्र शुश्राव वै शब्दं तोयसंरम्भवर्धितम् । मध्यमागम्य तोयस्य तस्य शब्दस्य

---

झालेल्या तेथील मुनींना हर्ष झाला १९ आणि लगेच अर्घ्य व पाद्य निवेदन करून आणि त्याचप्रमाणें विश्वामित्र मुनींना भोजन देऊन नंतर त्यांनीं रामलक्ष्मणांचें आदरातिथ्य केलें २०. ह्याप्रमाणें योग्य सत्कार झाल्यावर त्या रामप्रभृतींनीं कथांच्या योगानें त्या आश्रमांतील ऋषींचें चित्तरंजन केलें असतां त्या ऋषींनीं स्वस्थ चित्तानें संध्यावंदन केलें २१ व नंतर ते आश्रमवासी मुनि सदाचरणी ऋषींसहवर्तमान त्या रामादिकांना आश्रमांत घेऊन गेले असतां हवी ती इच्छा परिपूर्ण करणाऱ्या त्या भर्गाश्रमामध्यें ते विश्वामित्रमुनि सुखानें राहिले २२ आणि त्या धर्मात्म्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांनीं मनोहर कथांच्या योगानें त्या सौंदर्यसंपन्न राजकुमारांचें चित्तरंजन केलें २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

नंतर चांगलें उजाडल्यावर स्नानसंध्या अटोपलेल्या विश्वामित्रमुनींना पुढें करून ते शत्रूंचें दमन करणारे रामलक्ष्मण नदीतीरीं गेले १. ते सर्व महात्मे व निर्मल तपश्चर्या करणारे मुनि शुभावह नाव आणवून विश्वामित्रांना ह्मणाले २ " आपण राजकुमारांना पुढें करून ह्या नौकेवर आरूढ व्हा आणि निर्विघ्नपणें मार्गाचें अवलंबन करा. आतां वेळ जाऊं देऊं नका " ३. ह्यावर विश्वामित्रांनीं " ठीक आहे " असें ह्मणून त्या ऋषींना मान दिला आणि त्या रामलक्ष्मणांसहवर्तमान ते समुद्राला जाऊन मिळणाऱ्या गंगानदींतून तरून जाऊं लागले ४. तेव्हां उदकाचे मध्यभागीं आल्यावर जलक्षोभानें वृद्धिंगत झालेला असा एक ध्वनि रामाचे कानीं आला असतां तो ध्वनि

निश्चयम् ५ ज्ञातुकामो महातेजाः सहरामः कनीयसा । अथ रामः सरिन्मध्ये पप्रच्छ मुनिपुङ्गवम् ६ वारिणो भिद्यमानस्य किमयं तुमुलो ध्वनिः । राघवस्य वचः श्रुत्वा कौतूहलसमन्वितम् ७ कथयामास धर्मात्मा तस्य शब्दस्य निश्चयम् । कैलासपर्वते राम मनसा निर्मितं परम् ॥ ब्रह्मणा नरशार्दूल तेनेदं मानसं सरः ८ तस्मात्सुस्राव सरसः सायोध्यामुपगूहते । सरःप्रवृत्ता सरयूः पुण्या ब्रह्मसरश्च्युता ९ तस्यायमतुलः शब्दो जाह्नवीमभिवर्तते । वारिसंक्षोभजो राम प्रणामं नियतः कुरु १० ताभ्यां तु तावुभौ कृत्वा प्रणाममतिधार्मिकौ । तीरं दक्षिणमासाद्य जग्मतुर्लघुविक्रमौ ११ स वनं घोरसंकाशं दृष्ट्वा नरवरात्मजः । अविप्रहतमैक्ष्वाकः पप्रछ मुनिपुङ्गवम् १२ अहो वनमिदं दुर्गं झिल्लिकागणसंयुतम् । भैरवैः श्वापदैः कीर्णं शकुन्तैर्दारुणारवैः १३ नानाप्रकारैः शकुनैर्वाश्यद्भिर्भैरवस्वनैः ।

---

कोणाचा आहे हें निश्चयानें जाणण्याची महातेजस्वी रामाला कनिष्ठभ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान इच्छा झाली ५. तेव्हां, " नावेच्या योगानें दुभंग होत असलेल्या उदकामध्यें हा प्रचंड ध्वनि होत आहे हें काय ? " ६ ह्मणून रामानें मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना प्रश्न केला असतां उत्कंठेनें युक्त असें त्या रघुवंशज रामाचें भाषण श्रवण करून धर्मात्म्या विश्वामित्रमुनींनीं तो शब्द कशाचा हें निश्चयपूर्वक रामाला सांगण्यास आरंभ केला ७. ( ते ह्मणाले )," हे पुरुषश्रेष्ठा रामा, कैलासपर्वतावर ब्रह्मदेवानें मनाच्याच योगानें एक उत्कृष्ट सरोवर निर्माण केलें व तें मनानेंच निर्माण केलें असल्यामुळें मानस ह्याच नांवानें प्रसिद्ध झालें ८. त्या सरोवरापासून जी नदी निघाली ती अयोध्येसमीप वाहत आहे. सारांश, अयोध्येसमीप असलेली नदी सरोवरापासून निघाल्यामुळें ( ह्मणजे ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या सरोवरापासून निघाल्यामुळें ) ती पवित्र नदी सरयू ह्या नांवानें प्रसिद्ध झाली ९. त्या नदीचा हा अतुल ध्वनि जान्हवीच्या ध्वनीशीं संयुक्त होत आहे व तो उदकाच्या क्षोभामुळें होत आहे. हे रामा, तिला तूं शुद्ध मनानें प्रणाम कर " १०. ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींनीं सांगितलें असतां अत्यंत धार्मिक अशा त्या उभयतां रामलक्ष्मणांनीं त्यांना ह्मणजे गंगा आणि सरयू ह्यांना प्रणाम केला आणि दक्षिणतीराला आल्यावर लवकर लवकर पाऊल उचलून ते जाऊं लागले ११. जातां जातां त्या पुरुषश्रेष्ठ दशरथनंदन इक्ष्वाकुवंशज रामानें लोकांचा संचार नसल्यामुळें तुडवलें न गेलेलें आणि दिसण्यांत भयंकर असें वन अवलोकन करून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना प्रश्न केला १२. " कायहो हें गहन वन ! " हें झिल् झिल् शब्द करणाऱ्या कीटकांच्या समुदायांनीं युक्त असून भयंकर श्वापदें ह्यांत

सिंहव्याघ्रवराहैश्च वारणैश्चापि शोभितम् १४ धवाश्वकर्णककुभैर्बिल्वतिन्दुकपाटलैः। संकीर्णं बदरीभिश्च किं न्विदं दारुणं वनम् १५ तमुवाच महातेजा विश्वामित्रो महामुनिः। श्रूयतां वत्स काकुत्स्थ यस्यैतद्दारुणं वनम् १६ एतौ जनपदौ स्फीतौ पूर्वमास्तां नरोत्तम। मलदाश्च करूषाश्च देवनिर्माणनिर्मितौ १७ पुरा वृत्रवधे राम मलेन समभिप्लुतम्। क्षुधा चैव सहस्राक्षं ब्रह्महत्या समाविशत् १८ तमिन्द्रं मलिनं देवा ऋषयश्च तपोधनाः। कलशैः स्नापयामासुर्मलं चास्य प्रमोचयन् १९ इह भूम्यां मलं दत्वा देवाः कारूषमेव च। शरीरजं महेन्द्रस्य ततो हर्षं प्रपेदिरे २० निर्मलो निष्करूषश्च शुद्ध इन्द्रो यथाभवत्। ततो देशस्य सुप्रीतो वरं प्रादादनुत्तमम् २१ इमौ जनपदौ स्फीतौ ख्यातिं लोके गमिष्यतः। मलदाश्च करूषाश्च ममाङ्गमलधारिणौ २२ साधु साध्विति तं देवाः पाकशासनमब्रुवन्। देशस्य पूजां तां दृष्ट्वा कृतां शक्रेण धीमता २३ एतौ जन-

---

जिकडें तिकडें पसरलेलीं आहेत, त्याचप्रमाणें दारुण शब्द करणारे मांसपक्षी १३, स्वभावतःच भयंकर शब्दानें युक्त आणि त्यांतूनही अति भयंकर शब्द करणारे असे नानाप्रकारचे इतर पक्षी आणि तसेच सिंह, व्याघ्र, वराह व गज ह्यांच्या योगानें तें सुशोभित असून १४, धव, अश्वकर्ण, ककुभ, बिल्व, तिंदुक, पाटल आणि बदरी ह्या वृक्षांनीं तें गजबजलेलें आहे. खरोखर हें वन इतकें भयंकर होण्याचें कायहो कारण असावें ? " १५. ह्याप्रमाणें रामानें प्रश्न केला असतां महातेजस्वी विश्वामित्र महामुनि त्याला ह्मणाले, " वत्सा ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, हें भयंकर वन कोणाचें तें ऐक १६. हे पुरुषश्रेष्ठा, मलद आणि करूष असे हे देवांच्या यत्नानें निर्माण झालेले दोन देश पूर्वी मोठें समृद्ध होते १७. हे रामा, पूर्वी वृत्रासुरवधसमयीं अशुद्ध आचरण आणि क्षुधा ह्यांनीं इंद्र व्याप्त झाल्यामुळें ब्रह्महत्या त्याच्या मागें लागली १८. तेव्हां त्या मलिन इंद्राला देव आणि तपोधनऋषि ह्यांनीं ( गंगाजलानें भरलेल्या ) कलशांच्या योगानें स्नान घालून त्याचा मल काढून टाकिला १९. सारांश, ह्या भूमीचे ठिकाणीं देवांनीं महेंद्राच्या शरीरांतील मल व त्याचा बुभुक्षितपणा टाकून दिला; तेव्हां त्यांना आनंद झाला २०, आणि मल व बुभुक्षितपणा ह्यांनीं इंद्र रहित झाल्यामुळें पूर्वीप्रमाणें शुद्ध झाला. तदनंतर इंद्र त्या प्रदेशावर फारच संतुष्ट झाला आणि " माझ्या शरीराचा मल व माझी क्षुधा धारण करणारे हे प्रदेश मलद व करूष ह्या नांवानें प्रसिद्ध होऊन नेहमीं समृद्ध होतील आणि पृथ्वीमध्यें ह्यांची मोठी ख्याति होईल. " असा त्यानें अत्युत्कृष्ट वर दिला २१, २२. तेव्हां विचारी इंद्रानें केलेला तो देशाचा संमान

पदौ स्फीतौ दीर्घकालमरिंदम । मलदाश्च करूषाश्च मुदिता धनधान्यतः २४ कस्यचित्त्वथ कालस्य यक्षिणी कामरूपिणी । बलं नागसहस्रस्य धारयन्ती तदा ह्यभूत् २५ ताटका नाम भद्रं ते भार्या सुन्दस्य धीमतः । मारीचो राक्षसः पुत्रो यस्याः शक्रपराक्रमः २६ वृत्तबाहुर्महाशीर्षो विपुलास्यतनुर्महान् । राक्षसो भैरवाकारो नित्यं त्रासयते प्रजाः २७ इमौ जनपदौ नित्यं विनाशयति राघव । मलदांश्च करूषांश्च ताटका दुष्टचारिणी २८ सेयं पन्थानमावृत्य वसत्यत्यर्धयोजने । अत एव च गन्तव्यं ताटकाया वनं यतः २९ स्वबाहुबलमाश्रित्य जहीमां दुष्टचारिणीम् । मन्नियोगादिमं देशं कुरु निष्कण्टकं पुनः ३० न हि कश्चिदिमं देशं शक्तो ह्यागन्तुमीदृशम् । यक्षिण्या घोरया राम उत्सादितमसह्यया ३१ एतत्ते सर्वमाख्यातं यथैतद्दारुणं वनम् । यक्ष्या चोत्सादितं सर्वमद्यापि न निवर्तते ३२ [ ८४३ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥ २४ ॥

---

अवलोकन केल्यावर " उत्तम उत्तम " ह्मणून देवांनीं इंद्राला अनुमोदन दिलें २३. सारांश, हे शत्रुदमना रामा, हे समृद्ध देश मलद व करूष पुष्कळ काळ लोटेपर्यंत धनधान्यांनीं संपन्न होते २४. पुढें कांहीं काल लोटल्यानंतर स्वेच्छेप्रमाणें रूप धारण करणारी एक यक्षिणी उत्पन्न झाली. हे रामा, तुझें कल्याण असो. ती यक्षिणी सहस्र गजांचें बल धारण करणारी असून २५ सुंदाची भार्या आहे व तिचें नांव ताटका असें असून इंद्रतुल्यपराक्रमी मारीचनामक राक्षस तिचा पुत्र आहे २६. त्या धिप्पाड राक्षसाचे बाहु गरगरीत असून मस्तक, मुख व शरीर हीं प्रचंड आहेत आणि त्याची मुद्राही भयंकर असून तो राक्षस प्रजाजनांना नित्य त्रास देत आहे २७. हे रघुवंशजा रामा, दुराचरण करणारी ती ताटका ह्या मलद व करूष देशांची नेहमीं नासधूस करीत असते २८, आणि ती ही मार्ग अडवून धरून अर्धयोजनापेक्षां जास्त प्रदेशावर वास्तव्य करीत आहे. करितां, ज्याअर्थीं आपणांला ताटकेच्या वनामध्यें जावयाचेंच आहे २९, त्याअर्थीं आपल्या बाहुबलाचें अवलंबन करून तूं ह्या दुराचारिणीचा माझ्या आज्ञेनें वध कर आणि पुनरपि हा प्रदेश निष्कंटक करून सोड ३०, कारण, हे रामा, असह्य अशा घोर यक्षिणीनें उच्छिन्न करून टाकिलेल्या ह्या अशा प्रकारच्या प्रदेशामध्यें कोणीही येण्यास समर्थ नाहीं ३१. असो. हें वन दारुण कसें झालें हें सर्व मीं तुला सांगितलें. यक्षिणीनें हें जें सर्व उध्वस्त करून टाकिलें आहे तें अद्यापही पूर्वस्थितीवर येत नाहीं ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

अथ तस्याप्रमेयस्य मुनेर्वचनमुत्तमम् । श्रुत्वा पुरुषशार्दूलः प्रत्युवाच शुभां गिरम् १ अल्पवीर्या यदा यक्षी श्रूयते मुनिपुङ्गव । कथं नागसहस्रस्य धारयत्यबला बलम् २ इत्युक्तं वचनं श्रुत्वा राघवस्यामितौजसः । हर्षयञ्छ्लक्ष्णया वाचा सलक्ष्मणमरिंदमम् ३ विश्वामित्रोऽब्रवीद्वाक्यं शृणु येन बलोत्कटा । वरदानकृतं वीर्यं धारयत्यबला बलम् ४ पूर्वमासीन्महायक्षः सुकेतुर्नाम वीर्यवान् । अनपत्यः शुभाचारः स च तेपे महत्तपः ५ पितामहस्तु सुप्रीतस्तस्य यक्षपतेस्तदा । कन्यारत्नं ददौ राम ताटकां नाम नामतः ६ ददौ नागसहस्रस्य बलं चास्याः पितामहः । न त्वेव पुत्रं यक्षाय ददौ चासौ महायशाः ७ तां तु बालां विवर्धन्तीं रूपयौवनशालिनीम् । जम्भपुत्राय सुन्दाय ददौ भार्यां यशस्विनीम् ८ कस्यचित्त्वथ कालस्य यक्षी पुत्रं व्यजायत । मारीचं नाम दुर्धर्षं यः शापाद्राक्षसोऽभवत् ९ सुन्दे तु निहते राम अगस्त्यमृषिसत्तमम् । ताटका सह पुत्रेण प्रधर्षयितुमिच्छति १० भक्षार्थं जातसंरम्भा गर्जन्ती साभ्यधावत । आपतन्तीं तु तां

---

ज्यांचा प्रभाव अतर्क्य आहे अशा त्या विश्वामित्र मुनींचें उत्कृष्ट भाषण श्रवण करून पुरुषश्रेष्ठ राम शुभ वाणीनें त्यांना पुनरपि विचारूं लागला १ कीं, " हे मुनिश्रेष्ठा, पुराणादिकांमध्यें यक्षजाति वीर्यानें अल्प असल्याचें श्रुत आहे. तेव्हां त्या जातींतील अबला सहस्र गजांचें बल कसें धारण करीत आहे ? " २. ह्याप्रमाणें अपरिमित-सामर्थ्यवान् रघुवंशज रामानें प्रश्न केला असतां मधुर वाणीनें लक्ष्मणासहवर्तमान त्या शत्रुदमन रामाला आनंदित करीत करीत ३ विश्वामित्र ह्मणाले " ती यक्षिणी बलाढ्य कशी झाली तें ऐक. ही अबला वरप्रदानामुळें असलें बल व वीर्य धारण करीत आहे ४. पूर्वी सुकेतु ह्मणून एक मोठा यक्ष होऊन गेला; तो वीर्यवान् असतानांही त्याला अपत्य नव्हतें. पुढें त्या सदाचरणसंपन्न यक्षानें अपत्यप्राप्तीकरितां मोठी तपश्चर्या केली ५. तेव्हां, ब्रह्मदेवानें अतिशय संतुष्ट होऊन त्या यक्षाधिपतीला, हे रामा, नांवानें ताटका ह्मणून प्रसिद्ध असलेलें एक कन्यारत्न दिलें ६ आणि ह्या कन्येला ब्रह्मदेवानें सहस्र गजांचें बल दिलें; परंतु, त्या महाकीर्तिमान् ब्रह्मदेवानें पुत्र तर यक्षाला दिलाच नाहीं ७. ती बाला वाढीस लागून सौंदर्य व यौवन ह्यांनीं शोभूं लागली असतां जंभपुत्र सुंदाला त्या यक्षानें ती यशस्विनी भार्या ( करून ) दिली ८. ह्या गोष्टीला कांहीं दिवस लोटल्यानंतर त्या ताटकानामक यक्षिणीला अजिंक्य असा एक मारीचनामक पुत्र झाला व तो पुढें शापामुळें राक्षस बनला ९. हे रामा, ( अगस्त्य मुनींनीं )शाप दिल्यामुळें सुंदाचा वध झाल्यावर ती ताटका ऋषिश्रेष्ठ अगस्त्य मुनींना

दृष्ट्वा अगस्त्यो भगवानृषिः ११ राक्षसत्वं भजस्वेति मारीचं व्याजहार सः। अगस्त्यः परमामर्षस्ताटकामपि शप्तवान् १२ पुरुषादी महायक्षी विकृता विकृतानना। इदं रूपं विहायाशु दारुणं रूपमस्तु ते १३ सैषा शापकृतामर्षा ताटका क्रोधमूर्च्छिता। देशमुत्सादयत्येनमगस्त्याचरितं शुभम् १४ एनां राघव दुर्वृत्तां यक्षीं परमदारुणाम्। गोब्राह्मणहितार्थाय जहि दुष्टपराक्रमाम् १५ न ह्येनां शापसंसृष्टां कश्चिदुत्सहते पुमान्। निहन्तुं त्रिषु लोकेषु त्वामृते रघुनन्दन १६ न हि ते स्त्रीवधकृते घृणा कार्या नरोत्तम। चातुर्वर्ण्यहितार्थं हि कर्तव्यं राजसूनुना १७ नृशंसमनृशंसं वा प्रजारक्षणकारणात्। पातकं वा सदोषं वा कर्तव्यं रक्षता सदा १८ राज्यभारनियुक्तानामेष धर्मः सनातनः। अधर्म्यां जहि काकुत्स्थ धर्मो ह्यस्यां न विद्यते १९ श्रूयते हि पुरा शक्रो विरोचन-

---

धेरण्याची पुत्रासहवर्तमान इच्छा करूं लागली १० आणि क्रुद्ध होऊन गर्जना करीत करीत त्यांना भक्षण करण्याच्या उद्देशानें त्यांच्याकडे धांवली. तेव्हां ती पुत्रासहवर्तमान आपल्याकडे चाल करून येत आहे असें पाहून भगवान् अगस्त्य ऋषींनीं ११ " राक्षस हो " ह्मणून तिच्या मारीचनामक पुत्राला शाप दिला. इतकेंच नव्हे परंतु, त्या अत्यंत क्रुद्ध झालेल्या अगस्त्य मुनींनीं " हें तुझें रूप नाहींसें होऊन तुला सत्वर घोररूप प्राप्त होईल १२ आणि तूं महायक्षिणी शरीरानें व चेहऱ्यानें अक्राळविक्राळ होऊन माणसांना खाणारी ( राक्षसी ) होशील " असा त्या ताटकेलाही शाप दिला १३. ती ही शापामुळें क्रुद्ध झालेली राक्षसी क्रोधाच्या अगदीं अधीन झाली आहे आणि अगस्त्यमुनींचा संचार असलेला हा पवित्र देश उध्वस्त करीत आहे १४. ह्यास्तव, हे रघुवंशज रामा, अत्यंत भयंकर, दुराचारिणी आणि अनर्थावह पराक्रमानें युक्त अशा ह्या यक्षिणीचा गोब्राह्मणांच्या हितांकरितां तूं वध कर १५. हे रघुनंदना, शापग्रस्त झालेल्या ह्या ताटकेचा वध करण्यास त्रैलोक्यामध्यें तुझ्यावांचून इतर कोणत्याही पुरुषाचें सामर्थ्य नाहीं १६. हे पुरुषश्रेष्ठा, स्त्रीवध करावा लागत आहे ह्मणून तूं मनामध्यें दया आणूं नकोस. कारण, चारी वर्णांचें हित करण्याकरितां आणि प्रजारक्षण करण्याकरितां जें कांहीं करणें अवश्य असेल तें बरें असो, वाईट असो, पातकावह असो किंवा सदोष असो राजपुत्रानें केलेंच पाहिजे १७, १८. कारण, राज्यभार ज्यांच्यावर सोंपविलेला आहे त्यांचा हा सनातन धर्मच आहे. करितां, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, ह्या अधर्मनिष्ठ ताटकेचा वध कर. हिचे ठिकाणीं धर्म कसला तो मुळींच नाहीं १९. हे राजपुत्रा, पूर्वीं विरोचन दैत्याची कन्या मंथरा

सुतां नृप । पृथिवीं हन्तुमिच्छन्तीं मन्थरामभ्यसूदयत् २० विष्णुना च पुरा राम भृगुपत्नी पतिव्रता । अनिंद्रं लोकमिच्छन्ती काव्यमाता निषूदिता २१ एतैश्चान्यैश्च बहुभी राजपुत्रैर्महात्मभिः । अधर्मसहिता नार्यो हताः पुरुषसत्तमैः २२ तस्मादेनां घृणां त्यक्त्वा जहि मच्छासनान्नृप २३ [ ८६६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चविंशः सर्गः ॥ २५ ॥

मुनेर्वचनमक्लीबं श्रुत्वा नरवरात्मजः । राघवः प्राञ्जलिर्भूत्वा प्रत्युवाच दृढव्रतः १ पितुर्वचननिर्देशात्पितुर्वचनगौरवात् । वचनं कौशिकस्येति कर्तव्यमविशङ्कया २ अनुशिष्टोस्म्ययोध्यायां गुरुमध्ये महात्मना । पित्रा दशरथेनाहं नावज्ञेयं हि तद्वचः ३ सोहं पितुर्वचः श्रुत्वा शासनाद्ब्रह्मवादिनः । करिष्यामि न संदेहस्ताटकावधमुत्तमम् ४ गोब्राह्मणहितार्थाय देशस्य च हिताय च । तव चैवाप्रमेयस्य वचनं कर्तुमुद्यतः ५ एवमुक्त्वा धनुर्मध्ये बद्ध्वा मुष्टिमरिंदमः । ज्याघोषमकरोत्तीव्रं दिशः शब्देन नादयन् ६

---

पृथ्वीचा घात करण्याची इच्छा करूं लागली असतां इंद्रानें तिचा वध केल्याचें श्रुत आहे २०, आणि त्याचप्रमाणें, हे रामा, इंद्रशून्य स्वर्गलोक करण्याची इच्छा करणारी जी भृगुपत्नी व शुक्रमाता तिचा विष्णूनें वध केल्याचेंही ऐकण्यांत आहे २१. सारांश, ह्यांनीं आणि इतरही महात्म्या अनेक पुरुषश्रेष्ठ राजपुत्रांनीं अधर्मनिष्ठ स्त्रियांचा वध केला आहे २२. तस्मात्, हे राजपुत्रा, तूं दया सोडून देऊन माझ्या आज्ञेनें हिचा वध कर २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५ ॥

ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींचें शौर्ययुक्त भाषण श्रवण करून निर्मल आचरणानें युक्त असा जो पुरुषश्रेष्ठ दशरथपुत्र रघुवंशज राम तो हात जोडून ह्मणाला १ " विश्वामित्र मुनींची आज्ञा कांहीं एक शंका न घेतां पाळावी " अशी पित्याची प्रत्यक्ष आज्ञा झाली आहे २, आणि पित्याचें वचन मला अत्यंत प्रमाणभूत आहे. अहो, " विश्वामित्र मुनींच्या भाषणाची अवज्ञा करूं नको " अशी महात्म्या पित्या दशरथानें अयोध्येंत असतांना ( वसिष्ठवामदेवप्रभृति ) गुरूमध्यें मला आज्ञा केली आहे ३. तेव्हां, मी पित्याची आज्ञा शिरसा मान्य करून ब्रह्मवेत्त्याच्या आज्ञेनें उत्कृष्ट धर्माला कारणीभूत होणारा ताटकेचा वध मनामध्यें कांहींएक संदेह न आणितां करीन ४. तात्पर्य, गोब्राह्मणांच्या हिताकरितां आणि देशाच्या कल्याणाकरितां अतर्क्य प्रभावानें युक्त जे आपण त्यांच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास मी तयार आहें " ५. असें बोलून

तेन शब्देन वित्रस्तास्ताटकावनवासिनः । ताटका च सुसंक्रुद्धा तेन शब्देन मोहिता ७ तं शब्दमभिनिध्याय राक्षसी क्रोधमूर्च्छिता । श्रुत्वा चाभ्यद्रवत्क्रुद्धा यत्र शब्दो विनिःसृतः ८ तां दृष्ट्वा राघवः क्रुद्धां विकृतां विकृताननाम् । प्रमाणेनातिवृद्धां च लक्ष्मणं सोऽभ्यभाषत ९ पश्य लक्ष्मण यक्षिण्या भैरवं दारुणं वपुः । भिद्येरन्दर्शनादस्या भीरूणां हृदयानि च १० एनां पश्य दुराधर्षां मायाबलसमन्विताम् । विनिवृत्तां करोम्यद्य हृतकर्णाग्रनासिकाम् ११ न ह्येनामुत्सहे हन्तुं स्त्रीस्वभावेन रक्षिताम् । वीर्यं चास्या गतिं चैव हन्यामिति हि मे मतिः १२ एवं ब्रुवाणे रामे तु ताटकाक्रोधमूर्च्छिता । उद्यम्य बाहुं गर्जन्ती राममेवाभ्यधावत १३ विश्वामित्रस्तु ब्रह्मर्षिर्हुंकारेणाभिभर्त्स्य ताम् । स्वस्ति राघवयोरस्तु जयं चैवाभ्यभाषत १४ उद्धुन्वाना रजो घोरं ताटका राघवावुभौ । रजोमेघेन महता मुहूर्तं सा व्यमोहयत् १५ ततो मायां समास्थाय शिला-

---

शत्रुदमन रामानें धनुष्याच्या मध्यभागीं मूठ वळून ध्वनीनें दशदिशा नादित करीत करीत प्रत्यंचेचा प्रचंड टणत्कार केला ६. त्या टणत्कारानें ताटकेच्या वनांत राहणारे सर्व प्राणी कावरेबावरे झाले आणि त्या शब्दानें व्याकुल होऊन ताटकाही अतिशयच क्रुद्ध झाली ७. तो ध्वनि श्रवण करितांक्षणीं ती क्रुद्ध राक्षसी क्रोधानें अगदीं व्याप्त झाली आणि जिकडून तो ध्वनि आला होता त्या प्रदेशाला अनुलक्षून ती धांवत चालली ८. तेव्हां, शरीरानें व चेहेऱ्यानेंही अक्राळविक्राळ असून प्रमाणानें फारच प्रचंड असलेल्या त्या क्रुद्ध राक्षसीला अवलोकन करून तो रघुवंशज राम लक्ष्मणाला ह्मणाला ९ "हे लक्ष्मणा, ह्या यक्षिणीचें भयंकर आणि घोर असें रूप अवलोकन कर. अरे, हिला पाहून भित्र्या लोकांचीं तर असूंदेच, परंतु शूरांचींही हृदयें फुटून जातील १०. अरे, पहा. मायाबलानें युक्त आणि ह्मणूनच जिंकण्याला अशक्य अशा ह्या यक्षिणीचे कान व नाक कापून घेऊन मी हिला आज परावृत्त करितों ११. स्त्रीस्वभावानें ही रक्षित असल्यामुळें ( अर्थात् स्त्रियांचा वध करणें उचित नाहीं ह्मणून ही स्त्रीजाति ह्या दृष्टीनेंच वधापासून सुरक्षित असल्यामुळें ) मला हिचा वध करावा, असें वाटत नाहीं. करितां, हिचें सामर्थ्य आणि गति ह्यांचा नाश करावा असा माझा विचार आहे" १२. ह्याप्रमाणें राम बोलूं लागला असतां ताटका क्रोधानें अगदीं व्याप्त झाली आणि गर्जना करीत करीत हात उगारून थेट रामाकडेच धांवली १३. तेव्हां, विश्वामित्र ब्रह्मर्षींनीं हुंकारानें तिची निर्भर्त्सना करून "रघुवंशजांचा जय असो व ह्यांचें कल्याण होवो" असें ह्मटलें १४. इतक्यांत भयजनक अशी धूळ उडवीत

वर्षेण राघवौ । अवाकिरत्सुमहता ततश्चुक्रोध राघवः १६ शिलावर्षं महत्तस्याः शरवर्षेण राघवः । प्रतिवार्योपधावन्त्याः करौ चिच्छेद पत्रिभिः १७ ततश्छिन्नभुजां श्रान्तामभ्याशे परिगर्जतीम् । सौमित्रिरकरोत्क्रोधाद्धृतकर्णाग्रनासिकाम् १८ कामरूपधरा सा तु कृत्वा रूपाण्यनेकशः । अन्तर्धानं गता यक्षी मोहयन्ती स्वमायया ॥ अश्मवर्षं विमुञ्चन्ती भैरवं विचचार सा १९ ततस्तावश्मवर्षेण कीर्यमाणौ समन्ततः । दृष्ट्वा गाधिसुतः श्रीमानिदं वचनमब्रवीत् २० अलं ते घृणया राम पापैषा दुष्टचारिणी । यज्ञविघ्नकरी यक्षी पुरा वर्धेत मायया २१ वध्यतां तावदेवैषा पुरा संध्या प्रवर्तते । रक्षांसि संध्याकाले तु दुर्धर्षाणि भवन्ति हि २२ इत्युक्तः स तु तां यक्षीमश्मवृष्ट्याभिवर्षिणीम् । दर्शयञ्छब्दवेधित्वं तां रुरोध स सायकैः २३ सा रुद्धा बाणजालेन मायाबलसमन्विता । अभि-

---

उडवीत ती ताटका उभयतां रघुवंशजांकडे चालली, आणि धूलिपटलरूप प्रचंड मेघांच्या योगानें क्षणभर तिनें त्या रामलक्ष्मणांना अगदीं गोंधळून टाकिलें १५. तदनंतर मायेचें अवलंबन करून फारच मोठ्या पाषाणवर्षावानें तिनें त्या उभयतांना भरून काढिलें असतां रघुवंशज राम क्रुद्ध झाला १६. नंतर मोठ्या बाणवृष्टीच्या योगानें रामानें तिच्या पाषाणवृष्टीचें निवारण केलें आणि ती आपणाकडे धावून येऊं लागली असतां बाणांच्या योगानें तिचे हातही तोडून टाकिले १७. तेव्हां ती हाततुटकी ताटका थकून जाऊन लक्ष्मणासमीप गर्जना करूं लागली असतां सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रागारागानें तिचे कान व नाक कापून काढिलें १८. तदनंतर इच्छेप्रमाणें रूप धारण करण्यास समर्थ असलेली ती यक्षिणी नानाप्रकारचीं रूपें धारण करून अदृश्य झाली आणि आपल्या मायेनें रामलक्ष्मणांना मोह पाडण्याचा विचार करूं लागली. इतकेंच नव्हे परंतु, भयंकर पाषाणवृष्टि करीत करीत ती संचारही करूं लागली. १९. तेव्हां पाषाणवृष्टीनें रामलक्ष्मण सर्व बाजूंनीं भरून जात आहेत असें अवलोकन करून वैभवशाली गाधिपुत्र विश्वामित्र मुनि ह्मणाले २० "हे रामा, आतां तुझी दया पुरे. दुराचारिणी व पापी अशी ही यज्ञविघ्न करणारी यक्षिणी मायेनें प्रबळ झाली नाहीं २१ तोंच ह्मणजे संध्यासमय झाला नाहीं तोंच हिचा वध केला पाहिजे. कारण, संध्यासमय झाला असतां राक्षस जिंकण्याला फार अवघड जातात" २२. ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींनीं सांगितलें असतां शब्दवेधित्व दर्शविणाऱ्या त्या रामानें पाषाणवृष्टीनें वर्षाव करणाऱ्या त्या यक्षिणीला बाणांनीं जखडून टाकिलें २३. तेव्हां, बाणसमुदायानें जखडून गेलेली व मायाबलानें युक्त असलेली ती यक्षिणी आपलें रूप

दुद्राव काकुत्स्थं लक्ष्मणं च विनदुषी २४ तामापतन्तीं वेगेन विक्रान्ता-मशनीमिव । शरेणोरसि विव्याध पपात च ममार च २५ तां हतां भीम-संकाशां दृष्ट्वा सुरपतिस्तदा । साधु साध्विति काकुत्स्थं सुराश्चाप्यभि-पूजयन् २६ उवाच परमप्रीतः सहस्राक्षः पुरंदरः । सुराश्च सर्वे संहृष्टा विश्वामित्रमथाब्रुवन् २७ मुने कौशिक भद्रं ते सेन्द्राः सर्वे मरुद्गणाः । तोषिताः कर्मणानेन स्नेहं दर्शय राघवे २८ प्रजापतेः कृशाश्वस्य पुत्रा-न्सत्यपराक्रमान् । तपोबलभृतो ब्रह्मन्राघवाय निवेदय २९ पात्रभूतश्च ते ब्रह्मंस्तवानुगमने रतः । कर्तव्यं सुमहत्कर्म सुराणां राजसूनुना ३० एवमुक्त्वा सुराः सर्वे जग्मुर्हृष्टा विहायसम् । विश्वामित्रं पूजयन्तस्ततः सन्ध्या प्रवर्तते ३१ ततो मुनिवरः प्रीतस्ताटकावधतोषितः । मूर्ध्नि राम-मुपाघ्राय इदं वचनमब्रवीत् ३२ इहाद्य रजनीं राम वसाम शुभदर्शन । श्वःप्रभाते गमिष्यामस्तदाश्रमपदं मम ३३ विश्वामित्रवचः श्रुत्वा हृष्टो

प्रकट करून गर्जना करीत करीत ककुत्स्थकुलोत्पन्न राम आणि लक्ष्मण ह्यांच्या अंगावर धांवून जाऊं लागली २४. तेव्हां विद्युल्लतेप्रमाणें वेगावेगानें ती पराक्रमी यक्षिणी चाल करून येत आहे तोंच रामानें तिच्या वक्षस्थलावर बाण मारिला व ती बाणानें विद्ध होतांक्षणीं भूमीवर पडून मरण पावली २५. ह्याप्रमाणें त्या उग्ररूपी राक्षिणीचा वध झाल्याचें अवलोकन करून इंद्र व इतर देव "उत्तम उत्तम" ह्मणून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची प्रशंसा करूं लागले २६. नंतर अत्यंत प्रसन्न झालेला असा सहस्राक्ष इंद्र आणि आनंदित झालेले सर्व देव विश्वामित्रमुनींना ह्मणाले २७ "हे कौशिकमुने, तुझें कल्याण असो. सर्व देवगण इंद्रासहवर्तमान तुझ्या ह्या कृत्यानें संतुष्ट झाले आहेत. तूं आतां रघुकुलोत्पन्न रामाचे ठिकाणीं खराखरा स्नेह दाखीव २८. हे ब्रह्मन्, प्रजापति कृशाश्वाचे तपःसामर्थ्यानें युक्त असलेले अमोघपराक्रमी पुत्र तूं रघु-वंशज रामाला अर्पण कर २९. हे ब्रह्मन्, तुझी शुश्रूषा करण्याविषयीं तत्पर असलेला राम तुझ्या दानाला पात्र आहे आणि त्या राजकुमाराला देवांचें फारच मोठें कार्य कर्तव्य आहे" ३०. ह्याप्रमाणें विश्वामित्रांना सांगून त्यांची प्रशंसा करीत करीत सर्व देव आकाश मार्गानें चालते झाले व इतक्यांत संध्यासमयही प्राप्त झाला ३१. देव गेल्यानंतर ताटकेच्या वधानें संतुष्ट व प्रसन्न झालेले मुनिश्रेष्ठ विश्वामित्र रामाचे मस्तकीं अवघ्राण करून ह्मणाले ३२ "हे शुभदर्शना रामा, आजची रात्र आपण येथेंच काढूं आणि उद्यां उजाडल्यावर त्या माझ्या आश्रमाला जाऊं" ३३. ह्याप्र-माणें विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण करून दशरथपुत्र राम आनंदित झाला आणि

दशरथात्मजः । उवास रजनीं तत्र ताटकाया वने सुखम् ३४ मुक्तशापं वनं तच्च तस्मिन्नेव तदाहनि । रमणीयं विबभ्राज यथा चैत्ररथं वनम् ३५ निहत्य तां यक्षसुतां स रामः प्रशस्यमानः सुरसिद्धसंघैः । उवास तस्मिन्मुनिना सहैव प्रभातवेलां प्रतिबोध्यमानः ३६ [९०२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

अथ तां रजनीमुष्य विश्वामित्रो महायशाः । प्रहस्य राघवं वाक्यमुवाच मधुरस्वरम् १ परितुष्टोस्मि भद्रं ते राजपुत्र महायशः । प्रीत्या परमया युक्तो ददाम्यस्त्राणि सर्वशः २ देवासुरगणान्वापि सगन्धर्वोरगान्भुवि । यैरमित्रान्प्रसह्याजौ वशीकृत्य जयिष्यसि ३ तानि दिव्यानि भद्रं ते ददाम्यस्त्राणि सर्वशः । दण्डचक्रं महद्दिव्यं तव दास्यामि राघव ४ धर्मचक्रं ततो वीर कालचक्रं तथैव च । विष्णुचक्रं तथात्युग्रमैन्द्रं चक्रं तथैव च ५ वज्रमस्त्रं नरश्रेष्ठ शैवं शूलवरं तथा । अस्त्रं ब्रह्मशिरश्चैव ऐषीकमपि राघव ६ ददामि ते महाबाहो ब्राह्ममस्त्रमनुत्तमम् । गदे द्वे चैव काकुत्स्थ

ती रात्र त्या ताटकेच्या वनामध्यें त्यानें सुखानें घालविली ३४. तेव्हां, शापमुक्त झालेलें तें वन इंद्राच्या चैत्ररथवनाप्रमाणें रमणीय होऊन त्याचदिवशीं शोभूं लागलें ३५. सारांश, त्या ताटकानामक यक्षकन्येचा रामानें वध केला असतां देवगण आणि सिद्धसमुदाय त्याची प्रशंसा करूं लागले आणि प्रभातसमय प्राप्त झाला असतां विश्वामित्रमुनि ज्याला जागा करीत असत तो राम त्या वनामध्यें त्या मुनीसहवर्तमान राहिला ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

त्या रात्रीं त्या ठिकाणीं वास्तव्य केल्यानंतर महाकीर्तिमान विश्वामित्रमुनि हास्यपूर्वक मधुर स्वरानें युक्त असें भाषण रघुवंशज रामाशीं करूं लागले कीं १, " हे महायशस्वी राजपुत्रा, तुझें कल्याण असो; मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें आणि अत्यंत प्रसन्न होऊन तुला मी सर्व अस्त्रें देत आहें २. त्या अस्त्रांच्या साहाय्यानें तूं पृथ्वीवरील गंधर्व आणि उरग ह्यांसहवर्तमान शत्रुभूत देवदैत्यगणांना संग्रामामध्यें जेरीस आणून जिंकिशील ३. हे रघुवंशजा रामा, तुझें कल्याण असो. मी तीं सर्व दिव्य अस्त्रें व त्याचप्रमाणें दिव्य असें मोठें दंडचक्र तुला देईन ४. तसेंच, हे वीरा, धर्मचक्र, कालचक्र, विष्णुचक्र आणि अत्यंत उग्र असें इंद्रचक्र मी तुला देईन ५. हे पुरुषश्रेष्ठा रघुवंशजा रामा, वज्रास्त्र, शैवास्त्र, शूलवतनामक अस्त्र, ब्रह्मशिरोनामक अस्त्र आणि ऐषीकास्त्र मी तुला देईन ६. हे महापराक्रमी रामा, अनुपम असें ब्रह्मास्त्र मी तुला

मोदकी शिखरी शुभे ७ प्रदीप्ते नरशार्दूल प्रयच्छामि नृपात्मज । धर्मपाशमहं राम कालपाशं तथैव च ८ वारुणं पाशमस्त्रं च ददाम्यहमनुत्तमम् । अशनी द्वे प्रयच्छामि शुष्कार्द्रे रघुनन्दन ९ ददामि चास्त्रं पैनाकमस्त्रं नारायणं तथा । आग्नेयमस्त्रं दयितं शिखरं नाम नामतः १० वायव्यं प्रथमं नाम ददामि तव चानघ । अस्त्रं हयशिरो नाम क्रौञ्चमस्त्रं तथैव च ११ शक्तिद्वयं च काकुत्स्थ ददामि तव राघव । कङ्कालं मुसलं घोरं कापालमथ किङ्किणीम् १२ वधार्थं रक्षसां यानि ददाम्येतानि सर्वशः । वैद्याधरं महास्त्रं च नन्दनं नाम नामतः १३ असिरत्नं महाबाहो ददामि नृवरात्मज । गान्धर्वमस्त्रं दयितं मोहनं नाम नामतः १४ प्रस्वापनं प्रशमनं दद्मि सौम्यं च राघव । वर्षणं शोषणं चैव संतापनविलापने १५ मादनं चैव दुर्धर्षं कन्दर्पदयितं तथा । गान्धर्वमस्त्रं दयितं मानवं नाम नामतः १६ पैशाचमस्त्रं दयितं मोहनं नाम नामतः । प्रतीच्छ नरशार्दूल राजपुत्र महायशः १७ तामसं नरशार्दूल सौमनं च महाबलम् । संवर्तं चैव दुर्धर्षं मौसलं च नृपात्मज १८ सत्यमस्त्रं महाबाहो तथा

---

देईन आणि त्याचप्रमाणें हे कुकुत्स्थकुलोत्पन्ना, मोदकी आणि शिखरी ह्या दोन उज्ज्वल गदा व हे पुरुषश्रेष्ठा राजपुत्रा रामा, धर्मपाश आणि कालपाश मी तुला देईन ७,८. हे रघुनंदना, वारुण पाश हें अनुपम अस्त्र आणि शुष्क व आर्द्र अशीं दोन अशनीसंज्ञक अस्त्रें मी तुला देईन ९. पैनाकास्त्र, नारायणास्त्र, अग्नीला प्रिय आणि शिखर ह्या नांवानें प्रसिद्ध असें आग्नेयास्त्र १० व मुख्य वायव्यास्त्र, हे निष्पापा, मी तुला देईन. हयशिरोनामक अस्त्र, क्रौंचास्त्र, ११ आणि, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना राघवा, दोन शक्ति मी तुला देईन. कंकाल, मुसल, उग्र असें कापाल, किंकिणी १२ इत्यादि राक्षसांचा वध करण्यास समर्थ असलेलीं हीं सर्व अस्त्रें मी तुला देईन. नंदन ह्या नांवानें प्रसिद्ध असलेलें मोठें वैद्याधरास्त्र १३, हे महापराक्रमी राजपुत्रा, उत्कृष्ट खड्ग, मोहन ह्या नांवानें प्रसिद्ध व गंधर्वांना प्रिय असें गांधर्वास्त्र १४, प्रस्वापन, प्रशमन, सौम्य, वर्षण, शोषण, संतापन व विलापन हीं अस्त्रें, हे रघुवंशजा रामा, मी तुला देतों १५. मदनाला प्रिय आणि सहन करण्यास फारच अशक्य असें मादननामक अस्त्र, मानव ह्या नांवानें प्रसिद्ध आणि गंधर्वांना प्रिय असें गांधर्वास्त्र १६ आणि मोहन ह्या नांवानें प्रसिद्ध व पिशाचांना प्रिय असें पैशाच अस्त्र, हे पुरुषश्रेष्ठा महायशस्वी राजपुत्रा, तूं घे १७. हे पुरुषश्रेष्ठा राजपुत्रा, तामस, महाबलाढ्य सौमन, दुःसह असें संवर्त, मौसल १८, सत्यसंज्ञक अस्त्र, हे महा-

मायामयं परम् । सौरं तेजःप्रभं नाम परतेजोपकर्षणम् १९ सोमास्त्रं शिशिरं नाम त्वाष्ट्रमस्त्रं सुदारुणम् । दारुणं च भगस्यापि शीतेषुमथमानवम् २० एतान्राम महाबाहो कामरूपान्महाबलान् । गृहाण परमोदारान्क्षिप्रमेव नृपात्मज २१ स्थितस्तु प्राङ्मुखो भूत्वा शुचिर्मुनिवरस्तदा । ददौ रामाय सुप्रीतो मन्त्रग्राममनुत्तमम् २२ सर्वसंग्रहणं येषां दैवतैरपि दुर्लभम् । तान्यस्त्राणि तदा विप्रो राघवाय न्यवेदयत् २३ जपतस्तु मुनेस्तस्य विश्वामित्रस्य धीमतः । उपतस्थुर्महार्हाणि सर्वाण्यस्त्राणि राघवम् २४ ऊचुश्च मुदिता रामं सर्वे प्राञ्जलयस्तदा । इमे च परमोदार किंकरास्तव राघव २५ यद्यदिच्छसि भद्रं ते तत्सर्वं करवाम वै । ततो रामः प्रसन्नात्मा तैरित्युक्तो महाबलैः २६ प्रतिगृह्य च काकुत्स्थः समालभ्य च पाणिना । मानसा मे भविष्यध्वमिति तान्यभ्यचोदयत् २७ ततः प्रीतमना रामो विश्वामित्रं महामुनिम् । अभिवाद्य महातेजा गम-

---

पराक्रमी रामा, मायामय असें एक दुसरें अस्त्र, शत्रुतेजोनाशक असें तेजःप्रभसंज्ञक सूर्याचें अस्त्र १९, चंद्राचें शिशिरनामक अस्त्र, अत्यंत भयंकर असें त्वाष्ट्र अस्त्र आणि शत्रूंचा पराजय करणारें असें भगदेवाचें भयंकर शीतेषुनामक अस्त्र, तूं ग्रहण कर २०. हे महापराक्रमी राजपुत्रा, यथेष्टरूप धारण करणारे असे हे महाबलाढ्य व अत्यंत उदार अस्त्ररूपी कृशाश्वपुत्र तूं सत्वर घे " २१. ह्याप्रमाणें सांगितल्यावर ते मुनिश्रेष्ठ विश्वामित्र प्राङ्मुख झाले आणि अत्यंत प्रसन्न होऊन त्यांनीं रामाला अत्युत्कृष्ट असा अस्त्रविषयक मंत्रसमुदाय ( उपदेशरूपानें ) अर्पण केला २२. तात्पर्य, ज्यांचा सर्व प्रकारचा संग्रह देवांनाही दुर्लभ आहे तीं अस्त्रें त्या विप्र विश्वामित्रांनीं रघुवंशज रामाला त्यावेळीं अर्पण केलीं २३. सारांश, ते बुद्धिमान् विश्वामित्रमुनि त्या अस्त्रविषयक मंत्रांचा जप करूं लागले असतां सर्व अमूल्य अस्त्रें रघुवंशज रामासमीप मूर्तिमंत येऊन उभीं राहिलीं २४. नंतर मूर्तिमान् येऊन उभे राहिलेले ते सर्व अस्त्ररूप कृशाश्वपुत्र हात जोडून आनंदानें त्याला ह्मणाले, " हे अत्यंत उदार राघवा, हे आह्मी तुझे दास आलों आहोंत २५. तुझें कल्याण असो. तूं जें जें मनामध्यें आणिशील तें तें सर्व आह्मी शेंवटास नेऊं ". ह्याप्रमाणें त्या महाबलाढ्य कृशाश्वपुत्रांनीं रामाला सांगितलें असतां त्याचें मन प्रसन्न झालें २६ आणि हातानें स्पर्श करून त्यांचा स्वीकार केल्यावर " तुह्मी मंत्ररूपानें माझ्या मनामध्यें सर्वदां वास्तव्य करीत जा. " अशी त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें त्यांना आज्ञा केली २७. तदनंतर मनामध्यें प्रसन्न झालेला महातेजस्वी राम महामुनि विश्वामित्रांना अभिवंदन करून पुढें जाण्यास

नायापचक्रमे २८ [९३०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

प्रतिगृह्य ततोऽस्त्राणि प्रहृष्टवदनः शुचिः। गच्छन्नेव च काकुत्स्थो विश्वामित्रमथाब्रवीत् १ गृहीतास्त्रोऽस्मि भगवन्दुराधर्षः सुरैरपि। अस्त्राणां त्वहमिच्छामि संहारान्मुनिपुङ्गव २ एवं ब्रुवति काकुत्स्थे विश्वामित्रो महातपाः। संहारान्व्याजहाराथ धृतिमान्सुव्रतः शुचिः ३ सत्यवन्तं सत्यकीर्तिं धृष्टं रभसमेव च। प्रतिहारतरं नाम पराङ्मुखमवाङ्मुखम् ४ लक्ष्यालक्ष्याविमौ चैव दृढनाभसुनाभकौ। दशाक्षशतवक्त्रौ च दशशीर्षशतोदरौ ५ पद्मनाभमहानाभौ दुन्दुनाभस्वनाभकौ। ज्योतिषं शकुनं चैव नैरास्यविमलावुभौ ६ यौगन्धरविनिद्रौ च दैत्यप्रमथनौ तथा ७ शुचिबाहुर्महाबाहुर्निष्कलिर्विरुचस्तथा। सार्चिमाली धृतिमाली वृत्तिमान्रुचिरस्तथा ८ पित्र्यः सौमनसश्चैव विधूतमकरावुभौ। परवीरं रतिं चैव धनधान्यौ च राघव ९ कामरूपं कामरुचिं मोहमावरणं तथा। जृम्भकं सर्पनाथं च पन्थानवरुणौ तथा १० कृशाश्वतनयान्राम भास्वरान्कामरू-

---

उद्युक्त झाला २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

तदनंतर अस्त्रांचा स्वीकार केल्यावर प्रसन्न मुद्रेनें युक्त व शुचिर्भूत असलेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम जातां जातांच विश्वामित्रमुनींना ह्मणाला १ " हे भगवन्, मीं अस्त्रांचा स्वीकार केला आहे व त्यामुळें मी आतां देवांनाही अजिंक्य झालों आहें; परंतु, हे मुनिश्रेष्ठ, अस्त्रांचा उपसंहार कसा करावा हें जाणण्याची मला इच्छा आहे २. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम बोलूं लागला असतां धैर्यवान्, सदाचरणसंपन्न आणि शुचिर्भूत अशा महातपस्वी विश्वामित्रमुनींनीं अस्त्रांचे उपसंहार रामाला सांगितले ( आणि नंतर त्याला ते ह्मणाले ) ३ " सत्यवान्, सत्यकीर्ति," धृष्ट, रभस, प्रतिहारतर, पराङ्मुख, अवाङ्मुख ४, हे लक्ष्य आणि अलक्ष्य, दृढनाभ, वसुनाभ, दशाक्ष व शतवक्त्र, दशशीर्ष व शतोदर ५, पद्मनाभ व महानाभ, दुंदुनाभ व स्वनाभ, ज्योतिष, शकुन, उभयतां नैरास्य व विमल ६, दैत्यनाशक, योगंधर व विनिद्र ( हे अस्त्ररूप कृशाश्वपुत्र मी तुला देत असून ) ७ शुचिबाहु, महाबाहु, निष्कली, विरुच, सार्चिमाली, धृतिमाली, वृत्तिमान्, रुचिर ८, पित्र्य, सौमनस, आणि हे राघवा, उभयतां विधूत व मकर हे मी तुला देतों. शिवाय परवीर, रति, धन व धान्य ९, कामरूप, कामरुचि, मोह, आवरण, जृंभक, सर्पनाथ आणि पंथान व वरुण १० हे

षिणः । प्रतीच्छ मम भद्रं ते पात्रभूतोसि राघव ११ बाढमित्येव काकुत्स्थः प्रहृष्टेनान्तरात्मना । दिव्यभास्वरदेहाश्च मूर्तिमन्तः सुखप्रदाः १२ केचिदङ्गारसदृशाः केचिद्धूमोपमा स्तथा । चन्द्रार्कसदृशाः केचित्प्रह्वाञ्जलिपुटास्तथा १३ रामं प्राञ्जलयो भूत्वाब्रुवन्मधुरभाषिणः । इमे स्म नरशार्दूल शाधि किं करवाम ते १४ गम्यतामिति तानाह यथेष्टं रघुनन्दनः । मानसाः कार्यकालेषु साहाय्यं मे करिष्यथ १५ अथ ते राममामन्त्र्य कृत्वा चापि प्रदक्षिणम् । एवमस्त्विति काकुत्स्थमुक्त्वा जग्मुर्यथागतम् १६ स च तान्राघवो ज्ञात्वा विश्वामित्रं महामुनिम् । गच्छन्नेवाथ मधुरं श्लक्ष्णं वचनमब्रवीत् १७ किमेतन्मेघसंकाशं पर्वतस्याविदूरतः । वृक्षखण्डमितो भाति परं कौतूहलं हि मे १८ दर्शनीयं मृगाकीर्णं मनोहरमतीव च । नानाप्रकारैः शकुनैर्वल्गुभाषैरलंकृतम् १९ निःसृताः

---

यथेष्ट रूप धारण करणारे व तेजोमय असलेले अस्त्ररूप कृशाश्वपुत्र तूं घे. हे राघवा, तूं माझ्या दानाला पात्र आहेस; तुझें कल्याण असो " ११. ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींनीं सांगितलें असतां " होय " येवढेंच ह्मणून ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें प्रसन्न मनानें त्यांचा स्वीकार केला; तेव्हां दिव्य आणि उज्ज्वल देहानें युक्त व सुखप्रद असे ते अस्त्ररूप कृशाश्वपुत्र मूर्तिमान् तेथें आले १२. सारांश, कांहीं अंगारासारिखे, कांहीं धूमसदृश आणि कांहीं चंद्रसूर्याप्रमाणें तेजस्वी असे नम्र होऊन व हात जोडून तेथें उभे राहिले १३ आणि ह्याप्रमाणें हातजोडून उभे राहिल्यावर ते मधुरभाषण करणारे अस्त्ररूप कृशाश्वपुत्र रामाला ह्मणाले हे पुरुषश्रेष्ठा, हे आह्मी आलों आहोंत; आह्मी आपलें कार्य करावें त्याची आपण आज्ञा करा " १४. ह्याप्रमाणें त्यांनीं प्रार्थना केली असतां " आपण सांप्रत यथेष्ट गमन करा आणि कार्यसमय प्राप्त झाला असतां माझ्या मनामध्यें मंत्ररूपानें स्थित असलेले आपण मला साहाय्य करा " १५. ह्याप्रमाणें रामानें त्यांना सांगितल्यावर " ठीक आहे " असें ह्मणून त्यांनीं रामाचा निरोप घेतला आणि त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला प्रदक्षिणा करून तें आल्या वाटेनें चालते झाले १६. ह्याप्रमाणें अस्त्रांचें ज्ञान झाल्यानंतर रघुवंशज राम जातां जातांच महामुनिविश्वामित्रांना मधुर आणि स्पष्ट अशा वाणीनें प्रश्न करूं लागला १७ ( कीं, हे भगवन् ) पर्वतापासून दूर नसलेला हा मेघतुल्य वृक्षसमूह मला दिसत आहे तो कां आश्रमसंबंधीं आहे किंवा वनसंबंधीं आहे हें आपण मला सांगा; त्याविषयीं माझ्या मनामध्यें पराकाष्ठेची उत्सुकता उत्पन्न झाली आहे १८. हा वृक्षसमुदाय दिसण्यांत उत्तम असून मनोहर आहे, मृगांनीं हा व्याप्त झालेला आहे आणि मधुर शब्द करणाऱ्या नाना-

स्म मुनिश्रेष्ठ कान्ताराद्रोमहर्षणात् । अनया त्ववगच्छामि देशस्य सुख-वनया २० सर्वं मे शंस भगवन्कस्याश्रमपदं त्विदम् । संप्राप्ता यत्र ते पापा ब्रह्मघ्ना दुष्टचारिणः २१ तव यज्ञस्य विघ्नाय दुरात्मानो महामुने । भगवं-स्तस्य को देशः सा यत्र तव याज्ञिकी २२ रक्षितव्या क्रिया ब्रह्मन्मया वध्याश्च राक्षसाः । एतत्सर्वं मुनिश्रेष्ठ श्रोतुमिच्छाम्यहं प्रभो २३ [ ९५३ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

अथ तस्याप्रमेयस्य वचनं परिपृच्छतः । विश्वामित्रो महातेजा व्याख्या-तुमुपचक्रमे १ इह राम महाबाहो विष्णुर्देवनमस्कृतः । वर्षाणि सुबहूनीह तथा युगशतानि च २ तपश्चरणयोगार्थमुवास सुमहातपाः । एष पूर्वा-श्रमो राम वामनस्य महात्मनः ३ सिद्धाश्रम इति ख्यातः सिद्धो ह्यत्र महातपाः । एतस्मिन्नेव काले तु राजा वैरोचनिर्बलिः ४ निर्जित्य दैव-

---

प्रकारच्या पक्ष्यांनीं ह्याला शोभा आणिलेली आहे १९. हे मुनिश्रेष्ठ, आपण आतां शरीरावर कांटा आणणाऱ्या अशा भयंकर वनमार्गांतून बाहेर पडलों आहोंत आणि ह्या प्रदेशाच्या सुखीपणावरून हें आश्रमस्थान असावें असें मला वाटत आहे २०. करितां, हे भगवन् , हें कोणाचें आश्रमस्थान आहे हें सर्व, आपण मला सांगा. ज्या ठिकाणीं ते ब्रह्मघातकी, दुराचारी पापी २१ आणि दुरात्मे राक्षस आपल्या यज्ञाला विघ्न करण्यास प्रवृत्त झाले आहेत आणि ज्या ठिकाणीं आपल्या त्या यज्ञकर्माचें संर-क्षण व राक्षसांचा वध मला कर्तव्य आहे त्या आपल्या आश्रमाचा प्रदेश कोणता तो, हे म ामुने, आपण मला सांगा. हे ब्रह्मन् , हे मुनिश्रेष्ठ, हे प्रभो, हें सर्व श्रवण कर-ण्याची माझी इच्छा आहे २२,२३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

नंतर प्रश्न विचारणाऱ्या त्या अतर्क्य रामाचें भाषण श्रवण करून महातेजस्वी विश्वामित्रमुनि विचारिलेल्या प्रश्नांचें उत्तर देऊं लागले १. ( ते ह्मणाले ) " हे महा-पराक्रमी रामा, देवांना वंद्य अशा अत्यंत महातपस्वी विष्णूनें ( तपश्चर्येकडे लोकांची प्रवृत्ति व्हावी एतदर्थ ) तपश्चर्या करण्याकरितां पुष्कळ वर्षेंच नव्हे परंतु शेंकडों युगें ह्या ठिकाणीं वास्तव्य केलेलें आहे २. हे रामा, वामन अवतार घेण्यापूर्वीं तपश्चर्या करण्याकरितां महात्म्या विष्णूनें या आश्रमाचा स्वीकार केला होता व महातपस्वी विष्णु ह्या ठिकाणीं तपानें सिद्ध झाल्यामुळें सिद्धाश्रम ह्मणून हा आश्रम प्रसिद्ध आहे ३. ह्या आश्रमांत विष्णु तपश्चर्या करीत असतांनाच इंद्र आणि मरुद्गण ह्यांसह-वर्तमान देवगणांना जिंकून विरोचनपुत्र बलिराजानें ४ तें इंद्रादिकांचें राज्य स्वतः

तगणान्सेन्द्रान्सहमरुद्गणान् । कारयामास तद्राज्यं त्रिषु लोकेषु विश्रुतः ॥ यज्ञं चकार सुमहानसुरेन्द्रो महाबलः ५ बलेस्तु यजमानस्य देवाः साग्निपुरोगमाः । समागम्य स्वयं चैव विष्णुमूचुरिहाश्रमे ६ बलिर्वैरोचनिर्विष्णो यजते यज्ञमुत्तमम् । असमाप्तव्रते तस्मिन्स्वकार्यमभिपद्यताम् ७ ये चैनमभिवर्तन्ते याचितार इतस्ततः । यच्च यत्र यथावच्च सर्वं तेभ्यः प्रयच्छति ८ स त्वं सुरहितार्थाय मायायोगमुपाश्रितः । वामनत्वं गतो विष्णो कुरु कल्याणमुत्तमम् ९ एतस्मिन्नन्तरे राम कश्यपोऽग्निसमप्रभः । अदित्या सहितो राम दीप्यमान इवौजसा १० देवीसहायो भगवान्दिव्यं वर्षसहस्रकम् । व्रतं समाप्य वरदं तुष्टाव मधुसूदनम् ११ तपोमयं तपोराशिं तपोमूर्तिं तपात्मकम् । तपसा त्वां सुतप्तेन पश्यामि पुरुषोत्तमम् १२ शरीरे तव पश्यामि जगत्सर्वमिदं प्रभो । त्वमनादिरनिर्देश्यस्त्वामहं शरणं गतः १३ तमुवाच हरिः प्रीतः कश्यपं धूतकल्मषम् । वरं वरय भद्रं ते वरार्होऽसि मतो मम १४ तच्छ्रुत्वा वचनं तस्य मारीचः

करण्यास आरंभ केला व त्रैलोक्यामध्यें विख्यात असलेल्या त्या महाबलाढ्य व अतिप्रचंड दैत्यराजानें एक यज्ञही केला ५. परंतु, बलि यज्ञ करीत असतांना अग्निप्रभृति देव ह्या आश्रमामध्यें स्वतः विष्णूकडे आले आणि ह्मणाले ६ " हे विष्णो, विरोचनपुत्र बलि उत्तम यज्ञ करीत आहे. करितां, तें व्रत संपूर्ण होण्यापूर्वी आपण आपलें कार्य करून घ्यावें ७. इकडल्या तिकडल्या प्रदेशांतून तेथें जाऊन जे याचक त्याच्यापाशीं जें जें मागण्याकरितां जातात तें तें सर्व तो त्यांना यथायोग्य रीतीनें अर्पण करितो ८. ह्यास्तव, हे विष्णो, देवहिताकरितां मायेचें अवलंबन करून आपण वामनत्व स्वीकारा आणि आमचें चांगलें कल्याण करा " ९. हे रामा, हें ह्यांचें भाषण चाललें आहे तोंच अग्नितुल्य प्रभेनें युक्त आणि ह्मणूनच तेजानें देदीप्यमान अशा भगवान् कश्यपमुनींनीं अदितीसहवर्तमान सहस्र दिव्यवर्षेपर्यंत चालविलेली तपश्चर्या समाप्त केली आणि त्या देवीसहवर्तमान ते वरप्रद मधुसूदनाची स्तुति करूं लागले १०, ११ कीं " हे प्रभो, तपोमय, तपोराशि तपोमूर्ति व ज्ञानस्वरूप अशा तुज पुरुषश्रेष्ठाला मी आचरिलेल्या तपाच्या योगानें अवलोकन करीत आहें १२. हे प्रभो, तुझ्या शरीराचे ठिकाणीं मी हें सर्व जगत् अवलोकन करीत आहें. तूं अनादि असून अतर्क्य आहेस. मी तुला शरण आलों आहें " १३. ह्याप्रमाणें स्तुति झाल्यावर " वर माग; तुझें कल्याण असो; तूं वराला योग्य आहेस असें मी समजतों " ह्मणून श्रीहरींनीं प्रसन्न होऊन पापक्षालन झालेल्या कश्यपमुनींना सांगितलें असतां १४ ते मरीचिपुत्र कश्यपमुनि ह्मणाले " हे

कश्यपोऽब्रवीत्। अदित्या देवतानां च मम चैवानुयाचितम् १५ वरं वरद सुप्रीतो दातुमर्हसि सुव्रत। पुत्रत्वं गच्छ भगवन्नदित्या मम चानघ १६ भ्राता भव यवीयांस्त्वं शक्रस्यासुरसूदन। शोकार्तानां तु देवानां साहाय्यं कर्तुमर्हसि १७ अयं सिद्धाश्रमो नाम प्रसादात्ते भविष्यति। सिद्धे कर्मणि देवेश उत्तिष्ठ भगवन्नितः १८ अथ विष्णुर्महातेजा अदित्यां समजायत। वामनं रूपमास्थाय वैरोचनिमुपागतम् १९ त्रीन्पदानथ भिक्षित्वा प्रतिगृह्य च मेदिनीम्। आक्रम्य लोकाल्लोँकार्थी सर्वलोकहिते रतः २० महेन्द्राय पुनः प्रादान्नियम्य बलिमोजसा। त्रैलोक्यं स महातेजाश्चक्रे शक्रवशं पुनः २१ तेनैव पूर्वमाक्रान्त आश्रमः श्रमनाशनः। मयापि भक्त्या तस्यैव वामनस्योपभुज्यते २२ एतमाश्रममायान्ति राक्षसा विघ्नकारिणः। अत्र ते पुरुषव्याघ्र हन्तव्या दुष्टचारिणः २३ अद्य गच्छामहे राम सिद्धाश्रममनुत्तमम्। तदाश्रमपदं तात तवाप्येतद्यथा मम २४ इत्युक्त्वा परमप्रीतो

वरप्रद, अदिति, देवता आणि मी ह्यांनीं प्रार्थित असा वर आपण प्रसन्न होऊन मला द्या. सारांश, हे सुव्रत, हे भगवन्, हे निष्पाप, माझे व अदितीचे आपण पुत्र व्हा १५.१६. हे दैत्यनाशक, आपण इंद्राचे कनिष्ठ बंधु व्हा आणि शोकाकुल झालेल्या देवांना साहाय्य करा १७. आपल्या प्रसादामुळें हा प्रदेश सिद्धाश्रम ह्मणून प्रसिद्ध होईल. हे भगवन्, ही तपश्चर्या संपूर्ण झाली आहे. करितां, हे देवाधिदेव, आतां देवकार्याकरितां आपण येथून उठा" १८. ह्याप्रमाणें कश्यपमुनींनीं प्रार्थना केली असतां महातेजस्वी विष्णु अदितीचे ठिकाणीं जन्मास आले आणि वामनरूप धारण करून ते विरोचनपुत्र बलीकडे गेले १९. नंतर त्रैलोक्य व्यापण्याची इच्छा धरून सर्व लोकांच्या हिताविषयीं तत्पर असलेल्या विष्णूंनीं बलीपाशीं त्रिपाद भूमीची भिक्षा मागितली, त्याप्रमाणें त्या भूमीचा प्रतिग्रह केला आणि तीन पदांनीं तिन्ही लोक व्याप्त करून २० व आपल्या सामर्थ्यानें बलीचा निग्रह करून पुनरपि त्यांनीं तें त्रैलोक्य महेंद्राला अर्पण केलें. सारांश, त्या महातेजस्वी विष्णूंनीं पुनरपि त्रैलोक्य इंद्राधीन करून टाकिलें २१. असो. ह्या श्रमपरिहार करणाऱ्या आश्रमामध्यें पूर्वी त्या वामनावतार धारण करणाऱ्या ईश्वरानेंच वास्तव्य केलें होतें आणि मीही त्या वामनाच्याच प्रसादानें ह्या आश्रमाचा उपभोग घेत आहें २२. विघ्न करणारे राक्षस ह्या आश्रमामध्यें येत असतात. करितां, हे पुरुषश्रेष्ठा, त्या दुराचारी राक्षसांचा ह्या ठिकाणीं वध करणें योग्य आहे २३. हे रामा, आज आपण त्या सर्वोत्कृष्ट सिद्धाश्रमाला जाऊं. बा रामा,

गृह्य रामं सलक्ष्मणम् । प्रविशन्नाश्रमपदं व्यरोचत महामुनिः २५ शशीव गतनीहारः पुनर्वसुसमन्वितः २६ तं दृष्ट्वा मुनयः सर्वे सिद्धाश्रमनिवासिनः । उत्पत्योत्पत्य सहसा विश्वामित्रमपूजयन् २७ यथार्हं चक्रिरे पूजां विश्वामित्राय धीमते । तथैव राजपुत्राभ्यामकुर्वन्नतिथिक्रियाम् २८ मुहूर्तमथ विश्रान्तौ राजपुत्रावरिंदमौ । प्राञ्जली मुनिशार्दूलमूचतू रघुनन्दनौ २९ अद्यैव दीक्षां प्रविश भद्रं ते मुनिपुङ्गव । सिद्धाश्रमोयं सिद्धः स्यात्सत्यमस्तु वचस्तव ३० एवमुक्तो महातेजा विश्वामित्रो महानृषिः । प्रविवेश तदा दीक्षां नियतो नियतेन्द्रियः ३१ कुमाराविव तां रात्रिमुषित्वा सुसमाहितौ । प्रभातकाले चोत्थाय पूर्वां संध्यामुपास्य च ३२ प्रशुची परमं जाप्यं समाप्य नियमेन च । हुताग्निहोत्रमासीनं विश्वामित्रमवन्दताम् ३३ [ ९८६ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

---

हें आश्रमस्थान जसें माझें आहे तसें तुमचेंही आहे २५. ह्याप्रमाणें अत्यंत प्रसन्न झालेले महामुनि विश्वामित्र लक्ष्मणासहवर्तमान रामाला घेऊन त्या आश्रमामध्यें प्रविष्ट होऊं लागले असतां पुनर्वसुसंज्ञक दोन तार्‍यांनीं युक्त असलेला अभ्ररहित चंद्रमा ज्याप्रमाणें शोभूं लागतो त्याप्रमाणें ते शोभूं लागले २५,२६. त्यांना अवलोकन केल्याबरोबर सिद्धाश्रमनिवासी सर्व मुनींनीं एकदम उठून विश्वामित्रांचें पूजन केलें २७. प्रथमतः विवेकी विश्वामित्रमुनींचें त्यांनीं यथायोग्य पूजन केलें आणि नंतर त्याचप्रमाणें त्या राजपुत्रांचेंही त्यांनीं आदरातिथ्य केलें २८. असो. आश्रमांत गेल्यावर एक मुहूर्तभर विश्रांति घेतल्यानंतर ते रघुनंदन शत्रुनाशक राजपुत्र हात जोडून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना ह्मणाले २९ " हे मुनिश्रेष्ठ, आपलें देव बरें करो, आपण आजच दीक्षा घ्या. आपला यज्ञ सिद्धीस जाऊन ह्मणजे शेवटास जाऊन ह्या आश्रमाचें सिद्धाश्रम हें नांव अन्वर्थक होवो आणि आपलें वचन खरें होवो " ३०. ह्याप्रमाणें रामानें प्रार्थना केली असतां मन व इंद्रियें ह्यांचा निग्रह केलेल्या महातेजस्वी विश्वामित्रमुनींनीं त्या वेळीं यज्ञदीक्षा घेतली ३१. असो. शिवपुत्र दोन स्कंदच कीं काय असे शोभत असलेले ते राजकुमार स्वस्थांतःकरणपूर्वक त्या रात्रीं त्या सिद्धाश्रमामध्यें राहिले आणि प्रभातकालीं उठल्यानंतर अतिशयच शुचि असलेल्या त्या राजकुमारांनीं प्रातःसंध्या करून आणि नियमानें कर्तव्य जो उत्कृष्ट जप तोही समाप्त करून होम देऊन बसलेल्या विश्वामित्रमुनींना वंदन केलें ३२,३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडांपैकीं एकुणतिसावा सर्ग समाप्त झाला॥ २९ ॥

अथ तौ देशकालज्ञौ राजपुत्रावरिन्दमौ । देशे काले च वाक्यज्ञाव-भूतां कौशिकं वचः १ भगवञ्छ्रोतुमिच्छावो यस्मिन्काले निशाचरौ । संरक्षणीयौ तौ ब्रूहि नातिवर्तेत तत्क्षणम् २ एवंब्रुवाणौ काकुत्स्थौ त्वरमाणौ युयुत्सया । सर्वे ते मुनयः प्रीताः प्रशशंसुर्नृपात्मजौ ३ अद्यप्रभृति षड्रात्रं रक्षतां राघवौ युवाम् । दीक्षां गतो ह्येष मुनिर्मौनित्वं च गमिष्यति ४ तौ तु तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रौ यशस्विनौ । अनिद्रं षडहोरात्रं तपोवनमरक्षताम् ५ उपासाञ्चक्रतुर्वीरौ यत्तौ परमधन्विनौ । ररक्षतुर्मुनिवरं विश्वामित्रमरिन्दमम् ६ अथ काले गते तस्मिन्षष्ठेऽहनि तथागते । सौमित्रिमब्रवीद्रामो यत्तो भव समाहितः ७ रामस्यैवं ब्रुवाणस्य त्वरितस्य युयुत्सया । प्रजज्वाल ततो वेदिः सोपाध्यायपुरोहिता ८ सदर्भचमसस्रुक्का ससमित्कुसुमोच्चया । विश्वामित्रेण सहिता वेदिर्जज्वाल सर्त्विजा ९ मन्त्रवच्च यथान्यायं यज्ञोऽसौ संप्रवर्तते । आकाशे च महा-

ह्याप्रमाणें वंदन केल्यानंतर देश व काल जाणणारे आणि संभाषणामध्यें निपुण असलेले शत्रुनाशक राजपुत्र योग्य स्थळीं आणि योग्य वेळीं विश्वामित्रमुनींना ह्मणाले १ " भगवन्, यज्ञसंरक्षण करण्याकारितां त्या निशाचरांचें निवारण केव्हां केलें पाहिजे तें आपण सांगा ह्मणजे ती वेळ टळणार नाहीं " २. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मण युद्धाच्या उत्कंठेनें आज्ञा करण्याविषयीं विश्वामित्रमुनींना त्वरा करूं लागले असतां त्या सिद्धाश्रमांतील ते सर्व मुनि संतुष्ट झाले आणि प्रशंसापूर्वक त्या राजकुमारांना ह्मणाले ३ " हे रघुकुलोत्पन्न राजपुत्रहो, आजपासून सहा दिवसपर्यंत तुह्मी रक्षण करा. ह्या मुनींनीं यज्ञदीक्षा घेतली असल्यामुळें हे तेथपर्यंत मौन धारण करितील. ( ह्याकरितां, तुमच्या प्रश्नाचें उत्तर आह्मीं दिलें आहे ) " ४. ह्याप्रमाणें त्या मुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्या यशस्वी राजपुत्रांनीं निद्रा न घेतां सहा दिवसपर्यंत एकसारिखें त्या तपोवनाचें रक्षण केलें ५. सारांश, ते श्रेष्ठ धनुर्धारी राजपुत्र सज्ज झाले आणि समीप राहून त्यांनीं शत्रुनाशक मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांच्या यज्ञाचें रक्षण करूं लागले ६. असें चाललें असतां तो सहावा दिवस उजाडल्यावर " तूं सावधपणानें तयार रहा " ह्मणून लक्ष्मणाला रामांनीं सांगितलें ७. ह्याप्रमाणें युद्धाविषयीं उत्सुक झालेला राम लक्ष्मणाला सांगत असतांना ब्रह्मा, उपद्रष्टा आणि इतरही ऋत्विज ह्यांसहवर्तमान वेदि एकाएकीं प्रज्वलित होऊं लागली ८. तात्पर्य, दर्भ, चमस व स्रुचा आणि समिधा व पुष्पें ह्यांच्या राशी ह्यांनीं युक्त असलेली ती वेदि विश्वामित्र आणि ऋत्विज ह्यांसहवर्तमान एकाएकीं पेट घेऊं

ऽछब्दः प्रादुरासीद्भयानकः १० आवार्य गगनं मेघो यथा प्रावृषि दृश्यते । तथा मायां विकुर्वाणौ राक्षसावभ्यधावताम् ११ मारीचश्च सुबाहुश्च तयोरनुचरास्तथा । आगम्य भीमसंकाशा रुधिरौघानवासृजन् १२ तां तेन रुधिरौघेण वेदीं वीक्ष्य समुक्षिताम् । सहसाभिद्रुतो रामस्तानपश्यत्ततो दिवि १३ तावापतन्तौ सहसा दृष्ट्वा राजीवलोचनः । लक्ष्मणं त्वभिसंप्रेक्ष्य रामो वचनमब्रवीत् १४ पश्य लक्ष्मण दुर्वृत्तान्राक्षसान्पिशिताशनान् । मानवास्त्रसमाधूताननिलेन यथा घनान् १५ करिष्यामि न संदेहो नोत्सहे हन्तुमीदृशान् । इत्युक्त्वा वचनं रामश्चापे संधाय वेगवान् १६ मानवं परमोदारमस्त्रं परमभास्वरम् । चिक्षेप परमक्रुद्धो मारीचोरसि राघवः १७ स तेन परमास्त्रेण मानवेन समाहतः । संपूर्णं योजनशतं क्षिप्तः सागरसंप्लवे १८ विचेतनं विघूर्णन्तं शीतेषुबलपीडितम् । निरस्तं दृश्य मारीचं रामो लक्ष्मणमब्रवीत् १९ पश्य लक्ष्मण शीतेषुं

---

लागली९. असो. त्या यज्ञाचें अनुष्ठान समंत्रक व यथाविधि चाललें आहे तोंच आकाशामध्यें मोठा भयंकर शब्द होऊं लागला १० आणि आकाश व्याप्त करून ज्याप्रमाणें मेघ वर्षाकालीं मोठी गर्जना वगैरे करितांना दृष्टीस पडतात त्याप्रमाणें माया प्रकट करणारे ते राक्षस तेथें धावून आले ११. मारीच, सुबाहु आणि त्यांचे अनुयायी अशा त्या भयंकर राक्षसांनीं तेथें येऊन रक्तप्रवाहांची वृष्टि केली १२. तेव्हां, त्या रक्तप्रवाहानें सिंचित झालेली ती वेदि अवलोकन केल्याबरोबर राम एकाएकीं यज्ञशालेच्या भोंवतीं धावूं लागला तों आकाशामध्यें ते राक्षस त्याच्या दृष्टीस पडले १३. त्या राक्षसांपैकीं मारीच आणि सुबाहु हे उभयतां एकदम आपल्या अंगावर धावून येत आहेत असें अवलोकन करून कमलनयन राम लक्ष्मणाकडे पाहून ह्मणाला १४ "हे लक्ष्मणा, पहा ! वायूच्या योगानें ज्याप्रमाणें मेघ उडून जातात त्याप्रमाणें ह्या मांसभक्षक दुराचारी राक्षसांना मी मानवास्त्राच्या योगानें निःसंशय उडवून लावितों. अशा दुर्बलांचा वध करण्याला माझें मन घेत नाहीं". ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून त्या वेगवान् रामानें धनुष्याला बाण लाविला १५, १६ आणि अत्यंत श्रेष्ठ व अत्यंत उज्ज्वल अशा मानवास्त्राचें अभिमंत्रण करून तो बाण त्या अत्यंत क्रुद्ध झालेल्या रघुवंशज रामानें मारीच राक्षसाच्या वक्षःस्थलावर टाकिला १७. तेव्हां त्या श्रेष्ठ मानवास्त्राच्या योगानें ताडित झालेला तो राक्षस समुद्रामध्यें पुरीं शंभर योजनें लांबपर्यंत फेंकला गेला १८. ह्याप्रमाणें शीतेषुसंज्ञक मानवास्त्राच्या बलानें पीडित झाल्यामुळें मूर्छित झालेला तो मारीच राक्षस समुद्रांत फेंकला जाऊन तडफडत आहे असें अवलोकन करून लक्ष्मणाला राम

मानवं मनुसंहितम् । मोहयित्वा नयत्येनं न च प्राणैर्वियुज्यते २० इमानपि वधिष्यामि निर्घृणान्दुष्टचारिणः । राक्षसान्पापकर्मस्थान्यज्ञघ्ना-न्रुधिराशनान् २१ इत्युक्त्वा लक्ष्मणं चाशु लाघवं दर्शयन्निव । विगृह्य सुमहच्चास्त्रमाग्नेयं रघुनन्दनः २२ सुबाहूरसि चिक्षेप स विद्धः प्रापतद्भुवि । शेषान्वायव्यमादाय निजघान महायशाः २३ राघवः परमोदारो मुनीनां मुदमावहन् । स हत्वा राक्षसान्सर्वान्यज्ञघ्नान्रघुनन्दनः २४ ऋषिभिः पूजितस्तत्र यथेन्द्रो विजये पुरा । अथ यज्ञे समाप्ते तु विश्वामित्रो महामुनिः २५ निरीतिका दिशो दृष्ट्वा काकुत्स्थमिदमब्रवीत् । कृतार्थोस्मि महाबाहो कृतं गुरुवचस्त्वया २६ सिद्धाश्रममिदं सत्यं कृतं वीर महायशः । स हि रामं प्रशस्यैवं ताभ्यां संध्यामुपागमत् २७ [ १०१३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिंशः सर्गः ॥३०॥

---

ह्मणाला १९ " हे लक्ष्मणा, पहा ! मनूनें प्रथम योजिलेलें हें शीतेषुसंज्ञक मानवास्त्र ह्याला मोह पाडून लांब नेत आहे; परंतु, हें ह्याचे प्राण घेत नाहीं २०. असो. ह्या दुराचारी, पापकर्माविषयीं रत, यज्ञघातकी आणि रक्तप्राशन करून असणाऱ्या निर्दय राक्षसांचाही आतां मी वध करितों " २१. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून आपलें हस्तलाघव दर्शवीतच कीं काय रघुनंदन रामानें अतिशय प्रचंड असें आग्नेयास्त्र सत्वर धारण करून २२ सुबाहुनामक राक्षसाच्या वक्षःस्थलावर फेंकिलें असतां त्या अस्त्रानें ताडित झालेला तो राक्षस भूमीवर पडला. असो. नंतर अत्यंत उदार अशा त्या महायशस्वी रघुवंशज रामानें वायव्यास्त्र घेऊन इतर राक्षसांचा वध केला असतां त्या सिद्धाश्रमनिवासी मुनींना आनंद झाला. ह्याप्रमाणें रघुनंदन रामानें त्या सर्व यज्ञघातकी राक्षसांचा वध केला असतां २३,२४ विजयसमयीं पूर्वी ऋषींनीं ज्याप्रमाणें इंद्राचें पूजन केलें त्याप्रमाणें त्या सिद्धाश्रमनिवासी मुनींनीं त्याचें पूजन केलें. असो. नंतर यज्ञ समाप्त झाल्यावर महामुनि विश्वामित्र २५ सर्व प्रदेश पीडारहित झाल्याचें अवलोकन करून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाले " हे महाबाहो, माझा मनोरथ सिद्धीस गेला. गुरूचें ह्मणणं तूं शेवटास नेलेस २६ आणि, हे महायशस्वी वीरा, ह्या आश्रमाचेंही तूं सिद्धाश्रम हें नांव सत्य करून दाखविलेस ". ह्याप्रमाणें रामाची प्रशंसा केल्यावर ते विश्वामित्रमुनि त्यांच्यासहवर्तमान संध्यावंदन करूं लागले २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

संध्यावंदन झाल्यानंतर त्यांच्या मनांतील उद्देश शेवटास गेला आहे असे ते आनंदित

अथ तां रजनीं तत्र कृतार्थौ रामलक्ष्मणौ । ऊषतुर्मुदितौ वीरौ प्रहृष्टेनान्तरात्मना १ प्रभातायां तु शर्वर्यां कृतपौर्वाह्णिकक्रियौ । विश्वामित्रमृषींश्चान्यान्सहितावभिजग्मतुः २ अभिवाद्य मुनिश्रेष्ठं ज्वलन्तमिव पावकम् । ऊचतुः परमोदारं वाक्यं मधुरभाषिणौ ३ इमौ स्म मुनिशार्दूल किंकरौ समुपागतौ । आज्ञापय मुनिश्रेष्ठ शासनं करवाव किम् ४ एवमुक्ते तयोर्वाक्ये सर्व एव महर्षयः । विश्वामित्रं पुरस्कृत्य रामं वचनमब्रुवन् ५ मैथिलस्य नरश्रेष्ठ जनकस्य भविष्यति । यज्ञः परमधर्मिष्ठस्तत्र यास्यामहे वयम् ६ त्वं चैव नरशार्दूल सहास्माभिर्गमिष्यसि । अद्भुतं च धनूरत्नं तत्र त्वं द्रष्टुमर्हसि ७ तद्धि पूर्वं नरश्रेष्ठ दत्तं सदसि दैवतैः । अप्रमेयबलं घोरं मखे परमभास्वरम् ८ नास्य देवा न गन्धर्वा नासुरा न च राक्षसाः । कर्तुमारोपणं शक्ता न कथंचन मानुषाः ९ धनुषस्तस्य वीर्यं हि जिज्ञासन्तो महीक्षितः । न शेकुरारोपयितुं राजपुत्रा महाबलाः १० तद्धनुर्नरशार्दूल मैथिलस्य महात्मनः । तत्र द्रक्ष्यसि

---

झालेले वीर रामलक्ष्मण त्या रात्रीं सुप्रसन्न अंतःकरणानें त्या आश्रमामध्यें राहिले १ आणि रात्र उजाडल्यावर पूर्वाण्हसंबंधीं स्नानसंध्या आटोपून ते उभयतां, विश्वामित्र आणि इतरही ऋषि ह्यांच्या समीप गेले २. नंतर अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेल्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना अभिवंदन करून ते मधुर भाषण करणार रामलक्ष्मण अत्यंत उदात्त वाणीनें विश्वामित्रमुनींना ह्मणाले ३ " हे मुनिश्रेष्ठ, हे आह्मी दास आलों आहोंत. आतां, हे मुनिश्रेष्ठ, आह्मी आपली काय आज्ञा शिरसास न्यावी ह्याचा हुकूम व्हावा " ४. ह्याप्रमाणें त्यांनीं भाषण केलें असतां विश्वामित्रांना पुढाकार देऊन ते ऋषि रामाला ह्मणाले ५ " हे पुरुषश्रेष्ठा, मैथिलाधिपति जनक राजाच्या घरीं अत्यंत धर्मयुक्त असा यज्ञ होणार असून तिकडे आह्मी जाणार आहोंत ६. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा, तूंही आह्मांसहवर्तमान तेथें चल आणि तें अद्भुत श्रेष्ठ धनुष्य त्या ठिकाणीं तूं अवलोकन कर ७. हे पुरुषश्रेष्ठा रामा, देवरातनामक जो पूर्वींचा जनक राजा होता त्याचा यज्ञ सुरू असतांना अत्यंत उज्ज्वल आणि अतर्क्य सामर्थ्यानें युक्त असें तें घोर धनुष्य देवांनीं यज्ञमंडपामध्यें त्याला दिलेलें आहे ८. देव, गंधर्व, दैत्य आणि राक्षस ह्यांपैकीं कोणीही त्या धनुष्याला प्रत्यंचा चढविण्यास समर्थ नाहींत; मग मानव तर सर्वप्रकारें समर्थ नाहींतच नाहींत ९. महाबलाढ्य राजपुत्रांनीं व राजांनीं त्या धनुष्याचें वीर्य जाणण्याकरितां त्याला प्रत्यंचा चढविण्याची खटपट केली. परंतु, ते समर्थ झाले नाहींत १०. हे पुरुषश्रेष्ठा ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या महात्म्या मैथिलाधिपतीचें

काकुत्स्थ यज्ञं च परमाद्भुतम् ११ तद्धि यज्ञफलं तेन मैथिलेनोत्तमं धनुः। याचितं नरशार्दूल सुनाभं सर्वदैवतैः १२ आयागभूतं नृपतेस्तस्य वेश्मनि राघव। अर्चितं विविधैर्गन्धैर्धूपैश्चागुरुगन्धिभिः १३ एवमुक्त्वा मुनिवरः प्रस्थानमकरोत्तदा। सर्षिसंघः स काकुत्स्थ आमन्त्र्य वनदेवताः १४ स्वस्ति वोऽस्तु गमिष्यामि सिद्धः सिद्धाश्रमादहम्। उत्तरे जाह्नवीतीरे हिमवन्तं शिलोच्चयम् १५ इत्युक्त्वा मुनिशार्दूलः कौशिकः स तपोधनः। उत्तरां दिशमुद्दिश्य प्रस्थातुमुपचक्रमे १६ तं व्रजन्तं मुनिवरमन्वगादनुसारिणाम्। शकटीशतमात्रं तु प्रयाणे ब्रह्मवादिनाम् १७ मृगपक्षिगणाश्चैव सिद्धाश्रमनिवासिनः। अनुजग्मुर्महात्मानं विश्वामित्रं तपोधनम्। निवर्तयामास ततः सर्षिसंघः सपक्षिणः १८ ते गत्वा दूरमध्वानं लम्बमाने दिवाकरे। वासं चक्रुर्मुनिगणाः शोणाकूले समाहिताः १९

---

तें धनुष्य आणि अत्यंत अद्भुत यज्ञ तूं अवलोकन करशील ११. यज्ञामध्यें देव प्रसन्न झाले असतां त्या मैथिलाधिपतीनें यज्ञाचें फल ह्मणून तें उत्कृष्ट धनुष्य त्यांचेपाशीं मागितलें व त्याप्रमाणें शंकरासहवर्तमान सर्व देवांनीं तें सुनाभ ( कणजे उत्कृष्ट प्रकारच्या मुष्टिबंधनस्थानानें युक्त असलेलें ) धनुष्य त्याला अर्पण केलें १२. तेव्हांपासून, हे रघुवंशज रामा, त्या राजाच्या गृहामध्यें त्या यज्ञदेवतांच्या स्थानीं असलेल्या धनुष्याचें, नाना प्रकारचीं गंधें आणि अगुरुगंधांनीं युक्त असलेले धूप, ह्यांच्या योगानें पूजन होत असतें १३. ह्याप्रमाणें रामाला सांगितल्यावर मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांनीं ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मण आणि ऋषिसमुदाय ह्यांसहवर्तमान, वनदेवतांचा निरोप घेऊन, प्रयाण केलें १४. " तुमचें कल्याण असो. माझा मनोरथ सिद्धीस गेला आहे आणि मी आतां ह्या सिद्धाश्रमांतून निघून जान्हवीच्या उत्तर तीरीं असलेल्या हिमालय पर्वतावर जात आहें " १५ असें वनदेवतांना सांगून तें कुशिकवंशज तपोधन विश्वामित्र मुनिश्रेष्ठ उत्तर दिशेला जाण्याच्या उद्देशानें चालूं लागले १६. ह्याप्रमाणें ते मुनिश्रेष्ठ विश्वामित्र जाऊं लागले असतां त्यांचे अनुयायी जे इतर ब्रह्मवेत्ते मुनि त्यांच्या यज्ञपात्रांनीं वगैरे भरलेले शंभर गाडे त्यांच्या मागोमाग गेले. ( सारांश, अग्निहोत्राचें वगैरे शंभर गाडे सामान बरोबर घेऊन विश्वामित्रानुयायी ब्रह्मवेत्ते मुनि त्यांच्या मागोमाग गेले ) १७. इतकेंच नव्हे तर त्या सिद्धाश्रमांत राहणारे मृग व पक्षी ह्यांचे समुदायही त्या महात्म्या सिद्धाश्रमनिवासी मुनींबरोबर तपोधन विश्वामित्रमुनींच्या मागोमाग गेले. परंतु, ऋषिसमुदायासहवर्तमान जात असलेल्या विश्वामित्र मुनींनीं त्या पक्ष्यांना वगैरे परत फिरविलें १८. असो. बराच रस्ता चालून

तस्तंगते दिनकरे स्नात्वा हुतहुताशनाः। विश्वामित्रं पुरस्कृत्य निषेदुरमितौजसः २० रामोपि सहसौमित्रिर्मुनींस्तानभिपूज्य च। अग्रतो निषसादाथ विश्वामित्रस्य धीमतः २१ अथ रामो महातेजा विश्वामित्रं तपोधनम्। पप्रच्छ मुनिशार्दूलं कौतूहलसमन्वितम् २२ भगवन्को न्वयं देशः समृद्धवनशोभितः। श्रोतुमिच्छामि भद्रं ते वक्तुमर्हसि तत्त्वतः २३ नोदितो रामवाक्येन कथयामास सुव्रतः। तस्य देशस्य निखिलमृषिमध्ये महातपाः २४ [ १०३६ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे एकत्रिंशः सर्गः॥ ३१ ॥

ब्रह्मयोनिर्महानासीत्कुशो नाम महातपाः। अक्लिष्टव्रतधर्मज्ञः सज्जनप्रतिपूजकः १ स महात्मा कुलीनायां युक्तायां सुमहाबलान्। वैदर्भ्यां जनयामास चतुरः सदृशान्सुतान् २ कुशाम्बं कुशनाभं च असूर्तरजसं वसुम्। दीप्तियुक्तान्महोत्साहान्क्षत्रधर्मचिकीर्षया ३ तानुवाच कुशः

---

गेल्यावर सूर्य कलला असतां त्या मुनिगणांनीं सावध राहून शोणा नामक नदीच्या तीरीं वास्तव्य केलें १९. नंतर सूर्यास्त होऊं लागला असतां त्या मुनींनीं स्नान केलें आणि अग्निहोत्रहोम आटोपल्यावर विश्वामित्रमुनींना अग्रणीत्व देऊन ते अपरिमित-तेजस्वी मुनि तेथें बसले २०. तेव्हां लक्ष्मणासहवर्तमान रामही त्या मुनींना अभिवंदन करून विवेकी विश्वामित्रमुनींच्या समोर बसला २१. ह्याप्रमाणें सर्वजण बसल्यानंतर मुनिश्रेष्ठ तपोधन विश्वामित्रांना महातेजस्वी रामानें " हे भगवन् , समृद्ध वनानें शोभित असलेला हा प्रदेश कोण ? तें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. ' हे मुनिश्रेष्ठ, आपलें देव बरें करो; ह्याविषयींची यथार्थ हकीकत आपण मला कथन करा " असा प्रश्न केला २२,२३ व ह्याप्रमाणें रामानें प्रार्थना केली असतां त्या सदाचरणसंपन्न महातपस्वी विश्वामित्रमुनींनीं ऋषींमध्यें त्या देशासंबंधीं सर्व कांहीं कथन केलें. २४ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३१ ॥

सज्जनांना मान देणारा, निर्मल तपश्चर्या करणारा आणि धर्मवेत्ता असा एक महातपस्वी कुश ह्मणून मोठा ब्रह्मपुत्र पूर्वी होऊन गेला १. त्या महात्म्यानें क्षात्रधर्म वृद्धिंगत होण्याची इच्छा धरून कुलीन आणि आचरणानें शुद्ध अशा विदर्भराजाच्या कन्येचे ठिकाणीं फारच मोठे बलिष्ठ, देदीप्यमान आणि मोठे उत्साही असे कुशांब, कुशनाभ, असूर्तरजस आणि वसु ह्या नांवाचे आपणासारिखे चार पुत्र उत्पन्न केले २,३. पुढें त्या धार्मिष्ठ व सत्यवचनी पुत्रांना "हे पुत्रहो, प्रजापालन करा; ह्मणजे

पुत्रान्धर्मिष्ठान्सत्यवादिनः । क्रियतां पालनं पुत्रा धर्मं प्राप्स्यथ पुष्कलम् ४ कुशस्य वचनं श्रुत्वा चत्वारो लोकसत्तमाः । निवेशं चक्रिरे सर्वे पुराणां नृवरास्तदा ५ कुशाम्बस्तु महातेजाः कौशाम्बीमकरोत्पुरीम् । कुशनाभस्तु धर्मात्मा पुरं चक्रे महोदयम् ६ असूर्तरजसो नाम धर्मारण्यं महामतिः । चक्रे पुरवरं राजा वसुर्नाम गिरिव्रजम् ७ एषा वसुमती नाम वसोस्तस्य महात्मनः । एते शैलवराः पञ्च प्रकाशन्ते समन्ततः ८ सुमागधी नदी रम्या मागधान्विश्रुता ययौ । पञ्चानां शैलमुख्यानां मध्ये मालेव शोभते ९ सैषा हि मागधी राम वसोस्तस्य महात्मनः । पूर्वाभिचरिता राम सुक्षेत्रा सस्यमालिनी १० कुशनाभस्तु राजर्षिः कन्याशतमनुत्तमम् । जनयामास धर्मात्मा घृताच्यां रघुनन्दन ११ तास्तु यौवनशालिन्यो रूपवत्यः स्वलंकृताः । उद्यानभूमिमागम्य प्रावृषीव शतह्रदाः १२ गायन्त्यो नृत्यमानाश्च वादयन्त्यस्तु राघव । आमोदं परमं

तुह्मांला मोठें पुण्य लागेल " असं तो कुश ह्मणाला असतां ४ त्याचें भाषण श्रवण करून त्या पुरुषश्रेष्ठ व लोकोत्तर अशा सर्व चारही पुत्रांनीं नगरें वसविलीं ५. महातेजस्वी कुशांबानें कौशांबी नगरी वसविली; धर्मात्म्या कुशनाभानें महोदयनामक नगराची स्थापना केली ६ ; महामति असूर्तरजसानें धर्मारण्य वसविलें आणि वसुराजानें गिरिव्रजनामक श्रेष्ठ नगर स्थापिलें ७. तें जें गिरिव्रजनामक नगर तीच त्या महात्म्या वसुराजाची ( सांप्रत ) वसुमती ह्मणून प्रसिद्ध असलेली नगरी होय. ह्या नगरीच्या आसमंतात्भागीं हे पांच श्रेष्ठ पर्वत शोभत आहेत ८ आणि सुमागधी ह्मणून प्रसिद्ध असलेली जी रम्य नदी मगधदेशामध्यें वहात गेलेली आहे ती ह्या पांच श्रेष्ठ पर्वतांमध्यें मालेप्रमाणें शोभत आहे ९. हे रामा, ती ही त्या महात्म्या वसुराजाची मागधी ( ह्मणून प्रसिद्ध असलेली शोणा ) नदी होय. ही नदी पूर्वेकडे वहात जाणारी आहे. हिच्या दोन्ही तीरांवरील प्रदेश चांगला सुपीक आहे व त्यामुळें हिच्या तीरांवर धान्याची समृद्धि आहे १०. हे रघुनंदना, धर्मात्म्या कुशनाभ राजर्षीला सर्वोत्कृष्ट अशा शंभर कन्या घृताचीनामक अप्सरेच्या ठिकाणीं झाल्या ११. पर्जन्यकालीं मेघमंडलांतून बाहेर पडणाऱ्या प्रतिविद्युल्लताच कीं काय अशा त्या रूपवती व उत्तम प्रकारचे अलंकार धारण केलेल्या तरुण कन्या एकदां उपवनामध्यें गेल्या आणि उत्तम प्रकारच्या आभरणांनीं भूषित होऊन गायन, नृत्य व वादन करितां करितां, हे रघुवंशजा रामा, त्या पराकाष्ठेच्या आनंदांत निमग्न झाल्या १२, १३. सारांश, प्रत्येक अवयव सुंदर

जग्मुर्वराभरणभूषिताः १३ अथ ताश्चारुसर्वाङ्ग्यो रूपेणाप्रतिमा भुवि । उद्यानभूमिमागम्य तारा इव घनान्तरे १४ ताः सर्वा गुणसंपन्ना रूपयौवनसंयुताः । दृष्ट्वा सर्वात्मको वायुरिदं वचनमब्रवीत् १५ अहं वः कामये सर्वा भार्या मम भविष्यथ । मानुषस्त्यज्यतां भावो दीर्घमायुरवाप्स्यथ १६ चलं हि यौवनं नित्यं मानुषेषु विशेषतः । अक्षयं यौवनं प्राप्ता अमर्यश्च भविष्यथ १७ तस्य तद्वचनं श्रुत्वा वायोरक्लिष्टकर्मणः । अपहास्य ततो वाक्यं कन्याशतमथाब्रवीत् १८ अन्तश्चरसि भूतानां सर्वेषां सुरसत्तम । प्रभावज्ञाश्च ते सर्वाः किमर्थमवमन्यसे १९ कुशनाभसुता देव समस्ताः सुरसत्तम । स्थानाच्च्यावयितुं देवं रक्षामस्तु तपो वयम् २० मा भूत्स कालो दुर्मेधः पितरं सत्यवादिनम् । अवमन्य स्वधर्मेण स्वयंवरमुपास्महे २१ पिता हि प्रभुरस्माकं दैवतं परमं च सः । यस्य नो दास्यति पिता स नो भर्ता भविष्यति २२ तासां तु वचनं श्रुत्वा

---

असल्यामुळें पृथ्वीमध्यें रूपानें अप्रतिम असलेल्या त्या कन्या उपवनामध्यें आल्या असतां मेघामध्यें असलेल्या चांदण्यांप्रमाणें चमकूं लागल्या १४. तेव्हां सौंदर्य आणि यौवन ह्यांनीं युक्त असलेल्या त्या गुणसंपन्न सर्व कन्यांना अवलोकन करून सर्वात्मक वायु त्यांना ह्मणाला १५ " तुह्मांवर माझें मन गेलें आहे. करितां, तुह्मी सर्वजणी माझ्या भार्या व्हा, ह्मणजे मनुष्यत्वाचा त्याग होऊन तुह्मांला दीर्घ आयुष्य प्राप्त होईल १६. विशेषतः मनुष्यांमध्यें यौवन हें नेहमीं अगदीं चंचलच असतें. तस्मात्, तुह्मी अक्षय यौवन प्राप्त करून घेऊन अमर व्हा " १७. ह्याप्रमाणें त्या महापराक्रमी वायूचें भाषण श्रवण केल्यावर त्याच्या भाषणाचा उपहास करून त्या शंभर कन्या त्याला ह्मणाल्या १८ " हे सुरश्रेष्ठा, तूं प्राणिमात्रामध्यें संचार करणारा आहेस आणि आह्मी सर्वही तुझा प्रभाव जाणणाऱ्या आहोंत. तस्मात्, तूं उगींच आमची अवहेलना कशाकरितां करीत आहेस ? १९. हे देवा, आह्मी कुशनाभाच्या कन्या आहोंत आणि हे सुरश्रेष्ठा, (आमचा उपमर्द करण्यास प्रवृत्त झालेल्या तुझ्यासारिख्या) देवालाही देवत्वापासून च्युत करण्यास आह्मी समर्थ आहोंत; परंतु, आह्मी तपाचें रक्षण करीत आहोंत. (शाप दिला असतां तपाचा क्षय होईल ह्मणून आह्मी ती गोष्ट मनांत आणीत नाहीं) २०. हे दुर्बुद्धे, सत्यवादी पित्याचा अवमान करून विषयवासना उत्कट झाल्यामुळें स्वेच्छेनें पति वरण्यास आह्मी प्रवृत्त व्हावें असा प्रसंग आमच्यावर कधींही न येवो २१. अरे, पिता हा आमचा प्रभु असून आमचें परम दैवतही तोच आहे. ह्यास्तव, ज्या पुरुषाला आमचा पिता आह्मांला देईल तो आमचा भर्ता होईल " २२. हें त्या

हरिः परमकोपनः। प्रविश्य सर्वगात्राणि बभञ्ज भगवान्प्रभुः २३ ताः कन्या वायुना भग्ना विविशुर्नृपतेर्गृहम्। प्रविश्य च सुसंभ्रान्ताः सलज्जाः साश्रलोचनाः २४ स च ता दयिता भग्नाः कन्याः परमशोभनाः। दृष्ट्वा दीनास्तदा राजा संभ्रान्त इदमब्रवीत् २५ किमिदं कथ्यतां पुत्र्यः को धर्ममवमन्यते। कुब्जाः केन कृताः सर्वाश्चेष्टन्त्यो नाभिभाषथ २६ एवं राजा विनिःश्वस्य समाधिं संदधे ततः २७ [ १०६३ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा कुशनाभस्य धीमतः। शिरोभिश्चरणौ स्पृष्ट्वा कन्याशतमभाषत १ वायुः सर्वात्मको राजन्प्रधर्षयितुमिच्छति। अशुभं मार्गमास्थाय न धर्मं प्रत्यवेक्षते २ पितृमत्यः स्म भद्रं ते स्वच्छन्देन वयं स्थिताः। पितरं नो वृणीष्व त्वं यदि नो दास्यते तव ३ तेन पापानुबन्धेन

---

कन्यांचें भाषण श्रवण करून भगवान् समर्थ वायु पराकाष्ठेचा क्रुद्ध झाला आणि त्या कन्यांच्या सर्व गात्रांमध्यें प्रविष्ट होऊन त्यानें त्यांना मोडून टाकिल्या २३. ह्याप्रमाणें वायूच्या योगानें अंगभंग झालेल्या त्या कन्या राजाच्या घरांत प्रविष्ट झाल्या आणि प्रविष्ट झाल्यावर मनामध्यें अतिशयच गांधळून गेलेल्या त्या कन्या लज्जित होऊन डोळ्यांमध्यें अश्रु आणू लागल्या असतां २४ स्वतःला प्रिय आणि फारच सुंदर अशा त्या कन्या भग्न व ह्मणूनच दीन झालेल्या अवलोकन केल्याबरोबर राजा गांधळून जाऊन त्यांना ह्मणाला २५ " मुलींनों, हें काय तें सांगा. धर्माचें अतिक्रमण कोण बरें करीत आहे ? ( तें मला कळूं द्या. ) तुह्मां सर्वांना कुबड्या कोणीं करून टाकिल्या व तुह्मी विवळत असून माझ्याशीं कां भाषण करीत नाहीं ? ( हें मला सांगा ) " २६. ह्याप्रमाणें त्यांना विचारून व दुःखाचा सुस्कारा टाकून त्यांचें उत्तर ऐकण्याकरितां राजा एकाग्र चित्त करून बसला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

त्या विचारी कुशनाभाचें तें भाषण श्रवण केल्यावर त्याच्या चरणीं मस्तक ठेवून त्या शंभर कन्या त्याला ह्मणाल्या १ " हे राजा, सर्वात्मक वायु, पापमार्गाचें अवलंबन करून आह्मांवर बलात्कार करण्याची इच्छा करीत आहे; तो धर्माकडे लक्ष्य देत नाहीं २. तुझें कल्याण असो. आह्मी पित्याच्या अधीन आहोंत. पतीचा स्वीकार करण्याविषयीं आह्मी स्वतंत्र नाहीं. करितां, तूं आमची पित्यापाशीं मागणी कर आणि तो जर आह्मांला तुला अर्पण करील तर आह्मी तुझ्या होऊं ३ असें आह्मी सर्वही त्याला

वचनं न प्रतीच्छता । एवं ब्रुवन्त्यः सर्वाः स्म वायुनाभिहता भृशम् ४ तासां तु वचनं श्रुत्वा राजा परमधार्मिकः । प्रत्युवाच महातेजाः कन्याशतमनुत्तमम् ५ क्षान्तं क्षमावतां पुत्र्यः कर्तव्यं सुमहत्कृतम् । ऐकमत्यमुपागम्य कुलं चावेक्षितं मम ६ अलंकारो हि नारीणां क्षमा तु पुरुषस्य वा । दुष्करं तच्च वै क्षान्तं त्रिदशेषु विशेषतः ७ यादृशी वः क्षमा पुत्र्यः सर्वासामविशेषतः । क्षमा दानं क्षमा सत्यं क्षमा यज्ञाश्च पुत्रिकाः ८ क्षमा यशः क्षमा धर्मः क्षमायां विष्ठितं जगत् । विसृज्य कन्याः काकुत्स्थ राजा त्रिदशविक्रमः ९ मन्त्रज्ञो मन्त्रयामास प्रदानं सह मन्त्रिभिः । देशे काले च कर्तव्यं सदृशे प्रतिपादनम् १० एतस्मिन्नेव काले तु चूली नाम महाद्युतिः । ऊर्ध्वरेताः शुभाचारो ब्राह्मं तप उपागमत् ११ तपस्यन्तमृषिं तत्र गन्धर्वी पर्युपासते । सोमदा नाम भद्रं ते ऊर्मिलातनया तदा १२ सा च तं प्रणता भूत्वा शुश्रूषणपरायणा । उवास काले धर्मिष्ठा तस्या-

---

सांगत असतांना आमच्या सांगण्याची परवा न करणाऱ्या त्या पापबुद्धि वायूनें आह्मांवर पराकाष्ठेचा घाला घातला " ४. हें त्यांचें भाषण श्रवण करून तो महातेजस्वी महाधार्मिक राजा आपल्या उत्कृष्ट शंभर कन्यांना ह्मणाला ५ " मुलींनों, क्षमाशीलांना योग्य जी क्षमा ती तुह्मी एकमत करून केलीत आणि माझ्या कुलाकडें दृष्टि दिलीत हें तुह्मीं फारच मोठें कृत्य केलेंत ६. स्त्रियांना आणि त्याचप्रमाणें पुरुषांनाही क्षमा हें भूषण आहे आणि विशेषतः देवांचे ठिकाणीं तुह्मी क्षमा दाखविलींत हें तर तुह्मीं फारच दुष्कर कर्म केलें आहे ७. हे मुलींनों, जशी तुमचे ठिकाणीं क्षमा आहे तशीच सर्वांचे ठिकाणीं असो. कारण, हे कन्यांनों, दान, सत्य, यज्ञ ८, यश, व धर्म ह्या सर्वांचा अंतर्भाव क्षमेंतच होत असून क्षमाच ह्या जगताला मुख्य आधार आहे ". हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, ह्याप्रमाणें त्या कन्यांची समजूत करून व त्यांना निरोप देऊन तो देवतुल्यपराक्रमी व मसलती राजा योग्य ठिकाणीं योग्य वेळीं आणि योग्य वराला आपल्या कन्या देण्याविषयीं मंत्र्यांसहवर्तमान विचार करूं लागला. ९, १०. ह्याच वेळीं महातेजस्वी, ऊर्ध्वरेते आणि सदाचरणसंपन्न असे एक चूलिनामक महर्षि ब्रह्मप्राप्तिविषयक तपश्चर्या करीत होते ११ आणि तुझें देव बरें करो, हे रामा, ऊर्मिलेची कन्या सोमदानामक गंधर्वी आपणावर अनुग्रह होण्याविषयीं त्या तपश्चर्या करणाऱ्या ऋषीच्या सेवा करीत होती १२. सारांश, नम्रतापूर्वक सेवेमध्यें तत्पर राहून ती धर्मनिष्ठ गंधर्वी ऋषिसंनिध राहिली असतां ते महर्षि गुरु त्यावेळीं तिच्यावर संतुष्ट झाले १३ आणि, हे रघुनंदना, तिचें कल्याण

स्तुष्टाभवद्गुरुः १३ स च तां कालयोगेन प्रोवाच रघुनन्दन। परितुष्टोस्मि भद्रं ते किं करोमि तव प्रियम् १४ परितुष्टं मुनिं ज्ञात्वा गन्धर्वी मधुरस्वरम्। उवाच परमप्रीता वाक्यज्ञा वाक्यकोविदम् १५ लक्ष्म्या समुदितो ब्राह्म्या ब्रह्मभूतो महातपाः। ब्राह्मेण तपसा युक्तं पुत्रमिच्छामि धार्मिकम् १६ अपतिश्चास्मि भद्रं ते भार्या चास्मि न कस्यचित्। ब्राह्मेणोपगतायाश्च दातुमर्हसि मे सुतम् १७ तस्याः प्रसन्नो ब्रह्मर्षिर्ददौ ब्राह्ममनुत्तमम्। ब्रह्मदत्त इति ख्यातं मानसं चूलिनः सुतम् १८ स राजा ब्रह्मदत्तस्तु पुरीमध्यवसत्तदा। काम्पिल्यां परया लक्ष्म्या देवराजो यथा दिवम् १९ स बुद्धिं कृतवान्राजा कुशनाभः सुधार्मिकः। ब्रह्मदत्ताय काकुत्स्थ दातुं कन्याशतं तदा २० तमाहूय महातेजा ब्रह्मदत्तं महीपतिः। ददौ कन्याशतं राजा सुप्रीतेनान्तरात्मना २१ यथाक्रमं तदा पाणिं जग्राह रघुनन्दन। ब्रह्मदत्तो महीपालस्तासां देवपतिर्यथा २२ स्पृष्टमात्रे

होण्याची वेळ आल्यामुळें ते तिला ह्मणाले " तुझें कल्याण असो. मी तुझ्यावर संतुष्ट झालों आहें. तुझें कोणतें प्रिय करूं तें मला सांग " १४. ह्याप्रमाणें ते मुनि संतुष्ट झाले आहेत असें जाणून दुसऱ्याशीं संभाषण कसें करावें हें जाणत असलेली ती गंधर्वी पराकाष्ठेची आनंदित होऊन त्या संभाषणवेत्त्या ऋषींना मधुर वाणीनें ह्मणाली १५ " हे महातपस्वी, आपण आपल्या ब्रह्मतेजाच्या योगानें युक्त होऊन केवळ ब्रह्मरूप बनलेले आहांत. तस्मात्, ब्रह्मतपानें युक्त असा धार्मिक पुत्र होण्याची मला इच्छा आहे १६. हे मुने, तुमचें देव बरें करो. मी पतिरहित आहें व तशीच पुढेंही राहणार आहें सारांश, मी कोणाचीही भार्या होणार नाहीं. करितां, आपणांपाशीं शरण आलेल्या मला ब्रह्मसंबंधीं उपायानें आपण एक पुत्र प्राप्त करून द्यावा " १७. ह्याप्रमाणें तिनें प्रार्थना केली असतां त्या चूली ब्रह्मर्षींनीं प्रसन्न होऊन अनुपम अशा ब्रह्मविषयक तपःसामर्थ्यानें ब्रह्मदत्त ह्मणून प्रसिद्ध असलेला एक मानस पुत्र तिला दिला १८. तेव्हां तो ब्रह्मदत्त राजा देवराज इंद्र ज्याप्रमाणें स्वर्गामध्यें राहतो त्याप्रमाणें पराकाष्ठेच्या शोभेनें युक्त अशा कांपिल्या नगरीमध्यें राहूं लागला १९. असो. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, इकडे त्या अत्यंत धार्मिक कुशनाभ राजानें आपल्या शंभर कन्या ब्रह्मदत्ताला देण्याचें मनामध्यें आणिलें २० आणि त्याप्रमाणें त्या ब्रह्मदत्ताला बोलावून आणून सुप्रसन्न अंतःकरणानें महातेजस्वी व पृथ्वीपति अशा कुशनाभ राजानें त्या शंभर कन्या त्याला अर्पण केल्या २१. तेव्हां, हे रघुनंदना रामा, त्या इंद्रतुल्य ब्रह्मदत्त भूपालानें अनुक्रमानें त्या कन्यांचें

तदा पाणौ विकुब्जा विगतज्वराः। युक्तं परमया लक्ष्म्या बभौ कन्याशतं तदा २३ स दृष्ट्वा वायुना मुक्ताः कुशनाभो महीपतिः। बभूव परमप्रीतो हर्षं लेभे पुनः पुनः २४ कृतोद्वाहं तु राजानं ब्रह्मदत्तं महीपतिम्। सदारं प्रेषयामास सोपाध्यायगणं तदा २५ सोमदापि सुतं दृष्ट्वा पुत्रस्य सदृशीं क्रियाम्। यथान्यायं च गन्धर्वी स्नुषास्ताः प्रत्यनन्दत २६ स्पृष्ट्वा स्पृष्ट्वा च ताः कन्याः कुशनाभं प्रशस्य च २७ इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥३३॥

कृतोद्वाहे गते तस्मिन्ब्रह्मदत्ते च राघव। अपुत्रः पुत्रलाभाय पौत्रीमिष्टिमकल्पयत् १ इष्ट्यां तु वर्तमानायां कुशनाभं महीपतिम्। उवाच परमोदारः कुशो ब्रह्मसुतस्तदा २ पुत्रस्ते सदृशः पुत्र भविष्यति सुधार्मिकः। गाधिं प्राप्स्यसि तेन त्वं कीर्तिं लोके च शाश्वतीम् ३ एवमुक्त्वा कुशो राम कुशनाभं महीपतिम्। जगामाकाशमाविश्य ब्रह्मलोकं

पाणिग्रहण केलें २२. परंतु, त्या कन्यांच्या हाताला राजाचा स्पर्श होतांक्षणींच कुबडें नाहींशीं होऊन त्या शंभरही कन्या निश्चिंत झाल्या आणि पराकाष्ठेच्या सौंदर्यानें युक्त होऊन झळकूं लागल्या. २३. तेव्हां वायूनें सोडिलेल्या त्या कन्या अवलोकन करून कुशनाभ भूपति पराकाष्ठेचा आनंदित झाला आणि वारंवार त्याला हर्ष होऊं लागला २४. तदनंतर विवाह झाल्यावर पृथ्वीपति ब्रह्मदत्त राजाला उपाध्यायगणासहवर्तमान कुशनाभ राजानें आपल्या नगरीप्रत सपत्नीक पाठवून दिलें २५. तेव्हां आपला पुत्र व त्याला योग्य अशा स्त्रिया प्राप्त झाल्याचें अवलोकन करून त्या सोमदा गंधर्वीनें फिरून फिरून त्या कन्यांचे अंगावरून हात फिरवून व कुशनाभाची प्रशंसा करून त्या स्नुषांचें यथायोग्य रीतीनें अभिनंदन केलें २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

हे रघुवंशजा रामा, विवाह करून तो ब्रह्मदत्त गेल्यावर त्या निपुत्रिक कुशनाभराजानें पुत्रप्राप्तीकरितां पुत्रकामेष्टि याग करण्याचें मनामध्यें आणिलें १. पुढें तो याग सुरू झाल्यावर कुशनाभ भूपतीला अत्यंत उदार असा कुशनामक ब्रह्मपुत्र ह्मणाला २ "मुला, अत्यंत धार्मिक आणि तुला योग्य असा पुत्र प्राप्त होईल. सारांश, गाधिनामक पुत्र तुला प्राप्त होईल आणि त्याच्या योगानें तुझी अक्षय कीर्ति राहील "३. ह्याप्रमाणें, हे रामा, कुशनाभ भूपतीला सांगितल्यावर आकाशामध्यें प्रविष्ट होऊन तो कुश सनातन ब्रह्मलोकाला चालता झाला ४. पुढें ह्या

सनातनम् ४ कस्यचित्त्वथ कालस्य कुशनाभस्य धीमतः । जज्ञे परमधर्मिष्ठो गाधिरित्येव नामतः ५ स पिता मम काकुत्स्थ गाधिः परमधार्मिकः । कुशवंशप्रसूतोस्मि कौशिको रघुनन्दन ६ पूर्वजा भगिनी चापि मम राघव सुव्रता । नाम्ना सत्यवती नाम ऋचीके प्रतिपादिता ७ सशरीरा गता स्वर्गं भर्तारमनुवर्तिनी । कौशिकी परमोदारा प्रवृत्ता च महानदी ८ दिव्या पुण्योदका रम्या हिमवन्तमुपाश्रिता । लोकस्य हितकार्यार्थं प्रवृत्ता भगिनी मम ९ ततोहं हिमवत्पार्श्वे वसामि नियतः सुखम् । भगिन्यां स्नेहसंयुक्तः कौशिक्यां रघुनन्दन १० सा तु सत्यवती पुण्या सत्ये धर्मे प्रतिष्ठिता । पतिव्रता महाभागा कौशिकी सरितां वरा ११ अहं हि नियमाद्राम हित्वा तां समुपागतः । सिद्धाश्रममनुप्राप्तः सिद्धोस्मि तव तेजसा १२ एषा राम ममोत्पत्तिः स्वस्य वंशस्य कीर्तिता । देशस्य हि महाबाहो यन्मां त्वं परिपृच्छसि १३ गतोर्धरात्रः काकुत्स्थ कथाः

---

गोष्टीला कांहीं दिवस लोटल्यावर अत्यंत धर्मनिष्ठ असा गाधिनामक पुत्र विचारी कुशनाभाला झाला ५. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तो परम धार्मिक गाधी माझा पिता होय. हे रघुनंदना, कुशाच्या वंशामध्यें उत्पन्न झालों असल्यामळें मी कौशिक आहें ६. हे राघवा, उत्तम आचरणानें युक्त अशी एक माझी सत्यवतीनामक ज्येष्ठ भगिनी असून ती ऋचीकाला दिलेली होती ७. सर्वस्वीं भर्त्याच्या मताप्रमाणें वागणारी ती भगिनी देहासहवर्तमान स्वर्गाला गेली. तेव्हां फारच भव्य अशी ही कौशिकीनामक महानदी तिच्या रूपानें ह्या पृथ्वीवर प्राप्त झाली ८. सारांश, दिव्य, पवित्र उदकानें युक्त आणि रमणीय अशी माझी भगिनी हिमालयाचें अवलंबन करून लोकांचें हित करण्याकरितां प्रवृत्त झालेली आहे ९. असो. हे रघुनंदना, भगिनीचे ठिकाणीं माझें फारच प्रेम असल्यामुळें हिमालयावर कौशिक नदीचे संनिध मी नित्य सुखानें रहात असतों १०. नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेली ही कौशिकी माझी सत्यवतीनामक भगिनी असून ती पतिव्रता, महाभाग्यवती, पवित्र आणि सत्यधर्माचें अवलंबन करून राहणारी आहे ११. हे रामा, मी कांहीं सिद्धीच्या उद्देशानें तिला टाकून आलों आहें ह्मणजे ह्या सिद्धाश्रमाप्रत प्राप्त झालों आहें आणि तुझ्या तेजाच्या योगानें ती माझी कार्यसिद्धिही झालेली आहे १२. हे रामा, ही मीं आपली व माझ्या वंशाची उत्पत्ति तुला कथन केली आणि, हे महापराक्रमी रामा, ह्या देशाचा जो इतिहास तूं मला विचारिला होतास तोही मीं तुला कथन केला १३. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, मी गोष्टी सांगतां सांगतां मध्यरात्र होऊन गेली. करितां, आतां तूं झोंप घे; तुझें

कथयतो मम । निद्रामभ्येहि भद्रं ते मा भूद्विघ्नोऽध्वनीह नः १४ निष्पन्दास्तरवः सर्वे निलीना मृगपक्षिणः । नैशेन तमसा व्याप्ता दिशश्च रघुनन्दन १५ शनैर्विसृज्यते संध्या नभो नेत्रैरिवावृतम् । नक्षत्रतारागहनं ज्योतिर्भिरवभासते १६ उत्तिष्ठते च शीतांशुः शशी लोकतमोनुदः । ह्लादयन्प्राणिनां लोके मनांसि प्रभया स्वया १७ नैशानि सर्वभूतानि प्रचरन्ति ततस्ततः । यक्षराक्षससङ्घाश्च रौद्राश्च पिशिताशनाः १८ एवमुक्त्वा महातेजा विरराम महामुनिः । साधु साध्विति ते सर्वे मुनयो ह्यभ्यपूजयन् १९ कुशिकानामयं वंशो महान्धर्मपरः सदा । ब्रह्मोपमा महात्मानः कुशवंश्या नरोत्तमाः २० विशेषेण भवानेव विश्वामित्र महायशः । कौशिकी सरितां श्रेष्ठा कुलोद्योतकरी तव २१ मुदितैर्मुनिशार्दूलैः प्रशस्तः कुशिकात्मजः । निद्रामुपागमच्छ्रीमानस्तं गत इवांशुमान् २२ रामोऽपि सह सौमित्रिः किंचिदागतविस्मयः । प्रशस्य मुनिशार्दूलं निद्रां

---

कल्याण असो. आपल्या मार्गाला ह्या ठिकाणीं ( जागरण वगैरे झाल्यामुळें ) विघ्न न येवो १४. हे रघुनंदना, सर्व वृक्षांचीं पानेंही अगदीं हलेनाशीं झालीं आहेत; सर्व पशुपक्षी निद्रेमध्यें लीन होऊन गेले आहेत आणि सर्व दिशा रात्रीच्या अंधकारानें व्याप्त झाल्या आहेत १५. ( असेंच आपण गोष्टी सांगत बसलों ) तर हळूहळू संध्येचाही समय होऊं लागेल. नक्षत्रें आणि तारका ह्यांनीं भरलेलें आकाश ज्योतींच्या योगानें नेत्रांनीं आच्छादित झाल्यासारखें भासत आहे १६. जगतांतील अंधकार नाहींसा करणारा हा शीतकिरणांनीं युक्त असलेला चंद्र स्वतःच्या प्रभेनें जगतांतील प्राण्यांच्या मनाला आल्हाद देत देत उदय पावत आहे १७ आणि घोर व मांसभक्षक असे यक्षराक्षसांचे समुदाय आणि इतरही सर्व प्रकारचे निशाचर प्राणी इकडून तिकडे व तिकडून इकडे संचार करीत आहेत १८. ह्याप्रमाणें सांगून ते महातेजस्वी महर्षि विश्वामित्र स्तब्ध राहिले असतां "फार उत्तम." असें ह्मणून सर्वही मुनींनीं त्यांची प्रशंसा केली १९ आणि ते ह्मणाले "हा कुशिकांचा वंश नेहमींच मोठा धर्मनिष्ठ आहे. कुशवंशामध्यें उत्पन्न झालेले सर्वही पुरुष पुरुषश्रेष्ठ, महात्मे व ब्रह्मतुल्य आहेत २० आणि, हे महायशस्वी विश्वामित्रमुने, विशेषतः आपण तर तसेच असून नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेली ही कौशिकी आपल्या कुलाचा उद्धार करणारी आहे" २१. ह्याप्रमाणें आनंदित झालेल्या ऋषिश्रेष्ठांनीं प्रशंसा केली असतां अस्तंगत झालेल्या सूर्याप्रमाणें कुशिकनंदन विश्वामित्रमहर्षि झोंपीं गेले २२ व किंचित् आश्चर्यचकित झालेल्या रामांनींही लक्ष्मणासहवर्तमान

ममुपसेवत २३ [ ११३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥ ३४ ॥

उपास्य रात्रिशेषं तु शोणाकूले महर्षिभिः । निशायां सुप्रभातायां विश्वामित्रोऽभ्यभाषत १ सुप्रभाता निशा राम पूर्वा सन्ध्या प्रवर्तते । उत्तिष्ठोत्तिष्ठ भद्रं ते गमनायाभिरोचय २ तच्छ्रुत्वा वचनं तस्य कृतपूर्वाह्णिकक्रियः । गमनं रोचयामास वाक्यं चेदमुवाच ह ३ अयं शोणः शुभजलोऽगाधः पुलिनमण्डितः । कतरेण पथा ब्रह्मन्संतरिष्यामहे वयम् ४ एवमुक्तस्तु रामेण विश्वामित्रोऽब्रवीदिदम् । एष पन्था मयोद्दिष्टो येन यान्ति महर्षयः ५ ते गत्वा दूरमध्वानं गतेऽर्धदिवसे तदा । जाह्नवीं सरितां श्रेष्ठां ददृशुर्मुनिसेविताम् ६ तां दृष्ट्वा पुण्यसलिलां हंससारससेविताम् । बभूवुर्मुनयः सर्वे मुदिताः सह राघवाः ७ तस्यास्तीरे तदा सर्वे चक्रुर्वासपरिग्रहम् । ततः स्नात्वा यथान्यायं संतर्प्य पितृदेवताः ८ हुत्वा चैवाग्निहोत्राणि प्राश्य चामृतवद्धविः । विविशुर्जाह्नवीतीरे शुभा मुदितमानसाः ९

मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांची प्रशंसा करून निद्रेचा स्वीकार केला २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चवतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३४ ॥

अवशिष्ट राहिलेली रात्र महर्षींसहवर्तमान शोणानदीचे तीरीं घालवून ती रात्र उजाडल्यावर विश्वामित्र ह्मणाले १ " हे रामा, रात्र उजाडली. अरे, पूर्वेकडे तांबडें फुटलें. तुझें कल्याण असो. ऊठ ऊठ आणि आतां पुढें जाण्याचे मनांत आण " २. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण श्रवण केल्यावर प्रातःकाळचें आह्निक आटोपून रामानें पुढें जाण्याचें मनांत आणून त्यांना विचारिलें ३ " पवित्र जलानें युक्त व वालुकेनें भूषित असा हा अगाध शोणनद आहे. ह्यास्तव, हे ब्रह्मन्, आतां आपण कोणत्या मार्गानें ह्यांतून तरून जावें ? " ४. ह्याप्रमाणें रामानें प्रश्न केला असतां " ह्या मार्गानें जाण्याचें मीं मनामध्यें योजिलें आहे; कारण, महर्षि ह्याच मार्गानें जात असतात " असें विश्वामित्रांनीं त्याला सांगितलें ५. तेव्हां लांबपर्यंत रस्ता चालून जाऊन दोन प्रहर दिवस आला असतां मुनींनीं सेवित आणि नद्यांमध्यें श्रेष्ठ अशी जान्हवी त्यांनीं अवलोकन केली ६ व हंस आणि सारसपक्षी ह्यांनीं आश्रित व पवित्र जलानें युक्त अशी ती जान्हवी अवलोकन केल्याबरोबर रघुवंशज रामलक्ष्मणांसहवर्तमान सर्व मुनि आनंदित झाले ७. पुढें तिचे तीरीं सडासंमार्जन वगैरे करून वास्तव्य करण्याची तजवीज केल्यानंतर स्नान करून, पितरांचें व देवांचें यथाविधि संतर्पण करून ८, अग्नि-

विश्वामित्रं महात्मानं परिवार्य समन्ततः । विष्ठिताश्च यथान्यायं राघवौ च यथार्हतः । संप्रहृष्टमना रामो विश्वामित्रमथाब्रवीत् १० भगवञ्छ्रोतुमिच्छामि गङ्गां त्रिपथगां नदीम् । त्रैलोक्यं कथमाक्रम्य गता नदनदीपतिम् ११ चोदितो रामवाक्येन विश्वामित्रो महामुनिः । वृद्धिं जन्म च गङ्गाया वक्तुमेवोपचक्रमे १२ शैलेन्द्रो हिमवान्नाम धातूनामाकरो महान् । तस्य कन्याद्वयं राम रूपेणाप्रतिमं भुवि १३ या मेरुदुहिता राम तयोर्माता सुमध्यमा । नाम्ना मेना मनोज्ञा वै पत्नी हिमवतः प्रिया १४ तस्यां गङ्गेयमभवज्ज्येष्ठा हिमवतः सुता । उमा नाम द्वितीयाभूत्कन्या तस्यैव राघव १५ अथ ज्येष्ठां सुराः सर्वे देवकार्यचिकीर्षया । शैलेन्द्रं वरयामासुर्गङ्गां त्रिपथगां नदीम् १६ ददौ धर्मेण हिमवांस्तनयां लोकपावनीम् । स्वच्छन्दपथगां गङ्गां त्रैलोक्यहितकाम्यया १७ प्रतिगृह्य त्रिलोकार्थं त्रिलोकहितकाङ्क्षिणः । गङ्गामादाय तेगच्छन्कृ-

---

होत्र होम देऊन व ( पंचयज्ञावशिष्ट आणि ह्मणूनच ) अमृततुल्य असें अन्न भक्षण करून ते सर्वही पवित्र मुनि प्रसन्न अंतःकरणानें जान्हवीच्या तीरीं राहिले ९. नंतर महात्म्या विश्वामित्रमुनींच्या आसमंतात्भागीं गराडा गालून ते सर्व मुनि व रघुवंशज रामलक्ष्मण आपआपल्या योग्यतेप्रमाणें यथान्याय बसले असतां प्रसन्न अंतःकरणानें युक्त झालेला राम विश्वामित्रांना विचारूं लागला कीं १० " हे भगवन्, तीन मार्गांनीं गमन करणारी ही गंगानदी त्रैलोक्य व्यापून सागराकडे कशी गेली हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे " ११. ह्याप्रमाणें महामुनि विश्वामित्र रामाच्या भाषणानें प्रेरित झाले असतां गंगेची उत्पत्ति व वृद्धि कथन करण्याचाच त्यांनीं उपक्रम केला १२. ( ते ह्मणाले ) हे रामा, धातूंची मोठी खाणच असलेला जो पर्वतराज हिमालय त्याला, हे रामा, पृथ्वीमध्यें रूपानें अप्रतिम अशा दोन कन्या आहेत १३. हे रामा, मेना ह्मणून जी अत्यंत सुंदर व मनोहर अशी मेरुपर्वताची कन्या ती हिमालयाची प्रिय पत्नी असून त्यांची माता होय १४. त्या मेनेचे ठिकाणीं हिमालयाची ज्येष्ठ कन्या ही गंगा उत्पन्न झाली आणि, हे रघुवंशजा रामा, उमा ह्मणून दुसरी एक कन्या त्या हिमालयाचीच होय १५. पुढें देवकार्य सिद्धीस नेण्याकरितां सर्व देवांनीं मिळून तीन मार्गांनीं जाणारी जी गंगानदी ज्येष्ठ कन्या तिची पर्वतराज हिमालयापाशीं मागणी केली असतां १६ हिमालयपर्वतानें त्रैलोक्याचें हित व्हावें एतदर्थ स्वेच्छेस येईल त्या मार्गानें गमन करणारी आपली जगताला पावन करणारी गंगानामक कन्या धर्मानें देवांना दिली १७. तेव्हां त्रैलोक्याचें हित करण्याची इच्छा धरून असलेले

तार्थेनान्तरात्मना १८ या चान्या शैलदुहिता कन्यासीद्रघुनन्दन। उग्रं सुव्रतमास्थाय तपस्तेपे तपोधना १९ उग्रेण तपसा युक्तां ददौ शैलवरः सुताम्। रुद्रायाप्रतिरूपाय उमां लोकनमस्कृताम् २० एते ते शैलराजस्य सुते लोकनमस्कृते। गङ्गा च सरितां श्रेष्ठा उमा देवी च राघव २१ एतत्ते सर्वमाख्यातं यथा त्रिपथगामिनी। खं गता प्रथमं तात गतिं गतिमतां वर॥ सुरलोकं समारूढा विपापा जलवाहिनी २२ [११३५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः॥ ३५॥

उक्तवाक्ये मुनौ तस्मिन्नुभौ राघवलक्ष्मणौ। प्रतिनन्द्य कथां वीरावूचतुर्मुनिपुङ्गवम् १ धर्मयुक्तमिदं ब्रह्मन्कथितं परमं त्वया। दुहितुः शैलराजस्य ज्येष्ठाया वक्तुमर्हसि २ विस्तरं विस्तरज्ञोसि दिव्यं मानुषसंभवम्। त्रीन्पथो हेतुना केन प्लावयेल्लोकपावनी ३ कथं गङ्गा त्रिपथगा विश्रुता सरिदुत्तमा। त्रिषु लोकेषु धर्मज्ञ कर्मभिः कैः समन्विता ४ तथा ब्रुवति काकुत्स्थे विश्वामित्रस्तपोधनः। निखिलेन कथां सर्वामृषिमध्ये

ते देव त्रैलोक्याच्या हिताकरितां त्या गंगेचा स्वीकार करून मनामध्यें कृतकृत्य झाले आणि तिला घेऊन गेले १८. हे रघुनंदना रामा, दुसरी जी पर्वताची तपस्वी कन्या होती ती कडकडीत नियमाचें अवलंबन करून तपश्चर्या करीत होती १९ व ती जगद्वंद्य तपस्वी कन्या उमा अतुल अशा रुद्राला पर्वतराज हिमालयानें अर्पण केली २०. हे रघुवंशजा रामा, नद्यांमध्यें श्रेष्ठ असलेली गंगा आणि उमा देवी ह्या पर्वतराज हिमालयाच्या जगद्वंद्य कन्या मीं तुला कथन केल्या २१. सारांश, हे गतिमानांमध्यें श्रेष्ठ रामा, हें मीं तुला सर्व कथन केलें. आतां, गंगा त्रिपथगामिनी कशी झाली ऐकशील तर, बा रामा, विपापा व जलवाहिनी अशी ती गंगा प्रथम आकाशमार्गाला जाऊन नंतर देवलोकीं आरूढ झाली २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पस्तिसावा सर्ग समाप्त झाला॥ ३५॥

ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींनीं प्रश्नाचें उत्तर दिलें असतां उभयतां वीर रामलक्ष्मण त्या कथेचें अभिनंदन करून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना ह्मणाले १ "ब्रह्मन्, अत्यंत धर्मयुक्त असें हें वृत्त आपण कथन केलेंत. आतां पर्वतराजाच्या ज्येष्ठकन्येचें, देवलोक व मनुष्यलोक एतत्संबंधीं, चरित्र सविस्तर कथन करा; आपण सविस्तर हकीकत जाणणारे आहांत. हे धर्मज्ञ, ही लोकपावनी गंगा कोणत्या कारणामुळें तीन मार्ग व्याप्त करूं लागली? तशीच ही श्रेष्ठ नदी त्रिपथगा ह्मणून कशी विख्यात झाली आणि त्रैलोक्यामध्यें हिचीं कर्में तरी काय काय आहेत?" २, ३, ४. ह्याप्रमाणें

न्यवेदयत् ५ पुरा राम कृतोद्वाहः शितिकण्ठो महातपाः । दृष्ट्वा च भगवान्देवीं मैथुनायोपचक्रमे ६ तस्य संक्रीडमानस्य महादेवस्य धीमतः । शितिकण्ठस्य देवस्य दिव्यं वर्षशतं गतम् ७ न चापि तनयो राम तस्यामासीत्परंतप । सर्वे देवाः समुद्विग्नाः पितामहपुरोगमाः ८ यदिहोत्पद्यते भूतं कस्तत्प्रतिसहिष्यति । अभिगम्य सुराः सर्वे प्रणम्येदमब्रुवन् ९ देव देव महादेव लोकस्यास्य हिते रत । सुराणां प्रणिपातेन प्रसादं कर्तुमर्हसि १० न लोका धारयिष्यन्ति तव तेजः सुरोत्तम । ब्राह्मेण तपसा युक्तो देव्या सह तपश्चर ११ त्रैलोक्यहितकामार्थं तेजस्तेजसि धारय । रक्ष सर्वानिमाँल्लोकान्नालोकं कर्तुमर्हसि १२ देवतानां वचः श्रुत्वा सर्वलोकमहेश्वरः । बाढमित्यब्रवीत्सर्वान्पुनश्चेदमुवाच ह १३ धारयिष्याम्यहं तेजस्तेजसैव सहोमया । त्रिदशाः पृथिवी चैव निर्वाणमधिगच्छतु १४ यदिदं क्षुभितं स्थानान्मम तेजो ह्यनुत्तमम् । धारयिष्यति कस्तन्मे ब्रुवन्तु सुर-

ककुत्स्थकुलोत्पन्न राम विचारूं लागला असतां तपोधन विश्वामित्र ऋषींमध्यें ती सर्व कथा संपूर्णपणें निवेदन करूं लागले कीं ५ " हे रामा, पूर्वी महातपस्वी भगवान् शंकर विवाह झाल्यानंतर उमादेवीला अवलोकन करून तिच्याशीं समागम करण्यास प्रवृत्त झाले ६ आणि त्या देवाधिदेव, विचारी व शितिकंठ अशा महादेवाची रतिक्रीडा चालली असतां शंभर दिव्य वर्षें लोटलीं ७; तथापि, हे शत्रुतापना रामा, त्या उमा देवीचे ठिकाणीं पुत्रोत्पत्ति ( प्रकट ) झाली नाहीं. तेव्हां ब्रह्मदेवप्रभृति सर्व देव " ह्या संयोगापासून जो प्राणी उत्पन्न होईल त्याला कोण सहन करील?" ह्मणून उद्विग्न झाले आणि ते सर्वजण शंकराकडे येऊन प्रणामपूर्वक ह्मणाले ८, ९ " हे देवाधिदेव महादेवा, आपण ह्या जगताचें हित करण्याविषयीं तत्पर आहांत. करितां, प्रणिपात करीत असलेल्या ह्या देवांवर आपण कृपा करा १०. हे सुरश्रेष्ठ, आपलें तेज धारण करण्यास लोक समर्थ होणार नाहींत. कारण, आपण ब्राह्म तपानें युक्त आहांत आणि उमादेवीसहवर्तमान तप करणारे आहांत ११. करितां, त्रैलोक्याचें हित करण्याची इच्छा धरून आपण आपलें तेज तेजाच्याच योगानें धारण करा आणि ह्या सर्व लोकांचें रक्षण करा. आपण हें जगत् जनशून्य करूं नका १२". ह्याप्रमाणें देवतांचें भाषण श्रवण केल्यावर "ठीक आहे" असें ह्मणून ते सर्वलोकाधिपति शंकर पुनरपि त्यांना ह्मणाले १३ " मी तेजाच्याच योगानें उमेसहवर्तमान तेज धारण करीन. ह्यास्तव, देव आणि पृथ्वी ह्यांना सुख होवो १४; परंतु, हे सुरश्रेष्ठ, स्वस्थानापासून जें हें माझें अनुपम तेज क्षुभित झालें आहे तें कोण धारण करील? हें आपण मला सांगा १५ ". ह्याप्रमाणें

मत्तमाः १५ एवमुक्तास्ततो देवाः प्रत्यूचुर्वृषभध्वजम् । यत्तेजः क्षुभितं ह्यद्य तद्धरा धारयिष्यति १६ एवमुक्तः सुरपतिः प्रमुमोच महाबलः । तेजसा पृथिवी येन व्याप्ता सगिरिकानना १७ ततो देवाः पुनरिदमूचुश्चापि हुताशनम् । आविश त्वं महातेजो रौद्रं वायुसमन्वितः १८ तदग्निना पुनर्व्याप्तं संजातं श्वेतपर्वतम् । दिव्यं शरवणं चैव पावकादित्यसंनिभम् १९ यत्र जातो महातेजाः कार्तिकेयोऽग्निसंभवः । अथोमां च शिवं चैव देवाः सर्षिगणास्तथा २० पूजयामासुरत्यर्थं सुप्रीतमनसस्तदा । अथ शैलसुता राम त्रिदशानिदमब्रवीत् २१ समन्युरशपत्सर्वान्क्रोधसंरक्तलोचना । यस्मान्निवारिता चाहं संगता पुत्रकाम्यया २२ अपत्यं स्वेषु दारेषु नोत्पादयितुमर्हथ । अद्यप्रभृति युष्माकमप्रजाः सन्तु पत्नयः २३ एवमुक्त्वा सुरान्सर्वाञ्छशाप पृथिवीमपि । अवने नैकरूपा त्वं बहुभार्या भविष्यसि २४ न च पुत्रकृतां प्रीतिं मत्क्रोधकलुषीकृता ।

---

शंकरांनीं सांगितलें असतां " जें तेज क्षुभित झालें आहे तें आज पृथ्वी धारण करील" असें देवांनीं त्या वृषभध्वजाला उत्तर दिलें १६. ह्याप्रमाणें देवांनीं सांगितलें असतां देवाधिपति महाबलाढ्य शंकरानें आपलें तेज सोडिलें. तेव्हां त्या तेजाच्या योगानें पर्वत व वनें ह्यांसहवर्तमान सर्व पृथ्वी व्याप्त झाली १७. तदनंतर "हे महातेजस्वि अग्ने, वायूसहवर्तमान तूं ह्या रुद्रसंबंधीं तेजामध्यें प्रविष्ट हो " ह्मणून देवांनीं पुनरपि अग्नीला सांगितलें असतां १८ अग्नीनें व्याप्त झालेलें तें तेज श्वेतपर्वतरूप बनलें आणि श्वेतपर्वतरूप बनलेलें तें तेज ज्या प्रदेशामध्यें प्रविष्ट झालें त्या प्रदेशांत अग्नि आणि सूर्य ह्यांसारखें तेजस्वी असें एक शरांचें दिव्य वन झालें १९ व त्या ठिकाणीं अग्निसंभव महातेजस्वी कार्तिकेय उत्पन्न झाला. ऋषिगणासहवर्तमान सर्व देवांचीं मनें अत्यंत सुप्रसन्न झालीं व त्यांनीं उमा आणि शिव ह्यांची अतिशयच प्रशंसा केली. तेव्हां, हे रामा, पार्वती देवांशीं रागारागानें बोलली इतकेंच नव्हे परंतु, क्रोधाच्या योगानें जिचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत अशा त्या पार्वतीनें सर्व देवांना असा शाप दिला कीं, " पुत्रप्राप्तीच्या इच्छेनें मी पतीशीं संगत झालें असतां ज्याअर्थी तुह्मी मला समागमापासून निवृत्त केलें २०, २१, २२ त्याअर्थी तुह्मांला आपल्या स्त्रियांचे ठिकाणीं अपत्योत्पत्ति होणार नाहीं. आजपासून तुमच्या स्त्रिया संतानरहित होतील " २३. ह्याप्रमाणें सर्व देवांना शाप देऊन तिनें पृथ्वीलाही असा शाप दिला कीं " हे पृथ्वि, तुझें एकच स्वरूप कायम रहाणार नाहीं; तूं पुष्कळांची भार्या होशील २४. हे दुर्मति पृथ्वि, ज्याअर्थी मला पुत्र नसावा अशी तूं इच्छा केलीस त्याअर्थी माझ्या क्रोधानें कलुषित झालेल्या तुला पुत्रसुख प्राप्त

प्राप्स्यसे त्वं सुदुर्मेधो मम पुत्रमनिच्छती २५ तान्सर्वान्पीडितान्दृष्ट्वा सुरा-न्सुरपतिस्तदा । गमनायोपचक्राम दिशं वरुणपालिताम् २६ स गत्वा तप आतिष्ठत्पार्श्वे तस्योत्तरे गिरेः । हिमवत्प्रभवे शृङ्गे सह देव्या महे-श्वरः २७ एष ते विस्तरो राम शैलपुत्र्या निवेदितः । गङ्गायाः प्रभवं चैव शृणु मे सहलक्ष्मण २८ [ ११६३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-कीय आदिकाव्ये बालकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

तप्यमाने तदा देवे सेन्द्राः साग्निपुरोगमाः । सेनापतिमभीप्सन्तः पितामहमुपागमन् १ ततोऽब्रुवन्सुराः सर्वे भगवन्तं पितामहम् । प्रणिपत्य सुरा राम सेन्द्राः साग्निपुरोगमाः २ येन सेनापतिर्देव दत्तो भगवता पुरा । स तपः परमास्थाय तप्यते स्म सहोमया ३ यदत्रानन्तरं कार्यं लोकानां हितकाम्यया । संविधत्स्व विधानज्ञ त्वं हि नः परमा गतिः ४ देवतानां वचः श्रुत्वा सर्वलोकपितामहः । सान्त्वयन्मधुरैर्वाक्यैस्त्रिदशा-निदमब्रवीत् ५ शैलपुत्र्या यदुक्तं तन्न प्रजाः स्वासु पत्निषु । तस्या वच-

होणार नाहीं " २५. ह्याप्रमाणें पार्वतीचा शाप झाल्यामुळें ते सर्व देव दुःखित झालेले अवलोकन करून देवाधिपति महेश्वर वरुणरक्षित पश्चिमदिशेकडे जाण्याकरितां निघाले २६ आणि त्या हिमालयपर्वताच्या उत्तर प्रदेशावर जाऊन हिमवत्प्रभवनामक शिखराचे ठिकाणीं देवीपार्वतीसहवर्तमान ते महेश्वर तपश्चर्या करूं लागले २७. असो. हे रामा, पार्वतीसंबंधानें ही सविस्तर हकीकत मीं तुला कथन केली. आतां, हे लक्ष्मणास-हवर्तमान रामा, तूं माझ्यापासून गंगेची उत्पत्ति श्रवण कर २८. ह्याप्रमाणें महामुनि-वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडांपैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

देवाधिदेव शंकर तपश्चर्या करूं लागले असतां अग्निप्रभृति देव इंद्रासहवर्तमान सेनापति प्राप्त होण्याच्या इच्छेनें ब्रह्मदेवाकडे गेले १ आणि नंतर ते सर्व अग्निप्रभृति देव इंद्रासहवर्तमान प्रणाम करून भगवान् ब्रह्मदेवाला ह्मणाले २ " हे देवा, ज्या भगवानानें पूर्वी आह्मांला ( बीजरूपानें ) सेनापति दिला तो भगवान् उत्कृष्ट मौन धारण करून तपश्चर्या करीत आहे ३. तेव्हां अशा प्रसंगीं जें काय कर्तव्य असेल तें, हे विधानज्ञ, आपण लोकांचें हित करण्याची इच्छा धरून करा ; आपणच आमचा उत्कृष्ट आधार आहांत ४. ह्याप्रमाणें देवतांचें भाषण श्रवण केल्यावर सर्व लोकांचा पितामह ब्रह्मदेव सांत्वन करीत करीत मधुर वाक्यांनीं देवांना ह्मणाला ५ " स्वपत्नींचे ठिकाणीं तुह्मांला संतान प्राप्त होणार नाहीं असें जें पर्वतकन्येनें ह्मटलें आहे तें तिचें

नमक्लिष्टं सत्यमेव न संशयः ६ इयमाकाशगङ्गा च यस्यां पुत्रं हुताशनः। जनयिष्यति देवानां सेनापतिमरिन्दमम् ७ ज्येष्ठा शैलेन्द्रदुहिता मानयिष्यति तं सुतम् । उमायास्तद्बहुमतं भविष्यति न संशयः ८ तच्छ्रुत्वा वचनं तस्य कृतार्था रघुनन्दन । प्रणिपत्य सुराः सर्वे पितामहमपूजयन् ९ ते गत्वा परमं राम कैलासं धातुमण्डितम् । अग्निं नियोजयामासुः पुत्रार्थं सर्वदेवताः १० देवकार्यमिदं देव समाधत्स्व हुताशन । शैलपुत्र्यां महातेजो गङ्गायां तेज उत्सृज ११ देवतानां प्रतिज्ञाय गङ्गामभ्येत्य पावकः। गर्भं धारय वै देवि देवतानामिदं प्रियम् १२ इत्येतद्वचनं श्रुत्वा दिव्यं रूपमधारयत् । स तस्या महिमां दृष्ट्वा समन्तादवशीर्यत १३ समन्ततस्तदा देवीमभ्यषिञ्चत पावकः । सर्वस्रोतांसि पूर्णानि गङ्गाया रघुनन्दन १४ तमुवाच ततो गङ्गा सर्वदेवपुरोगमम् । अशक्ता धारणे देव तेजस्तव समुद्धतम् १५ दह्यमानाग्निना तेन संप्रव्यथितचेतना । अथा-

---

वचन अमोघ असल्यामुळें सत्य होणारच आहे ह्यांत संशय नाहीं ६ असो. ही आकाशगंगा आहे व हिचे ठिकाणीं शत्रूंचें दमन करणारा असा देवसेनापति पुत्र अग्नि उत्पन्न करील ७ ; पर्वतराजाची ज्येष्ठ कन्या स्वतःच्या अपत्याप्रमाणें त्या पुत्राला मान देईल आणि उमेलाही तें अगदीं संमत होईल ह्याविषयीं संशय नाहीं "८. ह्याप्रमाणें तें ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण करून देव कृतकृत्य झाले आणि, हे रघुनंदना रामा, प्रणिपातपूर्वक त्या सर्व देवांनीं ब्रह्मदेवाचें पूजन केलें ९. हे रामा, नंतर धातूंनीं भूषित अशा सर्वोत्कृष्ट कैलासपर्वतावर जाऊन पुत्रोत्पत्तीकरितां त्या सर्व देवतांनीं अग्नीची प्रार्थना केली कीं १० " हें देवकार्य आहे; ह्यास्तव, हे महातेजस्वी हुताशना, पर्वतकन्यका जी गंगा तिचे ठिकाणीं तूं शंकराचें तेज नेऊन ठेव " ११. नंतर सांगितलेलें कार्य करण्याविषयीं देवांला वचन देऊन अग्नि गंगेसमीप आला आणि ह्मणाला " हे देवि, तूं गर्भ धारण कर. हें देवतांना प्रिय आहे " १२. अशा प्रकारचें हें अग्नीचें भाषण श्रवण करून गंगेनें दिव्य रूप धारण केलें. तेव्हां तिचें तें सौंदर्यवैभव अवलोकन केल्याबरोबर तो ( पारदरूप शिवतेजोराशि ) आसमंतात्भागीं उचंबळून पडला १३. तेव्हां अग्नीनें चोहोंकडून गंगा देवीला ( शिववीर्यरूप पारदानें ) अभिषेक केला ( ह्मणजे गंगेच्या आसमंतात्भागीं अग्नीनें तो पारद ठेविला ) असतां, हे रघुनंदना रामा, गंगेचे सर्व ओघ त्यानें भरून गेले १४. नंतर त्या सर्वदेवाग्रणी अग्नीला गंगा ह्मणाली " हे देवा, तूं ठेविलेलें हें अत्यंत उग्र तेज धारण करण्यास मी समर्थ नाहीं १५. त्या तेजोरूप अग्नीच्या योगानें माझ्या शरीराचा

ब्रवीदिदं गङ्गा सर्वदेवहुताशनः १६ इह हैमवते पार्श्वे गर्भोयं संनिवेश्यताम् । श्रुत्वा त्वग्निवचो गङ्गा तं गर्भमतिभास्वरम् १७ उत्ससर्ज महातेजाः स्रोतोभ्यो हि तदानघ । यदस्या निर्गतं तस्मात्तप्तजाम्बूनदप्रभम् १८ काञ्चनं धरणीं प्राप्तं हिरण्यमतुलप्रभम् । ताम्रं कार्ष्णायसं चैव तैक्ष्ण्याद्देवाभिजायत १९ मलं तस्याभवत्तत्र त्रपु सीसकमेव च । तदेतद्धरणीं प्राप्य नानाधातुरवर्धत २० निक्षिप्तमात्रे गर्भे तु तेजोभिरभिरञ्जितम् । सर्वं पर्वतसंनद्धं सौवर्णमभवद्वनम् २१ जातरूपमिति ख्यातं तदाप्रभृति राघव । सुवर्णं पुरुषव्याघ्र हुताशनसमप्रभम् २२ तं कुमारं ततो जातं सेन्द्राः सहमरुद्गणाः । क्षीरसंभावनार्थाय कृत्तिकाः समयोजयन् २३ ताः क्षीरं जातमात्रस्य कृत्वा समयमुत्तमम् । ददुः पुत्रोयमस्माकं सर्वासामिति निश्चिताः २४ ततस्तु देवताः सर्वाः कार्तिकेय इति ब्रुवन् । पुत्रस्त्रैलोक्यविख्यातो भविष्यति न संशयः २५ तेषां तद्वचनं

अगदीं भडका होत असल्यामुळें मला फारच मूर्च्छा येऊं लागली आहे ". ह्यावर सर्व देवांच्या उद्देशानें हवन केलेल्या द्रव्याचें भक्षण करणारा अग्नि " ह्या हिमालयाच्या पार्श्वभागीं हा गर्भ ठेव " ह्मणून गंगेला ह्मणाला असतां त्याचें भाषण श्रवण करून तो अत्यंत उज्ज्वल गर्भ १६,१७, हे निष्पापा, त्या महातेजस्वी गंगेनें आपल्याप्रवाहापासून हिमालयावर नेऊन ठेविला. गंगेपासून निघालेलें तें तेज तावलेल्या सुवर्णासारिखें होतें १८ आणि ह्मणून ज्या भूप्रदेशावर तें ठेविलें गेलें तो भूप्रदेश अतुल कांतीनें युक्त असें सुवर्ण बनला व त्या तेजाच्या तीक्ष्णपणामुळें पलीकडे असलेला कांहीं भूप्रदेश ताम्र व लोह बनून राहिला १९. त्या गर्भाचा मल कथील व शिसें बनला आणि ह्याप्रमाणें भूमीवर प्राप्त झालेलें तें तेज अनेक धातूंच्या रूपानें वृद्धिंगत झालें २०. गर्भ हिमालयावर ठेवितांक्षणीं त्याच्या तेजाच्या योगानें रंजित झालेलें तें पर्वतसंबंधीं वन सर्व सुवर्णाचें झालें २१. हे पुरुषश्रेष्ठा राघवा, तेव्हांपासून अग्नीसारखें तेजोरूप असलेलें सुवर्ण जातरूप ह्मणून प्रख्यात झालें २२. तदनंतर रुद्रतेजापासून उत्पन्न झालेल्या त्या कुमाराला दुग्धपान मिळावें एतदर्थ मरुद्गण व इंद्र ह्यांसहवर्तमान सर्व देवांनीं कृत्तिकांची योजना केली २३. तेव्हां हा आमचा सर्वांचा पुत्र होईल असा उत्कृष्ट ठराव करून व त्याप्रमाणें आपल्या मनाचा निश्चय करून त्या कृत्तिकांनीं तो कुमार उत्पन्न होतांक्षणीं त्याला दुग्धपान दिलें २४. तदनंतर " हा तुमचा पुत्र कार्तिकेय ह्मणून त्रैलोक्यामध्यें विख्यात होईल ह्यांत संशय नाहीं " ह्मणून सर्व देवता त्यांना ह्मणाल्या २५. शिवपार्वतीपासून प्रथम स्कन्न ह्मणजे च्युत

श्रुत्वा स्कन्नं गर्भपरिस्रवं । स्नापयन्परया लक्ष्म्या दीप्यमानं यथानलम् २६ स्कन्द इत्यब्रुवन्देवाः स्कन्नं गर्भपरिस्रवं । कार्तिकेयं महाबाहुं काकुत्स्थ ज्वलनोपमम् २७ प्रादुर्भूतं ततः क्षीरं कृत्तिकानामनुत्तमम् । षण्णां षडाननो भूत्वा जग्राह स्तनजं पयः २८ गृहीत्वा क्षीरमेकाह्ना सुकुमारवपुस्तदा । अजयत्स्वेन वीर्येण दैत्यसैन्यगणान्विभुः २९ सुरसेनागणपतिमभ्यषिञ्चन्महाद्युतिम् । ततस्तममराः सर्वे समेत्याग्निपुरोगमाः ३० एष ते राम गङ्गाया विस्तरोऽभिहितो मया । कुमारसंभवश्चैव धन्यः पुण्यस्तथैव च ३१ भक्तश्च यः कार्तिकेये काकुत्स्थ भुवि मानवः । आयुष्मान्पुत्रपौत्रैश्च स्कन्दसालोक्यतां व्रजेत् ३२ [११९५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

तां कथां कौशिको रामे निवेद्य मधुराक्षराम् । पुनरेवापरं वाक्यं काकुत्स्थमिदमब्रवीत् १ अयोध्याधिपतिर्वीर पूर्वमासीन्नराधिपः । सगरो

झालेल्या आणि गंगेच्या गर्भापासून स्राव झाल्यावर पराकाष्ठेच्या कांतीनें अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेल्या त्या गर्भाला कृत्तिकांनीं त्या देवतांचें भाषण श्रवण केल्यावर स्नान घातलें २६ आणि, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, कार्तिकेय प्रथमतः स्कन्न ह्मणजे शिवपार्वतीच्या शरीरापासून च्युत होऊन गंगेच्या गर्भांतून स्राव झाल्यानंतर जन्मास आला असल्यामुळें ( ह्मणजे सावयव झाला असल्यामुळें ) देवांनीं स्कंद असें त्याचें नांव ठेविलें २७. असो. नंतर कृत्तिकांचे ठिकाणीं उत्कृष्ट दुग्धाचा प्रादुर्भाव झाला असतां सहा मुखांनीं युक्त होऊन त्या कुमारानें त्या सहाही कृत्तिकांचें स्तनपान केलें २८ व एक दिवस स्तनपान केल्यावरच सुकुमार शरीरानें युक्त असलेल्याही त्या समर्थ कार्तिकेयानें स्वतःच्या वीर्याच्या योगानें दैत्यसेनासमुदाय जिंकून टाकिले २९. तेव्हां अग्निप्रभृति सर्व देवांनीं एकत्र जुळून त्या महातेजस्वी कार्तिकेयाला देवसेनापति ह्या नात्यानें अभिषेक केला ३०. असो. हे रामा, धनदायक व पुण्यकारक असा कुमारजन्म आणि गंगेसंबंधीं सविस्तर वृत्त हें मीं तुला कथन केलें ३१. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, ह्या भूतलावर जो मानव कार्तिकेयाविषयीं भक्ति धारण करितो तो चिरायु होऊन पुत्रपौत्रांसहवर्तमान स्कंदलोकीं जातो ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला.॥ ३७॥

ह्याप्रमाणें ती कथा कुशिकवंशज विश्वामित्रांनीं मधुर शब्दांनीं रामाला कथन केल्यावर ते पुनरपि त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाले १ " हे वीरा, सगर ह्मणून पूर्वी एक अयोध्याधिपति धर्मात्मा राजा होऊन गेला. तो संतानरहित

नाम धर्मात्मा प्रजाकामः स चाप्रजः २ वैदर्भदुहिता राम केशिनी नाम नामतः । ज्येष्ठा सगरपत्नी सा धर्मिष्ठा सत्यवादिनी ३ अरिष्टनेमेर्दुहिता सुपर्णभगिनी तु सा । द्वितीया सगरस्यासीत्पत्नी सुमतिसंज्ञिता ४ ताभ्यां सह महाराजः पत्नीभ्यां तप्तवांस्तपः । हिमवन्तं समासाद्य भृगुप्रस्रवणे गिरौ ५ अथ वर्षशते पूर्णे तपसाराधितो मुनिः । सगराय वरं प्रादाद्भृगुः सत्यवतां वरः ६ अपत्यलाभः सुमहान्भविष्यति तवानघ । कीर्तिं चाप्रतिमां लोके प्राप्स्यसे पुरुषर्षभ ७ एका जनयिता तात पुत्रं वंशकरं तव । षष्टिं पुत्रसहस्राणि अपरा जनयिष्यति ८ भाषमाणं नरव्याघ्रं राजपुत्र्यौ प्रसाद्य तम् । ऊचतुः परमप्रीते कृताञ्जलिपुटे तदा ९ एकः कस्याः सुतो ब्रह्मन्का बहूञ्जनयिष्यति । श्रोतुमिच्छामहे ब्रह्मन्सत्यमस्तु वचस्तव १० तयोस्तद्वचनं श्रुत्वा भृगुः परमधार्मिकः । उवाच परमां वाणीं स्वच्छन्दोऽत्र विधीयताम् ११ एको वंशकरो वास्तु बहवो वा महाबलाः । कीर्तिमन्तो महोत्साहाः का वा कं वरमि-

---

असल्यामुळें संतानप्राप्तीविषयीं उत्सुक होता २. हे रामा, विदर्भराजाची केशिनी ह्मणून एक कन्या होती ती धर्मिष्ठ व सत्यवचनी असून सगराची ज्येष्ठ पत्नी होय ३. अरिष्टनेमीची कन्या आणि सुपर्णाची भगिनी अशी सुमति ह्मणून सगराची दुसरी पत्नी होती ४. त्या पत्नीसहवर्तमान हिमालयासंनिध भृगुप्रस्रवण पर्वतावर त्या महाराजानें तपश्चर्या केली ५. नंतर शंभर वर्षे पूर्ण झाल्यावर त्या तपश्चर्येच्या योगानें भृगुमुनि संतुष्ट झाले आणि सत्य भाषण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या भृगु महर्षींनीं सगराला असा वर दिला कीं ६, " हे निष्पापा, तुला मोठा अपत्यलाभ होईल आणि हे पुरुषश्रेष्ठा, लोकांमध्यें तुझी अप्रतिम कीर्ति होईल ७. बा सगरा, तुझ्या एका पत्नीला वंश चालविणारा पुत्र होईल आणि दुसऱ्या पत्नीचे ठिकाणीं साठ हजार पुत्र उत्पन्न होतील " ८. ह्याप्रमाणें ते पुरुषश्रेष्ठ भृगुमहर्षि सांगू लागले असतां त्यांना प्रसन्न करून घेऊन स्वतः अत्यंत संतुष्ट झालेल्या राजकन्यांनीं हात जोडून " हे ब्रह्मन्, एक पुत्र कोणाला होईल आणि पुष्कळ कोणाला होतील हें ऐकण्याची आमची इच्छा आहे; हे ब्रह्मन्, आपलें भाषण सत्य होवो " असें विचारिलें असतां ९,१० त्यांचें भाषण श्रवण करून अत्यंत धार्मिक भृगु उत्कृष्ट वाणीनें त्यांना ह्मणाले " ह्याविषयीं तुमची इच्छा काय आहे ती कळूं द्या ११. सारांश, वंश चालविणारा पुत्र पाहिजे असल्यास एकच होईल आणि कीर्तिमान् व मोठे उत्साही व महाबलाढ्य असे पुष्कळ पुत्रही होतील. तेव्हां कोणता वर कोणाला

च्छति १२ मुनेस्तु वचनं श्रुत्वा केशिनी रघुनन्दन । पुत्रं वंशकरं राम जग्राह नृपसंनिधौ १३ षष्टिं पुत्रसहस्राणि सुपर्णभगिनी तदा । महोत्साहान्कीर्तिमतो जग्राह सुमतिः सुतान् १४ प्रदक्षिणमृषिं कृत्वा शिरसाभिप्रणम्य तम् । जगाम स्वपुरं राजा सभार्यो रघुनन्दन १५ अथ काले गते तस्य ज्येष्ठा पुत्रं व्यजायत । असमञ्ज इति ख्यातं केशिनी सगरात्मजम् १६ सुमतिस्तु नरव्याघ्र गर्भतुम्बं व्यजायत । षष्टिः पुत्रसहस्राणि तुम्बभेदाद्विनिःसृता १७ घृतपूर्णेषु कुम्भेषु धात्र्यस्तान्समवर्धयन् । कालेन महता सर्वे यौवनं प्रतिपेदिरे १८ अथ दीर्घेण कालेन रूपयौवनशालिनः । षष्टिः पुत्रसहस्राणि सगरस्याभवंस्तदा १९ स च ज्येष्ठो नरश्रेष्ठः सगरस्यात्मसंभवः । बालान्गृहीत्वा तु जले सरय्वा रघुनन्दन २० प्रक्षिप्य प्राहसं नित्यं मज्जतस्तान्निरीक्ष्य वै २१ एवं पापसमाचारः सज्जनप्रतिबाधकः । पौराणामहिते युक्तः पित्रा निर्वासितः पुरात् २२ तस्य पुत्रोंऽशुमान्नाम असमञ्जस्य वीर्यवान् । संमतः सर्वलोकस्य सर्वस्यापि प्रियं-

पाहिजे ते समजू द्या " १२. ह्याप्रमाणें मुनींचें भाषण श्रवण केल्यावर, हे रघुनंदना रामा, केशिनीनें वंश चालविणारा असा एकच पुत्र राजाचे सन्निध मागून घेतला १३ आणि सुपर्णभगिनी सुमतीनें मोठे उत्साही व कीर्तिमान् असे साठ हजार पुत्र मागून घेतले १४. नंतर, हे रघुनंदना, त्या मुनींना प्रदक्षिणा करून व मस्तकानें प्रणाम करून तो सगरराजा भार्यांसहवर्तमान आपल्या नगराला परत गेला १५. पुढें कांहीं काल लोटल्यावर ज्येष्ठ पत्नी जी केशिनी तिला राजापासून असमंज ह्मणून पुत्र झाला १६. हे पुरुषश्रेष्ठा रामा, सुमतीला एक गर्भतुंब झाला व तो तुंब फुटून त्यांतून साठ हजार पुत्र बाहेर निघाले १७. घृतानें भरलेल्या कुंभाचे ठिकाणीं दायींनीं ते वाढविले व पुष्कळ काल लोटल्यानंतर ते सर्व यौवनावस्थेमध्यें आले १८. असो. ह्याप्रमाणें उत्पत्तीनंतर पुष्कळ काळ लोटल्यावर रूप व यौवन ह्यांनीं ते सगराचे साठ हजार पुत्र युक्त झाले १९. हे रघुनंदना, सगराचा तो पुरुषश्रेष्ठ ज्येष्ठ पुत्र असमंज त्या बालकांना घेऊन जाऊन सरयूनदीच्या उदकांत २० नेहमीं टाकीत असे आणि ते गटांगळ्या खाऊं लागले असतां त्यांच्याकडे पाहून हसत असे २१. ह्याप्रमाणें सज्जनांना पीडा देणारा तो दुराचारी पुत्र नगरवासी जनांचें अहित करण्याविषयीं तत्पर राहूं लागला असतां पित्यानें त्याला नगरांतून घालवून दिलें २२. त्या असमंजाचा अंशुमान् ह्मणून एक वीर्यवान् पुत्र होता; तो सर्व लोकांना संमत असून सर्वांशीं प्रिय भाषण करणारा असे २३. असो. तदनंतर

वदः २३ ततः कालेन महता मतिः समभिजायत। सगरस्य नरश्रेष्ठ यजेयमिति निश्चिता २४ स कृत्वा निश्चयं राजा सोपाध्यायगणस्तदा। यज्ञकर्मणि वेदज्ञो यष्टुं समुपचक्रमे २५ [ १२२० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः॥ ३८॥

विश्वामित्रवचः श्रुत्वा कथान्ते रघुनन्दनः। उवाच परमप्रीतो मुनिं दीप्तमिवानलम् १ श्रोतुमिच्छामि भद्रं ते विस्तरेण कथामिमाम्। पूर्वजो मे कथं ब्रह्मन्यज्ञं वै समुपाहरत् २ तस्य तद्वचनं श्रुत्वा कौतूहलसमन्वितः। विश्वामित्रस्तु काकुत्स्थमुवाच प्रहसन्निव ३ श्रूयतां विस्तरो राम सगरस्य महात्मनः। शंकरश्वशुरो नाम्ना हिमवानिति विश्रुतः ४ विन्ध्यपर्वतमासाद्य निरीक्षेते परस्परम्। तयोर्मध्ये समभवद्यज्ञः स पुरुषोत्तम ५ स हि देशो नरव्याघ्र प्रशस्तो यज्ञकर्मणि। तस्याश्वचर्यां काकुत्स्थ दृढधन्वा महारथः ६ अंशुमानकरोत्तात सगरस्य मते स्थितः।

---

बराच काल लोटल्यावर, हे पुरुषश्रेष्ठा रामा, "आपण अश्वमेधनामक याग करावा" असा दृढ विचार सगराच्या मनामध्यें आला २४ आणि यज्ञानुष्ठानाविषयीं उपाध्यायगणांसहवर्तमान निश्चय करून तो वेदवेत्ता राजा यज्ञाच्या उपक्रमाला लागला"२५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला॥ ३८॥

ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनीचें भाषण श्रवण केल्यावर कथा चालतां चालतां अत्यंत संतुष्ट झालेला रघुनंदन राम अग्नीप्रमाणें देदीप्यमान असलेल्या विश्वामित्रमुनींना ह्मणाला १ "आपलें देव बरें करो. हे ब्रह्मन्, माझ्या पूर्वजानें कसा यज्ञ केला ही कथा सविस्तर श्रवण करण्याची माझी इच्छा आहे" २. ह्याप्रमाणें रामाचें ह्मणणें ऐकून घेऊन सांगण्याविषयीं उत्सुक झालेले विश्वामित्रमुनि हंसत हंसत ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाले ३ "हे रामा, महात्म्या सगराच्या यज्ञाविषयीं सविस्तर वर्तमान तूं श्रवण कर. हिमवान् ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला शंकराचा श्वशुर ४ आणि विंध्यपर्वत हे उभयतां जवळ जवळ एकमेकांची बरोबरी करणार असून ( दोहोंमध्यें मोठासा पर्वत नसल्यामुळें ) एकमेकांकडे जसे कांहीं पहात असतात. त्या पर्वतांमध्यें, हे पुरुषोत्तमा रामा, तो यज्ञ झाला ५. कारण, हे पुरुषश्रेष्ठा, तो प्रदेश यज्ञकर्माला प्रशस्त आहे. असो. बा काकुत्स्था रामा, महाधनुर्धारी व महारथी असा जो सगराच्या मतानें वागणारा ( त्याचा पौत्र ) अंशुमान् हा त्या यज्ञसंबंधीं अश्वाचें रक्षण करीत होता. ह्याप्रमाणें सगराचा तो यज्ञ चालला असतां पर्व

तस्य पर्वणि तं यज्ञं यजमानस्य वासवः ७ राक्षसीं तनुमास्थाय यज्ञियाश्वमपाहरत् । ह्रियमाणे तु काकुत्स्थ तस्मिन्नश्वे महात्मनः ८ उपाध्यायगणाः सर्वे यजमानमथाब्रुवन् । अयं पर्वणि वेगेन यज्ञियाश्वोपनीयते ९ हर्तारं जहि काकुत्स्थ हयश्चैवोपनीयताम् । यज्ञच्छिद्रं भवत्येतत्सर्वेषामशिवाय नः १० तत्तथा क्रियतां राजन्यज्ञोऽच्छिद्रः कृतो भवेत् । सोपाध्यायवचः श्रुत्वा तस्मिन्सदसि पार्थिवः ११ षष्टिं पुत्रसहस्राणि वाक्यमेतदुवाच ह । गतिं पुत्रा न पश्यामि रक्षसां पुरुषर्षभाः १२ मन्त्रपूतैर्महाभागैरास्थितोऽपि महाक्रतुः । तद्गच्छथ विचिन्वध्वं पुत्रका भद्रमस्तु वः १३ समुद्रमालिनीं सर्वां पृथिवीमनुगच्छत । एकैकं योजनं पुत्रा विस्तारमभिगच्छत १४ यावत्तुरगसंदर्शस्तावत्खनत मेदिनीम् । तमेव हयहर्तारं मार्गमाणा ममाज्ञया १५ दीक्षितः पौत्रसहितः सोपाध्यायगणस्त्वहम् । इह स्थास्यामि भद्रं वो यावत्तुरगदर्शनम् १६ ते सर्वे हृष्टमनसो राजपुत्रा महाबलाः । जग्मुर्महीतलं राम पितुर्वचनयन्त्रिताः १७

---

दिवशीं इंद्रानें ६,७ राक्षसरूप धारण करून त्या यज्ञसंबंधीं अश्वाचा अपहार केला. तेव्हां, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या अश्वाचा अपहार होऊं लागला असतां महात्मे ८ सर्व उपाध्यायगण यजमानाला ह्मणाले " पर्वसमयींच ह्या यज्ञसंबंधीं अश्वाचा सत्वर अपहार होत आहे ९. ह्यास्तव, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना सगरा, ह्या अपहार करणाऱ्यांचा वध करून तूं आपला अश्व परत आण. कारण, यज्ञामध्यें आह्मां सर्वांच्या अकल्याणाला कारणीभूत होणारें असें हें विघ्न होत आहे १०. ह्यास्तव, हे राजा, यज्ञ निर्विघ्नपणें पार पडेल अशी तजवीज कर ". ह्याप्रमाणें उपाध्यायांचें भाषण श्रवण केल्यावर त्या यज्ञमंडपामध्यें तो राजा ११ आपल्या साठ हजार पुत्रांना, ह्मणाला " हे पुरुषश्रेष्ठ पुत्रहो, राक्षसांच्या मायेनें जर हें विघ्न प्राप्त होइल तर मंत्रपूत अशा मोठमोठ्या ऋत्विजांनीं हा महाक्रतु युक्त असतांनाही आपली धडगत होईल असें मला वाटत नाहीं. तस्मात्, हे पुत्रहो, तुह्मी जा आणि अश्व शोधून आणा; तुमचें कल्याण असो १२,१३. एकेक जण एक एक योजनपर्यंत लांब जा आणि अशा रीतीनें ही सर्व समुद्रवलयांकित पृथ्वी हुडकून काढा १४. इतकेंच नव्हे परंतु, ( भूमीवर जर अश्व उपलब्ध न होईल तर ) माझ्या आज्ञेनें तुह्मी अश्व दृष्टीं पडेपर्यंत पृथ्वी खणून काढा १५. यज्ञदीक्षा घेतलेला असा मी, पौत्र आणि उपाध्यायगण ह्यांसहवर्तमान, अश्व दृष्टीं पडेपर्यंत येथेंच थांबून राहीन. तुमचें कल्याण असो " १६. ह्याप्रमाणें पित्याची आज्ञा झाल्यावर त्या

योजनायामविस्तारमेकैको धरणीतलम् । बिभिदुः पुरुषव्याघ्रा वज्रस्पर्शसमैर्भुजैः १८ शूलैरशनिकल्पैश्च हलैश्चापि सुदारुणैः । भिद्यमाना वसुमती ननाद रघुनन्दन १९ नागानां वध्यमानानामसुराणां च राघव । राक्षसानां दुराधर्ष सत्त्वानां निनदोऽभवत् २० योजनानां सहस्राणि षष्टिं तु रघुनन्दन । बिभिदुर्धरणीं राम रसातलमनुत्तमम् २१ एवं पर्वतसंबाधं जम्बूद्वीपं नृपात्मजाः । खनन्तो नृपशार्दूल सर्वतः परिचक्रमुः २२ ततो देवाः सगन्धर्वाः सासुराः सहपन्नगाः । संभ्रान्तमनसः सर्वे पितामहमुपागमन् २३ ते प्रसाद्य महात्मानं विषण्णवदनास्तदा । ऊचुः परमसंत्रस्ताः पितामहमिदं वचः २४ भगवन्पृथिवी सर्वा खन्यते सगरात्मजैः। बहवश्च महात्मानो वध्यन्ते जलचारिणः २५ अयं यज्ञहरोऽस्माकमनेनाश्वोपनीयते। इति ते सर्वभूतानि हिंसन्ति सगरात्मजाः २६ [१२४६]इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकोनचत्वारिंशः सर्गः॥३९॥

---

महाबलाढ्य राजपुत्रांच्या मनाला उल्लास प्राप्त झाला आणि हे रामा, पित्याच्या आज्ञेनें बद्ध झालेले ते राजपुत्र भूतलावर गेले १७. एक एक योजन लांबपर्यंत एक एक जण भूतलाचे ठिकाणीं हिंडल्यावर ते पुरुषश्रेष्ठ स्पर्शाविषयीं वज्रसमान असलेल्या आपल्या बाहूंच्या योगानें आणि अत्यंत भयंकर नांगर व वज्रप्राय शूल ह्यांच्या योगानें पृथ्वी खणूं लागले असतां, हे रघुनंदना रामा, खणीत होतां होतां ती पृथ्वी गर्जना करूं लागली १८, १९. कारण, हे रघुवंशजा रामा, राक्षस, नाग, असुर इत्यादि प्राण्यांचा वध होऊं लागला असतां ते भयंकर गर्जना करूं लागले २०. हे रघुनंदना रामा, साठहजार योजनेंपर्यंत त्यांनीं अनुपम रसातल खणून काढिलें २१ आणि ह्याप्रमाणें खणतां खणतां, हे श्रेष्ठ राजकुमारा, पर्वतांनीं गजबजलेल्या जंबुद्वीपाभोंवतीं सर्व बाजूनीं ते राजपुत्र हिंडूं लागले २२. तेव्हां गंधर्व, असुर व पन्नग ह्यांसहवर्तमान सर्व देव मनामध्यें अगदीं घाबरून जाऊन ब्रह्मदेवाकडे गेले २३ आणि त्या महात्म्या ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतल्यावर पराकाष्ठेचे त्रस्त व खिन्नवदन झालेले ते देव त्याला ह्मणाले २४ "हे भगवन्, सगराचे पुत्र सर्व पृथ्वी खणून काढीत आहेत आणि पुष्कळ महात्म्यांचा व जलचर प्राण्यांचा ते वध करीत आहेत २५. सारांश, हाच आमचा यज्ञविघातक आहे व ह्यानेंच आमचा अश्व नेला आहे असें समजून ते सगरपुत्र सर्व प्राण्यांची हिंसा करीत आहेत २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडांपैकीं एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३९ ॥

देवतानां वचः श्रुत्वा भगवान्वै पितामहः। प्रत्युवाच सुसंत्रस्तान्कृतान्तबलमोहितान् १ यस्येयं वसुधा कृत्स्ना वासुदेवस्य धीमतः। महिषी माधवस्यैषा स एव भगवान्प्रभुः २ कापिलं रूपमास्थाय धारयत्यनिशं धराम्। तस्य कोपाग्निना दग्धा भविष्यन्ति नृपात्मजाः ३ पृथिव्याश्चापि निर्भेदो दृष्ट एव सनातनः। सगरस्य च पुत्राणां विनाशो दीर्घदर्शिनाम् ४ पितामहवचः श्रुत्वा त्रयस्त्रिंशदरिंदमाः। देवाः परमसंहृष्टाः पुनर्जग्मुर्यथागतम् ५ सगरस्य च पुत्राणां प्रादुरासीन्महास्वनः। पृथिव्यां भिद्यमानायां निर्घातसमनिःस्वनः ६ ततो भित्त्वा महीं सर्वां कृत्वा चापि प्रदक्षिणम्। सहिताः सागराः सर्वे पितरं वाक्यमब्रुवन् ७ परिक्रान्ता मही सर्वा सत्त्ववन्तश्च सूदिताः। देवदानवरक्षांसि पिशाचोरगपन्नगाः ८ न च पश्यामहेऽश्वं ते अश्वहर्तारमेव च। किं करिष्याम भद्रं ते बुद्धिरत्र विचार्यताम् ९ तेषां तद्वचनं श्रुत्वा पुत्राणां राजसत्तमः। समन्युरब्रवी-

ह्याप्रमाणें देवतांचें भाषण श्रवण केल्यावर अत्यंत त्रस्त व कालसामर्थ्यानें मोहित झालेल्या त्या देवांना भगवान् ब्रह्मदेव ह्मणाले १ " ज्या विवेकी वासुदेवाची ही संपूर्ण पृथ्वी आहे ह्मणजे ज्या माधवाची ही भार्या आहे तोच आमचा प्रभु भगवान् २ कपिलरूपाचें अवलंबन करून सर्वदा पृथ्वी धारण करीत आहे. तेव्हां त्याच्या क्रोधाग्नीनें ते राजपुत्र दग्ध होऊन जातील ३. कारण, पृथ्वीचा भेद आणि सगराच्या पुत्रांचा नाश हीं प्रत्येक कल्पामध्यें अवश्य ठरलेलींच आहेत ; ह्मणून अतींद्रियवेत्त्यांना समजून चुकलेलेच आहे" ४. ह्याप्रमाणें ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण केल्यावर शत्रुदमन करणारे तेहतीस(कोटि)ही देव पराकाष्ठेचे आनंदित झाले आणि आल्या वाटेनें परत गेले ५. असो. सगराच्या पुत्रांमुळें पृथ्वीचा भेद होऊं लागला असतां निर्घातध्वनीसारखा मोठा ध्वनी होऊं लागला ६. तदनंतर सर्व पृथ्वी भेदून आणि तिला प्रदक्षिणाही करून परत आल्यावर ते सर्व सगरपुत्र एकत्र जुळून आपल्या पित्याला ह्मणाले ७ " आह्मीं सर्व पृथ्वी धुंडिली आणि बलाढ्य असे देव, दानव, राक्षस, पिशाच, उरग व पन्नग ह्यांचाही नाश केला ८; परंतु आपला अश्व अथवा त्या अश्वाला नेणारा आमच्या कोठें आढळांत आला नाहीं. आपलें देव बरें करो. आतां आह्मीं काय करावें ? ह्याविषयीं आपण आतां कांहीं तरी उपाय मनांत आणा " ९ ह्याप्रमाणें

१ वायुना निहतो वायुर्गगनाच्च पतत्यधः। प्रचंडघोरनिर्घोषो निर्घात इति कथ्यते ॥ वाऱ्यावर वारा आपटून आकाशांतून खालीं आला असतां जो प्रचंड व भयंकर नाद होतो त्याला निर्घात असें ह्मणतात.

द्वाक्यं सगरो रघुनन्दन १० भूयः खनत भद्रं वो विभेद्य वसुधातलम् । अश्वहर्तारमासाद्य कृतार्थाश्च निवर्तत ११ पितुर्वचनमासाद्य सगरस्य महात्मनः । षष्टिः पुनः सहस्राणि रसातलमभिद्रवन् १२ खन्यमाने ततस्तस्मिन्ददृशुः पर्वतोपमम् । दिशागजं विरूपाक्षं धारयन्तं महीतलम् १३ सपर्वतवनां कृत्स्नां पृथिवीं रघुनन्दन । धारयामास शिरसा विरूपाक्षो महागजः १४ यदा पर्वणि काकुत्स्थ विश्रामार्थं महागजः । खेदाच्चालयते शीर्षं भूमिकम्पस्तदा भवेत् १५ ते तं प्रदक्षिणं कृत्वा दिशापालं महागजम् । मानयन्तो हि ते राम जग्मुर्भित्त्वा रसातलम् १६ ततः पूर्वां दिशं भित्त्वा दक्षिणां बिभिदुः पुनः । दक्षिणस्यामपि दिशि ददृशुस्ते महागजम् १७ महापद्मं महात्मानं सुमहत्पर्वतोपमम् । शिरसा धारयन्तं गां विस्मयं जग्मुरुत्तमम् १८ ते तं प्रदक्षिणं कृत्वा सगरस्य महात्मनः । षष्टिः पुत्रसहस्राणि पश्चिमां बिभिदुर्दिशम् १९ पश्चिमायामपि दिशि महान्तमचलोपमम् । दिशागजं सौमनसं ददृशुस्ते

---

पुत्रांचें भाषण श्रवण केल्यावर, हे रघुनंदना रामा, तो नृपश्रेष्ठ सगर क्रोधयुक्त होऊन ह्मणाला १० "तुमचें कल्याण असो. तुह्मी पुनरपि खणा आणि भूतलाचा भेद करून व अश्वाचा अपहार करणाऱ्याला गाठून कार्य झाल्यावर परत या" ११. हीं महात्म्या सगरनामक पित्याची आज्ञा मान्य करून ते साठ हजार पुत्र रसातलावर धांवले १२ आणि तें रसातल खणूं लागल्यावर उग्र नेत्रांनीं युक्त असा एक पर्वतप्राय दिग्गज महीतल धारण करीत असलेला त्यांनीं अवलोकन केला १३. सारांश, हे रघुनंदना, उग्र नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या महागजानें पर्वत व वनें ह्यांसहवर्तमान संपूर्ण पृथ्वी मस्तकीं धारण केली होती १४. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, अळस जाऊन श्रमपरिहार होण्याकरितां ज्यावेळीं तो महागज मस्तक हालवीत असतो त्यावेळीं भूकंप होत असतो १५. हे रामा, त्या दिक्पाल महागजाचा मान राखण्याकरितां त्यांनीं त्याला प्रदक्षिणा केली आणि नंतर ते रसातलाचा भेद करून आंत गेले १६. ह्याप्रमाणें पूर्व दिशेस पृथ्वी भेदून दक्षिण दिशा भेदिली असतां दक्षिण दिशेसही त्यांनीं एक महागज अवलोकन केला १७. त्या महात्म्या महापद्मनामक गजाचें शरीर प्रचंड पर्वतासारखें असून तो मस्तकानें पृथ्वी धारण करीत होता. तेव्हां त्याला अवलोकन केल्यावर त्या सगरपुत्रांना फारच विस्मय झाला १८. असो. महात्म्या सगराचे साठ हजार पुत्र त्याला प्रदक्षिणा करून पश्चिम दिशेस भेद करूं लागले १९. नंतर पश्चिम दिशेसही पर्वतप्राय असा एक सौमनसनामक दिक्पाल महागज

महाबलाः २० ते तं प्रदक्षिणं कृत्वा पृष्ट्वा चापि निरामयम् । खनन्तः समुपाक्रान्ता दिशं सोमवतीं तदा २१ उत्तरस्यां रघुश्रेष्ठ ददृशुर्हिमपाण्डुरम् । भद्रं भद्रेण वपुषा धारयन्तं महीमिमाम् २२ समालभ्य ततः सर्वे कृत्वा चैनं प्रदक्षिणम् । षष्टिः पुत्रसहस्राणि बिभिदुर्वसुधातलम् २३ ततः प्रागुत्तरां गत्वा सागराः प्रथितां दिशम् । रोषादभ्यखनन्सर्वे पृथिवीं सगरात्मजाः २४ ते तु सर्वे महात्मानो भीमवेगा महाबलाः । ददृशुः कपिलं तत्र वासुदेवं सनातनम् २५ हयं च तस्य देवस्य चरन्तमविदूरतः । प्रहर्षमतुलं प्राप्ताः सर्वे ते रघुनन्दन २६ ते तं यज्ञहनं ज्ञात्वा क्रोधपर्याकुलेक्षणाः । खनित्रलाङ्गलधरा नानावृक्षशिलाधराः ॥ अभ्यधावन्त संक्रुद्धास्तिष्ठ तिष्ठेति चाब्रुवन् २७ अस्माकं त्वं हि तुरगं यज्ञियं हृतवानसि । दुर्मेधस्त्वं हि संप्राप्तान्विद्धि नः सगरात्मजान् २८ श्रुत्वा तद्वचनं तेषां कपिलो रघुनन्दन । रोषेण महताविष्टो हुंकारमकरोत्तदा २९ ततस्तेनाप्रमेयेण कपिलेन महात्मना । भस्मराशीकृताः सर्वे काकुत्स्थ सगरात्मजाः ३० [१२७६] इति ० सर्गः ॥ ४० ॥

---

ऱ्या महाबलाढ्य सगरपुत्रांनीं अवलोकन केला २०. त्यांनीं प्रदक्षिणापूर्वक त्याला "बरें आहे नां ?" ह्मणून विचारिलें आणि उत्तर दिशा खणण्याकरितां ते चालले २१. नंतर, हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, उत्तर दिशेसही स्वतः बर्फासारिखा शुभ्रवर्ण असलेला भद्रनामक गज कल्याणकारक शरीरानें युक्त असूनहीं पृथ्वी धारण करीत असलेला त्यांनीं पाहिला २२. तेव्हां सर्वांनीं त्याला स्पर्श करून प्रदक्षिणा घातली आणि नंतर ते साठ हजार सगरपुत्र पृथ्वीचा भेद करूं लागले २३. तदनंतर ते सगरपुत्र प्रसिद्ध ईशान्य दिशेस गेले आणि सर्वही रागारागानें पृथ्वी खणूं लागले २४. तेव्हां भयंकर वेग व प्रचंड बल धारण करणाऱ्या त्या महात्म्या सगरपुत्रांनीं कपिलरूप धारण करून बसलेल्या सनातन वासुदेवाला अवलोकन केलें २५. नंतर त्या देवाच्या समीपच चरत असलेला अश्वही त्यांनीं पाहिला व, हे रघुनंदना, अश्व दृष्टीं पडतांक्षणीं त्यांना कांहीं पराकाष्ठेचा आनंद झाला २६. तदनंतर तो कपिलच यज्ञविघात करणारा आहे असें समजून कुदळी, नांगर आणि अनेक प्रकारचे वृक्ष व पाषाण धारण करणारे ते सगरपुत्र क्रुद्ध झाले आणि "थांब थांब" असे ह्मणून त्याच्या अंगावर धांवले २७ व "आमचा यज्ञिय अश्व तूंच हरण केला आहेस. परंतु, हे दुर्बुद्ध, आह्मी हे सगरपुत्र येथें आलों आहों हें तूं समजून ठेव" असें त्याला पुनरपि ह्मणाले २८ हे रघुनंदना, त्यांचें भाषण श्रवण करून तो कपिल फारच क्रुद्ध झाला व त्यानें रागारागानें नुसतें हुं: केलें २९ व त्याबरोबर, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्या महात्म्या

पुत्रांश्चिरगताञ्ज्ञात्वा सगरो रघुनन्दन । नप्तारमब्रवीद्राजा दीप्यमानं स्वतेजसा १ शूरश्च कृतविद्यश्च पूर्वैस्तुल्योसि तेजसा । पितॄणां गतिमन्विच्छ येन चाश्वोपवाहितः २ अन्तर्भौमानि सत्त्वानि वीर्यवन्ति महान्ति च । तेषां तु प्रतिघातार्थं सासिं गृह्णीष्व कार्मुकम् ३ अभिवाद्याभिवाद्यांस्त्वं हत्वा विघ्नकरानपि । सिद्धार्थः संनिवर्तस्व मम यज्ञस्य पारगः४ एवमुक्तोंशुमान्सम्यक्सगरेण महात्मना । धनुरादाय खड्गं च जगाम लघुविक्रमः ५ स खातं पितृभिर्मार्गमन्तर्भौमं महात्मभिः । प्रापद्यत नरश्रेष्ठ तेन राज्ञाभिचोदितः ६ देवदानवरक्षोभिः पिशाचपतगोरगैः । पूज्यमानं महातेजा दिशागजमपश्यत ७ स तं प्रदक्षिणं कृत्वा पृष्ट्वा चैव निरामयम् । पितॄन्स परिपप्रच्छ वाजिहर्तारमेव च ८ दिशागजस्तु तच्छ्रुत्वा प्रत्युवाच महामतिः । असमञ्ज कृतार्थस्त्वं सहाश्वः शीघ्रमेष्यसि ९ तस्य तद्वचनं श्रुत्वा सर्वानेव दिशागजान् । यथाक्रमं

---

अतर्क्य कपिलानें ते सर्वही सगरपुत्र भस्मराशि बनवून सोडिले ३०. ह्याप्रमाणें०श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकी चाळिसावा सर्ग समाप्त झाला॥४०॥

हे रघुनंदना, पुत्रांना जाऊन फार दिवस झाले असें समजून आल्यावर सगर राजा स्वतःच्या तेजानें देदीप्यमान असलेल्या आपल्या नातवाला ह्मणाला १ "तूं शूर व विद्वान् असून तेजानें आपल्या पूर्वजांची बरोबरी करणारा आहेस. करितां, पितरांचा आणि अश्व नेणाऱ्याचा तूं शोध लाव २. पृथ्वीमध्यें असणारे प्राणी मोठे व वीर्यवान् असतात. तस्मात्, त्यांचा घात करण्याकरितां तूं खड्गासहवर्तमान धनुष्य घे ३. वंद्य असतील त्यांना अभिवंदन कर, विघ्न करणाऱ्यांचा वध कर आणि माझा यज्ञ शेवटास नेण्याला समर्थ असलेला असा तूं कार्य करून परत ये" ४. ह्याप्रमाणें महात्म्या सगरानें उत्तम प्रकारानें अंशुमानाला सांगितलें असतां धनुष्य व खड्ग घेऊन तो सत्वर चालता झाला ५ व, हे पुरुषश्रेष्ठा रामा, त्या सगर राजाची आज्ञा झालेला तो अंशुमान् महात्म्या पितरांनीं भूमीमध्यें खणून ठेविलेल्या मार्गाशीं आला असतां ६ त्या महातेजस्वी अंशुमानानें देव, दानव, राक्षस, पिशाच, पक्षी व उरग ज्याची पूजा करीत आहेत असा दिग्गज अवलोकन केला ७. तेव्हां त्याला प्रदक्षिणा करून कुशलप्रश्न केल्यावर पितर व अश्व नेणारा ह्यांविषयीं त्यानें त्या दिग्गजाला विचारिलें असतां ८ तो महाविचारी दिग्गज त्याला ह्मणाला "हे असमंजसपुत्रा, तूं कार्यसिद्धि होऊन अश्वासहवर्तमान सत्वर परत येशील" ९. ह्याप्रमाणें त्याचें भाषण श्रवण केल्यावर सर्वही दिग्गजांना त्यानें क्रमाक्रमानें यथान्याय हाच प्रश्न केला

यथान्यायं प्रष्टुं समुपचक्रमे १० तैश्च सर्वैर्दिशापालैर्वाक्यज्ञैर्वाक्यकोविदैः । पूजितः सहयश्चैवागन्तासीत्यभिचोदितः ११ तेषां तद्वचनं श्रुत्वा जगाम लघुविक्रमः । भस्मराशीकृता यत्र पितरस्तस्य सागराः १२ स दुःखवशमापन्नस्त्वसमञ्जसुतस्तदा । चुक्रोश परमार्तस्तु वधात्तेषां सुदुःखितः १३ यज्ञियं च हयं तत्र चरन्तमविदूरतः । ददर्श पुरुषव्याघ्रो दुःखशोकसमन्वितः १४ स तेषां राजपुत्राणां कर्तुकामो जलक्रियाम् । स जलार्थी महातेजा न चापश्यज्जलाशयम् १५ विसार्य निपुणां दृष्टिं ततोऽपश्यत्खगाधिपम् । पितॄणां मातुलं राम सुपर्णमनिलोपमम् १६ सचैनमब्रवीद्वाक्यं वैनतेयो महाबलः । मा शुचः पुरुषव्याघ्र वधोऽयं लोकसंमतः १७ कपिलेनाप्रमेयेण दग्धा हीमे महाबलाः । सलिलं नार्हसे प्राज्ञ दातुमेषां हि लौकिकम् १८ गङ्गा हिमवतो ज्येष्ठा दुहिता पुरुषर्षभ । तस्यां कुरु महाबाहो पितॄणां सलिलक्रियाम् १९ भस्मरा-

---

असतां १० भाषणतत्त्वज्ञ व योग्य भाषण करण्यास समर्थ अशा सर्वही गजांनीं त्याचा मान राखिला आणि " अश्वासहवर्तमान तूं सत्वर परत येशील " ह्मणून त्याला सांगितलें ११. तेव्हां त्यांचें तें भाषण श्रवण केल्यावर ज्या ठिकाणीं त्याचे पितर कपिलांनीं भस्मराशि करून टाकिले होते त्या ठिकाणीं तो शीघ्रगति अंशुमान् आला १२ आणि त्या पितरांचा वध झाल्याचें समजून आल्यामुळें पराकाष्ठेचा व्याकुल व अत्यंत दुःखित झालेला तो असमंजसपुत्र अगदीं दुःखाधीन होऊन शोक करूं लागला १३. तों इतक्यांत समीपच तो यज्ञिय अश्व संचार करीत आहे असें दुःख व शोक ह्यांनीं व्याप्त झालेल्या त्या पुरुषश्रेष्ठ अंशुमानाच्या दृष्टीं पडलें १४. नंतर, त्या राजपुत्रांची उदकक्रिया करण्याची त्याला इच्छा झाली. परंतु, तो महातेजस्वी अंशुमान् उदकाची इच्छा करीत असतांना त्याला कोठें जलाशय दिसेना १५. तेव्हां दूरचा पदार्थ अवलोकन करण्यास समर्थ अशी आपली दृष्टि त्यानें चोहोंकडे फेंकिली असतां, हे रामा, वेगानें वायुतुल्य असलेला पित्यांचा मातुल गरुड त्यानें पाहिला १६. नंतर तो महाबलाढ्य गरुड त्याला ह्मणाला " हे पुरुषश्रेष्ठा, तूं शोक करूं नको; हा तुझ्या पितरांचा वध लोकांच्या हिताला कारणीभूत होणारा आहे १७. अचिंत्यशक्तिमान् कपिलानें ह्या महाबलाढ्य सगरपुत्रांना दग्ध केलें आहे. ह्यास्तव, हे प्राज्ञ, तूं ह्यांना नुसतें सामान्य उदक देऊं नकोस १८. हे पुरुषश्रेष्ठा, हिमालयाची ज्येष्ठ कन्या जी गंगा तिचे ठिकाणीं, हे महापराक्रमी अंशुमाना, तूं पितरांची उदकक्रिया कर १९. ती लोकपावनी गंगा भस्मराशि करून टाकिलेल्या ह्या

शीकृतानेतान्प्लावयेल्लोकपावनी २० तया क्लिन्नमिदं भस्म गङ्गया लोककान्तया। षष्टिः पुत्रसहस्राणि स्वर्गलोकं गमिष्यति २१ निर्गच्छाश्वं महाभाग संगृह्य पुरुषर्षभ। यज्ञं पैतामहं वीर निर्वर्तयितुमर्हसि २२ सुपर्णवचनं श्रुत्वा सोंशुमानतिवीर्यवान्। त्वरितं हयमादाय पुनरायान्महातपाः २३ ततो राजानमासाद्य दीक्षितं रघुनन्दन। न्यवेदयद्यथावृत्तं सुपर्णवचनं तथा २४ तच्छ्रुत्वा घोरसंकाशं वाक्यमंशुमतो नृपाः। यज्ञं निर्वर्तयामास यथाकल्पं यथाविधि २५ स्वपुरं त्वगमच्छ्रीमानिष्टयज्ञो महीपतिः। गङ्गायाश्चागमे राजा निश्चयं नाध्यगच्छत २६ अगत्वा निश्चयं राजा कालेन महता महान्। त्रिंशद्वर्षसहस्राणि राज्यं कृत्वा दिवं गतः २७ [ १३०३ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥ ४१ ॥

कालधर्मं गते राम सगरे प्रकृतीजनाः। राजानं रोचयामासुरंशुमन्तं सुधार्मिकम् १ स राजा सुमहानासीदंशुमान्रघुनन्दन। तस्य पुत्रो महानासीद्दिलीप इति विश्रुतः २ तस्मै राज्यं समादिश्य दिलीपे रघुनन्दन।

---

सगरपुत्रांना पावन करील २०. सारांश, त्या गंगेनें हें भस्म भिजलें म्हणजे साठ हजार सगरपुत्रांना तें स्वर्गलोकीं पाठविण्यास समर्थ होईल २१. ह्यास्तव, हे महाभाग्यवान् पुरुषश्रेष्ठा, तूं चालता हो; हें वीरा, हा अश्व घे, आणि आपल्या अजाचा अश्वमेध याग तूं शेवटास ने" २२. हें गरुडाचें भाषण श्रवण केल्यावर तो महावीर्यवान् व महातपस्वी अंशुमान् अश्व घेऊन सत्वर परत गेला २३. नंतर, हे रघुनंदना, यज्ञदीक्षा घेतलेल्या राजाजवळ जाऊन त्यानें तें झालेलें वर्तमान व गरुडाचें म्हणणें त्याला निवेदन केलें २४ व ती भयंकर वार्ता अंशुमानापासून श्रवण केल्यावर सगरराजानें सूत्रालों अनुसरून तो याग यथाविधि शेवटास नेला २५. असो. यज्ञ आटोपल्यावर तो वैभवशाली भूपति आपल्या नगराला आला; परंतु, (पुत्रांच्या उद्धाराला कारणीभूत होणारी ) गंगा येण्याला खात्रीचा उपाय कोणता ह्या विषयीं त्याची अटकळ झाली नाहीं २६. तेव्हां खात्रीलायक उपाय कोणता ह्याचा निर्णय न होतां बराच काळ लोटल्यावर म्हणजे तीस हजार वर्षें राज्य केल्यावर तो महात्मा सगर राजा स्वर्गास गेला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

हे रामा, सगर मरण पावल्यावर अमात्यवर्ग अत्यंत धार्मिक अशा अंशुमानालाच राजा समजूं लागले १. हे रघुनंदना, तो अंशुमान् राजा फारच मोठा होता व त्यालाही

हिमवच्छिखरे रम्ये तपस्तेपे सुदारुणम् ३ द्वात्रिंशच्छतसाहस्रं वर्षाणि सुमहायशाः । तपोवनगतो राजा स्वर्गं लेभे तपोधनः ४ दिलीपस्तु महातेजाः श्रुत्वा पैतामहं वधम् । दुःखोपहतया बुद्ध्या निश्चयं नाध्यगच्छत ५ कथं गङ्गावतरणं कथं तेषां जलक्रिया । तारयेयं कथं चैतानिति चिन्तापरोऽभवत् ६ तस्य चिन्तयतो नित्यं धर्मेण विदितात्मनः । पुत्रो भगीरथो नाम जज्ञे परमधार्मिकः ७ दिलीपस्तु महातेजा यज्ञैर्बहुभिरिष्टवान् । त्रिंशद्वर्षसहस्राणि राजा राज्यमकारयत् ८ अगत्वा निश्चयं राजा तेषामुद्धरणं प्रति । व्याधिना नरशार्दूल कालधर्ममुपेयिवान् । ९ इन्द्रलोकं गतो राजा स्वार्जितेनैव कर्मणा । राज्ये भगीरथं पुत्रमभिषिच्य नरर्षभः १० भगीरथस्तु राजर्षिर्धार्मिको रघुनन्दन । अनपत्यो महाराजः प्रजाकामः स च प्रजाः ११ मन्त्रिष्वाधाय तद्राज्यं गङ्गावतरणे रतः । तपो दीर्घं समातिष्ठद्गोकर्णे रघुनन्दन १२ ऊर्ध्व-

---

*दिलीप ह्मणून प्रसिद्ध असलेला मोठा पुत्र झाला २. हे रघुनंदना, त्या दिलीपाला राज्य देऊन तो अंशुमान् हिमालयपर्वताच्या रम्य शिखरावर दारुण तपश्चर्या करूं लागला ३ व ह्याप्रमाणें तपश्चर्या चालली असतांना बत्तीस हजार वर्षे लोटल्यावर तपोधन व तपोवनस्थ असा तो फारच मोठा कीर्तिमान् राजा स्वर्गास गेला ४.* असो. पितामहांचा वध झाल्याचें ऐकिल्यावर दिलीप राजाचें मन दुःखाकुल झालें व ह्यामुळें अमुकच उपाय केला असतां गंगा येईल ह्याचा त्याला निश्चय होईना ५. तेव्हां " गंगेचें खालीं आगमन कसें होईल, त्या पितामहांची उदकक्रिया गंगोदकानें कशी होईल आणि आपल्या हातून त्यांचा उद्धार कसा होईल ह्यांविषयीं तो चिंताग्रस्त झाला ६. पुढें धर्मानें प्रसिद्धीस आलेला तो दिलीपराजा तसाच चिंताक्रांत असतांना त्याला भगीरथ ह्मणून एक अत्यंत धार्मिक पुत्र झाला ७. महातेजस्वी दिलीपराजानें पुष्कळ यज्ञ केले आणि तीस हजार वर्षेपर्यंत त्यानें राज्य केलें ८. परंतु, हे पुरुषश्रेष्ठा रामा, पितामहांचा उद्धार करण्याला गंगेला आणण्याविषयीं खात्रीचा उपाय इतक्या कालामध्येंही त्याला सुचला नाहीं तेव्हां तशाच स्थितींत शेवटीं तो व्याधीच्या योगानें मरण पावला ९. सारांश, भगीरथनामक पुत्राला राज्यावर बसवून तो पुरुषश्रेष्ठ दिलीप राजा स्वतः केलेल्याच कर्माच्या योगानें इंद्रलोकीं गेला १०. पुढें, हे रघुनंदना, संतानाची इच्छा करणाऱ्या त्या निपुत्रिक व धर्मनिष्ठ महाराज भगीरथ राजर्षीनें आपली प्रजा ११ व राज्यहीं मंत्र्यांचे स्वाधीन केलीं व गंगेला आणण्याविषयीं उत्सुक होऊन, हे रघुनंदना, गोकर्णामध्यें त्यानें दीर्घ तपश्चर्येला आरंभ

बाहुः पञ्चतपा मासाहारो जितेन्द्रियः । तस्य वर्षसहस्राणि घोरे तपसि तिष्ठतः १३ अतीतानि महाबाहो तस्य राज्ञो महात्मनः । सुप्रीतो भगवान्ब्रह्मा प्रजानां प्रभुरीश्वरः १४ ततः सुरगणैः सार्धमुपागम्य पितामहः । भगीरथं महात्मानं तप्यमानमथाब्रवीत् १५ भगीरथ महाराज प्रीतस्तेऽहं जनाधिप । तपसा च सुतप्तेन वरं वरय सुव्रत १६ तमुवाच महातेजाः सर्वलोकपितामहम् । भगीरथो महाबाहुः कृताञ्जलिपुटः स्थितः १७ यदि मे भगवान्प्रीतो यद्यस्ति तपसः फलम् । सगरस्यात्मजाः सर्वे मत्तः सलिलमाप्नुयुः १८ गङ्गायाः सलिलक्लिन्ने भस्मन्येषां महात्मनाम् । स्वर्गं गच्छेयुरत्यन्तं सर्वे च प्रपितामहाः १९ देव याचे ह संतत्यै नावसीदेत्कुलं च नः । इक्ष्वाकूणां कुले देव एष मेऽस्तु वरः परः २० उक्तवाक्यं तु राजानं सर्वलोकपितामहः । प्रत्युवाच शुभां वाणीं मधुरां मधुराक्षराम् २१ मनोरथो महानेष भगीरथ महारथ । एवं भवतु भद्रं ते इक्ष्वाकुकुलवर्धन २२ इयं हैमवती ज्येष्ठा गङ्गा

केला १२. पंचाग्निसाधन करून एक महिन्यानें आहार करणारा तो जितेंद्रिय भगीरथ वर हात करून तपश्चर्या करूं लागला व तशा प्रकारची घोर तपश्चर्या त्या महात्म्या राजाची चालली असतां, हे महापराक्रमी राजा, हजारों वर्षें लोटलीं. तेव्हां प्रजाधिपति व समर्थ असे भगवान् ब्रह्मदेव फारच संतुष्ट झाले १३,१४ आणि देवगणासहवर्तमान संनिध येऊन तप करीत असलेल्या त्या महात्म्या भगीरथाला ह्मणाले १५ "हे प्रजाधिपते भगीरथ महाराजा, उत्कृष्ट प्रकारें आचरिलेल्या तपाच्या योगानें मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. हे सदाचरणसंपन्न, तूं वर माग" १६. ह्यावर महातेजस्वी व महापराक्रमी भगीरथ हात जोडून उभा राहिला आणि त्या सर्व लोकांच्या पूर्वजाला ह्मणाला १७ "भगवान् जर माझ्यावर प्रसन्न झाले असतील आणि माझ्या तपाचें जर कांहीं फल मला प्राप्त व्हावयाचें असेल तर सर्व सगरपुत्रांची माझे हातून उदकक्रिया व्हावी १८ ह्या महात्म्यांचें भस्म गंगोदकामध्यें भिजलें ह्मणजे ह्या सर्व प्रपितामहांना अक्षय्य स्वर्गप्राप्ति होईल १९. हे देवा, आमचें कुल उच्छिन्न होऊं नये एतदर्थ मी संतानाची याचना करीत आहें. करितां, हे देवा, इक्ष्वाकुवंशजांच्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या मला हा दुसरा एक वर आपणांपासून प्राप्त व्हावा" २०. ह्याप्रमाणें राजा बोलला असतां मधुर शब्द व मधुर स्वर ह्यांनीं युक्त असलेल्या शुभ वाणीचें अवलंबन करून सर्वलोकपूर्वज ब्रह्मदेव ह्मणाले २१ "हे महारथी, ही तुझी इच्छा मोठी आहे; हे इक्ष्वाकुकुलवर्धना, तुझ्या ह्मणण्याप्रमाणें होईल; तुझें कल्याण असो २२. हे राजा,

हिमवतः सुता । तां वै धारयितुं राजन्हरस्तत्र नियुज्यताम् २३ गङ्गायाः पतनं राजन्पृथिवी न सहिष्यते । तां वै धारयितुं राजन्नान्यं पश्यामि शूलिनः २४ तमेव मुक्त्वा राजानं गङ्गां चाभाष्य लोककृत् । जगाम त्रिदिवं देवैः सर्वैः सह मरुद्गणैः २५ [ १३२८ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥ ४२ ॥

देवदेवे गते तस्मिन्सोऽङ्गुष्ठाग्रनिपीडिताम् । कृत्वा वसुमतीं राम वत्सरं समुपासत १ अथ संवत्सरे पूर्णे सर्वलोकनमस्कृतः । उमापतिः पशुपती राजानमिदमब्रवीत् २ प्रीतस्तेऽहं नरश्रेष्ठ करिष्यामि तव प्रियम् । शिरसा धारयिष्यामि शैलराजसुतामहम् ३ ततो हैमवती ज्येष्ठा सर्वलोकनमस्कृता । तदा सातिमहद्रूपं कृत्वा वेगं च दुःसहम् ४ आकाशादपतद्राम शिवे शिवशिरस्युत । अचिन्तयच्च सा देवी गङ्गा परमदुर्धरा ५ विशाम्यहं हि पातालं स्रोतसा गृह्य शंकरम् । तस्यावलेपनं ज्ञात्वा क्रुद्धस्तु भगवान्हरः ६ तिरोभावयितुं बुद्धिं चक्रे त्रिनयनस्तदा ।

---

हिमालयपर्वताची ज्येष्ठ कन्या ही जी हैमवती गंगा तिला धारण करण्याकरितां शंकराची योजना केली पाहिजे २३. हे राजा, पृथ्वीला गंगापात सहन होणार नाहीं आणि, हे भूपते, त्या गंगेला धारण करणारा शूलपाणि शंकरावांचून मला तर दुसरा कोणी दिसत नाहीं " २४. ह्याप्रमाणें त्या भगीरथ राजाला सांगून व गंगेलाही ( त्याच्यावर योग्य कालीं अनुग्रह करण्यास ) सांगून ब्रह्मदेव मरुद्गणांसह सर्व देवांबरोबर स्वर्गाला गेले २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

हे रामा, ते देवाधिदेव ब्रह्मदेव गेल्यानंतर, केवल एका अंगुष्ठाग्रावर उभें राहून भगीरथानें एक वर्षभर तपश्चर्या केली १. तेव्हां संवत्सर पूर्ण झाल्यावर सर्वलोकवंदित उमाकांत पशुपति राजाला ह्मणाले २ " हे पुरुषश्रेष्ठ, मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहे. तुझा मनोरथ मी सिद्धीस नेईन. सारांश, मी पर्वतकन्या गंगा मस्तकीं धारण करीन " ३. ह्याप्रमाणें शंकरांनीं सांगितल्यावर ती हिमालयाची ज्येष्ठ कन्या सर्वलोकवंदित गंगा फारच मोठें रूप व दुःसह वेग धारण करून ४, हे रामा, कल्याणरूप अशा शिवमस्तकावर पडली आणि धारण करण्यास फारच कठीण असलेली ती गंगा " प्रवाहानें मी शंकराला ओढून नेऊन पातालामध्यें प्रवेश करीन " असें मनामध्यें आणूं लागली असतां तिला गर्व झाल्याचें जाणून भगवान् शंकर क्रुद्ध झाले ५.६ आणि तिला अदृश्य करून टाकण्याचें त्या त्र्यंबकांनीं मनांत आणिलें.

सा तस्मिन्पतिता पुण्या पुण्ये रुद्रस्य मूर्धनि ७ हिमवत्प्रतिमे राम जटामण्डलगह्वरे । सा कथंचिन्महीं गन्तुं नाशक्नोद्यत्नमास्थिता ८ नैव सा निर्गमं लेभे जटामण्डलमन्ततः । तत्रैवाबभ्रमद्देवी संवत्सरगणान्बहून् ९ तामपश्यत्पुनस्तत्र तपः परममास्थितः । स तेन तोषितश्चासीदत्यन्तं रघुनन्दन १० विससर्ज ततो गङ्गां हरो बिन्दुसरः प्रति । तस्यां विसृज्यमानायां सप्त स्रोतांसि जज्ञिरे ११ ह्लादिनी पावनी चैव नलिनी च तथैव च । तिस्रः प्राचीं दिशं जग्मुर्गङ्गाः शिवजलाः शुभाः १२ सुचक्षुश्चैव सीता च सिन्धुश्चैव महानदी । तिस्रश्चैता दिशं जग्मुः प्रतीचीं तु दिशं शुभाः १३ सप्तमी चान्वगात्तासां भगीरथरथं तदा १४ भगीरथोपि राजर्षिर्दिव्यं स्यन्दनमास्थितः । प्रायादग्रे महातेजा गङ्गा तं चाप्यनुव्रजत् १५ गगनाच्छंकरशिरस्ततो धरणिमागता । असर्पत जलं तत्र तीव्रशब्दपुरस्कृतम् १६ मत्स्यकच्छपसङ्घैश्च शिशुमारगणैस्तथा । पतद्भिः पतितैश्चैव व्यरोचत वसुंधरा १७ ततो देवर्षिगन्धर्वा यक्षसिद्धगणास्तथा । व्यलोकयन्त ते तत्र गगनाद्गां गतां

असो. हे रामा, जटामंडलामुळें आंत शिरण्यास कठीण असलेल्या आणि आकारानें हिमालयाप्रमाणें असलेल्या त्या पवित्र शिवमस्तकावर ती गंगा पडली असतां यत्न करूनही तिला बाहेर पृथ्वीवर येण्यास मार्ग सांपडला नाहीं ७,८. ह्याप्रमाणें बाहेर पडण्यास मार्गच जेव्हां सांपडेना तेव्हां ती गंगा देवी पुष्कळ संवत्सरसमुदाय लोटेपर्यंत त्या जटामंडलांतच भटकत होती ९. पुढें उत्कृष्ट तपश्चर्या करणाऱ्या भगीरथानें तिला त्या ठिकाणीं अवलोकन केलें. हे रघुनंदना, तपाच्या योगानें त्या भगीरथानें शंकराला अत्यंत संतुष्ट केलें असतां १० शंकरानें ती गंगा बिंदुसरोवरामध्यें सोडिली. तेव्हां, सोडितां सोडितां तिचे सात प्रवाह झाले ११. पैकीं ह्लादिनी, पावनी व नलिनी अशा तीन पवित्र उदकानें युक्त असलेल्या शुभ गंगा पूर्व दिशेला गेल्या १२. सुचक्षु, सीता व महानदी सिंधु ह्या तीन शुभ गंगा पश्चिम दिशेला गेल्या १३ व त्यापैकीं सातवी भगीरथाच्या रथाचे मागोमाग गेली १४. सारांश, महातेजस्वी भगीरथ राजर्षि दिव्य रथावर आरूढ होऊन पुढें जाऊं लागला असतां गंगाही त्याच्या मागोमाग जाऊं लागली १५. प्रथमतः आकाशापासून ती गंगा शिवमस्तकीं पडली, तेथून पृथ्वीवर आली आणि नंतर प्रचंड ध्वनीनें युक्त असें तें गंगोदक भगीरथाच्या मागोमाग जाऊं लागलें १६. गंगेबरोबर पृथ्वीवर पडणाऱ्या व पडलेल्या शिशुमारसंज्ञक जलचर समुदायांनीं आणि मत्स्य व कच्छ यांच्या समुदायांनीं पृथ्वी सुशोभित दिसूं लागली १७.

तदा १८ विमानैर्नगराकारैर्हयैर्गजवरैस्तदा । पारिप्लवगताश्चापि देवतास्तत्र विष्ठिताः १९ तदद्भुततमिमं लोके गङ्गावतरमुत्तमम् । दिदृक्षवो देवगणाः समीयुरमितौजसः २० संपतद्भिः सुरगणैस्तेषां चाभरणौजसा । शतादित्यमिवाभाति गगनं गततोयदम् २१ शिशुमारोरगगणैर्मीनैरपि च चञ्चलैः । विद्युद्भिरिव विक्षिप्तैराकाशमभवत्तदा २२ पाण्डुरैः सलिलोत्पीडैः कीर्यमाणैः सहस्रधा । शारदाभ्रैरिवाकीर्णं गगनं हंससंप्लवैः २३ क्वचिद्द्रुततरं याति कुटिलं क्वचिदायतम् । विनतं क्वचिदुद्भूतं क्वचिद्याति शनैः शनैः २४ सलिलेनैव सलिलं क्वचिदभ्याहतं पुनः । मुहुरूर्ध्वपथं गत्वा पपात वसुधां पुनः २५ तच्छंकरशिरोभ्रष्टं भ्रष्टं भूमितले पुनः । व्यरोचत तदा तोयं निर्मलं गतकल्मषम् २६ तत्रर्षिगणगन्धर्वा वसुधातलवासिनः । भवाङ्गपतितं तोयं पवित्रमिति पस्पृशुः २७ शापात्प्रपतिता ये

---

तेव्हां, देव, ऋषि व गंधर्व आणि यक्ष व सिद्ध यांचे गण काय आहे ह्मणून पाहूं लागले असतां आकाशांतून पृथ्वीवर आलेली गंगा त्यांनीं अवलोकन केली १८. नगरासारखीं विमानें, अश्व, आणि उत्कृष्ट गज यांवर आरूढ होऊन आणि पारिप्लवसंज्ञक यानांत बसून देव त्या ठिकाणीं आले होते १९. कारण, स्वर्गापासून पृथ्वीवर उत्तमप्रकारें गंगा अवतीर्ण झाली हें लोकामध्यें पराकाष्ठेचें आश्चर्य झालें होतें व तें अवलोकन करण्याकरितां अपरिमित सामर्थ्यवान् देवगण एकत्र जुळून तेथें आले होते २०. त्या ठिकाणीं लोटत असलेल्या त्या देवगणांच्या योगानें आणि त्यांच्या भूषणांच्या तेजानें मेघनिर्मुक्त आकाश शेंकडों सूर्यांनीं भरल्यासारिखें दिसत होतें २१. शिशुमार आणि सर्प यांचे समुदाय व चचल मत्स्य हे विद्युल्लतेप्रमाणें चोहोंकडे पसरले असून त्यांच्या योगानें आकाश व्याप्त झालें होतें २२ व वायूच्या वगैरे योगानें हजारों प्रकारांनीं उसळत असलेल्या श्वेतवर्ण जलफेनांच्या योगानें आकाश शरदृतंतील अभ्रांनीं अथवा हंसपक्ष्यांच्या समुदायांनीं व्याप्त झाल्यासारखें दिसत होतें २३. कांहीं ठिकाणांहून तें गंगोदक सत्वर जात होतें, कांहीं ठिकाणीं वक्र होऊन वाहत होतें कांहीं ठिकाणीं विस्तृत झालें होतें. कांहीं ठिकाणीं संकुचित झालेलें दिसत होतें, कांहीं ठिकाणीं उसळत होतें व कोठें हळू हळू चाललें होतें २४. कोठें उदकावर उदक आपटून पुष्कळ उंच उडत असे व पुनरपि भूमीवर पडत असे २५. असो. तें शिवमस्तकीं पडलेलें गंगाजल पुनरपि भूतलावर पडलें असतां निर्मल व निष्कल्मष असल्यामुळें शोभूं लागलें २६. तेव्हां भूतलावर राहणाऱ्या ऋषिगणांनीं व गंधर्वांनीं शिवशरीरापासून पडलेलें तें उदक पवित्र आहे असें समजून त्यामध्यें स्नान केलें २७. शापामुळें जे स्वर्गापासून भ्रष्ट होऊन

च गगनाद्वसुधातलम्। कृत्वा तत्राभिषेकं ते बभूवुर्गतकल्मषाः २८ धूतपापाः पुनस्तेन तोयेनाथ शुभान्विताः। पुनराकाशमाविश्य स्वाँल्लोकान्प्रतिपेदिरे २९ मुमुदे मुदितो लोकस्तेन तोयेन भास्वता। कृताभिषेको गङ्गायां बभूव गतकल्मषः ३० भगीरथो हि राजर्षिर्दिव्यं स्यन्दनमास्थितः। प्रायादग्रे महाराजस्तं गङ्गा पृष्ठतोऽन्वगात् ३१ देवाः सर्षिगणाः सर्वे दैत्यदानवराक्षसाः। गन्धर्वयक्षप्रवराः सकिंनरमहोरगाः ३२ सर्पाश्चाप्सरसो राम भगीरथरथानुगाः। गङ्गामन्वगमन्प्रीताः सर्वे जलचराश्च ये ३३ यतो भगीरथो राजा ततो गङ्गा यशस्विनी। जगाम सरितां श्रेष्ठा सर्वपापप्रणाशिनी ३४ ततो हि यजमानस्य जह्नोरद्भुतकर्मणः। गङ्गा संप्लावयामास यज्ञवाटं महात्मनः ३५ तस्यावलेपनं ज्ञात्वा क्रुद्धो जह्नुश्च राघव। अपिबच्च जलं सर्वं गङ्गायाः परमाद्भुतम् ३६ ततो देवाः सगन्धर्वा ऋषयश्च सुविस्मिताः। पूजयन्ति महात्मानं जह्नुं पुरुषसत्तमम् ३७ गङ्गां चापि नयन्ति स्म दुहितृत्वे महात्मनः। ततस्तुष्टो महातेजाः श्रोत्राभ्यामसृजत्प्रभुः ३८ तस्माज्जह्नुसुता गङ्गा

भूतलावर पडले होते ते त्या गंगाजलामध्यें स्नान करून निष्पाप झाले २८. इतकेंच नव्हे परंतु, पापक्षालन झालेले लोक त्या जलाच्या योगानें पुण्यवान् झाले आणि पुनरपि स्वर्गारोहण करून आपआपल्या स्थानाप्रत गेले २९. त्या उज्ज्वल उदकाच्या योगानें लोकांना मोठा आनंद झाला व ते आनंदित झालेले लोक गंगेमध्यें स्नान करून पापरहित झाले ३०. असो. महाराज भगीरथ राजर्षि दिव्य रथावर आरूढ होऊन पुढें चालला असतां गंगा त्याच्या मागोमाग गेली ३१. इतकेंच नव्हे परंतु, ऋषिगणांसहवर्तमान सर्व देव, दैत्य, दानव, राक्षस, मुख्य मुख्य गंधर्व, यक्ष, किन्नर, महोरग ३२, सर्प आणि अप्सरा ह्यांनींही, हे रामा, भगीरथाच्या रथामागून गमन केलें व सर्व जलचर प्राणी आनंदित होऊन गंगेबरोबर गेले ३३. जिकडे भगीरथ राजा गेला तिकडे नद्यामध्यें श्रेष्ठ आणि सर्वपापनाशक अशी यशस्विनी गंगा गेली ३४. जातां जातां यज्ञयाग करीत बसलेल्या अद्भुत पराक्रमी महात्म्या जन्हूचा यज्ञमंडप गंगेनें बुडविला ३५. तेव्हां, हे रघुवंशजा रामा, तिला गर्व झाला आहे असें जाणून जन्हु क्रुद्ध झाला आणि त्यानें अत्यंत अद्भुत असें तें सर्वही गंगाजल प्राशन करून टाकिलें ३६. असा प्रकार झाल्यावर देव, गंधर्व आणि ऋषि विस्मित होऊन महात्म्या पुरुषश्रेष्ठ जन्हूची स्तुति करूं लागले ३७ आणि कन्या या नात्यानें गंगेचा स्वीकार करण्याविषयीं त्यांनीं त्या महात्म्याची विनंति

प्रोच्यते जाह्नवीति च । जगाम च पुनर्गङ्गा भगीरथरथानुगा ३९ सागरं चापि संप्राप्ता सा सरित्प्रवरा तदा । रसातलमुपागच्छत्सिद्ध्यर्थं तस्य कर्मणः ४० भगीरथोऽपि राजर्षिर्गङ्गामादाय यत्नतः । पितामहान्भस्मकृतानपश्यद्गतचेतनः ४१ अथ तद्भस्मनां राशिं गङ्गासलिलमुत्तमम् । प्लावयत्पूतपाप्मानः स्वर्गं प्राप्ता रघूत्तम ४२ [१३७०] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

स गत्वा सागरं राजा गङ्गयानुगतस्तदा । प्रविवेश तलं भूमेर्यत्र ते भस्मसात्कृताः १ भस्मन्यथाप्लुते राम गङ्गायाः सलिलेन वै । सर्वलोकप्रभुर्ब्रह्मा राजानमिदमब्रवीत् २ तारिता नरशार्दूल दिवं याताश्च देववत् । षष्टिः पुत्रसहस्राणि सगरस्य महात्मनः ३ सागरस्य जलं लोके यावत्स्थास्यति पार्थिव । सगरस्यात्मजाः सर्वे दिवि स्थास्यन्ति देववत् ४ इयं च दुहिता ज्येष्ठा तव गङ्गा भविष्यति । त्वत्कृतेन च

---

केली. तेव्हां तो महातेजस्वी समर्थ जन्हु संतुष्ट झाला व त्यानें आपल्या कर्णांतून गंगेला सोडून दिलें ३८. यामुळें गंगेला जन्हुसुता व जान्हवी असें ह्मणू लागले. जन्हूपासून सुटल्यावर गंगा पुनरपि भगीरथाच्या रथाचे मागोमाग जाऊं लागली असतां ३९ ती श्रेष्ठ नदी सागराला ( ह्मणजे सगरांनीं केलेल्या खड्ड्याला ) जाऊन पोंचून त्या भगीरथाचें वंशोद्धाररूप कर्म सफल होण्याकरितां रसातलाला गेली ४०. ह्याप्रमाणें यत्नानें गंगेला घेऊन रसातलाप्रत गेल्यावर भगीरथ राजर्षीनें भस्मीभूत होऊन पडलेले आपले पितामह अवलोकन केले व ते अवलोकन करितांक्षणीं त्याला कांहीं सुचेनासें झालें ४१. नंतर त्या भस्मराशीवर गंगाजलाचें सिंचन केलें असतां, हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, ते भस्म होऊन पडलेले भगीरथाचे पितामह निष्पाप होऊन स्वर्गाप्रत गेले ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला.

ज्याच्या मागोमाग गंगा येत आहे असा तो भगीरथ राजा सगरपुत्रांनीं खणून ठेविलेल्या खड्ड्यापाशीं गेल्यावर भूतलामध्यें, ज्या ठिकाणीं ते सगरपुत्र भस्मीभूत होऊन पडले होते, त्या ठिकाणीं प्रविष्ट झाला १. पुढें, हे रामा, गंगाजलाच्या योगानें तें भस्म सिंचित झालें असतां सर्वलोकाधिपति ब्रह्मदेव भगीरथ राजाला ह्मणाला २ " हे पुरुषश्रेष्ठा, या महात्म्या सगराच्या साठ हजार पुत्रांचा तूं उद्धार केलास आणि ह्यामुळें ते देवांप्रमाणें स्वर्गास गेले ३. हे राजा जोंपर्यंत जगतामध्यें सागराचें उदक कायम राहील तोंपर्यंत सर्व सगरपुत्र स्वर्गामध्यें देवांप्रमाणें राहतील ४. ही गंगा

नाम्नाथ लोके स्थास्यति विश्रुता ५ गङ्गा त्रिपथगा नाम दिव्या भागीरथीति च । त्रीन्पथो भावयन्तीति तस्मात्त्रिपथगा स्मृता ६ पितामहानां सर्वेषां त्वमत्र मनुजाधिप । कुरुष्व सलिलं राजन्प्रतिज्ञामपवर्जय ७ पूर्वकेणहि ते राजंस्तेनातियशसा तदा । धर्मिणां प्रवरेणाथ नैष प्राप्तो मनोरथः ८ तथैवांशुमता वत्स लोकेऽप्रतिमतेजसा । गङ्गां प्रार्थयता नेतुं प्रतिज्ञा नापवर्जिता ९ राजर्षिणा गुणवता महर्षिसमतेजसा । मत्तुल्यतपसा चैव क्षत्रधर्मस्थितेन च १० दिलीपेन महाभाग तव पित्रातितेजसा । पुनर्न शकिता नेतुं गङ्गां प्रार्थयतानघ ११ सा त्वया समतिक्रान्ता प्रतिज्ञा पुरुषर्षभ । प्राप्तोऽसि परमं लोके यशः परमसंमतम् १२ तच्च गङ्गावतरणं त्वया कृतमरिन्दम । अनेन च भवान्प्राप्तो धर्मस्यायतनं महत् १३ प्लावयस्व त्वमात्मानं नरोत्तम सदोचिते । सलिले पुरुषश्रेष्ठ शुचिः पुण्यफलो भव १४ पितामहानां सर्वेषां कुरुष्व सलिलक्रियाम् । स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामि स्वं लोकं गम्यतां नृप १५ इत्येवमुक्त्वा देवेशः सर्वलोकपि-

---

तुझी ज्येष्ठ कन्या होईल आणि तूं ठेविलेल्या नांवांनीं ह्मणजे त्रिपथगा, दिव्या, भागीरथी या नांवांनीं ही गंगा जगतामध्यें विख्यात होऊन राहील. तीन मार्ग ही व्यापणारी असल्यामुळें हिला त्रिपथगा असें ह्मणतात ५,६. हे प्रजाधिपते भगीरथराजा, आपल्या सर्व पितामहांची तूं या ठिकाणीं उदकक्रिया करून आपली प्रतिज्ञा शेवटास ने ७. हे राजा, तुझा पूर्वज सगर अत्यंतकीर्तिमान् व धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असतांनाही त्याचा हा मनोरथ सिद्धीस गेला नाहीं ८. त्याचप्रमाणें, हे वत्सा, जगतामध्यें अंशुमान् अप्रतिमतेजस्वी होता व गंगा आणण्याविषयीं तो उत्सुकही होता. परंतु, त्यालाही आपली प्रतिज्ञा शेवटास नेतां आली नाहीं ९. तेजानें महर्षींची व तपानें माझी बरोबरी करणारा व अगदीं क्षत्रधर्माप्रमाणें वागणारा असा जो तुझा अतितेजस्वी व गुणवान् पिता राजर्षि दिलीप तोही गंगा आणण्याची इच्छा करीत होता. परंतु, हे महाभाग्यवान् निष्पाप भगीरथा, तो समर्थ झाला नाहीं १०,११. सारांश, हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या पूर्वजांना जी प्रतिज्ञा शेवटास नेतां आली नाहीं ती तूं शेवटास नेलीस आणि ह्मणूनच जगतामध्यें सर्वलोकसंमत असें उत्कृष्ट यश तूं प्राप्त करून घेतलेंस १२. हे शत्रुदमना, तें गंगावतरण तूं शेवटास नेलेंस आणि यामुळें धर्मानें प्राप्त होणारें एक मोठें ( ब्रह्मलोकरूप ) स्थानच तूं प्राप्त करून घेतलेंस १३. हे पुरुषश्रेष्ठा, सर्व काल स्नानाला योग्य अशा या गंगाजलामध्ये तूं स्नान कर आणि शुचिर्भूत होऊन पुण्यफलाचा वांटेकरी हो १४; व आपल्या सर्व पितामहांची उदकक्रिया उरकून घे. तुझें कल्याण असो. मी आपल्या

तामहः । यथागतं तथागच्छद्देवलोकं महायशाः १६ भगीरथस्तु राजर्षिः कृत्वा सलिलमुत्तमम् । यथाक्रमं यथान्यायं सागराणां महायशाः १७ कृतोदकः शुची राजा स्वपुरं प्रविवेश ह । समृद्धार्थो नरश्रेष्ठ स्वराज्यं प्रशशास ह १८ प्रमुमोद च लोकस्तं नृपमासाद्य राघव । नष्टशोकः समृद्धार्थो बभूव विगतज्वरः १९ एष ते राम गङ्गाया विस्तरोऽभिहितो मया । स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते सन्ध्याकालोऽतिवर्तते २० धन्यं यशस्यमायुष्यं पुत्र्यं स्वर्ग्यमथापि च । यः श्रावयति विप्रेषु क्षत्रियेष्वितरेषु च २१ प्रीयन्ते पितरस्तस्य प्रीयन्ते दैवतानि च । इदमाख्यानमायुष्यं गङ्गावतरणं शुभम् २२ यः शृणोति च काकुत्स्थ सर्वान्कामानवाप्नुयात् । सर्वे पापाः प्रणश्यन्ति आयुः कीर्तिश्च वर्धते २३ [ १३९३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः ॥ ४४ ॥

विश्वामित्रवचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः । विस्मयं परमं गत्वा विश्वामित्रमथाब्रवीत् १ अत्यद्भुतमिदं ब्रह्मन्कथितं परमं त्वया । गङ्गा-

लोकाप्रत जातों आणि, हे राजा, तूंही जलक्रिया आटोपून आपल्या नगराला परत जा" १५. ह्याप्रमाणें भगीरथ राजाला सांगितल्यावर सर्वलोकपूर्वज महायशस्वी सुराधिपति ब्रह्मदेव आल्या मार्गानें देवलोकीं परत गेले १६. इकडे महायशस्वी भगीरथ राजर्षिही सगरपुत्रांची अनुक्रमानं यथाविधि उत्तमप्रकारें जलक्रिया करून १७ आणि उदकक्रिया केल्यावर पुनरपि स्नानानें शुचि होऊन आपल्या नगरामध्यें प्रविष्ट झाला आणि, हे पुरुषश्रेष्ठा रामा, याप्रकारें कृतकृत्य होऊन तो आपलें राज्य करूं लागला १८. हे रघुवंशजा रामा, तो राजा प्राप्त झाल्यामुळें लोकही आनंदित झाले आणि शोकरहित व चिंतारहित होऊन ते धनसमृद्ध बनले १९. हे रामा, हें मीं गंगेचें आख्यान तुला सविस्तर कथन केलें. तुझें कल्याण असो. तुझें कल्याण असो. आतां संध्यावंदनाच्या कालाचें अतिक्रमण होत आहे २०. धनदायक, यशस्कर, आयुर्वर्धक, पुत्रदायक आणि स्वर्गप्रापक असें हें आख्यान जो ब्राह्मणांना, क्षत्रियांना अथवा वैश्यांना कथन करितो २१ त्याच्यावर देव आणि पितर प्रसन्न होतात. हें गंगावतरणरूप शुभ व आयुर्वर्धक आख्यान २२ जो श्रवण करितो त्याच्या सर्व कामना परिपूर्ण होतात आणि, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्याचीं सर्व पातकें नष्ट होऊन तो चिरायु आणि महाकीर्तिमान् होतो २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

विश्वामित्र मुनींचें भाषण श्रवण करून रघुवंशज राम लक्ष्मणांसहवर्तमान अत्यंत

वतरणं पुण्यं सागरस्यापि पूरणम् २ क्षणभूतेव नौ रात्रिः संवृत्तेयं परन्तप। इमां चिन्तयतः सर्वां निखिलेन कथां तव ३ तस्य सा शर्वरी सर्वा मम सौमित्रिणा सह। जगाम चिन्तयानस्य विश्वामित्रकथां शुभाम् ४ ततः प्रभाते विमले विश्वामित्रं तपोधनम्। उवाच राघवो वाक्यं कृताह्निकमरिंदमः ५ गता भगवती रात्रिः श्रोतव्यं परमाद्भुतम्। तराम सरितां श्रेष्ठां पुण्यां त्रिपथगां नदीम् ६ नौरेषा हि सुखास्तीर्णा ऋषीणां पुण्यकर्मणाम्। भगवन्तमिह प्राप्तं ज्ञात्वा त्वरितमागता ७ तस्य तद्वचनं श्रुत्वा राघवस्य महात्मनः। संतारं कारयामास सर्षिसङ्घस्य कौशिकः ८ उत्तरं तीरमासाद्य संपूज्यर्षिगणं ततः। गङ्गाकूले निविष्टास्ते विशालां ददृशुः पुरीम् ९ ततो मुनिवरस्तूर्णं जगाम सहराघवः। विशालां नगरीं रम्यां दिव्यां स्वर्गोपमां तदा १० अथ रामो महाप्राज्ञो विश्वामित्रं महामुनिम्। पप्रच्छ प्राञ्जलिर्भूत्वा विशालामुत्तमां पुरीम् ११ कतमो राजवंशोऽयं विशालायां महामुने। श्रोतुमिच्छामि भद्रं ते परं कौतूहलं

---

विस्मित झाला आणि ह्मणाला १ " हे ब्रह्मन्, सगरपुत्रांनीं खणून ठविलेल्या खड्ड्याचेंही पूरण ज्यानें केलें असें हें पवित्र गंगावतरण अत्यंत आश्चर्यावह असलेलें आपण उत्कृष्टप्रकारें कथन केलेंत २. आपण सविस्तर सांगितलेल्या या सर्व कथेच्या चिंतनामध्यें, हे शत्रुतापन मुने, आह्मांला ही सर्व रात्र एका क्षणासारखी झाली ३. सारांश, हे विश्वामित्र मुने, लक्ष्मणासहवर्तमान मी त्या शुभ कथेचें चिंतन करीत असतां सर्वही रात्र निघून गेली " ४. नंतर चांगलें उजाडल्यावर स्नान संध्या आटोपून बसलेल्या विश्वामित्र मुनींना शत्रुदमन करणारा रघुवंशज राम ह्मणाला ५ " अत्यंत अद्भुत आख्यान श्रवण करण्यास सांपडल्यामुळें पूज्य झालेली ती रात्र निघून गेली. आतां आपण नद्यांमध्यें श्रेष्ठ व पवित्र असलेली ही त्रिपथगामिनी तरून जाऊं ६. आपण येथें आला आहां असें समजून उत्कृष्ट आस्तरणांनीं युक्त असलेली ही पुण्यवान् महर्षींची नौका सत्वर इकडे आली आहे ७. याप्रमाणें महात्म्या रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर कुशिकवंशज विश्वामित्रमुनि ऋषिगणासहवर्तमान गंगा तरून गेले ८. नंतर उत्तर तीरावर येऊन तेथील ऋषिगणाचें पूजन केल्यावर ते गंगातीरीं राहिले असतां विशालानामक नगरी त्यांनीं अवलोकन केली ९. तेव्हां मुनिश्रेष्ठ विश्वामित्र रामलक्ष्मणांसहवर्तमान सत्वर त्या दिव्य, रम्य व स्वर्गतुल्य विशाला नगरीमध्यें गेले १०. नंतर महाबुद्धिमान् राम हात जोडून त्या उत्कृष्ट विशाला नगरीसंबंधानें महर्षि विश्वामित्रांना विचारूं लागला कीं ११ " हे महामुने, विशाला नगरीमध्यें हा कोणत्या राजाचा वंश आहे

हि मे १२ तस्य तद्वचनं श्रुत्वा रामस्य मुनिपुङ्गवः । आख्यातुं तत्समारंभे विशालायाः पुरातनम् १३ श्रूयतां राम शक्रस्य कथां कथयतः श्रुताम् । अस्मिन्देशे हि यद्वृत्तं शृणु तत्त्वेन राघव १४ पूर्वं कृतयुगे राम दितेः पुत्रा महाबलाः । अदितेश्च महाभागा वीर्यवन्तः सुधार्मिकाः १५ ततस्तेषां नरव्याघ्र बुद्धिरासीन्महात्मनाम् । अमरा विजराश्चैव कथं स्यामो निरामयाः १६ तेषां चिन्तयतां तत्र बुद्धिरासीद्विपश्चिताम् । क्षीरोदमथनं कृत्वा रसं प्राप्स्याम तत्रवै १७ ततो निश्चित्य मथनं योक्त्रं कृत्वा च वासुकिम् । मन्थानं मन्दरं कृत्वा ममन्थुरमितौजसः १८ अथ वर्षसहस्रेण योक्त्रसर्पशिरांसि च । वमन्तोतिविषं तत्र ददंशुर्दशनैः शिलाः १९ उत्पपाताग्निसंकाशं हालाहलमहाविषम् । तेन दग्धं जगत्सर्वं सदेवासुरमानुषम् २० अथ देवा महादेवं शंकरं शरणार्थिनः । जग्मुः पशुपतिं रुद्रं त्राहि त्राहीति तुष्टुवुः २१ एवमुक्त-

हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. आपलें देव बरें करो ; याविषयीं मला पराकाष्ठेची उत्सुकता आहे " १२. हें त्या रामाचें भाषण श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ विश्वामित्र विशाला नगरीविषयीं पुरातन वृत्तांत सांगूं लागले १३. ( ते ह्मणाले ) " हे रामा, इंद्र कथन करीत असतांना मीं ऐकिलेली ही कथा तूं श्रवण कर. सारांश, हे राघवा, या देशांत काय वर्तमान घडलें हें तूं खरें खरें ऐकून घे १४. हे रामा, पूर्वी कृतयुगामध्यें दितीचे पुत्र महाबलाढ्य असून अदितीचेही पुत्र महाभाग्यवान् , वीर्यवान् व परम धार्मिक होते १५. एकदां, हे पुरुषश्रेष्ठा, " आपण निरोगी व अजरामर कसे होऊं ! " ह्मणून त्या महात्म्यांच्या मनामध्यें विचार उत्पन्न झाला १६. तेव्हां विचार करितां करितां " क्षीरसागराचें मंथन करून अमृतरूप रस प्राप्त करून घ्यावा " असें त्या बुद्धिमानांना सुचलें असतां १७ त्यांनीं समुद्रमंथनाचा निश्चय केला आणि वासुकीची दोरी करून व मंदर पर्वताची रवी करून त्या अत्यंत पराक्रमी देवदैत्यांनीं समुद्रमंथनाला आरंभ केला १८. मंथन सुरू होऊन हजार वर्षे झाल्यावर रज्जुरूप बनलेल्या वासुकीच्या मुखांतून भयंकर विष बाहेर पडूं लागलें व दंतांच्या योगानें त्या सर्पाच्या मस्तकांनीं शिलांना दंशही केले १९. पाषाणांना दंश झाल्यावर अग्नीसारिखें जाज्वल्य हालाहल महाविष उत्पन्न झालें असतां देव, दैत्य व मानव ह्यांसहवर्तमान सर्व जगत् त्याच्या योगानें दग्ध होऊं लागलें २०. तेव्हां कल्याण करणाऱ्या सुरश्रेष्ठ पशुपति रुद्राला देव शरण गेले आणि " त्राहि त्राहि " असें ह्मणून त्यांनीं त्याला संतुष्ट केलें २१. ह्याप्रमाणें देवांनीं देवदेवेश्वर प्रभु शंकराची स्तुति केली

स्ततो देवैर्देवदेवेश्वरः प्रभुः। प्रादुरासीत्ततोत्रैव शङ्खचक्रधरो हरिः २२ उवाचैनं स्मितं कृत्वा रुद्रं शूलधरं हरिः। दैवतैर्मथ्यमाने तु यत्पूर्वं समुपस्थितम् २३ तत्त्वदीयं सुरश्रेष्ठ सुराणामग्रतो हि यत्। अग्रपूजामिह स्थित्वा गृहाणेदं विषं प्रभो २४ इत्युक्त्वा च सुरश्रेष्ठस्तत्रैवान्तरधीयत। देवतानां भयं दृष्ट्वा श्रुत्वा वाक्यं तु शार्ङ्गिणः २५ हालाहलं विषं घोरं संजग्राहामृतोपमम्। देवान्विसृज्य देवेशो जगाम भगवान्हरः २६ ततो देवासुराः सर्वे ममन्थू रघुनन्दन। प्रविवेशाथ पातालं मन्थानः पर्वतोत्तमः २७ ततो देवाः सगन्धर्वास्तुष्टुवुर्मधुसूदनम्। त्वं गतिः सर्वभूतानां विशेषेण दिवौकसाम् २८ पालयास्मान्महाबाहो गिरिमुद्धर्तुमर्हसि। इति श्रुत्वा हृषीकेशः कामठं रूपमास्थितः २९ पर्वतं पृष्ठतः कृत्वा शिश्ये तत्रोदधौ हरिः। पर्वताग्रं तु लोकात्मा हस्तेनाक्रम्य केशवः ३० देवानां मध्यतः स्थित्वा ममन्थ पुरुषोत्तमः। अथ वर्षसहस्रेण आयुर्वेदमयः पुमान् ३१ उदतिष्ठत्सुधर्मात्मा सदण्डः सकमण्डलुः। अथ धन्वन्तरिर्नाम अप्सरसश्च सुवर्चसः ३२ अप्सु निर्मथनादेव रसात्तस्माद्वरस्त्रियः। उत्प-

---

असतां शंख व चक्र धारण करणारे श्रीहरिही त्या ठिकाणीं प्रकट झाले २२. नंतर हास्यपूर्वक शूलपाणि रुद्राला श्रीहरि ह्मणाले " हे सुरश्रेष्ठ, देव मंथन करीत असतांना जें प्रथम उत्पन्न झालें तें आपलें आहे. कारण, आपण देवांमध्यें श्रेष्ठ आहां. ह्याकरितां, हे प्रभो, येथें राहून आपण ह्या अग्रपूजेचा ह्मणजे विषाचा स्वीकार करा " २३,२४. ह्याप्रमाणें बोलून सुरश्रेष्ठ विष्णु तेथंच अदृश्य झाले; तेव्हां देवतांचें भय पाहून व विष्णूचें भाषण श्रवण करून २५ शंकरांनीं अमृताप्रमाणें हालाहलसंज्ञक घोर विषाचा स्वीकार केला व नंतर देवांचा निरोप घेऊन ते देवाधिपति भगवान् हर तेथून निघून गेले २६. तदनंतर, हे रघुनंदना, सर्व देवदैत्य मंथन करूं लागले असतां तो श्रेष्ठपर्वतरूप मंथा पातालामध्यें प्रविष्ट झाला २७. " तेव्हां तूं सर्व प्राण्यांचा आणि विशेषतः देवांचा आधार आहेस. ह्यास्तव, हे महापराक्रमी विष्णो, तूं हा खालीं खचलेला पर्वत वर काढ आणि आमचें रक्षण कर " ह्मणून गंधर्वांसहवर्तमान देवांनीं मधुसूदनाचें स्तवन केलें असतां तें श्रवण करून हृषीकेशानें कूर्मरूप धारण केलें २८,२९. नंतर पर्वत पाठीवर घेऊन त्या श्रीहरीनें त्या महासागरामध्यें शयन केलें; इतकेंच नव्हे परंतु पर्वताचें अग्र हातानें धरून तो जगदात्मा पुरुषश्रेष्ठ केशव देवांमध्यें उभा राहून समुद्राचें मंथन करूं लागला. तदनंतर एक हजार वर्षांनीं अत्यंत धर्मात्मा असा धन्वंतरिनामक आयुर्वेदमय पुरुष दंडकमंडलूंसहवर्तमान समुद्रांतून

तुर्मनुजश्रेष्ठ तस्मादप्सरसोऽभवन् ३३ षष्टिः कोट्योऽभवंस्तासामप्सरसां सुवर्चसाम्। असंख्येयास्तु काकुत्स्थ यास्तासां परिचारिकाः ३४ न ताः स्म प्रतिगृह्णन्ति सर्वे ते देवदानवाः। अप्रतिग्रहणादेव ता वै साधारणाः स्मृताः ३५ वरुणस्य ततः कन्या वारुणी रघुनन्दन। उत्पपात महाभागा मार्गमाणा परिग्रहम् ३६ दितेः पुत्रा न तां राम जगृहुर्वरुणात्मजाम्। अदितेस्तु सुता वीर जगृहुस्तामनिन्दिताम् ३७ असुरास्तेन दैतेयाः सुरास्तेनादितेः सुताः। हृष्टाः प्रमुदिताश्चासन्वारुणीग्रहणात्सुराः ३८ उच्चैःश्रवा हयश्रेष्ठो मणिरत्नं च कौस्तुभम्। उदतिष्ठन्नरश्रेष्ठ तथैवामृतमुत्तमम् ३९ अथ तस्य कृते राम महानासीत्कुलक्षयः। अदितेस्तु ततः पुत्रा दितिपुत्रानयोधयन् ४० एकतामगमन्सर्वे असुरा राक्षसैः सह। युद्धमासीन्महाघोरं वीर त्रैलोक्यमोहनम् ४१ यदा क्षयं गतं सर्वं तदा विष्णुर्महाबलः। अमृतं

---

उत्पन्न झाला व अत्यंततेजस्वी अशा अप्सराही त्यांतूनच निघाल्या ३०,३१,३२. हे पुरुषश्रेष्ठा रामा, अपांचें (ह्मणजे जलाचें) मंथन चाललें असतां त्या रसापासून ज्या-अर्थी त्या उत्कृष्ट स्त्रिया निघाल्या, त्याअर्थी त्यांना अप्सरा ही संज्ञा प्राप्त झाली ३३. त्या अति तेजस्वी अप्सरा मुख्य मुख्य मिळून साठ कोटि होत्या व, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्यांच्या परिचारिका ज्या गौण अप्सरा उत्पन्न झाल्या त्यांची तर गणना करणेंही अशक्य आहे ३४. असो. समुद्रमंथन करणाऱ्या त्या देवदानवांपैकीं कोणीही त्यांचा स्वीकार केला नाहीं. तेव्हां स्वीकार न केल्यामुळेंच त्या सर्वसाधारण झाल्या ३५. नंतर, हे रघुनंदना रामा, वरुणाची कन्या महाभाग्यवती वारुणी अर्थात् सुरा ही उत्पन्न झाली आणि आपला परिग्रह करणारा कोणी आहे कीं नाहीं हें हुडकूं लागली ३६. हे रामा, दितीच्या पुत्रांनीं त्या वरुणकन्येचा स्वीकार केला नाहीं; परंतु, हे वीरा, अदितीच्या पुत्रांनीं ह्मणजे देवांनीं त्या अनिंदित वरुणकन्येचा स्वीकार केला ३७. तेव्हां सुरेचा परिग्रह न केल्यामुळें दितीचे पुत्र असुर झाले, तिचा स्वीकार केल्यामुळें अदितीचे पुत्र सुर झाले व त्या वरुणकन्येचा स्वीकार केल्यामुळें सुर हर्ष व आनंद यांनींही युक्त झाले ३८. हे पुरुषश्रेष्ठा, नंतर श्रेष्ठ अश्व उच्चैःश्रवा, उत्तम रत्न कौस्तुभ आणि उत्कृष्ट अमृत त्यांतून निघालें ३९. तेव्हां, हे रामा, त्या अमृताकरितां देव व असुर ह्यांचा जवळ जवळ मोठा कुलक्षयच झाला. अदितीचे पुत्र दितीच्या पुत्रांशीं युद्ध करूं लागले ४० तेव्हां सर्वही असुरांनीं राक्षसांशीं ऐक्य केलें व, हे वीरा, त्रैलोक्याला मोह पाडणारें असें त्यांच्यामध्यें महाघोर युद्ध झालें ४१. नंतर युद्ध होतां होतां त्या उभयतांचाही

सोऽहरत्तूर्णं मायामास्थाय मोहिनीम् ४२ ये गताभिमुखं विष्णुमक्षरं पुरुषोत्तमम् । संपिष्टास्ते तदा युद्धे विष्णुना प्रभविष्णुना ४३ अदितेरात्मजा वीरा दितेः पुत्रान्निजघ्निरे । अस्मिन्घोरे महायुद्धे दैतेयादित्ययोर्भृशम् ४४ निहत्य दितिपुत्रांस्तु राज्यं प्राप्य पुरन्दरः । शशास मुदितो लोकान्सर्षिसङ्घान्सचारणान् ४५ [१४३८] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ॥ ४५ ॥

हतेषु तेषु पुत्रेषु दितिः परमदुःखिता । मारीचं कश्यपं नाम भर्तारमिदमब्रवीत् १ हतपुत्रास्मि भगवंस्तव पुत्रैर्महात्मभिः । शक्रहन्तारमिच्छामि पुत्रं दीर्घतपोऽर्जितम् २ साहं तपश्चरिष्यामि गर्भं मे दातुमर्हसि । ईश्वरं शक्रहन्तारं त्वमनुज्ञातुमर्हसि ३ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा मारीचः कश्यपस्तदा । प्रत्युवाच महातेजा दितिं परमदुःखिताम् ४ एवं भवतु भद्रं ते शुचिर्भव तपोधने । जनयिष्यसि पुत्रं त्वं शक्रहन्तारमाहवे ५ पूर्णे वर्षसहस्रे तु शुचिर्यदि भविष्यसि । पुत्रं त्रैलो-

---

जेव्हां प्रायः सर्वस्वीं क्षय झाला तेव्हां मायेनें मोहिनीचें रूप धारण करून महाबलाढ्य विष्णूनीं तें अमृत सत्वर हरण केलें ४२. अचल अशा पुरुषश्रेष्ठ विष्णूचे अंगावर जे धावून गेले त्या सर्वांचें त्या महाप्रभावी विष्णूनें युद्धामध्यें अगदीं पीठ करून टाकिलें ४३. देवदैत्यांच्या या अत्यंत घोर महायुद्धामध्यें अदितीच्या वीर पुत्रांनीं दितिपुत्रांचा वध केला ४४ व ह्याप्रमाणें दितिपुत्रांचा वध करून राज्य मिळविल्यावर इंद्रानें आनंदित होऊन ऋषिगण व चारण यांसहवर्तमान लोकांचें परिपालन केलें ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४५ ॥

त्या पुत्रांचा वध झाला असतां दिति अत्यंत दुःखित होऊन मरीचिपुत्र कश्यपनामक भर्त्याला ह्मणाली १ "हे भगवन् , आपल्या महापराक्रमी पुत्रांनीं माझ्या पुत्रांचा वध केला. ह्यास्तव, दीर्घ तपश्चर्येच्या योगानें आपणांपासून इंद्रघातक पुत्र प्राप्त करून घेण्याची माझी इच्छा आहे २. करितां, मी तपश्चर्या करीन; आपण मला गर्भ द्या. सारांश, इंद्रघातक असा त्रैलोक्याधिपति पुत्र तपश्चर्येनें प्राप्त करून घेण्याविषयीं आपण मला अनुज्ञा द्या." ३. हें तिचें भाषण श्रवण केल्यावर अत्यंत दुःखित झालेल्या त्या दितीला महातेजस्वी मरिचिपुत्र कश्यप ह्मणाले ४ "असें होवो. हे तपोधने, तुझें कल्याण असो. तूं शुचिर्भूत रहा; ह्मणजे संग्राममध्यें इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल. ५. सहस्र संवत्सर पूर्ण होईपर्यंत जर तूं शुचिर्भूत राहशील

क्यहन्तारं मत्तस्त्वं जनयिष्यसि ६ एवमुक्त्वा महातेजाः पाणिना संममार्ज ताम् । तामालभ्य ततः स्वस्ति इत्युक्त्वा तपसे ययौ ७ गते तस्मिन्नरश्रेष्ठ दितिः परमहर्षिता । कुशप्लवं समासाद्य तपस्तेपे सुदारुणम् ८ तपस्तस्यां हि कुर्वन्त्यां परिचर्यां चकार ह । सहस्राक्षो नरश्रेष्ठ परया गुणसंपदा ९ अग्निं कुशान्काष्ठमपः फलं मूलं तथैव च । न्यवेदयत्सहस्राक्षो यच्चान्यदपि काङ्क्षितम् १० गात्रसंवाहनैश्चैव श्रमापनयनैस्तथा । शक्रः सर्वेषु कालेषु दितिं परिचचार ह ११ पूर्णे वर्षसहस्रे सा दशोने रघुनन्दन । दितिः परमसंहृष्टा सहस्राक्षमथाब्रवीत् १२ तपश्चरन्त्या वर्षाणि दश वीर्यवतां वर । अवशिष्टानि भद्रं ते भ्रातरं द्रक्ष्यसे ततः १३ यमहं त्वत्कृते पुत्र तमाधास्ये जयोत्सुकम् । त्रैलोक्यविजयं पुत्र सह भोक्ष्यसि विज्वरः १४ याचितेन सुरश्रेष्ठ पित्रा तव महात्मना । वरो वर्षसहस्रान्ते मम दत्तः सुतं प्रति १५ इत्युक्त्वा च दितिस्तत्र प्राप्ते मध्यन्दिनेश्वरे । निद्रयापहृता देवी

---

तर माझ्यापासून त्रैलोक्याधिपति इंद्राचा वध करणारा पुत्र तुला प्राप्त होईल " ६. याप्रमाणें बोलून महातेजस्वी कश्यपांनीं तिच्या अंगावरून हात फिरविला आणि नंतर तिच्याशीं समागम केल्यावर " कल्याण असो " असें ह्मणून ते तपश्चर्येकरितां निघून गेले ७. हे पुरुषश्रेष्ठा रामा, ते कश्यपमुनि गेल्यावर दितीला अत्यंत हर्ष झाला व कुशप्लवसंज्ञक तपोवनामध्यें जाऊन तिनें फारच उग्र तपश्चर्येला आरंभ केला ८. हे पुरुषश्रेष्ठा रामा, ती तपश्चर्या करूं लागली असतां इंद्रानें फारच उत्कृष्ट रीतीनें तिची सेवा चालविली ९. अग्नि, कुश, काष्ठें, उदक, फलें, मुळें आणि इतरही जें कांहीं तिला हवें असेल तें इंद्रानें दिलें १०. इतकेंच नव्हे परंतु, श्रमपरिहार होण्याकरितां हातपाय वगैरे चेपूनही इंद्र सर्व काल दितीची सेवा करूं लागला ११. असें होतां होतां, हे रघुनंदना, दहाकमी हजार वर्षें पूर्ण झाल्यावर दिति अत्यंत हर्षयुक्त होऊन इंद्राला ह्मणाली १२ " हे वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ इंद्रा, माझ्या तपश्चर्येची आतां दहा वर्षें उरलीं आहेत. तुझें कल्याण असो. हीं दहा वर्षें लोटल्यावर तूं भ्रात्याला अवलोकन करशील १३. हे पुत्रा, तुझ्या नाशाकरितां ह्मणून जो पुत्र मीं मागून घेतला, तो तसा न करितां मी तुला जय देण्याविषयीं उत्सुक असाच पुत्र उत्पन्न करीन आणि, हे पुत्रा, त्या आपल्या भ्रात्यासहवर्तमान तूं त्रैलोक्यविजयजन्य सुखाचा निश्चिंत होऊन उपभोग घेशील १४. हे सुरश्रेष्ठा, तुझ्या पित्याची प्रार्थना केली असतां " हजार वर्षांनीं तुला पुत्र होईल " ह्मणून त्या महात्म्यानें मला पुत्रप्राप्तीसंबंधानें वर दिला आहे " १५. ह्याप्रमाणें इंद्राला सांगितल्यावर सूर्य मध्यान्हीं

पादौ कृत्वाथ शीर्षतः १६ दृष्ट्वा तामशुचिं शक्रः पादयोः कृतमूर्धजाम्। शिरस्थाने कृतौ पादौ जहास च मुमोद च १७ तस्याः शरीरविवरं प्रविवेश पुरन्दरः। गर्भं च सप्तधा राम चिच्छेद परमात्मवान् १८ भिद्यमानस्ततो गर्भो वज्रेण शतपर्वणा। रुरोद सुस्वरं राम ततो दितिरबुध्यत १९ मा रुदो मा रुदश्चेति गर्भं शक्रोऽभ्यभाषत। बिभेद च महातेजा रुदन्तमपि वासवः २० न हन्तव्यं न हन्तव्यमित्येव दितिरब्रवीत्। निष्पपात ततः शक्रो मातुर्वचनगौरवात् २१ प्राञ्जलिर्वज्रसहितो दितिं शक्रोऽभ्यभाषत। अशुचिर्देवि सुप्तासि पादयोः कृतमूर्धजा २२ तदन्तरमहं लब्ध्वा शक्रहन्तारमाहवे। अभिन्दं सप्तधा देवि तन्मे त्वं क्षन्तुमर्हसि २३ [१४६१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ॥ ४६ ॥

सप्तधा तु कृते गर्भे दितिः परमदुःखिता। सहस्राक्षं दुराधर्षं वाक्यं सानुनयाब्रवीत् १ ममापराधाद्गर्भोऽयं सप्तधा शकलीकृतः। नापराधो हि देवेश तवात्र बलसूदन २ प्रियं त्वत्कृतमिच्छामि मम गर्भविपर्यये।

---

आला असतां उशाकडे पाय करून ती दिति निद्रिस्थ झाली १६. तेव्हां पाय ठेवण्याच्या ठिकाणीं मस्तक ठेविलेल्या त्या अशुचि दितीला अवलोकन करून म्हणजे मस्तक ठेवण्याचे ठिकाणीं पाय ठेविल्यामुळें अशुचि झालेल्या त्या दितीला अवलोकन करून इंद्राला हर्ष व आनंद झाला १७. तेव्हां, हे रामा, कारस्थानी असलेल्या त्या इंद्रानें तिच्या शरीरामध्यें प्रविष्ट होऊन तिच्या गर्भाचे सात तुकडे केले १८. परंतु, शेंकडों धारांनीं युक्त असलेल्या वज्राच्या योगानें तुकडे होऊं लागले असतां तो गर्भ सुस्वर रडूं लागला; तेव्हां हे रामा, दिति जागी झाली १९. नंतर " रडूं नको, रडूं नको " असें गर्भाला उद्देशून इंद्र ह्मणाला आणि. तो रडत असतांनाही त्या महातेजस्वी इंद्रानें त्याचे तुकडे केलेच २०. नंतर " मारूं नको, मारूं नको, " असेंच एकसारखें दिति ह्मणूं लागली असतां मातेच्या वचनाला मान देऊन इंद्र लगेच बाहेर पडला २१ आणि हात जोडून तो वज्रपाणि इंद्र तिला ह्मणाला " हे देवि, पाय ठेवण्याचे ठिकाणीं मस्तक ठेवून निद्रिस्थ असल्यामुळें तूं अशुचि झालीस २२. तेव्हां, हें छिद्र पाहून मी संग्रामामध्यें इंद्राचा वध करणाऱ्या तुझ्या पुत्राचे सात तुकडे केले. तस्मात्, ह्याची तूं मला क्षमा कर २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४६ ॥

गर्भाचे इंद्रानें सात तुकडे केल्यावर दिति अत्यंत दुःखित झाली आणि सांत्वनपूर्वक अजिंक्य इंद्राला ह्मणाली १ " हे देवाधिपते, हे बलदैत्यनाशका, माझ्या अपराधामुळें

मरुतां मम सप्तानां स्थानपाला भवन्तु ते ३ वातस्कन्धा इमे सप्त चरन्तु दिवि पुत्रक । मारुता इति विख्याता दिव्यरूपा ममात्मजाः ४ ब्रह्मलोकं चरत्वेक इन्द्रलोकं तथापरः । दिव्यवायुरिति ख्यातस्तृतीयोपि महायशाः ५ चत्वारस्तु सुरश्रेष्ठ दिशो वै तव शासनात् । संचरिष्यन्ति भद्रं ते कालेन हि ममात्मजाः ६ त्वत्कृतेनैव नाम्ना वै मारुता इति विश्रुताः। तस्यास्तद्वचनं श्रुत्वा सहस्राक्षः पुरन्दरः ७ उवाच प्राञ्जलिर्वाक्यमितीदं बलसूदनः । सर्वमेतद्यथोक्तं ते भविष्यति न संशयः ८ विचरिष्यन्ति भद्रं ते देवरूपास्तवात्मजाः । एवं तौ निश्चयं कृत्वा मातापुत्रौ तपोवने ९ जग्मतुस्त्रिदिवं राम कृतार्थाविति नः श्रुतम् । एष देशः स काकुत्स्थ महेन्द्राध्युषितः पुरा १० दितिं यत्र तपःसिद्धामेवं परिचचार सः ।

ह्या गर्भाचे सात तुकडे झाले आहेत; यांत तुझा अपराध नाहीं २. आतां माझ्या गर्भाच्या नाशाकरितां तूं जें कृत्य केलेंस, तें उभयतांनाही प्रिय व्हावें अशी माझी इच्छा आहे. करितां, सात मरुद्गणांच्या स्थानांचे हे सात पुत्र रक्षण करणारे होवोत ३. हे पुत्रा, आकाशामध्यें जे सात वायुप्रवाह आहेत त्यांचे ठिकाणीं मारुत ह्मणून विख्यात असलेले हे माझे दिव्यरूपी पुत्र संचार करोत ४. हे महायशस्वी इंद्रा, माझ्या पुत्रांपैकीं एक गण ब्रह्मलोकामध्यें संचार करो, दुसरा इंद्रलोकांत संचार करो, तिसरा दिव्य वायु ह्मणून प्रसिद्ध असलेला स्वर्गामध्यें राहो ५ आणि, हे सुरश्रेष्ठा, बाकीचे चार माझे पुत्रगण तुझ्या आज्ञेनें चारी दिशांचे ठिकाणीं योग्य कालीं संचार करोत. तुझें कल्याण असो ६. (मा रुदः मा रुदः—ह्मणजे रडूं नको, रडूं नको—असें ज्याअर्थी तूं ह्मणाला आहेस, त्याअर्थी) तूंच ठेविलेल्या नांवानें हे पुत्र मारुत ह्मणून प्रसिद्ध होवोत". ह्याप्रमाणें तिचें भाषण श्रवण केल्यावर सहस्रनयन बलदैत्यनाशक इंद्र हात जोडून तिला ह्मणाला "तूं ह्मटल्याप्रमाणें हें सर्व कांहीं होईल; ह्यांत संशय नाहीं ७,८. तुझें कल्याण असो. तुझे देवरूप पुत्र तुझ्या ह्मणण्याप्रमाणें संचार करितील". ह्याप्रमाणें तपोवनामध्यें ठरवून तीं मायलेकरें ९, हे रामा, कृतार्थ होऊन स्वर्गाला गेलीं असें आमच्या ऐकण्यांत आहे. असो. हे काकुत्स्था, तोच हा देश असून ह्या ठिकाणीं पूर्वी महेंद्रानें वास्तव्य केलें होतें १०. कारण, तपश्चर्येच्या योगानें सिद्ध झालेल्या दितीची इंद्रानें सेवा केली ती याच ठिकाणीं. असो. (हा प्रदेश कोणता हें मीं तुला सांगितलें; आतां ही विशाला नगरी कोणी स्थापिली तें सांगतों.) हे पुरुषश्रेष्ठा रामा, इक्ष्वाकूला अलंबुषेचे ठिकाणीं विशाल ह्मणून प्रख्यात असलेला एक अत्यंत धार्मिक पुत्र झाला असून त्यानें

इक्ष्वाकोस्तु नरव्याघ्र पुत्रः परमधार्मिकः ११ अलम्बुषायामुत्पन्नो विशाल इति विश्रुतः । तेन चासीदिह स्थाने विशालेति पुरीकृता १२ विशालस्य सुतो राम हेमचन्द्रो महाबलः । सुचन्द्र इति विख्यातो हेमचन्द्रादनन्तरः १३ सुचन्द्रतनयो राम धूम्राश्व इति विश्रुतः । धूम्राश्वतनयश्चापि सृञ्जयः समपद्यत १४ सृञ्जयस्य सुतः श्रीमान्सहदेवः प्रतापवान् । कुशाश्वः सहदेवस्य पुत्रः परमधार्मिकः १५ कुशाश्वस्य महातेजाः सोमदत्तः प्रतापवान् । सोमदत्तस्य पुत्रस्तु काकुत्स्थ इति विश्रुतः १६ तस्य पुत्रो महातेजाः संप्रत्येष पुरीमिमाम् । आवसत्परमप्रख्यः सुमतिर्नाम दुर्जयः १७ इक्ष्वाकोस्तु प्रसादेन सर्वे वैशालिका नृपाः । दीर्घायुषो महात्मानो वीर्यवन्तः सुधार्मिकाः १८ इहाद्य रजनीमेकां सुखं स्वप्स्यामहे वयम् । श्वःप्रभाते नरश्रेष्ठ जनकं द्रष्टुमर्हसि १९ सुमतिस्तु महातेजा विश्वामित्रमुपागतम् । श्रुत्वा नरवरश्रेष्ठः प्रत्यागच्छन्महायशाः २० पूजां च परमां कृत्वा सोपाध्यायः सबान्धवः । प्राञ्जलिः कुशलं पृष्ट्वा विश्वामित्रमथाब्रवीत् २१ धन्योस्म्यनुगृहीतोस्मि यस्य मे विषयं मुने । संप्राप्तो दर्शनं

---

ह्या ठिकाणीं विशाला ह्मणून नगरी स्थापन केली ११,१२. हे रामा, विशालाला हेमचंद्र ह्मणून एक महाबलाढ्य पुत्र झाला व पुढें त्या हेमचंद्रालाही सुचंद्र ह्मणून विख्यात असलेला एक पुत्र झाला १३. हे रामा, धूम्राश्व ह्मणून सुचंद्राचा पुत्र प्रसिद्ध आहे. त्या धूम्राश्वालाही सृंजय ह्मणून एक पुत्र झाला १४. वैभवशाली व प्रतापी सहदेव हा सृंजयाचा पुत्र होय आणि अत्यंत धार्मिक कुशाश्व हा सहदेवाचा पुत्र होय १५. कुशाश्वाला महातेजस्वी व प्रतापी असा सोमदत्त ह्मणून पुत्र झाला व त्या सोमदत्तालाही काकुत्स्थ ह्मणून एक प्रख्यात पुत्र झाला १६. त्या काकुत्स्थाचा पुत्र हा महातेजस्वी सुमति सांप्रत या पुरीमध्यें वास्तव्य करीत आहे. हा फारच प्रख्यात असून जिंकण्याला कठीण आहे १७. इक्ष्वाकूच्या प्रसादानें विशाला नगरींतील सर्वही राजे दीर्घायुषी, महात्मे, वीर्यवान् व अत्यंत धार्मिक झालेले आहेत १८. असो. हे पुरुषश्रेष्ठा रामा, आज एक रात्र आपण ह्या ठिकाणीं सुखानें शयन करूं. उद्यां उजाडल्यावर तूं जनकाला अवलोकन करशील १९ ह्याप्रमाणें उभयतांचें संभाषण चाललें असतां विश्वामित्रमुनि संनिध आल्याचें श्रवण करून तो महायशस्वी व महातेजस्वी नृपश्रेष्ठ सुमति त्यांना सामोरा आला २०. आणि उपाध्याय व बांधव ह्यांसहवर्तमान विश्वामित्रमुनींचें उत्कृष्टप्रकारें पूजन करून कुशलप्रश्न केल्यावर तो हात जोडून विश्वामित्रांना ह्मणाला २१ " हे मुने, मी धन्य आहें व

चैव नास्ति धन्यतरो मम २२ [ १४८३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥ ४७ ॥

पृष्ट्वा तु कुशलं तत्र परस्परसमागमे । कथान्ते सुमतिर्वाक्यं व्याजहार महामुनिम् १ इमौ कुमारौ भद्रं ते देवतुल्यपराक्रमौ । गजसिंहगती वीरौ शार्दूलवृषभोपमौ २ पद्मपत्रविशालाक्षौ खड्गतूणधनुर्धरौ । अश्विनाविव रूपेण समुपस्थितयौवनौ ३ यदृच्छयेव गां प्राप्तौ देवलोकादिवामरौ । कथं पद्भ्यामिह प्राप्तौ किमर्थं कस्य वा मुने ४ भूषयन्ताविमं देशं चन्द्रसूर्याविवाम्बरम् । परस्परेण सदृशौ प्रमाणेङ्गितचेष्टितैः ५ किमर्थं च नरश्रेष्ठौ संप्राप्तौ दुर्गमे पथि । वरायुधधरौ वीरौ श्रोतुमिच्छामि तत्त्वतः ६ तस्य तद्वचनं श्रुत्वा यथावृत्तं न्यवेदयत् । विश्वामित्रवचः श्रुत्वा राजा परमविस्मितः ७ अतिथी परमं प्राप्तौ

---

माझ्यावर मोठाच अनुग्रह झालेला आहे. कारण, माझ्या प्रदेशामध्यें आपण आला आहां व मला आपल्या दर्शनाचाही लाभ झाला आहे. तस्मात्, आपण माझ्यापेक्षां धन्य नाहीं २२ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडांपैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४७ ॥

परस्परांची भेट झाल्यानंतर कुशलप्रश्न झाल्यावर संभाषण सुरू झालें असतां सुमतिराजा महामुनि विश्वामित्रांना ह्मणाला १ " आपलें देव बरें करो ; हे पुत्र वीर, देवांसारखे पराक्रमी, गजाप्रमाणें धीर व सिंहाप्रमाणें अप्रतिहत गतीनें युक्त असून आकारानें अनुक्रमें व्याघ्र व वृषभ ह्यांप्रमाणें दिसत आहेत २. यांचे नेत्र कमलपत्राप्रमाणें विशाळ असून खड्ग, भाते व धनुष्य हीं यांनीं धारण केलेलीं आहेत. रूपानें हे अश्विनीकुमारांप्रमाणें दिसत असून ह्यांना यौवनावस्था प्राप्त झाली आहे ३ आणि प्रत्यक्ष देवच देवलोकापासून पृथ्वीवर प्राप्त झाल्याप्रमाणें हे दिसत आहेत. तेव्हां, ह्या ठिकाणीं हे पायांनीं कसे आले ? कशाकरितां आले ? आणि हे मुने, हे कोणाचे पुत्र आहेत ? हें आपण मला सांगा ४. आकाशाला भूषित करणाऱ्या चंद्रसूर्यांप्रमाणें हे हा प्रदेश भूषित करीत आहेत आणि शरीरमान, इंगित व चेष्टित ह्यांच्या योगानें हे एकमेकांसारखे आहेत ५. तस्मात्, ह्या दुर्गम मार्गामध्यें हे महाधनुर्धारी पुरुषश्रेष्ठ वीर कशाकरितां प्राप्त झाले आहेत ? हें खरें खरें ऐकण्याची माझी इच्छा आहे " ६. हें त्या सुमति राजाचें भाषण श्रवण केल्यावर विश्वामित्रमुनींनीं त्याला इत्थंभूत वर्तमान निवेदन केलें; तेव्हां विश्वामित्रांचें भाषण श्रवण करून राजा पराकाष्ठेचा विस्मित झाला ७ आणि अत्यंत सत्कारास पात्र अशा त्या

पुत्रौ दशरथस्य तौ । पूजयामास विधिवत्सत्कारार्हौ महाबलौ ८ ततः परमसत्कारं सुमतेः प्राप्य राघवौ । उष्य तत्र निशामेकां जग्मतुर्मिथिलां ततः ९ तां दृष्ट्वा मुनयः सर्वे जनकस्य पुरीं शुभाम् । साधु साध्विति शंसन्तो मिथिलां समपूजयन् १० मिथिलोपवने तत्र आश्रमं दृश्य राघवः । पुराणं निर्जनं रम्यं पप्रच्छ मुनिपुङ्गवम् ११ इद-माश्रमसंकाशं किं न्विदं मुनिवर्जितम् । श्रोतुमिच्छामि भगवन्कस्यायं पूर्व आश्रमः १२ तच्छ्रुत्वा राघवेणोक्तं वाक्यं वाक्यविशारदः । प्रत्यु-वाच महातेजा विश्वामित्रो महामुनिः १३ हन्त ते कथयिष्यामि शृणु तत्त्वेन राघव । यस्यैतदाश्रमपदं शप्तं कोपान्महात्मनः १४ गौतमस्य नर-श्रेष्ठ पूर्वमासीन्महात्मनः । आश्रमो दिव्यसंकाशः सुरैरपि सुपूजितः १५ स चात्र तप आतिष्ठदहल्यासहितः पुरा । वर्षपूगान्यनेकानि राजपुत्र महा-यशः १६ तस्यान्तरं विदित्वा च सहस्राक्षः शचीपतिः । मुनिवेषधरो भूत्वा अहल्यामिदमब्रवीत् १७ ऋतुकालं प्रतीक्षन्ते नार्थिनः सुसमाहिते ।

---

अतिथि ह्मणून प्राप्त झालेल्या महाबलाढ्य दशरथपुत्रांचें त्यानें यथाविधि पूजन केलें ८. तदनंतर सुमतीनें केलेल्या त्या उत्कृष्ट प्रकारच्या आदरातिथ्याचा स्वीकार करून एक रात्रभर ते रघुवंशज रामलक्ष्मण तेथेंच राहिले आणि नंतर मिथिला नगरीला निघाले ९. पुढें जनकाची ती शुभ नगरी अवलोकन केल्यावर " उत्तम उत्तम " ह्मणून सर्व मुनींनीं मिथिलेची प्रशंसा केली १०. तदनंतर मिथिला नगरीसमीप असलेल्या वनामध्यें जुनाट, निर्जन परंतु रम्य असा एक आश्रम अवलोकन करून रघुवंशज राम मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना ह्मणाला ११ " मुनिरहित असें हें आश्रमासारखें काय दिसत आहे ? हे भगवन्, हा पूर्वीचा कोणाचा आश्रम होता, हें ऐकण्याची माझी इच्छा आहे " १२. हें रघुवंशज रामाचें भाषण श्रवण केल्यावर संभाषण करण्या-मध्यें प्रवीण असलेले महातेजस्वी विश्वामित्र महामुनि ह्मणाले १३ " हे रघुवंशजा रामा, कोणत्या महात्म्याच्या कोपामुळें ह्या आश्रमाला शाप झाला आहे तें मी तुला खरें खरें सांगतों ; तूं श्रवण कर १४. हे पुरुषश्रेष्ठा रामा, स्वर्गांतील आश्रमाप्रमाणें असलेला हा आश्रम पूर्वी महात्म्या गौतममुनींचा होता. हा देवांनाही चांगल्या प्रकारें मान्य आहे १५. हे महायशस्वी राजकुमारा रामा, पूर्वी त्या गौतममुनींनीं अहल्येसहवर्तमान ह्या ठिकाणीं अनेक संवत्सरसमूहपर्यंत तपश्चर्या केली १६ व असें होतां होतां गौतममुनि आश्रमांत नाहींत अशी संधि पाहून सहस्रनयन शचीपति गौतममुनींचा वेष घेऊन ( आश्रमांत आला आणि ) अहल्येला ह्मणाला १७ " हे

संगमं त्वहमिच्छामि त्वया सह सुमध्यमे १८ मुनिवेषं सहस्राक्षं विज्ञाय रघुनन्दन । मतिं चकार दुर्मेधा देवराजकुतूहलात् १९ अथाब्रवीत्सुरश्रेष्ठं कृतार्थेनान्तरात्मना । कृतार्थास्मि सुरश्रेष्ठ गच्छ शीघ्रमितः प्रभो २० आत्मानं मां च देवेश सर्वथा रक्ष गौतमात् । इन्द्रस्तु प्रहसन्वाक्यमहल्यामिदमब्रवीत् २१ सुश्रोणि परितुष्टोस्मि गमिष्यामि यथागतम् । एवं संगम्य तु तदा निश्चक्रामोटजात्ततः २२ ससंभ्रमात्त्वरन्राम शङ्कितो गौतमं प्रति । गौतमं स ददर्शाथ प्रविशन्तं महामुनिम् २३ देवदानवदुर्धर्षं तपोबलसमन्वितम् । तीर्थोदकपरिक्लिन्नं दीप्यमानमिवानलम् २४ गृहीतसमिधं तत्र सकुशं मुनिपुङ्गवम् । दृष्ट्वा सुरपतिस्त्रस्तो विषण्णवदनोभवत् २५ अथ दृष्ट्वा सहस्राक्षं मुनिवेषधरं मुनिः । दुर्वृत्तं वृत्तसंपन्नो रोषाद्वचनमब्रवीत् २६ मम रूपं समास्थाय कृतवानसि दुर्मते । अकर्तव्यमिदं यस्माद्विफलस्त्वं भविष्यसि २७ गौतमेनैवमुक्तस्य सुरोषेण

अत्यंत सुंदरि, हे कृशोदरि, रतिसुखाची इच्छा करणारे लोक ऋतुकालाची परवा बाळगीत नसतात. तुझ्याशीं समागम करावा अशी माझी इच्छा आहे " १८. हे रघुनंदना रामा, नंतर हा गौतममुनींचा वेष धारण करून इंद्र आलेला आहे असें अहल्या समजली; परंतु, देवराज इंद्र माझा अभिलाष धरीत आहे ह्याचें कौतुक वाटून त्या दुर्मति स्त्रीनें त्याच्याशीं रममाण होण्याचें मनांत आणिलें १९. ( समागम झाल्या ) नंतर प्रसन्न मनानें ती त्या सुरश्रेष्ठ इंद्राला ह्मणाली " हे प्रभो सुरश्रेष्ठा, मी कृतकृत्य झालें; आतां आपण येथून सत्वर जा २० आणि गौतममुनींपासून आपण स्वतःचें व माझें सर्वप्रकारें रक्षण करा ". ह्यावर " हे सुंदरि, मी संतुष्ट झालों आहें; आतां मीं आल्या मार्गानें परत जातों " असें इंद्र हंसत हंसत अहल्येला ह्मणाला आणि ह्याप्रमाणें अहल्येशीं समागम केल्यावर तो त्या पर्णकुटिकेंतून बाहेर पडला २१,२२. हे रामा, गौतममुनींची मनांत भीति बाळगून तो लगबगीनें जात आहे तोंच महामुनि गौतम आश्रमांत प्रविष्ट होतांना त्याच्या दृष्टीं पडले, २३. देवदैत्यांनाही दुर्धर्ष, तपःसामर्थ्यानें युक्त आणि अग्नीप्रमाणें देदीप्यमान असे मुनिश्रेष्ठ गौतम तीर्थोदकामध्यें स्नान करून २४ आणि समिधा व दर्भ घेऊन आल्याचें अवलोकन केल्याबरोबर भयभीत झालेल्या देवराज इंद्राचें मुख अगदीं म्लान झालें २५. असो. आश्रमांत प्रविष्ट होतांना आपला वेष धारण करणाऱ्या दुराचारी इंद्राला पाहून सदाचारसंपन्न गौतममुनि रागारागानें त्याला ह्मणाले २६ " हे दुर्बुद्धे, माझा वेष धारण करून ज्याअर्थीं तूं हें निंद्य कृत्य केलें आहेस त्याअर्थीं तूं वृषणरहित होशील " २७. ह्याप्रमाणें अत्यंत क्रोधयुक्त झालेल्या

महात्मना । पेततुर्वृषणौ भूमौ सहस्राक्षस्य तत्क्षणात् २८ तथा शप्त्वा च वै शक्रं भार्यामपि च शप्तवान् । इह वर्षसहस्राणि बहूनि निवसिष्यसि २९ वातभक्षा निराहारा तप्यन्ती भस्मशायिनी । अदृश्या सर्वभूतानामाश्रमेऽस्मिन्वसिष्यसि ३० यदा त्वेतद्वनं घोरं रामो दशरथात्मजः । आगमिष्यति दुर्धर्षस्तदा पूता भविष्यसि ३१ तस्यातिथ्येन दुर्वृत्ते लोभमोहविवर्जिता । मत्सकाशं मुदा युक्ता स्वं वपुर्धारयिष्यसि ३२ एवमुक्त्वा महातेजा गौतमो दुष्टचारिणीम् । इममाश्रममुत्सृज्य सिद्धचारणसेविते ॥ हिमवच्छिखरे रम्ये तपस्तेपे महातपाः ३३ [ १५१७ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

अफलस्तु ततः शक्रो देवानग्निपुरोगमान् । अब्रवीत्त्रस्तनयनः सिद्धगन्धर्वचारणान् १ कुर्वता तपसो विघ्नं गौतमस्य महात्मनः । क्रोधमुत्पाद्य हि मया सुरकार्यमिदं कृतम् २ अफलोऽस्मि कृतस्तेन क्रोधात्सा च निराकृता । शापमोक्षेण महता तपोऽस्यापहृतं मया ३

महात्म्या गौतमांनीं इंद्राला ह्मटल्याबरोबर त्याचे वृषण तत्क्षणीं भूमीवर गळून पडले २८. ह्याप्रमाणें इंद्राला शाप दिल्यावर गौतममुनींनीं आपल्या भार्येलाही शाप दिला कीं " इतर कसल्याही प्रकारचा आहार न करितां केवळ वायुभक्षण करून व राखेंत पडून राहून तूं हजारों वर्षें ह्या ठिकाणीं पीडायुक्त होऊन राहशील; इतकेंच नव्हें परंतु ( स्वतःच्या रूपानें ) कोणत्याही प्राण्याच्या दृष्टोत्पत्तीस न येतां तूं ह्या आश्रमांत पडून राहशील २९.३०. दशरथपुत्र दुर्धर्ष राम जेव्हां ह्या घोर वनामध्यें येईल तेव्हां, हे दुराचारिणि, लोभमोहरहित बनलेली अशी तूं त्याच्या आदरातिथ्यानें शुद्ध होशील आणि शुद्ध झाल्यावर स्वतःचें रूप धारण करून तूं आनंदानें माझ्यासमीप राहशील " ३१.३२. ह्याप्रमाणें आपल्या दुराचारिणी भार्येला सांगितल्यावर ते महातेजस्वी व महातपस्वी गौतममुनि हा आश्रम सोडून सिद्धचारणांनीं सेविलेले अशा एका हिमालय पर्वताच्या रम्य शिखरावर तपश्चर्या करूं लागले ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४८ ॥

तदनंतर वृषणरहित झालेला इंद्र मुद्रा भयभीत करून सिद्ध, गंधर्व, चारण व अग्निप्रभृति देव ह्यांना ह्मणाला १ " महात्म्या गौतमाच्या तपामध्यें विघ्न यावें एतदर्थ त्याला क्रोध आणून मीं हें देवकार्य केलें आहे ( नाहीं तर उग्र तपश्चर्येच्या योगानें त्यानें सर्व देव स्थानभ्रष्ट करून टाकिले असते ) २. क्रोधामुळें त्यानें मला निष्फल

तस्मात् सुरवराः सर्वे सर्षिसंघाः सचारणाः । सुरकार्यकरं यूयं सफलं कर्तुमर्हथ ४ शतक्रतोर्वचः श्रुत्वा देवाः साग्निपुरोगमाः । पितृदेवानुपेत्याहुः सर्वे सह मरुद्गणैः ५ अयं मेषः सवृषणः शक्रो ह्यवृषणः कृतः । मेषस्य वृषणौ गृह्य शक्रायाशु प्रयच्छत ६ अफलस्तु कृतो मेषः परां तुष्टिं प्रदास्यति । भवतां हर्षणार्थं च ये च दास्यन्ति मानवाः ७ अक्षयं हि फलं तेषां यूयं दास्यथ पुष्कलम् । अग्नेस्तु वचनं श्रुत्वा पितृदेवाः समागताः ८ उत्पाट्य मेषवृषणौ सहस्राक्षे न्यवेशयन् । तदाप्रभृति काकुत्स्थ पितृदेवाः समागताः ९ अफलान्भुञ्जते मेषान्फलैस्तेषामयोजयन् । इन्द्रस्तु मेषवृषणस्तदाप्रभृति राघव १० गौतमस्य प्रभावेण तपसा च महात्मनः । तदागच्छ महातेज आश्रमं पुण्यकर्मणः ११ तारयैनां महाभागामहल्यां देवरूपिणीम् । विश्वामित्रवचः श्रुत्वा राघवः सहलक्ष्मणः १२ विश्वामित्रं पुरस्कृत्य आश्रमं प्रविवेश ह । ददर्श च महाभागां तपसा

करून टाकून तिचाही शापपूर्वक त्याग केला आहे व अशा रीतीनें त्याला मोठा शाप देण्याला लावून मीं त्याचें तप हरण केलें आहे ३. तस्मात्, ऋषिसमुदाय व चारण ह्यांसहवर्तमान हे सर्व सुरश्रेष्ठ हो, मज देवकार्य करणाऱ्याला तुह्मी वृषणयुक्त करा " ४. ह्याप्रमाणें इंद्रानें भाषण श्रवण केल्यावर अग्निप्रभृति सर्व देव मरुद्गणांसहवर्तमान ( कव्यवाहनप्रभृति ) पितृदेवांकडे जाऊन ह्मणाले ५ " हा मेष वृषणयुक्त आहे आणि गौतमानें इंद्राला वृषणरहित केलें आहे. करितां, मेषाचे वृषण घेऊन ते ताबडतोब इंद्राला द्या ६. ( तुमचें हविर्द्रव्य ह्मणून कल्पिलेल्या ) वृषणरहित मेषाच्या योगानें तुह्मांला पराकाष्ठेचा संतोष होईल. तुमच्या संतोषाकरितां जे मानव तुह्मांला वृषणरहित मेष अर्पण करितील ७ त्यांनाही तुह्मी मोठें अक्षय फल द्या ". हें अग्नीचें भाषण श्रवण केल्यावर पितृदेव एकत्र जुळले ८ व मेषाचें वृषण उपटून त्यांनीं इंद्राचे ठिकाणीं लाविलें. तेव्हांपासून, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, पितृदेव एकत्र होऊन ९ वृषणरहित मेषांचा स्वीकार करीत असतात. कारण, त्यांचे वृषण काढून यांनीं इंद्राला दिले. हे राघवा, महात्म्या गौतमाच्या प्रभावानें व तपानें तेव्हांपासून इंद्र मेषवृषण बनला १०. करितां, हे महातेजस्वी रामा, पुण्यकर्मी गौतमाच्या आश्रमामध्यें चल ११ आणि ( तुझ्या पादस्पर्शामुळें शापमुक्त होऊन ) देवरूप धारण करणाऱ्या ह्या अहल्येचा उद्धार कर ". हें विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण केल्यावर रघुवंशज राम विश्वामित्रांना पुढें घालून लक्ष्मणासहवर्तमान त्या आश्रमामध्यें गेला व तपाच्या योगानें जिची प्रभा चोहोंकडे फांकली आहे अशा त्या

द्योतितप्रभाम् १३ लोकैरपि समागम्य दुर्निरीक्ष्यां सुरासुरैः । प्रयत्नान्नि-र्मितां धात्रा दिव्यां मायामयीमिव १४ धूमेनाभिपरीताङ्गीं दीप्तामग्निशि-खामिव । सतुषारावृतां साभ्रां पूर्णचन्द्रप्रभामिव १५ मध्येऽम्भसो दुरा-धर्षां दीप्तां सूर्यप्रभामिव । सा हि गौतमवाक्येन दुर्निरीक्ष्या बभूव ह १६ त्रयाणामपि लोकानां यावद्रामस्य दर्शनम् । शापस्यान्तमुपागम्य तेषां दर्शनमागता १७ राघवौ तु तदा तस्याः पादौ जगृहतुर्मुदा । स्मरन्ती गौतमवचः प्रतिजग्राह सा हि तौ १८ पाद्यमर्घ्यं तथातिथ्यं चकार सुसमाहिता । प्रतिजग्राह काकुत्स्थो विधिदृष्टेन कर्मणा १९ पुष्पवृ-ष्टिर्महत्यासीद्देवदुन्दुभिनिःस्वनैः । गन्धर्वाप्सरसां चैव महानासी-त्समुत्सवः २० साधु साध्विति देवास्तामहल्यां समपूजयन् । तपोबल-विशुद्धाङ्गीं गौतमस्य वशानुगाम् २१ गौतमोऽपि महातेजा अहल्यास-हितः सुखी । रामं संपूज्य विधिवत्तपस्तेपे महातपाः २२ रामोऽपि परमां पूजां गौतमस्य महामुनेः । सकाशाद्विधिवत्प्राप्य जगाम मिथिलां ततः २३

महाभाग्यवती अहल्येला त्यानें अवलोकन केलें १२,१३. देवदैत्यांशीं मिळून आले-ल्याही कोणाला सुद्धां तिचें दर्शन होणें दुर्घट होतें. सारांश, ब्रह्मदेवानें मोठ्या प्रयत्नानें निर्माण केलेली दिव्य माया १४, धूमानें व्याप्त झालेली उज्ज्वल अग्निज्वाला, तुषारांनीं व्याप्त झालेली व अभ्रयुक्त असलेली पूर्णचंद्रप्रभा १५ अथवा मेघामध्यें असलेली उज्ज्वल सूर्यप्रभाच की काय अशी ती दिसत होती. असो. गौतममुनींनीं सांगि-तल्यावरून रामदर्शन होईपर्यंत त्रैलोक्यामध्यें कोणालाही तिचें दर्शन होणें दुर्घट झालें होतें. परंतु (रामदर्शनानें) शापमोक्ष आल्यावर ती सर्व लोकांच्या दृष्टीं पडूं लागली १६,१७. दर्शन झाल्यानंतर रघुवंशज रामलक्ष्मणांनीं तिचे आनंदानें पाय धरिले असतां गौतम मुनींनीं सांगितल्याचें स्मरून तिनेंही त्यांना स्पर्शपूर्वक अभिवंदन केलें १८. नंतर स्वस्थ अंतःकरण करून तिनें अर्घ्यपाद्यपूर्वक यथाविधि कर्मानें त्यांचें आतिथ्य केलें असतां ककुत्स्थकुलोत्पन्न रामानेंही (लक्ष्मणासहवर्तमान) त्याचा स्वीकार केला १९. तेव्हां देवदुंदुभींच्या गर्जनांसहवर्तमान रामावर व अहल्येवर मोठी पुष्पवृष्टि झाली; गंधर्व व अप्सरा ह्यांमध्येंही मोठा उत्सव झाला २० आणि गौतममुनींच्या अर्ध्या वचनांत राहून तपोबलानें शरीरशुद्धि झालेल्या त्या अहल्येची " उत्तम, उत्तम " ह्मणून देवांनीं ही प्रशंसा केली २१. तदनंतर महातेजस्वी गौतममुनि अहल्येसहवर्तमान सुखी झाले व रामाचें यथाविधि पूजन करून ते महातपस्वी मुनि तपश्चर्या करूं लागले २२ आणि नंतर रामही महामुनि गौतमांच्या उत्कृष्ट पूजेचा स्वीकार करून मिथिला

[१५४०] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकोनपञ्चाशत्तमः सर्गः ॥ ४९ ॥

ततः प्रागुत्तरां गत्वा रामः सौमित्रिणा सह। विश्वामित्रं पुरस्कृत्य यज्ञवाटमुपागमत् १ रामस्तु मुनिशार्दूलमुवाच सहलक्ष्मणः। साध्वी यज्ञसमृद्धिर्हि जनकस्य महात्मनः २ बहूनीह सहस्राणि नानादेशनिवासिनाम्। ब्राह्मणानां महाभाग वेदाध्ययनशालिनाम् ३ ऋषिवाटाश्च दृश्यन्ते शकटीशतसंकुलाः। देशो विधीयतां ब्रह्मन्यत्र वत्स्यामहे वयम् ४ रामस्य वचनं श्रुत्वा विश्वामित्रो महामुनिः। निवासमकरोद्देशे विविक्ते सलिलान्विते ५ विश्वामित्रमनुप्राप्तं श्रुत्वा नृपवरस्तदा। शतानन्दं पुरस्कृत्य पुरोहितमनिन्दितः ६ ऋत्विजोपि महात्मानस्त्वर्घ्यमादाय सत्वरम्। प्रत्युज्जगाम सहसा विनयेन समन्वितः ७ विश्वामित्राय धर्मेण ददौ धर्मपुरस्कृताम्। प्रतिगृह्य तु तां पूजां जनकस्य महात्मनः ८ पप्रच्छ कुशलं राज्ञो यज्ञस्य च निरामयम्। स तांश्चाथ मुनीन्पृष्ट्वा सोपाध्यायपुरोधसः ९ यथार्हमृषिभिः सर्वैः समागच्छत्प्रहृष्टवत्। अथ राजा मुनिश्रेष्ठं कृताञ्ज-

नगरीस चालता झाला २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ४९ ॥

तदनंतर ईशान्येस गेल्यावर विश्वामित्र मुनींना पुढें करून लक्ष्मणासहवर्तमान राम यज्ञमंडपामध्यें गेला १ आणि लक्ष्मणासहवर्तमान त्या मुनिश्रेष्ठांना ह्मणाला " महात्म्या जनकाची यज्ञसंपत्ति चांगली आहे २. कारण, हे महाभाग्यवान् मुने, वेदाध्ययनाविषयीं तत्पर असलेले देशादेशचे हजारों ब्राह्मण ३ व शेंकडों शकटांनीं गजबजून गेलेलीं ऋषींचीं वसतिस्थानें ह्या ठिकाणीं दिसत आहेत. करितां, आतां कोणती ती जागा ठरवा; ह्मणजे आपण त्या ठिकाणीं उतरूं " ४. हें रामाचें भाषण श्रवण केल्यानंतर महामुनि विश्वामित्रांनीं उदकानें युक्त व शांत अशा प्रदेशावर वास्तव्य करण्याचें ठरविलें ५. इकडे विश्वामित्र आल्याचें ऐकतांक्षणीं अनिंदित असा नृपश्रेष्ठ जनक शतानंदनामक पुरोहिताला ६ व महात्म्या ऋत्विजांना पुढें करून, सत्वर पूजासाहित्य घेऊन आणि विनययुक्त होऊन एकदम त्यांना सामोरा गेला ७ व धर्मबुद्धीनें त्यानें तें पूजासाहित्य विश्वामित्रांना अर्पण केलें. तेव्हां महात्म्या जनकाच्या त्या पूजेचा स्वीकार करून ८ स्वतः राजाविषयीं व यज्ञाविषयीं त्यांनीं त्याला कुशल वर्तमान विचारिलें व नंतर उपाध्याय व पुरोहित ह्यांसहवर्तमान ( जनकाबरोबर आलेल्या ) त्या सर्व मुनींना कुशलप्रश्न विचारिल्यावर ९ योग्यतेप्रमाणें सर्व ऋषींची

लिरभाषत १० आसने भगवानास्तां सहैभिर्मुनिपुंगवैः । जनकस्य वचः श्रुत्वा निषसाद महामुनिः ११ पुरोधा ऋत्विजश्चैव राजा च सह मन्त्रिभिः । आसनेषु यथान्यायमुपविष्टाः समन्ततः १२ दृष्ट्वा स नृपतिस्तत्र विश्वामित्रमथाब्रवीत् । अद्य यज्ञसमृद्धिर्मे सफला दैवतैः कृता १३ अद्य यज्ञफलं प्राप्तं भगवद्दर्शनान्मया । धन्योस्म्यनुगृहीतोस्मि यस्य मे मुनिपुंगव १४ यज्ञोपसदनं ब्रह्मन्प्राप्तोसि मुनिभिः सह । द्वादशाहं तु ब्रह्मर्षे दीक्षामाहुर्मनीषिणः १५ ततो भागार्थिनो देवान्द्रष्टुमर्हसि कौशिक । इत्युक्त्वा मुनिशार्दूलं प्रहृष्टवदनस्तदा १६ पुनस्तं परिपप्रच्छ प्राञ्जलिः प्रयतो नृपः । इमौ कुमारौ भद्रं ते देवतुल्यपराक्रमौ १७ गजतुल्यगती वीरौ शार्दूलवृषभोपमौ । अश्विनाविव रूपेण समुपस्थितयौवनौ १८ यदृच्छयेव गां प्राप्तौ देवलोकादिवामरौ । कथं पद्भ्यामिह प्राप्तौ किमर्थं कस्य वा मुने १९ वरायुधधरौ वीरौ कस्य पुत्रौ महामुने । भूषयन्ताविमं

---

विश्वामित्रांनीं आनंदानें भेट घेतली. नंतर " भगवानांनीं आसनावर बसावें " ह्मणून जनक राजानें हात जोडून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांची प्रार्थना केली असतां राजाचें ह्मणणें ऐकून महामुनि विश्वामित्र ( आसनावर ) बसले १०,११ व ते बसल्यावर पुरोहित, ऋत्विज आणि मंत्र्यांसहवर्तमान जनक राजा हेही योग्यतेप्रमाणें त्यांच्या भोंवतीं बसले १२. नंतर विश्वामित्रांकडे पाहून तो जनक राजा ह्मणाला " देवांनीं आज माझ्या यज्ञसंपत्तीचें सार्थक केलें १३. आपल्या दर्शनानें आज मला यज्ञफल प्राप्त झालें. खरोखर मी धन्य असून देवतांचा माझ्यावर अनुग्रह झालेला आहे. कारण, हे मुनिश्रेष्ठ, माझ्या १४ यज्ञमंडपामध्यें आज आपण मुनींसहवर्तमान प्राप्त झाला आहां. हे ब्रह्मर्षे, यज्ञदीक्षेचे बारा दिवस अवशिष्ट राहिले आहेत असें विद्वान् ऋत्विज ह्मणतात १५. तेव्हां हे कौशिकमुने, हविर्भागाची इच्छा करणारे देव आपण नंतर ( ह्या यज्ञामध्यें ) अवलोकन कराल ". ह्याप्रमाणें प्रसन्न मुद्रेनें युक्त झालेल्या जनकराजानें मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना सांगितलें १६ आणि नंतर हात जोडून तो जितेंद्रिय राजा पुनरपि त्यांना ह्मणाला " आपलें देव बरें करो, हे पुत्र देवांसारिखे पराक्रमी १७ वीर, गजाप्रमाणें धीर—व सिंहाप्रमाणें अप्रतिहत—गतीनें युक्त असून आकारानें अनुक्रमें व्याघ्र व वृषभ ह्यांप्रमाणें दिसत आहेत. रूपानें हे अश्विनीकुमारांप्रमाणें दिसत असून ह्यांना यौवनावस्था प्राप्त झाली आहे १८ आणि प्रत्यक्ष देवच देवलोकापासून पृथ्वीवर प्राप्त झाल्याप्रमाणें हे दिसत आहेत. तेव्हां, ह्या ठिकाणीं हे पायांनीं कसे आले? कशाकरितां आले? आणि हे मुने, हे कोणाचे पुत्र आहेत? हें आपण मला सांगा १९.

देशं चन्द्रसूर्याविवाम्बरम् २० परस्परस्य सदृशौ प्रमाणेङ्गितचेष्टितैः । काकपक्षधरौ वीरौ श्रोतुमिच्छामि तत्त्वतः २१ तस्य तद्वचनं श्रुत्वा जनकस्य महात्मनः । न्यवेदयदमेयात्मा पुत्रौ दशरथस्य तौ २२ सिद्धाश्रमनिवासं च राक्षसानां वधं तथा । तत्रागमनमव्यग्रं विशालायाश्च दर्शनम् २३ अहल्यादर्शनं चैव गौतमेन समागमम् । महाधनुषि जिज्ञासां कर्तुमागमनं तथा २४ एतत्सर्वं महातेजा जनकाय महात्मने । निवेद्य विररामाथ विश्वामित्रो महामुनिः २५ [१५६५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥ ५० ॥

तस्य तद्वचनं श्रुत्वा विश्वामित्रस्य धीमतः । हृष्टरोमा महातेजाः शतानन्दो महातपाः १ गौतमस्य सुतो ज्येष्ठस्तपसा द्योतितप्रभः । रामसंदर्शनादेव परं विस्मयमागतः २ एतौ निषण्णौ संप्रेक्ष्य शतानन्दो नृपात्मजौ । सुखासीनौ मुनिश्रेष्ठं विश्वामित्रमथाब्रवीत् ३ अपि ते मुनिशार्दूल मम माता यशस्विनी । दर्शिता राजपुत्राय तपो दीर्घमुपागता ४

---

आकाशाला शोभा आणणाऱ्या चंद्रसूर्यांप्रमाणें ह्या प्रदेशाला शोभा आणणारे आणि उत्कृष्ट आयुधें धारण करणारे हे वीर पुत्र, हे महामुने, कोणाचे आहेत ? २०. शरीरमान, इंगित व चेष्टित ह्यांमध्यें एकमेकासारिखे व मस्तकावर झुलपें असलेले असे जे हे वीर ह्यांची खरीखरी हकीकत ऐकण्याची माझी इच्छा आहे" २१. हें त्या महात्म्या जनकराजाचें भाषण श्रवण केल्यावर महात्म्या विश्वामित्रमुनींनीं त्या दशरथपुत्रांची हकीकत त्याला सांगितली २२ आणि सिद्धाश्रमामध्यें वास्तव्य, राक्षसांचा वध, त्या ठिकाणीं निर्भयपणें जाणें, विशाला नगरीचें दर्शन २३, अहल्येचें दर्शन, गौतम मुनींची भेट, महाधनुष्य पहाण्याविषयीं रामाची इच्छा आणि तें सज्ज करण्याकरितां त्याचें आगमन २४ हें सर्व महात्म्या जनकाला सांगून महातेजस्वी महर्षि विश्वामित्र स्वस्थ बसले २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पंनासावा सर्ग समाप्त झाला ॥ ५० ॥

विचारी विश्वामित्र मुनींचें तें भाषण श्रवण केल्यावर महातेजस्वी व महातपस्वी शतानंदाच्या शरीरावर रोमांच उठले १. नंतर तपाच्या योगानें ज्याचें तेज पडलें आहे असा तो गौतममुनींचा ज्येष्ठपुत्र शतानंद रामाला अवलोकन केल्याबरोबरच पराकाष्ठेचा विस्मित झाला २ आणि ते राजकुमार रामलक्ष्मण स्वस्थपणें आसनावर बसलेले पाहून तो मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना ह्मणाला ३ "हे मुनिश्रेष्ठ, दीर्घ तपश्चर्येचें अवलंबन करून राहिलेली माझी यशस्विनी माता आपण रामाला

अपि रामे महातेजा मम माता यशस्विनी । वन्यैरुपाहरत्पूजां पूजार्हे सर्वदेहिनाम् ५ अपि रामाय कथितं यद्वृत्तं तत्पुरातनम् । मम मातुर्महातेजो देवेन दुरनुष्ठितम् ६ अपि कौशिक भद्रं ते गुरुणा मम संगता । मम माता मुनिश्रेष्ठ रामसंदर्शनादितः ७ अपि मे गुरुणा रामः पूजितः कुशिकात्मज । इहागतो महातेजाः पूजां प्राप्य महात्मनः ८ अपि शान्तेन मनसा गुरुर्मे कुशिकात्मज । इहागतेन रामेण पूजितेनाभिवादितः ९ तच्छ्रुत्वा वचनं तस्य विश्वामित्रो महामुनिः । प्रत्युवाच शतानन्दं वाक्यज्ञो वाक्यकोविदम् १० नातिक्रान्तं मुनिश्रेष्ठ यत्कर्तव्यं कृतं मया । संगता मुनिना पत्नी भार्गवेणेव रेणुका ११ तच्छ्रुत्वा वचनं तस्य विश्वामित्रस्य धीमतः । शतानन्दो महातेजा रामं वचनमब्रवीत् १२ स्वागतं ते नरश्रेष्ठ दिष्ट्या प्राप्तोसि राघव । विश्वामित्रं पुरस्कृत्य महर्षिमपराजितम् १३ अचिन्त्यकर्मा तपसा ब्रह्मर्षिरमितप्रभः । विश्वामित्रो महातेजा वेत्स्येनं परमां गतिम् १४ नास्ति धन्यतरो राम त्वत्तोन्यो भुवि कश्चन । गोप्ता कुशिक

---

दाखविली नां ? ४. सर्व प्राण्यांना पूज्य असलेल्या ह्या रामाची माझ्या यशस्विनी व तेजस्वी मातेनें वन्य पदार्थांनीं पूजा केली नां ? ५. हे महातेजस्वी मुने, इंद्राशीं माझ्या मातेचें जें दुराचरण झालें तें पूर्वीचें वृत्त आपण रामाला कथन केलें नां ? ६. हे कुशिकवंशज मुनिश्रेष्ठ, आपलें देव बरें करो ! रामदर्शन झाल्यावर माझ्या मातेचा माझ्या पित्याशीं समागम झाला नां ? ७. हे कुशिकनंदन मुने, माझ्या पित्यानें रामाचें पूजन केलें नां ? त्या महात्म्याच्या पूजेचा स्वीकार करून हा महातेजस्वी राम येथें आला आहे नां ? ८ आणि त्याचप्रमाणें, हे कुशिकनंदन मुने, सत्कार होऊन येथें आलेल्या रामानें शांत मनानें माझ्या पित्याला अभिवंदन केलें नां ?" ९. हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर संभाषणज्ञ महामुनि विश्वामित्र भाषणाचें मर्म जाणणाऱ्या शतानंदाला ह्मणाले १० "हे मुनिश्रेष्ठा, मी कांहीं विसरलों नाहीं. जें करावयाचें होतें तें मीं केलें आणि भृगुवंशज जमदग्नीशीं संगत झालेल्या रेणुकेप्रमाणें गौतममुनींशीं त्यांच्या पत्नीचा समागम झाला "११. हें त्या विचारी विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण करून महातेजस्वी शतानंद रामाला ह्मणाला १२ "हे पुरुषश्रेष्ठा, तुझें स्वागत असो. हे रघुवंशजा रामा, पराजयरहित अशा विश्वामित्रमहर्षींना पुढें घालून तूं प्राप्त झालास हें खरोखर आमचें भाग्यच उदयास आलें १३. ह्या महातेजस्वी विश्वामित्रमुनींचीं कर्में अचिंत्य असून ह्या ब्रह्मर्षींची प्रभा तपाच्या योगानें अपरिमित झालेली आहे आणि हे जगताचें पराकाष्ठेचें हित करणारे आहेत असें मी जाणीत आहें १४.

पुत्रस्ते येन तप्तं महत्तपः १५ श्रूयतां चाभिधास्यामि कौशिकस्य महात्मनः। यथाबलं यथातत्त्वं तन्मे निगदतः शृणु १६ राजाभूदेष धर्मात्मा दीर्घकालमरिंदमः। धर्मज्ञः कृतविद्यश्च प्रजानां च हिते रतः १७ प्रजापतिसुतस्त्वासीत्कुशो नाम महीपतिः। कुशस्य पुत्रो बलवान्कुशनाभः सुधार्मिकः १८ कुशनाभसुतस्त्वासीद्गाधिरित्येव विश्रुतः। गाधेः पुत्रो महातेजा विश्वामित्रो महामुनिः १९ विश्वामित्रो महातेजाः पालयामास मेदिनीम्। बहुवर्षसहस्राणि राजा राज्यमकारयत् २० कदाचित्तु महातेजा योजयित्वा वरूथिनीम्। अक्षौहिणीपरिवृतः परिचक्राम मेदिनीम् २१ नगराणि च राष्ट्राणि सरितश्च महागिरीन्। आश्रमान्क्रमशो राजा विचरन्नाजगाम ह २२ वसिष्ठस्याश्रमपदं नानापुष्पलताद्रुमम्। नानामृगगणाकीर्णं सिद्धचारणसेवितम् २३ देवदानवगन्धर्वैः किंनरैरुपशोभितम्। प्रशान्तहरिणाकीर्णं द्विजसंघनिषेवितम् २४ ब्रह्मर्षिगणसंकीर्णं देवर्षिगणसेवितम्। तपश्चरणसंसिद्धैरग्निकल्पैर्महा-

---

हे रामा, मोठी तपश्चर्या केलेले कुशिकपुत्र विश्वामित्र ज्याअर्थी तुझें रक्षण करणारे आहेत, त्याअर्थी तुझ्याहून धन्य असा ह्या भूतलावर दुसरा कोणीही नाहीं १५. ह्या महात्म्या कौशिकमुनींविषयीं मी सांगतों तें श्रवण कर. सारांश, ह्यांचें तपोबल कसा प्रकारचें आहे व ह्यांना ब्रह्मर्षित्व कसें प्राप्त झालें हें मी तुला निवेदन करीत आहें तें तूं श्रवण कर १६. धर्मात्मा, धर्मवेत्ता, विद्यासंपन्न आणि प्रजाहिताविषयीं दक्ष असा हा पुष्कळ वेळपर्यंत शत्रूंचें दमन करणारा राजा होता १७. प्रजापतीचा पुत्र एक कुश म्हणून राजा होता व त्या कुशाचा पुत्र बलाढ्य व अत्यंत धार्मिक असा कुशनाभ म्हणून होता १८. गाधी म्हणून प्रख्यात असलेला कुशनाभाचा पुत्र होता आणि हा महातेजस्वी विश्वामित्रमहामुनि त्या गाधीचा पुत्र होय १९. ह्या महातेजस्वी विश्वामित्रराजानें पुष्कळ हजार वर्षें पृथ्वीचें परिपालन करून राज्य चालविलें २०. एकदां हा महातेजस्वी राजा सेना तयार करून व एक अक्षौहिणी सेना बरोबर घेऊन पृथ्वीपर्यटण करूं लागला असतां २१ नगरें, राष्ट्रें, नद्या, मोठमोठे पर्वत आणि आश्रम ह्यांवरून क्रमानें जातां जातां तो वसिष्ठमुनींच्या आश्रमामध्यें आला व नानाप्रकारच्या पुष्पवेली व वृक्ष ह्यांनीं युक्त, अनेक प्रकारच्या मृगसमुदायांनीं भरलेला, सिद्ध व चारण ह्यांनीं सेवित २२, २३, देव, दानव, गंधर्व आणि किन्नर ह्यांनीं शोभित, शांत हरिणांनीं गजबजलेला, पक्षिसमुदायांनीं आश्रय केलेला २४, ब्रह्मर्षिगणांनीं भरलेला, देवर्षिसमुदायांनीं सेवित, तपश्चर्येच्या योगानें सिद्ध झालेल्या अग्नितुल्य महात्म्यांनीं २५ आणि

त्मभिः २५ सततं संकुलं श्रीमद्ब्रह्मकल्पैर्महात्मभिः । अब्भक्षैर्वायुभक्षैश्च शीर्णपर्णाशनैस्तथा २६ फलमूलाशनैर्दान्तैर्जितदोषैर्जितेन्द्रियैः । ऋषिभिर्वालखिल्यैश्च जपहोमपरायणैः २७ अन्यैर्वैखानसैश्चैव समन्तादुपशोभितम् । वसिष्ठस्याश्रमपदं ब्रह्मलोकमिवापरम् २८ ददर्श जयतां श्रेष्ठो विश्वामित्रो महाबलः २९ [ १५९४ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

तं दृष्ट्वा परमप्रीतो विश्वामित्रो महाबलः । प्रणतो विनयाद्वीरो वसिष्ठं जपतां वरम् १ स्वागतं तव चेत्युक्तो वसिष्ठेन महात्मना । आसनं चास्य भगवान्वसिष्ठो व्यादिदेश ह २ उपविष्टाय च तदा विश्वामित्राय धीमते । यथान्यायं मुनिवरः फलमूलमुपाहरत् ३ प्रतिगृह्य तु तां पूजां वसिष्ठाद्राजसत्तमः । तपोग्निहोत्रशिष्येषु कुशलं पर्यपृच्छत ४ विश्वामित्रो महातेजा वनस्पतिगणे तदा । सर्वत्र कुशलं प्राह वसिष्ठो राजसत्तमम् ५ सुखोपविष्टं राजानं विश्वामित्रं महातपाः । पप्रच्छ

---

ब्रह्मतुल्य महात्म्यांनीं सहमीं भरलेला, संपन्न, जलप्राशन, वायुभक्षण, गलितपत्रभक्षण २६ अथवा फलमूलाशन करून राहिलल्या निर्दोष, क्षमपरायण, जितेंद्रिय व जपहोमाविषयीं तत्पर अशा वालखिल्य ऋषींच्या योगानें २७ आणि इतरही वैखानस महर्षींच्या योगानें आसमंतात भागीं सुशोभित असलेला व प्रति ब्रह्मलोकाप्रमाणें दिसत असलेला वसिष्ठमुनींचा आश्रम २८ विजयिश्रेष्ठ व महाबलाढ्य विश्वामित्रराजानें अवलोकन केला २९. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकावन्नावा सर्ग संपूर्ण झाला ॥ ५१ ॥

तपोनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या वसिष्ठमुनींना अवलोकन करून महाबलाढ्य व वीर असा विश्वामित्र राजा अत्यंत प्रसन्न झाला आणि विनयानें त्यानें त्यांना प्रणाम केला १. तेव्हां महात्म्या वसिष्ठमुनींनीं " तुझें स्वागत असो " ह्मणून त्याला सांगितलें आणि " ह्याला आसन द्या " ह्मणूनही वसिष्ठमुनींनी ( शिष्यांना ) आज्ञा केली २. नंतर विचारी विश्वामित्रराजा बसल्यावर मुनिश्रेष्ठ वसिष्ठांनीं योग्यतेप्रमाणें त्याला फलमूलें अर्पण केलीं ३. वसिष्ठमुनींच्या त्या आदरातिथ्याचा स्वीकार केल्यावर नृपश्रेष्ठ विश्वामित्रानें प्रथमतः त्यांना तप, अग्निहोत्र आणि शिष्य ह्यांविषयीं कुशल वर्तमान विचारिलें ४ व तदनंतर महातेजस्वी विश्वामित्रानें वृक्षांविषयींही त्यांना कुशल प्रश्न केला. तेव्हां वसिष्ठमुनींनीं त्या श्रेष्ठ राजाला " सर्वत्र कुशल आहे " ह्मणून सांगितलें ५. नंतर तपस्विश्रेष्ठ व महातपस्वी ब्रह्मपुत्र वसिष्ठांनीं स्वस्थ बसलेल्या विश्वा-

जपतां श्रेष्ठो वसिष्ठो ब्रह्मणः सुतः ६ कच्चित्ते कुशलं राजन्कच्चिद्धर्मेण रञ्जयन्। प्रजाः पालयसे राजन्राजवृत्तेन धार्मिकः ७ कच्चित्ते संभृता भृत्याः कच्चित्तिष्ठन्ति शासने। कच्चित्ते विजिताः सर्वे रिपवो रिपुसूदन ८ कच्चिद्बलेषु कोशेषु मित्रेषु च परंतप। कुशलं ते नरव्याघ्र पुत्रपौत्रे तथानघ ९ सर्वत्र कुशलं राजा वसिष्ठं प्रत्युदाहरत्। विश्वामित्रो महातेजा वसिष्ठं विनयान्वितम् १० कृत्वा तौ सुचिरं कालं धर्मिष्ठौ ताः कथास्तदा। मुदा परमया युक्तौ प्रीयेतां तौ परस्परम् ११ ततो वसिष्ठो भगवान्कथान्ते रघुनन्दन। विश्वामित्रमिदं वाक्यमुवाच प्रहसन्निव १२ आतिथ्यं कर्तुमिच्छामि बलस्यास्य महाबल। तव चैवाप्रमेयस्य यथार्हं संप्रतीच्छ मे १३ सत्क्रियां हि भवानेतां प्रतीच्छतु मया कृताम्। राजंस्त्वमतिथिश्रेष्ठः पूजनीयः प्रयत्नतः १४ एवमुक्तो वसिष्ठेन विश्वामित्रो महामुनिः। कृतमित्यब्रवीद्राजा पूजावाक्येन मे त्वया १५ फलमूलेन भगवन्विद्यते यत्तवाश्रमे। पाद्येनाचमनीयेन भगवद्दर्शनेन च १६ सर्वथा

---

मित्रराजाला प्रश्न केला कीं ६ " हे राजा, तुझें कुशल आहे नां? हे धार्मिक राजा, राजवर्तनानें प्रजेचें पालन करून धर्मानें तूं त्यांचें रंजन करीत आहेस नां? ७. तुझ्या सेवकांना वेळेवर पगार मिळून ते तुझी आज्ञा पाळण्याविषयीं तत्पर असतात नां? हे शत्रुनाशका, तुझे सर्व रिपु जिंकिलेले आहेत नां? ८. हे शत्रुतापना निष्पापा पुरुषश्रेष्ठा, सेना, कोश, मित्र, व पुत्रपौत्रादि संतति हीं सर्व कुशल आहेत नां? ९. ह्याप्रमाणें प्रश्न झाल्यावर महातेजस्वी विश्वामित्र राजानें विनयसंपन्न अशा श्रेष्ठ वसिष्ठमुनींना " सर्वत्र कुशल आहे ". ह्मणून सांगितलें १० व इकडल्या तिकडल्या गोष्टी पुष्कळ वेळपर्यंत सांगून अत्यंत संतुष्ट झालेल्या त्या उभयतां धर्मिष्ठांनीं परस्पराला आनंदित केलें ११. तदनंतर, हे रघुनंदना रामा, गोष्टी चालतां चालतां भगवन् वसिष्ठमुनि हंसत हंसत विश्वामित्राला ह्मणाले १२ " हे महाबलाढ्य राजा, अपरिमित सामर्थ्यानें युक्त असलेल्या तुझ्यासहवर्तमान ह्या तुझ्या सैन्याचें यथायोग्य आतिथ्य करावें अशी माझी इच्छा आहे. करितां, तूं त्या आतिथ्याचा स्वीकार कर १३. सारांश, हे राजा, तूं श्रेष्ठ अतिथि असल्यामुळें प्रयत्नपूर्वक तुझें आदरातिथ्य करणें योग्य आहे. करितां, मी करीत असलेल्या ह्या सत्काराचा तूं स्वीकार कर " १४. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां पुढें महामुनि बनलेला विश्वामित्र राजा वसिष्ठांना ह्मणाला " मी आदरातिथ्य करितों " ह्या आपल्या ह्मणण्यानेंच माझा सत्कार झाला आहे १५. शिवाय, हे भगवन्, आपल्या आश्रमामध्यें असलेलीं फलें, मुळें, पाद्य, आचमन

च महाप्राज्ञ पूजार्हेण सुपूजितः। नमस्तेस्तु गमिष्यामि मैत्रेणेक्षस्व चक्षुषा १७ एवं ब्रुवन्तं राजानं वसिष्ठः पुनरेव हि। न्यमन्त्रयत धर्मात्मा पुनः पुनरुदारधीः १८ बाढमित्येव गाधेयो वसिष्ठं प्रत्युवाच ह। यथाप्रियं भगवतस्तथास्तु मुनिपुङ्गव १९ एवमुक्तस्तथा तेन वसिष्ठो जपतां वरः। आजुहाव ततः प्रीतः कल्माषीं धूतकल्मषाम् २० एह्येहि शबले क्षिप्रं शृणु चापि वचो मम २१ सबलस्यास्य राजर्षेः कर्तुं व्यवसितोस्म्यहम्। भोजनेन महार्हेण सत्कारं संविधत्स्व मे २२ यस्य यस्य यथाकामं षड्रसेष्वभिपूजितम्। तत्सर्वं कामधुग्दिव्ये अभिवर्ष कृते मम २३ रसेनान्नेन पानेन लेह्यचोष्येण संयुतम्। अन्नानां निचयं सर्वं सृजस्व शबले त्वर २४ [१६१८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः॥ ५२॥

एवमुक्ता वसिष्ठेन शबला शत्रुसूदन। विदधे कामधुक्कामान्यस्य यस्येप्सितं तथा १ इक्षून्मधूंस्तथा लाजान्मैरेयांश्च वरासवान्। पानानि

---

आणि आपलें दर्शन ह्यांच्या योगानें १६, हे महाज्ञानवान् मुने, आपण माझें सर्व प्रकारें उत्कृष्ट पूजन, स्वतः माझ्या पूजेस आपणच पात्र असतांना, केलें आहे. आतां आपणांला नमस्कार असो. मी येथून गमन करितों. आपण मजवर कृपादृष्टि ठेवावी" १७. ह्याप्रमाणें विश्वामित्रराजा ह्मणत असतांना धर्मात्म्या व उदारबुद्धि वसिष्ठमुनींनीं फिरून फिरून त्याला निमंत्रण केलें १८. तेव्हां "ठीक आहे. हे मुनिश्रेष्ठ, आपली मर्जी असेल त्याप्रमाणें होऊं द्या" असें गाधिपुत्र विश्वामित्रानें वसिष्ठांना सांगितलें १९. ह्याप्रमाणें विश्वामित्रानें सांगितल्यावर तपस्विश्रेष्ठ वसिष्ठांनीं प्रसन्न होऊन किल्बिषरहित अशा आपल्या चित्रवर्णसंपन्न धेनूला हाक मारिली कीं २०, हे शबले, इकडे ये आणि माझ्या सांगण्याप्रमाणें सत्वर तजवीज ठेव २१. सैन्यासहवर्तमान ह्या राजर्षीचा मोठ्या मौल्यवान भोजनानें सत्कार करण्याचा मीं निश्चय केला आहे तो तूं सिद्धीस ने २२. सारांश, सहा रसांमध्यें ज्याला ज्याला जें जें प्रिय असेल तें तें, हे दिव्य कामधेनु, तूं माझ्याकरितां ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणें उत्पन्न कर २३. तात्पर्य, हे शबले, सरस अन्न, पान, लेह्य आणि चोष्य ह्यांसहवर्तमान अन्नांचा सर्व समुदाय तूं सत्वर उत्पन्न कर २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला॥ ५२॥

हे शत्रुनाशका रामा, ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं शबलेला सांगितलें असतां ज्याला ज्याला जें जें प्रिय होतें त्या त्याप्रमाणें सर्व इष्ट पदार्थ त्या कामधेनूनें उत्पन्न केले १.

च महार्हाणि भक्ष्यांश्चोच्चावचानपि २ उष्णाढ्यस्यौदनस्यात्र राशयः पर्वतोपमाः । मृष्टान्यन्नानि सूपांश्च दधिकुल्यास्तथैव च ३ नानास्वादुरसानां च खाण्डवानां तथैव च । भोजनानि सुपूर्णानि गौडानि च सहस्रशः ४ सर्वमासीत्सुसंतुष्टं हृष्टपुष्टजनायुतम् । विश्वामित्रबलं राम वसिष्ठेन सुतर्पितम् ५ विश्वामित्रो हि राजर्षिर्हृष्टपुष्टस्तदाभवत् । सान्तःपुरवरो राजा सब्राह्मणपुरोहितः ६ सामात्यो मन्त्रिसहितः सभृत्यः पूजितस्तदा । युक्तः परमहर्षेण वसिष्ठमिदमब्रवीत् ७ पूजितोऽहं त्वया ब्रह्मन्पूजार्हेण सुसत्कृतः । श्रूयतामभिधास्यामि वाक्यं वाक्यविशारद ८ गवां शतसहस्रेण दीयतां शबला मम । रत्नं हि भगवन्नेतद्रत्नहारी च पार्थिवः ॥ तस्मान्मे शबलां देहि ममैषा धर्मतो द्विज ९ एवमुक्तस्तु भगवान्वसिष्ठो मुनिपुङ्गवः । विश्वामित्रेण धर्मात्मा प्रत्युवाच महीपतिम् १० नाहं शतसहस्रेण नापि कोटिशतैर्गवाम् । राजन्दास्यामि शबलां राशिभी रज-

---

उसापासून आणि मधापासून होणारे पदार्थ, लाह्या, मैरेयसंज्ञक उत्कृष्ट आसवें, मोठमोठ्या किमतीचीं पेयें आणि लहान मोठीं भक्ष्यें तिनें उत्पन्न केलीं २. उन्हून उन्हून भाताच्या त्या ठिकाणीं पर्वतप्राय राशि पडल्या आणि मिष्टान्नें, वरणें, दधिकुल्या ( ह्मणजे दह्याचे पाट ) ३, नानाप्रकारच्या स्वादुरसानें युक्त असलेल्या खांडवांनीं भरलेलीं रुप्याचीं हजारों भोजनपात्रें तिनें उत्पन्न केलीं ४. तेव्हां, हे रामा, त्या अन्नाच्या योगानें वसिष्ठांनीं फारच तृप्त केलेलें विश्वामित्राचें सैन्य सर्व अत्यंत संतुष्ट झालें आणि त्यांतील लोक आनंदित व पुष्ट आहेत असें दिसूं लागले ५. सारांश, ब्राह्मण, पुरोहित, अंतःपुरांतील स्त्रिया, अमात्य, मंत्री आणि सेवक ह्यांसहवर्तमान विश्वामित्रराजर्षीचा सत्कार होऊन तो आनंदित व पुष्ट झाला 'आणि पराकाष्ठेचा हर्षयुक्त होऊन वसिष्ठांना ह्मणाला ६, ७ " हे ब्रह्मन्, आपलें पूजन माझ्या हातून होणें योग्य असतांना आपण माझा उत्तम रीतीनें सत्कार करून पूजन केलें आहे. करितां, हे संभाषणज्ञ मुने, मी काय ह्मणत आहे इकडे आपण लक्ष्य द्यावें ८. "हे भगवन्. एक लक्ष गाई घेऊन आपण शबला मला द्यावी. कारण, रत्नें जवळ ठेवण्याची योग्यता राजाचीच आहे आणि हें रत्न आहे. तस्मात् , हे द्विज. आपण मला शबला द्या. धर्मानें ही माझीच आहे. "९ ह्याप्रमाणें विश्वामित्रानें सांगितलें असतां मुनिश्रेष्ठ धर्मात्मे वसिष्ठ त्या भूपतीला ह्मणाले १०. " हे राजा, एक लक्ष्य गाईची तर गोष्टच नको आहे; परंतु. शेंकडों कोट गाई अथवा रुप्याच्या राशि घेऊनही मी शबला देणार नाहीं " ११. हे शत्रुदमना. माझ्यापासून त्याग होण्यास ही योग्य नाहीं. कारण,

तस्य वा ११ न परित्यागमर्हेयं मत्सकाशादरिन्दम । शाश्वती शबला मह्यं कीर्तिरात्मवतो यथा १२ अस्यां हव्यं च कव्यं च प्राणयात्रा तथैव च । आयत्तमग्निहोत्रं च बलिहोमस्तथैव च १३ स्वाहाकारवषट्कारौ विद्याश्च विविधास्तथा । आयत्तमत्र राजर्षे सर्वमेतन्न संशयः १४ सर्वस्वमेतत्सत्येन मम तुष्टिकरी तथा । कारणैर्बहुभी राजन्न दास्ये शबलां तव १५ वसिष्ठेनैवमुक्तस्तु विश्वामित्रोऽब्रवीत्तदा । संरब्धतरमत्यर्थं वाक्यं वाक्यविशारदः १६ हैरण्यकक्ष्याग्रैवेयान्सुवर्णाङ्कुशभूषितान् । ददामि कुञ्जराणां ते सहस्राणि चतुर्दश १७ हैरण्यानां रथानां च श्वेताश्वानां चतुर्युजाम् । ददामि ते शतान्यष्टौ किङ्किणीकविभूषितान् १८ हयानां देशजातानां कुलजानां महौजसाम् । सहस्रमेकं दश च ददामि तव सुव्रत १९ नानावर्णविभक्तानां वयःस्थानां तथैव च । ददाम्येकां गवां कोटिं शबला दीयतां मम २० यावदिच्छसि रत्नानि हिरण्यं वा द्विजोत्तम । तावद्ददामि ते सर्वं दीयतां शबला मम २१ एवमुक्तस्तु भगवान्विश्वामित्रेण धीमता । न दास्यामीति शबलां प्राह राजन्कथंचन २२ एतदेव हि मे रत्नमेतदेव हि मे धनम् । एतदेव हि सर्वस्वमेतदेव हि

आत्मवानाच्या कीर्तिप्रमाणें ही शबला नेहमीं माझ्यापाशींच राहणारी आहे १२. माझें हव्यकव्य, उपजीविका, अग्निहोत्र, भूतबलि, होम १३, श्रौतस्मार्त कर्म आणि नानाप्रकारच्या विद्या हें सर्व, हे राजर्षे, हिच्यावर अवलंबन आहे ह्यांत संशय नाहीं १४. हेंच माझें सर्वस्व असून हीच माझा संतोष करणारी आहे. सारांश, हे राजा, अनेक कारणांमुळें मी तुला शबला देणार नाहीं " १५. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां संभाषण करणाऱ्यांमध्यें पटु असलेला विश्वामित्रराजा अत्याग्रहाचें भाषण करूं लागला कीं १६ ( हे सुव्रता, ) सुवर्णशृंखला व कंठभूषणें आणि सुवर्णाचे अंकुश ह्यांनीं भूषित असलेले चवदा हजार गज १७, चारचार श्वेतवर्ण अश्व जोडिलेले आणि घंटाजालानें भूषित असलेले आठशें सोन्याचे रथ १८, मूळ प्रदेशांत उत्पन्न झालेले आणि महावेगवान् असे अकरा हजार जातिवंत घोडे, हे सुव्रत, मी आपणांला देतों १९ व अनेक वर्णांमुळें एकमेकींपासून भिन्न आणि तरुण अशा एक कोट गाई मी आपणांला देतों; आपण मला शबला द्या २०. हे द्विजश्रेष्ठ, ( फारतर काय, परंतु ) रत्न, सुवर्ण वगैरे जें पाहिजे असेल तें सर्व मी आपल्या इच्छेप्रमाणें आपणांला देतों. मला आपण शबला द्या "२१. ह्याप्रमाणें बुद्धिमान् विश्वामित्र राजानें प्रार्थना केली असतां भगवान् वसिष्ठमुनि त्याला ह्मणाले " हे राजा, कांहीं झालें तरी मी शबला

जीवितम् २३ दर्शश्च पौर्णमासश्च यज्ञाश्चैवाप्तदक्षिणाः । एत देव हि मे राजन्विविधाश्च क्रियास्तथा २४ अतोमूलाः क्रियाः सर्वा मम राजन्न संशयः । बहुना किं प्रलापेन न दास्ये कामदोहिनीम् २५ [१६४३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥५३॥

कामधेनुं वसिष्ठोऽपि यदा न त्यजते मुनिः । तदास्य शबलां राम विश्वामित्रोऽन्वकर्षत १ नीयमाना तु शबला राम राज्ञा महात्मना । दुःखिता चिन्तयामास रुदती शोककर्शिता २ परित्यक्ता वसिष्ठेन किमहं सुमहात्मना । याहं राजभृतैर्दीना ह्रियेय भृशदुःखिता ३ किं मयापकृतं तस्य महर्षेर्भावितात्मनः । यन्मामनागसं दृष्ट्वा भक्तां त्यजति धार्मिकः ४ इति संचिन्तयित्वा तु निःश्वस्य च पुनः पुनः । जगाम वेगेन तदा वसिष्ठं परमौजसम् ५ निर्धूय तांस्तदा भृत्याञ्छतशः शत्रुसूदन । जगामानिलवेगेन पादमूलं महात्मनः ६ शबला सा रुदन्ती च क्रोशन्ती चेदमब्रवीत् ।

---

देणार नाहीं २२. कारण, हेंच माझें रत्न, हेंच माझें धन व हेंच माझें जीवित असून २३ दर्श व पौर्णमास ( हे याग ), विपुल दक्षिणेनें युक्त असे क्रतु आणि इतरही नानाप्रकारचीं माझीं कर्मे हें सर्व, हे राजा, हीच आहे २४. हे राजा, माझीं सर्व कर्मे हिच्यावरच अवलंबून आहेत ह्यांत संशय नाहीं. तेव्हां फार बोलून काय कर्तव्य आहे ? मी ही कामधेनु देणार नाहीं २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

हे रामा, वसिष्ठही जेव्हां कामधेनूला सोडीना तेव्हां विश्वामित्रराजा त्याची ती शबला ( कामधेनु ) बलात्कारानें नेऊं लागला १. तेव्हां, हे रामा, महात्मा विश्वामित्र राजा बलात्कारानें शबलेला नेऊं लागला असतां ती शबला दुःखित झाली आणि शोकाकुल होऊन रडत रडत मनामध्यें चिंतन करूं लागली कीं २ “ हे राजसेवक अत्यंत दुःखित व दीन झालेल्या मला ओढून नेत आहेत; तेव्हां महात्म्या वसिष्ठानेंच माझा त्याग केला कीं काय ? ३. मी ह्याच्या सेवेविषयीं दक्ष असून निरुपद्रवी आहे हें जाणूनही ज्याअर्थीं हा धार्मिक वसिष्ठमुनि माझा त्याग करीत आहे त्याअर्थीं त्या जितेंद्रिय महर्षीचा काय बरें माझ्या हातून अपराध झाला आहे ? ” ४. ह्याप्रमाणें चिंतन करून व वारंवार सुस्कारे टाकून ती शबला वेगावेगानें महासामर्थ्यवान् वसिष्ठमुनींकडे निघाली ५ आणि, हे शत्रुनाशका, शेंकडों राजसेवकांना हिसडून टाकून वायुवेगानें ती त्या महात्म्या वसिष्ठमुनींच्या चरणापाशीं गेली ६ आणि मेघासारख्या गंभीर ध्वनीनें युक्त असलेली ती शबला वसिष्ठ मुनींसमोर उभी राहून

वसिष्ठस्याग्रतः स्थित्वा रुदन्ती मेघनिःस्वना ७ भगवन्किं परित्यक्ता त्वयाहं ब्रह्मणः सुत । यस्माद्राजभटा मां हि नयन्ते त्वत्सकाशतः ८ एवमुक्तस्तु ब्रह्मर्षिरिदं वचनमब्रवीत् । शोकसंतप्तहृदयां स्वसारमिव दुःखिताम् ९ न त्वां त्यजामि शबले नापि मेपकृतं त्वया । एष त्वां नयते राजा बलान्मत्तो महाबलः १० न हि तुल्यं बलं मह्यं राजा त्वद्य विशेषतः । बली राजा क्षत्रियश्च पृथिव्याः पतिरेव च ११ इयमक्षौहिणी पूर्णा गजवाजिरथाकुला । हस्तिध्वजसमाकीर्णा तेनासौ बलवत्तमः १२ एवमुक्ता वसिष्ठेन प्रत्युवाच विनीतवत् । वचनं वचनज्ञा सा ब्रह्मर्षिमतुलप्रभम् १३ न बलं क्षत्रियस्याहुर्ब्राह्मणा बलवत्तराः । ब्रह्मन्ब्रह्मबलं दिव्यं क्षात्राच्च बलवत्तरम् १४ अप्रमेयं बलं तुभ्यं न त्वया बलवत्तरः । विश्वामित्रो महावीर्यस्तेजस्तव दुरासदम् १५ नियुङ्क्ष्व मां महातेजस्त्वं ब्रह्मबलसंभृताम् । तस्य दर्पं बलं यत्नं नाशयामि दुरात्मनः १६ इत्युक्तस्तु

---

रुदन व आक्रोश करीत करीत त्यांना ह्मणाली ७ " हे भगवन्, हे ब्रह्मपुत्र, आपण माझा त्याग केला आहे कीं काय ? कारण, हे राजसैनिक मला आपणांजवळून ओढून नेत आहेत " ८. ह्याप्रमाणें तिनें ब्रह्मर्षि वसिष्ठांना सांगितलें असतां दुःखित झालेली आपली भगिनीच कीं काय अशा रीतीनें ते ब्रह्मर्षि शोकानें हृदयसंतप्त झालेल्या त्या कामधेनूला ह्मणाले ९ " हे शबले, मी तुझा त्याग करीत नाहीं व तूं माझा कांहीं अपराधही केला नाहींस. बलानें मत्त झालेला हा महाबलाढ्य राजा तुला नेत आहे १०. माझ्यापाशीं राजासारखें बल नाहीं; हा बलिष्ठ राजा क्षत्रिय व पृथ्वीपति असल्यामुळें मला अवध्य आहे आणि विशेषतः आज ( त्याचें आदरातिथ्य केलें असल्यामुळें) तर तो अवध्य आहेच आहे ११. हत्तीवरील निशाणें, गज, अश्व, आणि रथ ह्यांनीं भरलेलें हें संपूर्ण अक्षौहिणी सैन्य त्याच्यापाशीं असल्यामुळें तो अत्यंत बलाढ्य आहे " १२. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां वचनांचें इंगित जाणणारी ती कामधेनु नम्र होऊन त्या अतुलतेजस्वी ब्रह्मर्षीला ह्मणाली १३ " हे ब्रह्मन्, क्षत्रियाचें बल अल्प असून ब्राह्मण क्षत्रियांपेक्षां बलवत्तर आहेत असें ह्मणतात. तेव्हां क्षात्रबलापेक्षां दिव्य ब्रह्मबल श्रेष्ठ आहे १४. आपलें बल अमर्याद आहे व आपलें तेजही कोणाला जवळ येऊं देणारें नाहीं. सारांश, महावीर्यवान् विश्वामित्र आपणांपेक्षां बलाढ्य नाहीं १५. हे महातेजस्वी मुने, मी आपल्या ब्रह्मबलानें युक्त आहे; तेव्हां मला आज्ञा करा ह्मणजे मी त्या दुष्टाचा गर्व, बल आणि यत्न नाहींसा करितें " १६. ह्याप्रमाणें तिनें प्रार्थना केली असतां, हे रामा, महाय-

तया राम वसिष्ठस्तु महायशाः। सृजस्वेति तदोवाच बलं परबलार्दनम् १७ तस्य तद्वचनं श्रुत्वा सुरभिः सासृजत्तदा १८ तस्या हुंभारवोत्सृष्टाः पह्लवाः शतशो नृप। नाशयन्ति बलं सर्वं विश्वामित्रस्य पश्यतः १९ स राजा परमक्रुद्धः क्रोधविस्फारितेक्षणः। पह्लवान्नाशयामास शस्त्रैरुच्चावचैरपि २० विश्वामित्रार्दितान्दृष्ट्वा पह्लवाञ्छतशस्तदा। भूय एवासृजद्घोराञ्छकान्यवनमिश्रितान् २१ तैरासीत्संवृता भूमिः शकैर्यवनमिश्रितैः। प्रभावद्भिर्महावीर्यैर्हेमकिञ्जल्कसंनिभैः २२ तीक्ष्णासिपट्टिशधरैर्हेमवर्णाम्बरावृतैः। निर्दग्धं तद्बलं सर्वं प्रदीप्तैरिव पावकैः २३ ततोऽस्त्राणि महातेजा विश्वामित्रो मुमोच ह। तैस्ते यवनकाम्बोजा बर्बराश्चाकुलीकृताः २४ [१६६७] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे चतुष्पञ्चाशः सर्गः ॥५४॥

ततस्तानाकुलान्दृष्ट्वा विश्वामित्रास्त्रमोहितान्। वसिष्ठश्चोदयामास कामधुक्सृज योगतः १ तस्या हुंकारतो जाताः काम्बोजा रविसं-

शम्री वसिष्ठांनीं शत्रूच्या बलाचा पाडाव करणारें बल तूं उत्पन्न कर " ह्मणून तिला आज्ञा केली १७. तेव्हां त्यांची ती आज्ञा झालेली ऐकून सुरभीनें सैन्य उत्पन्न केलें १८; ह्मणजे, हे राजा, ती हंबरण्याबरोबर शेंकडों पल्हवसंज्ञक म्लेच्छ उत्पन्न झाले आणि विश्वामित्राच्या समक्ष ते त्याच्या सर्व सैन्याचा नाश करूं लागले १९. हें पाहून तो राजा अत्यंत क्रुद्ध झाला आणि क्रोधानें डोळे वटारून लहान मोठ्या शस्त्रांनीं त्या पल्हवांचा नाश करूं लागला २०. तेव्हां विश्वामित्रानें शेंकडों पल्हव जर्जर केलेले पाहून त्या कामधेनूनें पुनरपि यवनांसहवर्तमान भयंकर शक उत्पन्न केले असतां २१ उग्र तेज, प्रचंड वीर्य आणि सुवर्णतुल्य कांति ह्यांनीं युक्त असलेल्या त्या यवनमिश्रित शकांच्या योगानें तेथील सर्व भूमि व्याप्त झाली २२ आणि तीक्ष्ण तरवारी व पट्ट घेऊन पीतवस्त्र परिधान केलेल्या आणि ह्मणूनच प्रज्वलित अग्नीप्रमाणें दिसत असलेल्या त्या यवनमिश्रित शकांनीं विश्वामित्राचें तें सर्व सैन्य दग्ध करून टाकिलें २३. तेव्हां महातेजस्वी विश्वामित्रानेंही अस्त्रें सोडिलीं असतां त्यांच्या योगानें ते यवन, कांबोज व बर्बर वगैरे ( कामधेनूपासून उत्पन्न झालेले ) म्लेच्छ व्याकुल झाले २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

नंतर ते यवनप्रभृति विश्वामित्राच्या अस्त्रानें मोहित होऊन व्याकुल झालेले अवलोकन केल्यावर " हे कामधेनु, योगसामर्थ्यानें तूं आणखी सेना उत्पन्न कर " अशी वसिष्ठांनीं कामधेनूला आज्ञा केली असतां १ तिच्या हंबरण्यापासून सूर्यासारिखे तेजस्वी

निभाः । ऊधमश्चाथ संभूता बर्बराः शस्त्रपाणयः २ योनिदेशाच्च यवनाः शकृद्देशाच्छकाः स्मृताः । रोमकूपेषु म्लेच्छाश्च हारीताः सकिरातकाः ३ तैस्तन्निषूदितं सर्वं विश्वामित्रस्य तत्क्षणात् । सपदातिगजं साश्वं सरथं रघुनन्दन ४ दृष्ट्वा निषूदितं सैन्यं वसिष्ठेन महात्मना ॥ विश्वामित्रसुतानां तु शतं नानाविधायुधम् ५ अभ्यधावत्सुसंक्रुद्धं वसिष्ठं जपतां वरम् । हुंकारेणैव तान्सर्वान्निर्ददाह महानृषिः ६ ते साश्वरथपादाता वसिष्ठेन महात्मना । भस्मीकृता मुहूर्तेन विश्वामित्रसुतास्तथा ७ दृष्ट्वा विनाशितान्सर्वान्बलं च सुमहायशाः । सव्रीडं चिन्तयाविष्टो विश्वामित्रोऽभवत्तदा ८ समुद्र इव निर्वेगो भग्नदंष्ट्र इवोरगः । उपरक्त इवादित्यः सद्यो निष्प्रभतां गतः ९ हतपुत्रबलो दीनो लूनपक्ष इव द्विजः । हतसर्वबलोत्साहो निर्वेदं समपद्यत १० स पुत्रमेकं राज्याय पालयेति नियुज्य च । पृथिवीं क्षत्रधर्मेण वनमेवाभ्यपद्यत ११ स गत्वा हिमवत्पार्श्वे किंनरोरगसेविते । महादेवप्रसादार्थं तपस्तेपे महातपाः १२ केन-

---

कांबोज उत्पन्न झाले आणि सडांपासून शस्त्रपाणी बर्बर उत्पन्न झाले २. तसेच योनिप्रदेशापासून यवन, गुदप्रदेशापासून शक आणि रोमकूपापासून म्लेच्छ, हारीत व किरात उत्पन्न झाले ३ व, हे रघुनंदना रामा, पायदळ, हत्ती, अश्व व रथ ह्यांसहवर्तमान विश्वामित्राचें तें सर्व सैन्य त्यांनीं तत्क्षणीं नाहींसें करून टाकिलें ४. तेव्हां महात्म्या वसिष्ठानें सर्व सैन्याचा नाश केला असें अवलोकन करून विश्वामित्राचे शंभर पुत्र अत्यंत क्रुद्ध झाले आणि नानाप्रकारचीं आयुधें धारण करून तपस्विश्रेष्ठ वसिष्ठावर धांवून गेले; परंतु, त्या महर्षीनें हुंकारानेंच ते सर्व दग्ध करून टाकिले ५,६. सारांश, अश्व, रथ व पायदळ ह्यांसहवर्तमान ते विश्वामित्राचे पुत्र महात्म्या वसिष्ठानें एका क्षणांत भस्मरूप करून टाकिले ७. तेव्हां सर्व पुत्रांचा व सैन्याचा नाश झालेला पाहून अत्यंतमहाकीर्तिमान् विश्वामित्रराजा लज्जेनें खालीं मान घालून चिंताक्रांत झाला ८ आणि वेगरहित झालेला सागर, भग्नदंत झालेला सर्प अथवा राहुग्रस्त झालेला सूर्यच कीं काय असा तो एकाएकीं निस्तेज झाला ९. सारांश, पुत्र, सैन्य व उत्साह ह्या सर्वांचा नाश झाल्यामुळें पंख उपटलेल्या पक्ष्याप्रमाणें दीन झालेला तो विश्वामित्र खिन्न झाला १० आणि "क्षत्रधर्मानें पृथ्वीचें परिपालन कर" असें सांगून आपला एक पुत्र राज्यावर बसविल्यानंतर तो वनामध्यें चालता झाला ११". तेथून निघतांक्षणीं किन्नर आणि उरग ह्यांनीं आश्रित असलेल्या हिमालयाच्या एका प्रदेशावर जाऊन तो महातपस्वी विश्वामित्र महादेव प्रसन्न होण्याकरितां

चिरत्वथकालेन देवेशो वृषभध्वजः । दर्शयामास वरदो विश्वामित्रं महामुनिम् १३ किमर्थं तप्यसे राजन्ब्रूहि यत्ते विवक्षितम् । वरदोस्मि वरो यस्ते काङ्क्षितः सोभिधीयताम् १४ एवमुक्तस्तु देवेन विश्वामित्रो महातपाः । प्रणिपत्य महादेवं विश्वामित्रोब्रवीदिदम् १५ यदि तुष्टो महादेव धनुर्वेदो ममानघ । साङ्गोपाङ्गोपनिषदः सरहस्यः प्रदीयताम् १६ यानि देवेषु चास्त्राणि दानवेषु महर्षिषु । गन्धर्वयक्षरक्षःसु प्रतिभान्तु ममानघ १७ तव प्रसादाद्भवतु देवदेव ममेप्सितम् । एवमस्त्विति देवेशो वाक्यमुक्त्वा गतस्तदा १८ प्राप्य चास्त्राणि देवेशाद्विश्वामित्रो महाबलः । दर्पेण महता युक्तो दर्पपूर्णोभवत्तदा १९ विवर्धमानो वीर्येण समुद्र इव पर्वणि । हतं मेने तदा राम वसिष्ठमृषिसत्तमम् २० ततो गत्वाश्रमपदं मुमोचास्त्राणि पार्थिवः । यैस्तत्तपोवनं नाम निर्दग्धं चास्त्रतेजसा २१ उदीर्यमाणमस्त्रं तद्विश्वामित्रस्य धीमतः । दृष्ट्वा विप्रद्रुता भीता मुनयः शतशो

---

तप करूं लागला १२. असें होतां होतां कांहीं काल लोटल्यावर देवाधिदेव वृषभध्वज शंकरांनीं वर देण्यास उत्सुक होऊन महामुनि विश्वामित्राला दर्शन दिलें १३ आणि ते ह्मणाले " हे राजा, तूं कशाकरितां तप करीत आहेस ? तुला काय पाहिजे आहे ? मी वर देण्यास उद्युक्त झालों आहें ; करितां, तूं इच्छिला असशील तो वर मागून घे" १४. ह्याप्रमाणें देवांनीं सांगितलें असतां महातपस्वी विश्वामित्र महादेवाला साष्टांग नमस्कार घालून ह्मणाला १५ " हे महादेव, हे निष्पाप, आपण जर संतुष्ट झालां असाल तर अंगे, प्रत्यंगें, मंत्र आणि रहस्य ह्यांसहवर्तमान मला धनुर्वेद द्या १६ आणि हे निष्पाप, देव, दानव, महर्षि, गंधर्व, यक्ष आणि राक्षस ह्यांचेपाशीं जीं अस्त्रें असतील त्यांची मला स्फूर्ति होवो १७. हे देवाधिदेव, आपल्या प्रसादानें माझी ही इच्छा परिपूर्ण व्हावी " ह्याप्रमाणें विश्वामित्रानें वर मागितल्यावर " ठीक आहे " असें ह्मणून देवाधिदेव शंकर चालते झाले १८. तेव्हां देवाधिदेव शंकरापासून अस्त्रें प्राप्त झाल्यावर आधींच महागर्विष्ठ असलेला महाबलाढ्य विश्वामित्र दर्पानें अगदीं भरून गेला १९ आणि पर्वदिवशीं क्षुब्ध होणाऱ्या समुद्राप्रमाणें वीर्याच्या योगानें उचंबळूं लागलेला तो विश्वामित्र, हे रामा, ऋषिश्रेष्ठ वसिष्ठाचा नाश झालाच असें समजूं लागला २०. असो. तदनंतर वसिष्ठांच्या आश्रमाला गेल्यावर, आपल्या तेजाच्या योगानें तें तपोवन दग्ध करून टाकतील अशीं अस्त्रें त्या राजानें सोडिलीं २१. तेव्हां बुद्धिमान् विश्वामित्राचा अस्त्रप्रयोग होत आहे असें पाहून शेंकडों मुनि भयभीत झाले आणि चोहोंकडे धांवूं

दिशः २२ वसिष्ठस्य च ये शिष्या ये च वै मृगपक्षिणः। विद्रवन्ति भयाद्भीता नानादिग्भ्यः सहस्रशः २३ वसिष्ठस्याश्रमपदं शून्यमासीन्महात्मनः। मुहूर्तमिव निःशब्दमासीदीरिणसंनिभम् २४ वदतो वै वसिष्ठस्य मा भैरिति मुहुर्मुहुः। नाशयाम्यद्य गाधेयं नीहारमिव भास्करः २५ एवमुक्त्वा महातेजा वसिष्ठो जपतां वरः। विश्वामित्रं तदा वाक्यं सरोषमिदमब्रवीत् २६ आश्रमं चिरसंवृद्धं यद्विनाशितवानसि। दुराचारो हि यन्मूढस्तस्मात्त्वं न भविष्यसि २७ इत्युक्त्वा परमक्रुद्धो दण्डमुद्यम्य सत्वरः। विधूम इव कालाग्निर्यमदण्डमिवापरम् २८ [१६९५] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः॥ ५५॥

एवमुक्तो वसिष्ठेन विश्वामित्रो महाबलः। आग्नेयमस्त्रमुद्दिश्य तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् १ ब्रह्मदण्डं समुद्यम्य कालदण्डमिवापरम्। वसिष्ठो भगवान्क्रोधादिदं वचनमब्रवीत् २ क्षत्रबन्धो स्थितोस्म्येष यद्बलं तद्वि-

---

लागले २२. सारांश, वसिष्ठाचे शिष्य आणि त्या आश्रमांतील पशुपक्षी हे सर्वच भयभीत झाले आणि हजारों अनेक दिशांकडे पळत सुटले २३. ह्यामुळें महात्म्या वसिष्ठांच्या आश्रमांत अगदीं शुकशुकाट झाला आणि माळाप्रमाणें एक क्षणभर त्यांत अगदीं सामसूम झालें २४. तात्पर्य, " धुकें नाहींसें करणाऱ्या सूर्याप्रमाणें आज ह्या गाधिपुत्र विश्वामित्राचा मी नाश करितों; भिऊं नका. " असें वसिष्ठमुनि वारंवार ह्मणत असतांनाही तिकडे लक्ष्य न देतां त्यांच्या आश्रमांतून सर्वजण निघून गेले २५. असो. ह्याप्रमाणें आश्रमांतील लोकांना सांगून महातेजस्वी तपस्विश्रेष्ठ वसिष्ठ विश्वामित्राला रागारागानें ह्मणाले २६ " ज्याअर्थी पुष्कळ दिवसांपासून मीं वृद्धिंगत केलेल्या ह्या आश्रमाचा तूं नाश केला आहेस त्याअर्थी तूं मूढ व दुराचारी असल्याचें उघड होत आहे. ह्यास्तव, तूं आतां कायम राहणार नाहींस " २७. ह्याप्रमाणें बोलून निर्धूम कालाग्निच कीं काय असे ते अत्यंत क्रुद्ध झालेले वसिष्ठ साक्षात् दुसरा यमदंडच कीं काय असा दंड सत्वर उगारून उभे राहिले २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला॥ ५५॥

ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितल्यावर आग्नेय अस्त्र सोडण्याचा उद्देश मनांत आणून महाबलाढ्य विश्वामित्र ' उभा रहा उभा रहा ' असें वसिष्ठांना ह्मणाला १. तेव्हां दुसरा कालदंडच कीं काय असा ब्रह्मदंड उगारून भगवान् वसिष्ठ क्रोधानें त्याला ह्मणाले २ " हे क्षत्रियाधमा, हा मी उभा राहिलोंच आहें. आतां आपलें काय बल

दर्शय। नाशयाम्यद्य ते दर्पं शस्त्रस्य तव गाधिज ३ क च ते क्षत्रियबलं क च ब्रह्मबलं महत्। पश्य ब्रह्मबलं दिव्यं मम क्षत्रियपांसन ४ तस्यास्त्रं गाधिपुत्रस्य घोरमाग्नेयमुत्तमम्। ब्रह्मदण्डेन तच्छान्तमग्नेर्वेग इवाम्भसा ५ वारुणं चैव रौद्रं च ऐन्द्रं पाशुपतं तथा। ऐषिकं चापि चिक्षेप कुपितो गाधिनन्दनः ६ मानवं मोहनं चैव गान्धर्वं स्वापनं तथा। जृम्भणं मोहनं चैव संतापनविलापने ७ शोषणं दारणं चैव वज्रमस्त्रं सुदुर्जयम्। ब्रह्मपाशं कालपाशं वारुणं पाशमेव च ८ पिनाकमस्त्रं दयितं शुष्कार्द्रे अशनी तथा। दण्डास्त्रमथ पैशाचं क्रौञ्चमस्त्रं तथैव च ९ धर्मचक्रं कालचक्रं विष्णुचक्रं तथैव च। वायव्यं मथनं चैव अस्त्रं हयशिरस्तथा १० शक्तिद्वयं च चिक्षेप कङ्कालं मुसलं तथा। वैद्याधरं महास्त्रं च कालास्त्रमथ दारुणम् ११ त्रिशूलमस्त्रं घोरं च कापालमथ कङ्कणम्। एतान्यस्त्राणि चिक्षेप सर्वाणि रघुनन्दन १२ वसिष्ठे जपतां श्रेष्ठे तदद्भुतमिवाभवत्। तानि सर्वाणि दण्डेन ग्रसते ब्रह्मणः सुतः १३ तेषु शान्तेषु ब्रह्मास्त्रं क्षिप्तवान्गाधिनन्दनः। तदस्त्रमुद्यतं दृष्ट्वा देवाः साग्निपुरोगमाः १४

असेल तें दाखीव. हे गाधिपुत्रा, आज तुझा व तुझ्या शस्त्रांचा गर्व नाहींसा करून टाकितों ३. अरे, तुझें क्षत्रियबल कोणीकडे! आणि हें प्रचंड ब्रह्मबल कोणीकडे! हे क्षत्रियकलंका, माझें दिव्य ब्रह्मबल पहा" ४. असें बोलून स्थित असलेल्या वसिष्ठमुनींच्या ब्रह्मदंडानें त्या गाधिपुत्र विश्वामित्राचें घोर व अनुपम असें आग्नेयास्त्र, जलानें शांत होणाऱ्या अग्नीच्या वेगाप्रमाणें, शांत झालें ५. तेव्हां वारुण, रौद्र, ऐंद्र, पाशुपत व ऐषिक हीं अस्त्रें त्या क्रुद्ध झालेल्या गाधिपुत्र विश्वामित्रानें वसिष्ठावर टाकिलीं ६. इतकेंच नव्हे, परंतु, मानव, मोहन, गांधर्व, स्वापन, जृंभण, मोहन, संतापन व विलापन ७, शोषण, दारण, अत्यंत दुर्जय असें वज्रास्त्र, ब्रह्मपाश, कालपाश, वरुणपाश, ८, शिवाला प्रिय असलेलें पिनाक अस्त्र, शुष्क आणि आर्द्र ह्या नांवाचीं अशनिसंज्ञक अस्त्रें, दंडास्त्र, पैशाच, क्रौंचास्त्र ९, धर्मचक्र, कालचक्र, विष्णुचक्र, वायव्यास्त्र, मथनास्त्र, हयशिरःसंज्ञक अस्त्र १०, कंकाल आणि मुसल ह्या दोन शक्ति, महास्त्र वैद्याधर, दारुण कालास्त्र ११, घोर असें त्रिशूल अस्त्र, कपाल आणि कंकण हीं सर्व अस्त्रें, हे रघुनंदना रामा, गाधिपुत्र विश्वामित्रानें तपस्विश्रेष्ठ वसिष्ठांवर टाकिलीं. तेव्हां फारच मोठें आश्चर्य झालें. कारण, ब्रह्मपुत्र वसिष्ठांनीं आपल्या दंडाच्याच योगानें तीं सर्व अस्त्रें ग्रासून टाकिलीं १२,१३. ह्याप्रमाणें तीं अस्त्रें व्यर्थ झाल्यावर गाधिपुत्र विश्वामित्रानें ब्रह्मास्त्र सोडिलें. तेव्हां तें अस्त्र सुटलेलें पाहून अग्निप्रभृति देव १४, देवर्षि, गंधर्व आणि

देवर्षयश्च संभ्रान्ता गन्धर्वाः समहोरगाः । त्रैलोक्यमासीत्संत्रस्तं ब्रह्मास्त्रे समुदीरिते १५ तदप्यस्त्रं महाघोरं ब्राह्मं ब्राह्मेण तेजसा । वसिष्ठो ग्रसते सर्वं ब्रह्मदण्डेन राघव १६ ब्रह्मास्त्रं ग्रसमानस्य वसिष्ठस्य महात्मनः । त्रैलोक्यमोहनं रौद्रं रूपमासीत्सुदारुणम् १७ रोमकूपेषु सर्वेषु वसिष्ठस्य महात्मनः । मरीच्य इव निष्पेतुरग्नेर्धूमाकुलार्चिषः १८ प्राज्वलद्ब्रह्मदण्डश्च वसिष्ठस्य करोद्यतः । विधूम इव कालाग्नेर्यमदण्ड इवापरः १९ ततोऽस्तुवन्मुनिगणा वसिष्ठं जपतां वरम् । अमोघं ते बलं ब्रह्मंस्तेजो धारय तेजसा २० निगृहीतस्त्वया ब्रह्मन्विश्वामित्रो महाबलः । अमोघं ते बलं श्रेष्ठ लोकाः सन्तु गतव्यथाः २१ एवमुक्तो महातेजाः शमं चक्रे महातपाः । विश्वामित्रो विनिकृतो विनिःश्वस्येदमब्रवीत् २२ धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलं बलम् । एकेन ब्रह्मदण्डेन सर्वास्त्राणि हतानि मे २३ तदेतत्प्रसमीक्ष्याहं प्रसन्नेन्द्रियमानसः । तपो महत्समास्थास्ये यद्वै ब्रह्मत्वकारणम् २४ [१७१९] इत्यार्षे श्री० आदिकाव्ये बालकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥ ५६ ॥

---

महोरग हे अगदीं भांबावून गेले आणि तें ब्रह्मास्त्र सुटल्यावर सर्व त्रैलोक्य अगदीं त्रस्त झालें १५; परंतु, हे रघुवंशजा रामा, ब्रह्मतेजानें युक्त असलेल्या ब्रह्मदंडाच्या योगानें तें महाघोर ब्रह्मास्त्रही वसिष्ठांनीं ग्रासून टाकिलें १६. महात्मे वसिष्ठ ब्रह्मास्त्र ग्रासून टाकूं लागले असतां त्यांचें अति भयंकर व उग्ररूप त्रैलोक्याला मूर्च्छित करूं लागलें १७. कारण, महात्म्या वसिष्ठांच्या सर्व रोमछिद्रांतून धूमग्रस्त ज्वालांनीं युक्त असलेल्या अग्नीच्या ठिणग्या निघूं लागल्या १८ आणि दुसरा यमदंडच कीं काय असा हातामध्यें उगारिलेला वसिष्ठांचा ब्रह्मदंड धूमरहित कालाग्नीप्रमाणें प्रज्वलित होऊं लागला १९. तेव्हां, मुनिगण, तपस्विश्रेष्ठ वसिष्ठांची स्तुति करूं लागले कीं, " हे ब्रह्मन्, तुझें बल निष्फल होणारें नाहीं. आतां आपल्या तेजाच्याच योगानें आपण हें तेज आंवरून धरा २०. हे ब्रह्मन्, महाबलाढ्य विश्वामित्राला आपण जिंकिलें. हे श्रेष्ठ, आपलें बल अमोघ आहे. आतां लोक निर्भय होवोत " २१. ह्याप्रमाणें मुनिगणांनीं प्रार्थना केली असतां महातेजस्वी व महातपस्वी वसिष्ठांनीं शमाचें अवलंबन केलें. नंतर सर्व प्रकारें वसिष्ठांनीं जेरीस आणिलेला विश्वामित्र सुस्कारा टाकून ह्मणाला २२ " धिक्कार असो त्या क्षत्रियबलाला ! ब्रह्मतेजोबल हेंच खरें खरें बल होय. अरे, एका ब्रह्मदंडानें माझ्या सर्व अस्त्रांचा चुराडा होऊन गेला २३. तस्मात्, हा सर्व प्रकार अवलोकन करून मी आतां आपलीं इंद्रियें व मन शांत करितों आणि ब्राह्मणत्व येण्यास कारण होईल असें प्रचंड तप करितों " २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-

ततः संतप्तहृदयः स्मरन्निग्रहमात्मनः। विनिःश्वस्य विनिःश्वस्य कृतवैरो महात्मना १ स दक्षिणां दिशं गत्वा महिष्या सह राघव। तताप परमं घोरं विश्वामित्रो महातपाः २ फलमूलाशनो दान्तश्चचार परमं तपः। अथास्य जज्ञिरे पुत्राः सत्यधर्मपरायणाः ३ हविष्पन्दो मधुष्पन्दो दृढनेत्रो महारथः। पूर्णे वर्षसहस्रे तु ब्रह्मा लोकपितामहः ४ अब्रवीन्मधुरं वाक्यं विश्वामित्रं तपोधनम्। जिता राजर्षिलोकास्ते तपसा कुशिकात्मज ५ अनेन तपसा त्वां हि राजर्षिरिति विद्महे। एवमुक्त्वा महातेजा जगाम सह दैवतैः ६ त्रिविष्टपं ब्रह्मलोकं लोकानां परमेश्वरः। विश्वामित्रोपि तच्छ्रुत्वा ह्रिया किंचिदवाङ्मुखः ७ दुःखेन महताविष्टः समन्युरिदमब्रवीत्। तपश्च सुमहत्तप्तं राजर्षिरिति मां विदुः ८ देवाः सर्षिगणाः सर्वे नास्ति मन्ये तपःफलम्। एवं निश्चित्य मनसा भूय एव महातपाः ९ तपश्चचार धर्मात्मा काकुत्स्थ परमात्मवान्। एतस्मिन्नेव काले तु सत्य-

---

संज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं छप्पन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५६ ॥

तदनंतर आपल्या पराजयाचें स्मरण होत असल्यामुळें अंतःकरण संतप्त झालेला आणि उस्मारून उस्मारून महात्म्या वसिष्ठांशीं वैर धरून राहिलेला १ महातपस्वी विश्वामित्र आपल्या पत्नीसहवर्तमान दक्षिण दिशेस गेला आणि, हे रघुवंशजा रामा, तेथें फारच भयंकर तपश्चर्या करूं लागला २. फलमूलें भक्षण करून त्या जितेंद्रिय विश्वामित्रानें उत्कृष्ट तपश्चर्या केली. नंतर सत्य आणि धर्म ह्यांविषयीं तत्पर असलेल्या त्या विश्वामित्राला हविष्पंद, मधुष्पंद आणि महारथी दृढनेत्र ह्मणून पुत्र झाले. असो. तपश्चर्येला हजार वर्षे पूर्ण झाल्यावर लोकपितामह ब्रह्मदेव ३, ४, तपोधन विश्वामित्राला मधुर शब्दांनीं ह्मणाले " हे कुशिकपुत्रा, तूं आपल्या तपाच्या योगानें राजर्षीना प्राप्त होणारे लोक जिंकिले आहेस ५. ह्या तपाच्या योगानें " राजर्षि " असें आह्मीं तुला समजत आहोंत. " ह्याप्रमाणें विश्वामित्राला सांगून महातेजस्वी व लोकाधिपति ब्रह्मदेव इतर देवांसहवर्तमान स्वर्गाला जाऊन ब्रह्मलोकाप्रत गेले. इकडे ब्रह्मदेवांचें तें भाषण श्रवण करून विश्वामित्रानें लज्जेमुळें आपली मान किंचित् खालीं केली ६, ७ आणि अत्यंत दुःखाकुल होऊन रागारागानें तो आपल्याशीं ह्मणाला " अरे, मी फारच मोठें तप केलें असतांनाही ऋषिगणांसहवर्तमान हे सर्व देव त्याअर्थी मला राजर्षिच समजत आहेत त्याअर्थी ब्राह्मणत्व देण्याला योग्य होणारें ह्या तपाचें फल नाहीं असें मला वाटतें ". ह्याप्रमाणें मनाचा निश्चय झाल्यावर, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, पराकाष्ठेचा धैर्यवान् असलेला तो महातपस्वी धर्मात्मा विश्वामित्र

वादी जितेन्द्रियः १० त्रिशङ्कुरिति विख्यात इक्ष्वाकुकुलवर्धनः । तस्य बुद्धिः समुत्पन्ना यजेयमिति राघव ११ गच्छेयं स्वशरीरेण देवतानां परां गतिम् । वसिष्ठं स समाहूय कथयामास चिन्तितम् १२ अशक्यमिति चाप्युक्तो वसिष्ठेन महात्मना । प्रत्याख्यातो वसिष्ठेन स ययौ दक्षिणां दिशम् १३ ततस्तत्कर्मसिद्ध्यर्थं पुत्रांस्तस्य गतो नृपः । वासिष्ठा दीर्घतपसस्तपो यत्र हि तेपिरे १४ त्रिशङ्कुस्तु महातेजाः शतं परमभास्वरम् । वसिष्ठपुत्रान्ददृशे तप्यमानान्मनस्विनः १५ सोऽभिगम्य महात्मानः सर्वानेव गुरोः सुतान् । अभिवाद्यानुपूर्व्येण ह्रिया किंचिदवाङ्मुखः १६ अब्रवीत्स महात्मनः सर्वानेव कृताञ्जलिः । शरणं वः प्रपन्नोऽहं शरण्याञ्छरणं गतः १७ प्रत्याख्यातो हि भद्रं वो वसिष्ठेन महात्मना । यष्टुकामो महायज्ञं तदनुज्ञातुमर्हथ १८ गुरुपुत्रानहं सर्वान्नमस्कृत्य प्रसादये । शिरसा प्रणतो याचे ब्राह्मणांस्तपसि स्थितान् १९ ते मा भवन्तः । सिद्ध्यर्थं याज-

---

पुनरपि तपश्चर्या करूं लागला. त्याच वेळेला सत्यवादी आणि जितेंद्रिय ८,९,१०. असा त्रिशंकु ह्मणून विख्यात असलेला इक्ष्वाकुकुलवर्धक राजा राज्य करीत होता. हे रघुवंशजा रामा, आपण यज्ञ करावा आणि देवतांचें उत्कृष्ट स्थान जो स्वर्ग त्याप्रत स्वशरीरासहवर्तमान गमन करावें " असें त्या राजाच्या मनांत आलें. तेव्हां वसिष्ठांना हाक मारून त्यानें आपला उद्देश कळविला असतां ११, १२ " असें होणें अशक्य आहे " ह्मणून महात्म्या वसिष्ठांनीं त्याला सांगितलें व ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं नाकारिल्यावर तो दक्षिण दिशेस गेला १३. नंतर शरीरासहवर्तमान स्वर्गाची प्राप्ति करून देणारें कर्म सिद्ध होण्याकरितां तो राजा दीर्घ तपश्चर्या करणारे महातपस्वी वसिष्ठपुत्र जेथें तप करीत होते तेथें त्यांच्याकडे गेला असतां १४ महातेजस्वी त्रिशंकु राजानें तपश्चर्या करीत असलेले असे अत्यंत उज्ज्वल व विचारी शंभर वसिष्ठपुत्र अवलोकन केले १५. नंतर जवळ जाऊन त्या महात्म्या सर्वही गुरुपुत्रांना क्रमानें त्यानें अभिवंदन केलें आणि लज्जेमुळें मुख किंचित् खालीं करून व हात जोडून तो त्या सर्वही महात्म्यांना ह्मणाला १६ " इतरांचें रक्षण करण्यास मी समर्थ असतांनाही माझें रक्षण करण्यास योग्य असलेल्या आपणांकडे मी शरण आलों आहें १७. आपलें कल्याण असो. महाक्रतु करण्याचें माझ्या मनांत असून महात्म्या वसिष्ठांनीं मला नाकारिलें आहे. करितां, आपण तो महाक्रतु करण्याची अनुज्ञा द्या १८. सर्व गुरुपुत्रांना प्रणामपूर्वक मी शरण आलों आहें आणि मस्तकानें प्रणाम करून आपणांसारिख्या तपोनिष्ठ ब्राह्मणांपाशीं मी याचना करीत आहें १९. ह्यास्तव, शरीरासहवर्तमान स्वर्गाप्रत मला

यन्तु समाहिताः। सशरीरो यथाहं वै देवलोकमवाप्नुयाम् २० प्रत्याख्यातो वसिष्ठेन गतिमन्यां तपोधनाः। गुरुपुत्रानृते सर्वान्नाहं पश्यामि कांचन २१ इक्ष्वाकूणां हि सर्वेषां पुरोधाः परमा गतिः। तस्मादनन्तरं सर्वे भवन्तो दैवतं मम २२ [१७४१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः॥ ५७॥

ततस्त्रिशङ्कोर्वचनं श्रुत्वा क्रोधसमन्वितम्। ऋषिपुत्रशतं राम राजानमिदमब्रवीत् १ प्रत्याख्यातोसि दुर्मेधो गुरुणा सत्यवादिना। तं कथं समतिक्रम्य शाखान्तरमुपेयिवान् २ इक्ष्वाकूणां हि सर्वेषां पुरोधाः परमा गतिः। न चातिक्रमितुं शक्यं वचनं सत्यवादिनः ३ अशक्यमिति सोवाच वसिष्ठो भगवानृषिः। तं वयं वै समाहर्तुं क्रतुं शक्ताः कथंचन॥ बालिशस्त्वं नरश्रेष्ठ गम्यतां स्वपुरं पुनः ४ याजने भगवाञ्छक्तस्त्रैलोक्यस्यापि पार्थिव। अवमानं कथं कर्तुं तस्य शक्ष्यामहे वयम् ५ तेषां तद्वचनं श्रुत्वा क्रोधपर्याकुलाक्षरम्। स राजा पुनरेवैतानिदं वचनमब्रवीत् ६ प्रत्याख्यातो भगवता गुरुपुत्रैस्तथैव हि। अन्यां

जातां यावें एतदर्थ आपण स्वस्थांतःकरणपूर्वक माझ्याकडून यज्ञ करवा; ह्मणजे मी शरीरासहवर्तमान देवलोकाप्रत जाईन २०. हे तपोधनहो, वसिष्ठांनीं मला नाकारिलें आहे; ह्यास्तव, सर्व गुरुपुत्रांना शरण गेल्यावांचून मला कोणतीही गति दिसत नाहीं २१. कारण, पुरोहित हाच काय तो सर्वही इक्ष्वाकुवंशजांचा मुख्य आधार होय. तस्मात्, वसिष्ठानंतर सर्व आपणच माझें दैवत आहांत" २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला॥ ५७॥

तदनंतर, हे रामा, त्रिशंकूचें तें सक्रोध भाषण श्रवण केल्यावर वसिष्ठांचे शंभर पुत्र त्या राजाला ह्मणाले १ " हे दुष्टबुद्धे, सत्यवादी गुरूनें त्याग केला ह्मणून तूं त्याचें अतिक्रमण करून आश्रयाकरितां दुसऱ्याकडे कसा गेलास ? २. अरे, सर्व इक्ष्वाकुवंशजांना पुरोहित हाच मुख्य आश्रय आहे आणि सत्यवादी वसिष्ठांच्या वचनाचें उल्लंघन होणें शक्य नाहीं ३. करितां, भगवान् वसिष्ठ ऋषींनीं अशक्य ह्मणून ज्या यज्ञाविषयीं सांगितलें त्या यज्ञाचें अनुष्ठान करण्यास आह्मीं कोणत्याही प्रकारें समर्थ नाहीं. हे पुरुषश्रेष्ठा, तूं मूर्ख आहेस, आपल्या नगराप्रत परत जा ४. हे राजा, त्रैलोक्यप्राप्त्यर्थही यज्ञ करण्याला भगवान् वसिष्ठ समर्थ आहेत ; तेव्हां ( हा यज्ञ करण्याला ते समर्थ नाहींत असें समजून ) आह्मीं त्यांचा अवमान करण्यास कसें समर्थ होऊं ? ५. ह्याप्रमाणें वसिष्ठपुत्रांचें तें सक्रोध भाषण श्रवण करून तो त्रिशंकु

गतिं गमिष्यामि स्वस्ति वोस्तु तपोधनाः ७ ऋषिपुत्रास्तु तच्छ्रुत्वा वाक्यं घोराभिसंहितम् । शेपुः परमसंक्रुद्धाश्चण्डालत्वं गमिष्यसि ८ इत्युक्त्वा ते महात्मानो विविशुः स्वं स्वमाश्रमम् । अथ रात्र्यां व्यतीतायां राजा चण्डालतां गतः ९ नीलवस्त्रधरो नीलः पुरुषो ध्वस्तमूर्धजः । चित्यमाल्याङ्गरागश्च आयसाभरणोभवत् १० तं दृष्ट्वा मन्त्रिणः सर्वे त्यज्य चण्डालरूपिणम् । प्राद्रवन्सहिता राम पौरा येस्यानुगामिनः ११ एको हि राजा काकुत्स्थ जगाम परमात्मवान् । दह्यमानो दिवारात्रं विश्वामित्रं तपोधनम् १२ विश्वामित्रस्तु तं दृष्ट्वा राजानं विफलीकृतम् । चण्डालरूपिणं राम मुनिः कारुण्यमागतः १३ कारुण्यात्स महातेजा वाक्यं परमधार्मिकः । इदं जगाद भद्रं त राजानं घोरदर्शनम् १४ किमागमनकार्यं ते राजपुत्र महाबल । अयोध्याधिपते वीर शापाच्चण्डालतां गतः १५ अथ तद्वाक्यमाकर्ण्य राजा चण्डालतां गतः । अब्रवीत्प्राञ्-

---

राजा पुनरपि त्यांना ह्मणाला ६ " हे तपोधनहो, ज्याअर्थी गुरु आणि गुरुपुत्रही माझा त्याग करीत आहेत त्याअर्थी मी आतां दुसऱ्याचा आश्रय करितों ; तुमचें कल्याण असो " ७. नंतर ज्यांतील उद्देश भयंकर आहे असें तें राजाचें भाषण श्रवण केल्याबरोबर गुरुपुत्र अतिशय क्रुद्ध झाले आणि " तूं चांडाल होशील " ह्मणून त्यांनीं त्याला शापही दिला ८. ह्याप्रमाणें शाप देऊन ते महात्मे आपआपल्या आश्रमांत प्रविष्ट झाले व ती रात्र उजाडल्यावर त्रिशंकु राजाही चंडाल बनला ९; त्याचें वस्त्र नीलवर्णाचें झालें; शरीराची कांति रुक्ष होऊन मस्तकावरील केश अखुड झाले; श्मशानांतील पुष्पें आणि भस्मरूप उटी त्याच्या शरीराचे ठिकाणीं दिसूं लागली आणि अंगावरील भूषणेंही लोहमय झालीं १०. तेव्हां त्या चंडालरूपी राजाला अवलोकन करितांक्षणींच, हे रामा, सर्व मंत्री, सर्व नगरवासी जन व त्याचे अनुयायी एकत्र होऊन निघून गेले ११ व असें झालें असतां, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, रात्रंदिवस मनामध्यें जळत असलेला तो महाधैर्यवान् राजा तपोधन विश्वामित्राकडे गेला १२. तेव्हां, हे रामा, जन्म निरर्थक झालेल्या त्या चंडालरूपी राजाला अवलोकन करून विश्वामित्र मुनींना दया आली १३ आणि ते महातेजस्वी अत्यंत धार्मिक मुनि दयेमुळें त्या उग्र दिसणाऱ्या राजाला ह्मणाले, " हे महाबलाढ्य राजपुत्रा, तुझें कल्याण असो. शापामुळें चांडालत्व प्राप्त झालें असतांना, हे अयोध्याधिपते वीरा, तूं कशाकरितां येथें आला आहेस ? " १४, १५. हें विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण केल्यावर भाषणाचें मर्म जाणणारा तो चंडाल बनलेला राजा संभाषण करण्यामध्यें निपुण अस-

लिर्वाक्यं वाक्यज्ञो वाक्यकोविदम् १६ प्रत्याख्यातोस्मि गुरुणा गुरुपुत्रैस्तथैव च । अनवाप्यैव तं कामं मया प्राप्तो विपर्ययः १७ सशरीरो दिवं यायामिति मे सौम्यदर्शन । मया चेष्टं क्रतुशतं तच्च नावाप्यते फलम् १८ अनृतं नोक्तपूर्वं मे न च वक्ष्ये कदाचन । कृच्छ्रेष्वपि गतः सौम्य क्षत्रधर्मेण ते शपे १९ यज्ञैर्बहुविधैरिष्टं प्रजा धर्मेण पालिताः । गुरवश्च महात्मानः शीलवृत्तेन तोषिताः २० धर्मे प्रयतमानस्य यज्ञं चाहर्तुमिच्छतः । परितोषं न गच्छन्ति गुरवो मुनिपुंगव २१ दैवमेव परं मन्ये पौरुषं तु निरर्थकम् । दैवेनाक्रम्यते सर्वं दैवं हि परमा गतिः २२ तस्य मे परमार्थस्य प्रसादमभिकाङ्क्षतः । कर्तुमर्हसि भद्रं ते दैवोपहतकर्मणः २३ नान्यां गतिं गमिष्यामि नान्यच्छरणमस्ति मे । दैवं पुरुषकारेण निवर्तयितुमर्हसि २४ [१७६५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

---

लेल्या विश्वामित्रांना हात जोडून ह्मणाला १६ " गुरूनें व त्याचप्रमाणें गुरुपुत्रांनींही माझी पर्वा ठेविली नाहीं. ह्यामुळें ज्या उद्देशानें मी त्यांच्याकडे गेलों होतों तो उद्देश सिद्धीस न जातां उलट हा जातिभ्रंशरूप विपरीत प्रकार मात्र झाला आहे १७. हे सौम्य-दर्शन, शरीरासहवर्तमान स्वर्गास जावें अशी माझी इच्छा आहे आणि त्याकरितां मीं शंभर क्रतुही केले आहेत; परंतु, त्या क्रतूंचें सदेहस्वर्गप्राप्तिरूप फल मला प्राप्त होत नाहीं १८. हे सौम्य, मीं अनृत भाषण आजपर्यंत कधीं केलें नाहीं व संकटांत सांपडलों असतांही पुढें कधीं करणार नाहीं. हें मी आपणांला क्षत्रधर्म स्मरून सांगत आहें १९. मीं नाना प्रकारचे यज्ञ केले. धर्मानें प्रजांचें परिपालन केलें व आपल्या सच्छील आचरणानें महात्म्या गुरूला संतुष्ट केलें २०. परंतु, हे मुनिश्रेष्ठ, धर्माविषयीं उद्युक्त राहून सांप्रत मला यज्ञ करण्याची इच्छा झाली असतांनाही गुरूना त्यायासून संतोष होत नाहीं २१. तेव्हां प्रयत्न व्यर्थ असून दैवच श्रेष्ठ आहे असें मला वाटतें. कारण, दैवानेंच सर्व कांहीं व्यापून टाकिलें आहे आणि ह्मणूनच दैव हाच पुरुषाचा मुख्य आधार आहे २२. तस्मात् , दैवामुळेंच ज्याचें कर्म हाणून पडलें अशा मज अत्यंत दुःखित कृपायाभिलाष्यावर आपली कृपा व्हावी. आपलें कल्याण असो २३. तात्पर्य, मी आतां दुसऱ्या कोणाचेंही अवलंबन करणार नाहीं व ह्या प्रसंगीं आपणांवांचून माझें रक्षण करणारा दुसरा कोणी नाहीं. करितां, यत्नानें आपण माझें दैव हाणून पाडावें २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

उक्तवाक्यं तु राजानं कृपया कुशिकात्मजः। अब्रवीन्मधुरं वाक्यं साक्षाच्चण्डालतां गतम् १ इक्ष्वाको स्वागतं वत्स जानामि त्वां सुधार्मिकम्। शरणं ते प्रदास्यामि मा भैषीर्नृपपुंगव २ अहमामन्त्रये सर्वान्महर्षीन्पुण्यकर्मणः। यज्ञसाह्यकरान्राजंस्ततो यक्ष्यसि निर्वृतः ३ गुरुशापकृतं रूपं यदिदं त्वयि वर्तते। अनेन सह रूपेण सशरीरो गमिष्यसि ४ हस्तप्राप्तमहं मन्ये स्वर्गं तव नराधिप। यस्त्वं कौशिकमागम्य शरण्यं शरणागतः ५ एवमुक्त्वा महातेजाः पुत्रान्परमधार्मिकान्। व्यादिदेश महाप्राज्ञान्यज्ञसंभारकारणात् ६ सर्वाञ्छिष्यान्समाहूय वाक्यमेतदुवाच ह ७ सर्वानृषीन्सवासिष्ठानानयध्वं ममाज्ञया। सशिष्यान्सुहृदश्चैव सर्त्विजः सुबहुश्रुतान् ८ यदन्यो वचनं ब्रूयान्मद्वाक्यबलचोदितः। तत्सर्वमखिलेनोक्तं ममाख्येयमनादृतम् ९ तस्य तद्वचनं श्रुत्वा दिशो जग्मुस्तदाज्ञया। आजग्मुरथ देशेभ्यः सर्वेभ्यो ब्रह्मवादिनः १० ते च शिष्याः समागम्य मुनिं ज्वलिततेजसम्। ऊचुश्च वचनं सर्वे सर्वेषां ब्रह्मवादि-

---

साक्षात् चांडालत्व प्राप्त झालेल्या त्या राजानें ह्याप्रमाणें भाषण केलें असतां कुशिकवंशज विश्वामित्र दयेमुळें त्याला ह्मणाले १ " हे इक्ष्वाकुवंशजा, तुझें स्वागत असो. वत्सा, तूं अत्यंत धार्मिक आहेस हें मी समजत आहें. हे नृपश्रेष्ठा, भिऊं नकोस, मी तुझें रक्षण करीन २. मी पुण्य कर्म करणाऱ्या सर्व महर्षींना यज्ञाला साहाय्य करण्याकरितां निमंत्रण करीन आणि असें झालें असतां तूं सुखानें आपला याग शेवटास नेशील ३. गुरुशापामुळें जें रूप तुला प्राप्त झालें आहे त्या रूपासह तूं सदेह स्वर्गास जाशील ४. हे राजा, ज्याअर्थी तूं शरण जाण्यास योग्य अशा कुशिकवंशजविश्वामित्राला शरण आला आहेस त्याअर्थी तुला स्वर्गप्राप्त होणें ही गोष्ट अगदीं हातची आहे असें मी समजत आहें " ५. ह्याप्रमाणें राजाला सांगून त्या महातेजस्वी विश्वामित्रानें आपल्या महाबुद्धिमान् व अत्यंत धार्मिक पुत्रांना यज्ञसामग्री जुळविण्याविषयीं आज्ञा केली ६ आणि सर्व शिष्यांना हांक मारून त्यांना असें सांगितलें कीं ७ " वसिष्ठपुत्रांसहवर्तमान सर्व ऋषींना माझ्या आज्ञेनें येथें घेऊन या आणि चांगले बहुश्रुत असे जे माझे सुहृद असतील त्यांनाही ऋत्विज व शिष्य ह्यांसहवर्तमान येथें आणा ८ आणि माझा निरोप ऐकिल्यावर बोलण्याची स्फूर्ति होऊन जो कोणी काय बोलेल तें निंदात्मक असलें तरी सर्व माझ्यापाशीं उलट येऊन सांगा " ९. हें विश्वामित्राचें भाषण श्रवण करून ते शिष्य त्याच्या आज्ञेप्रमाणें चोहोंकडे गेले असतां सर्व देशाहून ब्रह्मवेत्ते मुनि आले १०. नंतर परत आलेले ते शिष्य

नाम् ११ श्रुत्वा ते वचनं सर्वे समायान्ति द्विजातयः । सर्वदेशेषु चागच्छन्वर्जयित्वा महोदयम् १२ वासिष्ठं यच्छतं सर्वं क्रोधपर्याकुलाक्षरम् । यथाह वचनं सर्वं शृणु त्वं मुनिपुङ्गव १३ क्षत्रियो याजको यस्य चण्डालस्य विशेषतः । कथं सदसि भोक्तारो हविस्तस्य सुरर्षयः १४ ब्राह्मणा वा महात्मानो भुक्त्वा चाण्डालभोजनम् । कथं स्वर्गं गमिष्यन्ति विश्वामित्रेण पालिताः १५ एतद्वचननैष्ठुर्यमूचुः संरक्तलोचनाः । वासिष्ठा मुनिशार्दूल सर्वे सहमहोदयाः १६ तेषां तद्वचनं श्रुत्वा सर्वेषां मुनिपुंगवः । क्रोधसंरक्तनयनः सरोषमिदमब्रवीत् १७ यद्दूषयन्त्यदुष्टं मां तप उग्रं समास्थितम् । भस्मीभूता दुरात्मानो भविष्यन्ति न संशयः १८ अद्य ते कालपाशेन नीता वैवस्वतक्षयम् । सप्त जातिशतान्येव मृतपाः संभवन्तु ते १९ श्वमांसनियताहारा मुष्टिका नाम निर्घृणाः । विकृताश्च विरूपाश्च लोकाननुचरन्त्विमान् २० महोदयश्च दुर्बुद्धिर्मामदूष्यं ह्यदूषयत् । दूषितः सर्वलो-

उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या विश्वामित्र मुनींची गांठ घेऊन त्या सर्व ब्रह्मवेत्त्यांनीं सर्व कांहीं भाषण त्याला सांगूं लागले कीं ११ ( हे मुनिश्रेष्ठ ) आपला निरोप ऐकून सर्व ब्राह्मण येत आहेत; महोदय ऋषींखेरीज सर्व देशांतील मुनि आलेच ( असें आपण समजा ) १२. हे मुनिश्रेष्ठ, क्रोधामुळें ज्यांतील वर्णोच्चारही स्पष्ट होत नव्हता असें वसिष्ठ मुनींच्या सर्व शंभरही पुत्रांनीं जे आपणांला उद्देशून भाषण केलें तें सर्व आपण ऐका १३. ( ते ह्मणाले ) " ज्याचा आणि विशेषेंकरून ज्या चांडालाचा याजक क्षत्रिय आहे त्याच्या यज्ञामध्यें देव व ऋषि हविर्भाग कसा ग्रहण करतील ? १४. अथवा, विश्वामित्र जरी पालन करणारा असला तरी चांडालाचें अन्न भक्षण करून महात्मे ब्राह्मण तरी कसे स्वर्गाला जातील ? " १५. हे मुनिश्रेष्ठ, डोळे लाल करून ते सर्वही वसिष्ठपुत्र महोदय मुनींसहवर्तमान निष्ठुरपणानें असें ह्मणाले १६. तें त्या सर्व शिष्यांचें भाषण श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांचें नेत्र क्रोधानें आरक्तवर्ण झाले आणि रागारागानें ते ह्मणाले १७ "ज्याअर्थीं उग्र तपश्चर्येचें अवलंबन करून असलेल्या मज निर्दोष मुनीला हे दोष लावीत आहेत त्याअर्थीं ह्या दुरात्म्यांचें निःसंशय भस्म होऊन जाईल १८. आज कालपाशाच्या योगानें ते यमसदनीं पोंचते होतील आणि मृतावर उपजीविका करून सातशें जन्मपर्यंत ते राहतील १९. सारांश, श्वानमांस हाच त्यांचा आहार होईल आणि निर्दय, कुरूप व अकाळविकाळ असे ते डोंब होऊन ह्या लोकांमध्यें संचार करतील २०. त्याचप्रमाणें मी दूषणास योग्य नसतांनाही ज्याअर्थीं दुर्बुद्धि महोदयानें मला दूषण

केषु निषादत्वं गमिष्यति २१ प्राणातिपातनिरतो निरनुक्रोशतां गतः। दीर्घकालं मम क्रोधाद्दुर्गतिं वर्तयिष्यति २२ एतावदुक्त्वा वचनं विश्वामित्रो महातपाः। विरराम महातेजा ऋषिमध्ये महामुनिः २३ [१७८८] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकोनषष्टितमः सर्गः॥५९॥

तपोबलहताञ्ज्ञात्वा वासिष्ठान्समहोदयान्। ऋषिमध्ये महातेजा विश्वामित्रोऽभ्यभाषत १ अयमिक्ष्वाकुदायादस्त्रिशङ्कुरिति विश्रुतः । धर्मिष्ठश्च वदान्यश्च मां चैव शरणं गतः २ स्वेनानेन शरीरेण देवलोकजिगीषया । यथायं स्वशरीरेण देवलोकं गमिष्यति । तथा प्रवर्त्यतां यज्ञो भवद्भिश्च मया सह ३ विश्वामित्रवचः श्रुत्वा सर्व एव महर्षयः । ऊचुः समेताः सहसा धर्मज्ञा धर्मसंहितम् ४ अयं कुशिकदायादो मुनिः परमकोपनः । यदाह वचनं सम्यगेतत्कार्यं न संशयः ५ अग्निकल्पो हि भगवाञ्छापं दास्यति रोषतः। तस्मात्प्रवर्त्यतां यज्ञः सशरीरो यथा दिवि ६ गच्छेदिक्ष्वाकुदायादो

---

दिलें आहे त्याअर्थीं सर्व लोकांमध्यें दूषित होऊन तो निषादाचे जन्मास जाईल २१, निर्दय बनल्यामुळें प्राण्यांचा प्राण घेण्याविषयीं तो उद्युक्त राहील आणि अशा रीतीनें माझ्या क्रोधामुळें पुष्कळ काल लोटेपर्यंत त्याला दुःखदस्थिति प्राप्त होईल २२. ऋषींमध्यें असें बोलून महातपस्वी व महातेजस्वी महामुनि विश्वामित्र स्वस्थ बसले २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला ॥ ५९ ॥

आपल्या तपःसामर्थ्यानें महोदयासहवर्तमान वसिष्ठपुत्रांचा नाश झाला असें समजून महातेजस्वी विश्वामित्र ऋषींमध्यें ह्मणाले १ "त्रिशंकु ह्मणून विख्यात असलेला हा इक्ष्वाकुवंशज धर्मनिष्ठ व उदार असून ह्या आपल्या स्वशरीरासहवर्तमान देवलोकप्राप्ति होण्याच्या उद्देशानें मला शरण आलेला आहे २. करितां, हा स्वशरीरासहवर्तमान देवलोकीं गमन करील अशा रीतीनें आपण माझ्याबरोबर यज्ञाला आरंभ करावा " ३. हें विश्वामित्रांचें भाषण श्रवण करून ते सर्वही धर्मज्ञ मुनि एके ठिकाणीं जुळले आणि धर्माला अनुसरून अशा रीतीनें आपआपसांत ह्मणूं लागले कीं ४ " हा कुशिकवंशज मुनि पराकाष्ठेचा कोपी आहे. तेव्हां यानें जें सांगितलें आहे तें नीट रीतीनें आपणांला तडीस नेलें पाहिजे ह्यांत संशय नाहीं ५. कारण ( आपण जर असें न केलें तर ) अग्नितुल्य, भगवान् विश्वामित्र क्रोधानें आपणांला शाप देईल. तस्मात् , विश्वामित्राच्या तेजानें हा इक्ष्वाकुवंशज त्रिशंकु शरीरासहवर्तमान स्वर्गास जाईल अशा रीतीनें यज्ञाला आरंभ करणें अवश्य आहे. करितां, यज्ञाला

विश्वामित्रस्य तेजसा। ततः प्रवर्त्यतां यज्ञः सर्वे समधितिष्ठत ७ एवमुक्त्वा महर्षयः संजह्रुस्ताः क्रियास्तदा। याजकश्च महातेजा विश्वामित्रोभवत्क्रतौ ८ ऋत्विजश्चानुपूर्व्येण मन्त्रवन्मन्त्रकोविदाः। चक्रुः सर्वाणि कर्माणि यथाकल्पं यथाविधि ९ ततः कालेन महता विश्वामित्रो महातपाः। चकारावाहनं तत्र भागार्थं सर्वदेवताः १० नाभ्यागमंस्तदा तत्र भागार्थं सर्वदेवताः। ततः कोपसमाविष्टो विश्वामित्रो महामुनिः ११ स्रुवमुद्यम्य सक्रोधस्त्रिशङ्कुमिदमब्रवीत्। पश्य मे तपसो वीर्यं स्वार्जितस्य नरेश्वर १२ एष त्वां स्वशरीरेण नयामि स्वर्गमोजसा। दुष्प्रापं स्वशरीरेण स्वर्गं गच्छ नरेश्वर १३ स्वार्जितं किंचिदप्यस्ति मया हि तपसः फलम्। राजंस्त्वं तेजसा तस्य सशरीरो दिवं व्रज १४ उक्तवाक्ये मुनौ तस्मिन्सशरीरो नरेश्वरः। दिव्यं जगाम काकुत्स्थ मुनीनां पश्यतां तदा १५ स्वर्गलोकं गतं दृष्ट्वा त्रिशङ्कुं पाकशासनः। सह सर्वैः सुरगणैरिदं वचनमब्रवीत् १६ त्रिशङ्को गच्छ भूयस्त्वं नासि स्वर्गकृतालयः। गुरुशापहतो मूढ पत भूमिमवाक्शिराः १७ एवमुक्तो महेन्द्रेण

---

आरंभ करा आणि आपण सर्वजण आपआपल्या अनुष्ठानाला लागा" ६, ७. ह्याप्रमाणें आपआपसांत बोलून त्या महर्षींनीं यज्ञकर्माला आरंभ केला. त्या यागामध्यें महातेजस्वी विश्वामित्र अध्वर्यु झाला ८ व मंत्रवेत्त्या ऋत्विजांनींही सर्व कर्में समंत्रक, यथाशास्त्र व यथाविधि केलीं ९. तदनंतर बऱ्याच वेळानें महातपस्वी विश्वामित्रानें हविर्भाग ग्रहण करण्याकरितां सर्व देवतांना आवाहन केलें १०; परंतु हविर्भागाकरितां एकही देवता तेथें येइना. तेव्हां, महामुनि विश्वामित्र कोपानें व्याप्त झाले ११ आणि स्रुवा हातांत घेऊन रागारागानें त्रिशंकूला ह्मणाले "हे राजा, स्वतः संपादन केलेल्या माझ्या तपाचें सामर्थ्य आतां पहा १२. हा मी आपल्या सामर्थ्याच्या योगानें स्वतःच्या शरीरासहवर्तमान तुला स्वर्गाला नेतों. हे राजा, स्वशरीरासहवर्तमान प्राप्त होण्याला दुर्घट असलेल्या स्वर्गाला तूं जा १३. हे राजा, तपाचें फल मीं कांहीं स्वसंपादित करून ठेविलें आहे. करितां, त्याच्या तेजानें तूं शरीरासहवर्तमान स्वर्गास गमन कर" १४. ह्याप्रमाणें विश्वामित्रमुनींनीं शब्द उच्चारिलें असतां, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, इतर मुनींचे समक्ष तो राजा शरीरासह स्वर्गाला गेला १५. असो. इकडे त्रिशंकु स्वर्गलोकाला आल्याचें अवलोकन करून इंद्र सर्व देवगणासहवर्तमान त्याला ह्मणाला १६ "हे त्रिशंको, तूं पुनरपि खालीं चालता हो. स्वर्गामध्यें रहाण्याची तुझी योग्यता नाहीं. अरे, गुरुशापानें तूं दग्ध झाला आहेस करितां, हे मूढा, अधोमुख होऊन तूं भूमीवर

त्रिशङ्कुरपतत्पुनः । विक्रोशमानस्त्राहीति विश्वामित्रं तपोधनम् १८ तच्छ्रुत्वा वचनं तस्य क्रोशमानस्य कौशिकः । रोषमाहारयत्तीव्रं तिष्ठ तिष्ठेति चाब्रवीत् १९ ऋषिमध्ये स तेजस्वी प्रजापतिरिवापरः । सृजन्दक्षिणमार्गस्थान्सप्तर्षीनपरान्पुनः २० नक्षत्रवंशमपरमसृजत्क्रोधमूर्छितः । दक्षिणां दिशमास्थाय ऋषिमध्ये महायशाः २१ सृष्ट्वा नक्षत्रवंशं च क्रोधेन कलुषीकृतः । अन्यमिन्द्रं करिष्यामि लोको वा स्यादनिन्द्रकः २२ दैवतान्यपि स क्रोधात्स्रष्टुं समुपचक्रमे । ततः परमसंभ्रान्ताः सर्षिसंघाः सुरासुराः २३ विश्वामित्रं महात्मानमूचुः सानुनयं वचः । अयं राजा महाभाग गुरुशापपरिक्षतः २४ सशरीरो दिवं यातुं नार्हत्येव तपोधन । तेषां तद्वचनं श्रुत्वा देवानां मुनिपुंगवः २५ अब्रवीत्सुमहद्वाक्यं कौशिकः सर्वदेवताः । सशरीरस्य भद्रं वस्त्रिशङ्कोरस्य भूपतेः २३ आरोहणं प्रतिज्ञातं नानृतं कर्तुमुत्सहे । स्वर्गोऽस्तु सशरीरस्य त्रिशङ्कोरस्य शाश्वतः २७

पड" १७. ह्याप्रमाणें महेंद्रानें सांगितलें असतां त्रिशंकु, तपोधन विश्वामित्रांना उद्देशून, "त्राहि त्राहि" ह्मणून आक्रोश करीत करीत पुनरपि खालीं आला १८. परंतु, आक्रोश करीत खालीं येणाऱ्या त्रिशंकूचे ते शब्द ऐकतांक्षणीं कुशिकवंशज विश्वामित्र अत्यंत क्रुद्ध झाला आणि " उभा रहा उभा रहा " असें त्याला ह्मणाला १९. नंतर प्रति ब्रह्मदेवच कीं काय अशा त्या ऋषींमध्यें असलेल्या तेजस्वी विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण करण्याच्या उद्देशानें दक्षिण मार्गस्थ असे दुसरे सप्तर्षिही उत्पन्न केले २०. क्रोधानें व्याप्त होऊन ऋषींमध्यें असलेल्या त्या महातपस्वी विश्वामित्रमुनीनें दक्षिण दिशेचें अवलंबन करून नक्षत्रमाला उत्पन्न केली २१ व नक्षत्रमाला उत्पन्न केल्यावरही क्रोधानें कलुषित झालेला तो विश्वामित्रमुनि " मी दुसरा इंद्र उत्पन्न करीन अथवा माझी सृष्टि इंद्ररहितच कां असेना? " असें ह्मणत ह्मणत २२ रागारागानें देवताही दुसऱ्या उत्पन्न करूं लागला. तेव्हां ऋषिगणासहवर्तमान देव व दैत्य पराकाष्ठेचे घाबरून गेले २३ आणि महात्म्या विश्वामित्राला सांत्वनपूर्वक ह्मणाले " हे महाभाग्यवान् तपोधन, गुरुशापानें हा राजा दग्ध झाला असल्यामुळें शरीरासहवर्तमान स्वर्गाप्रत गमन करण्यास हा योग्यच नाहीं ". हें त्या देवांचें भाषण श्रवण करून कुशिकवंशज मुनिश्रेष्ठ विश्वामित्रानें त्या सर्व देवतांना फारच मोठ्या निश्चयाचे शब्द सांगितले. ( तो ह्मणाला ) तुमचें कल्याण असो. शरीरासहवर्तमान ह्या त्रिशंकुराजाच्या २४,२५,२६ स्वर्गारोहणाची जी मीं प्रतिज्ञा केली आहे ती असत्य करण्याची माझी इच्छा नाहीं. करितां, शरीरासहवर्तमान ह्या त्रिशंकुराजाला अक्षय स्वर्गप्राप्ति

नक्षत्राणि च सर्वाणि मामकानि ध्रुवाण्यथ । यावल्लोका धरिष्यन्ति तिष्ठन्त्वेतानि सर्वशः २८ यत्कृतानि सुराः सर्वे तदनुज्ञातुमर्हथ । एवमुक्ताः सुराः सर्वे प्रत्यूचुर्मुनिपुंगवम् २९ एवं भवतु भद्रं ते तिष्ठन्त्वेतानि सर्वशः । गगने तान्यनेकानि वैश्वानरपथाद्बहिः ३० नक्षत्राणि मुनिश्रेष्ठ तेषु ज्योतिःषु जाज्वलन् । अवाक्शिरास्त्रिशङ्कुश्च तिष्ठत्वमरसंनिभः ३१ अनुयास्यन्ति चैतानि ज्योतींषि नृपसत्तमम् । कृतार्थं कीर्तिमन्तं च स्वर्गलोकगतं यथा ३२ विश्वामित्रस्तु धर्मात्मा सर्वदेवैरभिष्टुतः । ऋषिमध्ये महातेजा बाढमित्येव देवताः ३३ ततो देवा महात्मानो ऋषयश्च तपोधनाः । जग्मुर्यथागतं सर्वे यज्ञस्यान्ते नरोत्तम ३४ [१८२२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

विश्वामित्रो महातेजाः प्रस्थितान्वीक्ष्य तानृषीन् । अब्रवीन्नरशार्दूल सर्वांस्तान्वनवासिनः १ महाविघ्नः प्रवृत्तोयं दक्षिणामास्थितो दिशम् । दिशमन्यां प्रपत्स्यामस्तत्र तप्स्यामहे तपः २ पश्चिमायां विशालायां

---

झालीच पाहिजे २७ आणि हीं माझीं सर्व नक्षत्रें त्रैलोक्य कायम राहीपर्यंत सर्व प्रकारें कायम राहिलीं पाहिजेत २८. सारांश, हे देवहो, ज्या त्रिशंकुराजाकरितां हीं मीं उत्पन्न केलीं आहेत त्याकरितां तीं कायम राहण्याविषयीं तुह्मा सर्वांची अनुज्ञा असावी ". ह्याप्रमाणें विश्वामित्रानें सांगितलें असतां सर्व देव त्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्राला ह्मणाले २९ " असें होईल. तुझें कल्याण असो. वैश्वानरपथसंज्ञक ज्योतिश्चक्रमार्गाचे बाहेर आकाशामध्यें हीं तुझीं नक्षत्रें सर्व प्रकारें कायम रहातील ३० व, हे मुनिश्रेष्ठ, त्या नक्षत्रामध्यें हा देवतुल्य त्रिशंकु अधोमुख होऊन झळकत राहील ३१. इतकेंच नव्हे परंतु, हीं तुझीं नक्षत्रें स्वर्गलोकामत प्राप्त झाल्याप्रमाणें कृतार्थ झालेल्या ह्या कीर्तिमान् नृपश्रेष्ठ त्रिशंकूचीं अनुयायीं होतील " ३२. असें सांगितल्यावर धर्मात्म्या विश्वामित्राची सर्व देवांनीं ऋषींमध्यें प्रशंसा केली असतां " ठीक आहे " ह्मणून त्या महातेजस्वी विश्वामित्रानें देवतांना सांगितलें ३३. तदनंतर यज्ञ समाप्त झाल्यावर, हे पुरुषश्रेष्ठा रामा, महात्मे देव व तपोधन ऋषि हे सर्व आल्या मार्गानें परत गेले ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६० ॥

ते ऋषि चालूं लागलेले पाहून, हे पुरुषश्रेष्ठा रामा, महातेजस्वी विश्वामित्र तपोवनांत रहाणाऱ्या त्या सर्वांना ह्मणाला १ " अहो, दक्षिणदिशा व्याप्त करून राहिलेला हा त्रिशंकु एक आपल्या तपाला मोटें विघ्नच होऊन बसला आहे. ( ह्यामुळें आतां

पुष्करेषु महात्मनः । सुखं तपश्चरिष्यामः सुखं तद्धि तपोवनम् ३ एवमुक्त्वा महातेजाः पुष्करेषु महामुनिः । तप उग्रं दुराधर्षं तेपे मूलफलाशनः ४ एतस्मिन्नेव काले तु अयोध्याधिपतिर्महान् । अम्बरीष इति ख्यातो यष्टुं समुपचक्रमे ५ तस्य वै यजमानस्य पशुमिन्द्रो जहार ह । प्रनष्टे तु पशौ विप्रो राजानमिदमब्रवीत् ६ पशुरभ्याहृतो राजन्प्रनष्टस्तव दुर्नयात् । अरक्षितारं राजानं घ्नन्ति दोषा नरेश्वर ७ प्रायश्चित्तं महद्ध्येतन्नरं वा पुरुषर्षभ । आनयस्व पशुं शीघ्रं यावत्कर्म प्रवर्तते ८ उपाध्यायवचः श्रुत्वा स राजा पुरुषर्षभः । अन्वियेष महाबुद्धिः पशुं गोभिः सहस्रशः ९ देशाञ्जनपदांस्तांस्तान्नगराणि वनानि च । आश्रमाणि च पुण्यानि मार्गमाणो महीपतिः १० स पुत्रसहितं तात सभार्यं रघुनन्दन । भृगुतुङ्गे समासीनमृचीकं संददर्श ह ११ तमुवाच महातेजाः प्रणम्याभिप्रसाद्य च । महर्षिं तपसा दीप्तं राजर्षिरमितप्रभः १२ पृष्ट्वा सर्वत्र कुशलमृचीकं तमिदं वचः ।

---

हा प्रदेश तपश्चर्येला योग्य नाहीं ) करितां, आपण दुसऱ्या दिशेला जाऊं आणि तेथें तपश्चर्या करूं २. हे महात्महो, ह्या अफाट पश्चिम दिशेस पुष्कर तीर्थाचे तीरीं आपण सुखानें तपश्चर्या करूं. कारण, तें तपोवन सुखावह आहे " ३. ह्याप्रमाणें त्यांना सांगितल्यावर तो महातेजस्वी महामुनि विश्वामित्र फलमूलांवर उपजीविका करून इतरांना अशक्य असें घोर तप करूं लागला ४. असो. ह्याचवेळीं अंबरीष ह्मणून प्रसिद्ध असलेल्या महात्म्या अयोध्याधिपतीनें यज्ञाला आरंभ केला होता ५. त्याचा यज्ञ चालला असतांना इंद्रानें पशु हरण करून नेला. तेव्हां पशु दिसेनासा झाल्यावर पुरोहित राजाला ह्मणाला ६ " हे राजा, तुझ्या पातकामुळें पशु कोणीं हरण केला आहे तो दिसत नाहीं. हे प्रजाधिपते, प्रजांचें परिपालन न करणाऱ्या राजाला दोष लागत असतात ७. हे पुरुषश्रेष्ठा, अरे ही गोष्ट ह्मणजे मोठेंच प्रायश्चित्त पाडणारी आहे. ह्यास्तव, ह्या पशूच्या ऐवजीं नरपशु तरी सत्वर घेऊन ये; ह्मणजे अनुष्ठान सुरू होईल" ८. हें उपाध्यायाचें भाषण श्रवण करून तो पुरुषश्रेष्ठ महाविचारी अंबरीष राजा ( गेलेल्या पशूचे अभावीं द्रव्य घेऊन कोणीं आपला पुत्र देत असल्यास पहावा एतदर्थ) हजारों गाई बरोबर घेऊन नरपशु मिळविण्याकरितां निघाला ९. तो भूपति नानाप्रकारचे देश, नगरें, वनें आणि पवित्र आश्रम धुंडीत चालला असतां १०, हे रघुनंदना रामा, भृगुतुंगपर्वतावर पुत्र व भार्या ह्यांसहवर्तमान बसलेल्या ऋचीक मुनींना त्यानें अवलोकन केलें ११. तेव्हां, अतुल प्रभेनें युक्त असलेला तो महातेजस्वी अंबरीष राजर्षि तपानें देदीप्यमान असलेल्या ऋचीक महर्षींना प्रणाम करून सर्व प्रकारें कुशल

गवां शतसहस्रेण विक्रीणीषे सुतं यदि १३ पशोरर्थे महाभाग कृतकृत्योस्मि भार्गव । सर्वे परिगता देशा यज्ञियं न लभे पशुम् १४ दातुमर्हसि मूल्येन सुतमेकमितो मम । एवमुक्तो महातेजा ऋचीकस्त्वब्रवीद्वचः १५ नाहं ज्येष्ठं नरश्रेष्ठ विक्रीणीयां कथंचन । ऋचीकस्य वचः श्रुत्वा तेषां माता महात्मनाम् १६ उवाच नरशार्दूलमम्बरीषमिदं वचः । अविक्रेयं सुतं ज्येष्ठं भगवानाह भार्गवः १७ ममापि दयितं विद्धि कनिष्ठं शुनकं प्रभो । तस्मात्कनीयसं पुत्रं न दास्ये तव पार्थिव १८ प्रायेण हि नरश्रेष्ठ ज्येष्ठाः पितृषु वल्लभाः । मातॄणां च कनीयांसस्तस्माद्रक्ष्ये कनीयसम् १९ उक्तवाक्ये मुनौ तस्मिन्मुनिपत्न्यां तथैव च । शुनःशेपः स्वयं राम मध्यमो वाक्यमब्रवीत् २० पिता ज्येष्ठमविक्रेयं माता चाह कनीयसम् । विक्रेयं मध्यमं मन्ये राजपुत्र नयस्व माम् २१ अथ राजा महाबाहो वाक्यान्ते ब्रह्मवादिनः । हिरण्यस्य सुवर्णस्य कोटिभी रत्नराशिभिः २२ गवां शतसहस्रेण शुनःशेपं नरेश्वरः । गृहीत्वा परमप्रीतो

---

प्रश्न विचारिल्यावर त्यांना प्रसन्न करून घेऊन ह्मणाला " हे भगवन्, हे भार्गव, एक लक्ष गाई घेऊन जर आपण पशूकरितां आपला पुत्र विकत देत असाल तर मी कृतकृत्य होईन. मीं सर्व देश धुंडिले; परंतु नाहींसा झालेला यज्ञिय पशु मला मिळत नाहीं १२, १३, १४. ह्यास्तव, किंमत घेऊन आपण ह्या पुत्रांपैकीं एक पुत्र मला द्यावा ". ह्याप्रमाणें अंबरीषराजानें प्रार्थना केली असतां महातेजस्वी ऋचीक मुनि त्याला ह्मणाले १५ " हे पुरुषश्रेष्ठा, कांहीं झालें तरी मी ज्येष्ठ पुत्र विकणार नाहीं ". हें ऋचीक मुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्या महात्म्या पुत्रांची माता १६ पुरुषश्रेष्ठ अंबरीषाला ह्मणाली " भगवान् भार्गव मुनींनीं ज्येष्ठ पुत्र विकावयाचा नाहीं ह्मणून सांगितलें १७ आणि, हे प्रभो, हा कनिष्ठ पुत्र शुनक तर माझा आवडता आहे असें तूं समज. तस्मात्, हे राजा, मी कनिष्ठ पुत्र तुला देणार नाहीं १८. हे पुरुषश्रेष्ठा, प्रायः ज्येष्ठ पुत्र पित्यांना प्रिय असतात आणि कनिष्ठ पुत्र मातांना प्रिय असतात. तस्मात्, मी कनिष्ठ पुत्र राखून ठेवणार "१९. ह्याप्रमाणें ऋचीक मुनींनीं व त्यांच्या पत्नीनें सांगितलें असतां, हे रामा, मधला पुत्र शुनःशेप स्वतःच ह्मणाला २० " ज्येष्ठ पुत्र विकावयाचा नाहीं ह्मणून पिता ह्मणत आहे आणि कनिष्ठ पुत्र विकावयाचा नाहीं ह्मणून माता ह्मणत आहे. ह्यावरून मधला पुत्र विकण्याला हरकत नाहीं असें मला वाटतें. करितां, हे राजपुत्रा, तूं मला ने " २१. ह्याप्रमाणें त्या ब्रह्मवेत्त्या शुनःशेपानें सांगितल्यावर, हे महापराक्रमी रामा, उत्तम प्रभेनें युक्त असलेलें क्रोडोगणती सुवर्ण, रत्नांच्या राशि २२

जगाम रघुनन्दन २३ अम्बरीषस्तु राजर्षी रथमारोप्य सत्वरः । शुनःशेपं महातेजा जगामाशु महायशाः २४ [१८४६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकषष्टितमः सर्गः ॥ ६१ ॥

शुनःशेपं नरश्रेष्ठ गृहीत्वा तु महायशाः । व्यश्रमत्पुष्करे राजा मध्याह्ने रघुनन्दन १ तस्य विश्रममाणस्य शुनःशेपो महायशाः । पुष्करं ज्येष्ठमागम्य मिश्वामित्रं ददर्श ह २ तप्यन्तमृषिभिः सार्धं मातुलं परमातुरः । विषण्णवदनो दीनस्तृष्णया च श्रमेण च ३ पपाताङ्के मुने राम वाक्यं चेदमुवाच ह । न मेऽस्ति माता न पिता ज्ञातयो बान्धवाः कुतः ४ त्रातुमर्हसि मां सौम्य धर्मेण मुनिपुंगव । त्राता त्वं हि नरश्रेष्ठ सर्वेषां त्वं हि भावनः ५ राजा च कृतकार्यः स्यादहं दीर्घायुरव्ययः । स्वर्गलोकमुपाश्नीयां तपस्तप्त्वा ह्यनुत्तमम् ६ स मे नाथो ह्यनाथस्य भव भव्येन चेतसा । पितेव पुत्रं धर्मात्मंस्त्रातुमर्हसि किल्बिषात् ७ तस्य तद्वचनं श्रुत्वा विश्वामित्रो महा-

---

व एक लक्ष गाई शुनःशेपाकरितां अंबरीषराजानें ( ऋचीकमुनींना ) दिल्या आणि, हे रघुनंदना रामा, अत्यंत प्रसन्न झालेला तो राजा त्याला घेऊन गेला २३. सारांश, तो महातेजस्वी व महायशस्वी अंबरीष राजर्षि शुनःशेपाला रथावर घालून विलंब न करितां सत्वर चालता झाला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

हे रघुनंदना पुरुषश्रेष्ठा रामा, शुनःशेपाला घेऊन निघालेल्या त्या महायशस्वी अंबरीष राजानें पुष्करतीर्थासमीप विश्रांति घेतली १. तीर्थामध्यें श्रेष्ठ अशा पुष्कर तीर्थासमीप येऊन तो अंबरीषराजा विश्रांतीकरितां उतरूं लागला असतां अत्यंत दुःखित झालेल्या महायशस्वी शुनःशेपानें तेथें ऋषींसहवर्तमान तपश्चर्या करीत असलेल्या आपल्या मातुल विश्वामित्राली अवलोकन केलें आणि तृषेनें व श्रमानें अगदीं म्लानवदन होऊन दीन झालेला तो शुनःशेप २, ३, हे रामा, विश्वामित्राच्या मांडीवर पडला आणि, त्याला ह्मणाला " हे मुने, मला माता नाहीं व पिताही नाहीं; तेव्हां नातेवाईक आणि बांधव कोठून असणार ? ४. हे सौम्य, हे मुनिश्रेष्ठ, धर्मानें आपण माझें रक्षण करा. हे पुरुषश्रेष्ठा, माझा रक्षक तूंच असून शरण आलेल्या सर्वांचें पालन करणाराही तूंच आहेस ५. राजा कृतकृत्य व्हावा आणि मीही अक्षय्य दीर्घायु राहून व उत्कृष्ट तपश्चर्या करून स्वर्गलोकाप्रत जावें ६. ह्यास्तव, उदार अंतःकरणानें आपण मज अनाथाचें नाथ व्हा आणि, हे धर्मनिष्ठ, पुत्राचें रक्षण करणाऱ्या पित्याप्रमाणें आपण माझें ह्या संकटापासून रक्षण करा " ७. हें त्याचें भाषण श्रवण करून महातपस्वी

तपः । सान्त्वयित्वा बहुविधं पुत्रानिदमुवाच ह ८ यत्कृते पितरः पुत्राञ्जनयन्ति शुभार्थिनः । परलोकहितार्थाय तस्य कालोयमागतः ९ अयं मुनिसुतो बालो मत्तः शरणमिच्छति । अस्य जीवितमात्रेण प्रियं कुरुत पुत्रकाः १० सर्वे सुकृतकर्माणः सर्वे धर्मपरायणाः । पशुभूता नरेन्द्रस्य तृप्तिमग्नेः प्रयच्छत ११ नाथवांश्च शुनःशेपो यज्ञश्चाविघ्नतो भवेत् । देवतास्तर्पिताश्च स्युर्मम चापि कृतं वचः १२ मुनेस्तद्वचनं श्रुत्वा मधुच्छन्दादयः सुताः । साभिमानं नरश्रेष्ठ सलीलमिदमब्रुवन् १३ कथमात्मसुतान्हित्वा त्रायसेन्यसुतं विभो । अकार्यमिव पश्यामः श्वमांसमिव भोजने १४ तेषां तद्वचनं श्रुत्वा पुत्राणां मुनिपुंगवः । क्रोधसंरक्तनयनो व्याहर्तुमुपचक्रमे १५ निःसाध्वसमिदं प्रोक्तं धर्मादपि विगर्हितम् । अतिक्रम्य तु मद्वाक्यं दारुणं रोमहर्षणम् १६ श्वमांसभोजिनः सर्वे वासिष्ठा इव जातिषु । पूर्णं वर्षसहस्रं तु पृथिव्यामनुवत्स्यथ १७ कृत्वा शापसमायुक्तान्पुत्रान्मुनिवर-

---

विश्वामित्रानें त्याचें नानाप्रकारें सांत्वन केलें आणि आपल्या पुत्रांना ते ह्मणाले ८ " ज्याकरितां ह्मणजे ज्या पारलौकिकहितसंपादनाकरितां शुभेच्छु पितर पुत्र उत्पन्न करीत असतात त्याचा हा काल प्राप्त झाला आहे ९. हा बालक ऋषिपुत्र माझ्या हातून रक्षणाची इच्छा करीत आहे. ह्यास्तव, हे पुत्रहो, जीवदान देऊन तुह्मी ह्याचा मनोरथ शेवटास न्या १०. तुह्मी सर्वही सत्कर्म करणारे असून सर्वही धर्मनिष्ठ आहांत. तस्मात्, तुह्मी पशु बनून अंबरीषराजाचा अग्नि तृप्त करा ११. ह्मणजे शुनःशेप सनाथ होईल, यज्ञ निर्विघ्नपणें पार पडेल, देवता तृप्त होतील आणि माझीही आज्ञा तुह्मी पाळल्याप्रमाणें होईल " १२. हे पुरुष श्रेष्ठा रामा, हें विश्वामित्रमुनींचें भाषण श्रवण केल्यावर त्याचे मधुच्छंदप्रभृति पुत्र अभिमानानें हंसत हंसत त्याला ह्मणाले १३ " हे प्रभो, तूं आपल्या पुत्रांना खर्चीं घालून दुसऱ्याच्या पुत्राचें कसें रक्षण करीत आहेस ? हें तुझें करणें भोजनामध्यें श्वानाचें मांस स्वीकारिल्याप्रमाणें आह्मांला अयोग्य दिसत आहे " १४. ह्याप्रमाणें त्या पुत्रांचें भाषण श्रवण केल्यानंतर मुनिश्रेष्ठ विश्वामित्र क्रोधानें नेत्र आरक्तवर्ण करून त्यांना बोलूं लागला १५ " तुह्मीं जें हें माझ्या आज्ञेचें उल्लंघन करून अंगावर कांटा येण्यासारिखें भयंकर भाषण केलें आहेत तें माझें भय न बाळगितां केलें आहेत व धर्मदृष्टीनेंही हें तुमचें भाषण निंद्य आहे १६. ह्यास्तव, तुह्मीं सर्व श्वानमांस भक्षण करून मुष्टिक जातीमध्यें रहाल आणि वसिष्ठपुत्रांप्रमाणें एक हजार वर्षें पूर्ण होईपर्यंत ह्या पृथ्वीवर वास्तव्य कराल " १७. ह्याप्रमाणें पुत्रांना शाप दिल्यावर आणि सर्व दुःखनाशक रक्षामंत्रानें त्या शुनःशेपाचें रक्षण केल्यावर

स्तदा । शुनःशेपमुवाचार्तं कृत्वा रक्षां निरामयम् १८ पवित्रपाशैराबद्धो रक्तमाल्यानुलेपनः । वैष्णवं यूपमासाद्य वाग्भिरग्निमुदाहर १९ इमे च गाथे द्वे दिव्ये गायथा मुनिपुत्रक । अम्बरीषस्य यज्ञेस्मिंस्ततः सिद्धिमवाप्स्यसि २० शुनःशेपो गृहीत्वा ते द्वे गाथे सुसमाहितः । त्वरया राजसिंहं तमम्बरीषमुवाच ह २१ राजसिंहमहाबुद्धे शीघ्रं गच्छावहे वयम् । निवर्तयस्व राजेन्द्र दीक्षां च समुपाहर २२ तद्वाक्यमृषिपुत्रस्य श्रुत्वा हर्षसमन्वितः । जगाम नृपतिः शीघ्रं यज्ञवाटमतन्द्रितः २३ सदस्यानुमते राजन्पवित्रकृतलक्षणम् । पशुं रक्ताम्बरं कृत्वा यूपे तं समबन्धयत् २४ स बद्धो वाग्भिरग्र्याभिरभितुष्टाव वै सुरौ । इन्द्रमिन्द्रानुजं चैव यथावन्मुनिपुत्रकः २५ ततः प्रीतः सहस्राक्षो रहस्यस्तुतितोषितः । दीर्घमायुस्तदा प्रादाच्छुनःशेपाय वासवः २६ स च राजा नरश्रेष्ठ यज्ञस्य च समाप्तवान् । फलं बहुगुणं राम सहस्राक्षप्रसादजम् २७ विश्वामित्रोपि धर्मात्मा भूयस्तेपे महातपः । पुष्करेषु नरश्रेष्ठ दश वर्षशतानि च २८ [१८७४] इति

---

तो मुनिश्रेष्ठ विश्वामित्र त्या दुःखिताला ह्मणाला १८ "दर्भरज्जूंनीं बद्ध आणि रक्तपुष्पें व रक्तगंध ह्यांनीं युक्त होऊन तूं विष्णुदेवत्य यूपापाशीं आलास ह्मणजे मंत्रांनीं अग्नीचें स्तवन कर १९. हे ऋषिपुत्रा, ह्या अंबरीषाच्या यज्ञामध्यें तूं हे दोन गाथामंत्र ह्मण; ह्मणजे तुझा मनोरथ पूर्ण होईल " २०. ह्याप्रमाणें विश्वामित्रानें सांगितल्यावर स्वस्थचित्त होऊन शुनःशेपानें त्या दोन गाथामंत्रांचा स्वीकार केला आणि नंतर त्वरेनें त्या नृपश्रेष्ठ अंबरीषापाशीं येऊन तो ह्मणाला २१ " हे महाबुद्धिमान् नृपश्रेष्ठा, आतां आपण सत्वर जाऊं. हे राजेंद्रा, तूं यज्ञमंडपाकडे चल आणि यज्ञदीक्षा शेवटास ने " २२. हें त्या ऋषिपुत्राचें भाषण श्रवण केल्यावर अंबरीष राजाला आनंद झाला व तो अगदीं दक्ष राहून सत्वर यज्ञमंडपाकडे गेला २३. तदनंतर सदस्यांच्या अनुमतानें ज्याचे ठिकाणीं पवित्र अशा दर्भरज्जूंनीं चिन्ह केलेलें आहे व ज्याला रक्तवस्त्रांनीं वेष्टिलेलें आहे अशा त्या शुनःशेपाला पशु बनवून अंबरीष राजानें यूपाशीं ( ह्मणजे यज्ञस्तंभाशीं ) बांधिलें २४. तदनंतर यूपाशीं बद्ध झालेल्या त्या ऋषिपुत्र शुनःशेपानें इंद्र आणि विष्णु ह्या देवांची उत्कृष्ट मंत्रांनीं यथायोग्य स्तुति केली २५. तेव्हां गुप्त स्तुतीच्या योगानें इंद्र संतुष्ट झाला व शुनःशेपावर प्रसन्न होऊन त्या इंद्रानें त्याला दीर्घायुष्य दिलें २६ आणि, हे पुरुषश्रेष्ठा रामा, इंद्राच्या कृपेनें त्या अंबरीष राजालाही त्या यज्ञाचें फल पुष्कळपटीनें प्राप्त झालें २७. असो. तदनंतर, हे पुरुषश्रेष्ठा रामा, महातपस्वी धर्मात्म्या विश्वामित्रानेंही पुष्करतीर्थावर आणखी एक हजार

श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥६२॥

पूर्णे वर्षसहस्रे तु व्रतस्नातं महामुनिम् । अभ्यगच्छन्सुराः सर्वे तपःफलचिकीर्षवः १ अब्रवीत्सुमहातेजा ब्रह्मा सुरुचिरं वचः । ऋषिस्त्वमसि भद्रं ते स्वार्जितैः कर्मभिः शुभैः २ तमेवमुक्त्वा देवेशस्त्रिदिवं पुनरभ्यगात् । विश्वामित्रो महातेजा भूयस्तेपे महत्तपः ३ ततः कालेन महता मेनका परमाप्सरा । पुष्करेषु नरश्रेष्ठ स्नातुं समुपचक्रमे ४ तां ददर्श महातेजा मेनकां कुशिकात्मजः । रूपेणाप्रतिमां तत्र विद्युतं जलदे यथा ५ कन्दर्पदर्पवशगो मुनिस्तामिदमब्रवीत् । अप्सरः स्वागतं तेऽस्तु वस चेह ममाश्रमे ६ अनुगृह्णीष्व भद्रं ते मदनेन विमोहितम् । इत्युक्ता सा वरारोहा तत्रावासमथाकरोत् ७ तपसो हि महाविघ्नो विश्वामित्रमुपागमत् । तस्यां वसन्त्यां वर्षाणि पञ्च पञ्च च राघव ८ विश्वामित्राश्रमे सौम्ये सुखेन व्यतिचक्रमुः । अथ काले गते तस्मिन्विश्वामित्रो महामुनिः ९ सव्रीड इव संवृत्तश्चिन्ताशोकपरायणः । बुद्धिर्मुनेः समुत्पन्ना

---

वर्षेपर्यंत तपश्चर्या केली २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

पुष्करतीर्थाचे ठिकाणीं विश्वामित्राची तब्बल हजार वर्षें तपश्चर्या झाल्यावर तपोव्रत समाप्त करून स्नान केलेल्या महामुनि विश्वामित्राकडे सर्व देव तपाचें फल देण्याकरितां आले १. तेव्हां अत्यंत महातेजस्वी ब्रह्मदेव फारच मधुर वाणीनें विश्वामित्राला ह्मणाले " स्वसंपादित अशा पुण्यकर्मांच्या योगानें तूं ऋषि झाला आहेस; तुझें कल्याण असो " २. ह्याप्रकारें त्याला सांगून सुराधिपति ब्रह्मदेव पुनरपि स्वर्गास गेल्यावर महातेजस्वी विश्वामित्रानें पुनरपि मोठी तपश्चर्या आरंभिली ३. ह्याप्रमाणें त्याची तपश्चर्या सुरू होऊन बराच काल लोटल्यावर, हे पुरुषश्रेष्ठा रामा, मेनकानामक श्रेष्ठ अप्सरा पुष्कर तीर्थावर येऊन स्नान करूं लागली ४. तेव्हां मेघांतील विद्युल्लताच कीं काय अशा प्रकारें रूपानें अप्रतिम असलेल्या त्या मेनकेला महातेजस्वी कुशिकवंशज विश्वामित्रानें अवलोकन केलें ५ आणि मदनाच्या कचाट्यांत सांपडून तो मुनि तिला ह्मणाला " हे अप्सरे, तुझें स्वागत असो; तूं येथें माझ्या आश्रमामध्यें रहा ६. तुझें कल्याण असो; मदनानें मोहित झालेल्या मजवर तूं अनुग्रह कर". ह्याप्रमाणें विश्वामित्रानें सांगितलें असतां ती सुंदरी मेनका तेथें राहिली ७ व तें एक तपश्चर्येचें मोठें विघ्नच विश्वामित्राला प्राप्त झालें. हे रघुवंशजा रामा, विश्वामित्राच्या शांत आश्रमामध्यें ती वास्तव्य करूं लागली असतां विश्वामित्राचीं दहा वर्षें सुखानें गेलीं. तेव्हां तिच्या समागमामध्यें

मामर्षा रघुनन्दन १० सर्वं सुराणां कर्मैतत्तपोपहरणं महत् । अहोरात्रापदेशेन गताः संवत्सरा दश ११ काममोहाभिभूतस्य विघ्नोयं प्रत्युपस्थितः । स निःश्वसन्मुनिवरः पश्चात्तापेन दुःखितः १२ भीतामप्सरसं दृष्ट्वा वेपन्तीं प्राञ्जलिं स्थिताम् । मेनकां मधुरैर्वाक्यैर्विसृज्य कुशिकात्मजः १३ उत्तरं पर्वतं राम विश्वामित्रो जगाम ह । स कृत्वा नैष्ठिकीं बुद्धिं जेतुकामो महायशाः १४ कौशिकीतीरमासाद्य तपस्तेपे दुरासदम् । तस्य वर्षसहस्राणि घोरं तप उपासतः १५ उत्तरे पर्वते राम देवतानामभूद्भयम् । अमन्त्रयन्समागम्य सर्वे सर्षिगणाः सुराः १६ महर्षिशब्दं लभतां साध्वयं कुशिकात्मजः । देवतानां वचः श्रुत्वा सर्वलोकपितामहः १७ अब्रवीन्मधुरं वाक्यं विश्वामित्रं तपोधनम् । महर्षे स्वागतं वत्स तपसोग्रेण तोषितः १८ महत्त्वमृषिमुख्यत्वं ददामि तव कौशिक । ब्रह्मणस्तु वचः श्रुत्वा विश्वामित्रस्तपोधनः १९ प्राञ्जलिः प्रणतो भूत्वा प्रत्युवाच पिता-

---

तितका काल लोटल्यावर महामुनि विश्वामित्र ८, ९ चिंता व शोक ह्यांनीं अगदीं व्याप्त होऊन लज्जित झाल्यासारखा झाला आणि, हे रघुनंदना रामा, क्रुद्ध झालेल्या त्या मुनीच्या मनामध्यें असा विचार आला कीं १० "हें सर्व तपोनाशक महाकर्म देवांचेंच आहे. अरे, काममोहानें मी ग्रस्त झाल्यामुळें दहा वर्षे एका दिवसाप्रमाणें निघून गेलीं. अरे, ही अप्सरा हें एक विघ्नच उपस्थित झालें आहे. ह्याप्रमाणें उस्मारत असलेला तो मुनिश्रेष्ठ विश्वामित्र पश्चात्तापानें अतिशय दुःखित झाला आणि मेनका अप्सरा भयभीत होऊन कांपत कांपत हात जोडून उभी राहिली आहे असें अवलोकन केल्यावर मधुर शब्दांनीं तिला निरोप देऊन तो कुशिकवंशज ११, १२, १३ विश्वामित्र उत्तरपर्वतावर चालता झाला. हे रामा, नंतर काम जिंकण्याकरितां कडकडीत ब्रह्मचर्य पाळण्याविषयीं निश्चय करून तो महायशस्वी विश्वामित्र १४ कौशिकी नदीचे तीरीं जाऊन इतरांना होण्यास अशक्य असें तप करूं लागला. ह्याप्रमाणें तो हजारों वर्षे उत्तर पर्वतावर घोर तपश्चर्या करूं लागला असतां देवतांना भय उत्पन्न झालें आणि ऋषिगणांसहवर्तमान त्या सर्व देवांनीं एकत्र जुळून "ह्या कुशिकवंशजाला महर्षि ही पदवी खुशाल प्राप्त होवो " ह्मणून ठरविलें. तेव्हां देवांचें भाषण श्रवण करून सर्व लोकांचे उत्पादक ब्रह्मदेव १५, १६, १७ तपोधन विश्वामित्राला मधुर वाणीनें ह्मणाले "हे महर्षे, तुझें स्वागत असो. हे वत्सा, तुझ्या उग्र तपश्चर्येनें मी संतुष्ट झालों आहें १८. हे कुशिकवंशजा, मी तुला महत्त्व आणि ऋषिमुख्यत्व ( ह्मणजे श्रेष्ठ महर्षि ) ही पदवी देतों ". हे ब्रह्मदेवाचें भाषण श्रवण केल्यावर

महम् । ब्रह्मर्षिशब्दमतुलं स्वार्जितैः कर्मभिः शुभैः २० यदि मे भगवानाह ततोहं विजितेन्द्रियः । तमुवाच ततो ब्रह्मा न तावत्त्वं जितेन्द्रियः २१ यतस्व मुनिशार्दूल इत्युक्त्वा त्रिदिवं गतः । विप्रस्थितेषु देवेषु विश्वामित्रो महामुनिः २२ ऊर्ध्वबाहुर्निरालम्बो वायुभक्षस्तपश्चरन् । घर्मे पञ्चतपा भूत्वा वर्षास्वाकाशसंश्रयः २३ शिशिरे सलिलेशायी रात्र्यहानि तपोधनः । एवं वर्षसहस्रं हि तपो घोरमुपागमत् २४ तस्मिन्संतप्यमाने तु विश्वामित्रे महामुनौ । संतापः सुमहानासीत्सुराणां वासवस्य च २५ रम्भामप्सरसं शक्रः सर्वैः सह मरुद्गणैः । उवाचात्महितं वाक्यमहितं कौशिकस्य च २६ [ १९०० ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

सुरकार्यमिदं रम्भे कर्तव्यं सुमहत्त्वया । लोभनं कौशिकस्येह काममोहसमन्वितम् १ तथोक्ता साप्सरा राम सहस्राक्षेण धीमता । व्रीडिता

---

तपोधन विश्वामित्रानें १९ हात जोडून ब्रह्मदेवाला प्रणाम केला आणि तो त्याला ह्मणाला " ज्याअर्थी स्वसंपादित पुण्यकर्मांच्या योगानें आपण मला ब्रह्मर्षि ही अनुपम पदवी प्राप्त झाली असें ह्मणत नाहीं त्याअर्थी मी जितेंद्रिय नाहीं कीं काय " ? ह्याप्रमाणें विश्वामित्रानें विचारिलें असतां ब्रह्मदेवांनीं त्याला उत्तर दिलें " तूं अद्यापि जितेंद्रिय बनला नाहींस २०, २१. हे मुनिश्रेष्ठा. जितेंद्रिय बनण्याचा तूं प्रयत्न कर ". ह्याप्रमाणें ब्रह्मदेवांनीं सांगितल्यानंतर देव चालते झाले असतां महामुनि विश्वामित्र २२ कशाचाही आधार न धरितां हात वर करून आणि वायु भक्षण करून तपश्चर्या करूं लागला. ग्रीष्मऋतूमध्यें पंचाग्निसाधन करून तो तपश्चर्या करूं लागला; पर्जन्यकालीं केवळ आकाशाचेंच अवलंबन करून ( ह्मणजे वस्त्र प्रावरणाची पर्वा न करितां उघड्या जागेमध्यें बसून ) तो तपश्चर्या करूं लागला २३ आणि शीतकालामध्यें तर रात्रंदिवस उदकांत पडून तो तपोधन विश्वामित्र तप करूं लागला. ह्याप्रमाणें घोर तपश्चर्या करितां करितां एक हजार वर्षें लोटलीं २४. तरी तो महामुनि विश्वामित्र तप करीतच होता. तेव्हां देव व देवाधिपति इंद्र ह्यांना अतिशय संताप झाला २५ आणि सर्व मरुद्गणासहवर्तमान इंद्र कुशिकवंशज विश्वामित्राच्या अहिताचें आणि स्वतःच्या हिताचें असें भाषण रंभानामक अप्सरेशीं करूं लागला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥६३॥

( इंद्र ह्मणतो ) " हे रंभे, कुशिकवंशज विश्वामित्राला लुब्ध करून विषयमोहानें युक्त करणें हें फारच मोठें देवकार्य तुला केलें पाहिजे " १. हे रामा, ह्याप्रमाणें

प्राञ्जलिर्वाक्यं प्रत्युवाच सुरेश्वरम् २ अयं सुरपते घोरो विश्वामित्रो महामुनिः। क्रोधमुत्स्रक्ष्यते घोरं मयि देव न संशयः ३ ततो हि मे भयं देव प्रसादं कर्तुमर्हसि। एवमुक्तस्तया राम सभयं भीतया तदा ४ तामुवाच सहस्राक्षो वेपमानां कृताञ्जलिम्। मा भैषी रम्भे भद्रं ते कुरुष्व मम शासनम् ५ कोकिलो हृदयग्राही माधवे रुचिरद्रुमे। अहं कन्दर्पसहितः स्थास्यामि तव पार्श्वतः ६ त्वं हि रूपं बहुगुणं कृत्वा परमभास्वरम्। तमृषिं कौशिकं भद्रे भेदयस्व तपस्विनम् ७ सा श्रुत्वा वचनं तस्य कृत्वा रूपमनुत्तमम्। लोभयामास ललिता विश्वामित्रं शुचिस्मिता ८ कोकिलस्य तु शुश्राव वल्गु व्याहरतः स्वनम्। संप्रहृष्टेन मनसा स चैनामन्ववैक्षत ९ अथ तस्य च शब्देन गीतेनाप्रतिमेन च। दर्शनेन च रम्भाया मुनिः संदेहमागतः १० सहस्राक्षस्य तत्सर्वं विज्ञाय मुनिपुंगवः। रम्भां क्रोधसमाविष्टः शशाप कुशिकात्मजः ११ यन्मां

---

बुद्धिमान् इंद्रानें अप्सरेला सांगितलें असतां ती लज्जित झाली आणि हात जोडून त्या देवराजाला ह्मणाली २ "हे देवाधिपते, हा महामुनि विश्वामित्र भयंकर आहे. तेव्हां, हे देवा, हा माझ्यावर आग पाखडण्याला कमी करणार नाहीं ३. ह्यास्तव, मला ( आपण सांगतां हें कार्य करण्याला ) भय वाटत आहे. करितां, हे देवा, आपण मजवर कृपा करावी". हे रामा, ह्याप्रमाणें त्या भयभीत झालेल्या रंभेनें भीत भीत इंद्राला सांगितलें असतां ४ भयभीत होऊन हात जोडून उभी राहिलेल्या त्या रंभेला इंद्र ह्मणाला "हे रंभे, तू भिऊ नको; तुझें कल्याण असो. माझ्या आज्ञेनें तूं ही गोष्ट कर ५. वृक्षसौंदर्ययुक्त अशा वसंत ऋतूमध्यें मनोहर कोकिलपक्ष्याचें रूप धारण करून मी मदनासहवर्तमान तुझ्या सन्निध तत्पर राहीन ६. तूं अत्यंत उज्ज्वल आणि बहुगुणसंपन्न असें रूप धारण कर आणि, हे कल्याणि, त्या कुशिकवंशज तपोनिष्ठ ऋषीला तपश्चर्येपासून निवृत्त कर" ७. हें इंद्राचें भाषण श्रवण केल्यावर त्या सुहास्यवदना सुंदरी रंभेनें अनुपम रूप धारण करून विश्वामित्राला मोहित केलें ८. प्रथमतः मंजुल शब्द करीत असलेल्या कोकिलपक्ष्याचा ध्वनि प्रसन्न अंतःकरणानें विश्वामित्रानें श्रवण केला; तों इतक्यांत रंभाही त्याच्या दृष्टीस पडली ९. तेव्हां, त्याच्या त्या ध्वनीनें, अप्रतिम गायनानें आणि रंभेच्या दर्शनानें विश्वामित्र मुनीला ( हिला इंद्रानें पाठविली आहे किंवा माझी तपश्चर्या भग्न करण्याकरितां ही आपण होऊनच आली आहे असा ) संशय आला १० व नंतर तें सर्व इंद्राचें कृत्य आहे असें समजून आल्यावर कुशिकवंशज मुनिश्रेष्ठ विश्वामित्रानें क्रुद्ध होऊन रंभेला

**लोभयसे रम्भे कामक्रोधजयैषिणम । दश वर्ष सहस्राणि शैली स्थास्यसि दुर्भगे १२ ब्राह्मणः सुमहातेजास्तपोबलसमन्वितः । उद्धरिष्यति रम्भे त्वां मत्क्रोधकलुषीकृताम् १३ एवमुक्त्वा महातेजा विश्वामित्रो महामुनिः । अशक्नुवन्धारयितुं कोपं संतापमात्मनः १४ तस्य शापेन महता रम्भा शैली तदाभवत् । वचः श्रुत्वा च कन्दर्पो महर्षेः स च निर्गतः १५ कोपेन च महातेजास्तपोपहरणे कृते । इन्द्रियैरजितै राम न लेभे शान्तिमात्मनः १६ बभूवास्य मनश्चिन्ता तपोपहरणे कृते । नैवं क्रोधं गमिष्यामि न च वक्ष्ये कथंचन १७ अथ वा नोच्छ्वसिष्यामि संवत्सरशतान्यपि । अहं हि शोषयिष्यामि आत्मानं विजितेन्द्रियः १८ तावद्यावद्धि मे प्राप्तं ब्राह्मण्यं तपसार्जितम् । अनुच्छ्वसन्नभुञ्जानस्तिष्ठेयं शाश्वतीः समाः १९ न हि मे तप्यमानस्य क्षयं यास्यन्ति मूर्तयः २० एवं वर्षसहस्रस्य दीक्षां स मुनिपुंगवः । चकाराप्रतिमां लोके प्रतिज्ञां रघुन-**

---

शाप दिला कीं ११ " हे रंभे, काम आणि क्रोध जिंकण्याची इच्छा करीत असलेल्या मला ज्याअर्थी तूं लुब्ध करीत आहेस त्याअर्थी, हे दुर्भगे, दहा हजार वर्षेपर्यंत तूं पाषाण बनून राहशील १२ आणि, हे रंभे, माझ्या क्रोधानें ग्रस्त केलेल्या तुझा उद्धार तपःसामर्थ्यानें युक्त आणि फारच महातेजस्वी असा एक ब्राह्मण करील " १३. ह्याप्रमाणें महातेजस्वी महामुनि विश्वामित्रानें रंभेला शाप दिल्यावर क्रोध जिंकण्यास आपण समर्थ झालों नाहीं ह्मणून त्याला पश्चात्ताप झाला १४. त्याच्या त्या प्रचंड शापानें रंभाही तत्काळ पाषाण होऊन पडली व त्या विश्वामित्र महर्षींचें शापरूप भाषण श्रवण केल्यावर मदनही तेथून चालता झाला १५. हे रामा, इंद्रियदमन झालें नसल्यामुळें त्याप्रमाणें क्रोधाच्या योगानें तपश्चर्येचा व्यय झाला असतां विश्वामित्राच्या मनाला स्वस्थता वाटेना १६. ह्याप्रमाणें क्रोधानें तपश्चर्येच्या नाश झाला असतां विश्वामित्राच्या मनामध्यें असा विचार आला कीं " अशा प्रकारें *मी कधींही क्रोधयुक्त होणार नाहीं आणि आतां कांहीं झालें तरी भाषणही करणार नाहीं १७; अथवा ( इतकी पंचाईत कशाला ) शेंकडों वर्षें लोटेपर्यंत मी मुळीं श्वासोच्छ्वासच करणार नाहीं आणि अशा रीतीनें जितेंद्रिय राहून मी आपला देह शुष्क करून टाकीन १८. तात्पर्य, तपःसंपादित असें ब्राह्मण्य प्राप्त होईपर्यंत मी श्वासोच्छ्वास व आहार न करितां अनंत वर्षें तप करीत राहीन १९. तपश्चर्या करीत असल्यामुळें माझे अवयव नाहींसे होण्याची भीति नाहीं २०.* हे रघुनंदना रामा, ह्याप्रमाणें हजार वर्षेपर्यंत तपश्चर्येची दीक्षा घेण्याविषयीं त्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रानें जगतांत

न्दन २१ [ १९२१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥ ६४ ॥

अथ हैमवतीं राम दिशं त्यक्त्वा महामुनिः । पूर्वां दिशमनुप्राप्य तपस्तेपे सुदारुणम् १ मौनं वर्षसहस्रस्य कृत्वा व्रतमनुत्तमम् । चकाराप्रतिमं राम तपः परमदुष्करम् २ पूर्णे वर्षसहस्रे तु काष्ठभूतं महामुनिम् । विघ्नैर्बहुभिराधूतं क्रोधो नान्तरमाविशत् ३ स कृत्वा निश्चयं राम तप आतिष्ठनाव्ययम् । तस्य वर्षसहस्रस्य व्रते पूर्णे महाव्रतः ४ भोक्तुमारब्धवानन्नं तस्मिन्काले रघूत्तम । इन्द्रो द्विजातिर्भूत्वा तं सिद्धमन्नमयाचत ५ तस्मै दत्त्वा तदा सिद्धं सर्वं विप्राय निश्चितः । निःशेषितेऽन्ने भगवानभुक्त्वैव महातपाः ६ न किंचिदवदद्विप्रं मौनव्रतमुपास्थितः । तथैवासीत्पुनर्मौनमनुच्छ्वासं चकार ह ७ अथ वर्षसहस्रं च नोच्छ्वसन्मुनिपुङ्गवः । तस्यानुच्छ्वमानस्य मूर्ध्नि धूमो व्यजायत ८ त्रैलोक्यं

---

जिला तोड नाहीं अशी प्रतिज्ञा केली २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला॥६४॥

हे रामा, नंतर महामुनि विश्वामित्रानें उत्तर दिशा सोडून देऊन पूर्व दिशेचें अवलंबन केलें आणि त्या ठिकाणीं अत्यंत उग्र तपश्चर्येला आरंभ केला १. हे रामा, प्रथमतः सहस्र संवत्सरपर्यंत सर्वोत्कृष्ट मौनव्रत पाळण्याचा संकल्प करून इतरांना अत्यंत दुष्कर असें अप्रतिम तप त्यानें केलें २ व तपाला आरंभ होऊन सहस्र संवत्सर पूर्ण झाल्यानंतर काष्ठवत् झालेल्या त्या महामुनीवर पुष्कळ विघ्नांचा जरी गहजब झाला तरी त्याचे ठिकाणीं क्रोधाचा प्रवेश झाला नाहीं ३. कारण, हे रामा, क्रोध जिंकण्याविषयीं निश्चय करून त्यानें अमोघ तपश्चर्येला आरंभ केला होता. असो. हजार वर्षेपर्यंत संकल्प केलेल्या तपाचें अनुष्ठान पूर्ण झाल्यावर त्या महाव्रतस्थ विश्वामित्रानें ४, हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, अन्न भक्षण करण्याचा उपक्रम केला ; परंतु, ब्राह्मणरूप घेऊन आलेल्या इंद्रानें तें तयार झालेलें अन्न मागितलें ५. तेव्हां, क्रोधसंयमनाविषयीं निश्चय केलेल्या विश्वामित्रानें तयार झालेलें तें सर्व अन्न ब्राह्मणाला दिलें आणि ह्याप्रमाणें ब्राह्मणाला देऊन अन्न निःशेष झाल्यावर भोजन न करितांच राहिलेल्या महातपस्वी भगवान् विश्वामित्रानें ६ ब्राह्मणाला चकार शब्दही न बोलतां पुनरपि मौनव्रताचें अवलंबन केलें. सारांश, श्वासोच्छ्वास न सोडितां त्यानें त्याचप्रमाणें मौनधारण करून पुनरपि तपश्चर्येला आरंभ केला ७. अशाप्रकारें एक सहस्र संवत्सरपर्यंत जेव्हां श्वासही न सोडितां मुनिश्रेष्ठ विश्वामित्रानें तपश्चर्या चालविली तेव्हां

येन संभ्रान्तमातापितमिवाभवत् । ततो देवर्षिगन्धर्वाः पन्नगोरगराक्षसाः ९ मोहितास्तपसा तस्य तेजसा मन्दरश्मयः । कश्मलोपहताः सर्वे पितामहमथाब्रुवन् १० बहुभिः कारणैर्देव विश्वामित्रो महामुनिः । लोभितः क्रोधितश्चैव तपसा चाभिवर्धते ११ न ह्यस्य वृजिनं किंचिद्दृश्यते सूक्ष्ममप्युत । न दीयते यदि त्वस्य मनसा यदभीप्सितम् १२ विनाशयति त्रैलोक्यं तपसा सचराचरम् । व्याकुलाश्च दिशः सर्वा न च किंचित्प्रकाशते १३ सागराः क्षुभिताः सर्वे विशीर्यन्ते च पर्वताः । प्रकम्पन्ते च वसुधा वायुर्वातीह संकुलः १४ ब्रह्मन्न प्रतिजानीमो नास्तिको जायते जनः । संमूढमिव त्रैलोक्यं संप्रक्षुभितमानसम् १५ भास्करो निष्प्रभश्चैव महर्षेस्तस्य तेजसा । बुद्धिं न कुरुते यावन्नाशे देव महामुनिः १६ तावत्प्रसाद्यो भगवन्नग्निरूपो महाद्युतिः । कालाग्निना यथा पूर्वं त्रैलोक्यं दह्यतेऽखिलम् १७ देवराज्यं चिकीर्षेत दीयतामस्य यन्मनः । ततः सुर-

---

उच्छ्वासरहित असलेल्या त्या मुनीच्या मस्तकाचे ठिकाणीं धूम उत्पन्न झाला ८ व त्या धूमानें सर्व त्रैलोक्य गोंधळून जाऊन संतप्त झाल्यासारिखें झालें. तेव्हां त्याच्या तपोरूप तेजाच्या योगानें तेजोहीन, मोहित व मूर्छित झालेले सर्व देव, ऋषि, गंधर्व, पन्नग, उरग व राक्षस ब्रह्मदेवाला ह्मणाले ९, १० " हे देव, अनेक प्रकारांनीं महामुनि विश्वामित्राला लुब्ध व क्रुद्ध करण्याचा यत्न केला असतांनाही त्याची परवा न करितां तपाच्या योगानें त्याचें महात्म्य वाढतच आहे ११. त्याचे ठिकाणीं कामक्रोधादिविषयक असा कोणताही दोष सूक्ष्म सुद्धां दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. तेव्हां यानें मनांत इच्छिलेलें जर दिलें नाहीं १२ तर तपश्चर्येच्या योगानें स्थावरजंगमात्मक प्राण्यांसहवर्तमान हा त्रैलोक्याचा नाश करील. सांप्रत सर्व दिशा धुंद झाल्या असून प्रकाश असा कोठेंही नाहीं १३. सर्व समुद्र खवळून गेले आहेत; पर्वत मोडून पडत आहेत; भूमि कंपित होत आहे व वायु अतिशय क्षुब्ध होऊन वहात आहे १४. हे ब्रह्मन्, आह्मांला ह्या प्रसंगीं कांहीं सुचत नाहीं. जगत्क्षोभ होऊं लागल्यामुळें लोक ( स्वधर्मानुष्ठानाचा त्याग करून ) नास्तिक बनत चालले आहेत. सारांश, त्रैलोक्यांतील प्राण्यांचीं मनें क्षुब्ध झालेलीं असून तें अगदीं गोंधळून गेलें आहेत १५ व त्या महर्षीच्या तेजानें सूर्यही निस्तेज झाला आहे. ह्यास्तव, हे देव, महामुनि विश्वामित्रानें जगताचा नाश करण्याचें मनामध्यें आणिलें नाहीं १६ तोंच, हे भगवन्, ह्या अग्नितुल्य महातेजस्वी विश्वामित्राला प्रसन्न करून घ्यावा. पूर्वीं युगांतकालीं ज्याप्रमाणें कालाग्नीच्या योगानें संपूर्ण त्रैलोक्याचा दाह होत होता त्याप्रमाणें सांप्रत सर्व त्रैलो-

गणाः सर्वे पितामहपुरोगमाः १८ विश्वामित्रं महात्मानं वाक्यं मधुरमब्रुवन्। ब्रह्मर्षे स्वागतं तेस्तु तपसा स्म सुतोषिताः १९ ब्राह्मण्यं तपसोग्रेण प्राप्तवानसि कौशिक। दीर्घमायुश्च ते ब्रह्मन्ददामि समरुद्गणः २० स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते गच्छ सौम्य यथासुखम्। पितामहवचः श्रुत्वा सर्वेषां त्रिदिवौकसाम् २१ कृत्वा प्रमाणं मुदितो व्याजहार महामुनिः। ब्राह्मण्यं यदि मे प्राप्तं दीर्घमायुस्तथैव च २२ ओंकारोथ वषट्कारो वेदाश्च वरयन्तु माम्। क्षत्रवेदविदां श्रेष्ठो ब्रह्मवेदविदामपि २३ ब्रह्मपुत्रो वसिष्ठो मामेवं वदतु देवताः। यद्येवं परमः कामः कृतो यान्तु सुरर्षभाः २४ ततः प्रसादितो देवैर्वसिष्ठो जपतां वरः। सख्यं चकार ब्रह्मर्षिरेवमस्त्विति चाब्रवीत् २५ ब्रह्मर्षिस्त्वं न संदेहः सर्वं संपद्यते तव। इत्युक्त्वा देवताश्चापि सर्वा जग्मुर्यथागतम् २६ विश्वामित्रोपि धर्मात्मा लब्ध्वा ब्राह्म-

---

क्याचा दाह होत आहे १७. ह्मास्तव, देवराज्याची जरी ह्याला इच्छा असली तरी सुद्धां ती आपण पूर्ण करा. तात्पर्य, ज्याची ह्याला इच्छा असेल तें आपण ह्याला द्या". ह्याप्रमाणें देवांनीं ब्रह्मदेवाची विनंति केल्यानंतर ब्रह्मदेवप्रभृति ते सर्वही देवगण १८ महात्म्या विश्वामित्राला मधुर शब्दांनीं ह्मणाले " हे ब्रह्मर्षे, तुझें स्वागत असो. तुझ्या तपानें आह्मीं फारच संतुष्ट झालों आहों १९. हे कुशिकवंशजा, उग्र तपाच्या योगानें तुला ब्राह्मण्य प्राप्त झालें आहे. हे ब्रह्मन्, मी ( ब्रह्मदेव ) मरुद्गणासहवर्तमान तुला दीर्घ आयुष्य देतों २०. हे सत्वगुणसंपन्न मुने, तुला सुखप्राप्ति होवो; तुझें कल्याण असो. तपश्चर्या समाप्त करून तूं आतां खुशाल पाहिजे तिकडे जा". ह्याप्रमाणें सर्व देवांकरितां ब्रह्मदेवानें केलेलें भाषण श्रवण केल्यावर महामुनि विश्वामित्रांनीं आनंदित होऊन सर्व देवांना प्रणाम केला आणि ते त्यांना ह्मणाले " ब्राह्मण्य आणि त्याचप्रमाणें दीर्घ आयुष्य जर मला प्राप्त झालें असेल तर २१,२२ ओंकार, वषट्कार आणि वेद मला वरोत. ( सारांश, अध्यापन, याजन वगैरे कर्मे करण्याचा मला अधिकार यवो ) आणि धनुर्विद्या जाणणाऱ्यांमध्यें व ब्रह्मविद्या जाणणाऱ्यांमध्येंही श्रेष्ठ असलेला.२३ ब्रह्मपुत्र वसिष्ठ मला ह्याप्रमाणें ( ब्राह्मण ) ह्मणो. अशाप्रकारें माझा मुख्य मनोरथ जर सिद्धीस गेला असेल तर, हे सुरश्रेष्ठहो, आपण स्वस्थानीं जावें" २४. ह्याप्रमाणें विश्वामित्रांनीं सांगितलें असतां त्यांना ब्रह्मर्षि ह्मणण्याविषयीं देवांनीं तपस्विश्रेष्ठ वसिष्ठमुनींचें मन वळविलें; तेव्हां त्या ब्रह्मर्षि वसिष्ठांनींही " तुमच्या ह्मणण्याप्रमाणें हा ब्रह्मर्षि असो" असें ह्मणून विश्वामित्रांशीं सख्य केलें २५. नंतर " तूं ब्रह्मर्षि झालास ह्यांत संशय नाहीं; ब्राह्मण्यप्राप्तीला जें कांहीं अवश्यक आहे तें सर्व तुला प्राप्त झालें आहे"

ण्यमुत्तमम् । पूजयामास ब्रह्मर्षिं वसिष्ठं जपतां वरम् २७ कृतकामो महीं सर्वां चचार तपसि स्थितः । एवं त्वनेन ब्राह्मण्यं प्राप्तं राम महात्मना २८ एष राम मुनिश्रेष्ठ एष विग्रहवांस्तपः । एष धर्मः परो नित्यं वीर्यस्यैष परायणम् २९ एवमुक्त्वा महातेजा विरराम द्विजोत्तमः । शतानन्दवचः श्रुत्वा रामलक्ष्मणसंनिधौ ३० जनकः प्राञ्जलिर्वाक्यमुवाच कुशिकात्मजम् । धन्योऽस्म्यनुगृहीतोऽस्मि यस्य मे मुनिपुंगव ३१ यज्ञं काकुत्स्थसहितः प्राप्तवानसि कौशिक । पावितोऽहं त्वया ब्रह्मन्दर्शनेन महामुने ३२ गुणा बहुविधाः प्राप्तास्तव संदर्शनान्मया । विस्तरेण च वै ब्रह्मन्कीर्त्यमानं महत्तपः ३३ श्रुतं मया महातेजो रामेण च महात्मना । सदस्यैः प्राप्य च सदः श्रुतास्ते बहवो गुणाः ३४ अप्रमेयं तपस्तुभ्यमप्रमेयं च ते बलम् । अप्रमेया गुणाश्चैव नित्यं ते कुशिकात्मज ३५ तृप्तिराश्चर्यभूतानां कथानां नास्ति मे विभो । कर्मकालो मुनिश्रेष्ठ

---

असें ह्मणून सर्व देवही आल्यामार्गानें परत गेले २६. ह्याप्रमाणें सर्वोत्कृष्ट ब्राह्मण्य प्राप्त झाल्यावर धर्मात्म्या विश्वामित्र मुनींनींही तपस्विश्रेष्ठ ब्रह्मर्षि वसिष्ठांचें पूजन केलें २७ आणि कृतकृत्य झालेले हे विश्वामित्र मुनि तपोनिष्ठ राहून सर्व पृथ्वीवर संचार करूं लागले. हे रामा, ह्या महात्म्या विश्वामित्र मुनींनीं अशा प्रकारें ब्राह्मण्य प्राप्त करून घेतलें २८. हे रामा, हे मुनींमध्यें श्रेष्ठ आहेत; हे मूर्तिमंत तप आहेत; हे उत्कृष्ट धर्मच आहेत आणि वीर्याचेंही हे नित्य स्थानच आहेत " २९. ह्याप्रमाणें सांगून तो महातेजस्वी द्विजश्रेष्ठ शतानंद स्वस्थ बसला. तेव्हां रामलक्ष्मणासन्निध झालेलें तें शतानंदाचें भाषण श्रवण केल्यावर ३० (मिथिलाधिपति) जनकराजा हात जोडून कौशिकवंशज विश्वामित्रांना ह्मणाला " हे मुनिश्रेष्ठ, मी धन्य आहें. ज्याअर्थी ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांसहवर्तमान आपण येथें माझ्या यज्ञाप्रत आला आहां त्याअर्थी, हे कुशिकवंशज, माझ्यावर आपला अनुग्रहच झाला आहे. हे ब्रह्मन्, हे महामुने, दर्शन देऊन आपण मला आज पवित्र केलें ३१, ३२. आपलें दर्शन झाल्यामुळें आपल्या अनेक प्रकारच्या गुणांचें मला ज्ञान झालें आणि, हे ब्रह्मन्, आपलें मोठें तपही शतानंद सविस्तर सांगत असतांना मीं ३३ श्रवण केलें. हे महातेजस्वी मुने, मी, महात्मा राम आणि सदस्य ह्यांनीं यज्ञमंडपामध्यें येऊन आपले अनेक गुण श्रवण केले ३४. हे कुशिकवंशजमुने, आपलें तप अमर्याद आहे; आपलें सामर्थ्य अतर्क्य आहे आणि आपले गुणही सर्वदां असंख्य आहेत ३५. हे प्रभो, आपल्या आश्चर्यावह गोष्टी ऐकणें मला कधींच पुरेसें व्हावयाचें नाहीं; परंतु,

लम्बते रविमण्डलम् ३६ श्वःप्रभाते महातेजो द्रष्टुमर्हसि मां पुनः । स्वागतं जपतां श्रेष्ठ मामनुज्ञातुमर्हसि ३७ एवमुक्तो मुनिवरः प्रशस्य पुरुषर्षभम् । विससर्जाशु जनकं प्रीतं प्रीतमनास्तदा ३८ एवमुक्त्वा मुनिश्रेष्ठं वैदेहो मिथिलाधिपः । प्रदक्षिणं चकाराशु सोपाध्यायः सबान्धवः ३९ विश्वामित्रोऽपि धर्मात्मा सहरामः सलक्ष्मणः । स्ववासमभिचक्राम पूज्यमानो महात्मभिः ४० [ १९६१ ] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

ततः प्रभाते विमले कृतकर्मा नराधिपः । विश्वामित्रं महात्मानमाजुहाव सराघवम् १ तमर्चयित्वा धर्मात्मा शास्त्रदृष्टेन कर्मणा । राघवौ च महात्मानौ तदा वाक्यमुवाच ह २ भगवन्स्वागतं तेऽस्तु किं करोमि तवानघ । भवानाज्ञापयतु मामाज्ञाप्यो भवता ह्यहम् ३ एवमुक्तः स धर्मात्मा जनकेन महात्मना । प्रत्युवाच मुनिश्रेष्ठो वाक्यं वाक्यविशारदः ४ पुत्रौ दशरथस्येमौ क्षत्रियौ लोकविश्रुतौ । द्रष्टुकामौ धनुःश्रेष्ठं यदे-

---

हे मुनिश्रेष्ठ, आतां कर्मकालाचें अतिक्रमण होईल ; रविमंडल अस्ताचलाकडे कललें आहे ३६. हे महातेजस्वी मुने, आपण उद्ईक प्रातःकालीं माझी पुनरपि भेट घ्यावी; आपलें स्वागत असो. हे तपस्विश्रेष्ठ, मला आपण आतां अनुज्ञा द्यावी " ३७. ह्याप्रमाणें जनकराजानें प्रार्थना केली असतां मनामध्यें प्रसन्न झालेल्या मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांनीं संतुष्ट झालेल्या जनकाची प्रशंसा करून त्या पुरुषश्रेष्ठाला सत्वर अनुज्ञा दिली ३८. असो. वर सांगितल्याप्रमाणें मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांची प्रार्थना केल्यावर मिथिलाधिपति विदेहराज जनक, उपाध्याय आणि बांधव ह्यांसहवर्तमान स्वतः मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना प्रदक्षिणा करून, सत्वर चालता झाला ३९ व मोठमोठे प्रशंसा करीत असतांना धर्मात्मे विश्वामित्रही रामलक्ष्मणांसहवर्तमान आपल्या वसतिस्थानाकडे गेले ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६५ ॥

तदनंतर चांगलें उजाडल्यावर जनकराजानें स्नानसंध्या आटोपून महात्म्या विश्वामित्राला राघवांसहवर्तमान बोलावून आणिलें १ आणि सशास्त्र विधीनें त्या मुनीचें व रघुवंशज रामलक्ष्मणांचें पूजन करून तो धर्मात्मा जनकराजा त्यांना ह्मणाला २ " हे भगवन्, आपलें स्वागत असो. हे निष्पाप, मीं आपलें काय कार्य करावें तें आपण आज्ञा करावी; मी आपला आज्ञाधारक आहें " ३. ह्याप्रमाणें महात्म्या जनकानें प्रार्थना केली असतां संभाषण करण्यामध्यें निपुण असे धर्मात्मे मुनिश्रेष्ठ विश्वामित्र

तत्त्वापि तिष्ठति ५ एतद्दर्शय भद्रं ते कृतकामौ नृपात्मजौ । दर्शनादस्य धनुषो यथेष्टं प्रतियास्यतः ६ एवमुक्तस्तु जनकः प्रत्युवाच महामुनिम् । श्रूयतामस्य धनुषो यदर्थमिह तिष्ठति ७ देवरात इति ख्यातो निमेर्ज्येष्ठो महीपतिः । न्यासोऽयं तस्य भगवन्हस्ते दत्तो महात्मनः ८ दक्षयज्ञवधे पूर्वं धनुरायम्य वीर्यवान् । विध्वस्य त्रिदशान्रोषात्सलीलमिदमब्रवीत् ९ यस्माद्भागार्थिनो भागान्नाकल्पयत मे सुराः । वराङ्गानि महार्हाणि धनुषा शातयामि वः १० ततो विमनसः सर्वे देवा वै मुनिपुङ्गव । प्रसादयन्त देवेशं तेषां प्रीतोऽभवद्भवः ॥ प्रीतियुक्तस्तु सर्वेषां ददौ तेषां महात्मनाम् ११ तदेतद्देवदेवस्य धनुरत्नं महात्मनः । न्यासभूतं तदा न्यस्तमस्माकं पूर्वजे विभौ १२ अथ मे कृषतः क्षेत्रं लाङ्गलादुत्थिता ततः । क्षेत्रं शोधयता लब्धा नाम्ना सीतेति विश्रुता १३ भूतलादुत्थिता सा तु व्यवर्धत ममात्मजा ।

---

म्हणाले ४ " हे जगद्विख्यात क्षत्रिय आहेत; हे दशरथाचे पुत्र आहेत आणि तुझ्यापाशीं असलेलें श्रेष्ठ धनुष्य पहाण्याची त्यांची इच्छा आहे ५. करितां, तूं त्यांना तें दाखीव; त्या धनुष्याच्या दर्शनानें हे राजकुमार कृतकृत्य होतील आणि खुशाल परत जातील. तुझें कल्याण असो " ६. ह्याप्रमाणें विश्वामित्रांनीं जनकाला सांगितलें असतां तो त्या महामुनींना म्हणाला " ह्या धनुष्याची हकीकत आपण श्रवण करावी आणि तें येथें कशाकरितां आहे तेंही श्रवण करावें ७. देवरात म्हणून निमीचा ज्येष्ठ पुत्र राजा होऊन गेला. हे भगवन्, त्या महात्म्याच्या हातामध्यें ही चापरूप ठेव दिलेली आहे ८. पूर्वी दक्षयज्ञनाशाचे समयीं वीर्यवान् रुद्र, सहज हें धनुष्य वांकवून रागारागानें देवांची धुळदाण उडवून म्हणाला ९ " हे देवहो, मी हविर्भाग इच्छीत असतांनाही ज्याअर्थी तुह्मीं मला यज्ञभाग दिला नाहीं त्याअर्थी धनुष्याच्या योगानें मी तुमचीं महापूज्य मस्तकें तोडून टाकितों " १०. ह्याप्रमाणें रुद्रानें सांगितल्यावर, हे मुनिश्रेष्ठ, सर्व देव अगदीं दीन झाले आणि ते देवाधिदेव शंकराला प्रसन्न करून घेऊं लागले. तेव्हां शंकरही त्यांच्यावर प्रसन्न झाले आणि प्रसन्न होऊन त्या सर्व महात्म्यांना ते ( संहारार्थ धारण केलेलें ) धनुष्य त्यांनीं देऊन टाकिलें ११. तें हें महात्म्या देवाधिदेव शंकराचें श्रेष्ठ धनुष्य आमच्या समर्थ पूर्वजांपाशीं देवांनीं ठेव म्हणून त्यावेळीं ठेविलें आहे १२. असो. मी ( अग्निचयनाकरितां ) क्षेत्र शुद्ध करण्याच्या उद्देशानें जमीन नांगरूं लागलों असतां नांगरांतून एक कन्या मला प्राप्त झाली व ती नांगरापासून निघाली म्हणून सीता ह्या नांवानें प्रसिद्ध झाली १३. ती यज्ञभूमीपासून उत्पन्न झालेली माझी कन्या वाढीला लागली.

वीर्यशुल्केति मे कन्या स्थापितेयमयोनिजा १४ भूतलादुत्थितां तां तु वर्धमानां ममात्मजाम् । वरयामासुरागत्य राजानो मुनिपुङ्गव १५ तेषां वरयतां कन्यां सर्वेषां पृथिवीक्षिताम् । वीर्यशुल्केति भगवन्न ददामि सुतामहम् १६ ततः सर्वे नृपतयः समेत्य मुनिपुंगव । मिथिलामप्युपागम्य वीर्यं जिज्ञासवस्तदा १७ तेषां जिज्ञासमानानां शैवं धनुरुपाहृतम् । न शेकुर्ग्रहणे तस्य धनुषस्तोलनेऽपि वा १८ तेषां वीर्यवतां वीर्यमल्पं ज्ञात्वा महामुने । प्रत्याख्याता नृपतयस्तन्निबोध तपोधन १९ ततः परमकोपेन राजानो मुनिपुंगव । अरुन्धन्मिथिलां सर्वे वीर्यसंदेहमागताः २० आत्मानमवधूतं मे विज्ञाय नृपपुंगवाः । रोषेण महताविष्टाः पीडयन्मिथिलां पुरीम् २१ ततः संवत्सरे पूर्णे क्षयं यातानि सर्वशः । साधनानि मुनिश्रेष्ठ ततोऽहं भृशदुःखितः २२ ततो देवगणान्सर्वांस्तपसाहं प्रसादयम् । ददुश्च परमप्रीताश्चतुरङ्गबलं सुराः २३ ततो भग्ना नृपतयो हन्यमाना दिशो

---

तेव्हां, वीर्यशुल्का ( ह्मणजे हें त्र्यंबक चाप सज्ज करण्याला वगैरे समर्थ असें ज्याचें वीर्य असेल त्यालाच ही द्यावयाची असें ) ह्मणून मीं ही अयोनिसंभव कन्या रक्षण करून ठेविली १४. पुढें भूतलापासून उत्पन्न झालेली माझी कन्या मोठी होऊं लागली असतां, हे मुनिश्रेष्ठ, राजांनीं येऊन तिच्यासंबंधानें मागणी घातली १५. परंतु, नुसती मागणी घालणाऱ्या त्या सर्व राजांपैकीं मीं एकालाही आपली कन्या वीर्यशुल्का ह्मणून ( ह्मणजे ज्याचें सामर्थ्य माझ्या पसंतीला उतरेल त्यालाच ही द्यावयाची असें समजून ) दिली नाहीं १६. तदनंतर, हे मुनिश्रेष्ठ, सर्व राजे आपआपल्या सामर्थ्याचा अदमास पाहण्याकरितां एकत्र जमून मिथिला नगरीप्रत आले १७. तेव्हां सामर्थ्याचा अदमास पाहूं इच्छिणाऱ्या त्या राजांच्या समोर त्र्यंबकचाप आणून ठेविलें असतां ते तें धनुष्य उचलण्यास किंवा तोलण्यास समर्थ झाले नाहींत १८. तेव्हां, हे महामुने, त्या वीर्यवानांचें वीर्य अल्प आहे असें जाणून मीं त्यांना नाकारिलें; परंतु, त्याचा परिणाम काय झाला तो, हे तपोधन, आपण ऐका १९. मी कन्या देण्याचें नाकारिल्यावर, हे मुनिश्रेष्ठ, वीर्याविषयीं संशय आलेल्या त्या सर्वही राजांनीं मोठ्या रागानें मिथिलानगरी वेढून टाकिली २० आणि मीं त्यांचा तिरस्कार केला असें समजून अत्यंत क्रुद्ध झालेल्या त्या सर्वही श्रेष्ठ राजांनीं मिथिला नगरीला पीडा दिली २१. तदनंतर वेढा पडून एक संपूर्ण वर्ष लोटल्यावर ( बाहेरील माल आंत येण्याचा बंद झाल्यामुळें ) सर्व प्रकारचीं साधनें संपून गेलीं आणि तेव्हां, हे मुनिश्रेष्ठा, मी अत्यंत दुःखित झालों २२. नंतर सर्व देवगणांना तपश्चर्येच्या योगानें मीं प्रसन्न केलें असतां अत्यंत प्रसन्न झालेल्या

यथुः । अवीर्या वीर्यसंदिग्धाः सामात्याः पापकारिणः २४ तदेतन्मुनिशार्दूल धनुः परमभास्वरम् । रामलक्ष्मणयोश्चापि दर्शयिष्यामि सुव्रत २५ यद्यस्य धनुषो रामः कुर्यादारोपणं मुने । सुतामयोनिजां सीतां दद्यां दाशरथेरहम् २६ [ १९८७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥

जनकस्य वचः श्रुत्वा विश्वामित्रो महामुनिः । धनुर्दर्शय रामाय इति होवाच पार्थिवम् १ ततः स राजा जनकः सचिवान्व्यादिदेश ह । धनुरानीयतां दिव्यं गन्धमाल्यानुलेपितम् २ जनकेन समादिष्टाः सचिवाः प्राविशन्पुरम् । तद्धनुः पुरतः कृत्वा निर्जग्मुरमितौजसः ३ नृणां शतानि पञ्चाशद्व्यायतानां महात्मनाम् । मञ्जूषामष्टचक्रान्तां समूहुस्ते कथंचन ४ तामादाय सुमञ्जूषामायसीं यत्र तद्धनुः । सुरोपमं ते जनकमूचुर्नृपतिमन्त्रिणः ५ इदं धनुर्वरं राजन्पूजितं सर्वराजभिः । मिथिलाधिप राजेन्द्र दर्शनीयं यदीच्छसि ६ तेषां नृपो वचः श्रुत्वा कृताञ्जलिरभाषत । विश्वा-

---

देवांनीं मला चतुरंग सैन्य दिलें २३. तदनंतर माझ्या सैन्याचा मारा होऊं लागला असतां स्वतःच्या वीर्याविषयीं संदेह आलेले ते अल्पवीर्य पापी राजे अमात्यांसहवर्तमान वाट फुटेल तिकडे पळूं लागले २४. सारांश, हे महातेजस्वी मुनिश्रेष्ठा, अशी ज्या धनुष्याची हकीकत आहे तें हें अत्यंत उज्ज्वल धनुष्य रामलक्ष्मणांनाही मी दाखवीन २५ आणि, हे मुने, राम जर हें धनुष्य सज्ज करील तर अयोनिसंभव सीता मी ह्या दशरथपुत्राला देईन २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६६ ॥

जनकराजाचें भाषण श्रवण केल्यावर महामुनि विश्वामित्रांनीं " रामाला धनुष्य दाखीव " ह्मणून राजाला सांगितलें १. तदनंतर " गंध व पुष्पें घालून ठेविलेलें दिव्य धनुष्य आण " ह्मणून त्या जनकराजानें अमात्यांना सांगितलें २. तेव्हां, जनकाची आज्ञा झालेले ते सचिव नगरामध्यें गेले आणि तें धनुष्य पुढें घालून ते अपरिमित सामर्थ्यवान् अमात्य बाहेर आले ३. मोठमोठ्या धिप्पाड व उंच अशा पांच हजार पुरुषांनीं कशीतरी ती आठचाकी धनुष्याची पेटी ओढून आणिली ४. ज्यांत तें धनुष्य होतें ती लोखंडी पेटी ओढून आणिल्यावर ते मंत्री त्या देवतुल्य जनकराजाला ह्मणाले ५ " हे राजा, सर्व राजांना पूज्य असें हें श्रेष्ठ धनुष्य आणिलें आहे. हे मिथिलाधिपते नृपश्रेष्ठा, तुला जर हें दाखविण्याची इच्छा असेल तर दाखीव " ६. ह्याप्रमाणें त्यांचें भाषण श्रवण केल्यावर जनकराजा महात्म्या विश्वामित्राला व त्या उभयतां रामलक्ष्मणांना

मित्रं महात्मानं तावुभौ रामलक्ष्मणौ ७ इदं धनुर्वरं ब्रह्मञ्जनकैरभिपूजितम्। राजभिश्च महावीर्यैरशक्तैः पूरितुं तदा ८ नैतत्सुरगणाः सर्वे सासुरा न च राक्षसाः। गन्धर्वयक्षप्रवराः सकिंनरमहोरगाः ९ क्व गतिर्मानुषाणां च धनुषोऽस्य प्रपूरणे। आरोपणे समायोगे वेपने तोलने तथा १० तदेतद्धनुषां श्रेष्ठमानीतं मुनिपुंगव। दर्शयैतन्महाभाग अनयो राजपुत्रयोः ११ विश्वामित्रः सरामस्तु श्रुत्वा जनकभाषितम्। वत्स राम धनुः पश्य इति राघवमब्रवीत् १२ महर्षेर्वचनाद्रामो यत्र तिष्ठति तद्धनुः। मञ्जूषां तामपावृत्य दृष्ट्वा धनुरथाब्रवीत् १३ इदं धनुर्वरं दिव्यं संस्पृशामीह पाणिना। यत्नवांश्च भविष्यामि तोलने पूरणेऽपि वा १४ बाढमित्यब्रवीद्राजा मुनिश्च समभाषत। लीलया सधनुर्मध्ये जग्राह वचनान्मुनेः १५ पश्यतां नृसहस्राणां बहूनां रघुनन्दनः। आरोपयत्स धर्मात्मा सलीलमिव तद्धनुः १६ आरोपयित्वा मौर्वीं च पूरयामास तद्धनुः। तद्बभञ्ज धनुर्मध्ये नरश्रेष्ठो महायशाः १७ तस्य शब्दो महानासीन्निर्घातसमनिः-

---

ह्मणाला ७ " हे ब्रह्मन्, जनकराजांनीं आणि महासामर्थ्यवान् परंतु, सज्ज करण्यास असमर्थ अशा इतर राजांनींही पूजा करून ठविलेलें हें श्रेष्ठ धनुष्य होय ८. सर्व देवगण, असुरांसहवर्तमान राक्षस, मोठमोठे गंधर्व आणि यक्ष व किन्नर आणि महोरग ह्यांपैकीं कोणीही हें धनुष्य सज्ज करण्यास समर्थ नाहींत ९. कानापर्यंत हें धनुष्य ओढण्याचें, तें सज्ज करण्याचें, त्याला बाण लावण्याचें, प्रत्यंचा ओढण्याचें आणि हातानें तोलून पाहण्याचें सामर्थ्य मानवांच ठिकाणीं कोठून असणार ? १०. हे मुनिश्रेष्ठ, तें हें श्रेष्ठ धनुष्य आणिलें आहे. हे महाभाग्यवान् मुने, हें आपण ह्या राजपुत्रांना दाखवा " ११. हें जनकराजाचें भाषण रामासहवर्तमान बसलेल्या विश्वामित्रांनीं ऐकिल्यावर " वत्सा रामा, धनुष्य पहा " असें ते रघुवंशज रामाला ह्मणाले १२. तेव्हां त्या महर्षींनीं सांगितल्यावरून ज्या पेटींत तें धनुष्य होतें ती पेटी उघडून धनुष्य पाहून राम ह्मणाला १३ " ह्या दिव्य व श्रेष्ठ धनुष्याला मीं ह्या पेटीमध्यें हात लाविला आहे. हें तोलण्याचा व कर्णापर्यंत ओढण्याचा मी यत्न करून पहातों " १४. ह्याप्रमाणें रामानें ह्मटलें असतां " ठीक आहे " ह्मणून जनकराजा आणि विश्वामित्रमुनि ह्यांनीं त्याला सांगितल्यावर मुनींच्या वचनावरून त्यानें तें धनुष्य मध्यें धरून सहज उचलिलें १५ आणि पुष्कळ ह्मणजे हजारों राजे पहात असतांना त्या धर्मात्म्या रामानें त्या धनुष्याला सहज प्रत्यंचा चढविली १६. ह्याप्रमाणें प्रत्यंचा चढविल्यानंतर तें धनुष्य त्या पुरुषश्रेष्ठ महायशस्वी रामानें कानापर्यंत ओढिलें आणि मध्यें मोडून टाकिलें १७.

स्वनः । भूमिकम्पश्च सुमहान्पर्वतस्येव दीर्यतः १८ निपेतुश्च नराः सर्वे तेन शब्देन मोहिताः । वर्जयित्वा मुनिवरं राजानं तौ च राघवौ १९ प्रत्याश्वस्ते जने तस्मिन्राजा विगतसाध्वसः । उवाच प्राञ्जलिर्वाक्यं वाक्यज्ञो मुनिपुंगवम् २० भगवन्दृष्टवीर्यो मे रामो दशरथात्मजः । अत्यद्भुतमचिन्त्यं च अतर्कितमिदं मया २१ जनकानां कुले कीर्तिमाहरिष्यति मे सुता । सीता भर्तारमासाद्य रामं दशरथात्मजम् २२ मम सत्या प्रतिज्ञा सा वीर्यशुल्केति कौशिक । सीता प्राणैर्बहुमता देया रामाय मे सुता २३ भवतोऽनुमते ब्रह्मञ्छीघ्रं गच्छन्तु मन्त्रिणः । मम कौशिक भद्रं ते अयोध्यां त्वरिता रथैः २४ राजानं प्रश्रितैर्वाक्यैरानयन्तु पुरं मम । प्रदानं वीर्यशुल्कायाः कथयन्तु च सर्वशः २५ मुनिगुप्तौ च काकुत्स्थौ कथयन्तु नृपाय वै । प्रीतियुक्तं तु राजानमानयन्तु सुशीघ्रगाः २६ कौशिकस्तु तथेत्याह राजा चाभाष्य मन्त्रिणः । अयोध्यां प्रेषयामास धर्मात्मा

---

त्या वेळीं वीज कडकडल्याप्रमाणें त्याचा मोठा शब्द झाला आणि विदीर्ण होणाऱ्या पर्वताचे समीप जसा भूकंप होतो तसा फारच मोठा भूकंप झाला १८ व त्या शब्दाच्या योगानें मुनिश्रेष्ठ विश्वामित्र, जनकराजा आणि ते रघुवंशज रामलक्ष्मण ह्यांवांचून इतर सर्व लोक मूर्छित होऊन पडले १९. नंतर लोक सावध झाल्यावर ( कन्या अविवाहित राहण्याच्या ) भीतींतून मुक्त झालेला संभाषणज्ञ जनकराजा हात जोडून मुनिश्रेष्ठ विश्वामित्रांना ह्मणाला २० " हे भगवन्, दशरथपुत्र रामाचें वीर्य मीं अवलोकन केलें. ही अत्यंत अद्भुत गोष्ट ह्याच्या हातून होईल असें माझ्या गांवींही नव्हतें व व माझा तर्कही नव्हता २१. जनकराजांच्या कुलामध्यें ही माझी कन्या सीता दशरथपुत्र रामाला भर्ता प्राप्त करून घेऊन कीर्ति संपादन करील २२. हे कुशिकवंशज मुने, सीता वीर्यशुल्का ह्मणून जी माझी प्रतिज्ञा होती ती शेंवटास गेली. आतां प्राणापेक्षांही प्रिय असलेली ही माझी कन्या रामाला द्यावयाची २३. करितां, हे ब्रह्मन्, हे कौशिकमुने, आपलें देव बरें करो; रथ बरोबर घेऊन माझ्या मंत्र्यांना आपल्या अनुमतानें अयोध्येप्रत सत्वर जाऊं द्या २४ व सविनय शब्दांनीं प्रार्थना करून दशरथराजाला माझ्या नगराप्रत त्यांना घेऊन येऊं द्या. सारांश, वीर्यशुल्का कन्येच्या दानासंबंधानें येथें घडलेला सर्व वृत्तांत त्यांना तेथें कथन करूं द्या २५. रामलक्ष्मणांचें रक्षण मुनींनीं केलें आहे ह्मणून त्यांना राजाला निवेदन करूं द्या आणि प्रसन्न झालेल्या दशरथराजाला त्या अत्यंत शीघ्र गमन करणाऱ्या मंत्र्यांना आणूं द्या "२६. ह्यावर कौशिकमुनींनीं " ठीक आहे " असें सांगितल्यानंतर त्या धर्मात्म्या राजानेंही

कृतशासनम् २७ यथावृत्तं समाख्यातुमानेतुं च नृपं तथा २८ [२०१५] इति श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः॥ ६७॥

जनकेन समादिष्टा दूतास्ते क्लान्तवाहनाः । त्रिरात्रमुषिता मार्गे तेऽयोध्यां प्राविशन्पुरीम् १ ते राजवचनाद्गत्वा राजवेश्म प्रवेशिताः । ददृशुर्देवसंकाशं वृद्धं दशरथं नृपम् २ बद्धाञ्जलिपुटाः सर्वे दूता विगतसाध्वसाः । राजानं प्रश्रितं वाक्यमब्रुवन्मधुराक्षरम् ३ मैथिलो जनको राजा साग्निहोत्रपुरस्कृतः । मुहुर्मुहुर्मधुरया स्नेहसंरक्तया गिरा ४ कुशलं चाव्ययं चैव सोपाध्यायपुरोहितम् । जनकस्त्वां महाराजा पृच्छते सपुरःसरम् ५ पृष्ट्वा कुशलमव्यग्रं वैदेहो मिथिलाधिपः । कौशिकानुमते वाक्यं भवन्तमिदमब्रवीत् ६ पूर्वं प्रतिज्ञा विदिता वीर्यशुल्का ममात्मजा । राजानश्च कृतामर्षा निर्वीर्या विमुखीकृताः ७ सेयं मम सुता राजन्विश्वामित्रपुरस्कृतैः । यदृच्छयागतै राजन्निर्जिता तव पुत्रकैः ८ तच्च रत्नं धनुर्दिव्यं मध्ये भग्नं महात्मना । रामेण हि महाबाहो महत्यां जनसंसदि ९

---

त्याप्रमाणें आज्ञा पाळीत असलेल्या मंत्र्यांना सांगितलें आणि घडलेला वृत्तांत राजाला निवेदन करून त्याला आणण्याकरितां त्यांना अयोध्येप्रत पाठविलें २७,२८. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडांपैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

जनकराजानें आज्ञा केलेले ते दूत वाहनें थकून गेल्यामुळें मार्गामध्यें त्रिरात्र राहून नंतर अयोध्यानगरीमध्यें गेले १. राजाच्या सांगण्यावरून तेथें गेल्यावर राजवाड्यामध्यें द्वारपालांनीं त्यांचा प्रवेश करविला असतां देवतुल्य व वृद्ध दशरथराजाला त्यांनीं अवलोकन केलें २ आणि निर्भय झालेले ते सर्व दूत हात जोडून मधुर शब्दांनीं विनयपूर्वक राजाला ह्मणाले. ३ “ ऋत्विजांसहवर्तमान असलेला मिथिलाधिपति जनकराजा स्निग्ध व मधुर वाणीनें वारंवार ४, हे महाराजा, उपाध्याय, पुरोहित आणि सेवक ह्यांसहवर्तमान तुला अखंड कुशल विचारीत आहे ५ आणि स्वस्थांतःकरणपूर्वक कुशलप्रश्न करून त्या विदेहदेशाधिपति मिथिलाधिपतीनें विश्वामित्रमुनींच्या अनुमतानें आपणांला असा निरोप सांगितला आहे ६ कीं, “–माझी कन्या वीर्यशुल्का– ही माझी प्रतिज्ञा आपणांला विदितच आहे. ह्यामुळें निर्वीर्य राजे मीं नाकारिल्यामुळें क्रुद्ध होऊन परत गेलेले आहेत ७. ती ही माझी कन्या, हे राजा, विश्वामित्रमुनींसहवर्तमान सहज आलेल्या आपल्या चिरंजीवांनीं जिंकिली ८. कारण, तें दिव्य श्रेष्ठ धनुष्य, हे महापराक्रमी भूपते, लोकांच्या प्रचंड समाजांत महात्म्या रामानें

अस्मै देया मया सीता वीर्यशुल्का महात्मने । प्रतिज्ञां तर्तुमिच्छामि तदनुज्ञातुमर्हसि १० सोपाध्यायो महाराज पुरोहितपुरस्कृतः । शीघ्रमागच्छ भद्रं ते द्रष्टुमर्हसि राघवौ ११ प्रतिज्ञां मम राजेन्द्र निर्वर्तयितुमर्हसि । पुत्रयोरुभयोरेव प्रीतिं त्वमुपलप्स्यसे १२ एवं विदेहाधिपतिर्मधुरं वाक्यमब्रवीत् । विश्वामित्राभ्यनुज्ञातः शतानन्दमते स्थितः १३ दूतवाक्यं तु तच्छ्रुत्वा राजा परमहर्षितः । वसिष्ठं वामदेवं च मन्त्रिणश्चैवमब्रवीत् १४ गुप्तः कुशिकपुत्रेण कौसल्यानन्दवर्धनः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा विदेहेषु वसत्यसौ १५ दृष्टवीर्यस्तु काकुत्स्थो जनकेन महात्मना । संप्रदानं सुतायास्तु राघवे कर्तुमिच्छति १६ यदि वो रोचते वृत्तं जनकस्य महात्मनः । पुरीं गच्छामहे शीघ्रं मा भूत्कालस्य पर्ययः १७ मन्त्रिणो बाढमित्याहुः सह सर्वैर्महर्षिभिः । सुप्रीतश्चाब्रवीद्राजा श्वो यात्रेति च मन्त्रिणः १८ मन्त्रिणस्तु नरेन्द्रस्य रात्रिं परमसत्कृताः । ऊषुः प्रमुदिताः सर्वे गुणैः

---

मध्यें मोडून टाकिलें ९. तस्मात्, वीर्यशुल्का सीता मी ह्या महात्म्या रामाला देणार. सारांश, मीं आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेण्याचें मनांत आणिलें आहे तर त्याला आपलें अनुमोदन असावें १०. हे महाराज, आपलें देव बरें करो. आपण उपाध्याय आणि पुरोहित ह्यांसहवर्तमान रामलक्ष्मणांना भेटण्याकरितां सत्वर चला ११. हे राजाधिराज, माझी प्रतिज्ञा आपण शेवटास न्यावी आणि उभयतांही पुत्रांचें विवाहसुख आपण अनुभवावें " १२. ह्याप्रमाणें विश्वामित्रांची अनुज्ञा घेऊन शतानंदाच्या मताप्रमाणें वागणाऱ्या जनकराजानें मधुर शब्दांनीं दूतांपाशीं दशरथराजाला निरोप सांगितला होता १३. तो दूतांचा निरोप ऐकून घेऊन दशरथराजाला पराकाष्ठेचा हर्ष झाला आणि वसिष्ठ, वामदेव व इतरही मंत्री ह्यांना तो ह्मणाला १४ " कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या रामाचें कुशिकवंशज विश्वामित्रमुनींनीं रक्षण केलें असून भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान हा विदेह देशामध्यें वास्तव्य करीत आहे १५. महात्म्या जनकानें ह्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचें वीर्य अवलोकन केलें आहे आणि ह्मणूनच तो ह्या रघुवंशज रामाला आपली कन्या देऊं इच्छित आहे १६. आपणांला जर महात्म्या जनकाची चालचलणूक ( शरीरसंबंध करण्याला ) योग्य वाटत असेल तर आपण सत्वर त्याच्या नगरीप्रत जाऊं; कालातिक्रमण होणें योग्य नाहीं " १७. ह्याप्रमाणें दशरथराजानें विचारिलें असतां सर्व महर्षींसहवर्तमान मंत्र्यांनीं त्याला " ठीक आहे " ह्मणून ह्मटलें. तेव्हां " उदईक प्रयाण " ह्मणून अत्यंत प्रसन्न झालेल्या दशरथराजानें सांगितलें १८ व दशरथराजाला परम मान्य असलेले ते सर्वगुणसंपन्न मंत्री रात्रभर आनंदामध्यें

सर्वैः समन्विताः १९ [ २०३४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥ ६८ ॥

ततो राज्यां व्यतीतायां सोपाध्यायः सबान्धवः। राजा दशरथो हृष्टः सुमन्त्रमिदमब्रवीत् १ अद्य सर्वे धनाध्यक्षा धनमादाय पुष्कलम्। व्रजन्त्वग्रे सुविहिता नानारत्नसमन्विताः २ चतुरङ्गबलं चापि शीघ्रं निर्यातु सर्वशः। ममाज्ञा समकालं च यानं युग्यमनुत्तमम् ३ वसिष्ठो वामदेवश्च जाबालिरथ काश्यपः। मार्कण्डेयस्तु दीर्घायुर्ऋषिः कात्यायनस्तथा ४ एते द्विजाः प्रयान्त्वग्रे स्यन्दनं योजयस्व मे। यथा कालात्ययो न स्याद्दूता हि त्वरयन्ति माम् ५ वचनाच्च नरेन्द्रस्य सेना च चतुराङ्गिणी। राजानमृषिभिः सार्धं व्रजन्तं पृष्ठतोऽन्वयात् ६ गत्वा चतुरहं मार्गं विदेहानभ्युपेयिवान्। राजा च जनकः श्रीमाञ्छ्रुत्वा पूजामकल्पयत् ७ ततो राजानमासाद्य वृद्धं दशरथं नृपम्। मुदितो जनको राजा प्रहर्षं परमं ययौ। उवाच वचनं श्रेष्ठो नरश्रेष्ठं मुदान्वितम् ८ स्वागतं ते नरश्रेष्ठ दिष्ट्या प्राप्तोऽसि राघव। पुत्रयोरुभयोः प्रीतिं लप्स्यसे

---

राहिले १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६८ ॥

तदनंतर ती रात्र गेल्यावर उपाध्याय आणि बांधव ह्यांसहवर्तमान दशरथ राजा आनंदित होऊन सुमंत्राला ह्मणाला १ " आज सर्व खजिनदारांना नानाप्रकारचीं रत्नें व विपुल द्रव्य बरोबर घेऊन मोठ्या बंदोबस्तानें पुढें चालूं लागूं द्या २; चतुरंग सैन्य सर्वप्रकारें सत्वर बाहेर पडूं द्या आणि मीं आज्ञा केल्याबरोबर शिबिका, अश्व वगैरे उत्कृष्ट वाहनें ( वसिष्ठादिकांकरितां ) तयार असूं द्या ३. वसिष्ठ, वामदेव, जाबालि, कश्यप, दीर्घायु मार्कंडेयऋषि व कात्यायन ४ ह्या ब्राह्मणांना पुढें जाऊं द्या व तूंही माझा रथ जोड; विलंब होतां उपयोगी नाहीं. हे दूत मला घाई करीत आहेत"५. ह्याप्रमाणें दशरथ राजानें सांगितल्यावरून ऋषींसहवर्तमान निघालेल्या राजाच्या मागोमाग चतुरंग सेना चालती झाली ६. चार दिवस मार्गामध्यें काढिल्यानंतर दशरथ राजा विदेह देशाला जाऊन पोंचला आणि दशरथ आल्याचें ऐकिल्यावर वैभवशाली जनकराजानें त्याचा आदरसत्कार केला ७ व वृद्ध दशरथ राजाची भेट झाल्यावर आधींच आनंदित झालेल्या जनकराजाला पराकाष्ठेचा हर्ष झाला आणि तो श्रेष्ठ जनकराजा आनंदयुक्त झालेल्या पुरुषश्रेष्ठ दशरथराजाला ह्मणाला ८ " हे पुरुष श्रेष्ठा, तुझें स्वागत असो. हे रघुवंशजा, तूं आलास ही गोष्ट फार

वीर्यनिर्जिताम ९ दिष्ट्या प्राप्तो महातेजा वसिष्ठो भगवानृषिः । सह सर्वैर्द्विजश्रेष्ठैर्देवैरिव शतक्रतुः १० दिष्ट्या मे निर्जिता विघ्ना दिष्ट्या मे पूजितं कुलम् । राघवैः सह संबन्धाद्वीर्यश्रेष्ठैर्महाबलैः ११ श्वः प्रभाते नरेन्द्र त्वं संवर्तयितुमर्हसि । यज्ञस्यान्ते नरश्रेष्ठ विवाहमृषिसत्तमैः १२ तस्य तद्वचनं श्रुत्वा ऋषिमध्ये नराधिपः । वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठः प्रत्युवाच महीपतिम् १३ प्रतिग्रहो दातृवशः श्रुतमेतन्मया पुरा । यथा वक्ष्यसि धर्मज्ञ तत्करिष्यामहे वयम् १४ तद्धर्मिष्ठं यशस्यं च वचनं सत्यवादिनः । श्रुत्वा विदेहाधिपतिः परं विस्मयमागतः १५ ततः सर्वे मुनिगणाः परस्परसमागमे । हर्षेण महता युक्तास्तां रात्रिमवसन्सुखम् १६ राजा च राघवौ पुत्रौ निशाम्य परिहर्षितः । उवास परमप्रीतो जनकेनाभिपूजितः १७ जनकोऽपि महातेजाः क्रिया धर्मेण तत्त्ववित् । यज्ञस्य च सुताभ्यां च कृत्वा रात्रिमुवास ह १८ [ २०४२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे एकोनसप्ततितमः सर्गः ॥ ६९ ॥

चांगली झाली. शौर्यामुळें उभयतां पुत्रांविषयीं तुझे ठिकाणीं प्रेम उत्पन्न होईल ९. देवांसहवर्तमान येणाऱ्या इंद्राप्रमाणें सर्व द्विजश्रेष्ठांसहवर्तमान महातेजस्वी भगवान् वसिष्ठ ऋषि आले हें फार चांगलें झालें १०. वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ व महाबलाढ्य अशा रघुवंशजांबरोबर माझा संबंध झाल्यामुळें सुदैवानें माझीं सर्व विघ्नें टळलीं असून ईशकृपेनें माझ्या कुलाचाही उद्धार झाला आहे ११. हे राजा, उद्यांक प्रातःकाळीं यज्ञ समाप्त झाल्यावर ऋषिश्रेष्ठांसहवर्तमान आपण विवाह उरकून घ्यावा " १२. हें त्या जनकाचें भाषण ऋषींमध्यें श्रवण केल्यावर संभाषण करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ दशरथ राजा जनक भूपतीला ह्मणाला १३ " प्रतिग्रह दात्यावर अवलंबून आहे हे मीं पूर्वी ऐकिलेलें आहे. आतां, हे धर्मज्ञ, तूं जसें सांगशील तसें आह्मी करूं " १४. हें धर्मिष्ठ व यशस्कारक असें सत्यवादी दशरथाचें भाषण श्रवण केल्यावर विदेहदेशाधिपति जनक राजा पराकाष्ठेचा विस्मित झाला १५. तदनंतर सर्व ऋषिगणांना एकमेकांच्या भेटी झाल्यामुळें मोठा हर्ष होऊन त्यांनीं ती रात्र सुखानें काढिली १६. आपल्या रघुवंशजपुत्रांना अवलोकन करून हर्ष व पराकाष्ठेचा आनंद झालेला दशरथराजा जनकाकडून मानमान्यता होत असतांना तेथें राहिला १७ व महातेजस्वी तत्त्ववेत्ता जनकराजाही धर्माप्रमाणें यज्ञसंबंधीं अवशिष्ट राहिलेलीं कर्मे संपवून पुत्रांसहवर्तमान त्या रात्रीं तेथेंच राहिला १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकुणसत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ६९ ॥

ततः प्रभाते जनकः कृतकर्मा महर्षिभिः । उवाच वाक्यं वाक्यज्ञः शतानन्दं पुरोहितम् १ भ्राता मम महातेजा वीर्यवानतिधार्मिकः । कुशध्वज इति ख्यातः पुरीमध्यवसच्छुभाम् २ वार्याफलकपर्यन्तां पिबन्निक्षुमतीं नदीम् । सांकाश्यां पुण्यसंकाशां विमानमिव पुष्पकम् ३ तमहं द्रष्टुमिच्छामि यज्ञगोप्ता स मे ततः । प्रीतिं सोऽपि महातेजा इमां भोक्ता मया सह ४ एवमुक्ते तु वचने शतानन्दस्य संनिधौ । आगताः केचिदव्यग्रा जनकस्तान्समादिशत् ५ शासनात्तु नरेन्द्रस्य प्रययुः शीघ्रवाजिभिः । समानेतुं नरव्याघ्रं विष्णुमिन्द्राज्ञया यथा ६ सांकाश्यां ते समागम्य ददृशुश्च कुशध्वजम् । न्यवेदयन्यथावृत्तं जनकस्य च चिन्तितम् ७ तद्वृत्तं नृपतिः श्रुत्वा दूतश्रेष्ठैर्महाजवैः । आज्ञया तु नरेन्द्रस्य आजगाम कुशध्वजः ८ स ददर्श महात्मानं जनकं धर्मवत्सलम् । सोऽभिवाद्य शतानन्दं जनकं चातिधार्मिकम् ९ राजार्हं परमं दिव्यमासनं सोऽध्यरोहत । उपविष्टावुभौ तौ तु भ्रातरावमितद्युती १० प्रेषयामासतुर्वीरौ मन्त्रिश्रेष्ठं सुदामनम् ।

---

तदनंतर प्रभातकाल झाल्यावर स्नानसंध्या आटोपून संभाषणज्ञ जनकराजा महर्षिसहवर्तमान शतानंदनामक पुरोहिताला ह्मणाला १ " कुशध्वज ह्मणून प्रसिद्ध असलेला असा माझा एक महातेजस्वी, वीर्यवान् आणि अतिधार्मिक भ्राता आहे व तो पुष्पक विमानाप्रमाणें मनोहर, तटबंदी व यंत्रसामग्री ह्यांनीं युक्त, स्वर्गतुल्य आणि पवित्र अशा सांकाश्यानामक नगरीमध्यें इक्षुमती नदीचें जल सेवन करून रहात आहे २, ३. त्याची भेट घेण्याची माझी इच्छा आहे. कारण, मी त्याला यज्ञरक्षक ह्मणून समजत आहे. करितां, माझ्यासहवर्तमान त्या महातेजस्वी कुशध्वजालाही ह्या मंगलसंबंधीं आनंदाचा उपभोग घेण्यास सांपडला पाहिजे " ४. ह्याप्रमाणें शतानंदाला जनकानें सांगितलें असतां सेवेविषयीं तत्पर असे कांहीं लोक तेथें आले व त्यांना त्या जनकानें ( कुशध्वजाकडे ) जाण्यास सांगितलें ५. तेव्हां, राजाच्या आज्ञेवरून ते सेवक इंद्राच्या आज्ञेनें विष्णूला आणण्याकरितां जाणाऱ्या सेवकांप्रमाणें पुरुषश्रेष्ठ कुशध्वजाला आणण्याकरितां शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांवर आरूढ होऊन गेले ६ व सांकाश्या नगरीमध्यें जाऊन कुशध्वजाची भेट घेतल्यावर जनकाचा उद्देश त्यांनीं त्याला इत्थंभूत कथन केला ७. तेव्हां, तें वर्तमान ऐकून कुशध्वजराजा जनकराजाच्या आज्ञेप्रमाणें त्या महावेगवान् श्रेष्ठ दूतांसहवर्तमान निघून आला ८. नंतर धर्मवत्सल महात्म्या जनकाचें दर्शन झाल्यावर शतानंद व अत्यंत धार्मिक जनक ह्यांना अभिवंदन करून ९ तो राजाला योग्य अशा उत्कृष्ट दिव्य आसनावर बसला.

गच्छ मन्त्रिपते शीघ्रमैक्ष्वाकुममितप्रभम् ११ आत्मजैः सह दुर्धर्षमानयस्व समन्त्रिणम् । औपकार्यां स गत्वा तु रघूणां कुलवर्धनम् १२ ददर्श शिरसा चैनमभिवाद्येदमब्रवीत् । अयोध्याधिपते वीर वैदेहो मिथिलाधिपः १३ स त्वां द्रष्टुं व्यवसितः सोपाध्यायपुरोहितम् । मन्त्रिश्रेष्ठवचः श्रुत्वा राजा सर्षिगणस्तथा १४ सबन्धुरगमत्तत्र जनको यत्र वर्तते । राजा च मन्त्रिसहितः सोपाध्यायः सबान्धवः १५ वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठो वैदेहमिदमब्रवीत् । विदितं ते महाराज इक्ष्वाकुकुलदैवतम् १६ वक्ता सर्वेषु कृत्येषु वसिष्ठो भगवानृषिः । विश्वामित्राभ्यनुज्ञातः सह सर्वैर्महर्षिभिः १७ एष वक्ष्यति धर्मात्मा वसिष्ठो मे यथाक्रमम् । तूष्णींभूते दशरथे वसिष्ठो भगवानृषिः १८ उवाच वाक्यं वाक्यज्ञो वैदेहं सपुरोधसम् । अव्यक्तप्रभवो ब्रह्मा शाश्वतो नित्य अव्ययः १९ तस्मान्मरीचिः संजज्ञे मरीचेः कश्यपः सुतः । विवस्वान्कश्यपाज्जज्ञे मनुर्वैवस्वतः

---

ह्याप्रमाणें जनक व कुशध्वज हे उभयतां अत्यंत तेजस्वी भ्राते आसनावर बसले असतां १० त्या वीरांनीं सुदामानामक श्रेष्ठ मंत्र्याला " हे मंत्रिपते, सत्वर जा आणि अत्यंत तेजस्वी व अजिंक्य अशा इक्ष्वाकुवंशज दशरथाला पुत्र आणि मंत्री ह्यांसहवर्तमान घेऊन ये" असा निरोप सांगून दशरथाकडे पाठविलें. अशी त्यांची आज्ञा झाल्यावर तो सुदामा मंत्रि दशरथाच्या शिबिरामध्यें गेला आणि रघुकुलवर्धक दशरथाला ११, १२ अवलोकन केल्यावर मस्तकानें प्रणाम करून त्याला ह्मणाला " हे अयोध्याधिपते वीरा, विदेहराज मिथिलाधिपति १३, उपाध्याय आणि पुरोहित ह्यांसहवर्तमान, आपली भेट घेण्याकरितां वाट पहात बसला आहे ". हें त्या श्रेष्ठ मंत्र्याचें भाषण श्रवण केल्यावर दशरथराजा ऋषिगण १४ आणि बांधव ह्यांसहवर्तमान जिकडे जनक होता तिकडे गेला आणि मंत्री, उपाध्याय व बांधव ह्यांसहवर्तमान तेथें गेलेला १५ वें वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला दशरथराजा विदेहराज जनकाला ह्मणाला " हे महाराज, इक्ष्वाकुवंशजांचे कुलदैवत वसिष्ठ हे आपणांला विदितच आहे १६. आमच्या कोणत्याही कार्यासंबंधानें काय बोलावयाचें तें बोलणार भगवान् वसिष्ठ ऋषि आहेत. तेव्हां सर्वमहर्षींसहवर्तमान विश्वामित्र मुनींची अनुज्ञा घेऊन १७ हे धर्मात्मे वसिष्ठ मुनि माझी वंशपरंपरा कथन करितील ". ह्याप्रमाणें सांगून दशरथ स्वस्थ बसला असतां संभाषण कसें करावें हें जाणणारे भगवान् वसिष्ठ ऋषि १८ पुरोहितासहवर्तमान बसलेल्या विदेहराज जनकाला ह्मणाले " (मायोपाधिक) ब्रह्मापासून शाश्वत, नित्य आणि अव्यय असा चतुर्मुख ब्रह्मदेव उत्पन्न झाला १९. त्या ब्रह्मदेवापासून मरीचि झाला व मरीचीचा पुत्र कश्यप

स्मृतः २० मनुः प्रजापतिः पूर्वमिक्ष्वाकुश्च मनोः सुतः । तमिक्ष्वाकुमयोध्यायां राजानं विद्धिपूर्वकम् २१ इक्ष्वाकोस्तु सुतः श्रीमान्कुक्षिरित्येव विश्रुतः । कुक्षेरथात्मजः श्रीमान्विकुक्षिरुदपद्यत २२ विकुक्षेस्तु महातेजा बाणः पुत्रः प्रतापवान् । बाणस्य तु महातेजा अनरण्यः प्रतापवान् २३ अनरण्यात्पृथुर्जज्ञे त्रिशङ्कुस्तु पृथोरपि । त्रिशङ्कोरभवत्पुत्रो धुन्धुमारो महायशाः २४ धुन्धुमारान्महातेजा युवनाश्वो महारथः । युवनाश्वसुतश्चासीन्मान्धाता पृथिवीपतिः २५ मान्धातुस्तु सुतः श्रीमान्सुसन्धिरुदपद्यत । सुसन्धेरपि पुत्रौ द्वौ ध्रुवसन्धिः प्रसेनजित् २६ यशस्वी ध्रुवसन्धेस्तु भरतो नाम नामतः । भरतात्तु महातेजा असितो नाम जायत २७ यस्यैते प्रतिराजान उदपद्यन्त शत्रवः । हैहयास्तालजङ्घाश्च शूराश्च शशबिन्दवः २८ तांश्च स प्रतियुध्यन्वै युद्धे राजा प्रवासितः । हिमवन्तमुपागम्य भार्याभ्यां सहितस्तदा २९ असितोऽल्पबलो राजा कालधर्ममुपेयिवान् । द्वे चास्य भार्ये गर्भिण्यौ बभूवतुरिति श्रुतिः ३० एका

होय. कश्यपापासून विवस्वान् झाला व मनु हा विवस्वानाचा पुत्र होय २०. मनु हा पूर्वींचा प्रजाधिपति होय. इक्ष्वाकु हा मनूला पुत्र झाला व तोच इक्ष्वाकु अयोध्यानगरींतील पहिला राजा होय असें तूं समज २१. इक्ष्वाकूला एक वैभवशाली पुत्र झाला तो कुक्षि ह्मणून प्रसिद्ध होता. कुक्षीपासून तसाच वैभवशाली विकुक्षि ह्मणून पुत्र झाला २२. महातेजस्वी व प्रतापी बाण हा विकुक्षीचा पुत्र होय. महातेजस्वी व प्रतापी अनरण्य हा बाणाचा पुत्र होय २३. अनरण्यापासून पृथु झाला; पृथूपासून त्रिशंकु झाला आणि त्रिशंकूला धुंधुमार ह्मणून एक महाकीर्तिमान् पुत्र झाला २४. धुंधुमाराला महातेजस्वी व महारथी असा युवनाश्व पुत्र झाला व पृथ्वीपति मांधाता हा युवनाश्वाला पुत्र झाला २५. मांधात्यापासून सुसंधि ह्मणून वैभवशाली पुत्र झाला व त्या सुसंधीलाही ध्रुवसंधि आणि प्रसेनजित् असे दोन पुत्र झाले २६. ध्रुवसंधीला भरत ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला एक यशस्वी पुत्र झाला व त्या भरतापासून महातेजस्वी असित उत्पन्न झाला २७. त्या असिताला हैहय, तालजंघ आणि शूर शशबिंदु हे राजे शत्रु उत्पन्न झाले २८. त्यांच्याशीं युद्ध करितां करितां संग्रामामध्यें असित राजाला त्यांनीं हाकून लाविलें; तेव्हां तो आपल्या उभयतां भार्यांसहवर्तमान हिमालयपर्वतावर जाऊन राहिला २९ व तो अशक्त असितराजा तेथें परलोकीं गेला. त्या वेळीं त्याच्या दोन्ही भार्या गर्भिणी होत्या असें ऐकण्यांत आहे ३०. त्यांपैकीं एकीनें आपल्या सवतीला तिच्या गर्भाचा नाश होण्या-

गर्भविनाशार्थं सपत्न्यै सगरं ददौ । ततः शैलवरे रम्ये बभूवाभिरतो मुनिः ३१ भार्गवश्च्यवनो नाम हिमवन्तमुपाश्रितः । तत्र चैका महाभागा भार्गवं देववर्चसम् ३२ ववन्दे पद्मपत्राक्षी काङ्क्षन्ती सुतमुत्तमम् । तमृषिं साभ्युपागम्य कालिन्दी चाभ्यवादयत् ३३ स तामभ्यवदद्विप्रः पुत्रेप्सुं पुत्रजन्मनि । तव कुक्षौ महाभागे सुपुत्रः सुमहाबलः ३४ महावीर्यो महातेजा अचिरात्संजनिष्यति । गरेण सहितः श्रीमान्मा शुचः कमलेक्षणे ३५ च्यवनं च नमस्कृत्य राजपुत्री पतिव्रता । पत्या विरहिता तस्मात्पुत्रं देवी व्यजायत ३६ सपत्न्या तु गरस्तस्यै दत्तो गर्भजिघांसया । सह तेन गरेणैव संजातः सगरोऽभवत् ३७ सगरस्यासमञ्जस्तु असमञ्जादथांशुमान् । दिलीपोंऽशुमतः पुत्रो दिलीपस्य भगीरथः ३८ भगीरथात्ककुत्स्थश्च ककुत्स्थाच्च रघुस्तथा । रघोस्तु पुत्रस्तेजस्वी प्रवृद्धः पुरुषादकः ३९ कल्माषपादोऽप्यभवत्तस्माज्जातस्तु शङ्खणः । सुदर्शनः शङ्खणस्य अग्निवर्णः सुदर्श-

करितां सविष अन्न घातलें. त्या वेळीं त्या रमणीय श्रेष्ठ पर्वतावर च्यवन भार्गव ह्मणून एक मुनि त्या हिमालयाचा आश्रय करून आनंदांत रहात होते. त्या ठिकाणीं ( ती सविष अन्न भक्षण केलेली ) एक महाभाग्यवती असिताची भार्या गेली ३१.३२ आणि उत्कृष्ट पुत्र प्राप्त व्हावा असा उद्देश मनांत धरून कमलपत्राप्रमाणें विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या स्त्रीनें त्यांना वंदन केलें. ह्याप्रमाणें समीप जाऊन कालिंदीनामक स्त्रीनें त्या ऋषींना अभिवंदन केलें असतां ३३ त्या पुत्रेच्छु स्त्रीला पुत्रोत्पत्तीविषयीं त्या ब्रह्मर्षींनीं असा आशीर्वाद दिला कीं " हे महाभाग्यवति, अत्यंत महाबलाढ्य, महावीर्यवान् आणि महातेजस्वी असा एक वंशवशाली सत्पुत्र लवकरच विषासहवर्तमान तुझ्या उदरीं येईल. हे कमलनयने, तूं शोक करूं नको ३४,३५. ह्याप्रमाणें आशीर्वाद मिळाल्यावर च्यवनभार्गव मुनींना त्या पतिव्रता राजकन्येनें नमस्कार केला आणि पुढें त्या पतिविरहित असलेल्या राजपत्नीला त्या मुनींच्या आशीर्वादानें पुत्र झाला ३६. गर्भाचा नाश करण्याच्या उद्देशानें सवतीनें जें तिला विष घातलें होतें त्या विषासहवर्तमानच तो पुत्र उत्पन्न झाला आणि ह्मणूनच सगर ह्या नांवानें तो प्रसिद्ध झाला ३७.असो. सगराचा असमंज हा पुत्र होय; असमंजापासून अंशुमान् ह्मणून पुत्र झाला; अंशुमानाला दिलीप ह्मणून पुत्र झाला व भगीरथ दिलीपाचा पुत्र होय ३८. भगीरथापासून ककुत्स्थ झाला; ककुत्स्थापासून रघु झाला; रघुला प्रवृद्ध ह्मणून एक तेजस्वी पुत्र झाला व तो ( पुढें ) राक्षस बनून ३९ ( पाय चित्रविचित्रवर्णाचे झाल्यामुळें ) कल्माषपाद ह्मणूनही प्रसिद्ध झाला. त्या कल्माषपादापासून शंखण झाला; शंखणाला सुदर्शन ह्मणून पुत्र झाला

नात् ४० शीघ्रगस्त्वग्निवर्णस्य शीघ्रगस्य मरुः सुतः। मरोः प्रशुश्रुकस्त्वासीदम्बरीषः प्रशुश्रुकात् ४१ अम्बरीषस्य पुत्रोभून्नहुषश्च महीपतिः। नहुषस्य ययातिस्तु नाभागस्तु ययातिजः ४२ नाभागस्य बभूवाज अजाद्दशरथोभवत्। अस्माद्दशरथाज्जातौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ४३ आदिवंशविशुद्धानां राज्ञां परमधर्मिणाम्। इक्ष्वाकुकुलजातानां वीराणां सत्यवादिनाम् ४४ रामलक्ष्मणयोरर्थे त्वत्सुते वरये नृप। सदृशाभ्यां नरश्रेष्ठ सदृशे दातुमर्हसि ४५ [ २०८७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे सप्ततितमः सर्गः ॥ ७० ॥

एवं ब्रुवाणं जनकः प्रत्युवाच कृताञ्जलिः। श्रोतुमर्हसि भद्रं ते कुलं नः परिकीर्तितम् १ प्रदाने हि मुनिश्रेष्ठ कुलं निरवशेषतः। वक्तव्यं कुलजातेन तन्निबोध महामते २ राजाभूत्त्रिषु लोकेषु विश्रुतः स्वेन कर्मणा। निमिः परमधर्मात्मा सर्वसत्त्ववतां वरः ३ तस्य पुत्रो मिथिर्नाम जनको मिथिपुत्रकः। प्रथमो जनको राजा जनकादप्युदावसुः ४ उदावसोस्तु धर्मा-

---

आणि सुदर्शनाला अग्निवर्ण ह्मणून पुत्र झाला ४०. शीघ्रग हा अग्निवर्णाचा पुत्र असून मरु हा शीघ्रगाचा पुत्र होय. मरुपासून प्रशुश्रुक झाला व प्रशुश्रुकापासून अंबरीष झाला ४१. नहुषराजा हा अंबरीषाचा पुत्र होय, ययाति हा नहुषाचा पुत्र होय व नाभाग हा ययातीचा पुत्र होय ४२. नाभागाला अज ह्मणून पुत्र झाला; अजापासून दशरथ झाला आणि या दशरथापासून भ्राते रामलक्ष्मण उत्पन्न झाले ४३. सारांश, ब्रह्मदेवापासून वंशानें शुद्ध, अत्यंत धार्मिक आणि इक्ष्वाकुवंशज असे जे सत्यवचनी व वीर राजे होऊन गेले ४४ त्यांचे संबंधी जे रामलक्ष्मण त्यांच्याकरितां, हे राजा, मी तुझ्या कन्या मागत आहें व, हे पुरुषश्रेष्ठा जनका, योग्य अशा रामलक्ष्मणांला अनुरूप अशा ह्या कन्या देणें तुला ही योग्य आहे ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिविरचित श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७० ॥

ह्याप्रमाणें वसिष्ठ बोलत असतां जनक हात जोडून त्यांना ह्मणाला " आपलें देव बरें करो. आतां आह्मीं आपल्या कुलाची परंपरा सांगतों ती आपण श्रवण करा १. हे मुनिश्रेष्ठ, कन्यादानसमयीं कुलीन पुरुषानें आपलें कुल इत्थंभूत सांगितलें पाहिजे. ह्यास्तव, हे महामते, आपण आमचें कुल श्रवण करा २. आपल्या पराक्रमानें त्रैलोक्यामध्यें प्रख्यात, अत्यंत धर्मात्मा आणि सर्व सामर्थ्यवानांमध्यें श्रेष्ठ असा एक निमि ह्मणून राजा होऊन गेला ३. त्याचा पुत्र मिथि होय. जनक ह्मणून त्या मिथीला पुत्र झाला. तोच आमच्या कुलांतील पहिला जनकराजा होय ( व त्याच्याचमुळें पुढील

त्मा जातो वै नन्दिवर्धनः । नन्दिवर्धसुतः शूरः सुकेतुर्नाम नामतः ५ सुकेतोरपि धर्मात्मा देवरातो महाबलः । देवरातस्य राजर्षेर्बृहद्रथ इति स्मृतः ६ बृहद्रथस्य शूरोऽभून्महावीरः प्रतापवान् । महावीरस्य धृतिमान्सुधृतिः सत्यविक्रमः ७ सुधृतेरपि धर्मात्मा धृष्टकेतुः सुधार्मिकः । धृष्टकेतोश्च राजर्षेर्हर्यश्व इति विश्रुतः ८ हर्यश्वस्य मरुः पुत्रो मरोः पुत्रः प्रतीन्धकः । प्रतीन्धकस्य धर्मात्मा राजा कीर्तिरथः सुतः ९ पुत्रः कीर्तिरथस्यापि देवमीढ इति स्मृतः । देवमीढस्य विबुधो विबुधस्य महीध्रकः १० महीध्रकसुतो राजा कीर्तिरातो महाबलः । कीर्तिरातस्य राजर्षेर्महारोमा व्यजायत ११ महारोम्णस्तु धर्मात्मा स्वर्णरोमा व्यजायत । स्वर्णरोम्णस्तु राजर्षेर्ह्रस्वरोमा व्यजायत १२ तस्य पुत्रद्वयं राज्ञो धर्मज्ञस्य महात्मनः । ज्येष्ठोऽहमनुजो भ्राता मम वीरः कुशध्वजः १३ मां तु ज्येष्ठं पिता राज्ये सोऽभिषिच्य पिता मम । कुशध्वजं समावेश्य भारं मयि वनं गतः १४ वृद्धे पितरि स्वर्याते धर्मेण धुरमावहम् । भ्रातरं देवसंकाशं स्नेहात्पश्यन्कुशध्वजम् १५ कस्यचित्त्वथ कालस्य सांका-

---

सर्व राजे जनक ह्मटले जातात ). जनकापासून उदावसु झाला ४; उदावसूपासून नंदिवर्धन ह्मणून एक धर्मात्मा पुत्र झाला. त्या नंदिवर्धनाला सुकेतु ह्या नांवानें प्रसिद्ध असलेला एक शूर पुत्र झाला ५. सुकेतूलाही पुढें महाबलाढ्य व धर्मनिष्ठ असा देवरात ह्मणून पुत्र झाला व त्या देवरात राजर्षीचा बृहद्रथ हा पुत्र होय ६. बृहद्रथाला महावीर ह्मणून एक शूर व प्रतापी पुत्र झाला व त्या महावीराला सुधृति ह्मणून एक धैर्यवान् व अमोघपराक्रमी पुत्र झाला ७. सुधृतीला अत्यंत धार्मिक व धर्मात्मा असा धृष्टकेतु ह्मणून पुत्र झाला व त्या धृष्टकेतुराजर्षीला हर्यश्व ह्मणून प्रख्यात असलेला पुत्र झाला ८. हर्यश्वाचा पुत्र मरु; मरूचा पुत्र प्रतींधक आणि प्रतींधकाचा पुत्र धर्मात्मा राजा कीर्तिरथ ९. कीर्तिरथाचा पुत्र देवमिढ ह्मणून प्रसिद्ध होता; देवमीढाचा पुत्र विबुध होय व महीध्रक हा विबुधाचा पुत्र होय १०. महाबलाढ्य कीर्तिरात राजा विबुधाचा पुत्र असून राजर्षि कीर्तिरातालामहारोमा ह्मणून पुत्र झाला ११. महारोम्याला स्वर्णरोमा ह्मणून एक धर्मात्मा पुत्र झाला व त्या राजर्षि स्वर्णरोम्याला ऱ्हस्वरोमा ह्मणून पुत्र झाला १२. त्या महात्म्या व धर्मवेत्त्या ऱ्हस्वरोम राजाचे दोन पुत्र. मी ज्येष्ठ आणि माझा कनिष्ठ भ्राता वीर कुशध्वज १३. माझ्या त्या पित्यानें मी ज्येष्ठ ह्मणून मला राज्याभिषेक केला आणि "ह्याचें संरक्षण कर" ह्मणून कुशध्वजाला माझे स्वाधीन करून तो माझा पिता वनांत चालता झाला १४. सारांश, पिता वृद्ध होऊन स्वर्गाला गेल्यावर देवतुल्य कुशध्वज भ्रात्याकडे

श्यादागतः पुरात् । सुधन्वा वीर्यवान्राजा मिथिलामवरोधकः १६ स च मे प्रेषयामास शैवं धनुरनुत्तमम् । सीता च कन्या पद्माक्षी मह्यं वै दीयतामिति १७ तस्याप्रदानान्महर्षे युद्धमासीन्मया सह । स हतो विमुखो राजा सुधन्वा तु मया रणे १८ निहत्य तं मुनिश्रेष्ठ सुधन्वानं नराधिपम् । सांकाश्ये भ्रातरं शूरमभ्यषिञ्चं कुशध्वजम् १९ कनीयानेष मे भ्राता अहं ज्येष्ठो महामुने । ददामि परमप्रीतो वध्वौ ते मुनिपुंगव २० सीतां रामाय भद्रं ते ऊर्मिलां लक्ष्मणाय वै । वीर्यशुल्कां मम सुतां सीतां सुरसुतोपमाम् २१ द्वितीयामूर्मिलां चैव त्रिर्वदामि न संशयः । ददामि परमप्रीतो वध्वौ ते मुनिपुंगव २२ रामलक्ष्मणयोः राजन्गोदानं कारयस्व ह । पितृकार्यं च भद्रं ते ततो वैवाहिकं कुरु २३ मघा ह्यद्य महाबाहो तृतीयदिवसे प्रभो । फल्गुन्यामुत्तरे राजंस्तस्मिन्वैवाहिकं कुरु ॥ रामलक्ष्मणयोरर्थे दानं कार्यं सुखोदयम् २४ [२१२१] इत्यार्षे श्रीमद्रामा-

---

प्रेमदृष्टि ठेवून धर्मानें मी राज्य करूं लागलों १५. ह्याला कांहीं दिवस लोटल्यावर सांकाश्य नगरापासून वीर्यवान् सुधन्वा राजा मिथिला नगरीला वेढा देण्याकरितां आला १६ व आल्यानंतर " अत्युत्कृष्ट त्र्यंबक चाप व कमलनयना कन्या सीता हीं मला द्यावीं " ह्मणून त्यानें मला निरोप पाठविला १७. परंतु, हे महर्षे, हीं दोन्हींही मीं त्याला न दिल्यामुळें त्याचें माझ्याशीं युद्ध आलें व संग्रामामध्यें तो राजा सुधन्वा पराजित होऊन माझ्या हातून मारला गेला १८. हे मुनिश्रेष्ठ, ह्याप्रमाणें त्या सुधन्व्याराजाचा वध केल्यावर मीं आपल्या कुशध्वजनामक शूर भ्रात्याला सांकाश्य नगराचा अधिपति केला १९. हे महामुने, हा माझा कनिष्ठ भ्राता असून मी ह्याचा ज्येष्ठ भ्राता आहें. आतां, हे मुनिश्रेष्ठ, मी अत्यंत प्रसन्न होऊन ह्या कन्या आपल्या स्वाधीन करितों २०. आपलें देव बरें करो. सीता रामाला आणि ऊर्मिला लक्ष्मणाला मी देतों. देवकन्येप्रमाणें असलेली माझी वीर्यशुल्का कन्या सीता मी रामाला देतों २१ आणि दुसरी ऊर्मिला लक्ष्मणाला देतों हें मी तीन वेळ निःसंशय सांगत आहें. हे मुनिश्रेष्ठ, मी आपल्या कन्या अत्यंत आनंदानें आपल्या स्वाधीन करितों २२. असो. हे राजा, आतां आपण रामलक्ष्मणांचा गोदानसंस्कार करावा; नंतर आपण नांदीश्राद्ध वगैरे करा आणि मग विवाहसंस्कार होऊं द्या. आपलें कल्याण असो २३. हे महापराक्रमी प्रभो, आज मघानक्षत्र आहे. तेव्हां आजपासून तिसऱ्या दिवशीं ह्मणजे उत्तराफल्गुनी नक्षत्रावर, हे राजा, आपण विवाहसंस्कार करावा आणि रामलक्ष्मणांचा अभ्युदय होण्याकरितां सुखावह अशीं कांहीं दानेंही आपण करावी २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत

यणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्ड एकसप्ततितमः सर्गः ॥ ७१ ॥

तमुक्तवन्तं वैदेहं विश्वामित्रो महामुनिः । उवाच वचनं वीरं वसिष्ठसहितो नृपम् १ अचिन्त्यान्यप्रमेयाणि कुलानि नरपुंगव । इक्ष्वाकूणां विदेहानां नैषां तुल्योऽस्ति कश्चन २ सदृशो धर्मसंबन्धः सदृशो रूपसंपदा । रामलक्ष्मणयो राजन्सीता चोर्मिलया सह ३ वक्तव्यं च नरश्रेष्ठ श्रूयतां वचनं मम । भ्राता यवीयान्धर्मज्ञ एष राजा कुशध्वजः ४ अस्य धर्मात्मनो राजन्रूपेणाप्रतिमं भुवि । सुताद्वयं नरश्रेष्ठ पत्न्यर्थं वरयामहे ५ भरतस्य कुमारस्य शत्रुघ्नस्य च धीमतः । वरये ते सुते राजंस्तयोरर्थे महात्मनोः ६ पुत्रा दशरथस्येमे रूपयौवनशालिनः । लोकपालसमाः सर्वे देवतुल्यपराक्रमाः ७ उभयोरपि राजेन्द्र संबन्धेनानुबध्यताम् । इक्ष्वाकुकुलमव्यग्रं भवतः पुण्यकर्मणः ८ विश्वामित्रवचः श्रुत्वा वसिष्ठस्य मते तदा । जनकः प्राञ्जलिर्वाक्यमुवाच मुनिपुंगवौ ९ कुलं धन्यमिदं मन्ये येषां तौ मुनिपुंगवौ । सदृशं कुलसंबन्धं यदाज्ञापयतः स्वयम् १०

---

श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥७१॥

ह्याप्रमाणें विदेहदेशाधिपति जनकराजानें सांगितलें असतां वसिष्ठांसहवर्तमान महामुनि विश्वामित्र त्या वीर राजाला ह्मणाले १ " हे पुरुषश्रेष्ठा, विदेह आणि इक्ष्वाकु ह्यांचीं कुलें अतर्क्य व अत्यंत योग्य आहेत ह्यांची बरोबरी करणारा कोणीही नाहीं २. रामलक्ष्मणांचा अनुक्रमें सीता व ऊर्मिला ह्यांच्याशीं संबंध होणें हा उभय कुलांना योग्य असून सौंदर्यसंपत्तीनेंही अनुरूपच होणारा आहे ३. आतां, हे पुरुषश्रेष्ठा, मला कांहीं बोलावयाचें आहे तें तू ऐकून घे. हा धर्मवेत्ता कुशध्वज राजा तुझा कनिष्ठ भ्राता होय ४. हे पुरुषश्रेष्ठा राजा, ह्या धर्मात्म्या कुशध्वजाच्या दोन कन्या रूपानें पृथ्वीमध्यें अप्रतिम आहेत. ह्या आह्मीं पत्नींकरितां मागत आहोंत ५. सारांश, हे राजा, राजकुमार भरत आणि बुद्धिमान् शत्रुघ्न ह्या महात्म्यांकरितां मी तुझ्या भ्रात्याच्या कन्या मागत आहें ६. सौंदर्य व यौवन ह्यांनीं संपन्न असलेले हे दशरथाचे पुत्र देवतुल्य पराक्रमी असून सर्वही लोकपालांची बरोबरी करणारे आहेत ७. हे राजाधिराज, तुमचें पुण्यवानांचें कुल आणि इक्ष्वाकुकुल हीं दोन्हीं कुलें मनापासून शरीरसंबंधानें एकमेकांशीं संबद्ध होऊं द्या " ८. हें वसिष्ठांच्या अनुमतानें विश्वामित्रांनीं केलेलें भाषण श्रवण केल्यावर जनकराजा हात जोडून त्या उभयतां मुनिश्रेष्ठांना ह्मणाला ९ " ज्यांच्या कुलाचा संबंध योग्य अशा इक्ष्वाकुकुलाशीं करण्याविषयीं मुनिश्रेष्ठ स्वतः आज्ञा करीत आहेत त्यांचें हें कुल आज मी धन्य समजत आहें १०. आपल्या आज्ञेप्रमाणें

एवं भवतु भद्रं वः कुशध्वजसुते इमे । पत्न्यौ भजेतां सहितौ शत्रुघ्नभरतावुभौ ११ एकाह्ना राजपुत्रीणां चतसृणां महामुने । पाणीन्गृह्णन्तु चत्वारो राजपुत्रा महाबलाः १२ उत्तरे दिवसे ब्रह्मन्फल्गुनीभ्यां मनीषिणः । वैवाहिकं प्रशंसन्ति भगो यत्र प्रजापतिः १३ एवमुक्त्वा वचः सौम्यं प्रत्युत्थाय कृताञ्जलिः । उभौ मुनिवरौ राजा जनको वाक्यमब्रवीत् १४ परो धर्मः कृतो मह्यं शिष्योऽस्मि भवतोस्तथा । इमान्यासनमुख्यानि आस्यतां मुनिपुंगवौ १५ यथा दशरथस्येयं तथायोध्या पुरी मम । प्रभुत्वे नास्ति संदेहो यथार्हं कर्तुमर्हथ १६ तथा ब्रुवति वैदेहे जनके रघुनन्दनः । राजा दशरथो हृष्टः प्रत्युवाच महीपतिम् १७ युवामसंख्येयगुणौ भ्रातरौ मिथिलेश्वरौ । ऋषयो राजसंघाश्च भवद्भ्यामभिपूजिताः १८ स्वस्ति प्राप्नुहि भद्रं ते गमिष्यामः स्वमालयम् । श्राद्धकर्माणि विधिवद्विधास्य इति चाब्रवीत् १९ तमापृष्ट्वा नरपतिं राजा दशरथस्तदा । मुनीन्द्रौ तौ

होऊं द्या; आपलें कल्याण असो. उभयतां भरतशत्रुघ्नांनीं ह्या कुशध्वजराजाच्या कन्यांचा भार्या ह्मणून स्वीकार करावा ११ आणि, हे महामुने, एकाच दिवशीं महाबलाढ्य चारी राजपुत्रांनीं चारी राजकन्यांचें पाणिग्रहण करावें १२. हे ब्रह्मन्, उत्तराफल्गुनी नक्षत्रावर ह्मणजे भग ही ज्या नक्षत्राची देवता आहे त्या नक्षत्रावर विद्वानांनीं विवाह प्रशस्त मानिला आहे" १३. ह्याप्रमाणें सौम्य भाषण केल्यावर जनकराजा उठला आणि हात जोडून त्या उभयतां मुनिश्रेष्ठांना ह्मणाला १४ " ( इक्ष्वाकुकुलाशीं संबंध करविल्यामुळें ) आपण मला पराकाष्ठेचें पुण्यसंपादन करून दिलें आहे व दशरथाप्रमाणें मीही ( आपल्या कनिष्ठ भ्रात्यासहवर्तमान ) आपला शिष्य आहें. करितां, ( तिन्हीं राज्यांचें आधिपत्य स्वीकारून ) आपण उभयतां मुनिश्रेष्ठांनीं ह्या तिन्ही सिंहासनांचा स्वीकार करावा १५. ज्याप्रमाणें दशरथराजा ह्या मिथिलानगरीचा पाहिजे तसा विनियोग करण्यास समर्थ आहे त्याचप्रमाणें मीही अयोध्यानगरीचा यथेष्ट विनियोग करण्यास मुकत्यार आहें. सारांश, तिन्हीं राज्यांचें प्रभु आपण आहांत ह्याविषयीं संशय नाहीं. करितां, आपण योग्य रीतीनें ह्या राज्यांचें आधिपत्य स्वीकारावें १६. ह्याप्रमाणें विदेहाधिपति जनकराजा विनंति करूं लागला असतां रघुवंशज दशरथराजा आनंदित होऊन जनक भूपतीला ह्मणाला १७ " तुह्मीं उभयतां मिथिलाधिपति भ्राते असंख्य गुणांनीं संपन्न आहांत व आपल्या कुलांतील ऋषितुल्य राजसमुदायांचा तुह्मीं ह्या विनयानें उद्धार केला आहे १८. तुला सुखप्राप्ति होवो व तुझें कल्याण असो. आह्मीं आतां स्वस्थानीं जातों आणि यथाविधि नांदीश्राद्ध

पुरस्कृत्य जगामाशु महायशाः २० स गत्वा निलयं राजा श्राद्धं कृत्वा विधानतः । प्रभाते काल्यमुत्थाय चक्रे गोदानमुत्तमम् २१ गवां शतसहस्रं च ब्राह्मणेभ्यो नराधिपः । एकैकशो ददौ राजा पुत्रानुद्दिश्य धर्मतः २२ सुवर्णशृङ्ग्यः संपन्नाः सवत्साः कांस्यदोहनाः । गवां शतसहस्राणि चत्वारि पुरुषर्षभः २३ वित्तमन्यच्च सुबहु द्विजेभ्यो रघुनन्दनः । ददौ गोदानमुद्दिश्य पुत्राणां पुत्रवत्सलः २४ ससुतैः कृतगोदानैर्वृतः सन्नृपतिस्तदा । लोकपालैरिवाभाति वृतः सौम्यः प्रजापतिः २५ [ २१४६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे द्विसप्ततितमः सर्गः ॥ ७२ ॥

यस्मिंस्तु दिवसे राजा चक्रे गोदानमुत्तमम् । तस्मिंस्तु दिवसे वीरो युधाजित्समुपेयिवान् १ पुत्रः केकयराजस्य साक्षाद्भरतमातुलः । दृष्ट्वा पृष्ट्वा च कुशलं राजानमिदमब्रवीत् २ केकयाधिपती राजा स्नेहात्कुशलमब्रवीत् । येषां कुशलकामोसि तेषां संप्रत्यनामयम् ३ स्वस्रीयं मम

---

वगैरे करितों " १९. ह्याप्रमाणें जनकराजाचा निरोप घेऊन तो महाकीर्तिमान् दशरथ राजा त्या मुनिश्रेष्ठांना पुढें घालून सत्वर तेथून निघाला २०. नंतर स्वगृहीं गेल्यावर त्यानें यथाविधि नांदीश्राद्ध केलें आणि दुसरे दिवशीं प्रभातकालीं उठून प्रातःकालामध्यें कर्तव्य असा आपल्या पुत्रांचा उत्कृष्ट गोदानसंस्कार त्यानें केला २१ व आपल्या पुत्रांकरितां त्या प्रजाधिपति दशरथराजानें धर्मबुद्धीनें प्रत्येक पुत्राबद्दल एक लक्ष अशा गाई ब्राह्मणांना दिल्या २२. सारांश, त्या पुरुषश्रेष्ठ दशरथानें सुवर्णशृंगें व विपुल दुग्ध ह्यांनीं युक्त असलेल्या चार लक्ष सवत्स गाई कांस्यधातूच्या दोहनपात्रांसहवर्तमान ब्राह्मणांना दिल्या २३. इतकेंच नव्हे परंतु, पुत्रांच्या गोदानसंस्काराबद्दल त्या पुत्रवत्सल रघुवंशज दशरथराजानें ब्राह्मणांना आणखीही इतर विपुल द्रव्य दिलें २४ आणि गोदानसंस्कार झालेल्या पुत्रांनीं तो दशरथराजा परिवेष्टित झाला असतां लोकपालानीं परिवेष्टित असलेल्या सौम्य प्रजापतीप्रमाणें दिसूं लागला २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं बाहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७२ ॥

ज्या दिवशीं दशरथराजानें आपल्या पुत्रांचा गोदानसंस्कार केला त्याच दिवशीं वीर युधाजित् तेथें आला १ आणि केकयराजाचा पुत्र व प्रत्यक्ष भरताचा मातुल असा तो युधाजित् राजाची भेट झाल्यानंतर कुशल प्रश्न करून त्याला ह्मणाला २ " केकयदेशाधिपति राजानें तुला प्रेमपूर्वक कुशल प्रश्न विचारिला आहे आणि ज्यांचें कुशल वृत्त समजण्याची तुला इच्छा आहे त्यांचें सांप्रत कुशल आहे असेंही त्यानें सांगितलें

राजेन्द्र द्रष्टुकामो महीपतिः । तदर्थमुपयातोहमयोध्यां रघुनन्दन ४ श्रुत्वा त्वहमयोध्यायां विवाहार्थं तवात्मजान् । मिथिलामुपयातांस्तु त्वया सह महीपते ५ त्वरयाभ्युपयातोहं द्रष्टुकामः स्वसुः सुतम् । अथ राजा दशरथः प्रियातिथिमुपस्थितम् ६ दृष्ट्वा परमसत्कारैः पूजनार्हमपूजयत् । ततस्तामुषितो रात्रिं सह पुत्रैर्महात्मभिः ७ प्रभाते पुनरुत्थाय कृत्वा कर्माणि तत्त्ववित् । ऋषींस्तदा पुरस्कृत्य यज्ञवाटमुपागमत् ८ युक्ते मुहूर्ते विजये सर्वाभरणभूषितैः । भ्रातृभिः सहितो रामः कृतकौतुकमङ्गलः ९ वसिष्ठं तु पुरस्कृत्वा महर्षीनपरानपि । वसिष्ठो भगवानेत्य वैदेहमिदमब्रवीत् १० राजा दशरथो राजन्कृतकौतुकमङ्गलैः । पुत्रैर्नरवरश्रेष्ठो दातारमभिकाङ्क्षते ११ दातृप्रतिग्रहीतृभ्यां सर्वार्थाः संभवन्ति हि । स्वधर्मं प्रतिपद्यस्व कृत्वा वैवाह्यमुत्तमम् १२ इत्युक्तः परमोदारो वसिष्ठेन महात्मना । प्रत्युवाच महातेजा वाक्यं परमधर्मवित् १३ कः स्थितः प्रतिहारो मे कस्याज्ञां संप्रतीक्षते । स्वगृहे को विचारोस्ति यथाराज्य-

---

आहे ३. हे रघुनंदना, माझ्या भाच्याला भेटण्याची केकयराजाला इच्छा झाली आहे आणि त्याकरितां मी अयोध्या नगरीलाही आलों ४. परंतु, अयोध्येमध्यें आल्यावर विवाहाकरितां आपले पुत्र आपणांबरोबर मिथिला नगरीला गेले असें ऐकून, हे भूपते ५, आपल्या भाच्याला भेटण्याकरितां मी सत्वर येथें आलों ". ह्याप्रमाणें युधाजितानें सांगितल्यावर प्रिय अथिति आला आहे असें मनांत आणून दशरथराजानें ६ त्या पूज्य अतिथीचें परम सत्कारपूर्वक पूजन केलें. नंतर महात्म्या पुत्रांसहवर्तमान ती रात्र काढिल्यावर ७ प्रभातकालीं दशरथराजा उठला आणि नित्य कर्में करून तो तत्त्ववेत्ता दशरथराजा ऋषींना पुढें घालून यज्ञशाळेसमीप आला ८; तों इतक्यांत सर्व प्रकारचे अलंकार धारण केलेल्या भ्रात्यांसहवर्तमान मंगलकारक असें स्वस्तिवाचन झालेला रामही वसिष्ठ आणि इतर महर्षि पुढें घालून योग्य अशा विजयमुहूर्तावर तेथें आला. ह्याप्रमाणें तेथें आल्यावर भगवान् वसिष्ठ विदेहराज जनकाला ह्मणाले ९,१० " हे राजा, हे पुरुषश्रेष्ठा, श्रेष्ठ दशरथराजा मंगलकारक स्वस्तिवाचन वगैरे झालेल्या पुत्रांसहवर्तमान कन्यादान करणाऱ्याची वाट पहात आहे ११. कारण, देणार व घेणार जुळल्यावर सर्व कांहीं गोष्टी तडीस जात असतात. करितां, उत्कृष्ट विवाहसंस्कार करून तूं आपलें कर्तव्य शेवटास ने " १२. ह्याप्रमाणें महात्म्या वसिष्ठांनीं त्याला सांगितलें असतां तो परम उदार, महातेजस्वी व मोठा धर्मवेत्ता जनकराजा त्यांना ह्मणाला १३ " सध्यां माझ्या दारावर द्वारपाल कोण आहे आणि तो कोणाच्या आज्ञेची वाट पहात आहे ? अहो,

मिदं तव १४ कृतकौतुकसर्वस्वा वेदिमूलमुपागताः । मम कन्या मुनिश्रेष्ठ दीप्ता वह्नेरिवार्चिषः १५ सद्योऽहं त्वत्प्रतीक्षोस्मि वेद्यामस्यां प्रतिष्ठितः। अविघ्नं क्रियतां सर्वं किमर्थं हि विलम्ब्यते १६ तद्वाक्यं जनकेनोक्तं श्रुत्वा दशरथस्तदा । प्रवेशयामास सुतान्सर्वानृषिगणानपि १७ ततो राजा विदेहानां वसिष्ठमिदमब्रवीत् । कारयस्व ऋषे सर्वामृषिभिः सह धार्मिक १८ रामस्य लोकरामस्य क्रियां वैवाहिकीं प्रभो । तथेत्युक्त्वा तु जनकं वसिष्ठो भगवानृषिः १९ विश्वामित्रं पुरस्कृत्य शतानन्दं च धार्मिकम् । प्रपामध्ये तु विधिवद्वेदिं कृत्वा महातपाः २० अलंचकार तां वेदिं गन्धपुष्पैः समन्ततः। सुवर्णपालिकाभिश्च चित्रकुम्भैश्च साङ्कुरैः २१ अङ्कुराढ्यैः शरावैश्च धूपपात्रैः सधूपकैः । शङ्खपात्रैः स्रुवैः स्रुग्भिः पात्रैरर्घ्यादिपूजितैः २२ लाजपूर्णैश्च पात्रीभिरक्षतैरपि संस्कृतैः । दर्भैः समैः समास्तीर्य विधिवन्मन्त्रपूर्वकम् २३ अग्निमाधाय तं वेद्यां विधिमन्त्रपुरस्कृतम् । जुहावाग्नौ महातेजा वसिष्ठो मुनिपुंगवः २४ ततः सीतां समानीय सर्वाभरणभूषिताम् । समक्षमग्नेः संस्थाप्य राघवाभिमुखे

---

आपल्या घरामध्यें प्रवेश करण्याला विचार तो कसला. हें राज्य जसें माझें आहे तसें आपलेंही आहे १४ हे मुनिश्रेष्ठ, वह्नीच्या दीप्त ज्वालांप्रमाणें तेजस्वी असलेल्या माझ्या कन्या विवाहसंबंधीं पुण्याहवाचन वगैरे सर्व आटोपून वेदीसमीप आल्या आहेत १५ आणि मीही ह्या वेदीमध्यें आपलीच वाट पहात बसलों आहें. तस्मात् , आतां सर्व निर्विघ्नपणें होऊं द्या. विनाकारण विलंब कशाकरितां ? " १६. ह्याप्रमाणें जनकानें केलेलें भाषण श्रवण केल्यावर दशरथराजानें आपलें पुत्र व सर्व ऋषिगण आंत घेतले १७. तदनंतर विदेहदेशाधिपति जनकराजा वसिष्ठांना ह्मणाला " हे धर्मनिष्ठ ऋषे, हे प्रभो, ऋषींसहवर्तमान आपण ह्या जगन्मोहक रामाचा संपूर्ण विवाहसंस्कार करावा ". ह्यानंतर भगवान् वसिष्ठऋषींनीं " ठीक आहे " असें जनकाला सांगितलें १८, १९ आणि विश्वामित्र व धर्मनिष्ठ शतानंद ह्यांना पुढाकार देऊन यज्ञमंडपामध्यें महातपस्वी वसिष्ठांनीं यथाविधि वेदि तयार करून २० ती वेदि सभोंवतीं गंधपुष्पांनीं भूषित केली. नंतर सोन्याचे मुठींच्या सुऱ्या, चित्रविचित्र वर्णांचे अंकुरांसहवर्तमान कुंभ २१, अंकुरांनीं युक्त असे परळ, धूपयुक्त धूपपात्र, शंखपात्रें, स्रुवे, दर्व्या, अर्घ्यादिकांनीं युक्त अशीं पात्रें २२, लाह्यांनीं भरलेलीं पात्रें व क्षतरहित आणि संस्कृत असे सारखे दर्भ हीं त्या वेदीवर यथाविधि समंत्रक ठेवून २३ व त्या वेदीवर यथाविधि व समंत्रक अग्नि सिद्ध करून मुनिश्रेष्ठ महातेजस्वी वसिष्ठांनीं अग्नीमध्यें हवन केलें २४.

तदा २५ अब्रवीज्जनको राजा कौसल्यानन्दवर्धनम् । इयं सीता मम सुता सहधर्मचरी तव २६ प्रतीच्छ चैनां भद्रं ते पाणिं गृह्णीष्व पाणिना। पतिव्रता महाभागा छायेवानुगता सदा २७ इत्युक्त्वा प्राक्षिपद्राजा मन्त्रपूतं जलं तदा । साधु साध्विति देवानामृषीणां वदतां तदा २८ देवदुन्दुभिनिर्घोषः पुष्पवर्षो महानभूत् । एवं दत्त्वा सुतां सीतां मन्त्रोदकपुरस्कृताम् २९ अब्रवीज्जनको राजा हर्षेणाभिपरिप्लुतः ।लक्ष्मणागच्छ भद्रं ते ऊर्मिलामुद्यतां मया ३० प्रतीच्छ पाणिं गृह्णीष्व मा भूत्कालस्य पर्ययः । तमेवमुक्त्वा जनको भरतं चाभ्यभाषत ३१ गृहाण पाणिं माण्डव्याः पाणिना रघुनन्दन । शत्रुघ्नं चापि धर्मात्मा अब्रवीन्मिथिलेश्वरः ३२ श्रुतकीर्तेर्महाबाहो पाणिं गृह्णीष्व पाणिना । सर्वे भवन्तः सौम्याश्च सर्वे सुचरितव्रताः ३३ पत्नीभिः सन्तु काकुत्स्था मा भूत्कालस्य पर्ययः । जनकस्य वचः श्रुत्वा पाणीन्पाणिभिरस्पृशन् ३४ चत्वारस्ते

---

तदनंतर सर्व अलंकार धारण केलेली अशी सीता आणून आणि तिला अग्निसमक्ष रामापुढें उभी करून २५ जनकराजा, कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या, रामाला ह्मणाला " ही माझी कन्या सीता तुझी सहधर्मचारिणी आहे २६. तुझें कल्याण असो. तूं हिचा स्वीकार करून आपल्या हातानें हिचें पाणि ग्रहण कर. ही महाभाग्यवती पतिव्रता छायेप्रमाणें सर्वदां तुला अनुसरून वागेल " २७. ह्याप्रमाणें रामाला सांगून जनकराजानें कन्यादानाचें समंत्रक उदक सोडिलें. तेव्हां देव आणि ऋषि " उत्तम उत्तम " ह्मणून ह्मणूं लागले असतां २८ मोठ्या पुष्पवर्षावाबरोबर देवदुंदुभींचा ध्वनि होऊं लागला. ह्याप्रमाणें समंत्रक व उदकपूर्वक सीतानामक कन्येचें दान करून २९ हर्षानें उचंबळूं लागलेला जनकराजा ह्मणाला " हे लक्ष्मणा, ये; तुझें कल्याण असो. मीं पुढें केलेल्या ह्या ऊर्मिलेचा ३० तूं स्वीकार कर आणि हिचें पाणिग्रहण कर. कालातिक्रमण होणें योग्य नाहीं " . ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगितल्यावर जनक राजा भरताला ह्मणाला ३१ " हे रघुनंदना, तूं आपल्या हातानें ह्या मांडवीचें पाणिग्रहण कर ". असें भरताला सांगितल्यानंतर तो धर्मात्मा मिथिलाधिपति जनकराजा शत्रुघ्नालाही ह्मणाला ३२ " हे महापराक्रमी शत्रुघ्ना, आपल्या हातानें तूं ह्या श्रुतकीर्तीचें पाणिग्रहण कर. तुह्मीं सर्व सौम्य असून सर्वांनींही उत्तम रीतीनें ब्रह्मचर्यव्रत परिपालन केलेलें आहे ३३. ह्याकरितां, आतां तह्मी ककुत्स्थकुलोत्पन्नांनीं सपत्नीक असावें. आतां कालविलंब नको ". ह्याप्रमाणें जनकराजाचें भाषण श्रवण केल्यावर वसिष्ठ मुनींच्या आज्ञेंत असलेल्या त्या चारी दशरथपुत्रांनीं चारी

चतसृणां वसिष्ठस्य मते स्थिताः। अग्निं प्रदक्षिणं कृत्वा वेदिं राजानमेव च ३५ ऋषींश्चापि महात्मानः सहभार्या रघूद्वहाः। यथोक्तेन ततश्चक्रुर्विवाहं विधिपूर्वकम् ३६ पुष्पवृष्टिर्महत्यासीदन्तरिक्षात्सुभास्वरा। दिव्यदुन्दुभिनिर्घोषैर्गीतवादित्रनिःस्वनैः ३७ ननृतुश्चाप्सरःसङ्घा गन्धर्वाश्च जगुः कलम्। विवाहे रघुमुख्यानां तदद्भुतमदृश्यत ३८ ईदृशे वर्तमाने तु तूर्योद्घुष्टनिनादिते। त्रिरग्निं ते परिक्रम्य ऊहुर्भार्या महौजसः ३९ अथोपकार्यं जग्मुस्ते सभार्या रघुनन्दनाः। राजाप्यनुययौ पश्यन्सर्षिसङ्घः सबान्धवः ४० [२१८६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः॥ ७३॥

अथ रात्र्यां व्यतीतायां विश्वामित्रो महामुनिः। आपृष्ट्वा तौ च राजानौ जगामोत्तरपर्वतम् १ विश्वामित्रे गते राजा वैदेहं मिथिलाधिपम्। आपृष्ट्वैव जगामाशु राजा दशरथः पुरीम् २ अथ राजा विदेहानां ददौ कन्याधनं बहु। गवां शतसहस्राणि बहूनि मिथिलेश्वरः ३ कम्बलानां च मुख्यानां क्षौमान्कोट्यम्बराणि च। हस्त्यश्वरथपादातं

कन्यांचें पाणिग्रहण केलें आणि अग्नि, वेदि, जनकराजा व ऋषि ह्यांना त्या महात्म्या रघुवंशजांनीं भार्यांसहवर्तमान प्रदक्षिणा केली व नंतर शास्त्रोक्त प्रकारानें त्यांनीं विधिपूर्वक विवाहकृत्य समाप्त केलें ३४, ३५, ३६. तेव्हां फारच उज्ज्वल अशी मोठी पुष्पवृष्टि आकाशांतून झाली; दिव्य दुंदुभींचा घोष कानीं येऊं लागला आणि गायन व वादन ह्यांचेंही ध्वनि ऐकूं येऊं लागले ३७. इतकेंच नव्हे परंतु अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले आणि रघुवंशजश्रेष्ठांच्या विवाहसमयीं गंधर्वही मधुर गायन करूं लागले. तेव्हां तो सर्वही प्रकार अद्भुत वाटूं लागला ३८. ह्याप्रमाणें जिकडे तिकडे वाद्यघोषांनीं दुमदुमून गेलें असतां त्या महातेजस्वी रघुवंशजांनीं भार्यांशीं विवाह केला ३९ आणि नंतर ते रघुनंदन भार्यांसहवर्तमान शिबिरामध्यें गेले असतां ऋषिसमुदाय व बांधव ह्यांसहवर्तमान दशरथराजाही त्यांचे मागोमाग शिबिरामध्यें गेला ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीतश्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं त्र्याहात्तरावा सर्ग समाप्त झाला॥ ७३॥

तदनंतर रात्र निघून गेल्यावर महामुनि विश्वामित्र त्या उभयतां राजांचा निरोप घेऊन उत्तर पर्वतावर गेले १ व विश्वामित्र गेल्यानंतर भूपति दशरथराजाही मिथिलाधिपति विदेहराज जनकाचा निरोप घेऊन सत्वर आपल्या नगरीकडे गेला २. तेव्हां विदेहराज मिथिलाधिपति जनकानें त्या कन्यांबरोबर विपुल द्रव्य दिलें; लक्षावधि

दिव्यरूपं स्वलंकृतम् ४ ददौ कन्याशतं तासां दासीदासमनुत्तमम् । हिरण्यस्य सुवर्णस्य मुक्तानां विद्रुमस्य च ५ ददौ राजा सुसंहृष्टः कन्याधनमनुत्तमम् । दत्त्वा बहुविधं राजा समनुज्ञाप्य पार्थिवम् ६ प्रविवेश स्वनिलयं मिथिलां मिथिलेश्वरः । राजाप्ययोध्याधिपतिः सह पुत्रैर्महात्मभिः ७ ऋषीन्सर्वान्पुरस्कृत्य जगाम सबलान्वितः । गच्छन्तं तु नरव्याघ्रं सर्षिसङ्घं सराघवम् ८ घोरास्तु पक्षिणो वाचो व्याहरन्ति समन्ततः । भौमाश्चैव मृगाः सर्वे गच्छन्ति स्म प्रदक्षिणम् ९ तान्दृष्ट्वा राजशार्दूलो वसिष्ठं पर्यपृच्छत । असौम्याः पक्षिणो घोरा मृगाश्चापि प्रदक्षिणाः १० किमिदं हृदयोत्कम्पि मनो मम विषीदति । राज्ञो दशरथस्यैतच्छ्रुत्वा वाक्यं महानृषिः ११ उवाच मधुरां वाणीं श्रूयतामस्य यत्फलम् । उपस्थितं भयं घोरं दिव्यं पक्षिमुखाच्च्युतम् १२ मृगाः प्रशमयन्त्येते संतापस्त्यज्यतामयम् । तेषां संवदतां तत्र वायुः प्रादुर्बभूव ह १३

---

गाई दिल्या ३; उत्तम उत्तम ऊर्णावस्त्रें लक्षावधि दिलीं; रेशमी वस्त्रेंही पुष्कळ दिलीं; सामान्य वस्त्रेंही कोडोगणतीं दिलीं; दिसण्यांत उत्कृष्ट आणि अलंकार घातलेले असे गज, अश्व, रथ व पदाति पुष्कळ दिले ४. त्या चौघींपैकीं प्रत्येकीबरोबर सख्या ह्मणून शंभर शंभर कन्या आणि उत्कृष्ट दास व दासी दिल्या आणि रौप्य, सुवर्ण, मोत्यें आणि पोंवळीं हीं तर कोडोगणतीं दिलीं ५ ह्याप्रमाणें त्या जनकराजानें अत्यंत संतुष्ट होऊन आणखीही उत्कृष्ट उत्कृष्ट धन कन्यांना दिलें आणि ह्याप्रमाणें अनेक प्रकारचें द्रव्य देऊन व दशरथराजाला निरोप देऊन ६ मिथिलाधिपति जनकराजा स्वस्थानीं ह्मणजे मिथिलेमध्यें प्रविष्ट झाला. तेव्हां, अयोध्याधिपति दशरथराजाही महात्मे सर्व पुत्र बरोबर घेऊन ७ व सर्व ऋषींना पुढें घालून सैन्यासहवर्तमान तेथून निघाला. परंतु, ऋषिगण आणि रामप्रभृति पुत्र ह्यांसहवर्तमान तो पुरुषश्रेष्ठ दशरथराजा जाऊं लागला असतां ८ त्याच्या आसमंताद्भागीं पक्षी भयंकर शब्द करूं लागले व पृथ्वीवरील सर्व पशु त्याला उजवी घालूनही जाऊं लागले ९. तेव्हां त्यांना अवलोकन करून नृपश्रेष्ठ दशरथ वसिष्ठांना ह्मणाला " पक्षी भयंकर शब्द करीत आहेत व घोर पशुही उजवी घालून जात आहेत १०. तेव्हां हृदय कंपित करणारें असें हें काय आहे ? माझ्या मनाला तर कांहीं सुचत नाहीं ". हें दशरथराजाचें भाषण श्रवण करून ११ महर्षि वसिष्ठ मधुर शब्दांनीं त्याला ह्मणाले " ह्याचें काय फल आहे हें श्रवण कर. पक्ष्यांच्या तोंडून जो हा अंतरिक्षामध्यें शब्द निघाला त्यानें घोर भय सुचविलें १२; परंतु, उजवी घालून जाणारे हे पशु तें भय शांत

कम्पयन्मेदिनीं सर्वां पातयंश्च महाद्रुमान् । तमसा संवृतः सूर्यः सर्वे नावेदिषुर्दिशः १४ भस्मना चावृतं सर्वं संमूढमिव तद्बलम् । वसिष्ठो ऋषयश्चान्ये राजा च ससुतस्तदा १५ ससंज्ञा इव तत्रासन्सर्वमन्यद्विचेतनम् । तस्मिंस्तमसि घोरे तु भस्मच्छन्नेव सा चमूः १६ ददर्श भीमसंकाशं जटामण्डलधारिणम् । भार्गवं जामदग्न्येयं राजा राजविमर्दनम् १७ कैलासमिव दुर्धर्षं कालाग्निमिव दुःसहम् । ज्वलन्तमिव तेजोभिर्दुर्निरीक्ष्यं पृथग्जनैः १८ स्कन्धे चासज्य परशुं धनुर्विद्युद्गणोपमम् । प्रगृह्य शरमुग्रं च त्रिपुरघ्नं यथा शिवम् १९ तं दृष्ट्वा भीमसंकाशं ज्वलन्तमिव पावकम् । वसिष्ठप्रमुखा विप्रा जपहोमपरायणाः २० संगता मुनयः सर्वे संजजल्पुरथो मिथः । कच्चित्पितृवधामर्षी क्षत्रं नोत्सादयिष्यति २१ पूर्वं क्षत्रवधं कृत्वा गतमन्युर्गतज्वरः । क्षत्रस्योत्सादनं भूयो न खल्वस्य चिकी-

---

करीत आहेत. करितां, तूं हें भय सोडून दे ". ह्याप्रमाणें त्यांचा संवाद चालला आहे तोंच सर्व पृथ्वी कंपित करणारा व मोठे मोठे वृक्ष उलथून पाडणारा असा वारा सुटला; सूर्य अंधकारानें आच्छादित झाला; दिशांचें भान कोणालाही राहिलें नाहीं १३,१४ व तें बरोबर असलेलें सैन्य तर अगदीं सर्व धुराळ्यानें आच्छादित होऊन अगदीं मूर्छित झाल्यासारिखें झालें. वसिष्ठ, इतर ऋषि आणि पुत्रांसहवर्तमान दशरथराजा १५ एवढेच कायते त्याठिकाणीं शुद्धीवर असल्यासारिखे दिसत होते; बाकी सर्व कांहीं मूर्छित झालें होतें व त्या घोर अंधकारामध्यें ती सेना तर धुराळ्यानें अच्छादित झाल्यासारिखीच दिसत होती १६ असो. इतक्यांत क्षत्रियनाशक व दिसण्यांतही भयंकर असा जटाधारी भार्गवपुत्र राम दशरथराजानें अवलोकन केला १७. तो कैलासपर्वताप्रमाणें धिप्पाड होता; तेजामुळें त्याच्या संमुख जाणेंही अशक्य होतें; प्रलयकालच्या अग्नीप्रमाणें तो दुःसह होता आणि तेजानें जळत असल्यामुळें सामान्य जनांनीं तर त्याच्याकडे पहाणेंही शक्य नव्हतें १८. खांद्यावर त्यानें परशु टाकलेला होता आणि विद्युल्लतांच्या समुदायाप्रमाणें अत्यंत तेजस्वी धनुष्य हातांत घेतलें असल्यामुळें त्रिपुरासुरनाशक धनुष्य धारण केलेल्या शिवाप्रमाणेंच तो दिसत होता १९. प्रज्वलित अग्निच कीं काय अशा त्या उग्रस्वरूप परशुरामाला अवलोकन केल्यावर वसिष्ठप्रभृति विप्र जप, होम वगैरेंच्या उद्योगास लागले २० आणि इतर सर्व मुनि एकत्र जमून आपआपल्यामध्यें पुटपुटूं लागले कीं " अहो, पित्याचा वध सहन न करणारा हा परशुराम क्षत्रियांचा उच्छेद करण्याच्या उद्देशानें तर येथें आला नाहीं नां? २१. अहो, पूर्वी क्षत्रियांचा वध केल्यामुळें ह्याचा क्रोध व संताप

र्षितम् २२ एवमुक्त्वार्घ्यमादाय भार्गवं भीमदर्शनम्। ऋषयो राम रामेति मधुरं वाक्यमब्रुवन् २३ प्रतिगृह्य तु तां पूजामृषिदत्तां प्रतापवान्। रामं दाशरथिं रामो जामदग्न्योऽभ्यभाषत २४ [ २२१० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः ॥ ७४ ॥

राम दाशरथे वीर वीर्यं ते श्रूयतेऽद्भुतम्। धनुषो भेदनं चैव निखिलेन मया श्रुतम् १ तदद्भुतमचिन्त्यं च भेदनं धनुषस्तथा। तच्छ्रुत्वाहमनुप्राप्तो धनुर्गृह्य परं शुभम् २ तदिदं घोरसंकाशं जामदग्न्यं महद्धनुः। पूरयस्व शरेणैव स्वबलं दर्शयस्व च ३ तदहं ते बलं दृष्ट्वा धनुषोऽप्यस्य पूरणे। द्वन्द्वयुद्धं प्रदास्यामि वीर्यश्लाघ्यमहं तव ४ तस्य तद्वचनं श्रुत्वा राजा दशरथस्तदा। विषण्णवदनो दीनः प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् ५ क्षत्ररोषात्प्रशान्तस्त्वं ब्राह्मणश्च महातपाः। बालानां मम पुत्राणामभयं दातुमर्हसि ६ भार्गवाणां कुले जातः स्वाध्यायव्रतशालिनाम्। सहस्राक्षे प्रति-

---

नाहींसा झाला होता; तथापि, पुनरपि क्षत्रियजाति उच्छिन्न करून टाकण्याचें तर ह्यानें मनामध्यें आणिलें नाहीं नां ?" २२. ह्याप्रमाणें आपआपसांत बोलून ऋषींनीं दिसण्यांत उग्र असलेल्या त्या भार्गवरामाचें, पूजासाहित्य आणून, पूजन केलें आणि, "हे राम, हे राम" असे मधुर शब्द त्याला उद्देशून ते उच्चारूं लागले २३. तेव्हां, प्रतापी जमदग्निपुत्र रामानें ऋषींनीं केलेल्या त्या पूजेचा स्वीकार केला आणि नंतर दाशरथि रामाशीं तो बोलूं लागला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं चौऱ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला॥७४॥

हे रामा, हे दाशरथे, हे वीरा, तुझें वीर्य अद्भुत आहे ह्मणून माझे ऐकण्यांत आहे व धनुष्य मोडणें वगैरे प्रकारही सर्व माझ्या कानावर आलेला आहे १. तूं जें त्याप्रमाणें ( अनायासानें ) धनुष्य मोडून टाकिलेंस तें कृत्य ( सामान्य जनाला ) मोठें अद्भुत व अतर्क्य ( वाटण्यासारखें ) झालें असल्यामुळें तें ऐकिल्यानंतर दुसरें चांगलें धनुष्य घेऊन मी आलों आहें २. करितां, दिसण्यांतही घोर असलेल्या ह्या प्रचंड जामदग्न्य धनुष्याला बाण लावूनच तूं आपलें सामर्थ्य मला दाखीव ३. सारांश, ह्या धनुष्याला बाण लावण्यावरून तुझें सामर्थ्य माझ्या अवलोकनांत आलें ह्मणजे मी तुझ्याशीं द्वंद्वयुद्ध करीन व वीर्याच्या दृष्टीनें तें द्वंद्वयुद्ध तुझ्या प्रशंसेसच पात्र होईल" ४. हें परशुरामाचें भाषण श्रवण केल्यावर दशरथराजा खिन्नवदन होऊन दीन झाला आणि हात जोडून त्याला ह्मणाला ५ "क्षत्रियांसंबंधानें जो तुझे ठिकाणीं क्रोध होता तो क्षत्रियांच्या वधानें नाहींसा करून तूं महातपस्वी ब्राह्मण शांत झाला आहेस.

ज्ञाय शस्त्रं प्रक्षिप्तवानसि ७ स त्वं धर्मपरो भूत्वा कश्यपाय वसुन्धराम् । दत्त्वा वनमुपागम्य महेन्द्रकृतकेतनः ८ मम सर्वविनाशाय संप्राप्तस्त्वं महामुने । न चैकस्मिन्हते रामे सर्वे जीवामहे वयम् ९ ब्रुवत्येवं दशरथे जामदग्न्यः प्रतापवान् । अनादृत्य तु तद्वाक्यं राममेवाभ्यभाषत १० इमे द्वे धनुषी श्रेष्ठे दिव्ये लोकाभिपूजिते । दृढे बलवती मुख्ये सुकृते विश्वकर्मणा ११ अनुसृष्टं सुरैरेकं त्र्यम्बकाय युयुत्सवे । त्रिपुरघ्नं नरश्रेष्ठ भग्नं काकुत्स्थ यत्त्वया १२ इदं द्वितीयं दुर्धर्षं विष्णोर्दत्तं सुरोत्तमैः १३ तदिदं वैष्णवं राम धनुः परपुरञ्जयम् । समानसारं काकुत्स्थ रौद्रेण धनुषा त्विदम् १४ तदा तु देवताः सर्वाः पृच्छन्ति स्म पितामहम् । शितिकण्ठस्य विष्णोश्च बलाबलनिरीक्षया १५ अभिप्रायं तु विज्ञाय देवतानां पितामहः । विरोधं जनयामास तयोः सत्यवतां वरः १६ विरोधे तु महद्युद्धमभवद्रोमहर्षणम् । शितिकण्ठस्य विष्णोश्च परस्परजयैषिणोः १७

---

ह्यास्तव, माझ्या बालवयी पुत्रांना अभयदान दे ६. वेदाध्ययनरूप व्रतानें संपन्न अशा भार्गवांच्या कुलामध्यें तूं उत्पन्न झालेला आहेस आणि ( अतःपर शस्त्र धारण करणार नाहीं अशी ) इंद्राचे संनिध प्रतिज्ञा करून तूं शस्त्राचा त्याग केला आहेस ७. तस्मात् , धर्माचरणाविषयीं तत्पर होऊन तूं कश्यपमुनीला पृथ्वी दिलीस आणि वनामध्यें जाऊन महेंद्रपर्वताचा आश्रय करून राहिलास ८. परंतु ( असें असतांनाही ) माझा सर्वस्वीं नाश करण्याकरितां, हे महामुने, तूं प्राप्त झाला आहेस. अरे, एका रामाचा तूं वध केलास तर आमच्यापैकीं कोणीही जिवंत रहाणार नाहीं " ९. ह्याप्रमाणें दशरथराजा विनंति करीत असतांना प्रतापी जमदग्निपुत्र परशुराम त्याच्या विनंतीचा अव्हेर करून रामाशींच बोलूं लागले कीं १० " हीं दोन श्रेष्ठ दिव्य धनुष्यें लोकमान्य, दृढ, बलाढ्य पुरुषालाच लवणारीं व उत्कृष्ट अशीं विश्वकर्म्यानें मोठ्या यत्नानें निर्माण केलीं होतीं ११. त्यांपैकीं युद्धाची इच्छा करणाऱ्या त्र्यंबकाला त्रिपुरनाशक असें एक धनुष्य देवांनीं पूर्वी दिलें होतें व, हे पुरुषश्रेष्ठा, ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, त्याचाच तूं भंग केलास १२. हे रामा, हें दुसरें धनुष्य दुःसह असून सुरश्रेष्ठांनीं विष्णूला दिलें होतें १३. तें हें वैष्णव धनुष्य शत्रुसमूहाचा पराजय करणारें असून, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, सामर्थ्यानें हें रुद्राच्या धनुष्याची बरोबरी करणारें आहे १४. ( त्रिपुरासुराचा वध झाला ) तेव्हां सर्व देवांनीं शिव आणि विष्णु ह्यांचें बलाबल समजण्याच्या उद्देशानें ब्रह्मदेवाला प्रश्न केला असतां १५ देवांचा अभिप्राय जाणून त्या सत्यवानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या ब्रह्मदेवानें त्या उभयतांमध्यें विरोध उत्पन्न

तदा तु जृम्भितं शैवं धनुर्भीमपराक्रमम् । हुंकारेण महादेवः स्तम्भितोथ त्रिलोचनः १८ देवैस्तदा समागम्य सर्षिसंघैः सचारणैः । याचितौ प्रशमं तत्र जग्मतुस्तौ सुरोत्तमौ १९ जृम्भितं तद्धनुर्दृष्ट्वा शैवं विष्णुपराक्रमैः । अधिकं मेनिरे विष्णुं देवाः सर्षिगणास्तथा २० धनू रुद्रस्तु संक्रुद्धो विदेहेषु महायशाः । देवरातस्य राजर्षेर्ददौ हस्ते ससायकम् २१ इदं च वैष्णवं राम धनुः परपुरंजयम् । ऋचीके भार्गवे प्रादाद्विष्णुः सन्यासमुत्तमम् २२ ऋचीकस्तु महातेजाः पुत्रस्याप्रतिकर्मणः । पितुर्मम ददौ दिव्यं जामदग्नेर्महात्मनः २३ न्यस्तशस्त्रे पितरि मे तपोबलसमन्विते । अर्जुनो विदधे मृत्युं प्राकृतां बुद्धिमास्थितः २४ वधमप्रतिरूपं तु पितुः श्रुत्वा सुदारुणम् । क्षत्रमुत्सादयं रोषाज्जातं जातमनेकशः २५ पृथिवीं चाखिलां प्राप्य कश्यपाय महात्मने । यज्ञस्यान्तेददं राम दक्षिणां पुण्यकर्मणे २६ दत्त्वा महेन्द्र निलयस्तपोबलसमन्वितः । श्रुत्वा तु धनुषो भेदं

केला १६ आणि विरोध उत्पन्न झाल्यावर परस्परांचा पराजय करण्याच्या इच्छेनें शिव आणि विष्णु ह्यांमध्यें शरीरावर रोमांच उठविणारें असें प्रचंड युद्ध सुरू झालें १७. तेव्हां विष्णूनें हुंकारानें तें भयंकर पराक्रम करणारें रुद्रधनुष्य जर्जर करून त्रिलोचन महादेवाचेंही स्तंभन केलें १८. तेव्हां, ऋषिगण आणि चारण ह्यांसहवर्तमान सर्व देवांनीं एकत्र होऊन त्या उभयतां सुरश्रेष्ठांची प्रार्थना केली असतां ते शांत झाले १९ आणि विष्णूच्या पराक्रमांनीं तें शैव धनुष्य जर्जर झाल्याचें अवलोकन करून ऋषिगणांसहवर्तमान देव विष्णूला अधिक मानूं लागले २०. असो. तें जर्जर झालेलें धनुष्य क्रुद्ध झालेल्या महाकीर्तिमान् रुद्रानें विदेहदेशामध्यें असलेल्या राजर्षि देवराताच्या हातीं बाणांसहवर्तमान दिलें २१. असो. हे रामा, शत्रुसमूहाचा पराजय करणारें हें वैष्णव धनुष्य त्या विष्णूनें भृगुपुत्र ऋचीकाला उत्कृष्ट ठेव ह्मणून दिलें २२. पुढें महातेजस्वी ऋचीकानें कोणालाही उलट दुःख न देणारा असा जो त्याचा पुत्र व माझा पिता महात्मा जमदग्नि त्याला हें दिव्य धनुष्य दिलें २३. पुढें त्या वैष्णवचापरूप शस्त्राचा त्याग केल्यावर तपःसामर्थ्यानें युक्त असलेल्याही माझ्या पित्याला यःकश्चित् समजून कार्तवीर्य अर्जुनानें त्याचा वध केला २४. तेव्हां, अत्यंत दारुण व अयोग्य असा पित्याचा वध झाल्याचें एकतांक्षणीं मीं फिरून फिरून उत्पन्न झालेली क्षत्रियजाति अनेक वेळां, उच्छिन्न करून टाकिली २५ आणि, हे रामा, ही संपूर्ण पृथ्वी प्राप्त झाल्यावर महात्म्या पुण्यकर्मी कश्यपाला ती यज्ञाचे शेवटीं दक्षिणा ह्मणून मीं देऊन टाकिली २६ व कश्यपाला पृथ्वी देऊन टाकून तपःसा-

ततोहं द्रुतमागतः २७ तदेव वैष्णवं राम पितृपैतामहं महत् । क्षत्रधर्मं पुरस्कृत्य गृह्णीष्व धनुरुत्तमम् २८ योजयस्व धनुःश्रेष्ठे शरं परपुरञ्जयम् । यदि शक्नोमि काकुत्स्थ द्वन्द्वं दास्यामि ते ततः२९[२२३९]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये बालकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः ॥७५॥

श्रुत्वा तु जामदग्न्यस्य वाक्यं दाशरथिस्तदा । गौरवाद्यन्त्रितकथः पितू राममथाब्रवीत् १ श्रुतवानसि यत्कर्म कृतवानसि भार्गव । अनुरुध्यामहे ब्रह्मन्पितुरानृण्यमास्थितः २ वीर्यहीनमिवाशक्तं क्षत्रधर्मेण भार्गव। अवजानासि मे तेजः पश्य मेद्य पराक्रमम् ३ इत्युक्त्वा राघवः क्रुद्धो भार्गवस्य वरायुधम् । शरं च प्रतिजग्राह हस्ताल्लघुपराक्रमः ४ आरोप्य स धनू रामः शरं सज्यं चकार ह । जामदग्न्यं ततो रामं रामः क्रुद्धोऽब्रवीदिदम् ५ ब्राह्मणोसीति पूज्यो मे विश्वामित्रकृतेन च । तस्माच्छक्तो

---

मर्थ्यानें युक्त असलेला मी महेंद्रपर्वताचा आश्रय करून राहिलों. परंतु तूं धनुष्याचा भंग केलास हें एकतांक्षणीं मी तेथून सत्वर आलों आहें २७. सारांश, हे रामा, हें प्रचंड वैष्णव धनुष्य पितृपितामहपरंपरेनें मला प्राप्त झालेलें आहे. करितां, क्षत्रधर्माला स्मरून तूं हें उत्कृष्ट धनुष्य घे २८ आणि ह्या श्रेष्ठ धनुष्याला शत्रुसमूहनाशक असा बाण तूं लाव. सारांश, ह्या धनुष्याला बाण लावण्यास तूं समर्थ झालास ह्मणजे, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, मी तुझ्याशीं द्वंद्व युद्ध करीन २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७५ ॥

ह्याप्रमाणें जमदग्निपुत्र परशुरामाचें भाषण श्रवण केल्यावर दाशरथि राम, पिता संनिध असल्यामुळें उच्चस्वरानें न बोलतां, नम्रपणानें परशुरामाला ह्मणाला १ " हे भार्गवा, हे ब्रह्मन्, मी त्र्यंबकचाप मोडिल्याचें तूं ऐकिलें असशील आणि पित्याच्या ऋणांतून मुक्त होण्याकरितां तूं जें कर्म केलेंस तेंही आह्मांला कबूल आहे २; परंतु, हे भार्गवा, क्षत्रधर्मानें संपन्न असलेल्या माझा, वीर्यहीन अशक्ताप्रमाणें, तूं अवमान करीत आहेस हें मात्र आह्मांला खपत नाहीं. करितां, आज माझें तेज व पराक्रम तूं पहा " ३. ह्याप्रमाणें सांगून त्या क्रुद्ध झालेल्या शीघ्रपराक्रमी रघुवंशज रामानें भार्गवाचें धनुष्य व बाण ह्यांचा स्वीकार केला ४ आणि धनुष्याला प्रत्यंचा चढवून रामानें त्याला बाणही लाविला. नंतर दाशरथि राम क्रुद्ध होऊन त्या जमदग्निपुत्र परशुरामाला ह्मणाला ५ " तूं ब्राह्मण आहेस ह्मणून मला पूज्य आहेस एतदर्थ आणि विश्वामित्रां ( च्या भगिनीचा पौत्र आहेस ह्मणून त्या ) करितां, हे रामा, मी तुझ्यावर प्राण-

न ते राम मोक्तुं प्राणहरं शरम् ६ इमां वा त्वद्गतिं राम तपोबलसमर्जितान्। लोकानप्रतिमान्वापि हनिष्यामीति मे मतिः ७ न ह्ययं वैष्णवो दिव्यः शरः परपुरञ्जयः। मोघः पतति वीर्येण बलदर्पविनाशनः ८ वरायुधधरं रामं द्रष्टुं सर्षिगणाः सुराः। पितामहं पुरस्कृत्य समेतास्तत्र सर्वशः ९ गन्धर्वाप्सरसश्चैव सिद्धचारणकिंनराः। यक्षराक्षसनागाश्च तद्द्रष्टुं महदद्भुतम् १० जडीकृते तदालोके रामे वरधनुर्धरे। निर्वीर्यो जामदग्न्योसौ रामो राममुदैक्षत ११ तेजोभिर्गतवीर्यत्वाज्जामदग्न्यो जडीकृतः। रामं कमलपत्राक्षं मन्दमन्दमुवाच ह १२ काश्यपाय मया दत्ता यदा पूर्वं वसुंधरा। विषये मे न वस्तव्यमिति मां काश्यपोब्रवीत् १३ सोहं गुरुवचः कुर्वन्पृथिव्यां न वसे निशाम्। तदाप्रभृति काकुत्स्थ कृता मे काश्यपस्य ह १४ तामिमां मद्गतिं वीर हन्तुं नार्हसि राघव। मनोजवं गमिष्यामि महेन्द्रं पर्वतोत्तमम् १५ लोकास्त्वप्रतिमा राम

---

घातक बाण सोडण्यास असमर्थ आहें ६. तेव्हां, हे भार्गवरामा, ही तुझी गति ( ह्मणजे पाय ) अथवा तपःसामर्थ्यानें संपादित केलेले अप्रतिम लोक नाहींसे करावे असें मला वाटतें ७. कारण, स्वसामर्थ्यानें शत्रूंचा, बलाविषयीं, गर्व नाहींसा करून शत्रुसमूहांचाही नाश करणारा हा दिव्य वैष्णव बाण व्यर्थ पडणार नाहीं " ८. ह्याप्रमाणें दाशरथि राम परशुरामाला उद्देशून भाषण करीत असतांना तें श्रेष्ठ वैष्णव धनुष्य धारण केलेल्या रामाला अवलोकन करण्याकरितां ऋषिगणांसहवर्तमान सर्व देव ब्रह्मदेवाला पुढें करून त्या ठिकाणीं आले ९ आणि तो मोठा अद्भुत प्रकार अवलोकन करण्याकरितां गंधर्व, अप्सरा, सिद्ध, चारण, किन्नर, यक्ष, राक्षस आणि नाग हेही तेथें जुळले १०. नंतर श्रेष्ठ धनुष्य धारण करणाऱ्या दाशरथिरामाचे ठिकाणीं भार्गवरामामध्यें असलेलें तेज प्रविष्ट झाल्यामुळें भार्गवराम केवल जड झाला आणि नंतर निर्वीर्य बनलेला तो जमदग्निपुत्र राम दाशरथिरामाकडे पाहूं लागला ११. सारांश, तेज रामाचे ठिकाणीं गेल्या कारणानें निर्वीर्य झालेला आणि ह्मणूनच जड बनलेला जमदग्निपुत्र परशुराम कमलनयन रामाला हळूं हळूं ह्मणाला १२ " मी जेव्हां पूर्वी काश्यपाला पृथ्वी दिली, तेव्हां ( हा रात्रीं पृथ्वीवर राहिला असतां क्षत्रियांना झोंप येणार नाहीं असें समजून ) " माझ्या प्रदेशामध्यें तूं राहूं नकोस " ह्मणून मला काश्यपानें सांगितलें १३. तेव्हांपासून, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, गुरूंची आज्ञा परिपालन करण्याकरितां मी रात्रीं पृथ्वीवर वास्तव्य करीत नाहीं. कारण, काश्यपासंनिध मीं तशीच प्रतिज्ञा केलेली आहे १४. तस्मात्, ती ही माझी गति तूं नाहींशी करूं नकोस. ह्मणजे, हे वीरा

निर्जितास्तपसा मया । जहि ताञ्छरमुख्येन मा भूत्कालस्य पर्ययः १६ अक्षय्यं मधुहन्तारं जानामि त्वां सुरेश्वरम् । धनुषोऽस्य परामर्शात्स्वस्ति तेऽस्तु परन्तप १७ एते सुरगणाः सर्वे निरीक्षन्ते समागताः । त्वामप्रतिमकर्माणमप्रतिद्वन्द्वमाहवे १८ न चेयं तव काकुत्स्थ व्रीडा भवितुमर्हति । त्वया त्रैलोक्यनाथेन यदहं विमुखीकृतः १९ शरमप्रतिमं राम मोक्तुमर्हसि सुव्रत । शरमोक्षे गमिष्यामि महेन्द्रं पर्वतोत्तमम् २० तथा ब्रुवति रामे तु जामदग्न्ये प्रतापवान् । रामो दाशरथिः श्रीमांश्चिक्षेप शरमुत्तमम् २१ स हतान्दृश्य रामेण स्वाँल्लोकांस्तपसार्जितान् । जामदग्न्यो जगामाशु महेन्द्रं पर्वतोत्तमम् २२ ततो वितिमिराः सर्वा दिशश्चोपदिशस्तथा । सुराः सर्षिगणा रामं प्रशशंसुरुदायुधम् २३ रामं दाशरथिं रामो जामदग्न्यः प्रपूजितः । ततः प्रदक्षिणीकृत्य जगामात्मगतिं प्रभुः २४ [२२६३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्ये बालकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः ॥ ७६ ॥

---

राघवा, मी मनोवेगानें महेंद्रनामक श्रेष्ठ पर्वतावर जाईन १५. हे रामा, तपश्चर्येच्या योगानें मीं अप्रतिम लोक संपादन केलेले आहेत ते तूं ह्या श्रेष्ठ बाणानें खुशाल नाहींसे कर कसा. आतां विलंब नको १६. हें धनुष्य ग्रहण केल्यावरून मी तुला अक्षय्य असा सुरश्रेष्ठ विष्णु समजत आहें. हे शत्रुतापना, तुझें कल्याण असो १७. हे सर्व देवगण येथें आले आहेत व संग्रामामध्यें ज्याला प्रतियोद्धा नाहीं व ज्याच्या पराक्रमालाही तोड नाहीं अशा तुला अवलोकन करीत आहेत १८. हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, तूं त्रैलोक्यनाथानें मला पराजित केलेंस ह्मणून तुझ्यासंबंधानें मला लाज बाळगण्याचें कारण नाहीं १९. हे सदाचरणसंपन्न रामा, तूं आतां हा अप्रतिम बाण सोड; तो तूं सोडिलास ह्मणजे मी महेंद्रसंज्ञक श्रेष्ठ पर्वतावर चालता होईन ” २०. ह्याप्रमाणें जमदग्निपुत्र परशुराम सांगत असतांना प्रतापी व वैभवशाली दाशरथि रामानें तो उत्कृष्ट बाण सोडिला २१. तेव्हां, तपानें संपादन केलेले आपले लोक रामानें नाहींसे केलेले पाहून जमदग्निपुत्र परशुराम श्रेष्ठ अशा महेंद्रपर्वतावर सत्वर चालता झाला २२. तदनंतर सर्व दिशा व उपदिशा अंधकाररहित झाल्या आणि ऋषिगणांसहवर्तमान देवांनीं धनुर्धारी रामाची प्रशंसा केली २३. नंतर दाशरथि रामानें परशुरामाचें पूजन केल्यावर तो समर्थ परशुरामही दाशरथि रामाला उजवी घालून स्वस्थानीं गेला २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं शाहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७६ ॥

गते रामे प्रशान्तात्मा रामो दाशरथिर्धनुः। वरुणायाप्रमेयाय ददौ हस्ते महायशाः १ अभिवाद्य ततो रामो वसिष्ठप्रमुखानृषीन्। पितरं विकलं दृष्ट्वा प्रोवाच रघुनन्दनः २ जामदग्न्यो गतो रामः प्रयातु चतुरङ्गिणी। अयोध्याभिमुखी सेना त्वया नाथेन पालिता ३ रामस्य वचनं श्रुत्वा राजा दशरथः सुतम्। बाहुभ्यां संपरिष्वज्य मूर्ध्न्युपाघ्राय राघवम् ४ गतो राम इति श्रुत्वा हृष्टः प्रमुदितो नृपः। पुनर्जातं तदा मेने पुत्रमात्मानमेव च ५ चोदयामास तां सेनां जगामाशु ततः पुरीम्। पताकाध्वजिनीं रम्यां तूर्योद्घुष्टनिनादिताम् ६ सिक्तराजपथां रम्यां प्रकीर्णकुसुमोत्कराम्। राजप्रवेशसुमुखैः पौरैर्मङ्गलपाणिभिः ७ संपूर्णां प्राविशद्राजा जनौघैः समलंकृताम्। पौरैः प्रत्युद्गतो दूरं द्विजैश्च पुरवासिभिः ८ पुत्रैरनुगतः श्रीमाञ्छ्रीमद्भिश्च महायशाः। प्रविवेश गृहं राजा हिमवत्सदृशं प्रियम्॥ ननन्द स्वजनै राजा गृहे कामैः सुपूजितः ९ कौसल्या च सुमित्रा च कैकयी च सुमध्यमा। वधू-

---

परशुराम गेल्यावर दाशरथि रामाचें मन शांत झालें व त्या महाकीर्तिमान् रामानें तें धनुष्य तेथें आलेल्या अचिंत्यसामर्थ्यवान् वरुणाच्या हातांत दिलें १. नंतर वसिष्ठप्रभृति ऋषींना अभिवंदन केल्यावर खिन्न झालेल्या पित्याला अवलोकन करून रघुनंदन राम ह्मणाला २ " जामदग्न्य राम गेला. आतां आपण प्रभूंनीं रक्षण केलेली ही चतुरंग सेना अयोध्येकडे वळून चालूं लागूं द्या " ३. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर दशरथराजानें आपल्या रघुवंशज पुत्राला बाहूंनीं आलिंगन देऊन त्याचें मस्तक हुंगिलें ४. कारण, परशुराम गेला हें ऐकिल्या बरोबर दशरथराजाला हर्ष व आनंद झाला आणि पुत्राचा व आपला पुनर्जन्म झाला असेंही त्याला वाटलें ५. तदनतर सेनेला चालूं लागण्याची आज्ञा करून तो दशरथ सत्वर आपल्या अयोध्या नगरीकडे चालता झाला ६. ती रम्य नगरी पताका व ध्वज ह्यांनीं युक्त असून वाद्यघोषानें दुमदुमून गेलेली होती व राजमार्गावर सडा घातलेला असल्यामुळें आणि पुष्पांचे ढीग ठिकठिकाणीं पसरले असल्यामुळें ती मनोहर दिसत होती ७. राजाचा प्रवेश होणार असल्यामुळें ज्यांचीं मुखकमलें प्रफुल्लित झालीं आहेत व ज्यांनीं आपल्या हातामध्यें मंगलकारक पदार्थ घतलेले आहेत अशा नगरवासी जनांनीं ती परिपूर्ण असून इतरही जनसमुदायांनीं ती भूषित झालेली होती व अशा नगरीमध्यें राजानें प्रवेश केला ८. नगरांत राहणारे द्विज आणि इतरही नगरवासी जन हे दूरपर्यंत ज्याला सामोरे गेले आहेत आणि ज्याच्या मागोमाग वैभवशाली पुत्र येत आहेत असा तो महाकीर्तिमान् व श्रीमान् राजा हिमालयपर्वताप्रमाणें असलेल्या आपल्या प्रिय गृहामध्यें प्रविष्ट झाला आणि गृहामध्यें स्वजनांनीं इष्ट वस्तु देऊन त्याचा उत्तम प्रकारें संमान केल्यामुळें तो आनंदित झाला ९ व कौसल्या, सुमित्रा, सुंदरी कैकेयी आणि इतरही राजभार्या स्नुषांचें स्वागत करण्याकडे

प्रतिग्रहे युक्ता याश्चान्या राजयोषितः १० ततः सीतां महाभागामूर्मिलां च यशस्विनीम् । कुशध्वजसुते चोभे जगृहुर्नृपयोषितः ११ मङ्गलालापनैर्होमैः शोभिताः क्षौमवाससः । देवतायतनान्याशु सर्वास्ताः प्रत्यपूजयन् १२ अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वा राजसुतास्तदा । रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिर्मुदिता रहः १३ कृतदाराः कृतास्त्राश्च सधनाः ससुहृज्जनाः । शुश्रूषमाणाः पितरं वर्तयन्ति नरर्षभाः १४ कस्यचित्त्वथकालस्य राजा दशरथः सुतम् । भरतं कैकयीपुत्रमब्रवीद्रघुनन्दनः १५ अयं केकयराजस्य पुत्रो वसति पुत्रक । त्वां नेतुमागतो वीरो युधाजिन्मातुलस्तव १६ श्रुत्वा दशरथस्यैतद्भरतः कैकयीसुतः । गमनायाभिचक्राम शत्रुघ्नसहितस्तदा १७ आपृच्छ्य पितरं शूरो रामं चाक्लिष्टकारिणम् । मातृश्चापि नरश्रेष्ठः शत्रुघ्नसहितो ययौ १८ युधाजित्प्राप्य भरतं सशत्रुघ्नं प्रहर्षितः । स्वपुरं प्राविशद्वीरः पिता तस्य तुतोष ह १९ गते च च भरते रामो लक्ष्मणश्च महाबलः । पितरं देवसंकाशं पूजयामासतुस्तदा २० पितुराज्ञां पुरस्कृत्य पौरकार्याणि सर्वशः । चकार रामः सर्वाणि प्रियाणि च हितानि च २१ मातृभ्यो मातृकार्याणि कृत्वा परमयन्त्रितः । गुरूणां गुरुका-

गेलल्या १०. तदनंतर महाभाग्यवती सीता, यशस्विनी ऊर्मिला आणि मांडवी व श्रुतकीर्ति ह्या ज्या उभयतां कुशध्वजराजाच्या कन्या त्यांचें राजभार्यांनीं स्वागत केलें ११. आशीर्वाद प्राप्त झालेल्या व गृहप्रवेशनीय होम झाल्यामुळें कल्याणसंपन्न होऊन क्षौमवस्त्र परिधान केलेल्या सर्वही राजकन्यांनीं देवस्थानांना सत्वर प्रणाम केले १२; नंतर पूज्यांना अभिवंदन करून त्या सर्वही राजकन्या आनंदित झाल्या आणि भर्त्यासहवर्तमान त्या एकांतामध्यें आनंद पावूं लागल्या १३. भार्या, अस्त्रें, धन आणि सुहृद् ह्यांनीं युक्त असलेले ते पुरुषश्रेष्ठ रामप्रभृति दशरथपुत्र पित्याच्या सेवेमध्यें तत्पर राहून त्याच्या आज्ञेप्रमाणें वागत असत १४. ह्याला कांहीं दिवस लोटल्यावर कैकयीपासून झालेल्या आपल्या भरतनामक पुत्राला रघुनंदन दशरथराजा ह्मणाला १५ " मुला, हा केकयराजाचा पुत्र वीर युधाजित तुझा मातुल तुला नेण्याकरितां येथें येऊन राहिला आहे " १६. हें दशरथाचें भाषण श्रवण केल्यावर कैकयीपुत्र भरत शत्रुघ्नाला बरोबर घेऊन जाण्यास निघाला १७ आणि पिता, कोणाला कधींही न दुखविणारा राम व सर्व माता ह्यांचा निरोप घेऊन तो पुरुषश्रेष्ठ शूर भरत शत्रुघ्नासहवर्तमान चालता झाला १८. भरत शत्रुघ्न बरोबर आल्यामुळें युधाजिताला हर्ष झाला आणि तो वीर आपल्या नगरांत प्रविष्ट झाल्यावर त्याचा पिताही संतुष्ट झाला १९. असो. भरत गेल्यावर राम व महाबलाढ्य लक्ष्मण हे उभयतां आपल्या देवतुल्य पित्याची मानमान्यता ठेवूं लागले २० आणि पित्याच्या आज्ञेनें राम, प्रिय आणि हितावह, अशीं सर्व लोकांचीं कामें सर्व प्रकारें करूं लागला २१; मातांचीं जीं कार्यें

र्याणि काले कालेन्ववैक्षत २२ एवं दशरथः प्रीतो ब्राह्मणा नैगमास्तथा । रामस्य शीलवृत्तेन सर्वे विषयवासिनः २३ तेषामतियशा लोके रामः सत्यपराक्रमः । स्वयंभूरिव भूतानां बभूव गुणवत्तरः २४ रामश्च सीतया सार्धं विजहार बहूनृतून् । मनस्वी तद्गतमनास्तस्या हृदि समर्पितः २५ प्रिया तु सीता रामस्य दाराः पितृकृता इति । गुणाद्रूपगुणाच्चापि प्रीतिर्भूयोभिवर्धते २६ तस्याश्च भर्ता द्विगुणं हृदये परिवर्तते । अन्तर्गतमपि व्यक्तमाख्याति हृदयं हृदा २७ तस्य भूयो विशेषेण मैथिली जनकात्मजा । देवताभिः समा रूपे सीता श्रीरिव रूपिणी २८ तया स राजर्षिसुतोभिकामया समेयिवानुत्तमराजकन्यया । अतीव रामः शुशुभे मुदान्वितो विभुः श्रिया विष्णुरिवामरेश्वरः २९ [ २२९२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये चतुर्विंशतिसाहस्र्यां संहितायां बालकाण्डे रामक्रीडाख्यानं नाम सप्तसप्ततितमः सर्गः ॥ ७७ ॥ समाप्तमिदं बालकाण्डम् ॥ १ ॥

---

असतील तीं तो त्यांच्याकरितां करूं लागला आणि श्रुतिस्मृतींची मर्यादा यत्किंचितूही उल्लंघन न करणारा तो राम गुरुसंबंधीं शुश्रूषा वगैरे कृत्यांकडेही वेळोंवेळीं लक्ष्य पुरवूं लागला २२ व ह्याप्रमाणें राम वागूं लागला असतां त्याच्या सुशील वर्तनानें दशरथ, ब्राह्मण, उदमी आणि देशामध्यें रहाणारे इतरही सर्व हे संतुष्ट झाले २३. त्या चार पुत्रांपैकीं अमोघपराक्रमी राम जगतामध्यें अत्यंत कीर्तिमान् झाला आणि प्राण्यांमध्यें ब्रह्मदेवाप्रमाणें अत्यंत गुणी झाला २४. सीतेचे ठिकाणीं ज्याचें मन आसक्त होऊन राहिलेलें आहे व सीतेनेंही ज्याला आपल्या मनामध्यें ठेविलें आहे अशा विचारी रामानें पुढें पुष्कळ ऋतु ( ह्मणजे बारा संवत्सर ) सीतेसहवर्तमान आनंदामध्यें काढिले २५. पित्यानें दिलेली भार्या ह्मणून रामाला सीता आधींच प्रिय झाली होती व तिच्या आंगच्या गुणामुळें आणि तिचे ठिकाणीं असणाऱ्या सौंदर्यरूप गुणामुळें त्याचें प्रेम अधिकच वृद्धिंगत होत होतें २६. सीतेकडे रामाच्या मनाचा जितका ओढा असे त्यापेक्षां सीतेच्या मनाचा रामाकडे दुप्पट ओढा असे आणि रूपामध्यें देवतांची बरोबरी करणारी व मूर्तिमंत लक्ष्मीप्रमाणेंच असलेली ती जनककन्या मैथिली सीता रामाच्या अंतःकरणांतील अभिप्राय आपल्या अंतःकरणानें स्पष्टपणें फारच अधिक जाणीत असे. (परंतु, रामाला तिच्या अंतःकरणांतील अभिप्राय तितका स्पष्टरीतीनें कळत नसे. कारण, सीतेला जितका रामाचा ध्यास असे तितका रामाला सीतेचा ध्यास नसे ) २७,२८. सारांश, तो राजर्षिपुत्र राम, प्रीतीस पात्र असलेल्या त्या उत्कृष्ट राजकन्येचा समागम झाल्यावर, लक्ष्मीशीं संगत झालेल्या देवाधिपति प्रभु विष्णुप्रमाणें, आनंदित होऊन शोभूं लागला २९. ह्याप्रमाणें चतुर्विंशतिसहस्रग्रंथात्मक महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील बालकांडापैकीं सत्त्याहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७७ ॥ ह्या ठिकाणीं बालकांडही संपूर्ण झालें ॥ १ ॥

॥ श्रीः ॥

वाई मोदवृत्त वर्तमानपत्रद्वारा प्रसिद्ध झालेलें

# मराठी भाषांतरासह रामायण.

## अयोध्याकांड.

भाषांतर कर्ते

काशीनाथ वामन लेले, वाईकर.

वाई मोदवृत्त छापखान्यांत छापिलें.



शके १८२०

॥ श्रीः ॥

# श्रीमहामुनिवाल्मीकिप्रणीतं श्रीरामायणम्।

## अयोध्याकाण्डम्।

श्रीगणेशाय नमः ॥ गच्छता मातुलकुलं भरतेन तदानघः। शत्रुघ्नो नित्यशत्रुघ्नो नीतः प्रीतिपुरस्कृतः १ स तत्र न्यवसद्भ्रात्रा सह सत्कारसत्कृतः। मातुलेनाश्वपतिना पुत्रस्नेहेन लालितः २ तत्रापि निवसन्तौ तौ तर्प्यमाणौ च कामतः। भ्रातरौ स्मरतां वीरौ वृद्धं दशरथं नृपम् ३ राजापि तौ महातेजाः सस्मार प्रोषितौ सुतौ। उभौ भरतशत्रुघ्नौ महेन्द्रवरुणोपमौ ४ सर्व एव तु तस्येष्टाश्चत्वारः पुरुषर्षभाः। स्वशरीराद्विनिर्वृत्ताश्चत्वार इव बाहवः ५ तेषामपि महातेजा रामो रतिकरः पितुः।

ध्येयं सदा परिभवघ्नमभीष्टदोहं तीर्थास्पदं शिवविरिञ्चिनुतं शरण्यम्। भृत्यार्तिहं प्रणतपाल भवाब्धिपोतं वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ त्यक्त्वा सुदुस्त्यज सुरेप्सित राज्यलक्ष्मीं धर्मिष्ठ आर्यवचसा यदगादरण्यम्। मायामृगं दयितयेप्सितमन्वधावद्वन्दे महापुरुष ते चरणारविन्दम् ॥ भरत मातुलगृहीं जाऊं लागला असतां (कामक्रोधादि) नित्य रिपूंचा नाश करणाऱ्या निरुपद्रवी शत्रुघ्नाला तो प्रेमपूर्वक आपल्या बरोबर घेऊन गेला १ व त्या ठिकाणीं तो भ्रात्यांसहवर्तमान वास्तव्य करूं लागला असतां अश्वपति मातुल त्याचा चांगला सत्कार करीत असे व पुत्रप्रेमानें त्याचें लालन करीत असे २. परंतु, अशाप्रकारच्या मातुलगृहीं ते रहात असतांनाही आणि इष्ट वस्तु प्राप्त होऊन त्यांचे मनोरथ तेथें सिद्धीस जात असतांनाही त्या वीर भ्रात्यांना वृद्ध दशरथराजाचें स्मरण होत असे ३ व महातेजस्वी राजालाही परदेशांत गेलेल्या आपल्या उभयतां इंद्रवरुणतुल्य भरतशत्रुघ्न पुत्रांचें स्मरण होत असे ४. कारण, स्वतःच्या शरीरांतून निघालेल्या चार हातांप्रमाणेंच कीं काय त्या दशरथराजाला सर्व चारीही पुरुषश्रेष्ठ पुत्र एकसारिखेच प्रिय

स्वयंभूरिव भूतानां बभूव गुणवत्तरः ६ स हि देवैरुदीर्णस्य रावणस्य वधार्थिभिः। अर्थितो मानुषे लोके जज्ञे विष्णुः सनातनः ७ कौसल्या शुशुभे तेन पुत्रेणामिततेजसा। यथा वरेण देवानामदितिर्वज्रपाणिना ८ स हि रूपोपपन्नश्च वीर्यवाननसूयकः। भूमावनुपमः सूनुर्गुणैर्दशरथोपमः ९ स च नित्यं प्रशान्तात्मा मृदुपूर्वं च भाषते। उच्यमानोपि परुषं नोत्तरं प्रतिपद्यते १० कदाचिदुपकारेण कृतेनैकेन तुष्यति। न स्मरत्यपकाराणां शतमप्यात्मवत्तया ११ शीलवृद्धैर्ज्ञानवृद्धैर्वयोवृद्धैश्च सज्जनैः। कथयन्नास्त वै नित्यमस्त्रयोग्यान्तरेष्वपि १२ बुद्धिमान्मधुराभाषी पूर्वभाषी प्रियंवदः। वीर्यवान्न च वीर्येण महता स्वेन विस्मितः १३ न चानृतकथो विद्वान्वृद्धानां प्रतिपूजकः। अनुरक्तः प्रजाभिश्च प्रजाश्चाप्यनुरज्यते १४ सानुक्रोशो जितक्रोधो ब्राह्मणप्रतिपूजकः। दीनानुकम्पी धर्मज्ञो नित्यं प्रग्रहवाञ्छुचिः १५ कुलोचितमतिः क्षात्रं स्वधर्मं बहु

होते ५. त्या चौघांमध्येंही महातेजस्वी राम पित्याला ( विशेष ) आनंद देणारा असून प्राण्यांमध्यें ब्रह्मदेवाप्रमाणें अधिक गुणवान् होता ६. कारण, मत्त झालेल्या रावणाचा वध व्हावा हा उद्देश मनांत धरून देवांनीं ( अवतार धारण करण्याविषयीं ) सनातन विष्णूची प्रार्थना केली असतां तो राम मनुष्य लोकामध्यें विष्णूचा अवतार झालेला होता ७. वास्तव, सुरश्रेष्ठ इंद्रामुळें शोभणाऱ्या अदितीप्रमाणें त्या अपरिमिततेजस्वी पुत्राच्या योगानें कौसल्या शोभत होती ८. जगतामध्यें अनुपम असलेला तो दशरथपुत्र राम गुणांनीं दशरथाप्रमाणें असून रूपवान्, वीर्यवान् व निर्मत्सर होता ९. त्याचें अंतःकरण नेहमीं शांत असे; त्याच्या भाषणांत मार्दव असे व कोणी त्याला टोंचून बोलूं लागला असतांही तो त्याला कठोर उत्तर देत नसे १०. एकाद्यानें कधीं काळीं त्याच्यावर एक ( यत्किंचित् ) उपकार केलेला असला तरी तेवढ्यानें तो त्याच्यावर संतुष्ट असे आणि अंतःकरण स्वाधीन असल्यामुळें शंभर अपराधांचेंही त्याला स्मरण होत नसे ११. अस्त्राभ्यासाचा समय असतांनाही शीलवृद्ध, ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध सज्जनां ( ची गांठ पडली असतां त्यांच्या ) शीं तो नित्य बोलत बसत असे १२. तो बुद्धिमान् राम कोणी आला असतां त्याच्याशीं प्रथम, प्रिय व मधुर भाषण करीत असे आणि वीर्यवान् असूनही स्वतःच्या प्रचंड वीर्याचा त्याला कधीं अचंबा वाटत नसे १३. अनृत भाषण कधींही न करितां तो ज्ञानी राम वृद्धांचा मान राखीत असे आणि प्रजाजन त्याच्यावर प्रेम करीत असून तोही प्रजाजनांवर प्रीति करीत असे १४. सदय, क्रोधसंयमन केलेला आणि दीनावर कृपा करणारा तो धर्मवेत्ता राम ब्राह्मणांचा सत्कार

मन्यते । मन्यते परया प्रीत्या महत्स्वर्गफलं ततः १६ नाश्रेयसि रतो यश्च न विरुद्धकथारुचिः । उत्तरोत्तरयुक्तीनां वक्ता वाचस्पतिर्यथा १७ अरोगस्तरुणो वाग्मी वपुष्मान्देशकालवित् । लोके पुरुषसारज्ञः साधुरेको विनिर्मितः १८ स तु श्रेष्ठैर्गुणैर्युक्तः प्रजानां पार्थिवात्मजः । बहिश्चर इव प्राणो बभूव गुणतः प्रियः १९ सर्वविद्याव्रतस्नातो यथावत्साङ्गवेदवित् । इष्वस्त्रे च पितुः श्रेष्ठो बभूव भरताग्रजः २० कल्याणाभिजनः साधुरदीनः सत्यवागृजुः । वृद्धैरभिविनीतश्च द्विजैर्धर्मार्थदर्शिभिः २१ धर्मकामार्थतत्त्वज्ञः स्मृतिमान्प्रतिभानवान् । लौकिके समयाचारे कृतकल्पो विशारदः २२ निभृतः संवृताकारो गुप्तमन्त्रः सहायवान् । अमोघक्रोधहर्षश्च त्यागसंयमकालवित् २३ दृढभक्तिः स्थिरप्रज्ञो नासद्ग्राही न दुर्वचः । निस्तन्द्रीरप्रमत्तश्च स्वदोषपरदोषवित् २४ शास्त्रज्ञश्च कृतज्ञश्च पुरु-

---

करीत असून नेहमीं जितेंद्रिय व शुचिर्भूत असे १५. आपल्या कुलाला योग्य अशीच त्याची मति असे; स्वतःचा क्षात्रधर्मच तो श्रेष्ठ समजत असे आणि स्वर्गरूप महाफल क्षात्रधर्माच्या अवलंबनानेंच साध्य आहे असें त्याला अगदीं मनापासून वाटत असे १६. श्रेयस्कर न होणारें कर्म करण्याकडे त्याचा कधींच कल नसे; धर्मविरुद्ध भाषणाची त्याला कधीं अभिरुचि नसे व बृहस्पतीप्रमाणें तो उत्तमोत्तम भाषण करीत असे १७. असो. आरोग्यसंपन्न, तरुण, वक्ता, सुलक्षणदेहधारी, देशकालज्ञ आणि कोणत्या पुरुषाचे अंगीं कोणता गुण आहे हें जाणणारा तो राम एकच ब्रह्मदेवानें सर्वगुणसंपन्न निर्माण केलेला होता १८. ह्यास्तव, उत्कृष्ट गुणांनीं संपन्न असलेला तो राजकुमार राम अंगच्या गुणामुळें प्रजाजनांना—शरीराबाहेर संचार करणारा प्राणच कीं काय असा—प्रिय झाला १९. ज्या ज्या विद्येला जें जें व्रत अवश्य असेल तें तें आचरिल्यानंतर समावर्तन संस्कार झालेला आणि ह्मणूनच योग्य रीतीनें सांग वेद जाणणारा तो भरताग्रज राम शस्त्रास्त्रांमध्यें तर पित्यापेक्षांही अधिक झाला २०. असो. तो राम कल्याणाचें उत्पत्तिस्थान, सज्जन, सत्यवचनी व सरळ असून धर्मार्थवेत्त्या वृद्ध द्विजांपासून त्याला शिक्षण प्राप्त झालें होतें २१. धर्म, अर्थ आणि काम ह्यांचें तत्त्व जाणणारा तो राम स्मरण व समयस्फूर्ति ह्या गुणांनीं युक्त असून लोकव्यवहारामध्यें प्रवीण व धर्मशास्त्रामध्येंही निष्णात होता २२. त्या विनयसंपन्न रामाचा अभिप्राय इतरांना समजत नसे; गुप्त मित्रांचें त्याला साहाय्य असें; त्याचा क्रोध आणि हर्ष हे कधींही व्यर्थ जात नसत आणि दान करण्याचा व मिळविण्याचा काल कोणता हें तो जाणीत असे २३. गुरु वगैरेंचे ठिकाणीं निश्चल भक्ति करणारा स्थिर बुद्धीनें युक्त असलेला, निंद्य गोष्टीचें कधींही अवलंबन न करणारा;

षान्तरकोविदः। यः प्रग्रहानुग्रहयोर्यथान्यायं विचक्षणः २५सत्संग्रहानुग्रहणे स्थानविन्निग्रहस्य च ।आयकर्मण्युपायज्ञः संदृष्टव्ययकर्मवित् २६ श्रैष्ठ्यं चास्त्रसमूहेषु प्राप्तो व्यामिश्रकेषु च। अर्थधर्मौ च संगृह्य सुखतन्त्रो न चालसः २७ वैहारिकाणां शिल्पानां विज्ञातार्थविभागवित् । आरोहे विनये चैव युक्तो वारणवाजिनाम् २८ धनुर्वेदविदां श्रेष्ठो लोकेतिरथसंमतः । अभियाता प्रहर्ता च सेनानयविशारदः २९ अप्रधृष्यश्च सङ्ग्रामे क्रुद्धैरपि सुरासुरैः।अनसूयो जितक्रोधो न दृप्तो न च मत्सरी ३० नावज्ञेयश्च भूतानां न च कालवशानुगः । एवं श्रेष्ठैर्गुणैर्युक्तः प्रजानां पार्थिवात्मजः ३१ संमतस्त्रिषु लोकेषु वसुधायाः क्षमागुणैः । बुद्ध्या बृहस्पतेस्तुल्यो वीर्ये चापि शचीपतेः ३२ तथा सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैः

---

दुसऱ्याला उद्वेग उत्पन्न होईल असें भाषण न करणारा; आलस्यरहित आणि दक्ष असा तो राम स्वकीय आणि परकीय दोष जाणीत असे २४. शास्त्रज्ञ, कृतज्ञ व लोकांचा अभिप्राय जाणण्याविषयीं निपुण असा तो राम निग्रह आणि अनुग्रह यथायोग्यरीतीनें करण्यामध्यें निपुण असे २५. सज्जनांचा संग्रह करून आपलें रक्षण केव्हां करावें आणि दुष्टांचा निग्रह कोठें व केव्हां करावा हें तो जाणीत असे आणि द्रव्यार्जनाचा उपाय तो जाणीत असून शास्त्रोक्त व्ययकर्महीं तो जाणीत असे २६. अस्त्रसमुदाय आणि नाटक वगैरे कवींच्या मिश्र कृति ह्यांमध्यें तो निपुण असून आळशी नसलेला तो राम धर्म आणि अर्थ ह्यांना बाध न येईल अशा रीतीनें सुखाच्या मागें लागलेला असे २७. गज आणि अश्व ह्यांच्यावर बसावें कसें आणि त्यांना शिकवावें कसें हें त्याला चांगलें अवगत असें आणि क्रीडाविषयक शिल्पकर्माचा तो ज्ञाता असून द्रव्यव्यवस्था कशी करावी हेंही तो जाणीत असे २८. धनुर्वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, जगतांतील अतिरथ्यांनाही संमत, शत्रूवर चालून जाणारा आणि प्रहार करणारा तो राम सेनेला युद्धशिक्षण देण्यांतही प्रवीण असे २९. क्रुद्ध झालेल्या देवदैत्यांचीही संग्रामामध्यें त्याच्या पुढें जाण्याची छाती नसून असूयारहित व क्रोधसंयमन केलेला तो राम कधीं गर्व वहात नसे आणि मत्सरही धरीत नसे ३०. कोणताही प्राणी त्याची अवज्ञा करीत नसे आणि तोही कालाच्या अधीन होऊन रहात नसे. ह्याप्रमाणें तो राजकुमार राम श्रेष्ठ गुणांनीं युक्त होता. त्रैलोक्यांतील लोकांना तो संमत असे ; क्षमाप्रभृति गुणांनीं तो पृथ्वीची बरोबरी करणारा असे ; बुद्धीनें बृहस्पतीसारिखा असे आणि वीर्यामध्येंही इंद्राप्रमाणें असे ३१, ३२. किरणांच्या योगानें ज्याप्रमाणें देदीप्यमान सूर्य शोभत असतो त्याचप्रमाणें सर्व प्रजाजनांना इष्ट आणि पित्याला आनंद देणाऱ्या अशा गुणांच्या योगानें राम शोभू

पितुः । गुणैर्विरुरुचे रामो दीप्तः सूर्य इवांशुभिः ३३ तमेवंवृत्तसंपन्नमप्रधृष्यपराक्रमम् । लोकनाथोपमं नाथमकामयत मेदिनी ३४ एतैस्तु बहुभिर्युक्तं गुणैरनुपमैः सुतम् । दृष्ट्वा दशरथो राजा चक्रे चिन्तां परन्तपः ३५ अथ राज्ञो बभूवैव वृद्धस्य चिरजीविनः । प्रीतिरेषा कथं रामो राजा स्यान्मयि जीवति ३६ एषा ह्यस्य परा प्रीतिर्हृदि संपरिवर्तते । कदा नाम सुतं द्रक्ष्याम्यभिषिक्तमहं प्रियम् ३७ वृद्धिकामो हि लोकस्य सर्वभूतानुकम्पकः। मत्तः प्रियतरो लोके पर्जन्य इव वृष्टिमान् ३८ यमशक्रसमो वीर्ये बृहस्पतिसमो मतौ। महीधरसमो धृत्यां मत्तश्च गुणवत्तरः ३९ महीमहमिमां कृत्स्नामधितिष्ठन्तमात्मजम् । अनेन वयसा दृष्ट्वा यथा स्वर्गमवाप्नुयाम् ४० इत्येवं विविधैस्तैस्तैरन्यपार्थिवदुर्लभैः । शिष्टैरपरिमेयैश्च लोके लोकोत्तमैर्गुणैः ४१ तं समीक्ष्य तदा राजा युक्तं समुदितैर्गुणैः । निश्चित्य सचिवैः सार्धं यौवराज्यममन्यत ४२ दिव्यन्तरिक्षे भूमौ च घोर-

---

लागला ३३. तेव्हां अशा प्रकारच्या आचरणानें संपन्न आणि अजिंक्य पराक्रमानें युक्त असा तो जगदीशतुल्य राम प्रभु असावा ह्मणून पृथ्वी ( वरील प्रजा ) इच्छा करूं लागली ३४ आणि त्या अनेक अनुपम गुणांनीं संपन्न असलेल्या पुत्राला अवलोकन करून शत्रुतापन दशरथराजाही ( पुत्राला राज्याभिषेक करण्याचें ) मनामध्यें आणूं लागला ३५. सारांश, पुष्कळ काळ पर्यंत राहिलेल्या त्या वृद्ध दशरथराजाला "मी जिवंत असतांना राम कसा तरी राजा होवो" अशी इच्छा उत्पन्न झाली ३६. हीच उत्कट इच्छा त्याच्या हृदयामध्यें एकसारिखी घोळत असे आणि ह्मणूनच "मी आपल्या प्रिय पुत्राला राज्याभिषेक झालेला केव्हां अवलोकन करीन ? ३७. कारण, लोकांच्या अभ्युदयाची इच्छा धरून जलवृष्टियुक्त पर्जन्याप्रमाणें प्राणिमात्रावर दया करणारा हा राम पृथ्वींतील लोकांना माझ्यापेक्षांही प्रिय आहे ३८. वीर्यामध्यें यम व इंद्र ह्यांप्रमाणें असलेला, बुद्धीमध्यें बृहस्पतीची बरोबरी करणारा आणि धैर्यासंबंधानें पर्वततुल्य असलेला हा राम माझ्यापेक्षांही गुणी आहे ३९. तस्मात्, ह्या संपूर्ण पृथ्वीचें राज्य चालवितांना मी त्या पुत्राला ह्या वयामध्यें अवलोकन करून योग्य कालीं स्वर्गप्राप्ति करून घेईन" ४० अशा प्रकारचें विचार तो मनामध्यें आणूं लागला. जगतामध्यें इतर राजांचे ठिकाणीं आढळण्यास दुर्लभ अशा ह्या निर्दिष्ट केलेल्या नानाप्रकारच्या गुणांनीं आणि निर्दिष्ट न केलेल्या अशाही लोकोत्तर असंख्य गुणांनीं युक्त असलेल्या ४१, ह्मणजे उक्त व अनुक्त अशा सर्व गुणांनीं संपन्न असलेल्या, त्या पुत्राला अवलोकन करून आणि मंत्र्यांसहवर्तमान निश्चय करून रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याचा दशरथानें विचार

मुत्पातजं भयम् । मंचचक्षेथ मेधावी शरीरं चात्मनो जराम् ४३ पूर्णचन्द्राननस्याथ शोकापनुदमात्मनः । लोके रामस्य बुबुधे संप्रियत्वं महात्मनः ४४ आत्मनश्च प्रजानां च श्रेयसे च प्रियेण च । प्राप्ते काले स धर्मात्मा भक्त्या त्वरितवान्नृपः ४५ नानानगरवास्तव्यान्पृथग्जानपदानपि । समानिनाय मेदिन्यां प्रधानान्पृथिवीपतिः ४६ तान्वेश्मनानाभरणैर्यथार्हं प्रतिपूजितान् । ददर्शालंकृतो राजा प्रजापतिरिव प्रजाः ४७ न तु केकयराजानं जनकं वा नराधिपः । त्वरया चानयामास पश्चात्तौ श्रोष्यतः प्रियम् ४८ अथोपविष्टे नृपतौ तस्मिन्परपुरार्दने । ततः प्रविविशुः शेषा राजानो लोकसंमताः ४९ अथ राजवितीर्णेषु विविधेष्वासनेषु च । राजानमेवाभिमुखा निषेदुर्नियता नृपाः ५० स लब्धमानैर्विनयान्वितैर्नृपैः पुरालयैर्जानपदैश्च

---

केला ४२ आणि स्वर्ग, अंतरिक्ष व भूमि ह्यांचे ठिकाणीं दृष्टोत्पत्तीस आलेलें उत्पातजन्य घोर भय व स्वतःच्या शरीराचे ठिकाणीं प्राप्त झालेली जरा हें त्या बुद्धिमान् दशरथ राजानें पुत्राला राज्याभिषेक करण्याचें कारण सांगितलें ४३. नंतर पूर्ण चंद्राप्रमाणें ज्याचें मुख आल्हादकारक आहे अशा महात्म्या रामाला अभिषेक केला असतां आपली काळजी दूर होऊन जगतालाही आनंद होईल असें त्याला समजून आलें ४४. तव्हां आपलें कल्याण होऊन प्रजाजनांचा इष्ट हेतु सिद्धीस जावा एतदर्थ रामाला राज्याभिषेक करण्याचा काल प्राप्त झाला आहे असें समजून त्याविषयीं दशरथराजानें मंत्र्यांना मनःपूर्वक त्वरा केली ४५. नंतर नानाप्रकारच्या नगरामध्यें वास्तव्य करणाऱ्या आणि भिन्न भिन्न देशांमध्यें राहणाऱ्या पृथ्वींतील राजांना भूपति दशरथ राजानें मंत्र्यांकडून बोलावून आणिलें ४६ आणि उतरण्याला घरें व नानाप्रकारचीं भूषणें देऊन यथायोग्य रीतीनें त्यांचा आदर सत्कार झाल्यावर प्रजाजनांची भेट घेणारा ब्रह्मदेवच कीं काय अशा त्या दशरथराजानें अलंकार धारण करून त्यांची भेट घेतली ४७. परंतु, इच्छिलेलें कार्य सिद्धीस नेण्याची त्वरा असल्यामुळें " ह्यांना नंतर प्रिय वार्ता समजेल " असें मनांत आणून त्या दशरथराजानें केकयराजाला अथवा जनकाला त्यावेळीं आणविलें नाहीं ४८. असो. शत्रूंच्या नगरांना पीडा देणारा तो दशरथराजा सभेमध्यें येऊन बसल्यानंतर केकय आणि जनक ह्यांशिवाय इतर लोकमान्य राजे सभेंत प्रविष्ट झाले ४९. नंतर दशरथराजानें नानाप्रकारचीं आसनें दाखवून दिल्यावर ठरीव प्रदेशावरच अंमल चालविणारे ते राजे दशरथराजाच्या संमुख बसले ५० आणि सत्कार झालेले विनयी राजे व अयोध्यानगरींतील आणि देशांतील दाटी दाटीनें बसलेले लोक ह्यांच्या योगानें परिवेष्टित झालेला तो राजा देवांनीं परिवे-

मानवैः । उपोपविष्टैर्नृपतिर्वृतो बभौ सहस्रचक्षुर्भगवानिवामरैः ५१ इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे प्रथमः सर्गः ॥ १ ॥

ततः परिषदं सर्वामामन्त्र्य वसुधाधिपः । हितमुद्धर्षणं चैवमुवाच प्रथितं वचः १ दुन्दुभिस्वरकल्पेन गम्भीरेणानुनादिना । स्वरेण महता राजा जीमूत इव नादयन् २ राजलक्षणयुक्तेन कान्तेनानुपमेन च । उवाच रसयुक्तेन स्वरेण नृपतिर्नृपान् ३ विदितं भवतामेतद्यथा मे राज्यमुत्तमम् । पूर्वकैर्मम राजेन्द्रैः सुतवत्परिपालितम् ४ सोऽहमिक्ष्वाकुभिः सर्वैर्नरेन्द्रैः प्रतिपालितम् । श्रेयसा योक्तुमिच्छामि सुखार्हमखिलं जगत् ५ मयाप्याचरितं पूर्वैः पन्थानमनुगच्छता । प्रजा नित्यमनिद्रेण यथाशक्त्यभिरक्षिताः ६ इदं शरीरं कृत्स्नस्य लोकस्य चरता हितम् । पाण्डुरस्यातपत्रस्य च्छायायां जरितं मया ७ प्राप्य वर्षसहस्राणि बहून्यायूंषि जीवतः । जीर्णस्यास्य शरीरस्य विश्रान्तिमभिरोचये ८ राजप्रभावजुष्टां च दुर्वहामजितेन्द्रियैः । परिश्रान्तोऽस्मि लोकस्य गुर्वीं धर्मधुरं वहन् ९ सोऽहं विश्राममिच्छामि

---

ष्ठित झालेल्या भगवान् इंद्राप्रमाणें शोभूं लागला ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं पहिला सर्ग समाप्त झाला ॥ १ ॥

नंतर सर्व सभेला अवधान देण्यास सांगून भूपति दशरथराजा श्रेयस्कर, उत्कृष्टहर्षजनक व सुश्राव्य असें भाषण करूं लागला १. सारांश, दुंदुभीच्या ध्वनीप्रमाणें गंभीर असल्यामुळें ज्याचा प्रतिध्वनि उठत आहे अशा मोठ्या स्वरानें दशरथराजा मेघाप्रमाणें दशदिशा नादित करूं लागला २ आणि राजलक्षणाला योग्य, इष्ट आणि अनुपम अशा अद्भुत रसानें संपन्न असलेल्या स्वरानें तो दशरथराजा सभेंत बसलेल्या राजांना ह्मणाला ३ " माझ्यापूर्वीं होऊन गेलेल्या राजाधिराजांनीं ह्या माझ्या उत्कृष्ट राज्याचें पुत्राप्रमाणें परिपालन केलें हें तुह्मांला विदितच आहे ४. तर्‍हां सर्व इक्ष्वाकुवंशज राजांनीं पालन केल्यामुळें सुख भोगण्यासच योग्य झालेल्या ह्या संपूर्ण जगताचें कल्याण करण्याची माझी इच्छा आहे ५. पूर्वजांनीं घालून दिलेल्या मार्गाचें आक्रमण करून मींही हें राज्य चालविलें आहे आणि नित्य दक्ष राहून प्रजाजनांचें यथाशक्ति रक्षण केलेलें आहे ६. सारांश, संपूर्ण जगताचें हित करण्याचा उद्देश मनांत धरून मीं हें शरीर शुभ्रवर्ण छत्राच्या छायेखालीं अगदीं जीर्ण करून टाकिलें आहे ७. ह्याकरितां, हजारों वर्षें ह्मणजे पुरुषांचीं अनेक आयुष्यें होईपर्यंत जगून जीर्ण झालेल्या ह्या शरीराला विश्रांति द्यावी अशी माझी इच्छा आहे ८. ज्याला शौर्यप्रभृति राजप्रभावांची अपेक्षा आहे आणि इंद्रियाधीन पुरुषांना जें रेटणें

पुत्रं कृत्वा प्रजाहिते । संनिकृष्टानिमान्सर्वाननुमान्य द्विजर्षभान् १० अनुजातो हि मां सर्वैर्गुणैः श्रेष्ठो ममात्मजः । पुरन्दरसमो वीर्ये रामः परपुरंजयः ११ तं चन्द्रमिव पुष्येण युक्तं धर्मभृतां वरम् । यौवराज्ये नियोक्तास्मि प्रातः पुरुषपुङ्गवम् १२ अनुरूपः स वो नाथो लक्ष्मीवाँल्लक्ष्मणाग्रजः । त्रैलोक्यमपि नाथेन येन स्यान्नाथवत्तरम् १३ अनेन श्रेयसा सद्यः संयोक्ष्येहमिमां महीम् । गतक्लेशो भविष्यामि सुते तस्मिन्निवेश्य वै १४ यदिदं मेनुरूपार्थं मया साधु सुमन्त्रितम् । भवन्तो मेनुमन्यन्तां कथं वा करवाण्यहम् १५ यद्यप्येषा मम प्रीतिर्हितमन्यद्विचिन्त्यताम् । अन्या मध्यस्थचिन्ता तु विमर्दाभ्यधिकोदया १६ इति ब्रुवन्तं मुदिताः प्रत्यनन्दन्नृपा नृपम् । वृष्टिमन्तं महामेघं नदन्त इव बर्हिणः १७ स्निग्धो-

---

दुर्घट आहे असें जगताचें धर्मरूप जूं वहातां वहातां मी श्रांत झालों आहें ९. तस्मात्, संनिध असलेल्या ह्या सर्व द्विजश्रेष्ठांच्या संमतीनें प्रजाहिताविषयीं पुत्राची योजना करून विश्रांति घेण्याचें माझ्या मनांत आहे १०. माझा श्रेष्ठ पुत्र सर्व गुणांनीं माझ्यासारिखाच निपजला आहे आणि तो शत्रुसमूह जिंकणारा राम वीर्यामध्यें इंद्राची बरोबरी करणारा आहे ११. तर्‍हां पुष्य नक्षत्रानें युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें कोणतेंही कार्य सिद्धीस नेण्याविषयीं दक्ष आणि धर्मनिष्ठांमध्यें उत्कृष्ट अशा पुरुषश्रेष्ठ रामाला मी उदईक प्रातःकालीं यौवराज्याचा अभिषेक करणार १२. कारण, लक्ष्मणाहून थोर असलेला तो वैभवशाली राम तुह्मांला योग्य प्रभु आहे; इतकेंच नव्हे परंतु, तो अधिपति झाला असतां सर्व त्रैलोक्यालाही पहिल्यापेक्षां अधिक चांगला प्रभु मिळाल्यासारिखें होणार आहे १३. ह्यास्तव, माझ्यापेक्षांही प्रशस्त असलेल्या ह्या रामाला मी विलंब न करितां ह्या पृथ्वीचा अधिपति करणार आणि त्या पुत्राचे ठिकाणीं पृथ्वीपालनाचा भार टाकून मी आतां ह्या ( प्रजापालनाच्या ) क्लेशांतून मुक्त होणार १४. ह्या कार्याविषयीं मीं चांगला विचार केला आहे असें जर तुह्मांला वाटत असेल आणि असें होणें जर तुह्मांला अनुकूल असेल तर आपण मला अनुमोदन द्यावें आणि हें आपणांला संमत नसेल तर (क्लेशांतून मुक्त होण्याविषयीं) मीं काय करावें तें आपण मला कथन करावें १५. अहो, अशी जरी माझी उत्कट इच्छा आहे तरी लोकांचें हित होण्याचा दुसरा कांहीं उपाय असल्यास त्याचाही आपण विचार करावा. कारण, तिऱ्हाईतपणानें केलेल्या विचाराची गोष्ट वेगळी आहे. दोन्ही पक्षांचा खल होऊन जो विचार ठरतो तो अधिक फायदेशीर असतो " १६. ह्याप्रमाणें दशरथराजा भाषण करूं लागला असतां जलवृष्टि करणाऱ्या मोठ्या मेघाचें ज्याप्रमाणें मयूरपक्षी गर्जना करीत करीत अभिनंदन

नुनादः संजज्ञे ततो हर्षसमीरितः । जनौघोद्घुष्टसंनादो मेदिनीं कम्पयन्निव १८ तस्य धर्मार्थविदुषो भावमाज्ञाय सर्वशः । ब्राह्मणा बलमुख्याश्च पौरजानपदैः सह १९ समेत्य ते मन्त्रयितुं समतागतबुद्धयः । ऊचुश्च मनसा ज्ञात्वा वृद्धं दशरथं नृपम् २० अनेकवर्षसाहस्रो वृद्धस्त्वमसि पार्थिव । स रामं युवराजानमभिषिञ्चस्व पार्थिवम् २१ इच्छामो हि महाबाहुं रघुवीरं महाबलम् । गजेन महता यान्तं रामं छत्रावृताननम् २२ इति तद्वचनं श्रुत्वा राजा तेषां मनःप्रियम् । अजानन्निव जिज्ञासुरिदं वचनमब्रवीत् २३ श्रुत्वैतद्वचनं यन्मे राघवं पतिमिच्छथ । राजानः संशयोयं मे तदिदं ब्रूत तत्त्वतः २४ कथं नु मयि धर्मेण पृथिवीमनुशासति । भवन्तो द्रष्टुमिच्छन्ति युवराजं महाबलम् २५ ते तमूचुर्महात्मानः पौरजानपदैः सह । बहवो नृप कल्याणगुणाः सन्ति सुतस्य ते २६ गुणान्गुणवतो देव

---

करितात त्याप्रमाणें त्या सभेंतील राजांनीं आनंदित होऊन त्याचें अभिनंदन केलें असतां १७ त्यांच्या हर्षाचा सुखावह असा प्रतिध्वनि होऊं लागला आणि जनसमूहांच्या आनंदघोषाचा ध्वनि तर पृथ्वी कंपित करीत आहे कीं काय असा होऊं लागला १८. नंतर त्या धर्मार्थवेत्त्या दशरथराजाचा अभिप्राय पूर्णपणें लक्ष्यांत घेऊन ब्राह्मण आणि सेनानायक भूपति नगरांतील व देशांतील लोकांसहवर्तमान १९ एकत्र जुळून एकमतानें विचार करूं लागले आणि विचार केल्यानंतर आपल्या मनानें काय तो निश्चय करून ते वृद्ध दशरथराजाला ह्मणाले २० "हे राजा, तूं हजारों वर्षांचा वृद्ध आहेस; तेव्हां तूं आपल्या युवराज रामाला राज्याभिषेक कर २१. छत्रानें मुख आच्छादून गेलें असतां मोठ्या गजावर आरूढ होऊन महाबलाढ्य व महापराक्रमी रघुवीर राम जातांना पहाण्याची आमची इच्छा आहे" २२. हें त्याचें भाषण श्रवण केल्यावर त्यांच्या मनाला कोणती गोष्ट प्रिय आहे हें माहीत नसल्यासारिखें दाखवून त्यांच्या मनांतील उद्देश समजून घेण्याच्या उद्देशानेंच कीं काय दशरथराजा त्यांना ह्मणाला २३ "हे नृप हो, माझें भाषण श्रवण करून ज्याअर्थी तुह्मी रघुवंशज राम प्रभु होण्याची इच्छा करीत आहां त्याअर्थी मला हा एक संशय आहे त्याचें तुह्मी खरें खरें उत्तर द्या २४. अहो, मी धर्मानें पृथ्वीचें राज्य करीत असतांना महाबलाढ्य राम युवराज होण्याची तुह्मीं कां बरें इच्छा करीत आहां ?" २५. असें दशरथराजानें विचारिल्यानंतर नगरांतील आणि देशांतील लोकांसहवर्तमान ते महात्मे राजे त्याला ह्मणाले "हे भूपते, ह्याच्या योगानें प्रजेचें कल्याण होईल असे पुष्कळच गुण तुझ्या पुत्राच्या ठिकाणीं आहेत २६. हे राजा, गुणी, देवतुल्य आणि बुद्धिमान् अशा तुझ्या पुत्राचे

देवकल्पस्य धीमतः । प्रियानानन्दनान्कृत्स्नान्प्रवक्ष्यामोऽथ ताञ्छृणु २७ दिव्यैर्गुणैः शक्रसमो रामः सत्यपराक्रमः । इक्ष्वाकुभ्योपि सर्वेभ्यो ह्यतिरिक्तो विशांपते २८ रामः सत्पुरुषो लोके सत्यः सत्यपरायणः । साक्षाद्रामाद्विनिर्वृत्तो धर्मश्चापि श्रिया सह २९ प्रजासुखत्वे चन्द्रस्य वसुधायाः क्षमागुणैः । बुद्ध्या बृहस्पतेस्तुल्यो वीर्ये साक्षाच्छचीपतेः ३० धर्मज्ञः सत्यसन्धश्च शीलवाननसूयकः । क्षान्तः सान्त्वयिता श्लक्ष्णः कृतज्ञो विजितेन्द्रियः ३१ मृदुश्च स्थिरचित्तश्च सदा भव्योऽनसूयकः । प्रियवादी च भूतानां सत्यवादी च राघवः ३२ बहुश्रुतानां वृद्धानां ब्राह्मणानामुपासिता । तेनास्येहातुला कीर्तिर्यशस्तेजश्च वर्धते ३३ देवासुरमनुष्याणां सर्वास्त्रेषु विशारदः । सम्यग्विद्याव्रतस्नातो यथावत्साङ्गवेदवित् ३४ गान्धर्वे च भुवि श्रेष्ठो बभूव भरताग्रजः । कल्याणाभिजनः साधुरदीनात्मा महामतिः ३५ द्विजैरभिविनीतश्च श्रेष्ठैर्धर्मार्थनैपुणैः । यदा व्रजति

इष्ट व आनंदकारक सर्व गुण आह्मी आतां सांगतों तें तूं श्रवण कर २७. हे प्रजाधिपते दशरथराजा, अमोघपराक्रमी राम दिव्य गुणांनीं इंद्राची बरोबरी करणारा असल्यामुळें सर्वही इक्ष्वाकुवंशजांपेक्षां वरचढ आहे २८. ह्या जगतामध्यें सत्यावलंबी रामच खरा सत्पुरुष असून अर्थासहवर्तमान धर्मही साक्षात् रामापासूनच निघालेला आहे. ( सारांश, धर्म व अर्थ हे दोन्हीही रामावरच अवलंबून आहेत ) २९. प्रजाजनांना आनंद देण्याविषयीं राम चंद्राची बरोबरी करणारा आहे; क्षमाप्रभृति गुणांनीं तो पृथ्वीसारिखा आहे; बुद्धीनें तो बृहस्पतीशीं तुल्य आहे आणि वीर्यामध्यें तर तो प्रत्यक्ष इंद्राप्रमाणें आहे ३०. धर्मवेत्ता, सत्यप्रतिज्ञ, सुशील, कोणाचा मत्सर न करणारा, क्षमाशील, इतरांचें दुःख निवारण करणारा, मधुरभाषणी, कृतज्ञ, जितेंद्रिय ३१, मृदु. दृढनिश्चयी, सर्वदा दृष्टीं पडणारा आणि इतरांच्या मत्सरास पात्र नसलेला रघुवंशज राम ३२ प्राणिमात्राशीं प्रिय व सत्य भाषण करणारा असून बहुश्रुत वृद्ध ब्राह्मणांचा समागम करणारा आहे आणि त्यामुळें ह्या जगतामध्यें त्याची कीर्ति, ख्याति आणि शौर्य ह्यांची अभिवृद्धि होत आहे ३३. देव, असुर आणि मनुष्य ह्यांच्या सर्व अस्त्रांमध्यें निपुण, ज्या ज्या विद्येला जें जें व्रत आवश्यक तें तें उत्तम रीतीनें आचरिल्यानंतर समावर्तन झालेला आणि यथायोग्य रीतीनें सांग वेद जाणणारा ३४ तो भरताग्रज राम संगीत शास्त्रांतही ह्या पृथ्वीमध्यें श्रेष्ठ झालेला आहे. कल्याणांचें तर तो महाबुद्धिमान् सज्जन राम निवासस्थानच आहे; क्षोभ उत्पन्न होण्यासारिखा प्रसंग असतांनाही त्याचें अंतःकरण कधींही क्षुब्ध होत नाहीं ३५; धर्म व अर्थ [illegible]

सङ्ग्रामं ग्रामार्थे नगरस्य वा ३६ गत्वा सौमित्रिसहितो नाविजित्य निवर्तते । सङ्ग्रामात्पुनरागत्य कुञ्जरेण रथेन वा ३७ पौरान्स्वजनवन्नित्यं कुशलं परिपृच्छति । पुत्रेष्वग्निषु दारेषु प्रेष्यशिष्यगणेषु च ३८ निखिलेनानुपूर्व्या च पिता पुत्रानिवौरसान् । शुश्रूषन्ते च वः शिष्याः कच्चिद्वर्मसु दंशिताः ३९ इति वः पुरुषव्याघ्रः सदा रामोभिभाषते । व्यसनेषु मनुष्याणां भृशं भवति दुःखितः ४० उत्सवेषु च सर्वेषु पितेव परितुष्यति । सत्यवादी महेष्वासो वृद्धसेवी जितेन्द्रियः ४१ स्मितपूर्वाभिभाषी च धर्मं सर्वात्मना श्रितः । सम्यग्योक्ता श्रेयसां च न विगृह्य कथारुचिः ४२ उत्तरोत्तरयुक्तौ च वक्ता वाचस्पतिर्यथा । सुभ्रूरायतताम्राक्षः साक्षाद्विष्णुरिव स्वयम् ४३ रामो लोकाभिरामोयं शौर्यवीर्यपराक्रमैः । प्रजापालनसंयुक्तो न रागोपहितेन्द्रियः ४४ शक्तस्त्रैलोक्यमप्येष भोक्तुं किं नु

निपुण असलेल्या द्विजांनीं शिक्षण दिलेला राम ग्रामाच्या अथवा नगराच्या रक्षणार्थ जेव्हां लक्ष्मणांसहवर्तमान संग्रामामध्यें जातो तेव्हां शत्रूला जिंकिल्यावांचून माघारा फिरतच नाहीं आणि गजावर अथवा रथामध्यें आरूढ होऊन संग्रामांतून परत आल्यानंतर ३६,३७ स्वजनांप्रमाणें पौरजनांना—पुत्र अग्नि, स्त्रिया, सेवकजन आणि शिष्यगण ह्यांविषयीं पूर्ण रीतीनें क्रमाक्रमानें औरस पुत्रांना विचारणाऱ्या पित्याप्रमाणें—कुशल प्रश्न करीत असतो. " शिष्य आपली शुश्रूषा करीत असतात नां ? " व " सेवक आपल्या रक्षणाविषयीं दक्ष असतात नां ! " ३८,३९ असें तो पुरुषश्रेष्ठ राम अनुक्रमें ब्राह्मणांना व क्षत्रियांना सर्वदां विचारीत असतो. मनुष्यावर दुखाचे प्रसंग आले असतां तो अत्यंत दुःखित होतो ४० आणि प्रजाजनामध्यें कोणताही उत्सव सुरू झाला असतां पुत्राच्या सुखानें संतुष्ट होणाऱ्या पित्याप्रमाणें राम संतुष्ट होत असतो. सत्यवचनी, महाधनुर्धारी, वृद्धांचा समागम करणारा, जितेंद्रिय ४१ आणि स्मितपूर्वक भाषण करणारा राम अगदीं मनापासून धर्माचें अवलंबन करून राहिलेला आहे. तो प्रजाजनांचें उत्तम प्रकारें कल्याण करणारा आहे; लोकांमध्यें कलह लावून एकमेकांचीं भांडणें ऐकण्याची त्याला आवड नाहीं ४२ आणि उत्तमोत्तम संभाषणांनें तर तो बृहस्पतीप्रमाणेंच वक्ता आहे. उत्कृष्ट भिंवया आणि विशाल व आरक्तवर्ण नेत्र ह्यांनीं युक्त असलेला हा त्रैलोक्यसुंदर राम शौर्य, वीर्य आणि पराक्रम ह्यांच्या योगानें प्रत्यक्ष विष्णूची बरोबरी करणारा आहे. प्रजापालनाविषयीं हा दक्ष असून ह्याचीं इंद्रियें विषयेच्छेच्या अधीन कधींही होत नाहींत ४३,४४.

महीमिमाम् । नास्य क्रोधः प्रसादश्च निरर्थोऽस्ति कदाचन ४५ हन्त्येष नियमाद्वध्यानवध्येषु न कुप्यति । युनक्त्यर्थैः प्रहृष्टश्च तमसौ यत्र तुष्यति ४६ दान्तैः सर्वप्रजाकान्तैः प्रीतिसंजननैर्नृणाम् । गुणैर्विरोचते रामो दीप्तः सूर्य इवांशुभिः ४७ तमेवंगुणसंपन्नं रामं सत्यपराक्रमम् । लोकपालोपमं नाथमकामयत मेदिनी ४८ वत्सः श्रेयसि जातस्ते दिष्ट्यासौ तव राघव । दिष्ट्या पुत्रगुणैर्युक्तो मारीच इव कश्यपः ४९ बलमारोग्यमायुश्च रामस्य विदितात्मनः । देवासुरमनुष्येषु सगन्धर्वोरगेषु च ५० आशंसते जनः सर्वो राष्ट्रे पुरवरे तथा । आभ्यन्तरश्च बाह्यश्च पौरजानपदो जनः ५१ स्त्रियो वृद्धास्तरुण्यश्च सायंप्रातः समाहिताः । सर्वान्देवान्नमस्यन्ति रामस्यार्थे मनस्विनः । तेषां तद्याचितं देव त्वत्प्रसादात्समृद्ध्यताम् ५२ राममिन्दीवरश्यामं सर्वशत्रुनिबर्हणम् । पश्यामो यौवराज्यस्थं तव राजोत्तमात्मजम् ५३ तं देवदेवोपममात्मजं ते सर्वस्य

तस्मात्, त्रैलोक्याचाही उपभोग घेण्यास हा समर्थ आहे; मग ह्या पृथ्वीचा उपभोग घेण्याची गोष्ट कशाला पाहिजे ? ह्याची अवकृपा अथवा कृपा कधींही व्यर्थ होत नाहीं ४५. शास्त्राच्या नियमाला अनुसरून हा वध्यांचा वध करीत असतो, अवध्यांचे ठिकाणीं क्रोध करीत नाहीं आणि ज्याच्यावर संतुष्ट होतो त्याला हा राम हर्षयुक्त होऊन द्रव्यसंपन्न करून सोडितो ४६. सारांश, मनोनिग्रही, सर्व प्रजाजनांना इष्ट आणि मनुष्यांना आनंददायक अशा गुणांनीं युक्त असलेला हा राम किरणांच्या योगानें देदीप्यमान् असलेल्या सूर्याप्रमाणें प्रकाशत आहे ४७ आणि ह्मणूनच अशा प्रकारच्या गुणांनीं संपन्न असलेला अमोघपराक्रमी व लोकपालतुल्य राम आपला नाथ असावा अशी पृथ्वीला ( अर्थात् पृथ्वीवरील जनांना ) इच्छा झाली आहे ४८. आमच्या भाग्यामुळें हा तुझा पुत्र रघुवंशज राम प्रजाजनांचें रक्षणरूप कल्याण करण्याविषयीं समर्थ झाला आहे आणि आमच्या भाग्यामुळेंच हा मरीचिपुत्र कश्यपाप्रमाणें गुणांनीं युक्त आहे ४९. देव, असुर, मनुष्य, गंधर्व आणि उरग ह्यांच्यामध्यें राष्ट्रांमध्यें व ह्या श्रेष्ठ नगरामध्यें असणारा जो तो जन ह्या रामाला बल, आरोग्य आणि आयुष्य चिंतीत असतो ५०. सेवक, नगरांत व देशांत राहणारे बाहेरील लोक आणि सर्व वृद्ध व तरुण स्त्रिया विचारी रामाकरितां सकाळ संध्याकाळ एकाग्र अंतःकरण करून देवांना नमस्कार करीत असतात. तेव्हां, हे राजा, तुझ्या कृपनें त्यांच्या मनांतील उद्देश सिद्धीस जावो ५१,५२. हे नृपश्रेष्ठा, नील कमलाप्रमाणें श्यामवर्ण असा तुझा पुत्र सर्वशत्रुनाशक राम यौवराज्यावर बसल्याचें आह्मीं

लोकस्य हिते निविष्टम्। हिताय नः क्षिप्रमुदारजुष्टं मुदाभिषेक्तुं वरद त्वमर्हसि ५४ [ १०५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

तेषामञ्जलिपद्मानि प्रगृहीतानि सर्वशः। प्रतिगृह्याब्रवीद्राजा तेभ्यः प्रियहितं वचः १ अहोस्मि परमप्रीतः प्रभावश्चातुलो मम। यन्मे ज्येष्ठं प्रियं पुत्रं यौवराज्यस्थमिच्छतः २ इति प्रत्यर्चितान्राजा ब्राह्मणानिदमब्रवीत्। वसिष्ठं वामदेवं च तेषामेवोपशृण्वताम् ३ चैत्रः श्रीमानयं मासः पुण्यः पुष्पितकाननः। यौवराज्याय रामस्य सर्वमेवोपकल्पताम् ४ राज्ञस्तूपरते वाक्ये जनघोषो महानभूत् ५ शनैस्तस्मिन्प्रशान्ते च जनघोषे जनाधिपः। वसिष्ठं मुनिशार्दूलं राजा वचनमब्रवीत् ६ अभिषेकाय रामस्य यत्कर्म सपरिच्छदम्। तदद्य भगवन्सर्वमाज्ञापयितुमर्हसि ७ तच्छ्रुत्वा भूमिपालस्य वसिष्ठो मुनिसत्तमः। आदिदेशाग्रतो राज्ञः स्थितान्युक्तान्कृताञ्जलीन् ८ सुवर्णादीनि रत्नानि बलीन्सर्वौषधीरपि। शुक्लमा-

---

पाहूं ५३. तस्मात्, हे वरप्रद भूपते, सर्व लोकांच्या हिताविषयीं तत्पर व उदार गुणांनीं संपन्न अशा आपल्या देवाधिदेवविष्णुतुल्य रामाला आमच्या हिताकारितां तूं आनंदानें राज्याभिषेक कर ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं दुसरा सर्ग समाप्त झाला ॥ २ ॥

आपल्या मस्तकाशीं राजांनीं जीं अंजलिरूप कमलें लाविलीं होतीं त्यांचा सर्वप्रकारें यथायोग्य मान राखून दशरथराजा त्यांना प्रिय व हितकारक अशा शब्दांनीं ह्मणाला १ "अहो, ज्याअर्थी माझा ज्येष्ठ प्रिय पुत्र यौवराज्यावर बसावा अशी तुह्मी इच्छा करीत आहां त्याअर्थी मी अत्यंत प्रसन्न झालों असून मी आपला प्रभावही अतुल समजत आहें "२. ह्याप्रमाणें त्यांना मान दिल्यावर ते ऐकत असतांनाच दशरथराजा वसिष्ठ, वामदेव इत्यादि ब्राह्मणांना ह्मणाला ३ " हा वनें प्रफुल्लित झालेला श्रीमान् चैत्रमास पवित्र आहे. तेव्हां तुह्मीं रामाला यौवराज्याचा अभिषेक करण्याविषयीं सर्व तयारी करा "४. हें राजाचें ह्मणणें समाप्त झाल्यावर लोकांनीं मोठा आनंदघोष केला ५ व तो आनंदघोष हळू हळू शांत झाल्यावर प्रजाधिपति दशरथराजा मुनिश्रेष्ठ वसिष्ठांना ह्मणाला ६ " हे भगवन्, रामाच्या अभिषेकाकरितां काय कर्म केलें पाहिजे व त्याला साहित्य काय पाहिजे हें आपण आह्मांला सर्व सांगा ७. " हें दशरथभूपतीचें भाषण श्रवण केल्यावर मुनिश्रेष्ठ वसिष्ठ हात जोडून राजाच्या पुढें उभे राहिलेल्या सेवादक्ष मंत्र्यांना ह्मणाले ८ " सुवर्णप्रभृति रत्नें, पूजाद्रव्यें, सर्व प्रकारच्या औषधि, श्वेतपुष्पें, लाह्या,

ल्यानि लाजांश्च पृथक् मधुसर्पिषी ९ अहतानि च वासांसि रथं सर्वायुधान्यपि। चतुरङ्गबलं चैव गजं च शुभलक्षणम् १० चामरव्यजने चोभे ध्वजं छत्रं च पाण्डुरम्। शतं च शातकुम्भानां कुम्भानामग्निवर्चसाम् ११ हिरण्यशृङ्गमृषभं समग्रं व्याघ्रचर्म च। यच्चान्यत्किंचिदेष्टव्यं तत्सर्वमुपकल्प्यताम् १२ उपस्थापयत प्रातरग्न्यागारे महीपतेः। अन्तःपुरस्य द्वाराणि सर्वस्य नगरस्य च १३ चन्दनस्रग्भिरर्च्यन्तां धूपैश्च घ्राणहारिभिः। प्रशस्तमन्नं गुणवद्दधिक्षीरोपसेचनम् १४ द्विजानां शतसाहस्रं यत्प्रकाममलं भवतु। सत्कृत्य द्विजमुख्यानां श्वः प्रभाते प्रदीयताम् १५ घृतं दधि च लाजाश्च दक्षिणाश्चापि पुष्कलाः। सूर्येऽभ्युदितमात्रे श्वो भविता स्वस्तिवाचनम् १६ ब्राह्मणाश्च निमन्त्र्यन्तां कल्प्यन्तामासनानि च। आबध्यन्तां पताकाश्च राजमार्गश्च सिच्यताम् १७ सर्वे च तालापचरा गणिकाश्च स्वलंकृताः। कक्ष्यां द्वितीयामासाद्य तिष्ठन्तु नृपवेश्मनः १८ देवायतनचैत्येषु सान्नभक्ष्याः सदक्षिणाः। उपस्थापयितव्याः स्युर्माल्ययोग्याः पृथक्पृथक् १९ दीर्घासिबद्धगोधाश्च संनद्धा मृष्टवाससः। महाराजाङ्गनं शूराः प्रविशन्तु महोदयम् २० एवं व्यादिश्य विप्रौ तु क्रियास्तत्र

वेगवेगळ्या पात्रांत मध व घृत ९, कोरीं वस्त्रें, रथ, सर्वप्रकारचीं आयुधें, चतुरंग सेना, सुलक्षणी गज १०, चौरी व मोर्चेल हीं दोन्ही, ध्वज, श्वेत छत्र, अग्निप्रमाणें उज्ज्वल असे शंभर सुवर्णकुंभ ११, सुवर्णशृंगी वृषभ, सबंध व्याघ्रचर्म आणि इतरही (हळदकुंकू वगैरे) लागणारें सामान हें सर्व जमवा १२ आणि प्रातःकालीं राजाच्या होमशालेमध्यें ठेवा. अंतःपुराच्या आणि सर्व नगराच्या द्वारांचें गंधपुष्पांनीं व घ्राणेंद्रिय तल्लीन करणाऱ्या धूपांनीं पूजन करा. दधि व पय ह्यांनीं युक्त असलेलें प्रशस्त व गुणवान् अन्न एक लक्ष ब्राह्मणांना अगदीं हवें तितकें पुरेसें होईल इतकें तयार करा आणि उद्ईक प्रभातकालीं तें द्विजश्रेष्ठांना सत्कारपूर्वक द्या १३, १४, १५ व त्या बरोबर घृत, दधि, लाह्या आणि विपुल दक्षिणा द्या. उद्यां सूर्योदय होतांक्षणीं स्वस्तिवाचन होणें आहे १६; त्याकरितां ब्राह्मणांना निमंत्रणें करून आसनांची तजवीज ठेवा आणि जिकडे तिकडे पताका बांधून राजमार्गावर सडे टाका १७. सर्व प्रकारचा ताल धरणारे आणि उत्तम अलंकार धारण केलेल्या नायकिणी राजवाड्याच्या दुसऱ्या चौकामध्यें येऊन बसूं द्या १८. देवालयें आणि मार्गावरील वृक्ष ह्यांचे ठिकाणीं ओदन, भक्ष्य व दक्षिणा ह्यांसहवर्तमान पूजासाहित्य (येणाऱ्या ब्राह्मणांकरितां) वेगळें वेगळें ठेवून द्या १९. लांब लांब तलवारी घेऊन अंगुलित्राण धारण केलेले व उज्ज्वल वस्त्र परिधान केलेले वीर सज्ज होऊन

विनिष्ठितौ। चक्रतुश्चैव यच्छेषं पार्थिवाय निवेद्य च २१ कृतमित्येव चाब्रूतामभिगम्य जगत्पतिम्। यथोक्तवचनं प्रीतौ हर्षयुक्तौ द्विजोत्तमौ २२ ततः सुमन्त्रं द्युतिमान्राजा वचनमब्रवीत्। रामः कृतात्मा भवता शीघ्रमानीयतामिति २३ स तथेति प्रतिज्ञाय सुमन्त्रो राजशासनात्। रामं तत्रानयांचक्रे रथेन रथिनां वरम् २४ अथ तत्र सहासीनास्तदा दशरथं नृपम्। प्राच्योदीच्याः प्रतीच्याश्च दाक्षिणात्याश्च भूमिपाः २५ म्लेच्छाश्चार्याश्च ये चान्ये वनशैलान्तवासिनः। उपासांचक्रिरे सर्वे तं देवा वासवं यथा २६ तेषां मध्ये स राजर्षिर्मरुतामिव वासवः। प्रासादस्थो दशरथो ददर्शायान्तमात्मजम् २७ गन्धर्वराजप्रतिमं लोके विख्यातपौरुषम्। दीर्घबाहुं महासत्त्वं मत्तमातङ्गगामिनम् २८ चन्द्रकान्ताननं राममतीव प्रियदर्शनम्। रूपौदार्यगुणैः पुंसां दृष्टिचित्तापहारिणम् २९ घर्माभितप्ताः पर्जन्यं ह्लादयन्तमिव प्रजाः। न ततर्प समायान्तं

---

महोत्सवसमारंभ ज्यांत चाललेला आहे अशा महाराजाच्या चौकामध्यें प्रविष्ट होऊं द्या" २०. ह्याप्रमाणें अधिकाऱ्यांना आज्ञा करून त्या राजवाड्यामध्यें असलेल्या विप्र वसिष्ठवामदेवांनीं आपआपलीं कार्यें केलीं आणि राजानें सांगितल्याशिवाय जें कांहीं अवश्य कर्तव्य होतें तेंही राजाला निवेदन करून त्यांनीं केलें २१ व नंतर "सांगितल्याप्रमाणें तयारी झाली" असें त्या सुप्रसन्न व हर्षयुक्त द्विजश्रेष्ठ वसिष्ठ वामदेवांनीं भूपति दशरथापाशीं येऊन सांगितल्यावर २२. तेजस्वी दशरथराजा "धर्माकडे बुद्धि असलेल्या रामाला सत्वर घेऊन ये" ह्मणून सुमंत्राला ह्मणाला २३. तेव्हां "ठीक आहे" असें त्या सुमंत्रानें त्याला सांगितलें आणि रथ्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाला राजाच्या आज्ञेवरून तो रथांत घेऊन आला २४. दशरथानें सुमंत्राला आज्ञा केल्यानंतर त्या राजवाड्यामध्यें एकत्र बसलेले पूर्व, उत्तर, पश्चिम व दक्षिण ह्या चारी दिशांकडील म्लेच्छ व आर्य राजे आणि वनामध्यें व पर्वतासमीप वास्तव्य करणारे इतरही भूपति हे सर्व इंद्रासमीप बसणाऱ्या देवांप्रमाणें त्या दशरथासमीप बसले २५, २६. देवामध्यें असलेल्या इंद्राप्रमाणें त्या भूपतींमध्यें राजवाड्यांत बसलेल्या दशरथ राजर्षीनें आपल्या पुत्राला येतांना अवलोकन केलें २७. त्या पुत्राची कांति गंधर्वराजाप्रमाणें असून त्याचा पराक्रम जगतामध्यें प्रख्यात होता आणि त्या महाधैर्यवान् व आजानुबाहु रामाची गति मत्त गजाप्रमाणें होती २८. चंद्राप्रमाणें मुख सुंदर असल्यामुळें त्या रामाचें दर्शन अत्यंत प्रिय होतें; रूप व औदार्य एतद्विषयक गुणांनीं तो मनुष्यांची दृष्टि व चित्त आपणाकडे वेधून टाकीत होता २९ आणि उष्णतेनें संतप्त

पश्यमानो नराधिपः ३० अवतार्य सुमन्त्रस्तु राघवं स्यन्दनोत्तमात् । पितुः समीपं गच्छन्तं प्राञ्जलिः पृष्ठतोऽन्वगात् ३१ स तं कैलासशृङ्गाभं प्रासादं रघुनन्दनः । आरुरोह नृपं द्रष्टुं सहसा तेन राघवः ३२ सप्राञ्जलिरभिप्रेत्य प्रणतः पितुरन्तिके । नाम स्वं श्रावयन्रामो ववन्दे चरणौ पितुः ३३ तं दृष्ट्वा प्रणतं पार्श्वे कृताञ्जलिपुटं नृपः । गृह्याञ्जलौ समाकृष्य सस्वजे प्रियमात्मजम् ३४ तस्मै चाभ्युदितं सम्यङ्मणिकाञ्चनभूषितम् । दिदेश राजा रुचिरं रामाय परमासनम् ३५ तथासनवरं प्राप्य व्यदीपयत राघवः । स्वयैव प्रभया मेरुमुदये विमलो रविः ३६ तेन विभ्राजिता तत्र सा सभापि व्यरोचत । विमलग्रहनक्षत्रा शारदी द्यौरिवेन्दुना ३७ तं पश्यमानो नृपतिस्तुतोष प्रियमात्मजम् । अलंकृतमिवात्मानमादर्शतलसंस्थितम् ३८ स तं सुस्थितमाभाष्य पुत्रं पुत्रवतां वरः । उवाचेदं वचो राजा देवेन्द्रमिव कश्यपः ३९ ज्येष्ठायामसि मे पत्न्यां सदृश्यां सदृशः सुतः । उत्पन्नस्त्वं

---

झालेल्या लोकांना आल्हाद देणाऱ्या पर्जन्याप्रमाणें तो आपल्या प्रजाजनांना आपल्या दर्शनानें आल्हाद देत होता. ह्यामुळें आपणाकडे येत असलेल्या रामाला अवलोकन करून भूपति दशरथाची तृप्ति झाली नाहीं ३०. असो. रघुवंशज रामाला त्या श्रेष्ठ रथांतून उतरविल्यानंतर तो सुमंत्र सारथि पित्यासमीप चाललेल्या रामाच्या मागोमाग हात जोडून जाऊं लागला ३१. रथांतून उतरल्यावर कैलासशिखराप्रमाणें असलेल्या त्या राजवाड्यामध्यें राजाचें दर्शन घेण्याकरितां रघुनंदन राम त्या सारथ्यासहवर्तमान वर चढून गेला ३२ व हात जोडून आणि नम्र होऊन पित्याचे समीप गेल्यानंतर " मी राम " असें ह्मणून त्यानें आपल्या पित्याच्या चरणांना वंदन केलें ३३. नंतर साष्टांग नमस्कार घालून बाजूला हात जोडून उभ्या राहिलेल्या त्या पुत्राला अवलोकन केल्यावर दशरथराजानें आपल्या प्रिय पुत्राला अंजलि धरून जवळ घेतलें व कवटाळून धरिलें ३४ आणि तदनंतर रत्नें व सुवर्ण यांनीं भूषित असें एक तेथें आणून ठेविलेलें मनोहर उत्कृष्ट आसन दशरथराजानें त्या रामाला देण्यास सांगितलें ३५. तेव्हां तें श्रेष्ठ आसन प्राप्त झालें असतां उदयकालीं निर्मल रवि ज्याप्रमाणें स्वतःच्याच प्रभेनें मेरुपर्वताला शोभा आणितो त्याप्रमाणें रामानें स्वतःच्याच प्रभेनें त्या श्रेष्ठ आसनाला शोभा आणिली ३६. आसनाला रामाच्या योगानें शोभा आली इतकेंच नव्हे परंतु, ज्यांतील ग्रह व नक्षत्रें निर्मल आहेत असें शरदृतूंतील आकाश ज्याप्रमाणें चंद्राच्या योगानें शोभा पावतें त्याप्रमाणें रामानें प्रकाशित केलेली ती सभाही शोभूं लागली ३७. आरशामध्यें प्रतिबिंबित झालेलें आपलें भूषित स्वरूपच कीं काय असा त्या आपल्या

गुणज्येष्ठो मम रामात्मजः प्रियः ४० त्वया यतः प्रजाश्चेमाः स्वगुणैरनुरञ्जिताः । तस्मात्त्वं पुष्ययोगेन यौवराज्यमवाप्नुहि ४१ कामतस्त्वं प्रकृत्यैव निर्णीतो गुणवानिति । गुणवत्यपि तु स्नेहात्पुत्र वक्ष्यामि ते हितम् ॥ भूयो विनयमास्थाय भव नित्यं जितेन्द्रियः ४२ कामक्रोधसमुत्थानि त्यजस्व व्यसनानि च । परोक्षया वर्तमानो वृत्त्या प्रत्यक्षया तथा ४३ अमात्यप्रभृतीः सर्वाः प्रजाश्चैवानुरञ्जय । कोष्ठागारायुधागारैः कृत्वा संनिचयान्बहून् ४४ इष्टानुरक्तप्रकृतिर्यः पालयति मेदिनीम् । तस्य नन्दन्ति मित्राणि लब्ध्वामृतमिवामराः ४५ तस्मात्पुत्र त्वमात्मानं नियम्यैवं समाचर ४६ तच्छ्रुत्वा सुहृदस्तस्य रामस्य प्रियकारिणः । त्वरिताः शीघ्रमागत्य कौसल्यायै न्यवेदयन् ४७ सा हिरण्यं च गाश्चैव रत्नानि विविधानि च । व्यादिदेश प्रियाख्येभ्यः कौसल्या प्रमदोत्तमा ४८ अथाभिवाद्य राजानं

---

प्रिय पुत्राला अवलोकन करितांना दशरथ भूपति संतुष्ट झाला ३८ व नंतर इंद्राशीं भाषण करणारा कश्यपच कीं काय असा तो पुत्रवानांमध्यें श्रेष्ठ असलेला दशरथ राजा स्वस्थ बसलेल्या आपल्या पुत्राला "हे रामा" असें संबोधन ह्मणाला ३९ "हे रामा, माझ्या योग्य व ज्येष्ठ पत्नीचे ठिकाणीं तूं मला अनुरूप असा पुत्र झालेला आहेस. तूं गुणांनीं ज्येष्ठ आहेस आणि ह्मणूनच मला प्रिय असा पुत्र आहेस ४०. तूं ह्या प्रजांचें आपल्या गुणांनीं रंजन केलेलें आहेस; तस्मात्, पुष्यनक्षत्रावर तूं यौवराज्य प्राप्त करून घे ४१. हे पुत्रा, तूं स्वभावतःच जरी अत्यंत गुणवान् ह्मणून ठरलेला आहेस आणि जरी खरोखरीच गुणवान् आहेस तरी प्रेमामुळें मी तुला हिताची गोष्ट सांगतों ४२. तूं विनयशील जरी आहेस तरी आणखी विनयाचें अवलंबन करून नेहमीं जितेंद्रिय असत जा; काम व क्रोध ह्यांपासून उत्पन्न होणारीं व्यसनें टाकून दे ४३ आणि धान्याचीं कोठारें व शस्त्रगृहें ह्यांसहवर्तमान रत्नादिकांचीं पुष्कळ भांडारें भरून आपल्या अंतर्बाह्य वर्तनानें तूं अमात्यप्रभृति प्रजाजनांना संतुष्ट ठेव. स्वतःला प्रिय असलेल्या प्रजा ज्याचे ठिकाणीं अनुरक्त असतात अशा भूपालाच्या मित्रांना अमृतप्राप्त झालेल्या देवांप्रमाणें आनंद होत असतो. तस्मात्, हे पुत्रा, तूं आत्मसंयमन करून ह्याप्रमाणें वागत जा" ४४,४५,४६. हें दशरथराजाचें भाषण श्रवण केल्यावर रामाच्या इच्छेप्रमाणें वागणारे त्याचे सुहृद् सत्वर कौसल्येकडे आले आणि त्यांनीं तो वृत्तांत तिला निवेदन केला असतां ४७ त्या उत्कृष्ट कौसल्या स्त्रीनें सुवर्ण, गायी आणि नानाप्रकारचीं रत्नें त्या प्रिय वार्ता सांगणाऱ्यांना देण्याची आज्ञा केली ४८; दशरथराजानें उपदेश केल्यानंतर इकडे रघुवंशज रामही राजाला अभिवंदन करून

रथमारुह्य राघवः । ययौ स्वं द्युतिमद्वेश्म जनौघैः प्रतिपूजितः ४९ ते चापि पौरा नृपतेर्वचस्तच्छ्रुत्वा तदा लाभमिवेष्टमाशु । नरेन्द्रमामन्त्र्य गृहाणि गत्वा देवान्समानर्चुरभिप्रहृष्टाः ५० [ १५५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

गतेष्वथ नृपो भूयः पौरेषु सह मन्त्रिभिः । मन्त्रयित्वा ततश्चक्रे निश्चयज्ञः स निश्चयम् १ श्व एव पुष्यो भविता श्वोऽभिषेच्यस्तु मे सुतः । रामो राजीवपत्राक्षो युवराज इति प्रभुः २ अथान्तर्गृहमाविश्य राजा दशरथस्तदा । सूतमामन्त्रयामास रामं पुनरिहानय ३ प्रतिगृह्य तु तद्वाक्यं सूतः पुनरुपाययौ । रामस्य भवनं शीघ्रं राममानयितुं पुनः ४ द्वाःस्थैरावेदितं तस्य रामायागमनं पुनः । श्रुत्वैव चापि रामस्तं प्राप्तं शङ्कान्वितोऽभवत् ५ प्रवेश्य चैनं त्वरितो रामो वचनमब्रवीत् । यदागमनकृत्यं ते भूयस्तद्ब्रूह्यशेषतः ६ तमुवाच ततः सूतो राजा त्वां द्रष्टुमिच्छति । श्रुत्वा प्रमाणं तत्र त्वं गमनायेतराय वा ७ इति सूतवचः श्रुत्वा रामोऽपि त्वरया-

---

आणि रथारूढ होऊन जनसमुदायांचे मुजरे घेत घेत आपल्या सुशोभित गृहामध्यें गेला ४९; तेथें जमलेले ते नगरवासी जनही प्रिय वस्तूच्या लाभाप्रमाणें असलेलें राजाचें तें भाषण श्रवण केल्यावर त्याचा निरोप घेऊन घरीं गेले आणि (आपला मनोरथ सिद्धीस जाण्याचा समय आला आहे असें समजून ) त्यांनीं आनंदानें देवतांचें अर्चन केलें ५०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ ३ ॥

नगरवासी जन गेल्यानंतर कालदेशवर्तमान जाणणाऱ्या त्या प्रभु दशरथराजानें पुनरपि मंत्र्यांसहवर्तमान वाटाघाट करून " उद्यांच पुष्यनक्षत्र आहे. तेव्हां उदयींकच माझा कमलनयन पुत्र जो राम त्याला युवराज ह्मणून राज्याभिषेक करावयाचा " असा निश्चय केला १,२. नंतर घरांत गेल्यावर " रामाला पुनरपि इकडे घेऊन ये " ह्मणून दशरथराजानें सारथ्याला सांगितलें असतां ३ त्याची आज्ञा शिरसा मान्य करून सारथि रामाला पुनरपि घेऊन येण्याकरितां सत्वर रामाचे घरीं गेला ४. तेव्हां, द्वारपालांनीं तो आल्याचें वर्तमान रामाला निवेदन केलें असतां तो पुनरपि प्राप्त झाला आहे असें ऐकतांक्षणीं राम शंकित झाला ५ आणि त्या सारथ्याला सत्वर आंत घेऊन " पुनरपि तुझ्या येण्याचें कारण काय तें पूर्णपणें सांग " असें तो त्याला विचारूं लागला ६. तेव्हां " राजाला आपणांला भेटण्याची इच्छा आहे. ह्यास्तव, हें ऐकून घेऊन तिकडे जाण्याविषयीं अथवा न जाण्याविषयीं आपण मुखत्यार

न्वितः। प्रययौ राजभवनं पुनर्द्रष्टुं नरेश्वरम् ८ तं श्रुत्वा समनुप्राप्तं रामं दशरथो नृपः। प्रवेशयामास गृहं विवक्षुः प्रियमुत्तमम् ९ प्रविशन्नेव च श्रीमान्राघवो भवनं पितुः। ददर्श पितरं दूरात्प्रणिपत्य कृताञ्जलिः १० प्रणमन्तं तमुत्थाप्य संपरिष्वज्य भूमिपः। प्रदिश्य चासनं चास्मै रामं च पुनरब्रवीत् ११ राम वृद्धोऽस्मि दीर्घायुर्भुक्ता भोगा यथेप्सिताः। अन्नवद्भिः क्रतुशतैर्यथेष्टं भूरिदक्षिणैः १२ जातमिष्टमपत्यं मे त्वमद्यानुपमं भुवि। दत्तमिष्टमधीतं च मया पुरुषसत्तम १३ अनुभूतानि चेष्टानि मया वीर सुखान्यपि। देवर्षिपितृविप्राणामनृणोऽस्मि तथात्मनः १४ न किंचिन्मम कर्तव्यं तवान्यत्राभिषेचनात्। अतो यत्त्वामहं ब्रूयां तन्मे त्वं कर्तुमर्हसि १५ अद्य प्रकृतयः सर्वास्त्वामिच्छन्ति नराधिपम्। अतस्त्वां युवराजानमभिषेक्ष्यामि पुत्रक १६ अपि चाद्याशुभान्राम स्वप्नान्पश्यामि राघव। सनिर्घाता दिवोल्काश्च पतन्ति हि महास्वनाः १७ अव-

---

आहां" ह्मणून त्या सारथ्यानें त्याला सांगितलें ७ व हें त्या सारथ्याचें भाषण श्रवण करून रामही पुनरपि दशरथराजाची भेट घेण्याकरितां सत्वर राजवाड्यामध्यें गेला असतां ८ तो राम प्राप्त झाला असें समजल्यावर आपणांला प्रिय अशी कांहीं उत्कृष्ट गोष्ट सांगण्याचा उद्देश मनांत धरून दशरथ राजानें त्याला आंत येण्याला आज्ञा दिली ९. वैभवशाली रामानेंही पित्याच्या गृहामध्यें प्रविष्ट होतां होतांच हात जोडिले आणि पित्याचें दर्शन होतांक्षणीं दुरूनच त्याला प्रणाम केला १०. तेव्हां प्रणाम करणाऱ्या त्या रामाला उठवून दशरथ भूपतीनें कवटाळून धरिलें आणि हातानें त्याला (बसण्याकरितां) आसन दाखवून तो पुनरपि त्याला ह्मणाला ११ "हे रामा, मी आतां वृद्ध झालों आहें. मी दीर्घायुषी आहें; यथेष्ट विषयोपभोग मीं घेतले आहेत आणि ब्राह्मण-भोजन व विपुल दक्षिणा ह्यांसहवर्तमान शेंकडों क्रतूंनीं मीं देवांचें यथाविधि पूजन केलें आहे १२. हे पुरुषोत्तमा, पृथ्वीमध्यें अनुपम असें प्रिय अपत्य तूं आज मला प्राप्त झाला आहेस. मीं दान, यजन आणि अध्ययन केलें आहे १३. हे वीरा, मीं पाहिजे त्या सुखाचा उपभोग घेतला आहे आणि (याग, अध्ययन, प्रजोत्पादन, दान आणि उपभोग ह्यांच्या योगानें) मी देव, ऋषि, पितर, विप्र आणि आत्मा ह्यांच्या ऋणांतून मुक्त झालों आहें १४. तुझ्या अभिषेकावांचून माझें आतां कांहीं एक कर्तव्य उरलें नाहीं. ह्यास्तव, मी जें तुला सांगतों तें तूं कर १५. हे पुत्रा, आज सर्व प्रजा तूं प्रभु होण्याची इच्छा करीत आहेत. तस्मात्, मी तुला यौवराज्याचा अभिषेक करणार आहें १६. परंतु, हे रघुवंशजा रामा, अशुभ

ष्टब्धं च मे राम नक्षत्रं दारुणग्रहैः । आवेदयन्ति दैवज्ञाः सूर्याङ्गारकराहुभिः १८ प्रायेण च निमित्तानामीदृशानां समुद्भवे । राजा हि मृत्युमाप्नोति घोरां चापदमृच्छति १९ तद्यावदेव मे चेतो न विमुह्यति राघव । तावदेवाभिषिञ्चस्व चला हि प्राणिनां मतिः २० अद्य चन्द्रोऽभ्युपगमत्पुष्यात्पूर्वं पुनर्वसुम् । श्वः पुष्ययोगं नियतं वक्ष्यन्ते दैवचिन्तकाः २१ तत्र पुष्येऽभिषिञ्चस्व मनस्त्वरयतीव माम् । श्वस्त्वाहमभिषेक्ष्यामि यौवराज्ये परन्तप २२ तस्मात्त्वयाद्य प्रभृति निशेयं नियमात्मना । सह वध्वोपवस्तव्या दर्भप्रस्तरशायिना २३ सुहृदश्चाप्रमत्तास्त्वां रक्षन्त्वद्य समन्ततः । भवन्ति बहुविघ्नानि कार्याण्येवंविधानि हि २४ विप्रोषितश्च भरतो यावदेव पुरादितः । तावदेवाभिषेकस्ते प्राप्तकालो मतो मम २५ कामं खलु सतां वृत्ते भ्राता ते भरतः स्थितः । ज्येष्ठानुवर्ती धर्मात्मा सानुक्रोशो जितेन्द्रियः २६ किं नु चित्तं मनुष्याणामनित्यमिति मे मतम् । सतां च

---

स्वप्न मीं आजच अवलोकन केलीं आहेत आणि विद्युत्पातासहवर्तमान आकाशांतून मोठ्या गर्जनेनें युक्त असे उल्कापातही होत आहेत १७. इतकेंच नव्हे परंतु, हे रामा, सूर्य, मंगल आणि राहु हे क्रूर ग्रह आज माझ्या नक्षत्राला आले आहेत असें ज्योतिषी सांगत आहेत १८. अरे अशाप्रकारचीं निमित्तें झालीं असतां प्रायः राजाला प्रथम घोर विपत्ति प्राप्त होऊन मृत्यु येत असतो १९. तस्मात्, हे रघुवंशजा रामा, माझ्या चित्ताला मोह पडला नाहीं तोंच तूं आपल्याला अभिषेक करून घे. कारण, प्राण्याची बुद्धि अस्थिर आहे २०. आज पुष्याचे पूर्वीच्या नक्षत्रावर ह्मणजे पुनर्वसु नक्षत्रावर चद्र आहे आणि चंद्राचा पुष्यनक्षत्राशीं योग गणितानें निश्चित होत असल्याचें ज्योतिषी सांगत आहेत २१. तेव्हां त्या पुष्यनक्षत्रावर अभिषेक कर ह्मणून मन मला त्वरा करीत आहे. तस्मात्, हे शत्रुतापना, मी उदयींक तुला यौवराज्याचा अभिषेक करीन २२. ह्याकरितां आतांपासून ही रात्र तूं आज दर्भास्तरणावर पडून व जितेंद्रिय राहून भार्येसहवर्तमान घालीव २३ आणि तुझे सुहृद् सभोंवतीं राहून आज तुझें दक्षतेनें रक्षण करोत. कारण, अशा प्रकारच्या कार्यांना पुष्कळ विघ्नें येत असतात २४. भरत या नगरांतून बाहेर गेला आहे तोंच तुझ्या अभिषेकाचा योग्य काल आहे असें मला वाटतें. जरी तुझा भ्राता भरत सज्जनांच्या वर्तनाचें अनुकरण करीत असून तुज ज्येष्ठ भ्रात्याच्या अनुरोधानें वागणारा आहे आणि जरी तो धर्मात्मा, दयालु व जितेंद्रिय आहे २५,२६ तरी हे राघवा, ज्याअर्थी धर्माविषयीं नित्य तत्पर असलेल्या सज्जनांचेंही चित्त रागद्वेषादि कारणांमुळें विकारवश होऊन जात असल्याचें दिसतें त्याअर्थी मनुष्यांचें चित्त

धर्मनित्यानां कृतशोभि च राघव २७ इत्युक्तः सोभ्यनुज्ञातः श्वो भावि-न्यभिषेचने । व्रजेति रामः पितरमभिभाष्याभ्ययाद्गृहम् २८ प्रविश्य चात्मनो वेश्म राज्ञा दिष्टोभिषेचने । तत्क्षणादेव निष्क्रम्य मातुरन्तःपुरं ययौ २९ तत्र तां प्रवणामेव मातरं क्षौमवासिनीम् । वाग्यतां देवतागारे ददर्शायाचतीं श्रियम् ३० प्रागेव चागता तत्र सुमित्रा लक्ष्मणस्तथा । सीता चानायिता श्रुत्वा प्रियं रामाभिषेचनम् ३१ तस्मिन्कालेपि कौसल्या तस्थावामीलितेक्षणा । सुमित्रयान्वास्यमाना सीतया लक्ष्मणेन च ३२ श्रुत्वा पुष्ये च पुत्रस्य यौवराज्येभिषेचनम् । प्राणायामेन पुरुषं ध्यायमाना जनार्दनम् ३३ तथा सनियमामेव सोभिगम्याभिवाद्य च । उवाच वचनं रामो हर्षयंस्तामिदं वरम् ३४ अम्ब पित्रा नियुक्तोस्मि प्रजापालनकर्मणि । भविता श्वोभिषेको मे यथा मे शासनं पितुः ३५ सीतयाप्यु-

---

अस्थिरच आहे असें मला वाटतें " २७. ह्याप्रमाणें रामाला सांगून " जा " ह्मणून दशरथराजानें त्याला अनुज्ञा दिल्यावर आणि अभिषेक उदयीक होणार ह्मणून ही आज्ञा झाल्यावर राम पित्याचा निरोप घेऊन घरीं गेला २८. राजानें अभिषेकाची आज्ञा केल्यावर आपल्या घरीं गेल्यानंतर राम तत्क्षणींच तेथून निघून मातेच्या अंतःपुरामध्यें गेला २९; तों ती माता देवघरामध्यें त्याच्या दृष्टीं पडली. ती सांवळें नेसून देवपूजनामध्यें गढलेली होती आणि मौन धारण करून रामाला राज्यलक्ष्मी प्राप्त होण्याविषयीं देवांची प्रार्थना करीत होती ३०. त्या ठिकाणीं सुमित्रा आणि लक्ष्मण ह्यांचें आगमन प्रथमच झालेलें असून आपणांला प्रिय असलेला रामराज्याभिषेक श्रवण केल्याबरोबर कौसल्येनें सीतेलाही तेथें आणविलें होतें ३१. त्यावेळीं ( राम आला असतां )ही कौसल्या डोळे मिटून बसलेली होती आणि सुमित्रा, सीता व लक्ष्मण हीं तिच्या शुश्रूषेमध्यें तत्पर होतीं ३२. सारांश, पुण्यनक्षत्रावर आपल्या पुत्राला यौवराज्याचा अभिषेक होणार असें ऐकून ती कौसल्या भक्तजनांचें दुःख निवारण करणाऱ्या पुराण पुरुषाचें श्वासोच्छ्वास न करितां ध्यान करीत होती ३३. असो. त्याप्रमाणें ती नियम करून बसली असतानांच तिचे समीप जाऊन अभिवंदनपूर्वक तिला आनंद देणाऱ्या रामानें असें उत्कृष्ट भाषण तिच्याशीं केलें कीं ३४ " हे माते, प्रजापालनरूप कार्याचे ठिकाणीं पित्यानें माझी योजना केली आहे आणि पित्याच्या आज्ञेप्रमाणें मला उद्यां अभिषेक होणार आहे ३५. माझ्यासहवर्तमान सीतेलाही ही रात्र आत्मसंयमनपूर्वक दर्भास्तरणावर पडून काढिली

---

१ ह्या ठिकाणीं क्षौमवासिनी असें विशेषण कौसल्येला दिलें आहे. ह्यावरून देवपूजा वगैरेचे वेळीं सांवळें वस्त्र नेसण्याचा प्रघात अति प्राचीन कालापासून असावा असें दिसतें.

पवस्तव्या रजनीयं मया सह । एवमुक्तमुपाध्यायैः स हि मामुक्तवान्पिता ३६ यानि यान्यत्रयोग्यानि श्वोभाविन्यभिषेचने । तानि मे मङ्गलान्यद्य वैदेह्याश्चैव कारय ३७ एतच्छ्रुत्वा तु कौसल्या चिरकालाभिकाङ्क्षितम् । हर्षबाष्पाकुलं वाक्यमिदं राममभाषत ३८ वत्स राम चिरं जीव हतास्ते परिपन्थिनः । ज्ञातीन्मे त्वं श्रिया युक्तः सुमित्रायाश्च नन्दय ३९ कल्याणे बत नक्षत्रे मया जातोसि पुत्रक । येन त्वया दशरथो गुणैराराधितः पिता ४० अमोघं बत मे क्षान्तं पुरुषे पुष्करेक्षणे । येयमिक्ष्वाकुराजश्रीः पुत्र त्वां संश्रयिष्यति ४१ इत्येवमुक्तो मात्रा तु रामो भ्रातरमब्रवीत् । प्राञ्जलिं प्रह्वमासीनमभिवीक्ष्य स्मयन्निव ४२ लक्ष्मणेमां मया सार्धं प्रशाधि त्वं वसुंधराम् । द्वितीयं मेन्तरात्मानं त्वामियं श्रीरुपस्थिता ४३ सौमित्रे भुङ्क्ष्व भोगांस्त्वमिष्टान्राज्यफलानि च । जीवितं चापि राज्यं च त्वदर्थमभिकामये ४४ इत्युक्त्वा लक्ष्मणं रामो मातरावभिवाद्य च । अभ्यनुज्ञाप्य सीतां च ययौ स्वं च निव-

---

पाहिजे असें उपाध्यायांनीं सांगितलें असून पित्यानेंही मला ह्याप्रमाणें सांगितलें आहे ३६. ह्यास्तव, उद्यां होणाऱ्या अभिषेकाला ज्या ज्या कांहीं मांगलिक गोष्टी योग्य असतील त्या माझ्याकरितां व विदेह राजाच्या कन्येकरितां तूं आज करीव " ३७. हें फार दिवसांपासून मनांत योजिलेलें कृत्य श्रवण केल्यानंतर कौसल्येचा कंठ आनंदाश्रूंनीं सद्गदित झाला आणि ती रामाला ह्मणाली ३८ " वत्सा रामा, तूं चिरजीवी हो; तुझ्या शत्रूंचा नाश होवो आणि तूं वैभवसंपन्न होऊन माझ्या व सुमित्रेच्या नातेवाईकांना आनंदित कर ३९ हे पुत्रा, तूं खरोखर शुभनक्षत्रावर मला झाला आहेस आणि ह्मणूनच आपल्या गुणांनीं पित्या दशरथाचें तूं आराधन केलें आहेस ४०. हे पुत्रा, ज्याअर्थी ही इक्ष्वाकुकुलाची राज्यलक्ष्मी तुझा आश्रय करणार आहे त्याअर्थी कमलनयन पुराणपुरुषाचें मीं जें कांहीं व्रत आचरिलें तें सफल झालें " ४१. ह्याप्रमाणें मातेनें रामाला सांगितल्यावर नम्र होऊन व हात जोडून बसलेल्या आपल्या भ्रात्याला अवलोकन करून किंचित् हंसत हंसतच कीं काय राम त्याला ह्मणाला ४२ " हे लक्ष्मणा, माझ्यासहवर्तमान तूं ह्या पृथ्वीचें राज्य कर; तूं माझा दुसरा अंतरात्मा आहेस आणि तुला हें राज्यवैभव आलेलें आहे ४३. हे लक्ष्मणा, तूं पाहिजे त्या प्रिय गोष्टींचा उपभोग घे व राज्याचीं ( उत्कृष्ट ) फलें भोग. ह्या राज्याची आणि जीविताचीही तुझ्याकरितांच मी इच्छा करीत आहें " ४४. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून रामानें उभयतां मातांना अभिवंदन केलें आणि आपणांला व सीतेला जाण्याची

शनम् ४५ [ २०० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

संदिश्य रामं नृपतिः श्वोभाविन्यभिषेचने । पुरोहितं समाहूय वसिष्ठमिदमब्रवीत् १ गच्छोपवासं काकुत्स्थं कारयाद्य तपोधन । श्रेयसे राज्यलाभाय वध्वा सह यतव्रत २ तथेति च स राजानमुक्त्वा वेदविदां वरः । स्वयं वसिष्ठो भगवान्ययौ रामनिवेशनम् ३ उपवासयितुं वीरं मन्त्रविन्मन्त्रकोविदम् । ब्राह्मं रथवरं युक्तमास्थाय सुधृतव्रतः ४ स रामभवनं प्राप्य पाण्डुराभ्रघनप्रभम् । तिस्रः कक्ष्या रथेनैव विवेश मुनिसत्तमः ५ तमागतमृषिं रामस्त्वरन्निव ससंभ्रमम् । मानयिष्यन्स मानार्हं निश्चक्राम निवेशनात् ६ अभ्येत्य त्वरमाणोथ रथाभ्याशं मनीषिणः । ततोवतारयामास परिगृह्य रथात्स्वयम् ७ स चैनं प्रश्रितं दृष्ट्वा संभाष्याभिप्रसाद्य च । प्रियार्हं

अनुज्ञा देवून तो आपल्या निवासस्थानामध्यें गेला ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं चवथा सर्ग समाप्त झाला ॥४॥

दुसऱ्या दिवशीं होणाऱ्या अभिषेकासंबंधानें रामाला आज्ञा केल्यावर दशरथराजा पुरोहित वसिष्ठांना बोलावून आणून ह्मणाला १ "हे तपोधन, हे व्रतस्थ मुने, राज्यलाभरूप कल्याण होण्याकरितां भार्येसहवर्तमान ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडून आपण आज उपवास करावा" २. ह्यावर ते वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेले भगवान् वसिष्ठमुनि "ठीक आहे" ह्मणून राजाला ह्मणाले आणि धरिलेलें व्रत अत्यंत निश्चयपूर्वक चालविणार ते मंत्रवेत्ते वसिष्ठमुनि ब्राह्मणाला योग्य अशा अश्व जोडिलेल्या श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन मंत्रवेत्त्या वीर रामाला उपवास घालण्याकरितां रामाच्या घराकडे गेले ३,४ व श्वेत मेघाप्रमाणें हुबेहुब दिसत असलेल्या रामाच्या निवासस्थानापाशीं जाऊन पोंचल्यावर ते मुनिश्रेष्ठ वसिष्ठ रथांत बसूनच तीन दरवाजे ओलांडून आंत गेले ५. तेव्हां त्या आलेल्या मान्य ऋषींचा मान राखण्याकरितां राम घाईघाईनें सत्वर घरांतून बाहेर गेला ६ आणि त्वरेनें त्या विचारी वसिष्ठांच्या रथासमीप आल्यावर त्यानें स्वतः हात धरून वसिष्ठांना रथांतून उतरवून घेतलें ७. नंतर प्रिय भाषणालाच योग्य असा राम नम्र झालेला पाहून वसिष्ठांनीं संबोधनपूर्वक त्याची

१ तिस्रः कक्ष्या रथेनैव विवेश मुनिसत्तमः ॥ असें ह्या ठिकाणीं विशेष सांगितलें आहे. ह्यावरून राजवाड्याच्या वगैरे आवारामध्यें गाड्यांत बसून जाण्याची सवलत कांहीं विवक्षित लोकांनाच असावयाची आणि इतरांना नसावयाची ही व्यवस्थाही अति प्राचीन कालापासूनच चालत आली आहे असें दिसतें.

हर्षयन्राममित्युवाच पुरोहितः ८ प्रसन्नस्ते पिता राम यत्त्वं राज्यमवाप्स्यसि। उपवासं भवानद्य करोतु सह सीतया ९ प्रातस्त्वामभिषेक्ता हि यौवराज्ये नराधिपः। पिता दशरथः प्रीत्या ययातिं नहुषो यथा १० इत्युक्त्वा स तदा राममुपवासं यतव्रतः। मन्त्रवत्कारयामास वैदेह्या सहितं शुचिः ११ ततो यथावद्रामेण स राज्ञो गुरुरर्चितः। अभ्यनुज्ञाप्य काकुत्स्थं ययौ रामनिवेशनात् १२ सुहृद्भिस्तत्र रामोपि सहासीनः प्रियंवदैः। सभाजितो विवेशाथताननुज्ञाप्य सर्वशः १३ हृष्टनारीनरयुतं रामवेश्म तदा बभौ। यथा मत्तद्विजगणं प्रफुल्लनलिनं सरः १४ स राजभवनप्रख्यात्तस्माद्रामनिवेशनात्। निर्गत्य ददृशे मार्गं वसिष्ठो जनसंवृतम् १५ वृन्दवृन्दैरयोध्यायां राजमार्गाः समन्ततः। बभूवुरभिसंबाधाः कुतूहलजनैर्वृताः १६ जनवृन्दोर्मिसंघर्षहर्षस्वनवृतस्तदा। बभूव राजमार्गस्य सागरस्येव निःस्वनः १७ सिक्तसंमृष्टरथ्या हि तथा च वनमालिनी। आसीदयोध्या तदहः

---

स्तुति केली आणि त्याला हर्ष उत्पन्न करीत करीत ते पुरोहित वसिष्ठ त्याला ह्मणाले ८ "हे रामा, तुझ्यावर पिता प्रसन्न झाला आहे आणि त्यामुळें तुला राज्य प्राप्त होणार आहे. करितां, सीतेसहवर्तमान तूं आज उपवास कर ९. ययातीला अभिषेक करणाऱ्या नहुषाप्रमाणें तुझा पिता दशरथ राजा उद्यीक प्रातःकालीं तुझा यौवराज्याचा अभिषेक करणार आहे" १०. ह्याप्रमाणें सांगून त्या शुचिर्भूत व व्रतस्थ वसिष्ठमुनींनीं सीतेसहवर्तमान रामाकडून समंत्रक उपवास करविला ११ आणि नंतर रामानें त्या राजगुरूचें यथाविधि पूजन केल्यावर ते वसिष्ठमुनि रामाला सांगून तेथून निघाले १२. तेव्हां प्रिय भाषण करणाऱ्या सुहृदांसहवर्तमान बसलेल्या रामाचा त्या सुहृदांनीं सत्कार केल्यावर त्या सर्वांना अनुज्ञा देऊन तो गृहामध्यें प्रविष्ट झाला १३. त्यावेळीं रामाचें निवासस्थान जिकडे तिकडे आनंदित स्त्रीपुरुषांनीं युक्त झालें आणि ज्याच्यांतील कमलें प्रफुल्लित झालीं आहेत व ज्याच्यावरील पक्षिगण मत्त झाले आहेत अशा सरोवराप्रमाणें दिसूं लागलें १४. असो. राजवाड्याप्रमाणें असलेल्या त्या रामाच्या निवासस्थानापासून निघाल्यावर वसिष्ठांनीं मार्गावर लोकांची खेंचाखेंच झालेली आहे असें अवलोकन केलें १५. कारण, अयोध्येंतील राजमार्ग समुदायांच्याही समुदायांनीं अगदीं गजबजून गेलेले होते आणि जिकडे तिकडे रामाभिषेकोत्सव पहाण्याकरितां उत्सुक झालेल्या लोकांची गर्दी झालेली होती १६. असो. जनसमुदायरूप लाटांचें संघर्षण ह्याच्या योगानें आणि हर्षाच्या योगानें उत्पन्न झालेला जो शब्द त्या शब्दानें राजमार्ग युक्त झाल्यामुळें त्याचा सागराप्रमाणें ध्वनि होऊं लागला १७.

समुच्छ्रितगृहध्वजा १८ तदा ह्ययोध्यानिलयः सस्त्रीबालाकुलो जनः। रामाभिषेकमाकाङ्क्षन्नाकाङ्क्षन्नुदयं रवेः १९ प्रजालंकारभूतं च जनस्यानन्दवर्धनम्। उत्सुकोऽभूज्जनो द्रष्टुं तमयोध्यामहोत्सवम् २० एवं तज्जनसंबाधं राजमार्गं पुरोहितः। व्यूहन्निव जनौघं तं शनै राजकुलं ययौ २१ सिताभ्रशिखरप्रख्यं प्रासादमधिरुह्य च। समीयाय नरेन्द्रेण शक्रेणेव बृहस्पतिः २२ तमागतमभिप्रेक्ष्य हित्वा राजासनं नृपः। पप्रच्छ स्वमतं तस्मै कृतमित्यभिवेदयत् २३ तेन चैव तदा तुल्यं सहासीनाः सभासदः। आसनेभ्यः समुत्तस्थुः पूजयन्तः पुरोहितम् २४ गुरुणा त्वभ्यनुज्ञातो मनुजौघं विसृज्य तम्। विवेशान्तःपुरं राजा सिंहो गिरिगुहामिव २५ तदग्र्यवेषप्रमदाजनाकुलं महेन्द्रवेश्मप्रतिमं निवेशनम्। व्यदीपयंश्चारु विवेश पार्थिवः शशीव तारागणसंकुलं नभः २६ [२२६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चमः सर्गः॥ ५ ॥

---

त्या दिवशीं अयोध्येंतील मार्गावर झाडून सडे टाकिलेले होते. ठिकठिकाणीं तोरणें लाविलेलीं होतीं आणि जिकडे तिकडे घरामध्यें गुड्या उभारलेल्या होत्या १८. इतकेंच नव्हे परंतु, बायकामुलांसहवर्तमान आनंदानें भांबावून गेलेले अयोध्येंतील लोक रामाभिषेकसमारंभ पहाण्याची उत्सुकता असल्यामुळें सूर्योदयाची वाट पहात बसले होते १९. सारांश, प्रजेला भूषणभूत आणि लोकांचा आनंद वृद्धिंगत करणारा असा तो अयोध्येंतील महोत्सव पहाण्याकरितां प्रजाजन उत्सुक झाले होते २०. त्याप्रमाणें लोकांनीं गजबजून गेलेल्या राजमार्गानें पुरोहित वसिष्ठमुनि हळू हळू त्या जनसमुदायाला आणखी एकत्र जुळवीत जुळवीतच कीं काय राजवाड्यामध्यें गेले २१ आणि श्वेतवर्ण मेघाप्रमाणें दिसणाऱ्या हिमालय पर्वताच्या शिखरांसमान असलेल्या त्या राजवाड्यांत चढून गेल्यावर इंद्राकडे जाणाऱ्या बृहस्पतीप्रमाणें ते दशरथराजाच्या समीप गेले २२. तव्हां ते आलेले पाहून दशरथराजा सिंहासनावरून उठला आणि "माझ्या मताप्रमाणें झालें कां ?" म्हणून त्यानें विचारिलें असतां त्यांनींही त्याला झालें म्हणून सांगितलें २३. राजा सिंहासनावरून उठूं लागला असतां त्याच्या बरोबर बसलेले सभासदही पुरोहित वसिष्ठमुनींची मानमान्यता राखण्याकरितां आपआपल्या आसनावरून उठले होते २४. असो गुरूंनीं ( सर्व तयारी झाल्यामुळें विश्रांति घेण्याविषयीं ) अनुज्ञा दिली असतां त्या जनसमुदायाला निरोप देऊन दशरथराजा पर्वताच्या गुहेंत जाणाऱ्या सिंहाप्रमाणें अंतःपुरामध्यें गेला २५. सारांश, उत्कृष्ट वेष धारण केलेल्या स्त्रियांनीं गजबजलेल्या आणि इंद्राच्या मंदिराप्रमाणें असलेल्या त्या मनोहर स्थानाला

गते पुरोहिते रामः स्नातो नियतमानसः। सह पत्न्या विशालाक्ष्या नारायणमुपागमत् १ प्रगृह्य शिरसा पात्रीं हविषो विधिवत्ततः। महते दैवतायाज्यं जुहाव ज्वलितानले २ शेषं च हविषस्तस्य प्राश्याशास्यात्मनः प्रियम्। ध्यायन्नारायणं देवं स्वास्तीर्णे कुशसंस्तरे ३ वाग्यतः सह वैदेह्या भूत्वा नियतमानसः। श्रीमत्यायतने विष्णोः शिश्ये नरवरात्मजः ४ एकयामावशिष्टायां रात्र्यां प्रतिविबुध्य सः। अलंकारविधिं सम्यक्कारयामास वेश्मनः ५ तत्र शृण्वन्सुखा वाचः सूतमागधबन्दिनाम्। पूर्वां सन्ध्यामुपासीनो जजाप सुसमाहितः ६ तुष्टाव प्रणतश्चैव शिरसा मधुसूदनम्। विमलक्षौमसंवीतो वाचयामास स द्विजान् ७ तेषां पुण्याहघोषोऽथ गम्भीरमधुरस्तथा। अयोध्यां पूरयामास तूर्यघोषानुनादितः ८ कृतोपवासं तु तदा वैदेह्या सह राघवम्। अयोध्यानिलयः श्रुत्वा

---

शोभा आणीत आणीत दशरथराजा, तारागणांनीं व्याप्त झालेल्या आकाशामध्यें प्रविष्ट होणाऱ्या चंद्राप्रमाणें, त्यांत प्रविष्ट झाला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं पांचवा सर्ग समाप्त झाला॥ ५॥

पुरोहित वसिष्ठमुनि गेल्यानंतर मनःसंयमन केलेला राम आपल्या विशालनयन स्त्रीसहवर्तमान स्नान करून नारायणाचें ध्यान करूं लागला १. नंतर प्रणामपूर्वक त्यानें आज्यस्थाली घेतली आणि प्रज्वलित अग्नीमध्यें सर्वोत्कृष्ट नारायण देवतेला उद्देशून आज्याचा होम केला २; शेष राहिलेलें आज्य प्राशन करून आपणांला प्रिय असलेली गोष्ट सिद्धीस जाण्याविषयीं त्यानें ईश्वराची प्रार्थना केली आणि नारायण देवतेचें चिंतन करीत करीत तो पुरुषश्रेष्ठ दशरथराजाचा पुत्र भव्य अशा देवगृहामध्यें व्यवस्थित रीतीनें पसरलेल्या दर्भास्तरणावर सीतेसहवर्तमान वाङ्नियम व आत्मसंयमन करून पडला ३,४. नंतर एक प्रहर रात्र राहिल्यावर जागृत होऊन त्यानें आपल्या निवासस्थानाला (सडासंमार्जन वगैरे करवून आणि गुढ्या तोरणें वगैरेंची व्यवस्था लाववून) उत्तमप्रकारानें शोभा आणविली ५. पौराणिक, भाट व स्तुतिपाठक, ह्यांचे मधुर शब्द कानावर येऊं लागले असतां प्रातःसंध्या करूं लागलेल्या त्या रामानें अत्यंत स्वस्थांतःकरणपूर्वक जप केला ६ आणि मस्तकानें प्रणाम करून मधुसूदनाची स्तुति केल्यावर उज्ज्वल पीतांबर परिधान केलेल्या त्या रामानें ब्राह्मणांकडून पुण्याहवाचन करविलें ७. तेव्हां वाद्यांच्या घोषाबरोबर गंभीर आणि मधुर अशा त्या ब्राह्मणांच्या पुण्याहघोषानें (ह्मणजे "पुण्याहं" ह्या शब्दाच्या ध्वनीनें) अयोध्या नगरी दुमदुमून राहिली ८. तदनंतर सीतेसहवर्तमान रामानें (अभिषेकाकरितां) उपवास केल्याचें श्रवण केल्यावर अयोध्येमध्यें

सर्वः प्रमुदितो जनः ९ ततः पौरजनः सर्वः श्रुत्वा रामाभिषेचनम् । प्रभातां रजनीं दृष्ट्वा चक्रे शोभयितुं पुरीम् १० सिताभ्रशिखराभेषु देवतायतनेषु च । चतुष्पथेषु रथ्यासु चैत्येष्वट्टालकेषु च ११ नानापण्यसमृद्धेषु वणिजामापणेषु च । कुटुम्बिनां समृद्धेषु श्रीमत्सु भवनेषु च १२ सभासु चैव सर्वासु वृक्षेष्वालक्षितेषु च । ध्वजाः समुच्छ्रिताः साधु पताकाश्चाभवंस्तथा १३ नटनर्तकसङ्घानां गायकानां च गायताम् । मनःकर्णसुखा वाचः शुश्राव जनता ततः १४ रामाभिषेकयुक्ताश्च कथाश्चक्रुर्मिथो जनाः । रामाभिषेके संप्राप्ते चत्वरेषु गृहेषु च १५ बाला अपि क्रीडमाना गृहद्वारेषु संघशः । रामाभिषवसंयुक्ताश्चक्रुरेव कथा मिथः १६ कृतपुष्पोपहारश्च धूपगन्धाधिवासितः । राजमार्गः कृतः श्रीमान्पौरै रामाभिषेचने १७ प्रकाशीकरणार्थं च निशागमनशङ्कया । दीपवृक्षांस्तथा चक्रुरनुरथ्यासु सर्वशः १८ अलंकारं पुरस्यैवं कृत्वा तत्पुरवासिनः । आकाङ्क्षमाणा रामस्य यौवराज्याभिषेचनम् १९

---

राहणारे सर्व लोक आनंदित झाले ९ आणि रामाला अभिषेक होणार असें ऐकून आनंदित झालेल्या त्या सर्व नगरवासी जनांनीं रात्र उजाडली व रात्र उजाडली असें पाहून नगरीला शोभा आणण्याचें मनामध्यें आणिलें १०. श्वेतमेघतुल्य हिमालयपर्वताच्या शिखरांप्रमाणें असलेलीं देवालयें, चौक, मोठमोठे रस्ते, पार, बुरूज ११, अनेक प्रकारचा माल भरलेलीं उदम्यांचीं दुकानें, कुटुंबी लोकांचीं समृद्ध आणि भव्य गृहें १२, सर्व सभास्थानें आणि चोहोंबाजूंनीं दृष्टोत्पत्तीस येणार ( उंच उंच ) वृक्ष ह्यांचे ठिकाणीं निशाणें व पताका चांगल्या रीतीनें उभारिल्या गेल्या १३. नट आणि नृत्य करणारे ह्यांचे समुदाय आपआपलीं कामें करूं लागले असतां आणि गवई गाऊं लागले असतां मनाला आणि श्रवणेंद्रियाला सुखावह असे शब्द जनसमुदायाला ऐकूं येऊं लागले १४. ह्याप्रमाणें रामाला अभिषेक होण्याचा समय प्राप्त झाला असतां चवाठ्यावरून आणि घरांतून लोक रामाभिषेकासंबंधानेंच आपआपसांत गोष्टी बोलूं लागले १५; घरांच्या दारांशीं ठिकठिकाणीं बालकांचे समुदाय जुळून खेळूं लागले आणि रामाच्या अभिषेकासंबंधानेंच आपआपसांत वांटाघाटी करूं लागले १६. नगरांतील लोकांनीं रामाच्या अभिषेकाकरितां फुलांच्या अराशी करून व जिकडे तिकडे धूपाचा सुवास करून राजमार्गाला शोभा आणिली १७ आणि समारंभ होतां होतां कदाचित् रात्र पडेल अशी शंका येऊन उजेड करण्याकरितां त्यांनीं लहान लहान रस्त्यांतून सुद्धां अमर्दी चोहोंकडे दीपवृक्ष तयार करून ठेविले १८. ह्याप्रमाणें

समेत्य सङ्घशः सर्वे चत्वरेषु सभासु च। कथयन्तो मिथस्तत्र प्रशशंसुर्जनाधिपम् २० अहो महात्मा राजायमिक्ष्वाकुकुलनन्दनः। ज्ञात्वा वृद्धं स्वमात्मानं रामं राज्येऽभिषेक्ष्यति २१ सर्वे ह्यनुगृहीताः स्म यन्नो रामो महीपतिः। चिराय भविता गोप्ता दृष्टलोकपरावरः २२ अनुद्धतमना विद्वान्धर्मात्मा भ्रातृवत्सलः। यथा च भ्रातृषु स्निग्धस्तथास्मास्वपि राघवः २३ चिरं जीवतु धर्मात्मा राजा दशरथो नघः। यत्प्रसादेनाभिषिक्तं रामं द्रक्ष्यामहे वयम् २४ एवंविधं कथयतां पौराणां शुश्रुवुः परे। दिग्भ्यो विश्रुतवृत्तान्ताः प्राप्ता जानपदा जनाः २५ ते तु दिग्भ्यः पुरीं प्राप्ता द्रष्टुं रामाभिषेचनम्। रामस्य पूरयामासुः पुरीं जानपदा जनाः २६ जनौघस्तैर्विसर्पद्भिः शुश्रुवे तत्र निःस्वनः। पर्वसूदीर्णवेगस्य सागरस्येव निःस्वनः २७ ततस्तदिन्द्रक्षयसंनिभं पुरं दिदृक्षुभिर्जानपदैरुपाहितैः। समन्ततः सस्वनमाकुलं बभौ समुद्रयादोभिरिवार्णवोदकम् २८ [ २५४ ]

---

रामाला यौवराज्याचा अभिषेक होण्याची इच्छा करणारे त्या नगरींतील लोक नगरी सुशोभित करून १९ चवाठ्यावर आणि सभांतून सर्व समुदायांनीं जुळले आणि आपआपसांत गोष्टी बोलतां बोलतां दशरथराजाची प्रशंसा करूं लागले कीं २० "कायहो तरी हा महात्मा इक्ष्वाकुवंशज दशरथराजा! अहो, आपण वृद्ध झालों असें समजून हा रामाला राज्याभिषेक करणार आहे २१. आतां जगतांतील सर्व बरा वाईट प्रकार जाणणारा रामराजा पुष्कळ दिवसपर्यंत आपला पालक होणार. हा आपणां सर्वांवर खरोखर ईश्वराचा अनुग्रह झाला आहे २२. विनयशील, अंतःकरणानें युक्त, ज्ञाता, धर्मनिष्ठ आणि भ्रातृवत्सल असा हा रघुवंशज राम भ्रात्याप्रमाणें आह्मांवरही प्रेम करणारा आहे २३. ज्याच्या कृपेमुळें आज आह्मांला रामाला राज्याभिषेक झालेला पाहाण्याचा प्रसंग येणार आहे तो बिचारा धर्मात्मा दशरथराजा दीर्घायु होवो" २४. ह्याप्रमाणें राजधानींतील लोक आपआपसांत बोलूं लागले असतां रामाच्या अभिषेकाचा वृत्तांत श्रवण केल्यावर चोहोंकडून आलेल्या देशांतील इतर लोकांनीं तें बोलणें ऐकिलें २५ आणि रामाचा अभिषेक पहाण्याकरितां चोहोंकडून राजधानीमध्यें आलेल्या त्या देशांतील लोकांनीं तर रामाची ती नगरी अगदीं भरूनच काढिली २६. तव्हां त्या राजधानीकडे चाललेल्या जनसमुदायांना पर्वदिवशीं मोठ्या वेगानें युक्त झालेल्या सागराच्या ध्वनीप्रमाणें अयोध्यानगरींतील गडबड ऐकूं येऊं लागली २७ आणि समुद्रांतील जलचरांच्या योगानें ज्याप्रमाणें समुद्राचें उदक सशब्द व क्षुब्ध होऊन जातें त्याप्रमाणें अभिषेक महोत्सव पहाण्याकरितां आलेल्या देशांतील लोकांच्या

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षष्ठः सर्गः ॥६॥

ज्ञातिदासी यतो जाता कैकेय्या तु सहोषिता । प्रासादं चन्द्रसंकाशमारुरोह यदृच्छया १ सिक्तराजपथां कृत्स्नां प्रकीर्णकमलोत्पलाम् । अयोध्यां मन्थरा तस्मात्प्रासादादन्ववैक्षत २ पताकाभिर्वरार्हाभिर्ध्वजैश्च समलंकृताम् । कृतां छन्नपथैश्चापि स्वच्छन्दकपथैर्वृताम् ॥ सिक्तां चन्दनतोयैश्च शिरःस्नातजनैर्युताम् ३ माल्यमोदकहस्तैश्च द्विजेन्द्रैरभिनादिताम् । शुक्लदेवगृहद्वारां सर्ववादित्रनादिताम् ४ संप्रहृष्टजनाकीर्णां ब्रह्मघोषनिनादिताम् । प्रहृष्टवरहस्त्यश्वां संप्रणर्दितगोवृषाम् ५ हृष्टप्रमुदितैः पौरैरुच्छ्रितध्वजमालिनीम् । अयोध्यां मन्थरा दृष्ट्वा परं विस्मयमागता ६ सा हर्षोत्फुल्लनयनां पाण्डुरक्षौमवासिनीम् । अविदूरे स्थितां दृष्ट्वा धात्रीं पप्रच्छ मन्थरा ७ उत्तमेनाभिसंयुक्ता हर्षेणार्थपरा सती । राममाता धनं

---

योगानें इंद्रभुवनाप्रमाणें असलेलें तें नगर चोहोंकडून क्षुब्ध व ध्वनियुक्त झालें २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सहावा सर्ग समाप्त झाला ॥ ६ ॥

कोठें तरी जन्मास आलेली आणि कैकेयीसहवर्तमान राहिलेली तिच्या माहेरची दासी मंथरा चंद्राप्रमाणें शुभ्र असलेल्या वाड्यावर स्वेच्छेनें आरूढ होऊन १ अयोध्यानगरीकडे पाहूं लागली असतां चोहोंकडे राजमार्गावर सडे टाकिलेले आहेत; कमलपुष्पें पसरून दिलेलीं आहेत २; राजांना योग्य अशा पताका आणि ध्वज ह्यांच्या योगानें नगरी सुशोभित केलेली आहे; जेथें जागा ऊंच व सखल आहे अशा मार्गांवरही ती सुशोभित केलेली आहे; लोकसमुदायाला जाण्यायेण्याकरितां इमारती वगैरे पाडून केलेल्या मोठमोठ्या मार्गांनीं ती व्याप्त झालेली आहे; तिच्यांतील लोकांनीं अभ्यंग स्नान केलेलें आहे ३; पुष्पें व मोदक हातांत असलेल्या द्विजश्रेष्ठांच्या घोषांनीं ती दुमदुमून गेलेली आहे; तिच्यांतील देवालयांच्या द्वारांना शुभ्र रंग दिलेला आहे; सर्व प्रकारच्या वाद्यांनीं ती नादित झालेली आहे ४; जिकडे तिकडे लोकांना हर्ष झाला आहे; वेदघोषाच्या ध्वनीनें ती नगरी नादित झालेली आहे; उत्कृष्ट गज आणि अश्व ह्यांनाही हर्ष झालेला आहे; गाई व बैलही आनंदानें डरक्या फोडीत आहेत ५ आणि आनंदित झालेल्या नगरींतील लोकांनीं ध्वजपंक्ति उभारिलेल्या आहेत असें तिच्या दृष्टीं पडलें आणि अशाप्रकारें सुशोभित झालेली अयोध्यानगरी अवलोकन करून तिला अत्यंत विस्मय झाला ६. तेव्हां हर्षानें तिचे नेत्र प्रफुल्लित झालेले आहेत आणि जिनें शुभ्रवर्ण शालू नेसलेला आहे अशी रामाची दाई जवळच उभी होती तिला

किं नु जनेभ्यः संप्रयच्छति ८ अतिमात्रं प्रहर्षः किं जनस्यास्य च शंस मे । कारयिष्यति किं वापि संप्रहृष्टो महीपतिः ९ विदीर्यमाणा हर्षेण धात्री तु परया मुदा । आचचक्षेथ कुब्जायै भूयसीं राघवे श्रियम् १० श्वः पुष्येण जितक्रोधं यौवराज्येन चानघम् । राजा दशरथो राममभिषेक्ता हि राघवम् ११ धात्र्यास्तु वचनं श्रुत्वा कुब्जा क्षिप्रममर्षिता । कैलासशिखराकारात्प्रासादादवरोहत १२ सा दह्यमाना क्रोधेन मन्थरा पापदर्शिनी । शयानामेव कैकेयीमिदं वचनमब्रवीत् १३ उत्तिष्ठ मूढे किं शेषे भयं त्वामभिवर्तते । उपप्लुतमघौघेन नात्मानमवबुद्ध्यसे १४ अनिष्टे सुभगाकारे सौभाग्येन विकत्थसे । चलं हि तव सौभाग्यं नद्याः स्रोत इवोष्णगे १५ एवमुक्ता तु कैकेयी रुष्टया परुषं वचः । कुब्जया पापदर्शिन्या विषादमगमत्परम् १६ कैकेयी त्वब्रवीत्कुब्जां कच्चित्क्षेमं न मन्थरे । विषण्णवदनां हि त्वां लक्षये भृशदुःखिताम् १७ मन्थरा तु

---

पाहून मंथरा ह्मणाली ७ "पराकाष्ठेचा हर्ष होऊन मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणें दिसत असलेली ही राममाता लोकांना द्रव्य कशाकरितां देत आहे ८, ह्या लोकांना अतिशय हर्ष कशाकरितां झालेला आहे आणि दशरथराजा तरी अत्यंत हर्षयुक्त होऊन काय करविण्याच्या बेतानें आहे हें मला सांग" ९. ह्याप्रमाणें विचारिलें असतां अंतःकरणांत हर्ष मावेनासा झाल्यामुळें त्याच्या योगानें जशी कांहीं विदीर्ण होत असलेली ती दासी अत्यंत आनंदानें त्या कुबडीला रामाच्या राज्यलक्ष्मीविषयीं सांगूं लागली कीं १०, "(हे मंथरे) उदयीक पुष्यनक्षत्रावर क्रोध जिंकलेल्या निष्पाप रघुवंशज रामाला दशरथ अभिषेक करणार आहे" ११. हें दाईचें भाषण श्रवण करितांक्षणीं ती कुबडी क्रुद्ध झाली आणि कैलास पर्वताच्या शिखराप्रमाणें असलेल्या गच्चीवरून खालीं उतरली १२ आणि उतरतांक्षणीं क्रोधानें जळत असलेली ती पापबुद्धि मंथरा कैकेयी निजली असतांनाच तिला ह्मणाली १३ "हे मूढे, ऊठ; निजतेस काय ? तुला भय प्राप्त झालें आहे आणि स्वतः दुःखसागरांत तूं बुडून गेली असतांनाही तुला पत्ता नाहीं १४. दिसण्यांत मात्र चांगली असून अप्रिय गोष्ट करणारे कैकेयि, "पतीचें मझ्यावर प्रेम आहे" ह्मणून फुशारक्या मारीत असतेस; परंतु, ग्रीष्मऋतूंतील नदीच्या प्रवाहाप्रमाणें तझ्यावर असलेलें पतिप्रेम अशाश्वत आहे" १५. ह्याप्रमाणें त्या पापदृष्टि कुबडीनें रुष्ट होऊन कठोर भाषण केलें असतां कैकेयीला पराकाष्ठेचा खेद झाला १६ आणि ती त्या कुबडीला ह्मणाली "हे मंथरे, माझें बरें नाहीं कीं काय ? तूं अत्यंत दुःखित झाली असून तुझें मुखही अगदीं खिन्न झालेलें मला दिसत आहे" १७. हें कैकेयीचें मधुर

वचः श्रुत्वा कैकेय्या मधुराक्षरम् । उवाच क्रोधसंयुक्ता वाक्यं वाक्यविशारदा १८ सा विषण्णतरा भूत्वा कुब्जा तस्यां हितैषिणी। विषादयन्ती प्रोवाच भेदयन्ती च राघवम् १९ अक्षयं सुमहद्देवि प्रवृत्तं त्वद्विनाशनम् । रामं दशरथो राजा यौवराज्येऽभिषेक्ष्यति २० सास्म्यगाधे भये मग्ना दुःखशोकसमन्विता । दह्यमानानलेनेव त्वद्धितार्थमिहागता २१ तव दुःखेन कैकेयि मम दुःखं महद्भवेत् । त्वद्वृद्धौ मम वृद्धिश्च भवेदिह न संशयः २२ नराधिपकुले जाता महिषी त्वं महीपतेः । उग्रत्वं राजधर्माणां कथं देवि न बुध्यसे २३ धर्मवादी शठो भर्ता श्लक्ष्णवादी च दारुणः । शुद्धभावेन जानीषे तेनैवमतिसंधिता २४ उपस्थितः प्रयुञ्जानस्त्वयि सान्त्वमनर्थकम् । अर्थेनैवाद्य ते भर्ता कौसल्यां योजयिष्यति २५ अपवाह्य तु दुष्टात्मा भरतं तव बन्धुषु । काल्ये स्थापयिता रामं राज्ये निहतकण्टके २६ शत्रुः पतिप्रवादेन मात्रेवहितकाम्यया । आशीविष इवाङ्केन बाले परिधृतस्त्वया २७ यथा हि कुर्याच्छत्रुर्वा सर्पो

---

शब्दानें युक्त असलेलें भाषण श्रवण केल्यावर बोलण्यामध्यें पटाईत असलेली ती क्रुद्ध मंथरा १८ पहिल्यापेक्षांही ज्यास्त खिन्न झाली आणि कैकेयीचें हित इच्छिणारी ती कुबडी रामाविषयीं कैकेयीच्या अंतःकरणांत भेदभाव उत्पन्न करण्याच्या उद्देशानें तिला खेद उत्पन्न करीत करीत ह्मणाली १९ "हे राजपत्नि, दशरथराजा रामाला यौवराज्याचा अभिषेक करणार हा एक फार प्रचंड आणि अक्षय असा तुझा नाशच होण्याचा समय आला आहे २०. हें एकतांक्षणीं अगाध भयामध्यें मी बुडून गेलें आणि दुःख व शोक ह्यांनीं व्याप्त होऊन अग्नीनें दग्ध होत असलेलीच कीं काय मी तुझ्या हिताकरितां येथें आलें आहे २१. हे कैकेयि, तुला दुःख झालें असतां मला फारच दुःख होईल आणि तुझा अभ्युदय झाला असतां माझाही निःसंशय अभ्युदय होईल २२. तूं राजकुलामध्यें जन्मास आलेली असून राजाची भार्या आहेस; परंतु, हे राजपत्नि, इतकें असून राजधर्मांचें उग्र स्वरूप तूं कसें जाणीत नाहींस ? २३. धर्माच्या गोष्टी सांगून गोडगोड थापा मारणारा तुझा पति शठ व भयंकर असतांना तूं त्याला शुद्ध मनाचा समजत आहेस आणि ह्मणूनच सर्वप्रकारें तुला त्यानें फसविलें आहे २४. तुझ्याशीं नुसतें पोकळ गोडगोड भाषण करीत असून कौसल्येचें कल्याण करण्याविषयीं तत्पर असलेला तुझा भर्ता आज कौसल्येचाच मनोरथ सिद्धीस नेणार आहे २५. तो दुरात्मा तुझा भर्ता भरताला तुझ्या माहेरच्या माणसांकडे हांकून लाऊन उदयीक प्रभातकालीं निष्कंटक राज्यावर रामाची स्थापना करणार २६. हे पोरि, माता ज्याप्रमाणें बालकाचें

वा प्रत्युपेक्षितः। राज्ञा दशरथेनाद्य सपुत्रा त्वं तथा कृता २८ पापेनानृतसान्त्वेन बाले नित्यं सुखोचिता। रामं स्थापयता राज्ये सानुबन्धा हता ह्यसि २९ सा प्राप्तकालं कैकेयि क्षिप्रं कुरु हितं तव। त्रायस्व पुत्रमात्मानं मां च विस्मयदर्शने ३० मन्थराया वचः श्रुत्वा शयनात्सा शुभानना। उत्तस्थौ हर्षसंपूर्णा चन्द्रलेखेव शारदी ३१ अतीव सा तु संतुष्टा कैकेयी विस्मयान्विता। दिव्यमाभरणं तस्यै कुब्जायै प्रददौ शुभम् ३२ दत्त्वा त्वाभरणं तस्यै कुब्जायै प्रमदोत्तमा। कैकेयी मन्थरां दृष्ट्वा पुनरेवाब्रवीदिदम् ३३ इदं तु मन्थरे मह्यमाख्यातं परमं प्रियम्। एतन्मे प्रियमाख्यातं किं वा भूयः करोमि ते ३४ रामे वा भरते वाहं विशेषं नोपलक्षये। तस्मात्तुष्टास्मि यद्राजा रामं राज्येऽभिषेक्ष्यति ३५ न मे परं किंचिदितो वरं पुनः प्रियं प्रियार्हे सुवचं वचोऽमृतम्। तथा ह्यवोचस्त्वमतः प्रियोत्तरं

---

हित करण्याची इच्छा धरिते त्याप्रमाणें हित करण्याची इच्छा धरून पतीच्या मिषानें तू हा सर्पासारिखा भयंकर शत्रु आपल्या शरीरावर धारण केला आहेस २७. उपेक्षा केली असतां शत्रु अथवा सर्प ज्याप्रमाणें करीत असतो त्याप्रमाणें दशरथराजानें आज पुत्रासहवर्तमान तुझी अवस्था करून टाकिली आहे २८. हे पोरि, रामाला राज्यावर बसविणाऱ्या ह्या दशरथराजानें दुष्टपणा व कपट ह्यांनीं भरलेल्या गोड गोड भाषणानें पुत्रपौत्रादि परंपरेसहवर्तमान तुझा घात केला आहे २९. करितां, हे कैकेयि, ह्या समयाला योग्य अशी जी हिताची गोष्ट असेल ती तूं सत्वर कर आणि ( चाललेला प्रकार आपल्या हिताचाच चालला आहे असें समजून ) विस्मयचकित होणारे, हे, कैकेयि, पुत्राचें, माझें आणि आपल्या स्वतःचें रक्षण कर " ३०. हें मंथरेचें भाषण श्रवण केल्यावर हर्षानें व्याप्त झाल्यामुळें शरदृतूंतील चंद्रकलाच कीं काय अशा रीतीनें प्रसन्न मुद्रेनें युक्त झालेली कैकेयी शय्येवरून उठली ३१; अतिशय संतुष्ट व विस्मययुक्त होऊन तिनें त्या कुबडीला 'शुभं' असें एक दिव्य भूषण दिलें ३२ आणि त्या कुबडीला भूषण दिल्यावर हर्षयुक्त झालेली ती सर्वोत्कृष्ट स्त्री कैकेयी मंथरेला पुनरपि ह्मणाली ३३ " हे मंथरे, ही पराकाष्ठेची प्रिय वार्ता तूं मला सांगितलीस. खरोखर ही प्रिय वार्ता तूं मला सांगितली आहेस. आतां ह्याबद्दल मी आणखी तुला काय बरें देऊं ? ३४. राम व भरत ह्यांमध्यें मला कांहीं भेद दिसत नाहीं. ह्यास्तव, राजा रामाला राज्याभिषेक करणार ह्मणून मी संतुष्ट झालें आहें ३५. हे प्रियदानयोग्य मंथरे, ह्या तुझ्या प्रिय वार्तेपेक्षां मला कोणतेंही चांगलें भाषण अधिक प्रिय नाहीं. कारण, तू अशीच कांहीं अमृततुल्य वार्ता मला कथन केली

वरं परं ते प्रददामि तं वृणु ३६ [ २९० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

मन्थरा त्वभ्यसूय्यैनामुत्सृज्याभरणं हि तत् । उवाचेदं ततो वाक्यं कोपदुःखसमन्विता १ हर्षं किमर्थमस्थाने कृतवत्यसि बालिशे । शोकसागरमध्यस्थं नात्मानमवबुध्यसे २ मनसा प्रसहामि त्वां देवि दुःखार्दिता सती । यच्छोचितव्ये हृष्टासि प्राप्य त्वं व्यसनं महत् ३ शोचामि दुर्मतित्वं ते का हि प्राज्ञा प्रहर्षयेत् । अरेः सपत्नीपुत्रस्य वृद्धिं मृत्योरिवागताम् ४ भरतादेव रामस्य राज्यसाधारणाद्भयम् । तद्विचिन्त्य विषण्णास्मि भयं भीताद्धि जायते ५ लक्ष्मणो हि महाबाहू रामं सर्वात्मना गतः । शत्रुघ्नश्चापि भरतं काकुत्स्थं लक्ष्मणो यथा ६ प्रत्यासन्नक्रमेणापि भरतस्यैव भामिनि । राज्यक्रमो विसृष्टस्तु तयोस्तावद्यवीयसोः ७ विदुषः क्षत्रचारित्रे प्राज्ञस्य प्राप्तकारिणः । भयात्प्रवेपे रामस्य चिन्तयन्ती तवा-

आहेस. ह्याकरितां, प्रिय वार्ता श्रवण केल्यानंतर मी तुला श्रेष्ठ वर देतें तो तूं मागून घे " ३६. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं सातवा सर्ग समाप्त झाला ॥ ७ ॥

मंथरेला कैकयीचें भाषण सहन न झाल्यामुळें कैकयीनें दिलेलें तें भूषण तिनें टाकून दिलें आणि कोप व दुःख ह्यांनीं व्याप्त झालेली ती मंथरा कैकयीला ह्मणाली १ "हे मूढे, भलत्याच प्रसंगीं तूं कशाकरितां आनंदित झाली आहेस ? तूं स्वतः शोकसागरामध्यें आहेस हें जाणीत नाहीस २. हे राजपत्नि, भयंकर संकट प्राप्त होऊन शोक करण्याचा समय आला असतांना तूं आनंदित झाली आहेस ह्याविषयीं मी दुःखाकुल होऊन मनापासून तुझा निषेध करीत आहें ३ आणि तुझ्या मूढपणाबद्दल मला वाईट वाटत आहे. मृत्यूप्रमाणें सवतीच्या पुत्राचा अभ्युदय प्राप्त आल्याचें पाहून कोण बरें शहाणी स्त्री आनंदित होईल ? ४. राज्य हें सर्वांनाच साधारण असल्यामुळें भरतापासूनच रामाला भय आहे. तव्हां, ह्याचा विचार करून मी खिन्न झालें आहें. कारण, जो एक पुरुष ज्या दुसऱ्या पुरुषाला भीत असतो तो अधिकारापन्न झाला असतां त्या दुसऱ्या पुरुषाला त्याच्यापासून भय प्राप्त होतें ५. महापराक्रमी लक्ष्मण सर्वस्वीं रामाच्या तंत्रानें वागणारा आहे आणि लक्ष्मण ज्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या तंत्रानें वागत आहे तसा शत्रुघ्नही भरताच्या तंत्रानें वागत आहे ६. दशरथराजा नेहमीं तुझ्या संनिधच असतो ह्या कारणानें, हे स्त्रिये, भरतालाच राज्य प्राप्त होणें उचित दिसतें; परंतु, ते भरतशत्रुघ्न वयानें लहान असल्यामुळें त्यांना राज्य प्राप्त होणें दूरच

त्मजम् ८ सुभगा किल कौसल्या यस्याः पुत्रोभिषेक्ष्यते। यौवराज्येन महता श्वः पुष्येण द्विजोत्तमैः ९ प्राप्तां वसुमतीं प्रीतिं प्रतीतां हतविद्विषम्। उपस्थास्यसि कौसल्यां दासीवत्त्वं कृताञ्जलिः १० एवं च त्वं सहास्माभिस्तस्याः प्रेष्या भविष्यसि। पुत्रश्च तव रामस्य प्रेष्यत्वं हि गमिष्यति ११ हृष्टाः खलु भविष्यन्ति रामस्य परमाः स्त्रियः। अप्रहृष्टा भविष्यन्ति स्नुषास्ते भरतक्षये १२ तां दृष्ट्वा परमप्रीतां ब्रुवन्तीं मन्थरां ततः। रामस्यैव गुणान्देवी कैकेयी प्रशशंस ह १३ धर्मज्ञो गुणवान्दान्तः कृतज्ञः सत्यवाञ्छुचिः। रामो राजसुतो ज्येष्ठो यौवराज्यमतोर्हति १४ भ्रातॄन्भृत्यांश्च दीर्घायुः पितृवत्पालयिष्यति। संतप्यसे कथं कुब्जे श्रुत्वा रामाभिषेचनम् १५ भरतश्चापि रामस्य ध्रुवं वर्षशतात्परम्। पितृपैतामहं राज्यमवाप्स्यति नरर्षभः १६ सा त्वमभ्युदये प्राप्ते दह्यमानेव मन्थरे।

---

राहिलें आहे ७. सर्व शास्त्रवेत्ता, क्षत्रविद्येमध्यें निपुण आणि विलंब न करितां समयोचित कर्तव्य गोष्ट करणारा जो राम त्याच्यापासून तुझ्या पुत्राला अनर्थ प्राप्त होणार असें समजून मी त्याच्या भयानें कांपत आहे ८. उद्यांक पुष्यनक्षत्रावर द्विजश्रेष्ठांकडून जिच्या पुत्राला श्रेष्ठ यौवराज्याचा अभिषेक होणार ती कौसल्या खरोखर भाग्यवती आहे ९. उद्यां पृथ्वी प्राप्त होऊन कौसल्या आनंदित झाली असतां आणि तुह्मांसारिख्या प्रतिपक्ष्यांचा घात करून ती प्रसिद्धीला आली असतां तुला हात जोडून दासीप्रमाणें तिच्या सेवेमध्यें तत्पर राहणें भाग पडेल १०. ह्याप्रमाणें तूं आह्मांसहवर्तमान तिची दासी होशील आणि तुझा पुत्र रामाचा दास होईल ११. सीतेच्या सख्यासुद्धां आनंदित होतील आणि राज्यप्राप्तिक्रमांतून भरताचें नांव नाहींसें झालें असतां तुझ्या स्नुषा दुःखित होऊन राहतील." १२. ह्याप्रमाणें रामाविषयीं अतिशय असंतुष्ट होऊन भाषण करीत असलेल्या त्या मंथरेला अवलोकन करूनही राजपत्नी कैकेयी रामाच्याच गुणांची प्रशंसा करूं लागली १३. ( ती ह्मणाली ) राम हा धर्मवेत्ता, गुणवान्, आत्मसंयमी, कृतज्ञ, सत्यनिष्ठ आणि आचरणानें निर्मल असून राजाचा ज्येष्ठ पुत्र असल्यामुळें त्यालाच यौवराज्य प्राप्त होणें योग्य आहे १४. तो दीर्घायु राम भ्रात्यांचें आणि दासांचें—पुत्राचें परिपालन करणाऱ्या पित्याप्रमाणें—पालन करील. तेव्हां, हे कुबडे, रामाला अभिषेक होत आहे हें ऐकून तुझ्या अंगाचा कशाकरितां संताप झाला आहे ? १५. पुरुषश्रेष्ठ भरतही जर राज्यप्राप्तीची इच्छा धरीत असेल तर रामानें शंभर वर्षें राज्य

भविष्यति च कल्याणे किमिदं परितप्यसे १७ यथा वै भरतो मान्यस्तथा भूयोपि राघवः । कौसल्यातोतिरिक्तं च मम शुश्रूषते बहु १८ राज्यं यदि हि रामस्य भरतस्यापि तत्तदा । मन्यते हि यथात्मानं तथा भ्रातॄंस्तु राघवः १९ कैकेय्या वचनं श्रुत्वा मन्थरा भृशदुःखिता । दीर्घमुष्णं विनिःश्वस्य कैकेयीमिदमब्रवीत् २० अनर्थदर्शिनी मौर्ख्यान्नात्मानमवबुध्यसे । शोकव्यसनविस्तीर्णे मज्जन्ती दुःखसागरे २१ भविता राघवो राजा राघवस्य च यः सुतः । राजवंशात्तु भरतः कैकेयि परिहास्यते २२ न हि राज्ञः सुताः सर्वे राज्ये तिष्ठन्ति भामिनि । स्थाप्यमानेषु सर्वेषु सुमहाननयो भवेत् २३ तस्माज्ज्येष्ठे हि कैकेयि राज्यतन्त्राणि पार्थिवाः । स्थापयन्त्यनवद्याङ्गि गुणवत्स्वितरेष्वपि २४ असावत्यन्तनिर्भग्नस्तव पुत्रो भविष्यति । अनाथवत्सुखेभ्यश्च राजवंशाच्च वत्सले २५ साहं त्वदर्थे संप्राप्ता त्वं तु मां नावबुध्यसे । सपत्निवृद्धौ या मे त्वं प्रदेयं दातुमर्हसि २६

---

केल्यानंतर पितृपितामहादि परंपरेनें चालत आलेलें राज्य निःसंशय त्यालाही प्राप्त होईल १६. तस्मात्, रामाभिषेकरूप उत्सव प्राप्त झाला असून भरताभिषेकरूप श्रेयःप्राप्तिही कांहीं कालानें होण्याचें निश्चित असतांना, हे मंथरे, तूं अगदीं होरपळल्यासारिखी कशाकरितां संतप्त होत आहेस ? १७. मला जसा भरत मान्य आहे तसा राम तर त्याच्याहीपेक्षां अधिक मान्य आहे आणि तोही कौसल्येपेक्षां माझ्याच शुश्रूषेमध्यें फार तत्पर असतो १८. शिवाय, रामाला जर आज राज्य प्राप्त होत आहे तर तें भरतालाही होतच आहे. कारण, तो स्वतांप्रमाणें आपल्या भ्रात्यांना समजत आहे" १९. हें कैकेयीचें भाषण श्रवण करून मंथरा अतिशय संतप्त झाली आणि दीर्घ व उष्ण असा सुस्कारा टाकून कैकेयीला ह्मणाली २० "भलतेंच मनांत घेऊन बसलेली तूं शोक आणि संकट ह्यांनीं व्याप्त झालेल्या दुःखसागरामध्यें बुडत असतांनाही मूर्खपणामुळें तुला स्वतःचें भान राहिलेलें नाहीं २१. रघुवंशज राम उद्यां राजा झाला ह्मणजे त्याचाच पुत्र पुढें राजा होणार आणि, हे कैकेयि, राजवंशापासून भरत च्युत होणार २२. हे स्त्रिये, राजाचे सर्वच पुत्र कधीं राज्य करीत नसतात. कारण, सर्वच पुत्र राज्य करूं लागले असतां फारच मोठा अनर्थ होईल २३. तस्मात्, हे सुंदरि कैकेयि, इतर पुत्र गुणवान् असतांनाही ज्येष्ठ पुत्रालाच राजे राज्याचे अधिकार देत असतात २४. सारांश, हे दयाशील कैकेयि, हा तुझा पुत्र अनाथाप्रमाणें राजवंशाला आणि सर्व सुखांना अगदीं शेवटपर्यंत मुकणार २५. मी तुझ्याकरितां येथें आलें असून तूं तर मला ओळखीत नाहींस. इतकेंच नव्हे परंतु, सवतीचा अभ्युदय होत आहे [illegible] तूं मला देणगी देण्यास

ध्रुवं तु भरतं रामः प्राप्य राज्यमकण्टकम्। देशान्तरं नाययिता लोकान्तरमथापि वा २७ बाल एव तु मातुल्यं भरतो नायितस्त्वया। संनिकर्षाच्च सौहार्दं जायते स्थावरेष्विव २८ भरतानुवशात्सोपि शत्रुघ्नस्तत्समं गतः। लक्ष्मणो हि यथा रामं तथायं भरतं गतः २९ श्रूयते हि द्रुमः कश्चिच्छेत्तव्यो वनजीवनैः। संनिकर्षादिषीकाभिर्मोचितः परमाद्भयात् ३० गोप्ता हि रामं सौमित्रिर्लक्ष्मणं चापि राघवः। अश्विनोरिव सौभ्रात्रं तयोर्लोकेषु विश्रुतम् ३१ तस्मान्न लक्ष्मणे रामः पापं किंचित्करिष्यति। रामस्तु भरते पापं कुर्यादेव न संशयः ३२ तस्माद्राजगृहादेव वनं गच्छतु राघवः। एतद्धि रोचते मह्यं भृशं चापि हितं तव ३३ एवं ते ज्ञातिपक्षस्य श्रेयश्चैव भविष्यति। यदि चेद्भरतो धर्मात्पित्र्यं राज्यमवाप्स्यति ३४ स ते सुखोचितो बालो रामस्य सहजो रिपुः। समृद्धा-

---

उद्युक्त झाली आहेस २६. रामाला निष्कंटक राज्य प्राप्त झालें असतां तो भरताला परदेशीं अथवा परलोकींही निःसंशय पाठवून देणार २७. भरताला तर तूं बालपणींच मातुलगृहीं पाठवून दिलें आहेस; परंतु, वृक्षलतादिकांचे ठिकाणीं सांनिध्यामुळें जसें परस्परसंयोगरूप प्रेम वाढत असतें तसें मनुष्यांमध्येंही सांनिध्यामुळेंच प्रेम वाढत असतें. ( सारांश, वृक्ष, लता वगैरे जवळ जवळ असल्यामुळें जशीं एकमेकांना कवटाळून धरितात तशीच मनुष्यांची स्थिति असल्यामुळें प्रथमपासून भरत जर पित्याचे संनिध असता तर त्यालाही आज राज्याचा विभाग प्राप्त झालाच असतां ) २८. शत्रुघ्न येथें असतां तर कदाचित् भरताचा घात झाला नसता. परंतु, तोही भरताच्या तंत्रानें वागणारा असल्यामुळें त्याच्या बरोबर चालता झाला. कारण, लक्ष्मण जसा रामाच्या अनुरोधानें वागणारा आहे तसा हा भरताच्या अनुरोधानें वागणारा आहे २९. वनामध्यें उपजीविका करणाऱ्यांना एक वृक्ष तोडावयाचा होता; परंतु, त्याच्या भोंवतालीं असलेल्या कांटेरी झुडुपांनीं त्या पराकाष्ठेच्या भीतीपासून त्या वृक्षाला मुक्त केलें असें ऐकण्यांत आहे ३०. सुमित्रापुत्र लक्ष्मण रामाचें रक्षण करणारा असून राम लक्ष्मणाचें रक्षण करणारा आहे. कारण, त्या उभयतांतील भ्रातृप्रेम अश्विनीकुमारांच्या भ्रातृप्रेमाप्रमाणें लोकप्रसिद्ध आहे ३१. ह्यामुळें लक्ष्मणाचें राम यत्किंचित्ही वाईट करणार नाहीं; परंतु, भरताचें तो निःसंशय वाईट करणारच ३२. तस्मात्, राजवाड्यांतूनच आज रामानें वनांत चालतें व्हावें हें मला रुचत आहे आणि तुझेंही ह्यामध्यें अतिशय हित आहे ३३. ह्याप्रमाणें भरताला जर धर्मतः पित्याचें राज्य प्राप्त झालें तर तुझ्या माहेरच्या माणसांचेंही कल्याण होईल ३४. तात्पर्य, रामाला राज्यलक्ष्मी प्राप्त झाली

र्थस्य नष्टार्थो जीविष्यति कथं वशे ३५ अभिद्रुतमिवारण्ये सिंहेन गजयूथपम्। प्रच्छाद्यमानं रामेण भरतं त्रातुमर्हसि ३६ दर्पान्निराकृता पूर्वं त्वया सौभाग्यवत्तया। राममाता सपत्नी ते कथं वैरं न यापयेत् ३७ यदा च रामः पृथिवीमवाप्स्यते प्रभूतरत्नाकरशैलसंयुताम्। तदागमिष्यस्यशुभं पराभवं सहैव दीना भरतेन भामिनि ३८ यदा हि रामः पृथिवीमवाप्स्यते ध्रुवं प्रणष्टो भरतो भविष्यति। अतो हि संचिन्तय राज्यमात्मजे परस्य चैवाद्य विवासकारणम् ३९ [ ३२९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टमः सर्गः ॥ ८ ॥

एवमुक्ता तु कैकेयी क्रोधेन ज्वलितानना। दीर्घमुष्णं विनिःश्वस्य मन्थरामिदमब्रवीत् १ अद्य राममितः क्षिप्रं वनं प्रस्थापयाम्यहम्। यौवराज्येन भरतं क्षिप्रमद्याभिषेचये २ इदं त्विदानीं संपश्य केनोपायेन साधये। भरतः प्राप्नुयाद्राज्यं न तु रामः कथंचन ३ एवमुक्ता तु सा देव्या मन्थरा पापदर्शिनी। रामार्थमुपहिंसन्ती कैकेयीमिदमब्रवीत् ४

असतांना सहज शत्रु असलेला तुझा बालक अभ्युदयापासून च्युत झाला असतां कसा बरें त्याच्या आज्ञेमध्यें वागून जिवंत राहील ? ३५. तस्मात् , अरण्यामध्यें सिंह पाठीस लागलेल्या गजेंद्राप्रमाणें रामाच्या योगानें पादाक्रांत होऊन जाणाऱ्या भरताचें तूं रक्षण कर ३६. पतिप्रेमाच्या जोरावर पूर्वीं तूं गर्वानें रामाच्या मातेला जुमानिलें नाहींस. तेव्हां ती तुझी सवत आतां त्या वैराचा कां बरें सूड उगवून घेणार नाहीं ? ३७. हे स्त्रिये, विशाल समुद्र आणि पर्वत ह्यांसहवर्तमान पृथ्वी जेव्हां रामाला प्राप्त होईल तेव्हां भरतासहवर्तमान तूं अनाथ होऊन तुझी फारच शोचनीय हानि होणार आहे ३८. तात्पर्य, रामाला पृथ्वी प्राप्त झाली असतां भरताचा निःसंशय घात होईलच होईल. ह्यास्तव, आपल्या पुत्राला राज्यप्राप्तीचें कारण आणि शत्रूला बाहेर घालविण्याचें कारण तूं मनामध्यें योज ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं आठवा सर्ग समाप्त झाला ॥ ८ ॥

ह्याप्रमाणें मंथरा ह्मणाली असतां कैकेयीची मुद्रा क्रोधानें लाल झाली आणि दीर्घ व उष्ण सुस्कारा टाकून ती कैकयी मंथरेला ह्मणाली १ " तर मग आज मी रामाला सत्वर वनामध्यें पाठवितें आणि भरताला आजच्या आजच सत्वर यौवराज्याचा अभिषेक करवितें २. परंतु, हे मंथरे, रामाला कांहीं केलें तरी राज्य प्राप्त न होतां भरतालाच राज्य प्राप्त व्हावें ही गोष्ट कोणत्या उपायानें मला साधितां येईल ह्याचा तूं विचार कर " ३. ह्याप्रमाणें राजपत्नी मंथरेला ह्मणाली असतां वाईट चिंतणारी ती मंथरा

हन्तेदानीं प्रपश्य त्वं कैकेयि श्रूयतां वचः। यथा ते भरतो राज्यं पुत्रः प्राप्स्यति केवलम् ५ किं न स्मरसि कैकेयि स्मरन्तीवानिगूहसे। यदुच्यमानमात्मार्थं मत्तस्त्वं श्रोतुमिच्छसि ६ मयोच्यमानं यदि ते श्रोतुं छन्दो विलासिनि। श्रूयतामभिधास्यामि श्रुत्वा चैतद्विधीयताम् ७ श्रुत्वैवं वचनं तस्या मन्थरायास्तु कैकयी। किंचिदुत्थाय शयनात्स्वास्तीर्णादिदमब्रवीत् ८ कथयस्व ममोपायं केनोपायेन मन्थरे। भरतः प्राप्नुयाद्राज्यं न तु रामः कथंचन ९ एवमुक्ता तदा देव्या मन्थरा पापदर्शिनी। रामार्थमुपहिंसन्ती कैकेयीमिदमब्रवीत् १० पुरा देवासुरे युद्धे सह राजर्षिभिः पतिः। आगच्छत्त्वामुपादाय देवराज्यस्य साह्यकृत् ११ दिशमास्थाय कैकेयि दक्षिणां दण्डकान्प्रति। वैजयन्तमिति ख्यातं पुरं यत्र तिमिध्वजः १२ स शम्बर इति ख्यातः शतमायो महासुरः। ददौ शक्रस्य सङ्ग्रामं देवसङ्घैरनिन्दितः १३ तस्मिन्महति सङ्ग्रामे पुरुषान्क्षतविक्षतान्।

---

रामाभिषेक हाणून पाडण्याच्या उद्देशानें कैकेयीला ह्मणाली ४ "हे कैकेयि, आतां माझें सामर्थ्य पहा आणि फक्त तुझ्या भरतनामक पुत्रालाच कसें राज्य प्राप्त होईल ह्यासंबंधानें तूं आतां माझें बोलणें ऐकून घे ५. हे कैकेयि, तो उपाय तुला स्मरतच नाहीं? किंवा स्मरत असूनही तूं लपवून ठेवीत आहेस? कारण, ज्याअर्थी आपला मनोरथ सिद्धीस नेणारा तो उपाय तूं अनेक वेळां मला सांगितला असूनही मला "सांग" ह्मणून ह्मणत आहेस त्याअर्थी माझ्या तोंडातून वदविण्याचाच तुझा उद्देश दिसतो ६. हे विलासिनि, माझ्या तोंडून ऐकण्याचीच जर तुझी इच्छा असेल तर ऐक आणि ऐकून घेऊन तूं त्याप्रमाणें वाग" ७. हें त्या मंथरेचें भाषण ऐकून घेतल्यावर उत्कृष्ट रीतीनें घातलेल्या शय्येपासून कैकेयी किंचित् उठली आणि ह्मणाली ८ "हे मंथरे, रामाला कांहीं केलें तरी राज्य प्राप्त न होतां भरतालाच कोणत्या उपायानें राज्य प्राप्त होईल तो उपाय तूं मला सांग" ९. ह्याप्रमाणें राजपत्नी कैकेयी बोलली असतां दुसऱ्याचें वाईट चिंतणारी ती मंथरा रामाचा अभिषेक हाणून पाडण्याचा उद्देश मनांत धरून कैकेयीला ह्मणाली १० "पूर्वी देवदैत्यांच्या युद्धामध्यें राजर्षिसहवर्तमान तुझा पति देवराज इंद्राला साहाय्य करण्याकरितां तुला बरोबर घेऊन गेला होता ११. हे कैकेयि, दक्षिण दिशेस असलेल्या दंडकारण्यदेशामध्यें वैजयंत ह्मणून प्रसिद्ध राजधानीचें शहर असून त्या ठिकाणीं तिमिध्वज राजा होता १२. तोच शंबर ह्मणून प्रसिद्ध आहे आणि शेंकडों मायांनीं युक्त असलेल्या त्या अनिंदित महादैत्यानेंच देवगणांसहवर्तमान इंद्राशीं संग्राम केला १३. त्या महासंग्रामामध्यें जे पुरुष जखमा लागून रात्रीं पडलेले असत त्यांना

रात्रौ प्रसुप्तान्घ्नन्ति स्म तरसापास्य राक्षसाः १४ तत्राकरोन्महायुद्धं राजा दशरथस्तदा । असुरैश्च महाबाहुः शस्त्रैश्च शकलीकृतः १५ अपवाह्य त्वया देवि सङ्ग्रामान्नष्टचेतनः । तत्रापि विक्षतः शस्त्रैः पतिस्ते रक्षितस्त्वया १६ तुष्टेन तेन दत्तौ ते द्वौ वरौ शुभदर्शने । स त्वयोक्तः पतिर्देवि यदिच्छेयं तदा वरम् १७ गृह्णीयां तु तदा भर्तस्तथेत्युक्तं महात्मना । अनभिज्ञा ह्यहं देवि त्वयैव कथितं पुरा १८ कथैषा तव तु स्नेहान्मनसा धार्यते मया । रामाभिषेकसंभारान्निगृह्य विनिवर्तय १९ तौ च याचस्व भर्तारं भरतस्याभिषेचनम् । प्रव्राजनं च रामस्य वर्षाणि च चतुर्दश २० चतुर्दश हि वर्षाणि रामे प्रव्राजिते वनम् । प्रजाभावगतः स्नेहः स्थिरः पुत्रो भविष्यति २१ क्रोधागारं प्रविश्याद्य क्रुद्धेवाश्वपतेः सुते । शेष्वानन्तर्हितायां त्वं भूमौ मलिनवासिनी २२ मा स्मैनं प्रत्युदीक्षेथा मा चैनमभिभाषथाः । रुदन्ती पार्थिवं दृष्ट्वा जगत्यां शोकलालसा २३ दयिता

बलात्कारानें आंथरुणावरून ओढून नेऊन राक्षस मारीत असत १४. त्या संग्रामामध्यें दशरथराजानें मोठें युद्ध केलें. तेव्हां त्या महापराक्रमी राजाच्या अंगाचे दैत्यांनीं शस्त्रांच्या योगानें अगदीं लचके काढिले १५. हें पाहून, हे राजपत्नि, मूर्छित झालेल्या आपल्या पतीला तूं संग्रामांतून दूर घेऊन गेलीस; तथापि, तेथंही असुरांनीं शस्त्रांच्या योगानें त्याच्या शरीराला क्षतें पाडिलींच. परंतु, त्या प्रसंगींही, तूं त्याचें रक्षण केलेंस १६. हें पाहिल्यावर भर्ता संतुष्ट होऊन, हे सुंदरि, तुला त्यानें वर देऊं केले असतां " इच्छेस येईल तेव्हां मी हे वर मागून घेईन " ह्मणून तूं त्याला सांगितलें आहेस व तो महात्माही त्या वेळीं " ठीक आहे " ह्मणून बोलला आहे. हे राजपत्नि, हा प्रकार मला प्रथम विदित नव्हता; परंतु, तूंच पूर्वी सांगितला आहेस १७, १८. ही गोष्ट तुझे ठिकाणीं प्रेम असल्यामुळें मीं मनांत धरून ठेविलेली आहे. ह्याकरितां वरांच्या जोरावर तूं पतीला वश करून घे आणि रामाला अभिषेक करण्याच्या तयारीपासून तूं त्याला परावृत्त कर १९. तात्पर्य, भरताला राज्याभिषेक आणि चवदा वर्षेपर्यंत रामाला वनवास ह्याप्रमाणें ते दोन वर तूं आपल्या भर्त्यापासून मागून घे २०. चवदा वर्षे राम वनांमध्यें गेला ह्मणजे तुझ्या पुत्राविषयीं प्रजेच्या अंतःकरणांत प्रेम उत्पन्न होईल आणि असें झालें असतां राज्याचे ठिकाणीं तुझा पुत्र निश्चल राहील २१. तस्मात्, हे अश्वपतिकन्ये, तूं आज क्रोधगृहांमध्यें जा आणि भूमीवर कांहींएक न आंथरतां मलिन वस्त्र परिधान करून पड २२. राजा आला असतां त्याच्याकडे तूं पाहूंही नकोस आणि कांहीं भाषणही करूं नकोस. राजाला पाहिल्याबरोबर तूं शोकाकुल

त्वं सदा भर्तुरत्र मे नास्ति संशयः। त्वत्कृते च महाराजो विशेदपि हुताशनम् २४ न त्वां क्रोधयितुं शक्तो न क्रुद्धां प्रत्युदीक्षितुम्। तव प्रियार्थं राजा तु प्राणानपि परित्यजेत् २५ न ह्यतिक्रमितुं शक्तस्तव वाक्यं महीपतिः। मन्दस्वभावे बुध्यस्व सौभाग्यबलमात्मनः २६ मणिमुक्तासुवर्णानि रत्नानि विविधानि च। दद्याद्दशरथो राजा मा स्म तेषु मनः कृथाः २७ यौ तौ देवासुरे युद्धे वरौ दशरथो ददौ। तौ स्मारय महाभागे सोर्थो न त्वाक्रमेदिति २८ यदा तु ते वरं दद्यात्स्वयमुत्थाप्य राघवः। व्यवस्थाप्य महाराजं त्वमिमं वृणुया वरम् २९ रामप्रव्राजनं दूरं नव वर्षाणि पञ्च च। भरतः क्रियतां राजा पृथिव्यां पार्थिवर्षभ ३० चतुर्दश हि वर्षाणि रामे प्रव्राजिते वनम्। रूढश्च कृतमूलश्च शेषं स्थास्यति ते सुतः ३१ रामप्रवाजनं चैव देवि याचस्व तं वरम्। एवं सेत्स्यन्ति पुत्रस्य सर्वार्था-

---

होऊन भूमीवर रुदन करीत पडलेली रहा २३. तूं नेहमीं भर्त्याला प्रिय आहेस ह्याविषयीं मला संशय नाहीं. तुझ्याकरितां तो महाराज अग्नीमध्येंही प्रवेश करील २४. तुला कोप आणण्यास तो समर्थ नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, तूं क्रुद्ध असतांना तुझ्याकडे पहाण्याचेंही त्याचें तोंड नाहीं. तुला प्रिय असलेली गोष्ट करण्याकरितां राजा प्राणांचाही त्याग करील २५. तुझा शब्द खालीं पाडण्यास तो भूपति समर्थ नाहीं. तेव्हां, हे मूढ, पतिप्रेमाचा केवढा जोर तुला आहे हें तूं समजून एस २६. मणि, मोत्यें, सुवर्ण आणि नानाप्रकारचीं रत्नें तुला दशरथ राजा देऊं लागेल; परंतु, तूं त्यांचे ठिकाणीं आपलें मन गुंतवूं नको २७. हे महाभाग्यवति कैकेयि, देवदैत्यांच्या युद्धाचे वेळीं जे वर तुला दिलेले आहेत त्यांचें तूं त्याला स्मरण कर ह्मणजे तुझा तो उद्देश अगदींच कांहीं निष्फल होणार नाहीं २८. जेव्हां स्वतः शय्येवरून उठून राजा तुला वर देईल तेव्हां शपथा घालून तूं त्याला सत्यवचनांत धर आणि " हे राजाधिराज, चवदा वर्षें रामाला दूर ( वनामध्यें ) हाकून देऊन भरताला पृथ्वीचा राजा करावा. " असा वर तूं त्याच्यापाशीं माग २९, ३० चवदा वर्षें राम वनामध्यें गेला असतां तितक्या कालामध्यें तुझा पुत्र भरत चांगला वाढेल आणि मुळें धरून राहील. ( सारांश, पुष्कळवर्षेंपर्यंत परिपालन केलेला वृक्ष ज्याप्रमाणें चांगला वाढीस लागतो आणि त्याचीं मुळें पक्कीं बसतात त्याचप्रमाणें चवदा वर्षेंपर्यंत राम वनवासांत गेला असतां तुझ्या पुत्राच्या राज्याला बळकटी येऊन राज्यसंरक्षणाचें एक मुख्य साधन जें सैन्य तेंही तितका काल लोटेपर्यंत त्याला वश होऊन राहील व असें झालें असतां राम जरी वनवासांतून परत आला तरी तुझा पुत्र राज्यापासून भ्रष्ट होणार नाहीं आणि

**स्तव कामिनि ३२ एवं प्रव्राजितश्चैव रामोरामो भविष्यति। भरतश्च गतामित्रस्तव राजा भविष्यति ३३ येन कालेन रामश्च वनात्प्रत्यागमिष्यति। अन्तर्बहिश्च पुत्रस्ते कृतमूलो भविष्यति ३४ संगृहीतमनुष्यश्च सुहृद्भिः साकमात्मवान्। प्राप्तकालं नु मन्येहं राजानं वीतसाध्वसा ३५ रामाभिषेकसंकल्पान्निगृह्य विनिवर्तय। अनर्थमर्थरूपेण ग्राहिता सा ततस्तया ३६ हृष्टा प्रतीता कैकेयी मन्थरामिदमब्रवीत्। सा हि वाक्येन कुब्जायाः किशोरीवोत्पथं गता ३७ कैकेयी विस्मयं प्राप्य परं परमदर्शना। प्रज्ञां ते नावजानामि श्रेष्ठे श्रेष्ठाभिधायिनि ३८ पृथिव्यामसि कुब्जानामुत्तमा बुद्धिनिश्चये। त्वमेव तु ममार्थेषु नित्ययुक्ता हितै-**

---

रामही राज्याची आशा धरणार नाहीं ) ३१. ह्यास्तव, हे राजपत्नि, रामाला हांकून देणें हाच वर तूं त्याच्यापाशीं माग. ह्मणजे, हे कामिनि, पुत्रासंबंधानें तुझे सर्व मनोरथ परिपूर्ण होतील ३२. ह्याप्रमाणें रामाला हांकून लाविलें असतां तो प्रजाजनानां अप्रिय होईल आणि शत्रु नाहींसा झालेला तुझा भरत राजा होईल ३३. इतका काल वनवासांत घालविल्यानंतर राम जर परत येईल तर तितका काल लोटेपर्यंत तुझ्या पुत्राविषयीं प्रजाजनांचे ठिकाणीं अंतर्बाह्य दृढ प्रेम उत्पन्न होऊन राहील ३४. इतकेंच नव्हे परंतु, विश्वासूक माणसांचा संग्रह त्याच्यापाशीं होऊन त्या जितेंद्रिय भरताच्या मित्राविषयींही प्रजाजनांचे ठिकाणीं अचल प्रेम उत्पन्न होईल. सारांश, रामाला अभिषेक करण्यापासून राजाला परावृत्त करण्याचा हाच समय आहे असें मला वाटतें. ह्यास्तव, तूं निर्भय हो आणि वरांच्या जोरावर त्याला कचाट्यांत धरिल्यावर रामाला अभिषेक करण्याच्या संकल्पापासून तूं त्याला निवृत्त कर ". ह्याप्रमाणें त्या मंथरेनें अनर्थावह गोष्टच हिताची आहे असें कैकेयीचे अंतःकरणांत ठसविलें असतां ३५,३६ कैकेयीला हर्ष झाला आणि तिनें तिचा उपदेश मान्य केला. कारण, लहान शिंगरू बरोबर असलेल्या घोडीप्रमाणें कुबडीच्या भाषणानें ती अत्यंत समंजस कैकेयीही अतिशय विस्मित होऊन गैर मार्गाला गेली ( तात्पर्य, अगदीं अल्पवयी शिंगरू बरोबर येत असलें ह्मणजे घोडी ज्याप्रमाणें चाबूकस्वार वर बसला असतांनाही त्याला न जुमानितां आपल्या शिंगराकरितां आडमार्गाला जाते त्याप्रमाणें कैकेयी राजाचे अधीन असतांनाही मंथरेच्या उपदेशामुळें भरताकरितां कुमार्गाकडे वळली ) आणि ह्मणूनच मंथरेला ह्मणाली " हितोपदेशाविषयीं कुशल व श्रेष्ठ मंथरे, मी तुझ्या बुद्धीची अवज्ञा करीत नाहीं ३७,३८. कार्य कोणतें आणि अकार्य कोणतें ह्याचा बुद्धिपूर्वक निश्चय करण्याविषयीं तूं पृथ्वींतील सर्व कुबड्या दासींमध्यें श्रेष्ठ आहेस आणि तूंच

पिणी ३९ नाहं समवबुध्येयं कुब्जे राज्ञश्चिकीर्षितम्। सन्ति दुःसंस्थिताः कुब्जे वक्राः परमपापिकाः ४० त्वं पद्मामेव वातेन संनता प्रियदर्शना। उरस्तेऽभिनिविष्टं वै यावत्स्कन्धात्समुन्नतम् ४१ अधस्ताच्चोदरं शान्तं सुनाभमिव लज्जितम्। प्रतिपूर्णं च जघनं सुपीनौ च पयोधरौ ४२ विमलेन्दुसमं वक्त्रमहो राजसि मन्थरे। जघनं तव निर्मृष्टं रशनादामभूषितम् ४३ जङ्घे भृशमुपन्यस्ते पादौ च व्यायतावुभौ। त्वमायताभ्यां सक्थिभ्यां मन्थरं क्षौमवासिनि ४४ अग्रतो मम गच्छन्ती राजसेतीवशोभने। आसन्याः शम्बरे मायाः सहस्रमसुराधिपे ४५ हृदये ते निविष्टास्ता भूयश्चान्याः सहस्रशः। तदेव स्थगु यद्दीर्घं रथघोणामिवायतम् ४६ मतयः क्षत्रविद्याश्च मायाश्चात्र वसन्ति ते। अत्र तेहं प्रमोक्ष्यामि मालां कुब्जे हिरण्मयीम् ४७ अभिषिक्ते च भरते राघवे च वनं गते। जात्येन च सुवर्णेन सुनिष्टप्तेन सुन्दरि ४८ लब्धार्था च प्रतीता च लेपयिष्यामि

---

माझ्या कार्याविषयीं नेहमीं तत्पर असून माझें हित इच्छिणारी आहेस ३९. हे कुबडचे, राजाचा अभिप्राय काय आहे हें मला समजत नाहीं. हे कुबडचे, आकारानें विद्रूप आणि आचरणानेंही अत्यंत पापी अशाच दासी पुष्कळ असतात ४०; परंतु, तूं मात्र वायूनें नम्र झालेल्या कमलाप्रमाणें वाकलेली असून तुझी मुद्रा दुसऱ्याला आनंद देणारी आहे. तुझें वक्षस्थल कुबडानें व्याप्त झाल्यामुळें स्कंधापर्यंत उन्नत आहे ४१ आणि वक्षःस्थलाच्या अधोभागीं उत्कृष्ट नाभीनें युक्त असलेलें तुझें उदर (कृश असल्यामुळें वक्षःस्थलाची उन्नति पाहून लज्जित झाल्यासारिखें दिसत आहे. तुझा कटिप्रदेश विस्तीर्ण असून स्तन चांगले पुष्ट आहेत ४२ आणि तुझें मुख निर्मल चंद्राप्रमाणें दिसत आहे व ह्यामुळें खरोखर, हे मंथरे, तूं (किती तरी) झळकत आहेस. तुझा कटिप्रदेश स्वच्छ असून कमरपट्ट्यानें भूषित झालेला आहे ४३ आणि तुझ्या पोटऱ्या तर लोकांच्या उपमेस पात्र झाल्या असून तुझे दोन्ही पाय विस्तीर्ण आहेत. हे सुंदरि मंथरे, तूं पैठणी नेसून माझ्यापुढें चालूं लागलीस ह्मणजे लांब लांब मांड्यांच्या योगानें तूं अतिशयच मनोहर दिसत असतेस. असुराधिपति शंबरापाशीं ज्या हजारों माया होत्या त्या व इतरही आणखी हजारों माया तुझ्या हृदयामध्यें राहिलेल्या आहेत आणि रथचक्राच्या तुंब्याप्रमाणें विस्तीर्ण असलेलें जें दीर्घकुबड तें तेंच आहे ४४,४५,४६. ह्या तुझ्या कुबडामध्यें मति, राजनीति आणि माया ह्यांचें वास्तव्य आहे. ह्यास्तव, भरताला राज्याभिषेक होऊन राम वनामध्यें गेला ह्मणजे उत्कृष्ट व कसालाही उत्तम उतरलेल्या सुवर्णाची आणि सोन्यांतच मढविलेली माळा, हे मनोहर कुबडचे, मी

ते स्थगु । मुखे च तिलकं चित्रं जातरूपमयं शुभम् ४९ कारयिष्यामि ते कुब्जे शुभान्याभरणानि च । परिधाय शुभे वस्त्रे देवतेव चरिष्यसि ५० चन्द्रमाह्वयमानेन मुखेनाप्रतिमानना । गमिष्यसि गतिं मुख्यां गर्वयन्ती द्विषज्जने ५१ तवापि कुब्जाः कुब्जायाः सर्वाभरणभूषिताः । पादौ परिचरिष्यन्ति यथैव त्वं सदा मम ५२ इति प्रशस्यमाना सा कैकेयीमिदमब्रवीत् । शयानां शयने शुभ्रे वेद्यामग्निशिखामिव ५३ गतोदके सेतुबन्धो न कल्याणि विधीयते । उत्तिष्ठ कुरु कल्याणं राजानमनुदर्शय ५४ तथा प्रोत्साहिता देवी गत्वा मन्थरया सह । क्रोधागारं विशालाक्षी सौभाग्यमदगर्विता ५५ अनेकशतसाहस्रं मुक्ताहारं वराङ्गना । अवमुच्य वरार्हाणि शुभान्याभरणानि च ५६ तदा हेमोपमा तत्र कुब्जा वाक्यवशं गता । संविश्य भूमौ कैकेयी मन्थरामिदमब्रवीत् ५७ इह वा मां मृतां कुब्जे नृपायावेदयिष्यसि । वनं तु राघवे प्राप्ते भरतः प्राप्स्यते

---

तुझ्या ह्या कुबडाला घालीन ४७,४८. माझा मनोरथ परिपूर्ण होऊन मी संतुष्ट झालें ह्मणजे तुझ्या कुबडाला ओटी लावीन. त्याच्या मुखावर एक आश्चर्यकारक टिळा लावीन आणि जातीच्या सोन्यानें तें शुभ कुबड मढवून काढीन ४९. हे कुबडे, चांगलीं चागलीं भूषणें मी तुझ्याकरितां करवीन आणि उत्कृष्ट वस्त्रें परिधान करून तूं देवतेप्रमाणें संचार करिशील ५०. तुझा चेहेरा अप्रतिम असल्यामुळें चंद्राशीं स्पर्धा करणाऱ्या आपल्या मुखामुळें शत्रुजनांमध्यें तूं गर्व करूं लागशील आणि श्रेष्ठता पावशील ५१. तूं जरी कुबडी आहेस तरी ज्याप्रमाणें तूं सर्वदां माझ्या पायांची सेवा करीत असतेस त्याचप्रमाणें सर्व प्रकारचे अलंकार धारण केलेल्या कुबड्या तुझ्या पायांची सेवा करूं लागतील " ५२. ह्याप्रमाणें कैकेयी मंथरेची प्रशंसा करीत असतांना वेदींतील अग्नीच्या ज्वालेप्रमाणें शुभ्र शय्येवर शयन करणाऱ्या कैकेयीला ती मंथरा ह्मणाली ५३ " हे कल्याणि, पाणी निघून गेल्यावर कोणी बांध घालीत नसतात. ह्यास्तव, ऊठ; आपलें कल्याण करून घे आणि क्रुद्ध झाली आहेस असें राजाला दाखीव " ५४. ह्याप्रमाणें मंथरेनें प्रोत्साहन दिल्यावर पतिप्रेमाच्या मदानें चढून गेलेली ती विशालनयना राजपत्नी कैकेयी मंथरेसहवर्तमान क्रोधगृहामध्यें गेली ५५. अनेक लक्षांचा मोत्याचा हार व बहुमोल अशीं इतर उत्कृष्ट भूषणें तिनें काढून ठेविलीं ५६; सुवर्णासारिख्या कांतीनें युक्त असलेली व कुबडीच्या बोलण्याला वश झालेली ती कैकेयी भूमीवर पडली आणि मंथरेला ह्मणाली ५७ " हे कुबडे, ( माझ्या मनाप्रमाणें गोष्ट घडून न आल्यामुळें ) मी येथें मेल्याचें वर्तमान तूं राजाला

क्षितिम् ५८ सुवर्णेन न मे ह्यर्थो न रत्नैर्न च भोजनैः । एष मे जीवितस्यान्तो रामो यद्यभिषिच्यते ५९ अथो पुनस्तां महिषीं महीक्षितो वचोभिरत्यर्थमहापराक्रमैः । उवाच कुब्जा भरतस्य मातरं हितं वचो राममुपेत्य चाहितम् ६० प्रपत्स्यते राज्यमिदं हि राघवो यदि ध्रुवं त्वं ससुता च तप्स्यसे । ततो हि कल्याणि यतस्व तत्तथा यथा सुतस्ते भरतोभिषेक्ष्यते ६१ तथातिविद्धा महिषीति कुब्जया समाहता वागिषुभिर्मुहुर्मुहुः । विधाय हस्तौ हृदयेतिविस्मिता शशंस कुब्जां कुपिता पुनः पुनः ६२ यमस्य वा मां विषयं गतामितो निशम्य कुब्जे प्रतिवेदयिष्यसि । वनं गते वा सुचिराय राघवे समृद्धकामो भरतो भविष्यति ६३ अहं हि नैवास्तरणानि न स्रजो न चन्दनं नाञ्जनपानभोजनम् । न किंचिदिच्छामि न चेह जीवनं न चेदितो गच्छति राघवो वनम् ६४ अथैवमुक्त्वा वचनं सुदारुणं निधाय सर्वाभरणानि भामिनी । असंस्कृतामास्तरणेन मेदिनीं तदाधिशिश्ये पतितेव किंनरी ६५ उदीर्णसंरम्भतमोवृता-

---

सांगशील किंवा राम वनांत जाऊन भरताला पृथ्वी प्राप्त होईल ? ( ह्या शिवाय तिसरी गोष्ट कांहीं संभवनीय नाहीं ) ५८. सुवर्ण, रत्नें व भोजनें ह्यांच्याशीं मला कांहीं एक कर्तव्य नाहीं. रामाला जर अभिषेक होईल तर हाच माझ्या जीविताचा अंत होय ५९. ह्यानंतर भरतमाता जी राजभार्या कैकेयी तिच्या हिताचें आणि रामाच्या अहिताचें भाषण अत्यंत क्रूर शब्दांनीं त्या कुबडीनें तिच्याशीं केलें कीं ६०, " हे कल्याणि, रामाला जर हें राज्य प्राप्त झालें तर पुत्रासहवर्तमान तुला ताप होईल. ह्यास्तव, तुझ्या भरतनामक पुत्राला राज्याभिषेक होईल अशा रीतीनें जो यत्न करणें असेल तो कर " ६१. ह्याप्रमाणें वाग्बाणांचे वारंवार तडाके देऊन कुबडीनें अतिशय वेधून टाकिलेली ती राजभार्या कैकेयी हृदयावर हात ठेवून ( राजानें माझ्याशीं अशाप्रकारें प्रतारणा केली आहे काय ! ह्मणून ) अत्यंत विस्मित झाली. आणि पुन्हां:पुन्हां क्रुद्ध होऊन ती त्या कुबडीला ह्मणाली ६२ " हे कुबडये, रामाला जर राज्याभिषेक झाला तर ) यमाच्या प्रदेशामध्यें मी येथून गेल्याचें पाहून तूं राजाला तसें सांगशील किंवा पुष्कळ कालपर्यंत राम वनामध्यें चालता झाला तर भरताचें मनोरथ परिपूर्ण होतील? ६३ राम जर येथून वनामध्यें गेला नाहीं तर प्रावरणें, माळा, चंदन, अंजन, अन्न, उदक वगैरेपैकीं मी कशाचीही इच्छा धरणार नाहीं; इतकेंच नव्हे परंतु, मी जीविताचीही आशा धरणार नाहीं" ६४. ह्याप्रमाणें मंथरेशीं अति क्रूर भाषण करून त्या स्त्रीनें आपलीं सर्व भूषणें काढून ठेविलीं आणि आस्तरणरहित अशा

नना तदावमुक्तोत्तममाल्यभूषणा । नरेन्द्रपत्नी विमना बभूव सा तमोवृता द्यौरिव मग्नतारका ६६ [३९५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

विदर्शिता यदा देवी कुब्जया पापया भृशम् । तदा शेते स्म सा भूमौ दिग्धविद्धेव किंनरी १ निश्चित्य मनसा कृत्यं सा सम्यगिति भामिनी । मन्थरायै शनैः सर्वमाचचक्षे विचक्षणा २ सा दीना निश्चयं कृत्वा मन्थरा वाक्यमोहिता । नागकन्येव निःश्वस्य दीर्घमुष्णं च भामिनी ३ मुहूर्तं चिन्तयामास मार्गमात्मसुखावहम् । सा सुहृच्चार्थकामा च तं निशम्य विनिश्चयम् ४ बभूव परमप्रीता सिद्धिं प्राप्येव मन्थरा । अथ सा रुषिता देवी सम्यक्कृत्वा विनिश्चयम् ५ संविवेशाबला भूमौ निवेश्य भ्रुकुटिं मुखे। ततश्चित्राणि माल्यानि दिव्यान्याभरणानि च ६ अपविद्धानि कैकेय्या तानि भूमिं प्रपेदिरे । तया तान्यपविद्धानि माल्यान्याभरणानि च ७

---

भूमीवर, पुण्यक्षयामुळें स्वर्गांतून खालीं पडलेल्या किन्नरीप्रमाणें, ती पडली ६५. सारांश, अत्यंत कोपरूप तमानें जिचें मुख व्याप्त झालेलें आहे आणि उत्तमोत्तमही पुष्पांचा व भूषणांचा जिनें त्याग केलेला आहे अशी ती खिन्न झालेली राजपत्नी कैकेयी, तमानें व्याप्त आणि ह्मणूनच नक्षत्ररहित अशा आकाशाप्रमाणें, दिसूं लागली ६६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं नववा सर्ग समाप्त झाला ॥ ९ ॥

दुष्ट कुबडीनें राजपत्नी कैकेयीचें मनांत भलतेंच भरवून दिल्यामुळें ती विषलिप्त बाणानें विद्ध झालेल्या किन्नरीप्रमाणें भूमीवर पडली १ आणि मंथरेनें उपदेशिलेलें कृत्य योग्य आहे असा मनानें निश्चय करून ती बुद्धिमती स्त्री हें सर्व चांगलें आहे ह्मणून मंथरेला ह्मणाली २. तात्पर्य, मंथरेच्या भाषणानें मोहित झालेली ती विचारी स्त्री कैकेयी नागकन्येप्रमाणें दीर्घ व उष्ण सुस्कारा टाकूं लागली ३ आणि क्षणभर विचार करून मंथरेनें सांगितलेला मार्ग आपल्या सुखाचा आहे असें तिनें मनामध्यें आणिलें. तेव्हां, कैकेयीची मैत्रीण आणि तिच्याच वैभवाची इच्छा धरणारी मंथरा कैकेयीचा तो निश्चय पाहून ४ मनोरथ सिद्धीस गेल्याप्रमाणें पराकाष्ठेची आनंदित झाली. तदनंतर क्रुद्ध झालेली ती राजपत्नी अबला कैकेयी मंथरेनें सांगितल्याप्रमाणें करण्याचा पक्का निश्चय करून आणि ( अति क्रोधामुळें ) भिंवया मुखाकडे करून भूमीवर निजली. तेव्हां तिनें काढून टाकिलेलीं चित्रविचित्र पुष्पं व दिव्य भूषणें हीं भूमीवरच पडलीं व नक्षत्रें ज्याप्रमाणें आकाशाला शोभा आणितात त्याप्रमाणें तिनें

अशोभयन्त वसुधां नक्षत्राणि यथा नभः । क्रोधागारे च पतिता सा बभौ मलिनाम्बरा ८ एकवेणीं दृढां बद्ध्वा गतसत्त्वेव किंनरी । आज्ञाप्य तु महाराजो राघवस्याभिषेचनम् ९ उपस्थानमनुज्ञाप्य प्रविवेश निवेशनम् । अद्य रामाभिषेको वै प्रसिद्ध इति जज्ञिवान् १० प्रियार्हां प्रियमाख्यातुं विवेशान्तःपुरं वशी । स कैकेय्या गृहं श्रेष्ठं प्रविवेश महायशाः ११ पाण्डुराभ्रमिवाकाशं राहुयुक्तं निशाकरः । शुकबर्हिसमायुक्तं क्रौञ्चहंसरुतायुतम् १२ वादित्ररवसंघुष्टं कुब्जावामनिकायुतम् । लतागृहैश्चित्रगृहैश्चम्पकाशोकशोभितैः १३ दान्तराजतसौवर्णवेदिकाभिः समायुतम् । नित्यपुष्पफलैर्वृक्षैर्वापीभिरुपशोभितम् १४ दान्तराजतसौवर्णैः संवृतं परमासनैः । विविधैरन्नपानैश्च भक्ष्यैश्च विविधैरपि १५ उपपन्नं महार्हैश्च भूषणैस्त्रिदिवोपमम् । संप्रविश्य महाराजः स्वमन्तःपुरमृद्धिमत् १६ न ददर्श स्त्रियं राजा कैकेयीं शयनोत्तमे । स कामबलसंयुक्तो रत्यर्थी मनु-

---

टाकून दिलेल्या पुष्पांनीं व भूषणांनीं पृथ्वीला शोभा आणिली. क्रोधगृहामध्यें पडलेल्या त्या कैकेयीनें मलिन वस्त्र परिधान केलें होतें ५, ६, ७, ८ आणि केसांचा घट्ट अंबाडा बांधून पडलेली ती कैकेयी गतप्राण झालेल्या किन्नरस्त्रीप्रमाणें दिसत होती. इकडे रामाभिषेकाची आज्ञा केल्यावर महाराज दशरथानें ९ सभासदांना आपआपल्या घरीं जाण्याची अनुज्ञा दिली आणि नंतर तो स्वतः घरामध्यें गेला. तदनंतर आजच रामाभिषेक निश्चित झाला आहे; परंतु, कैकेयीला हें वर्तमान कळलेलें नाहीं असें समजून १० तो जितेंद्रिय दशरथराजा प्रिय वार्ता ऐकविण्यास योग्य अशा कैकेयीला तें प्रिय वर्तमान सांगण्याकरितां अंतःपुरामध्यें गेला व अंतःपुरांत गेल्यावर तो महाकीर्तिमान् दशरथराजा श्वेतवर्ण मेघ व राहु ह्यांनीं युक्त असलेल्या आकाशांत प्रविष्ट होणाऱ्या चंद्राप्रमाणें कैकयीच्या मुख्य गृहामध्यें प्रविष्ट झाला. शुक आणि मयूर ह्यांनीं युक्त असलेल्या त्या गृहामध्यें क्रौंच व हंस पक्षी शब्द करीत होते ११, १२; वाद्यांचा तेथें घोष चाललेला होता; कुबड्या आणि खुजे त्यामध्यें होते; चंपक व अशोक वृक्ष ह्यांनीं सुशोभित असलेलीं सचित्र लतागृहें तेथें असून १३ हस्तिदंत, रजत व सुवर्ण ह्यांचीं आसनें त्या ठिकाणीं केलेलीं होतीं; नेहमीं प्रफुल्लित व फलयुक्त असलेल्या वृक्षांनीं आणि वापींनीं त्याला शोभा आलेली असून १४ हस्तिदंत, रजत व सुवर्ण ह्यांच्या उत्कृष्ट आसनांनीं ते व्याप्त झालेलें होतें व नानाप्रकारचीं खाद्यपेयें अनेक प्रकारचे भक्ष्य पदार्थ १५ आणि मोठमोठीं मौल्यवान् भूषणें त्या स्वर्गतुल्य गृहामध्यें होतीं १६. असो. तो महाराज दशरथ समृद्ध अशा आपल्या

जाधिपः १७ अपश्यद्दयितां भार्यां पप्रच्छ विषसाद च। न हि तस्य पुरा देवी तां वेलामत्यवर्तत १८ न च राजा गृहं शून्यं प्रविवेश कदाचन। ततो गृहगतो राजा कैकेयीं पर्यपृच्छत १९ यथापुरमविज्ञाय स्वार्थलिप्सुमपण्डिताम्। प्रतीहारी त्वथोवाच संत्रस्ता तु कृताञ्जलिः २० देव देवी भृशं क्रुद्धा क्रोधागारमभिद्रुता। प्रतीहार्या वचः श्रुत्वा राजा परमदुर्मनाः २१ विषसाद पुनर्भूयो लुलितव्याकुलेन्द्रियः। तत्र तां पतितां भूमौ शयानामतथोचिताम् २२ प्रतप्त इव दुःखेन सोपश्यज्जगतीपतिः। स वृद्धस्तरुणीं भार्यां प्राणेभ्योपि गरीयसीम् २३ अपापः पापसंकल्पां ददर्श धरणीतले। लतामिव विनिष्कृत्तां पतितां देवतामिव २४ किंनरीमिव निर्धूतां च्युतामप्सरसं यथा। मायामिव परिभ्रष्टां हरिणीमिव संयताम् २५ करेणुमिव दिग्धेन विद्धां मृगयुना वने। महागज इवा-

---

अंतःपुरांत प्रविष्ट झाला असतां उत्कृष्ट शय्येवर स्त्री कैकेयी त्या राजाच्या दृष्टीस पडली नाहीं. तेव्हां, उत्कट कामवासना झाल्यामुळें रतिसुखाविषयीं उत्सुक झालेल्या त्या भूपतीनें १७ तिची चौकशी केली आणि तो खिन्न झाला. कारण, ह्यापूर्वीं राजपत्नीनें ती वेळ कधींही चुकविली नव्हती १८ आणि ह्मणूनच दशरथराजालाही कैकेयीरहित अशा त्या गृहामध्यें प्रवेश करण्याचा कधींही प्रसंग आलेला नव्हता. असो. त्या गृहांत गेल्यावर कैकेयी स्वार्थलोलुप व विवेकशून्य बनली आहे हें न जाणून त्या राजानें पूर्वीप्रमाणें द्वारावर असलेल्या दासीला ती कोठें आहे ह्मणून विचारिलें असतां ती दारावर असणारी दासी भयभीत होऊन व हात जोडून ह्मणाली १९,२० "हे भूपते, राणी अत्यंत क्रुद्ध झाली असून क्रोधगृहामध्यें झपाट्यानें निघून गेली आहे". हें त्या दारावरील दासीचें भाषण श्रवण केल्यावर दशरथराजाच्या मनाला फारच वाईट वाटलें २१ आणि इंद्रियें अति चंचल व क्षुब्ध होऊन त्याला पुनरपि अधिकच खेद झाला. तदनंतर तसा प्रकार कधींही न करणारी ती कैकेयी भूमीवर पडली आहे २२ असें पाहून तो भूपति दशरथराजा दुःखानें अगदीं संतप्त झाला. सारांश, त्या वृद्ध व निष्पाप दशरथराजानें प्राणांपेक्षांही प्रिय अशी आपली, दुष्ट हेतु मनांत धरून राहिलेली, तरुण भार्या भूतलावर पडलेली पाहिली. ती कैकेयी तोडून टाकिलेली लता, स्वर्गापासून च्युत झालेली देवता २३,२४ ( पुण्यक्षयामुळें ) स्वस्थानापासून पतित झालेली किन्नरस्त्री, स्वर्गापासून च्युत झालेली अप्सरा, दुसऱ्यांना मोह पाडण्याकरितां योजिल्यामुळें मध्येंच स्थित असलेली माया, जाळ्यामध्यें जखडून गेलेली हरिणी २५ अथवा व्याधांचा विषलिप्त बाण लागून पडलेली हत्तीणच आहे कीं

रण्ये स्नेहात्परमदुःखिताम् २६ परिमृज्य च पाणिभ्यामभिसंत्रस्तचेतनः। कामी कमलपत्राक्षीमुवाच वनितामिदम् २७ न तेहमभिजानामि क्रोधमात्मनि संश्रुतम् । देवि केनाभियुक्तासि केन वासि विमानिता २८ यदिदं मम दुःखाय शेषे कल्याणि पांसुषु । भूमौ शेषे किमर्थं त्वं मयि कल्याणचेतसि २९ भूतोपहतचित्तेव मम चित्तप्रमाथिनि । सन्ति मे कुशला वैद्यास्त्वभितुष्टाश्च सर्वशः ३० सुखितां त्वां करिष्यन्ति व्याधिमाचक्ष्व भामिनि । कस्य वापि प्रियं कार्यं केन वा विप्रियं कृतम् ३१ कः प्रियं लभतामद्य को वा सुमहदप्रियम् । मा रौत्सीर्मा च कार्षीस्त्वं देवि संपरिशोषणम् ३२ अवध्यो वध्यतां को वा वध्यः को वा विमुच्यताम् । दरिद्रः को भवेदाढ्यो द्रव्यवान्वाप्यकिंचनः ३३ अहं च हि मदीयाश्च सर्वे तव वशानुगाः । न ते कंचिदभिप्रायं व्याहन्तुमहमुत्सहे ३४

---

काय असें त्याला वाटलें. तेव्हां, अरण्यांत पडलेल्या हत्तिणीच्या अंगावर सोंड फिरविणाऱ्या महागजाप्रमाणें मनामध्यें अतिशय त्रस्त झालेला तो कामी दशरथराजा अत्यंत दुःखित अशा आपल्या स्त्रीच्या अंगावर प्रेमानें हात फिरवून त्या कमलनयना स्त्रीला ह्मणाला २६,२७ " माझ्या संबंधानें तुला क्रोध येण्याचें कारण काय झालें आहे हें मला विदित नाहीं. हे देवि, हे कल्याणि, ज्याअर्थीं धुराळ्यांत लोळत पडण्याचें हें मला दुःखदायक कृत्य तूं करीत आहेस त्याअर्थीं तुझी कोणी हेटाळणी केली आहे किंवा तुझा कोणीं अपमान केला आहे! तें कळूं दे. माझें मन तुझ्याविषयीं शुद्ध असून मी जिवंत असतांना तूं कशाकरितां भूमीवर पडली आहेस ? २८,२९. भुतांनीं झपाटल्याप्रमाणें तूं भूमीवर पडली असल्यामुळें माझें मन क्षुब्ध करीत आहेस. माझ्यापाशीं कुशल वैद्य आहेत, आणि सर्वप्रकारें ते माझ्यावर संतुष्ट आहेत ३०. तेव्हां, हे स्त्रिये, तुला काय व्याधि आहे तें सांग ह्मणजे ते तुला सुखी करितील. कोणाचें प्रिय करण्याचें तुझ्या मनामध्यें आहे किंवा तुला अप्रिय असलेली गोष्ट कोणीं केली आहे ( हें कळूं दे ) ३१. तुला प्रिय अशा कोणाचा मनोरथ आज सिद्धीस गेला पाहिजे किंवा तुला अप्रिय अशा कोणाला अत्यंत दुःख प्राप्त झालें पाहिजे ( तें तरी समजूं दे ) हे देवि, तूं रडूं नकोस आणि विनाकारण आपलीं हाडें वाळवून घेऊं नकोस ३२. अवध्य असूनही कोणाचा तुझ्या मनामध्यें वध कर्तव्य आहे? वध्य असूनही कोण मुक्त व्हावा असें तुला वाटत आहे? कोण दरिद्री पुरुष संपन्न व्हावा असा तुझा उद्देश आहे ? अथवा कोण श्रीमान् पुरुष दरिद्री व्हावा अशी तुझी मनीषा आहे ? ( तें तरी एकदां कळूं दे ) ३३. मी आणि

आत्मनो जीवितेनापि ब्रूहि यन्मनसि स्थितम् । बलमात्मनि जानन्ती न मां शङ्कितुमर्हसि ३५ करिष्यामि तव प्रीतिं सुकृतेनापि ते शपे । यावदावर्तते चक्रं तावती मे वसुन्धरा ३६ द्राविडाः सिन्धुसौवीराः सौराष्ट्रा दक्षिणापथाः। वङ्गाङ्गमगधा मत्स्याः समृद्धाः काशिकोसलाः ३७ तत्र जातं बहु द्रव्यं धनधान्यमजाविकम् । ततो वृणीष्व कैकेयि यद्यत्त्वं मनसेच्छसि ३८ किमायासेन ते भीरु उत्तिष्ठोत्तिष्ठ शोभने । तत्त्वं मे ब्रूहि कैकेयि यतस्ते भयमागतम् ३९ तत्ते व्यपनयिष्यामि नीहारमिव रश्मिवान् ४० तथोक्ता सा समाश्वस्ता वक्तुकामा तदप्रियम् । परिपीडयितुं भूयो भर्तारमुपचक्रमे ४१ [४३६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥

तं मन्मथशरैर्विद्धं कामवेगवशानुगम् । उवाच पृथिवीपालं कैकेयी दारुणं वचः १ नास्मि विप्रकृता देव केनचिन्नावमानिता । अभिप्रायस्तु

---

माझे लोक हे सर्व तुझे दास आहेत व आपल्या जिवावर जरी प्रसंग आला तरी तुझा कोणताही मनोरथ ह्मणून पाडण्याची माझी छाति नाहीं. ह्यास्तव, जें तुझ्या मनांत असेल तें सांग. माझें प्रेम तुझ्यावर फार आहे हें आपलें बल तूं जाणीत असूनही माझ्याविषयीं शंका घेणें तुला योग्य नाहीं ३५. मी तुझें प्रिय करीन हें मी तुला आपल्या पुण्याची शपथ घेऊन सांगत आहें. जेथपर्यंत सूर्यमंडल प्रकाशित होत आहे तेथपर्यंत ही पृथ्वी माझी आहे. ( ह्यास्तव, तुझा कोणताही मनोरथ सिद्धीस नेणें मला कठीण नाहीं ) ३६. द्राविड, सिंधु, सौवीर, सौराष्ट्र, दक्षिणापथ वंग, अंग, मगध, मत्स्य व संपन्न काशिकोसल हे देश माझ्या स्वाधीन आहेत ३७. त्या ठिकाणीं धन, धान्य, लोंकरीचीं वस्त्रें वगैरे विपुल द्रव्य उत्पन्न झालेलें आहे. तस्मात्, हे कैकयि, जें तुझ्या मनास येईल तें तूं माग ३८. हे भीरु, या आयासानें काय होणार आहे ? हे कल्याणि, ऊठ ऊठ आणि तुला कोठून भीति प्राप्त झाली आहे तें, हे कैकेयि, तूं मला सांग ३९. ह्मणजे सूर्य ज्याप्रमाणें धुकें नाहींसें करितो त्याप्रमाणें मी तुझें भय नाहींसें करीन " ४०. ह्याप्रमाणें भर्त्याशीं अप्रिय भाषण करण्यास उद्युक्त झालेल्या त्या कैकेयीचें राजानें सांत्वन केलें असतां ती भर्त्याला पुनरपि पीडा देण्यास उद्युक्त झाली ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं दहावा सर्ग समाप्त झाला ॥ १० ॥

कामबाणांनीं विद्ध आणि ह्मणूनच विषयवासनेच्या तावडींत सांपडलेल्या त्या भूपतीला कैकेयी कठोर शब्दांनीं ह्मणाली १ " हे राजा, माझी कोणीं हेटाळणी केली

मे कश्चित्तमिच्छामि त्वया कृतम् २ प्रतिज्ञां प्रतिजानीष्व यदि त्वं कर्तुमिच्छसि । अथ ते व्याहरिष्यामि यथाभिप्रार्थितं मया ३ तामुवाच महाराजः कैकेयीमीषदुत्स्मयः । कामी हस्तेन संगृह्य मूर्धजेषु भुवि स्थिताम् ४ अवलिप्ते न जानासि त्वत्तः प्रियतरो मम । मनुजो मनुजव्याघ्राद्रामादन्यो न विद्यते ५ तेनाजय्येन मुख्येन राघवेण महात्मना । शपे ते जीवनार्हेण ब्रूहि यन्मनसेप्सितम् ६ यं मुहूर्तमपश्यंस्तु न जीवेयमहं ध्रुवम् । तेन रामेण कैकेयि शपे ते वचनक्रियाम् ७ आत्मना चात्मजैश्चान्यैर्वृणे यं मनुजर्षभम् । तेन रामेण कैकेयि शपे ते वचनक्रियाम् ८ भद्रे हृदयमप्येतदनुमृश्योद्धरस्व मे । एतत्समीक्ष्य कैकेयि ब्रूहि यत्साधु मन्यसे ९ बलमात्मनि पश्यन्ती न विशङ्कितुमर्हसि । करिष्यामि तव प्रीतिं सुकृतेनापि ते शपे १० सा तदर्थमना देवी तमभिप्रायमागतम् ।

---

नाहीं व माझा कोणीं अवमानही केला नाहीं. माझा एक उद्देश आहे आणि तो तुझ्याकडून सिद्धीस जावा अशी माझी इच्छा आहे २. तूं जर तो माझा उद्देश सिद्धीस नेण्याचें इच्छित असशील तर तशी प्रतिज्ञा कर, ह्मणजे माझा काय उद्देश आहे तो मी तुला सांगेन " ३. ह्याप्रमाणें कैकेयीनें दशरथाला सांगितलें असतां तो विषयलंपट महाराज ( मी हिचा आज्ञाधारक असतांना भलतीच शंका घेऊन ही मला प्रतिज्ञा करण्यास लावीत आहे ह्मणून किंचित् हास्य करूं लागला आणि भूमीवर पडलेल्या त्या कैकेयीचे केंस धरून ( ह्मणजे तिचें मस्तक आपल्या मांडीवर ठेवून ) तिला ह्मणाला ४ " हे गर्विष्ठ कैकेयि, पुरुषश्रेष्ठ रामाशिवाय तुझ्यापेक्षां मला कोणीही अधिक प्रिय नाहीं हें तूं जाणीत नाहींस काय ? ५. रघुवंशजांतील मुख्य, शत्रूंनीं जिंकण्यास अशक्य आणि माझ्या जीवनाचें साधन अशा महात्म्या रामाशपथ मी तझा उद्देश सिद्धीस नेईन. करितां, जें तुझ्या मनांत असेल तें सांग ६. जो एक क्षणभरही दृष्टीआड झाला असतां मी निःसंशय जगणार नाहीं त्या रामाशपथ, हे कैकेयि, मी तुझें सांगणें शेवटास नेईन ७. स्वतःपेक्षां आणि आपल्या इतर पुत्रांपेक्षां मी ज्या पुरुषश्रेष्ठ रामाला प्रिय समजत आहें त्या रामाशपथ मी तुझें सांगणें शेवटास नेईन ८. हे कल्याणि, माझें हें अंतःकरण तुझ्याविषयीं कसें आहे ह्याचा विचार करून तूं ह्या दुःखापासून मला सोडीव आणि राम सर्वांपेक्षां मला प्रिय आहे हें लक्ष्यांत घेऊन, हे कैकेयि, जें तुला बरें वाटत असेल तें तूं सांग ९. पतिप्रेमरूप बल स्वतःचे ठिकाणीं असल्याचें तुला माहीत असतांना माझ्याविषयीं शंका घेणें योग्य नाहीं. मी तुला प्रिय असलेली गोष्ट सिद्धीस नेईन; जर न नेईन तर माझें सर्व पुण्य निष्फल होईल " १०. ह्याप्रमाणें

निर्माध्यस्थ्याच्च हर्षाच्च बभाषे दुर्वचं वचः ११ तेन वाक्येन संहृष्टा तमभिप्रायमात्मनः । व्याजहार महाघोरमभ्यागतमिवान्तकम् १२ यथाक्रमेण शपसे वरं मम ददासि च । तच्छृण्वन्तु त्रयस्त्रिंशद्देवाः सेन्द्रपुरोगमाः १३ चन्द्रादित्यौ नभश्चैव ग्रहा राज्यहनी दिशः । जगच्च पृथिवी चेयं सगन्धर्वाः सराक्षसाः १४ निशाचराणि भूतानि गृहेषु गृहदेवताः । यानि चान्यानि भूतानि जानीयुर्भाषितं तव १५ सत्यसन्धो महातेजा धर्मज्ञः सत्यवाक्शुचिः । वरं मम ददात्येष सर्वे शृण्वन्तु दैवताः १६ इति देवी महेष्वासं परिगृह्याभिशस्य च । ततः परमुवाचेदं वरदं काममोहितम् १७ स्मर राजन्पुरावृत्तं तस्मिन्देवासुरे रणे । तत्र त्वां च्यावयच्छत्रुस्तव जीवितमन्तरा १८ तत्र चापि मया देव यत्त्वं समभिरक्षितः । जाग्रत्या यतमानायास्ततो मे प्रददौ वरौ १९ तौ दत्तौ च वरौ देव

---

दशरथानें सांगितलें असतां मंथरेनें सांगितलेलीच गोष्ट मनांत धरून बसलेली ती राजपत्नी कैकेयी तो आपला उद्देश शेवटास जाण्याचा समय आला आहे असें जाणून कोणाच्याही मध्यस्थीची अपेक्षा न करितां हर्षानें कठोर शब्दांनीं राजाशीं बोलूं लागली ११. सारांश, राजाच्या त्या प्रतिज्ञेनें अतिशय आनंदित झालेली ती कैकेयी प्राप्त झालेल्या मृत्यूप्रमाणें असलेला तो आपला महाभयंकर अभिप्राय राजाला विदित करण्याचा निश्चय करून त्याला ह्मणाली १२ " ( प्रथम प्रिय पुत्राची आणि नंतर पुण्याची ) क्रमानें शपथ घेऊन तूं मला वर देत आहेस हें इंद्रप्रभृति तेहेतीस कोटी देव ऐकून ठेवोत १३ ; आणि त्याचप्रमाणें चंद्र, सूर्य, आकाश, ग्रह, रात्री, दिवस, दिशा, जगत्, ही पृथ्वी, गंधर्व आणि राक्षस ह्यांसहवर्तमान स्वर्गांतील देवता १४, निशाचर प्राणि, घरांतील गृहदेवता व इतरही प्राणी हें तुझें प्रतिज्ञेचें भाषण ऐकून ठेवोत १५. हा सत्यप्रतिज्ञ, महातेजस्वी, धर्मज्ञ, सत्यवक्ता आणि आचरणानें शुद्ध असा भूपति मला वर देत आहे हें सर्व देवांनीं ऐकून ठेवावें " १६. ह्याप्रमाणें राजपत्नी कैकयीनें सत्यप्रतिज्ञत्वादिगुणांविषयीं राजाची प्रशंसा करून त्याला पक्कें करून घेतलें आणि नंतर काममोहित होऊन वर देण्यास उद्युक्त झालेल्या त्या राजाला ती ह्मणाली १७ " हे राजा, पूर्वीच्या वृत्तांताचें स्मरण कर. त्या देवदैत्यांच्या संग्रामामध्यें रात्रीं युद्धाचे प्रसंगीं शंबरनामक शत्रूनें तुला अगदीं जर्जर करून टाकिलें होतें; फक्त जीव मात्र तुझा घेतला नव्हता १८. हे देवा, त्या वेळीं मीं जागीं राहून तुझें संरक्षण केलें आणि तुझ्या जीवाकरितां मीं तडफड केली ह्मणून तूं मला दोन वर दिलेस १९. ते दिलेले वर, हे राजा, मी तुझ्याचपाशीं आजपर्यंत ठेव ह्मणून ठेविले होते आणि, हे

निक्षेपं मृगयाम्यहम् । तवैव पृथिवीपाल सकाशे रघुनन्दन २० तत्प्रतिश्रुत्य धर्मेण न चेद्दास्यसि मे वरम् । अद्यैव हि प्रहास्यामि जीवितं त्वद्विमानिता २१ वाड्मात्रेण तदा राजा कैकेय्या स्ववशं कृतः । प्रचस्कन्द विनाशाय पाशं मृग इवात्मनः २२ ततः परमुवाचेदं वरदं काममोहितम् । वरौ देयौ त्वया देव तदा दत्तौ महीपते २३ तौ तावदहमद्यैव वक्ष्यामि शृणु मे वचः । अभिषेकसमारम्भो राघवस्योपकल्पितः २४ अनेन वाभिषेकेण भरतो मेऽभिषिच्यताम् । यो द्वितीयो वरो देव दत्तः प्रीतेन मे त्वया २५ तदा देवासुरे युद्धे तस्य कालोऽयमागतः । नव पञ्च च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः २६ चीराजिनधरो धीरो रामो भवतु तापसः । भरतो भजतामद्य यौवराज्यमकण्टकम् २७ एष मे परमः कामो दत्तमेव वरं वृणे । अद्य चैव हि पश्येयं प्रयान्तं राघवं वने २८ स राजराजो भव सत्यसंगरः कुलं च शीलं च हि जन्म रक्ष च । परत्रवासे हि वदन्त्यनुत्तमं तपोधनाः सत्यवचो हितं नृणाम् २९ [४६५] इत्यार्षे

---

भूपते रघुनंदना, आज मी ते मागत आहें २०. तस्मात्, धर्माची शपथ घेऊन तूं वचन दिलें असूनही जर मला वर देणार नाहींस तर आपणांकडून माझा अपमान झाला ह्मणून मी आजच्या आजच प्राणत्याग करीन " २१. ह्याप्रमाणें कैकेयीनें केवल आपल्या भाषणानेंच राजाला वश करून टाकिलें असतां आपल्या घाताकरितां पाशांत सांपडणाऱ्या मृगाप्रमाणें तो दशरथराजा आपल्या घाताकरितां प्रतिज्ञारूप पाशामध्यें सांपडला २२. तदनंतर काममोहित होऊन वर देण्यास उद्युक्त झालेल्या दशरथाला कैकेयी ह्मणाली " हे भूपते राजा, त्यावेळीं देऊं केलेले वर आपण मला आतां द्या २३. ते मी आजच मागून घेत आहें. ह्यास्तव, माझें भाषण श्रवण करा. रामाच्या अभिषेकाचा जो हा समारंभ केलेला आहे २४ त्याच समारंभानें माझ्या भरताला अभिषेक व्हावा. हे राजा, त्या देवदैत्यांच्या युद्धामध्यें आपण प्रसन्न होऊन जो वर मला देऊं केला होता तो मागून घेण्याचा हा समय प्राप्त झाला आहे. ह्यास्तव, वल्कलें आणि अजिनें परिधान करून ज्ञानवान् रामानें तापस बनून चवदा वर्षेंपर्यंत दंडकारण्यामध्यें वास्तव्य करावें आणि भरतानें आज निष्कंटक यौवराज्याचा स्वीकार करावा २५,२६,२७. हीच माझी मुख्य इच्छा आहे व आपण दिलेलाच वर मी मागून घेत आहें. ह्याकरितां, राम वनामध्यें जात असलेला मी आजच पहाणार २८. तूं राजाधिराज आहेस. करितां आपली प्रतिज्ञा खरी करून कुलाची, शीलाची आणि जन्माची चाड बाळग. कारण, परलोकीं वास्तव्य करण्यामध्यें पुरुषांना सत्यवचन अत्यंत हितकारक होतें असें तपोधन

श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकादशः सर्गः॥११॥

ततः श्रुत्वा महाराजः कैकेय्या दारुणं वचः । चिन्तामभिसमापेदे मुहूर्तं प्रतताप च १ किं नु मेयं दिवास्वप्नश्चित्तमोहोपि वा मम । अनुभूतोपसर्गो वा मनसो वाप्युपद्रवः २ इति संचिन्त्य तद्राजा नाध्यगच्छत्तदा सुखम् । प्रतिलभ्य ततः संज्ञां कैकेयीवाक्यतापितः ३ व्यथितो विक्लवश्चैव व्याघ्रीं दृष्ट्वा यथा मृगः । असंवृतायामासीनो जगत्यां दीर्घमुच्छ्वसन् ४ मण्डले पन्नगो रुद्धो मन्त्रैरिव महाविषः । अहोधिगिति सामर्षो वाचमुक्त्वा नराधिपः ५ मोहमापेदिवान्भूयः शोकोपहतचेतनः । चिरेण तु नृपः संज्ञां प्रतिलभ्य सुदुःखितः ६ कैकेयीमब्रवीत्क्रुद्धो निर्दहन्निव तेजसा । नृशंसे दुष्टचारित्रे कुलस्यास्य विनाशिनि ७ किं कृतं तव रामेण पापे पापं मयापि वा । सदा ते जननीतुल्यां वृत्तिं वहति राघवः ८ तस्यैवं त्वमनर्थाय किंनिमित्तमिहोद्यता । त्वं मयात्मविनाशाय भवनं स्वं निवे-

---

ह्मणत असतात २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११ ॥

तदनंतर कैकेयीचें भयंकर भाषण श्रवण केल्यावर महाराज दशरथ चिंताक्रांत होऊन क्षणभर संतप्त झाला १ आणि "हें कां मीं दिवसां पडणारें (व्यर्थ) स्वप्न पाहिलें? कां हा मला चित्तभ्रम झालेला आहे? किंवा पिशाचानें झपाटल्याचा हा मला अनुभव आलेला आहे? किंवा हा कांहीं मानसिक उपद्रव आहे?" असें मनांत आणूं लागला २; परंतु, असें चिंतन करूनही त्या राजाला बरें वाटेना. नंतर कैकेयीच्या भाषणानें स्मरण होऊन संतप्त झालेला तो राजा सावध झाला ३ आणि उघड्या भूमीवर बसलेला तो भूपति व्याघ्रीकडे दृष्टि गेलेल्या मृगाप्रमाणें कैकेयीकडे दृष्टि जातांक्षणीं व्यथित व दीन होऊन दीर्घ सुस्कारे टाकूं लागला ४ व यंत्रमंडलामध्यें मंत्रांच्या योगानें जखडून टाकिलेल्या महाविषारी सर्पाप्रमाणें कैकेयीनें जखडून टाकिलेला तो भूपति "अहो धिक्कार असो" असें रागारागानें ह्मणून ५ पुनरपि मूर्छित झाला. नंतर शोकानें मूर्छित झालेला तो राजा बऱ्याच वेळानें शुद्धीवर आला आणि अत्यंत दुःखित होऊन ६ व क्रुद्ध होऊन दुःखजन्य संतापानें जळफळत जळफळत कैकेयीला ह्मणाला "हे क्रूर, हे दुराचारिणि, हे कुलघातिनि ७, हे पापिणि, रामानें अथवा मीं तुझें काय वाईट केलें आहे. नेहमीं आपल्या जननीप्रमाणें राम तुला वागवीत असतो ८. असें असतांना त्याच्या अनर्थाकरितां तूं येथें ह्याप्रमाणें कां उद्युक्त झाली आहेस ? ( अथवा तुला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ! ) तीक्ष्ण विषानें युक्त असलेली नागीण

शिता ९ अविज्ञानान्नृपसुता व्याली तीक्ष्णविषा यथा । जीवलोको यदा सर्वो रामस्याह गुणस्तवम् १० अपराधं कमुद्दिश्य त्यक्ष्यामीष्टमहं सुतम् । कौसल्यां च सुमित्रां च त्यजेयमपि वा श्रियम् ११ जीवितं चात्मना रामं न त्वेव पितृवत्सलम् । परा भवति मे प्रीतिर्दृष्ट्वा तनयमग्रजम् १२ अपश्यतस्तु मे रामं नष्टं भवति चेतनम् । तिष्ठेल्लोको विना सूर्यं सस्यं वा सलिलं विना १३ न तु रामं विना देहे तिष्ठेत्तु मम जीवितम् । तदलं त्यज्यतामेष निश्चयः पापनिश्चये १४ अपि ते चरणौ मूर्ध्ना स्पृशाम्येष प्रसीद मे । किमर्थं चिन्तितं पापं त्वया परमदारुणम् १५ अथ जिज्ञासमे मां त्वं भरतस्य प्रियाप्रिये । अस्तु यत्तत्त्वया पूर्वं व्याहृतं राघवं प्रति १६ स मे ज्येष्ठसुतः श्रीमान्धर्मज्येष्ठ इतीव मे । तत्त्वया प्रियवादिन्या सेवार्थं कथितं भवेत् १७ तच्छ्रुत्वा शोकसंतप्ता संतापयसि मां भृशम् ।

---

जशी एकाद्यानें न समजतां घरामध्यें आणून ठेवावी त्याप्रमाणें राजकन्या ह्मणून मीं न समजतां तुला आपल्या नाशाकरितां स्वतःच्या घरामध्यें आणून ठेविली. जगतांतील सर्व लोक जर रामाच्या गुणांची प्रशंसा करीत आहेत ९, १० तर कोणत्या अपराधाचें निमित्त करून मी आपल्या प्रिय पुत्राचा त्याग करूं ? कौसल्येचा, सुमित्रेचा अथवा राज्यलक्ष्मीचाही मी त्याग करीन ११. परंतु, स्वतः होऊन जीविताचें साधन अशा पितृवत्सल रामाचा मी स्वतः होऊन कधींही त्याग करणार नाहीं. ज्येष्ठ पुत्र अवलोकन केला ह्मणजे मला पराकाष्ठेचा आनंद होत असतो १२. तेव्हां राम जर दृष्टीआड झाला तर माझें चैतन्यच नाहींसें होणार. सूर्यावांचून कदाचित् जगतूही राहील किंवा उदकावांचून पिकेंही कायम राहातील १३ परंतु, रामावांचून माझ्या देहामध्यें जीव राहणार नाहीं. तस्मात्, हे दुष्टबुद्धि कैकेयि, तूं हा आग्रह सोडून दे १४. ह्याकरितां हा मी आपलें मस्तकही तुझ्या पायावर ठेवीत आहें; तूं मजवर कृपा कर. हे पापिणि, अत्यंत भयंकर असें हें आज तूं मनामध्यें कशाकरितां आणिलें आहेस ? १५. आतां भरत मला प्रिय आहे किंवा नाहीं हें समजून घेण्याकरितां जर तूं असा प्रकार केला असशील तर पूर्वी रामासंबंधानें तूं काढिलेले उद्गार एकीकडेच राहोत १६. तो माझा ज्येष्ठपुत्र वैभवशाली राम धर्मानेंही ज्येष्ठ आहे असें जें तूं प्रिय भाषण करणारी मला पूर्वी सांगत होतीस तें खरें नसून माझें मन वळविण्याकरितांच तूं तें सांगत होतीस असें ह्मटलें पाहिजे १७. अथवा ( महाकुलामध्यें उत्पन्न झालेल्या तुझ्या ठिकाणीं असा दुष्ट विचार येणें असंभवनीय आहे. ह्यास्तव ) शून्य गृहामध्यें तुला पिशाचादिकांनीं झपाटलें आहे आणि ह्मणूनच तूं दुसऱ्याच्या तावडींत सांपडल्यामुळें रामाच्या अभिषेकाचा

आविष्टासि गृहे शून्ये सा त्वं परवशं गता १८ इक्ष्वाकूणां कुले देवि संप्राप्तः सुमहानयम्। अनयो नयसंपन्ने यत्र ते विकृता मतिः १९ न हि किंचिदयुक्तं वा विप्रियं वा पुरा मम। अकरोस्त्वं विशालाक्षि तेन न श्रद्दधामि ते २० ननु ते राघवस्तुल्यो भरतेन महात्मना। बहुशो हि स्म बाले त्वं कथाः कथयसे मम २१ तस्य धर्मात्मनो देवि वने वासं यशस्विनः। कथं रोचयसे भीरु नव वर्षाणि पञ्च च २२ अत्यन्तसुकुमारस्य तस्य धर्मे कृतात्मनः। कथं रोचयसे वासमरण्ये भृशदारुणे २३ रोचयस्यभिरामस्य रामस्य शुभलोचने। तव शुश्रूषमाणस्य किमर्थं विप्रवासनम् २४ रामो हि भरताद्भूयस्तव शुश्रूषते सदा। विशेषं त्वयि तस्मात्तु भरतस्य न लक्षये २५ शुश्रूषां गौरवं चैव प्रमाणं वचनक्रियाम्। कस्तु भूयस्तरं कुर्यादन्यत्र पुरुषर्षभात् २६ बहूनां स्त्रीसहस्राणां बहूनां चोपजीविनाम्। परिवादोपवादो वा राघवे नोपपद्यते २७ सान्त्वयन्सर्वभूतानि रामः शुद्धेन चेतसा। गृह्णाति मनुजव्याघ्रः प्रियैर्विषय-

---

वृत्तांत श्रवण करितांक्षणीं शोकानें संतप्त होऊन मलाही अत्यंत ताप देत आहेस १८. हे विनयसंपन्न देवि, तुझ्या मतीलाही ज्याअर्थी विकार झाला त्याअर्थी इक्ष्वाकूंच्या कुलामध्यें हा एक अति भयंकर अनर्थच प्राप्त झाला आहे ह्यांत संशय नाहीं १९. हे विशालनयने, ह्यापूर्वी तूं माझ्याशीं कोणतेंही अयोग्य अथवा अप्रिय भाषण केलेलें नाहींस व ह्मणूनच तुझें हें भाषण मला विश्वसनीय वाटत नाहीं. (सारांश, तुला कोणीं तरी झपाटल्यामुळें तूं असें बोलत आहेस ) २०. हे बाले, महात्मा भरत आणि राम हे तुला सारखेच आहेत ह्मणून तूं पुष्कळ वेळां माझ्यापाशीं बोलली आहेस २१. तस्मात्, हे देवि, हे भीरु, भरताप्रमाणेंच प्रिय असा जो धर्मात्मा व यशस्वी राम त्यानें चवदा वर्षेपर्यंत वनवास करावा हें तुला कसें रुचत आहे ? २२. अत्यंत सुकुमार असून धर्माकडेच मन असलेल्या त्या रामाचें अत्यंत भयंकर अशा अरण्यामध्यें वास्तव्य तुला कसें रुचत आहे ? २३. हे शुभनयने, तुझ्या शुश्रूषेमध्यें तत्पर असणाऱ्या मनोहर रामाला अरण्यांत हांकून देणें तुला कसें रुचत आहे ? २४ भरतापेक्षां रामच नेहमीं तुझी शुश्रूषा करीत असतो. त्या रामापेक्षां भरतानें तुझ्या ठिकाणीं कांहींही जास्त गौरव दृष्टोत्पत्तीस येत नाहीं २५. सेवा, बहुमान, विश्वास आणि सांगितलेलें करणें ह्या गोष्टी पुरुषश्रेष्ठ रामाहून अधिक कोण करणार आहे ? २६. अनेक हजारों स्त्रियांमध्यें रामाची कोणीही निंदा करीत नाहीं आणि अनेक सेवकांमध्येंही रामावर कोणाचा अपवाद नाहीं २७. कारण, पुरुषश्रेष्ठ राम शुद्ध मनानें सर्व प्राण्यांचें सांत्वन

वासिनः २८ सत्त्वेन लोकाञ्जयति द्विजान्दानेन राघवः । गुरूञ्छुश्रूषया वीरो धनुषा युधि शात्रवान् २९ सत्यं दानं तपस्त्यागो मित्रता शौचमार्जवम् । विद्या च गुरुशुश्रूषा ध्रुवाण्येतानि राघवे ३० तस्मिन्नार्जवसंपन्ने देवि देवोपमे कथम् । पापमाशंससे रामे महर्षिसमतेजसि ३१ न स्मराम्यप्रियं वाक्यं लोकस्य प्रियवादिनः । स कथं त्वत्कृते रामं वक्ष्यामि प्रियमप्रियम् ३२ क्षमा यस्मिंस्तपस्त्यागः सत्यं धर्मः कृतज्ञता। अप्यहिंसा च भूतानां तमृते का गतिर्मम ३३ मम वृद्धस्य कैकेयि गतान्तस्य तपस्विनः । दीनं लालप्यमानस्य कारुण्यं कर्तुमर्हसि ३४ पृथिव्यां सागरान्तायां यत्किंचिदधिगम्यते । तत्सर्वं तव दास्यामि मा च त्वं मृत्युमाविश ३५ अञ्जलिं कुर्मि कैकेयि पादौ चापि स्पृशामि ते । शरणं भव रामस्य माधर्मो मामिह स्पृशेत् ३६ इति दुःखाभिसंतप्तं विलपन्तमचेतनम् । घूर्णमानं महाराजं शोकेन समभिप्लुतम् ३७ पारं शोका-

करीत असतो आणि देशांत राहणाऱ्या लोकांना प्रिय असेल तें करून वश करून घेत असतो २८. सच्छीलपणामुळें लोकांना, दानाच्या योगानें द्विजांना, शुश्रूषेनें गुरूंना आणि धनुष्याच्या योगानें युद्धामध्यें शत्रूंना हा वीर राम आपल्या अधीन करून घेत असतो २९. सत्य वचन, दान, तप, धर्म, मित्रता, शुचिर्भूतपणा, सरलता, विद्या आणि गुरुशुश्रूषा हे गुण रामाचे ठिकाणीं अचल आहेत ३०. तस्मात्, सरल आणि देवतुल्य अशा त्या महर्षीसमान तेजस्वी रामाविषयीं, हे देवि, तूं मनामध्यें कां बरें पाप आणीत आहेस ? ३१. मी प्रिय भाषण करणारा आहें व लोकांना उद्देशून अप्रिय भाषण केल्याचें मला कधींही स्मरत नाहीं. तऱ्हां, तुझ्याकरितां प्रिय रामाला मी अप्रिय भाषण कसें करूं ? ३२. क्षमा, तप, औदार्य, सत्य, धर्म, कृतज्ञता आणि प्राण्यांची अहिंसा हे गुण ज्याच्या ठिकाणीं आहेत त्या रामावांचून मला काय बरें आधार आहे ? ३३. ह्यास्तव, हे कैकयि, तूं मजवर दया कर. मी अगदीं वृद्ध होऊन वयाच्या शेंवटल्या अवस्थेला पोचलों आहें व दीन होऊन मोठ्या काकुळतीनें तुझी प्रार्थना करीत आहें ३४. समुद्रवलयांकित पृथ्वीमध्यें जें कांहीं मिळण्यासारिखें असेल तें सर्व मी तुला देईन. तूं माझ्या मृत्यूचा आग्रह धरूं नकोस ३५. हे कैकेयि, मी तुला हात जोडितों आणि तुझ्या पायावरही मस्तक ठेवितों; परंतु, तूं रामाची रक्षण करणारी हो आणि ह्या ठिकाणीं मला अधर्माचा स्पर्श होऊं देऊं नको " ३६. ह्याप्रमाणें दुःखानें संतप्त, शोकानें व्याप्त, मूर्छित, शरीराला कंप सुटून विलाप करीत असलेल्या ३७ आणि शोकसागरांतून पार पाडण्याविषयीं वारंवार प्रार्थना

र्णवस्याशु प्रलपन्तं पुनः पुनः। प्रत्युवाचाथ कैकेयी रौद्रा रौद्रतरं वचः ३८ यदि दत्त्वा वरौ राजन्पुनः प्रत्यनुतप्यसे। धार्मिकत्वं कथं वीर पृथिव्यां कथयिष्यसि ३९ यदा समेता बहवस्त्वया राजर्षयः सह। कथयिष्यन्ति धर्मज्ञ तत्र किं प्रतिवक्ष्यसि ४० यस्याः प्रसादे जीवामि या च माममभ्यपालयत्। तस्याः कृता मया मिथ्या कैकेय्या इति वक्ष्यसि ४१ किल्बिषं त्वं नरेन्द्राणां करिष्यसि नराधिप। यो दत्त्वा वरमद्यैव पुनरन्यानि भाषसे ४२ शैब्यः श्येनकपोतीये स्वमांसं पक्षिणे ददौ। अलर्कश्चक्षुषी दत्त्वा जगाम गतिमुत्तमाम् ४३ सागरः समयं कृत्वा न वेलामतिवर्तते। समयं मानृतं कार्षीः पूर्ववृत्तमनुस्मरन् ४४ स त्वं धर्मं परित्यज्य रामं राज्यभिषिच्य च। सह कौसल्यया नित्यं रन्तुमिच्छसि दुर्मते ४५ भवत्वधर्मो धर्मो वा सत्यं वा यदि वानृतम्। यत्त्वया संश्रुतं मह्यं तस्य

---

करीत असलेल्या दशरथ महाराजाला कैकेयी अधिक भयंकर अशा शब्दांनीं ह्मणाली ३८ " हे राजा, वर देऊन सवरूनही जर तूं पुन्हां पश्चात्ताप पावत आहेस तर, हे वीरा, पृथ्वीमध्यें लोकांना धार्मिकपणाबद्दल तुझी प्रशंसा कशी करितां येईल? ३९ हे धर्मज्ञा, अनेक राजर्षि तुझी भेट घेऊन मला दिलल्या वरासंबंधानें गोष्टी बोलूं लागतील तेव्हां तूं त्यांना काय उत्तर देशील ? ४०. " जिच्या कृपेनें मी जिवंत राहिलों आणि जिनें माझें रक्षण केलें त्या कैकेयीला दिलेलें वचन मीं मिथ्या केलें " असेंच तुला सांगावें लागेल ४१. ज्याअर्थी वर देऊन सवरूनही आज पुन्हां भलतींच भाषणें करीत आहेस त्याअर्थी, हे राजा, आपल्या कुलांतील राजांच्या नांवाला तूं कलंक लावशील ४२. अरे, शैब्य राजानें कपोताला अभय दिलें होतें व तें आपलें अभयवचन परिपूर्ण करण्याकरितां कपोताबद्दल त्यानें आपलें स्वतःचें मांस श्येनपक्ष्याला दिलें असें श्येनकपोतीय आख्यानामध्यें सांगितलें आहे. अलर्कराजानें अंध ब्राह्मणाला वर देऊं केला; तेव्हां त्यानें " तुझे डोळे मला दे " असा वर मागितला असतांही अलर्क राजा (प्रतिज्ञा शेवटास नेण्याकरितां) त्याला आपले नेत्र देऊन उत्तम गतीला गेला ४३ मर्यादेचें अतिक्रमण न करण्याविषयीं देवांनीं प्रार्थना केली असतां " मी अतिक्रमण करणार नाहीं " असें त्यांना वचन दिल्यापासून समुद्रही मर्यादेचें अतिक्रमण करीत नाहीं. तस्मात्, ह्या पुरातन वृत्तांताचें स्मरण करून तरी तूं आपली प्रतिज्ञा असत्य करूं नको ४४. हे दुर्मते, धर्माचा त्याग करून आणि रामाला राज्याभिषेक करून कौसल्येसहवर्तमान नित्य रममाण होण्याची तूं इच्छा करीत आहेस ४५. अरे, हा धर्म असो अथवा अधर्म असो किंवा सत्य असो अथवा अनृत असो तूं जें

नास्ति व्यतिक्रमः ४६ अहं हि विषमद्यैव पीत्वा बहु तवाग्रतः । पश्यतस्ते मरिष्यामि रामो यद्यभिषिच्यते ४७ एकाहमपि पश्येयं यद्यहं राममातरम् । अञ्जलिं प्रतिगृह्णन्तीं श्रेयो ननु मृतिर्मम ४८ भरतेनात्मना चाहं शपे ते मनुजाधिप । यथा नान्येन तुष्येयमृते रामविवासनात् ४९ एतावदुक्त्वा वचनं कैकेयी विरराम ह । विलपन्तं च राजानं न प्रतिव्याजहार सा ५० श्रुत्वा तु राजा कैकेय्या वाक्यं परमशोभनम् । रामस्य च वने वासमैश्वर्यं भरतस्य च ५१ नाभ्यभाषत कैकेयीं मुहूर्तं व्याकुलेन्द्रियः । प्रैक्षतानिमिषो देवीं प्रियामप्रियवादिनीम् ५२ तां हि वज्रसमां वाचमाकर्ण्य हृदयाप्रियाम् । दुःखशोकमयीं श्रुत्वा राजा न सुखितोऽभवत् ५३ स देव्या व्यवसायं च घोरं च शपथं कृतम् । ध्यात्वा रामेति निःश्वस्य च्छिन्नस्तरुरिवापतत् ५४ नष्टचित्तो यथोन्मत्तो विपरीतो यथातुरः । हृततेजा यथा सर्पो बभूव जगतीपतिः ५५ दीनयातुरया वाचा इति होवाच कैकयीम् । अनर्थमिममर्थाभं केन त्वमुपदर्शिता ५६ भूता-

मला वचन दिलें आहेस तें फिरणार नाहीं ४६. रामाला जर राज्याभिषेक होईल तर मी आजच पुष्कळसें विष भक्षण करून तुझ्यापुढें व तुझ्यासमक्ष प्राण देईन ४७. राजमाता या नात्यानें सर्व लोकांचे मुजरे घेतांना रामाच्या मातेला पहाण्याचा जर मला प्रसंग आला तर खरोखर मरणच मला श्रेयस्कर होणार आहे ४८. हे राजा, भरताशपथ आणि आपल्या स्वतःशपथ मी तुला सांगतें कीं, रामाला हाकून देणें ह्यावांचून दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें मला संतोष होणार नाहीं " ४९. इतकें भाषण करून कैकेयी स्वस्थ राहिली आणि राजा विलाप करूं लागला असतांही ती त्याच्याशीं कांहीं एक बोलेनाशीं झाली ५०. तेव्हां रामाला वनवास आणि भरताला ऐश्वर्य हें कैकेयीचें अत्यंत अशुभ भाषण श्रवण केल्यावर दशरथराजा इंद्रियें ५१ व्याकुल झाल्यामुळें कैकेयीशीं क्षणभर कांहींच न बोलतां अप्रिय भाषण करणाऱ्या आपल्या प्रिय भार्येकडे ( क्रोधानें ) कांहीं वेळ टक लावून पाहूं लागला ५२. कारण, अंतःकरणाला अप्रिय आणि दुःख व शोक हाच ज्याचा परिणाम असें तें वज्रप्राय भाषण श्रवण केल्यापासून राजाला सुख झालें नाहीं ५३. इतकेंच नव्हे परंतु, रामाविषयीं आपल्या भार्येचा तो निश्चय आणि तिनें केलेली ती घोर शपथ मनांत आणिल्यावर अतिशय सुस्कारे टाकून छिन्न वृक्षाप्रमाणें तो एकाएकीं भूमीवर पडला ५४ आणि भान नाहींसें झालेल्या उन्मत्त पुरुषाप्रमाणें, विपरीतप्रकृति झालेल्या व्याधिग्रस्त पुरुषाप्रमाणें अथवा तेजहरण केलेल्या सर्पाप्रमाणें तो भूपति दिसूं लागला ५५ आणि दीन व व्याकुल शब्दांनीं तो कैकेयीला

प्रहतचित्तेव ब्रुवन्ती मां न लज्जसे । शीलव्यसनमेतत्ते नाभिजानाम्यहं पुरा ५७ बालायास्तत्त्विदानीं ते लक्षये विपरीतवत् । कुतो वा ते भयं जातं या त्वमेवंविधं वरम् ५८ राष्ट्रे भरतमासीनं वृणीषे राघवं वने । विरमैतेन भावेन त्वमेतेनानृतेन च ५९ यदि भर्तुः प्रियं कार्यं लोकस्य भरतस्य च । नृशंसे पापसंकल्पे क्षुद्रे दुष्कृतकारिणि ६० किं नु दुःखमलीकं वा मयि रामे च पश्यसि । न कथंचिदृते रामाद्भरतो राज्यमावसेत् ६१ रामादपि हि तं मन्ये धर्मतो बलवत्तरम् । कथं वक्ष्यसि रामस्य वनं गच्छेति भाषिते ६२ मुखवर्णं विवर्णं तु यथैवेन्दुमुपप्लुतम् । तां तु मे सुकृतां बुद्धिं सुहृद्भिः सह निश्चिताम् ६३ कथं द्रक्ष्याम्यपावृत्तां परैरिव हतां चमूम् । किं मां वक्ष्यन्ति राजानो नानादिग्भ्यः समागताः ६४ बालो बतायमैक्ष्वाकश्चिरं राज्यमकारयत् । यदा हि बहवो वृद्धा गुणवन्तो बहुश्रुताः ६५ परिप्र-

---

ह्मणाला " हितकारक दिसणाऱ्या ह्या अनर्थाचा तुला कोणीं उपदेश केला आहे ? ५६ आणि पिशाचानें अंतःकरण झपाटल्याप्रमाणें माझ्याशीं असें भाषण करितांना तुला लाज कशी वाटत नाहीं ? ह्यापूर्वी बालपणीं सुद्धां तुझ्या सुशीलपणावर अशी धाड आलेली मला स्मरत नाहीं; परंतु, सांप्रत तुझ्या ठिकाणीं हा सगळाच प्रकार मला विपरीत दिसत आहे. भरताला राज्यावर बसवून रामाला वनवासांत पाठविण्या-विषयीं तूं वर मागत आहेस; परंतु, अशाप्रकारचा वर मागण्यासारिखें भय तुला कोठून प्राप्त झालें आहे ? भर्ता, लोक आणि भरत ह्यांना प्रिय असलेलें जर तुला कर्तव्य असेल तर ह्या विचारापासून आणि ह्या अनृत मार्गापासून तूं परावृत्त हो. हे दुष्टे, हे क्षुद्रे, हे दुराचारिणि, हे प्रापिणि ५७,५८,५९,६०, तुला दुःख होण्यासारिखें काय कारण अथवा कोणता अपराध माझे ठिकाणीं व रामाचे ठिकाणीं तुझ्या दृष्टीं पडत आहे ? रामावांचून भरत कधींही राज्यावर बसणार नाहीं ६१. कारण, रामापेक्षांही मी त्याला अधिक धार्मिक समजत आहें. बरें, " वनांत जा " असें कदाचित् मीं जरी रामाला सांगितलें तरी तुझ्यानें त्याला कसें पाहवेल ? ( कारण, राम तुला अतिशयच प्रिय आहे ) ६२. ग्रहण लागलेल्या चंद्राप्रमाणें ( राम वनवासांत गेल्यामुळें ) निस्तेज झालेली आपली मुद्रा मी अरशामध्यें कशी बरें अवलोकन करूं ? आणि सुहृदांसहवर्तमान जो उत्कृष्ट विचार मीं निश्चित केला तो ६३, शत्रूंनीं पराजित केलेल्या सैन्याप्रमाणें, परत फिरलेला मी कसा बरें पाहूं ? दशोदशांहून जमलेले राजे मला काय बरें ह्मणतील ? ६४. " हा इक्ष्वाकुवंशज दशरथ मूर्ख असतांना ह्यानें पुष्कळ दिवस राज्य तरी कसें केलें ? " असेंच ह्मणतील. गुणवान् आणि

क्ष्यन्ति काकुत्स्थं वक्ष्यामीह कथं तदा। कैकेय्या क्लिश्यमानेन पुत्रः प्रव्राजितो मया ६६ यदि सत्यं ब्रवीम्येतत्तदसत्यं भविष्यति। किं मां वक्ष्यति कौसल्या राघवे वनमास्थिते ६७ किं चैनां प्रतिवक्ष्यामि कृत्वा विप्रियमीदृशम्। यदा यदा च कौसल्या दासीव च सखीव च ६८ भार्यावद्भगिनीवच्च मातृवच्चोपतिष्ठति। सततं प्रियकामा मे प्रियपुत्रा प्रियंवदा ६९ न मया सत्कृता देवी सत्कारार्हा कृते तव। इदानीं तत्तपति मां यन्मया सुकृतं त्वयि ७० अपथ्यव्यञ्जनोपेतं भुक्तमन्नमिवातुरम्। विप्रकारं च रामस्य संप्रयाणं वनस्य च ७१ सुमित्रा प्रेक्ष्य वै भीता कथं मे विश्वसिष्यति। कृपणं बत वैदेही श्रोष्यति द्वयमप्रियम् ७२ मां च पञ्चत्वमापन्नं रामं च वनमाश्रितम्। वैदेही बत मे प्राणाञ्छोचन्ती क्षपयिष्यति ७३ हीना हिमवतः पार्श्वे किंनरेणेव किंनरी। न हि राममहं

---

बहुश्रुत असे अनेक वृद्ध लोक ६५ " राम कोठें आहे ? " असें मला विचारूं लागले असतां मी त्यांना काय बरें सांगूं ? कैकेयीच्या तावडींत सांपडल्यामुळें मीं आपला पुत्र वनवासांत घालविला " ६६ असें जरी मी खरें सांगूं लागलों तरी लोकांना तें असत्यच वाटणार. राम वनामध्यें निघाला असतां कौसल्या मला काय बरें ह्मणेल ? ६७ आणि अशा प्रकारची अप्रिय गोष्ट केल्यावर मी तरी तिला काय बरें उत्तर देऊं ? जेव्हां जेव्हां कौसल्या ( प्रसंग पाहून ) दासीप्रमाणें, सखीप्रमाणें ६८, भार्येप्रमाणें, भगिनीप्रमाणें आणि मातेप्रमाणें माझ्या शुश्रूषेमध्यें तत्पर असे आणि जेव्हां जेव्हां ती पुत्रवत्सल व मधुर भाषण करणारी कौसल्या माझें प्रिय करण्याविषयीं नेहमीं तत्पर रहात असे ६९ तेव्हां तेव्हां ती सत्कारास पात्र असतांनाही तुझ्याकरितां मीं तिचा सत्कार केला नाहीं. अपथ्य पदार्थांनीं युक्त असलेलें अन्न भक्षण केलें असतां त्यापासून जशी रुग्ण मनुष्याला पीडा होते तशी, तुझ्याशीं चांगल्या रीतीनें जें मीं वर्तन केलें त्याची, आतां मला पीडा होत आहे. रामाचा अभिषेक हाणून पाडून त्याला वनांत पाठविल्याचें ७०, ७१ पाहून भयभीत झालेली सुमित्रा माझ्यावर कसा बरें विश्वास ठेवील ? ( तझ्या मनाप्रमाणें झालें असतां ) मी मृत झालों आणि राम वनवासांत गेला असे दोन खरोखर दुःखदायक व अप्रिय प्रकार सीतेला ऐकावे लागतील. हिमालयपर्वतावर पतीचा वियोग झालेल्या किन्नरस्त्रीप्रमाणें सीता माझ्याकरितां शोक करीत करीत आपले प्राण व्याकुल करील. राम महावनामध्यें निघालेला पाहून आणि मिथिलराजकन्या सीता रुदन करीत आहे असें अवलोकन करून फार वेळ जगण्याची मला आशा नाहीं. तुला आपल्या

दृष्ट्वा प्रवसन्तं महावने ७४ चिरं जीवितुमाशंसे रुदन्तीं चापि मैथिलीम् । सा नूनं विधवा राज्यं सपुत्रा कारयिष्यसि ७५ सतीं त्वामहमत्यन्तं व्यवस्याम्यसतीं सतीम् । रूपिणीं विषसंयुक्तां पीत्वेव मदिरां नरः ७६ अनृतैर्बत मां सान्त्वैः सान्त्वयन्ती स्म भाषसे । गीतशब्देन संरुध्य लुब्धो मृगमिवावधीः ७७ अनार्य इति मामार्याः पुत्रविक्रायकं ध्रुवम् । विक्रोश्यन्ति रथ्यासु सुरापं ब्राह्मणं यथा ७८ अहो दुःखमहो कृच्छ्रं यत्र वाचः क्षमे तव । दुःखमेवं विधं प्राप्तं पुरा कृतमिवाशुभम् ७९ चिरं खलु मया पापे त्वं पापेनाभिरक्षिता । अज्ञानादुपसंपन्ना रज्जुरुद्बन्धनी यथा ८० रममाणस्त्वया सार्धं मृत्युं त्वां नाभिलक्षये । बालो रहसि हस्तेन कृष्णसर्पमिवास्पृशम् ८१ तं तु मां जीवलोकोयं नूनमाक्रोष्टुमर्हति । मया ह्यपितृकः पुत्रः स महात्मा दुरात्मना ८२ बालिशो बत कामात्मा राजा

---

पुत्रासहवर्तमान जर राज्य चालवावयाचें असेल तर तुला खरोखर तें विधवा होऊनच चालवावें लागेल ७२, ७३, ७४, ७५. दृष्टीला मनोहर भासणारी मदिरा प्यायल्यावर विकार उत्पन्न झाला असतां ज्याप्रमाणें ती सविष असल्याचें समजून येतें त्याचप्रमाणें तूं सती ह्मणून जरी माझ्या मनानें अतिशय घेतलेलें होतें तरी तूं दिसण्यांत मात्र सती असून वस्तुत: असती आहेस हा माझा आतां निश्चय झाला ७६. गोड गोड भाषण करणारी तूं खोट्याच मधुर शब्दांनीं माझ्याशीं आजपर्यंत बोलत आली आहेस आणि गायनाच्या ध्वनीनें मृगाला कचाट्यांत धरून त्याचा वध करणाऱ्या पारध्याप्रमाणें तूं आज माझा वध करण्यास प्रवृत्त झाली आहेस ७७. सुरापान करणाऱ्या ब्राह्मणाची ज्याप्रमाणें रस्त्यांतून लोक निंदा करीत असतात त्याचप्रमाणें "पुत्राचा विक्रय करून स्त्रीसुखाचा उपभोग घेणारा हा दुष्ट आहे" ह्मणून सभ्य लोक माझी निःसंशय निंदा करूं लागतील ७८. अरेरे, कायरे हें दुःख !! अरे, किती तरी हा दुःखाचा प्रसंग ! ज्याअर्थी तुझे हे शब्द मला ऐकून घेणें भाग पडत आहे त्याअर्थीं पूर्वी कधीं केलेल्या अशुभ कर्माचें फल ह्मणून अशा प्रकारचें हें अपरिहार्य दुःख मला प्राप्त झालें आहे असें वाटतें ७९. हे पापिणि, न कळत जसा एकाद्यानें आपल्या गळ्याला फांस लावून घ्यावा तशी मीं पाप्यानें ( आपल्या नाशाकरितां ) तुला खरोखर पुष्कळ दिवसपर्यंत जतन करून ठेविली ८०. हातानें कृष्णसर्पाला स्पर्श करणाऱ्या बालाप्रमाणें तुझ्यासहवर्तमान रममाण होणाऱ्या माझ्या लक्ष्यांत तूं मृत्यु आहेस हें आलें नाहीं ८१. ह्यामुळें आतां ह्या पृथ्वींतील सर्व प्राण्यांनीं माझी निंदा करणेंच योग्य आहे. कारण, मी दुरात्म्यानें त्या महात्म्या पुत्राला वनांत

दशरथो भृशम् । स्त्रीकृते यः प्रियं पुत्रं वनं प्रस्थापयिष्यति ८३ वेदैश्च ब्रह्मचर्यैश्च गुरुभिश्चोपकर्शितः । भोगकाले महत्कृच्छ्रं पुनरेव प्रपत्स्यते ८४ नालं द्वितीयं वचनं पुत्रो मां प्रतिभाषितुम् । स वनं प्रव्रजेत्युक्तो बाढमित्येव वक्ष्यति ८५ यदि मे राघवः कुर्याद्वनं गच्छेति चोदितः । प्रतिकूलं प्रियं मे स्यान्न तु वत्सः करिष्यति ८६ राघवे हि वनं प्राप्ते सर्वलोकस्य धिक्कृतम् । मृत्युरक्षमणीयं मां नयिष्यति यमक्षयम् ८७ मृते मयि गते रामे वनं मनुजपुंगव । इष्टे मम जने शेषे किं पापं प्रतिपत्स्यसे ८८ कौसल्या मां च रामं च पुत्रौ च यदि हास्यति । दुःखान्यसहती देवी मामेवानुगमिष्यति ८९ कौसल्यां च सुमित्रां च मां च पुत्रैस्त्रिभिः सह । प्रक्षिप्य नरके सा त्वं कैकयि सुखिता भव ९० मया रामेण च त्यक्तं शाश्वतं सत्कृतं गुणैः । इक्ष्वाकुकुलमक्षोभ्यमाकुलं पालयिष्यसि ९१ प्रियं चेद्भरतस्यैतद्रामप्रव्राजनं भवेत् । मा स्म मे भरतः कार्षीत्प्रेतकृत्यं गतायुषः ९२ मृते मयि गते रामे वनं पुरुषपुंगवे । सेदानीं

---

पाठवून अनाथ करण्याचा प्रसंग आणिला ८२. " स्त्रीकरितां पुत्राला वनांत पाठवून देणारा हा विषयासक्त दशरथराजा खरोखर अतिशय मूर्ख आहे " ( अशी लोक माझी निंदा करितील ) ८३. वेदाध्ययन, ब्रह्मचर्य आणि गुरुशुश्रूषा ह्यांच्या योगानें आधींच कृश झालेल्या रामाला राज्योपभोगसमयींही पुनरपि मोठें दुःख सोसावें लागणार ८४. माझ्या पुत्राला माझ्याशीं दुसरें भाषण कांहीं करवणारच नाहीं " वनांत जा " असें ह्मटलें असतां तो " ठीक आहे " एवढेंच ह्मणेल ८५. मीं " वनांत जा " ह्मणून सांगितलें असतां राम जर माझ्या विरुद्ध वागेल तर मला प्रिय होईल; परंतु, तो पुत्र तसें करणारच नाहीं ८६. राम वनांत गेला असतां क्षमेस अपात्र आणि ह्मणूनच सर्व लोकांनीं धिक्कारिलेल्या मला मृत्यु यमसदनीं नेईल ८७. मी मेल्यावर आणि पुरुषश्रेष्ठ राम वनवासांत गेल्यावर अवशिष्ट राहिलेल्या माझ्या प्रिय जनांना तूं किती तरी दुःख देशील ! ८८. माझा आणि रामाचा कौसल्येला जर वियोग झाला आणि त्याचप्रमाणें सुमित्रेला जर माझा, रामाचा आणि आपल्या उभयतां पुत्रांचा वियोग झाला तर त्या उभयतांनाही दुःख सहन न होऊन त्या माझेच मागोमाग ( परलोकीं ) येतील ८९. सारांश, कौसल्येला, सुमित्रेला आणि तिन्ही पुत्रांसहवर्तमान मला नरकांत लोटून देऊन हे कैकेयि, तूं सुखी हो ९०. गुणांनीं अलंकृत, शाश्वत आणि क्षोभरहित असें इक्ष्वाकुकुल मीं व रामानें सोडिलें असतां तूं तें क्षुब्ध झालेलें परिपालन करिशील ९१. रामाचें वनवासांत जाणें जर भरताला प्रिय असेल तर मी मरण

विधवा राज्यं सपुत्रा कारयिष्यसि ९३ त्वं राजपुत्रि दैवेन न्यवसो मम वेश्मनि । अकीर्तिश्चातुला लोके ध्रुवः परिभवश्च मे ॥ सर्वभूतेषु चावज्ञा यथा पापकृतस्तथा ९४ कथं रथैर्विभुर्यात्वा गजाश्वैश्च मुहुर्मुहुः । पद्भ्यां रामो महारण्ये वत्सो मे विचरिष्यति ९५ यस्य चाहारसमये सूदाः कुण्डलधारिणः । अहंपूर्वाः पचन्ति स्म प्रसन्नाः पानभोजनम ९६ स कथं नु कषायाणि तिक्तानि कटुकानि च । भक्षयन्वन्यमाहारं सुतो मे वर्तयिष्यति ९७ महार्हवस्त्रसंवद्धो भूत्वा चिरसुखोचितः । काषायपरिधानस्तु कथं रामो भविष्यति ९८ कस्येदं दारुणं वाक्यमेवंविधमरीरितम् । रामस्यारण्यगमनं भरतस्याभिषेचनम ९९ धिगस्तु योषितो नाम शठाः स्वार्थपरायणाः । न ब्रवीमि स्त्रियः सर्वा भरतस्यैव मातरम् १०० अनर्थभावेऽर्थपरे नृशंसे ममानुतापाय निवेशितासि । किमप्रियं पश्यसि मन्निमित्तं हितानुकारिण्यथवापि रामे १ परित्यजेयुः पितरोऽपि पुत्रान्भार्याः

---

पावल्यानंतर भरतानें माझें उत्तरकार्य करूं नये ९२. पुत्रासहवर्तमान जर तुला राज्य कर्तव्य असेल तर पुरुषश्रेष्ठ राम वनांत गेल्यामुळें मी मृत झालों असतां तुला आतां तें विधवा झाल्यावरच करावें लागेल ९३. हे राजकन्ये, ज्याअर्थी दुर्दैवानें तुझें वास्तव्य माझ्या घरीं झालें आहे त्याअर्थी जगतामध्यें माझी अत्यंत अपकीर्ति व हेटाळणी निःसंशय होणार आणि पातकी पुरुषाप्रमाणें सर्व प्राण्यांमध्यें माझी अवज्ञा होणार ९४. रथ, गज आणि अश्व ह्यांवर नेहमीं आरूढ होऊन जाणारा माझा पुत्र प्रभु राम महारण्यामध्यें पायांनीं कसा जाईल ? ९५. ज्याच्या भोजनाचा समय झाला असतां कुंडलें धारण करणारे आचारी आनंदित होऊन चढाओढीनें खाण्यापिण्याचे पदार्थ तयार करीत असतात ९६ तो माझा पुत्र तुरट, कडू आणि तिखट कंदमुळांवर अर्थात् वन्य आहारावर कशी बरें उपजीविका करील ? ९७. मोठमोठ्या मौल्यवान् वस्त्रांमध्यें गुरफटून गेलेला आणि पुष्कळ दिवसपर्यंत सुखांत राहिलेला राम आज काषायवस्त्रें कशीं बरें परिधान करील ? ९८. रामाचें अरण्यामध्यें गमन आणि भरताला अभिषेक अशा प्रकारचें जें भयंकर भाषण आज मला ऐकणें भाग पडलें तें खरोखर माझ्या एकाद्या अनिर्वचनीय दुष्कर्माचेंच फल होय ९९. धिक्कार असो ह्या स्वार्थसाधु कपटी स्त्रियांना ! सर्व स्त्रियांसंबंधानें माझें हें ह्मणणें नाहीं. फक्त भरताच्या मातेलाच उद्देशून मी हें ह्मणत आहें १००. अनर्थकारक गोष्ट करण्याचा उद्देश धरून स्वार्थ साधु पहाणारे, हे दुष्टे, मला त्रास होण्याकरितांच परमेश्वरानें तुला माझ्या घरीं घातलें आहे असें दिसतें. नाहींतर जगताचें हित करण्याविषयीं तत्पर असलेल्या

पतींश्चापि कृतानुरागाः। कृत्स्नं हि सर्वं कुपितं जगत्स्याद्दृष्ट्वैव रामं व्यसने निमग्नम् २ अहं पुनर्देवकुमाररूपमलंकृतं तं सुतमाव्रजन्तम्। नन्दामि पश्यन्निव दर्शनेन भवामि दृष्ट्वैव पुनर्युवेव ३ विना हि सूर्येण भवेत्प्रवृत्तिरवर्षता वज्रधरेण वापि। रामं तु गच्छन्तमितः समीक्ष्य जीवेन्न कश्चित्त्विति चेतना मे ४ विनाशकामामहितामित्रामावासयं मृत्युमिवात्मनस्त्वाम्। चिरं बताङ्केन धृतासि सर्पी महाविषा तेन हतोस्मि मोहात् ५ मया च रामेण सलक्ष्मणेन प्रशास्तु हीनो भरतस्त्वया सह। पुरं च राष्ट्रं च निहत्य बान्धवान्ममाहितानां च भवाभिभाषिणी ६ नृशंसवृत्ते व्यसनप्रहारिणि प्रसह्य वाक्यं यदिहाद्य भाषसे। न नाम ते तेन मुखात्पतन्त्यधो विशीर्यमाणा दशनाः सहस्रधा ७ न किंचिदाहाहितमप्रियं वचो न वेत्ति रामः परुषाणि भाषितुम्। कथं तु रामे ह्यभिरामवादिनि ब्रवीषि

---

रामाचे ठिकाणीं माझ्यामुळें स्वतःला अप्रिय होण्यासारिखें तुला काय बरें दिसत आहे ? १. राम संकटांत सांपडल्याचें पाहून पिते पुत्रांचा व अनुरक्त भार्या पतींचाही त्याग करितील. इतकेंच नव्हे परंतु, संपूर्ण जगत् क्रुद्ध होऊन जाईल २. देवकुमारांप्रमाणें असलेला माझा पुत्र राम अलंकार धारण करून माझ्याकडे येत असल्याचें ऐकून प्रत्यक्ष पाहिल्याप्रमाणें मला आनंद होतो आणि त्याला पाहिल्यावर तर तरुण पुरुषांप्रमाणें मी ( उत्साहयुक्त ) होत असतो ३. कदाचित् सूर्यावांचूनही लोकांचा व्यवहार चालेल आणि इंद्र जरी पर्जन्य पाडीत नसला तरीही कदाचित् लोकांची उपजीविका सुरू राहील; परंतु, येथून राम वनांत जात असल्याचें अवलोकन करून कोणीही जिवंत राहणार नाहीं असें मला वाटतें ४. माझ्या विनाशाची व अकल्याणाची इच्छा धरून माझ्याशीं शत्रुभावानें वागणाऱ्या आणि ह्मणूनच माझ्या मृत्यूप्रमाणें असलेल्या तुला मीं आपणांपाशीं राहून घेतली आणि मोहामुळें तुज महाविषारी सर्पिणीला मी पुष्कळ दिवसपर्यंत मांडीवर ठेविली. त्यामुळें माझा घात झाला आहे ५. मी आणि लक्ष्मणासहवर्तमान राम ह्यांनीं रहित असलेल्या भरतानें तुझ्यासहवर्तमान राजधानीवर व राष्ट्रावर अंमल चालवावा आणि बांधवांना मारून तूं माझ्या शत्रूंशीं प्रत्यक्ष भाषण करूं लागण्यास सिद्ध व्हावेस ६. संकटांत सांपडलेल्यावर प्रहार करणाऱ्ये हे दुराचारिणि, आज तूं ह्या ठिकाणीं उद्धटपणानें भाषण करीत असूनही तुझ्या दांतांचे हजारों तुकडे होऊन ते तुझ्या मुखांतून कसे पडत नाहींत हें मला समजत नाहीं ७. रामानें आजपर्यंत अहितकारक आणि अप्रिय असें भाषण यत्किंचितूही केलेलें नाहीं व कठोर शब्द उच्चारणें तर त्याला ठाऊकच नाहीं. तेव्हां गुणांच्या

दोषान्गुणनित्यसंमते ८ प्रताम्य वा प्रज्वल वा प्रणश्य वा सहस्रशो वा स्फुटितां महीं व्रज । न ते करिष्यामि वचः सुदारुणं समाहितं केकयराजपांसने ९ क्षुरोपमां नित्यमसत्प्रियंवदां प्रदुष्टभावां स्वकुलोपघातिनीम् । न जीवितुं त्वां विषहे मनोरमां दिधक्षमाणां हृदयं सबन्धनम् ११० न जीवितं मेस्ति कुतः पुनः सुखं विनात्मजेनात्मवतां कुतो रतिः । ममाहितं देवि न कर्तुमर्हसि स्पृशामि पादावपि ते प्रसीद मे ११ स भूमिपालो विलपन्ननाथवत्स्त्रिया गृहीतो हृदयेतिमात्रया । पपात देव्याश्चरणौ प्रसारितावुभावसंप्राप्य यथातुरस्तथा ११२ [ ५.७७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

अतदर्हं महाराजं शयानमतथोचितम् । ययातिमिव पुण्यान्ते देवलोकात्परिच्युतम् १ अनर्थरूपासिद्धार्था ह्यभीता भयदर्शिनी । पुनराकार-

---

योगानें सर्वांना सर्वदा संमत अशा प्रिय भाषण करणाऱ्या रामाला तूं दोष कसे लावीत आहेस? ८ तूं संताप, जळ, मर अथवा हजारों तुकडे तुकडे होऊन पृथ्वींत मिळून जा. हे केकयराजकलंकिनि, अत्यंत भयंकर असें हें तूं केलेलें भाषण मी कधींही एकणार नाहीं ९. वस्तऱ्याचीच उपमा तुला योग्य आहे. नेहमीं तूं प्रिय परंतु मिथ्या भाषण करणारी आहेस; तुझी बुद्धि फार दुष्ट आहे आणि तूं आपल्या कुलाचा घात करणारी आहेस. ह्यास्तव, प्राणांसहवर्तमान हृदय दग्ध करण्याची इच्छा करीत असल्यामुळें मनाला दुःख देणाऱ्या तुला जगवावी अशी मला मुळींच इच्छा नाहीं ११०. ( राम वनवासांत गेला असतां ) मी जिवंतही रहाणार नाहीं मग सुखाची गोष्ट कशाला पाहिजे ? कारण, आत्मवेत्त्या पुरुषांना पुत्रावांचून सुख कोठून असणार ? ह्यास्तव, हे देवि, तूं माझें अकल्याण करूं नकोस. मी तुझे पायही धरितों. तूं मजवर कृपा कर ११. ह्याप्रमाणें अमर्यादरीतीनें वागणाऱ्या स्त्रीच्या कचाट्यांत सांपडलेला तो दशरथभूपति अनाथाप्रमाणें विलाप करीत करीत आपल्या भार्येच्या पसरलेल्या पायांना स्पर्श करण्याकरितां गेला असतां व्याधिग्रस्त पुरुषाप्रमाणें तिच्या पायांपर्यंत पोंचण्यापूर्वींच मूर्छित होऊन भूमीवर पडला ११२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांतील बारावा सर्ग समाप्त झाला ॥ १२॥

स्त्रीला प्रणाम करण्यास पात्र आणि भूमीवर शयन करण्यास अयोग्य असतांनाही तशा रीतीनें शयन करणारा आणि ह्मणूनच पुण्याचे शेवटीं देवलोकापासून च्युत झालेल्या ययातीप्रमाणें दिसणारा जो महाराज दशरथ १ त्याला त्याच वराच्या संबंधानें मूर्तिमंत अनर्थ, उद्देश सिद्धीस न गेलेली, लोकापवादाची भीति न बाळगणारी

यामास तमेव वरमङ्गना २ त्वं कत्थसे महाराज सत्यवादी दृढव्रतः । मम चेदं वरं कस्माद्विधारयितुमिच्छसि ३ एवमुक्तस्तु कैकेय्या राजा दशरथस्तदा । प्रत्युवाच ततः क्रुद्धो मुहूर्तं विह्वलन्निव ४ मृते मयि गते रामे वनं मनुजपुंगवे । हन्तानार्ये ममामित्र सकामा सुखिनी भव ५ स्वर्गेऽपि खलु रामस्य कुशलं दैवतैरहम् । प्रत्यादेशादभिहितं धारयिष्ये कथं बत ६ कैकेय्याः प्रियकामेन रामः प्रव्राजितो वनम् । यदि सत्यं ब्रवीम्येतत्तद्सत्यं भविष्यति ७ अपुत्रेण मया पुत्रः श्रमेण महता महान् । रामो लब्धो महातेजाः स कथं त्यज्यते मया ८ शूरश्च कृतविद्यश्च जितक्रोधः क्षमापरः । कथं कमलपत्राक्षो मया रामो विवास्यते ९ कथमिन्दीवरश्यामं दीर्घबाहुं महाबलम् । अभिराममहं रामं स्थापयिष्यामि दण्डकान् १० सुखानामुचितस्यैव दुःखैरनुचितस्य च । दुःखं नामानुपश्येयं कथं रामस्य धीमतः ११ यदि दुःखमकृत्वा तु मम संक्रमणं भवेत् । अदुःखार्हस्य

---

आणि रामापासून भरताला भय होईल असें मनांत आणणारी स्त्री कैकेयी ह्मणाली २ " हे महाराज, सत्यवादी आणि स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणारा ह्मणून तुझी मोठी ख्याति आहे. तस्मात् , माझा हा वर कशाकरितां आपल्याकडे ऋण ठेवण्याची इच्छा करीत आहेस ? " ३. ह्याप्रमाणें कैकेयी बोलली असतां दशरथराजा क्रुद्ध झाला आणि क्षणभर विवळून तिला ह्मणाला ४ " हे दुष्टे, हे शत्रुरूपिणि, मी मरून पुरुषश्रेष्ठ राम वनामध्यें गेला ह्मणजे आपले मनोरथ परिपूर्ण करून घेऊन तूं सुखी हो ५. स्वर्गामध्यें गेल्यावर " राम कुशल आहे नां ? " ह्मणून देवांनीं विचारिल्यावर मी त्यांना काय बरें सांगूं ? " मीं त्याला वनांत पाठविलें " असें जर सांगेन तर " अशा उत्कृष्ट पुत्राला तूं वनांत कसें पाठविलेस " ह्मणून जर ते विचारूं लागले तर तें माझ्यानें एकवणारही नाहीं ६. " कैकेयीचें प्रिय करण्याकरितां रामाला मीं वनवासांत पाठविलें " असें जर मी त्यांना खरें सांगूं लागलों तर तें माझें बोलणें ते असत्यच समजतील ( आणि " विषयवासनेमुळें ह्यानें अशी गोष्ट केली " असेंच ते ह्मणतील) ७. " मी निपुत्रिक असतांना मोठ्या कष्टानें हा महात्मा, महातेजस्वी पुत्र राम मला प्राप्त झाला आहे. त्याचा मी त्याग कसा बरें करूं ? ८. शूर, विद्या झालेला, क्रोध जिंकिलेला आणि क्षमाशील असा जो कमलनयन राम त्याला मीं कसें बरें हांकून लावावें? ९. नील कमलाप्रमाणें ज्याचा वर्ण आहे अशा महाबलाढ्य, आजानुबाहु व मनोहर रामाला मीं दंडकारण्यामध्यें कसें बरें पाठवावें ? १०. मूळपासून सुखामध्येंच वाढलेल्या आणि दुःखाची कधींच संवय नसलेल्या बिचारी रामाचें दुःख मी कसें बरें पाहूं ? ११. दुःखाला

रामस्य ततः सुखमवाप्नुयाम् १२ नृशंसे पापसंकल्पे रामं सत्यपराक्रमम् । किं विप्रियेण कैकेयि प्रियं योजयसे मम १३ अकीर्तिरतुला लोके ध्रुवं परिभविष्यति १४ तथा विलपतस्तस्य परिभ्रमितचेतसः । अस्तमभ्यागमत्सूर्यो रजनी चाभ्यवर्तत १५ सा त्रियामा तदार्तस्य चन्द्रमण्डलमण्डिता । राज्ञो विलपमानस्य न व्यभासत शर्वरी १६ सदैवोष्णं विनिःश्वस्य वृद्धो दशरथो नृपः । विललापार्तवद्दुःखं गगनासक्तलोचनः १७ न प्रभातं त्वयेच्छामि निशे नक्षत्रभूषिते । क्रियतां मे दया भद्रे मयायं रचितोऽञ्जलिः १८ अथवा गम्यतां शीघ्रं नाहमिच्छामि निर्घृणाम् । नृशंसां कैकयीं द्रष्टुं यत्कृते व्यसनं मम १९ एवमुक्त्वा ततो राजा कैकेयीं संयताञ्जलिः । प्रसादयामास पुनः कैकेयीं राजधर्मवित् २० साधुवृत्तस्य दीनस्य त्वद्गतस्य गतायुषः । प्रसादः क्रियतां भद्रे देवि राज्ञो विशेषतः २१ शून्येन खलु सुश्रोणि मयेदं समुदाहृतम् । कुरु साधु प्रसादं मे बाले सहृदया ह्यसि २२

---

अयोग्य अशा रामाबद्दल दुःख न करितां जर माझें परलोकीं गमन होईल तर मला सुख होईल १२. हे दुष्टे, हे पापबुद्धि कैकेयि, माझ्या अमोघपराक्रमी प्रिय रामावर तूं कशाकरितां अप्रिय गोष्ट लादीत आहेस ? १३. असें झालें असतां लोकामध्यें माझी कांहीं पराकाष्ठेची अपकीर्ति होईल व आजपर्यंत मिळविलेल्या कीर्तीवर तुझ्या योगानें पाणी पडेल " १४. ह्याप्रमाणें अंतःकरणाला मोह पडून तो दशरथ विलाप करीत असतां सूर्य अस्तास जाऊन रात्र पडली १५ आणि ती रात्रही जरी चंद्रमंडलानें भूषित होती तरी विलाप करीत असलेल्या त्या राजाला ती सुखदायक झाली नाहीं १६. तेव्हां एकसारिखे सुस्कारे टाकून तो वृद्ध दशरथराजा आकाशाकडे दृष्टि देऊन आर्त मनुष्याप्रमाणें दुःखानें विलाप करूं लागला कीं १७ " हे नक्षत्रभूषित रात्रि, तूं उजाडूं देऊं नकोस. हे कल्याणि, तूं मजवर दया कर. हे मी तुला हात जोडिले आहेत १८. अथवा तूं जा लवकर. जिच्या करितां मला हें दुःख झालें आहे त्या निर्दय व दुष्ट कैकयीचें (फार वेळ पर्यंत) तोंड पहाण्याची मला इच्छा नाहीं " १९. ह्याप्रमाणें विलाप करून त्या दशरथराजानें कैकेयीपुढें हात जोडिले आणि तो राजधर्मज्ञ दशरथ पुनरपि कैकयीची प्रार्थना करूं लागला कीं २०, " हे कल्याणि, मी सद्वर्तनानें वागणारा दशरथ आज दीन होऊन तुझ्या तावडींत सांपडलों आहें व आतां माझ्या आयुष्याचे दिवसही थोडकेच राहिले आहेत. करितां, हे देवि, मी राजा आहे ह्या गोष्टीकडे विशेष लक्ष्य देऊन तूं मजवर कृपा कर २१. हे सुंदरि, सारासार विचार न राहिल्यामुळें मीं तुझ्याशीं हें कठोर भाषण केलें; परंतु, तूं दयालु आहेस; करितां, हे बाले, मजवर

प्रसीद देवि रामो मे त्वद्दत्तं राज्यमव्ययम् । लभतामसितापाङ्गे यशः परमवाप्स्यसि २३ मम रामस्य लोकस्य गुरूणां भरतस्य च । प्रियमेतद्गुरुश्रोणि कुरु चारुमुखेक्षणे २४ विशुद्धभावस्य हि दुष्टभावा दीनस्य ताम्राश्रुकलस्य राज्ञः । श्रुत्वा विचित्रं करुणं विलापं भर्तुर्नृशंसा न चकार वाक्यम् २५ ततः स राजा पुनरेव मूर्छितः प्रियामतुष्टां प्रतिकूलभाषिणीम् । समीक्ष्य पुत्रस्य विवासनं प्रति क्षितौ विसंज्ञो निपपात दुःखितः २६ इतीव राज्ञो व्यथितस्य सा निशा जगाम घोरं श्वसतो मनस्विनः । विबोध्यमानः प्रतिबोधनं तदा निवारयामास स राजसत्तमः २७ [ ६०४ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३॥

पुत्रशोकार्दितं पापा विसंज्ञं पतितं भुवि । विचेष्टमानमुत्प्रेक्ष्य ऐक्ष्वाकमिदमब्रवीत् १ पापं कृत्वेव किमिदं मम संश्रुत्य संश्रवम् । शेषे क्षितितले सन्नः स्थित्यां स्थातुं त्वमर्हसि २ आहुः सत्यं हि परमं धर्मं

---

चांगली कृपा कर २२. हे देवि, मजवर प्रसन्न हो. तूंच रामाला राज्य दे आणि हे कृष्णनयने, त्याला तूं दिलेलें राज्य अक्षय प्राप्त होऊं दे ह्मणजे तुझी ही पराकाष्ठेची कीर्ति होईल २३. हे सुंदरि, हे मनोहरवदने, हे सुंदरनयने, मला, रामाला, लोकांना, वसिष्ठप्रभृति गुरूंना आणि भरतालाही हीच गोष्ट प्रिय आहे" २४. याप्रमाणें रडून रडून ज्याच्या नेत्रांतील अश्रूही आरक्तवर्ण झाले आहेत व जो मनानें शुद्ध आहे अशा त्या भर्त्याचा नानाप्रकारचा दीन विलाप श्रवण करूनही पापबुद्धि दुष्ट कैकयीनें त्याच्या ह्मणण्याप्रमाणें केलें नाहीं २५. तेव्हां तो राजा पुनरपि मूर्छित झाला आणि ( कांहींसा सावध झाल्यावर ) असंतुष्ट आणि विरुद्ध भाषण करणाऱ्या आपल्या प्रिय पत्नीकडे पाहूं लागला. परंतु, इतकें झालें असतांही पुत्राला वनवासांत पाठविण्याविषयीं ती आपला आग्रह सोडीत नाहीं असें अवलोकन केल्यावर तो राजा दुःखित व मूर्छित होऊन पृथ्वीवर पडला २६. ह्याप्रमाणें दुःखाकुल होऊन तो विचारी राजा भयंकर सुस्कारे टाकीत पडला असतांना ती रात्र निघून गेली. तेव्हां मंगलगीतादिकांनीं भाट वगैरे लोक त्याला उठवूं लागले असतां त्या राजश्रेष्ठानें त्यांचा प्रतिबंध केला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ १३॥

पुत्रशोकाकुल झाल्यामुळें मूर्छित होऊन तडफडत असलेल्या इक्ष्वाकुवंशज दशरथराजाला अवलोकन करून दुष्ट कैकेयी ह्मणाली १ " अरे, मला वर देण्याची प्रतिज्ञा करून तूं पाप केल्याप्रमाणें व्याकुल होऊन भूतलावर पडला आहेस हें काय ? सज्जनांच्या सत्यपालनरूप मर्यादेनेंच वागणें तुला योग्य आहे २. धर्मज्ञ लोक

धर्मविदो जनाः । सत्यमाश्रित्य च मया त्वं धर्मं प्रतिचोदितः ३ संश्रुत्य शैब्यः श्येनाय स्वां तनुं जगतीपतिः । प्रदाय पक्षिणे राजा जगाम गतिमुत्तमाम् ४ तथा ह्यलर्कस्तेजस्वी ब्राह्मणे वेदपारगे । याचमाने स्वके नेत्रे उद्धृत्याविमना ददौ ५ सरितां तु पतिः स्वल्पां मर्यादां सत्यमन्वितः । सत्यानुरोधात्समये वेलां स्वां नातिवर्तते ६ सत्यमेकपदं ब्रह्म सत्ये धर्मः प्रतिष्ठितः । सत्यमेवाक्षया वेदाः सत्येनावाप्यते परम् ७ सत्यं समनुवर्तस्व यदि धर्मे धृता मतिः । स वरः सफलो मेऽस्तु वरदो ह्यसि सत्तम ८ धर्मस्यैवाभिकामार्थं मम चैवाभिचोदनात् । प्रव्राजय सुतं रामं त्रिः खलु त्वां ब्रवीम्यहम् ९ समयं च ममार्येमं यदि त्वं न करिष्यसि । अग्रतस्ते परित्यक्ता परित्यक्ष्यामि जीवितम् १० एवं प्रचोदितो राजा कैकेय्या निर्विशङ्कया । नाशकत्पाशमुन्मोक्तुं बलिरिन्द्रकृतं यथा ११ उद्भ्रान्तहृदयश्चापि विवर्णवदनोऽभवत् । स धुर्यो वै परिस्पन्दन्युगचक्रान्तरं यथा १२ विकलाभ्यां च नेत्राभ्यामपश्यन्निव भूमिपः । कृच्छ्राद्धैर्येण

---

सत्यालाच उत्कृष्ट धर्म ह्मणतात आणि मींही सत्यरूप धर्माचेंच अवलंबन करून तुला वरदानाविषयीं मागणें केलें आहे ३. भूपति शैब्यराजा कपोताला अभय देण्याची प्रतिज्ञा केल्यावर आपलें शरीर श्येन पक्ष्याला देऊन उत्कृष्ट गतीला गेला ४. त्याचप्रमाणें तेजस्वी अलर्कराजानें वेदपारंगत ब्राह्मण याचना करूं लागला असतां आपले नेत्र काढून खिन्न न होतां त्याला दिले ५. सत्याचें अवलंबन करून असलेला समुद्र सत्याचा त्याग होईल ह्या भीतीनें चंद्रोदयकालीं वृद्धिंगत होण्याचा समय असतांही मर्यादेचें उल्लंघन यत्किंचितही करीत नाहीं ६. सत्यवचन हेंच प्रणवरूप ब्रह्म होय; सत्यावरच धर्म अवलंबून आहे; अक्षय वेदही सत्याच्याच आश्रयानें आहेत आणि सत्य हेंच ब्रह्मस्वरूपाच्या प्राप्तीचें साधन आहे ७. धर्माकडे जर तुझें चित्त असेल तर सत्याला अनुसरून वाग आणि, हे सज्जनश्रेष्ठ, ज्याअर्थी तूं मला वर दिला आहेस त्याअर्थी तो माझा वर सफल होवो ८. सारांश, धर्माकरितां आणि मी सांगत आहें ह्मणून तूं आपल्या राम पुत्राला वनामध्यें पाठीव; हें मी तुला तीन वेळ सांगत आहें ९. हे आर्य, माझी ही अट जर तूं शेवटास न नेशील तर तूं माझी उपेक्षा केलीस ह्मणून तुझ्यासमोर मी जीव देईन" १०. ह्याप्रमाणें निःशंकपणानें कैकयीनें राजाला सांगितलें असतां इंद्रानें टाकिलेला पाश ज्याप्रमाणें बलीला सोडितां आला नाहीं त्याप्रमाणें सत्यरूपपाशाच्या बंधनापासून दशरथराजा मुक्त होण्यास समर्थ झाला नाहीं ११. इतकेंच नव्हे परंतु, जूं आणि चाक ह्यांमध्यें सांपडून तडफड करीत असलेल्या बैला-

संस्तभ्य कैकेयीमिदमब्रवीत् १३ यस्ते मन्त्रकृतः पाणिरग्नौ पापे मया धृतः । संत्यजामि स्वजं चैव तव पुत्रं सह त्वया १४ प्रयाता रजनी देवि सूर्यस्योदयनं प्रति । अभिषेकाय हि जनस्त्वरयिष्यति मां ध्रुवम् १५ रामाभिषेकसंभारैस्तदर्थमुपकल्पितैः । रामः कारयितव्यो मे मृतस्य सलिलक्रियाम् १६ सपुत्रया त्वया नैव कर्तव्या सलिलक्रिया । व्याहन्तास्यशुभाचारे यदि रामाभिषेचनम् १७ न शक्तोऽद्यास्म्यहं द्रष्टुं दृष्ट्वा पूर्वं तथा मुखम् । हतहर्षं तथानन्दं पुनर्जनमवाङ्मुखम् १८ तां तथा ब्रुवतस्तस्य भूमिपस्य महात्मनः । प्रभाता शर्वरी पुण्या चन्द्रनक्षत्रमालिनी १९ ततः पापसमाचारा कैकेयी पार्थिवं पुनः । उवाच परुषं वाक्यं वाक्यज्ञा रोषमूर्छिता २० किमिदं भाषसे राजन्वाक्यं गररुजोपमम् । आनाययितुमक्लिष्टं पुत्रं राममिहार्हसि २१ स्थाप्य राज्ये मम सुतं कृत्वा रामं वन-

---

प्रमाणें तो मनामध्यें गोंधळून जाऊन त्याचें मुख निस्तेज झालें १२ आणि अश्रूंनीं नेत्र व्याकुल झाल्यामुळें दृष्टि अंधक झालेला तो भूपति धैर्यानें दुःख आंवरून धरून मोठ्या कष्टानें कैकेयीला ह्मणाला १३ " हे पापिणि, अग्निसंनिध मीं जें तुझें समंत्रक पाणिग्रहण केलें आहे तें मी सोडितों आणि माझ्यापासून झालेला माझा पुत्रही तुझ्यासहवर्तमान मी टाकून देतों १४. हे देवि, रात्र निघून गेली. आतां सूर्योदयाच्या वेळेला अभिषेकाकरितां जुळविलेल्या सामग्रीनें रामाला अभिषेक करण्याकरितां लोक मला निःसंशय घाई करितील. ह्यास्तव, रामाच्या अभिषेकाकरितां जुळविलेल्या वस्तूंनीं मला रामाला अभिषेक करविला पाहिजे. " आतां गुरूचाही अवमान करून जर तुला रामाचा अभिषेक हाणून पाडावयाचा असेल तर, हे दुराचारिणि, त्या अभिषेकसामग्रीनें मज मृताचें उत्तरकार्यच रामाकडून मला करविलें पाहिजे. तूं आपल्या पुत्रासहवर्तमान माझें उत्तरकार्य करितां उपयोगीच नाहीं १५,१६,१७. रामाला अभिषेक होणार हें समजल्याबरोबर लोकांचीं मुखकमलें प्रफुल्लित झालेलीं मीं अवलोकन केलेलीं आहेत. कारितां, रामाभिषेक हाणून पाडिला ह्मणून आतां हर्षरहित व आनंदरहित होऊन लोकांनीं आपलीं तोंडें खालीं घातलेलीं आज माझ्यानें पाहावणार नाहींत " १८. ह्याप्रमाणें तो महात्मा दशरथ भूपति त्या कैकेयीशीं बोलत आहे तोंच चंद्र व नक्षत्रसमुदाय ह्यांनीं युक्त असलेली ती पुण्यकारक रात्र उजाडली १९. तेव्हां पापबुद्धीनें वागणारी आणि संभाषण करण्यामध्यें निपुण असलेली ती कैकेयी क्रोधानें अगदीं व्याप्त होऊन कठोर शब्दांनीं राजाला ह्मणाली २० " हे राजा, विषजन्य दुःखाप्रमाणें दुःख देणारें हें तूं काय बोलत आहेस ? आपल्या रामपुत्राला अभिषेका-

चरम् । निःसपत्नां च मां कृत्वा कृतकृत्यो भविष्यसि २२ स तुन्न इव तीक्ष्णेन प्रतोदेन हयोत्तमः । राजा प्रचोदितोभीक्ष्णं कैकेय्या वाक्यमब्रवीत् २३ धर्मबन्धेन बद्धोस्मि नष्टा च मम चेतना । ज्येष्ठं पुत्रं प्रियं रामं द्रष्टुमिच्छामि धार्मिकम् २४ ततः प्रभातां रजनीमुदिते च दिवाकरे । पुण्ये नक्षत्रयोगे च मुहूर्ते च समागते २५ वसिष्ठो गुणसंपन्नः शिष्यैः परिवृतस्तथा । उपगृह्याशु संभारान्प्रविवेश पुरोत्तमम् २६ सिक्तसंमार्जितपथां पताकोत्तमभूषिताम् । संहृष्टमनुजोपेतां समृद्धविपणापणाम् २७ महोत्सवसमायुक्तां राघवार्थे समुत्सुकाम् । चन्दनागुरुधूपैश्च सर्वतः परिधूपिताम् २८ तां पुरीं समतिक्रम्य पुरन्दरपुरोपमाम् । ददर्शान्तःपुरं श्रीमान्नानाध्वजगणायुतम् २९ पौरजानपदाकीर्णं ब्राह्मणैरुपशोभितम् । यष्टिमद्भिः सुसंपूर्णं सदश्वैः परमार्चितैः ३० तदन्तःपुरमासाद्य व्यतिचक्राम तं जनम् । वसिष्ठः परमप्रीतः परमर्षिभिरावृतः ३१ स त्वप-

---

करितां तुला खुशाल येथें आणविणें योग्य आहे काय? २१. माझ्या पुत्राला राज्यावर बसवून आणि रामाला वनवासांत पाठवून मला शत्रुरहित केलेंस ह्मणजे तूं कृतकृत्य होशील " २२. दुःसह चाबूक मारिला असतां उत्कृष्ट अश्व ज्याप्रमाणें स्वाराच्या अधीन होतो त्याप्रमाणें कैकयीनें भाषणानें वश करून घेतलेला राजा ह्मणाला २३ " धर्मबंधनानें मी बद्ध झालों असल्यामुळें मला आतां कांहीं सुचत नाहीं. प्रिय आणि धार्मिक अशा ज्येष्ठ पुत्र रामाला पहाण्याची माझी इच्छा आहे " २४. तदनंतर रात्र उजाडलेली पाहून सूर्योदय झाल्यावर शुभनक्षत्रीं सुमुहूर्त प्राप्त झाला असतां २५ शिष्यांनीं परिवेष्टित असे गुणसंपन्न वसिष्ठमुनि अभिषेकाचें साहित्य घेऊन त्या उत्कृष्ट नगरामध्यें सत्वर प्रविष्ट झाले २६. त्या नगरींतील रस्ते शिंपून व झाडून काढिलेले होते; उत्तम उत्तम पताकांनीं त्या नगरीला शोभा आणिलेली होती; आंतील लोक हर्षयुक्त झालेले होते; बाजारांतून विक्रीचे पदार्थ पुष्कळ मांडून ठेविलेले होते २७; जिकडे तिकडे महोत्सव चाललेला होता; रामाकरितां आंतील लोक उत्सुक झालेले होते आणि चंदन व अगरु ह्यांचे चोहोंकडे धूप घातलेले होते २८. अशा त्या इंद्रनगरीसमान असलेल्या नगरींत गेल्यावर श्रीमान् वसिष्ठमुनींनीं अंतःपुर अवलोकन केलें. त्या अंतःपुरामध्यें नानाप्रकारचे ध्वजसमुदाय होते २९; नगरींतील आणि देशांतील लोकांनीं तें गजबजून गेलेलें होतें; दंडधारी ब्राह्मणांच्या योगानें त्याला शोभा आलेली होती आणि उत्तमप्रकारें शृंगारिलेल्या उत्कृष्ट अश्वांनीं तें भरलेलें होतें ३०. अशा प्रकारच्या अंतःपुराशीं गेल्यावर महर्षींनीं परिवेष्टित अस-

श्यद्विनिष्क्रान्तं सुमन्त्रं नाम सारथिम्। द्वारे मनुजसिंहस्य सचिवं प्रियदर्शनम् ३२ तमुवाच महातेजाः सूतपुत्रं विशारदम्। वसिष्ठः क्षिप्रमाचक्ष्व नृपतेर्मामिहागतम् ३३ इमे गङ्गोदकघटाः सागरेभ्यश्च काञ्चनाः। औदुम्बरं भद्रपीठमभिषेकार्थमाहृतम् ३४ सर्वबीजानि गन्धाश्च रत्नानि विविधानि च। क्षौद्रं दधि घृतं लाजा दर्भाः सुमनसः पयः ३५ अष्टौ च कन्या रुचिरा मत्तश्च वरवारणः। चतुरश्वो रथः श्रीमान्निस्त्रिंशो धनुरुत्तमम् ३६ वाहनं नरसंयुक्तं छत्रं च शशिसंनिभम्। श्वेते च वालव्यजने भृङ्गारं च हिरण्मयम् ३७ हेमदामपिनद्धश्च ककुद्मान्पाण्डुरो वृषः। केसरी च चतुर्दंष्ट्रो हरिश्रेष्ठो महाबलः ३८ सिंहासनं व्याघ्रतनुः समिधश्च हुताशनः। सर्वे वादित्रसंघाश्च वेश्याश्चालंकृताः स्त्रियः ३९ आचार्या ब्राह्मणा गावः पुण्याश्च मृगपक्षिणः। पौरजानपदश्रेष्ठा नैगमाश्च गणैः सह ४० एते चान्ये च बहवः प्रीयमाणाः प्रियंवदाः। अभिषेकाय रामस्य सह तिष्ठन्ति पार्थिवैः ४१ त्वरयस्व महाराजं यथा समुदितेऽहनि। पुष्ये

---

लेले वसिष्ठमुनि अत्यंत प्रसन्न होऊन तेथील लोकांच्या अगावरून जाऊं लागले असतां ३१ ज्याचें दर्शन आल्हादकारक आहे अशा अंतःपुरांतून बाहेर येत असलेला पुरुषश्रेष्ठ दशरथराजाचा सुमंत्रनामक सारथि व मंत्री त्यांनीं अवलोकन केला ३२ आणि ते महातेजस्वी वसिष्ठमुनि त्या व्यवहारज्ञ सारथ्याला ह्मणाले " मी येथें आलों आहें हें तूं राजाला सत्वर निवेदन कर ३३. अभिषेकाकरितां हे गंगाजलाचे घट आणिलेले आहेत, समुद्रांपासूनही सुवर्ण घट त्यांच्या उदकानें भरून आणिलेले आहेत आणि अभिषेकाकरितां उंबराचें हें भद्रपीठही आणिलेलें आहे ३४. सर्वप्रकारचीं बीजें, गंध, नानाप्रकारचीं रत्नें, मध, दधि, घृत, लाह्या, दर्भ, पुष्पें, पय ३५, सुंदर अशा आठ कुमारिका, मदमत्त असा उत्कृष्ट गज, चार अश्व जोडिलेला वैभवशाली रथ, खड्ग, उत्कृष्ट धनुष्य ३६, भोयांसहवर्तमान पालखी, चंद्रासारिखें निर्मल छत्र, शुभ्रवर्ण चामरें, सुवर्णाची झारी ३७, सोन्याच्या साखळदंडानें बांधिलेला आणि वशिंड असलेला श्वेतवर्ण बैल, विपुल केस आणि चार दाढा ह्यांनीं युक्त असलेला महाबलाढ्य व श्रेष्ठ अश्व ३८, सिंहासन, व्याघ्रचर्म, समिधा, अग्नि, सर्व प्रकारचे वाद्यसमुदाय, वेश्या, अलंकार धारण केलेल्या स्त्रिया ३९, आचार्य, ब्राह्मण, गाई, पवित्र पशुपक्षी, नगरांतील व देशांतील श्रेष्ठ श्रेष्ठ लोक आणि आपआपल्या गणांसहवर्त- उदमी लोक ४० हे व इतरही पुष्कळ प्रिय भाषण करणारे व प्रसन्न मुद्रेनें युक्त असलेले लोक राजांसहवर्तमान रामाच्या अभिषेकाकरितां वाट पहात आहेत ४१. ह्यास्तव,

नक्षत्रयोगे च रामो राज्यमवाप्नुयात् ४२ इति तस्य वचः श्रुत्वा सूतपुत्रो महाबलः । स्तुवन्नृपतिशार्दूलं प्रविवेश निवेशनम् ४३ तं तु पूर्वोदितं वृद्धं द्वारस्था राजसंमताः । न शेकुरभिसंरोद्धुं राज्ञः प्रियचिकीर्षवः ४४ स समीपस्थितो राज्ञस्तामवस्थामजज्ञिवान् । वाग्भिः परमतुष्टाभिरभिष्टोतुं प्रचक्रमे ४५ ततः सूतो यथापूर्वं पार्थिवस्य निवेशने । सुमन्त्रः प्राञ्जलिर्भूत्वा तुष्टाव जगतीपतिम् ४६ यथानन्दति तेजस्वी सागरो भास्करोदये । प्रीतः प्रीतेन मनसा तथा नन्दय नस्ततः ४७ इन्द्रमस्यां तु वेलायामभितुष्टाव मातलिः । सोजयद्दानवान्सर्वांस्तथा त्वां बोधयाम्यहम् ४८ वेदाः सहाङ्गा विद्याश्च यथा ह्यात्मभुवं प्रभुम् । ब्रह्माणं बोधयन्त्यद्य तथा त्वां बोधयाम्यहम् ४९ आदित्यः सह चन्द्रेण यथा भूतधरां शुभाम् । बोधयत्यद्य पृथिवीं तथा त्वां बोधयाम्यहम् ५० उत्तिष्ठ सुमहाराज

गुणसंपन्न अशा ह्या दिवशीं व पुष्य नक्षत्राच्या योगावर रामाला राज्याभिषेक होईल अशा रीतीनें तूं महाराज दशरथाकडून त्वरा करीव" ४२. हें त्या वसिष्ठमुनींचें भाषण श्रवण केल्यावर तो महाबलाढ्य सारथि नृपश्रेष्ठ दशरथाची स्तुति करीत करीत तो असलेल्या स्थानामध्यें गेला ४३. तेव्हां " ह्याला कधींही कोणीं आडकाठी करूं नये " असें राजानें पूर्वींच सांगून ठेविलें असल्यामुळें राजाचें प्रिय करण्याची इच्छा करणारे व राजाला संमत असलेले द्वारपाल त्याला आडकाठी करण्यास समर्थ झाले नाहींत ४४. आंत प्रविष्ट झाल्यावर तो सुमंत्र राजाचें समीप उभा राहिला; परंतु, कैकयीनें करून टाकिलेली ती राजाची अवस्था समजण्यांत न आल्यामुळें अत्यंत स्तुतिपरिपूर्ण शब्दांनीं तो त्याची प्रशंसा करूं लागला ४५. सारांश, राजा जेथें बसला होता त्या स्थानामध्यें गेलेला तो सारथि सुमंत्र हात जोडून पूर्वीप्रमाणें पृथ्वीपति दशरथाची स्तुति करूं लागला ४६. ( तो ह्मणाला ) सूर्योदय झाला असतां त्याच्या तेजानें युक्त झालेला समुद्र ज्याप्रमाणें स्नानास आलेल्या पुरुषांना आनंदित करितो त्याप्रमाणें आपण स्वतः संतुष्ट होऊन प्रसन्न अंतःकरणानें आह्मांला आनंदित करा ४७. ह्या सूर्योदयाचे वेळीं मातलीनें इंद्राची स्तुति केली असतां त्या इंद्रानें सर्व दानवांचा पराभव केला. तस्मात् ज्याप्रमाणें मातलि इंद्राला उठवितो त्याप्रमाणें मी तुला उठवीत आहें ४८. सांग, वेद व मीमांसा ज्याप्रमाणें स्वयंभु प्रभु ब्रह्मदेवाला सृष्टि करण्याविषयीं जागृत करितात त्याप्रमाणें मी तुला जागृत करितों ४९. आदित्य व चंद्र भूतधरा पृथ्वी ( अर्थात् पृथ्वीवरच्या सर्व लोकां )ला जागृत करितात त्याप्रमाणें मी तुला जागृत करितों ५०. हे महाराज, अभिषेकोत्सवसंबंधीं मंगल कृत्य करून

कृतकौतुकमङ्गलः । विराजमानो वपुषा मेरोरिव दिवाकरः ५१ उदतिष्ठत रामस्य समग्रमभिषेचनम् । पौरजानपदाश्चापि नैगमश्च कृताञ्जलिः ५२ अयं वसिष्ठो भगवान्ब्राह्मणैः सह तिष्ठति । क्षिप्रमाज्ञाप्यतां राजन्राघवस्याभिषेचनम् ५३ यथा ह्यपालाः पशवो यथा सेना ह्यनायका । यथा चन्द्रं विना रात्रिर्यथा गावो विना वृषम् ५४ एवं हि भविता राष्ट्रं यत्र राजा न दृश्यते । एवं तस्य वचः श्रुत्वा सान्त्वपूर्वमिवार्थवत् ५५ अभ्यकीर्यत शोकेन भूय एव महीपतिः । ततस्तु राजा तं सूतं सन्नहर्षः सुतं प्रति ५६ शोकरक्तेक्षणः श्रीमानुद्वीक्ष्योवाच धार्मिकः । वाक्यैस्तु खलु मर्माणि मम भूयो निकृन्तसि ५७ सुमन्त्रः करुणं श्रुत्वा दृष्ट्वा दीनं च पार्थिवम् । प्रगृहीताञ्जलिः किंचित्तस्माद्देशादपाक्रमत् ५८ यदा वक्तुं स्वयं दैन्यान्न शशाक महीपतिः । तदा सुमन्त्रं मन्त्रज्ञा कैकेयी प्रत्युवाच ह ५९ सुमन्त्र राजा रजनीं रामहर्षसमुत्सुकः । प्रजागरपरिश्रान्तो निद्रावशमुपागतः ६० तद्गच्छ त्वरितं सूत राजपुत्रं यशस्विनम् । राममानय

---

नानाप्रकारचीं वस्त्रें परिधान करा व मेरुपर्वतावर उदय पावलेल्या सूर्याप्रमाणें लोकांना आनंदित करा ५१. रामचंद्राच्या अभिषेकाचें सर्व साहित्य तयार आहे व त्याकरितां पुरांतले व देशांतले लोक आणि शेट सावकारही हात जोडून उभे आहेत ५२. हे भगवान् वसिष्ठमुनि ब्राह्मणांसहवर्तमान येऊन उभे राहिले आहेत. हे राजन्, रामास अभिषेक करण्याविषयीं सत्वर अनुज्ञा व्हावी ५३. ज्याप्रमाणें रक्षकावांचून पशु, सेनाधिपतीवांचून सेना, चंद्रावांचून रात्रि व वृषभावांचून गाई शोभत नाहींत ५४ त्याप्रमाणें राजावांचून राज्य शोभत नाहीं. ( करितां आपण उठावें ) ह्याप्रमाणें सुमंत्राचें सांत्वनपूर्वक आणि आश्चर्ययुक्त असें भाषण ऐकून ५५ राजा पुनरपि शोकानें व्याप्त झाला. नंतर पुत्रनिमित्त ज्याचा उत्साह गेला आहे व शोकानें ज्याचे नेत्र आरक्तवर्ण झाले आहेत असा तो धार्मिक राजा त्या सुमंत्राला ह्मणाला " हे सुमंत्रा, तूं आपल्या भाषणानें पुनरपि माझें मर्मोद्घाटन कां करीत आहेस ? " ५६, ५७. हें दीन झालेल्या राजाचें हृदयाला द्रव येण्यासारिखें भाषण श्रवण केल्यावर सुमंत्रानें हात जोडिले व तो तेथून बाजूला सरला ५८. तदनंतर राजाचे मुखांतून स्वप्रतिज्ञापालनरूप संकटानें कांहींच शब्द निघत नाहीं असें पाहून कैकेयी आपणहोऊन बोलूं लागली ५९. ( ती ह्मणाली ) हे सुमंत्रा, रामाभिषेकरूप उत्साहानें राजाचा रात्रभर डोळा लागला नाहीं व त्यामुळें हल्लीं तो निद्रावश झाला आहे ६०. करितां, हे सुमंत्रा, तुझें कल्याण असो. तूं यशस्वी राजपुत्र रामचंद्राला कांहीं विचार न करितां

भद्रं ते नात्र कार्या विचारिणा ६१ अश्रुत्वा राजवचनं कथं गच्छामि भामिनि । तच्छ्रुत्वा मन्त्रिणो वाक्यं राजा मन्त्रिणमब्रवीत् ६२ सुमन्त्र रामं द्रक्ष्यामि शीघ्रमानय सुन्दरम् । स मन्यमानः कल्याणं हृदयेन ननन्द च ६३ निर्जगाम च स प्रीत्या त्वरितो राजशासनात् । सुमन्त्रश्चिन्तयामास त्वरितं चोदितस्तया ६४ व्यक्तरामाभिषेकार्थे इहायस्यति धर्मराट् । इति सूतो मतिं कृत्वा हर्षेण महता पुनः ६५ निर्जगाम महातेजा राघवस्य दिदृक्षया । सागरह्रदसंकाशात्सुमन्त्रोन्तःपुराच्छुभात् ६६ ततः पुरस्तात्सहसा विनिःसृतो महीपतेर्द्वारगतान्विलोकयन् । ददर्श पौरान्विविधान्महाधनानुपस्थितान्द्वारमुपेत्य विष्टितान् ६७ [६७१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

ते तु तां रजनीमुष्य ब्राह्मणा वेदपारगाः । उपतस्थुरुपस्थानं सह राजपुरोहिताः १ अमात्या बलमुख्याश्च मुख्या ये निगमस्य च । राघव-

---

सत्वर घेऊन ये ६१. हे ऐकून सुमंत्र ह्मणाला " हे कैकेयि, राजाज्ञा झाल्यावांचून रामचंद्राला आणण्याकरितां मी कसा बरं जाऊं ? " ह्याप्रमाणें सुमंत्राचें वचन श्रवण करितांक्षणीं दशरथराजा मंत्र्याला ह्मणाला ६२. " हे सुमंत्रा, मी सुंदर अशा रामाला अवलोकन करण्याची इच्छा करितों. ह्यास्तव, त्यास तूं सत्वर घेऊन ये. असें राजानें सांगितलें असतां राजा कदाचित् ( रामदर्शनानें संतुष्ट होऊन ) रामाला राज्याभिषेक करील असें वाटून सुमंत्र मनामध्यें आनंदित झाला ६३ व तो राजाच्या आज्ञेवरून मोठ्या प्रेमानें निघाला असतां कैकेयी त्यास ह्मणाली " हे सुमंत्रा, रामाला लवकर घेऊन ये " ६४ ह्याप्रमाणें पुनरपि कैकेयीचें भाषण श्रवण केल्यावर सुमंत्र मनामध्यें विचार करूं लागला कीं, कैकेयीची ही त्वरा रामाला अभिषेक करण्याकरितांच असावी काय? हा धर्मरक्षण करणारा दशरथराजा अगदीं थकल्यासारिखा दिसत आहे. यांचें बाहेर येण्याचें मान दिसत नाहीं ६५. असा विचार करून तो महातेजस्वी सुमंत्र रामचंद्राला पहाण्याकरितां समुद्राच्या डोहाप्रमाणें शोभणाऱ्या अंतःपुरांतून बाहेर पडला ६६. तदनंतर पृथ्वीपति दशरथराजाच्या अंतःपुरांतून बाहेर पडतांच देवडीवर प्राप्त झालेले पौर व मोठमोठाले श्रीमान् लोक सुमंत्रानें अवलोकन केले ६७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चवदावा सर्ग समाप्त झाला ॥ १४ ॥

राजाच्या पूर्वीच्या आज्ञेवरून उपाध्यायांसह ते वेदपारंगत ब्राह्मण ती रात्र गेल्यानंतर प्रातःकालीं राजद्वारांत आले १. प्रधान लोक, सेनाधिपति लोक आणि व्यापाऱ्यां-

स्याभिषेकार्थे प्रीयमाणाः सुसंगताः २ उदिते विमले सूर्ये पुष्ये चाभ्यागतेहनि । लग्ने कर्कटके प्राप्ते जन्म रामस्य च स्थिते ३ अभिषेकाय रामस्य द्विजेन्द्रैरुपकल्पितम् । काञ्चना जलकुंभाश्च भद्रपीठं स्वलंकृतम् ४ रथश्च सम्यगास्तीर्णो भास्वता व्याघ्रचर्मणा । गंगायमुनयोः पुण्यात्संगमादाहृतं जलम् ५ याश्चान्याः सरितः पुण्या ह्रदाः कूपाः सरांसि च। प्राग्वाहाश्चोर्ध्ववाहाश्च तिर्यग्वाहाश्च क्षीरिणः ६ ताभ्यश्चैवाहृतं तोयं समुद्रेभ्यश्च सर्वशः । क्षौद्रं दधि घृतं लाजा दर्भाः सुमनसः पयः ७ अष्टौ च कन्या रुचिरा मत्तश्च वरवारणः । सजलाः क्षीरिभिश्छन्ना घटाः काञ्चनराजताः ८ पद्मोत्पलयुता भान्ति पूर्णाः परमवारिणा । चन्द्रांशुविकचप्रख्यं पाण्डुरं रत्नभूषितम् ९ सज्जं तिष्ठति रामस्य वालव्यजनमुत्तमम् । चन्द्रमण्डलसंकाशमातपत्रं च पाण्डुरम् १० सज्जं द्युतिकरं श्रीमदभिषेकपुरःसरम् । पाण्डुरश्च वृषः सज्जः पाण्डुराश्वश्च संस्थितः ११ वादित्राणि च सर्वाणि बंदिनश्च तथा परे । इक्ष्वाकूणां यथा राज्ये सम्भ्रियेताभिषे-

---

तील मुख्य लोक रामाच्या अभिषेकाकरितां प्रेमानें जुळले २. स्पष्ट सूर्याचा उदय झाला असतां, त्यावेळेस पुष्य नक्षत्र असतां आणि रामाच्या जन्मकालीं असणाऱ्या कर्क लग्नाला लवकरच प्रारंभ होणार असतां ३ ब्राह्मणांनीं रामाच्या अभिषेकाकरितां सर्व तयारी केली ती अशीः— सुवर्णाचे कुंभ जलानें भरून ठेविले, सिंहासन आलंकृत केलें ४, रथावर सुशोभित व्याघ्रचर्म घातलें, पुण्यकारक अशा गंगायमुनेच्या संगमांतून उदक आणून ठेविलें ५ व पूर्वेकडे वहाणाऱ्या, पर्वत वगैरे आड आल्यामुळें ऊर्ध्व व वाकडच्या वहाणाऱ्या, पुष्कळ पाण्यानें भरून चाललेल्या अशा ज्या नद्या ६ आहेत त्या नद्यांपासून आणि सर्व समुद्रांपासून उदक आणून ठेविलें. मध, दही, तूप, लाह्या, दर्भ, फुलें आणि दूध हेही पदार्थ आणून ठेविले ७. आठ रूपवती कन्या व मदोन्मत्त असा हत्ती आणून ठेविला. उदकानें भरलेले व ज्या वृक्षांना चीक येतो त्या वृक्षाच्या पल्लवानें आच्छादिलेले असे सोन्याचे आणि रुप्याचे घट ८ आणि सूर्यविकासी व चंद्रविकासी कमलानें युक्त, निर्मल उदकानें भरलेले व शोभायमान असे घट ठेविले, चंद्राच्या किरणांप्रमाणें शुभ्र व रत्नानें अलंकृत केलेली ९ अशी उत्तम चौरी रामाला वारा घालण्याकरितां तयार करून ठेविली आणि चंद्रबिंबासारिखें शोभणारें पांढरें असें छत्रही ठेविलें १०. ह्याप्रमाणें रामाला अभिषेक करण्याच्या उपयोगी पडणारें मुख्य मुख्य साहित्य तयार केलें. शिवाय, पांढरा बैल आणि पांढरा घोडाही तयार करून ठेविला ११, सर्व प्रकारचीं वाद्यें तयार ठेविलीं आणि भाट उभे केले. ज्याप्रमाणें इक्ष्वाकुकुलोत्पन्न

चनम् १२ तथा जातीयमादाय राजपुत्राभिषेचनम् । ते राजवचनात्तत्र समवेता महीपतिम् १३ अपश्यन्तोब्रुवन्को नु राज्ञो नः प्रतिवेदयेत् । न पश्यामश्च राजानमुदितश्च दिवाकरः १४ यौवराज्याभिषेकश्च सज्जो रामस्य धीमतः । इति तेषु ब्रुवाणेषु सर्वांस्तांश्च महीपतीन् १५ अब्रवीत्तानिदं वाक्यं सुमन्त्रो राजसत्कृतः । रामं राज्ञोनियोगेन त्वरया प्रस्थितो ह्यहम् १६ पूज्या राज्ञो भवंतश्च रामस्य तु विशेषतः । अयं पृच्छामि वचनात्सुखमायुष्मतामहम् १७ राज्ञः संप्रतिबुद्धस्य चानागमनकारणम् । इत्युक्त्वान्तः पुरद्वारमाजगाम पुराणवित् १८ सदा सक्तं च तद्वेश्म सुमन्त्रः प्रविवेश ह । तुष्टावास्य तदा वंशं प्रविश्य स विशाम्पतेः १९ शयनीयं नरेन्द्रस्य तदासाद्य व्यतिष्ठत । सोत्यासाद्य तु तद्वेश्म तिरस्करणिमन्तरा २० आशीर्भिर्गुणयुक्ताभिरभितुष्टाव राघवम् । सोमसूर्यौ च काकुत्स्थ शिववैश्रवणावपि २१ वरुणश्चाग्निरिन्द्रश्च विजयं प्रदिशन्तु ते । गता भगवती रात्रिरहः शिवमुप-

---

पुरुषांना राज्याभिषेक करितेवेळीं जसें साहित्य पाहिजे १२ त्याप्रमाणें तसें रामाला अभिषेक करण्याकरितां सर्व साहित्य तयार केलें. राजाच्या आज्ञेवरून जुळलेले सर्व लोक त्या ठिकाणीं राजा १३ न दिसल्यामुळें आपआपसांत बोलूं लागले. कीं, " आह्मी येथें आलों आहोंत असें राजाला कोण कळवील ? राजा तर येथें दिसत नाहीं; सूर्याचा उदय झाला १४. बुद्धिमान् अशा रामाला यौवराज्याभिषेक करण्याची सर्व तयारी सिद्ध आहे." असें ते लोक बोलत असतां राजानें सत्कार केलेला सुमंत्र, तेथें जुळलेल्या सर्व राजांना असें बोलला कीं, " राजाच्या आज्ञेवरून हा मी त्वरेनें रामाला आणण्याकरितां निघालों १५,१६. तुह्मीं दशरथराजाला पूज्य आहांत त्याहींपेक्षां रामाला जास्त पूज्य आहांत. ह्याकरितां आपल्या आज्ञेवरून राजाला " आपल्याला सुखानें निद्रा लागली होती नां ? असें राजे ( व ब्राह्मण वगैरे ) विचारीत आहेत " अशी विज्ञापना करितों. जागा असून बाहेर न येण्याचें कारण काय ? असें ( राजे वगैरे लोक ) विचारीत आहेत अशी राजाला विज्ञापना करितों." असें बोलून अनुभवशील असा सुमंत्र अंतःपुराच्या दरवाज्यांत जाण्याकरितां निघाला १७, १८ व ज्या अंतःपुरांत जाण्याकरितां त्याला कधींही परवानगी लागत नसे त्या अंतःपुरांत तो गेला. त्यानें तेथें गेल्यावर राजाच्या वंशाची स्तुति केली १९ व तेथें राजाच्या शय्यागारांत पडद्याच्या आड अगदीं जवळ उभा राहिला २०. नंतर ज्यांत गुणवर्णन आहे अशी राजाची आशीर्वादपूर्वक स्तुति करूं लागला. हे ककुत्स्थकुलोत्पन्न राजा, चंद्र आणि सूर्य, शंकर आणि कुबेर २१, वरुण, अग्नि आणि इंद्र हे तुला विजय देवोत. ऐश्वर्यानें शोभणारी अशी

स्थितम् २२ बुद्ध्यस्व राजशार्दूल कुरु कार्यमनन्तरम् । ब्राह्मणा बलमुख्याश्च नैगमाश्चागतास्त्विह २३ दर्शनं ते भिकाङ्क्षन्ते प्रतिबुद्ध्यस्व राघव । स्तुवन्तं तं तदा सूतं सुमन्त्रं मन्त्रकोविदम् २४ प्रतिबुद्ध्य ततो राजा इदं वचनमब्रवीत् । राममानय सूतेति यदस्यभिहितो मया २५ किमिदं कारणं येन ममाज्ञा प्रतिवाह्यते । न चैव संप्रसुप्तोहमानयेहाशु राघवम् २६ इति राजा दशरथः सूतं तत्रान्वशात्पुनः । स राजवचनं श्रुत्वा शिरसा प्रतिपूज्य तम् २७ निर्जगाम नृपावासान्मन्यमानः प्रियं महत् । प्रपन्नो राजमार्गं च पताकाध्वजशोभितम् २८ हृष्टः प्रमुदितः सूतो जगामाशु विलोकयन् । स सूतस्तत्र शुश्राव रामाभिकरणाः कथाः २९ अभिषेचनसंयुक्ताः सर्वलोकस्य त्दृष्टवत् । ततो ददर्श रुचिरं कैलाससदृशप्रभम् ३० रामवेश्म सुमन्त्रस्तु शक्रवेश्मसमप्रभम् । महाक-

---

रात्र संपली व शुभकारक दिवसालाही आरंभ झाला २२. तरी, हे राजश्रेष्ठा, जागा हो व कर्तव्यकर्म करण्यास आरभ कर. ब्राह्मण, सेनाधिपति आणि पौरजन हे सर्व येथें आले आहेत २३ व, हे राघवा, ते तुला भेटण्याची इच्छा करित आहेत. तरी तूं जागा हो. हें बोलणें ऐकतांक्षणीं राजा, सुमंत्र जरी पडद्याच्या आड होता तरी त्याच्या शब्दावरून त्यास ओळखून स्तुति करणाऱ्या आणि मसलतीमध्यें निपुण असलेल्या सुमंत्र सारथ्याला, असें बोलला कीं, " हे सुमंत्रा, मीं तुला पूर्वी रामाला आणण्याविषयीं सांगितलें असतां पुन्हां माघारा येण्याचें कारण काय ? २४,२५ माझी आज्ञा उल्लंघन कां करितोस. ज्या वेळेस मीं तुला सांगितलें त्या वेळेला मी झोंपेंत नव्हतों. असो. आतां लवकर रामाला इकडे घेऊन ये " २६. ह्याप्रमाणें दशरथराजानें रामाला आणण्याविषयीं पुन्हां सूताला आज्ञा केली असतां त्या सुमंत्रानें राजाचें बोलणें ऐकून राजाला साष्टांग नमस्कार केला २७ आणि हें आपणाला अत्यंत प्रिय तेंच काम मिळालें आहे असें मानून राजाच्या गृहांतून बाहेर निघाला व ज्या ठिकाणीं पताका उभारिल्या आहेत अशा राजमार्गावर प्राप्त झाला २८ नंतर सर्वांगावर रोमांच उभारिलेले आहेत असा आनंदित झालेला सुमंत्र मार्गांतील शोभा पहात पहात लवकर चालला असतां त्या ठिकाणीं त्या आनंदित झालेल्या सुमंत्रानें सर्व लोकांच्या रामाच्या अभिषेकसंबंधीं चाललेल्या कथा ऐकल्या. पुढें सुमंत्र सुंदर कैलासपर्वताप्रमाणें व इंद्रग्रहाप्रमाणें शोभणारें, ज्यास मोठमोठालीं कपाटें आहेत, ज्या ठिकाणीं शेंकडों ओटे आहेत, ज्याच्यापुढें सुवर्णाच्या प्रतिमा मांडिलेल्या आहेत, ज्याच्या दरवाज्याच्या बाहेर रत्नांचें व पोवळ्यांचें काम केलेलें आहे, जें शरद्कालच्या मेघाप्रमाणें काळें दिसणारें, मेरुपर्वताच्या गुहे-

पाटपिहितं वितर्दिशतशोभितम् ३१ काञ्चनप्रतिमैकाग्रं मणिविद्रुमतोरणम् । शारदाभ्रघनप्रख्यं दीप्तं मेरुगुहासमम् ३२ मणिभिर्वरमाल्यानां सुमहद्भिरलंकृतम् । मुक्तामणिभिराकीर्णं चन्दनागुरुभूषितम् ३३ गन्धान्मनोज्ञान्विसृजद्दार्दुरं शिखरं यथा । सारसैश्च मयूरैश्च विनदद्भिर्विराजितम् ३४ सुकृतेहामृगाकीर्णं सूत्कीर्णं भक्तिभिस्तथा । मनश्चक्षुश्च भूतानामाददत्तिग्मतेजसा ३५ चन्द्रभास्करसङ्काशं कुबेरभवनोपमम् । महेन्द्रधाममप्रतिमं नानापक्षिसमाकुलम् ३६ मेरुशृङ्गसमं सूतो रामवेश्म ददर्श ह । उपस्थितैः समाकीर्णं जनैरञ्जलिकारिभिः ३७ उपादाय समाक्रान्तैस्तदा जानपदैर्जनैः । रामाभिषेकसुमुखैरुन्मुखैःसमलंकृतम् ३८ महामेघसमप्रख्यमुदग्रं सुविराजितम् । नानारत्नसमाकीर्णं कुब्जकैरपिचावृतम् ३९ स वाजियुक्तेन रथेन सारथिः समाकुलं राजकुलं विराजयन् । वरूथिना राजगृहाभिपातिना पुरस्य सर्वस्य मनांसि हर्षयन् ४० ततः समासाद्य महाधनं महत्प्रहृष्टरोमा स बभूव सारथिः । मृगैर्मयूरैश्च समा-

---

सारिखें भासणारें, सोन्याच्या पुष्पाच्या माळांतून मध्यें लोंबणाऱ्या अशा मोठ्या रत्नांनीं अलंकृत केलेलें, चोहोंकडे मोत्यांनीं व रत्नांनीं व्यापिलेलें आणि चंदन व अगरु ह्यांनीं भूषित केलेलें असें रामचंद्राचें गृह त्या सुमंत्राच्या दृष्टी पडलें. २९, ३०, ३१, ३२, ३३. ज्यांतून उत्तम प्रकारचे सुगंध निघत आहेत अशा सुगंधि चंदनवृक्षाला धारण करणारा मलयपर्वतच कीं काय असें शोभणारें, शब्द करणारे सारस आणि मोर ह्यांनीं सुशोभित, सोन्याच्या क्रीडामृगांनीं व्याप्त असलेलें, प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या किरणांनीं व्याप्त, उत्तम तेजानें सर्व लोकांच्या मनाला व नेत्राला हरण करणारें चंद्र आणि सूर्य ह्यांच्या सारिखें भासणारें, कुबेराच्या अथवा महाप्रतापी इंद्राच्या मंदिराप्रमाणें दिसणारें, अनेक पक्ष्यांनीं व्याप्त अशा मेरूच्या शिखराप्रमाणें मोठें, जुळणाऱ्या आणि हात जोडणाऱ्या अशा लोकांनीं व्याप्त असलेलें, रामाच्या अभिषेकाविषयीं उत्सुक अशा नजराणे घेऊन आलेल्या देशांतल्या लोकांनीं भूषित केलेलें असें, मोठ्या मेघाशीं तुल्य व प्रशस्त असणारें, अत्यंत सुशोभित असणाऱ्या अनेक रत्नांनीं व्याप्त असें व दास वगैरे लोकांनीं गजबजून गेलेलें अशा रामाच्या घराला बघतां झाला ३४, ३५, ३६, ३७, ३८, ३९. तो सुमंत्र, ज्यास घोडे लाविले आहेत व जो आच्छादिलेला आहे अशा रथावर आरुढ होऊन ज्या ठिकाणीं अति गर्दी आहे अशा मार्गाला सुशोभित करीत करीत व नगरातल्या सर्व लोकांना आनंद देत देत, रामाच्या घरीं निघाला असतां ४० तो सारथि ज्या घरांत मोर व हरिण चोहोंकडे संचार करितात

कुलोल्बणं गृहं वरार्हस्य शचीपतेरिव ४१ स तत्र कैलासनिभाः स्वलंकृताः प्रविश्य कक्ष्यास्त्रिदशालयोपमाः। प्रियान्वरान्राममते स्थितान्बहून्व्यपोह्य शुद्धांतमुपस्थितो रथी ४२ स तत्र शुश्राव च हर्षयुक्ता रामाभिषेकार्थकृताञ्जनानाम्। नरेन्द्रसूनोरभिमङ्गलार्थाः सर्वस्य लोकस्य गिरः प्रहृष्टाः ४३ महेन्द्रसद्मप्रतिमं च वेश्म रामस्य रम्यं मृगपक्षिजुष्टम्। ददर्श मेरोरिव शृङ्गमुच्चं विभ्राजमानं प्रभया सुमन्त्रः ४४ उपस्थितैरञ्जलिकारिभिश्च सोपायनैर्जानपदैर्जनैश्च। कोट्यापरार्धैश्च विमुक्तयानैः समाकुलं द्वारपदं ददर्श ४५ ततो महामेघमहीधराभं प्रभिन्नमत्यंकुशमत्यसह्यम्। रामोपवाह्यं रुचिरं ददर्श शत्रुंजयंनागमुदग्रकायम् ४६ स्वलंकृतान्साश्वरथान्सकुञ्जरानमात्यमुख्यांश्च ददर्श वल्लभान्। व्यपोह्य सूतः सहितान्समन्ततः समृद्धमन्तःपुरमाविवेश ह ४७ ततोद्रिकूटाच-

---

अशा व अनेक वस्तु धारण करण्यास योग्य अशा इंद्राच्या गृहाप्रमाणें शोभणाऱ्या रामाच्या समृद्ध गृहाला जाऊन आनंदित झाला व त्यामुळें त्याच्या आंगावर रोमांच उभे राहिले ४१. नंतर तो योद्धा सुमंत्र त्या घरीं, कैलासपर्वतासारिखें शोभणारे आणि अलंकारांनीं सुशोभित केलेले असे कांहीं चौक ओलांडून रामाच्या आज्ञेमध्यें वागणारे, रामाला अत्यंत प्रिय व श्रेष्ठ अशा बहुत द्वारपालांचें उल्लंघन करून, अंतःपुराला आला असतां ४२. तो सुमंत्र, त्या ठिकाणीं रामाच्या अभिषेकाकरितां खटपट करणाऱ्या लोकांच्या ( ज्यांत रामाच्या कल्याणाचाच अर्थ आहे अशा ) वाणींना आणि इतर जुळलेल्या लोकांच्या आनंदयुक्त वाणीला, ऐकतां झाला ४३. इंद्राच्या गृहाप्रमाणें शोभणारें, मृग आणि पक्षी हे ज्या ठिकाणीं संचार करितात असें, मेरुपर्वताच्या शिखरा इतकें उंच, तेजानें अत्यंत सुशोभित दिसणारें व रमणीय अशा रामाच्या गृहाला पहातां झाला ४४ आणि नजराणे घेऊन येऊन आपलीं रथ वगैरे वहानें एकाबाजूस ठेऊन व हात जोडून उभे राहिलेल्या कोट्यावधि देशांतल्या लोकांनीं व्याप्त अशा दरवाज्याच्या स्थलाला बघतां झाला ४५. नंतर मोठमोठाले मेघ ज्या पर्वतावर उतरले आहेत अशा पर्वताप्रमाणें दिसणारा, उन्मत्त झालेला, महाताला अंकुशानेंही अवरण्यास कठिण व राम नेहमीं ज्याच्यावर बसतात आणि ज्याचा देह फार मोठा आहे अशा शत्रुंजयनामक सुंदर हत्तीला बघतां झाला ४६. सुमंत्र सारथि उत्तम उत्तम अलंकारांनीं युक्त असे अश्व, गज व रथ ह्यांवर आरुढ झालेले असे मुख्य मुख्य प्रधान व राजाच्या प्रीतींतले दुसरे लोक यांना मार्गांतून एका बाजूस करून आपण अंतःपुरांत निघाला ४७. नंतर तो सारथि, पर्वताच्या शिखरावर स्थिर अस-

लमेघसन्निभं महाविमानोपमवेश्मसंयुतम्। अवार्यमाणः प्रविवेश सारथिः प्रभूतरत्नं मकरो यथाऽर्णवम् ॥ ४८ ॥ [७१९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥

स तदन्तःपुरद्वारं समतीत्य जनाकुलम्। प्रविविक्तां ततः कक्ष्यामाससाद पुराणवित् १ प्रासकार्मुकबिभ्रद्भिर्युवाभिर्मृष्टकुण्डलैः। अप्रमादिभिरेकाग्रैः स्वानुरक्तैरधिष्ठिताम् २ अत्र काषायिणो वृद्धान्वेत्रपाणीन्स्वलंकृतान्। ददर्श विष्ठितान्द्वारि स्त्र्यध्यक्षान्सुसमाहितान् ३ ते समीक्ष्य समायान्तं रामप्रियचिकीर्षवः। सहसोत्पतिताः सर्वे ह्यासनेभ्यः ससम्भ्रमाः ४ तानुवाच विनीतात्मा सूतपुत्रः प्रदक्षिणः। क्षिप्रमाख्यातरामाय सुमन्त्रो द्वारि तिष्ठति ५ ते राममुपसंगम्य भर्तुः प्रियचिकीर्षवः। सहभार्याय रामाय क्षिप्रमेवाचचक्षिरे ६ प्रतिवेदितमाज्ञाय सूतमभ्यन्तरं पितुः। तत्रैवानाययामास राघवः प्रियकाम्यया ७ तं वैश्रवणसंकाशमुपविष्टं स्वलं-

णाऱ्या मेघासारिखे दिसणारें व मोठमोठाल्या विमानासारिख्या गृहांनीं युक्त असलेले अशा रामाच्या अंतःपुरांत ज्याप्रमाणें मकर पुष्कळ रत्नांनीं भरलेल्या समुद्रांत जातो त्याप्रमाणें प्रतिबंधरहित गेला ४८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ १५ ॥

तो जुना माहितगार सारथि लोकांची गर्दी झालेलें अंतःपुराचें द्वार ओलांडून जेथें गर्दी नाहीं अशा चौकामध्यें गेला १. त्या चौकामध्यें पट्ट व धनुष्यें घेऊन उज्ज्वल कुंडलें धारण केलेले एकाग्र अंतःकरण करून रक्षणाविषयीं दक्ष असलेले आणि राजाविषयीं उत्तम प्रकारची बुद्धि असलेले तरुण लोक होते २. ह्या ठिकाणीं काषायवस्त्र परिधान करून व उत्तम प्रकारचे अलंकार धारण करून हातांमध्यें राजवेत्र घेतलेले वृद्ध लोक मोठ्या दक्षतेनें स्त्रियांवर देखरेख करीत असतांना त्या सारथ्यानें द्वारामध्यें अवलोकन केलें ३. रामाचें प्रिय करण्याची इच्छा धरणाऱ्या त्या लोकांनीं त्या सारथ्याला येतांना पाहिले आणि पाहिल्याबरोबर ते सर्व लगबगीनें आपआपल्या स्थानापासून उठून उभे राहिले ४. तेव्हां अतिशयच सरळ रीतीनें वागणारा तो नम्र सारथि "सुमंत्र द्वारामध्यें उभा आहे हें सत्वर रामाला सांगा" ह्मणून त्यांना ह्मणाला असतां ५ स्वामीचें प्रिय करणारे ते वेत्रधर रामाकडे गेले आणि भार्येसहवर्तमान असलेल्या रामाला त्यांनीं तें वृत्त सत्वरच निवेदन केलें ६. तेव्हां पित्याच्या अंतरंगांतील सारथि आला आहे असें समजतांक्षणीं पित्याचें प्रिय करण्याची इच्छा धरून रघुवंशज रामानें त्याला तेथेंच आणविलें ७. नंतर कुबेराप्रमाणें

कृतम्। ददर्श सूतः पर्यंके सौवर्णे सोत्तरच्छदे ८ वराहरुधिराभेण शुचिना च सुगन्धिना। अनुलिप्तं परार्ध्येन चन्दनेन परन्तपम् ९ स्थितया पार्श्वतश्चापि वालव्यजनहस्तया। उपेतं सीतया भूयश्चित्रया शशिनं यथा १० तं तपन्तमिवादित्यमुपपन्नं स्वतेजसा। ववन्दे वरदं बन्दी विनयज्ञो विनीतवत् ११ प्राञ्जलिः सुमुखं दृष्ट्वा विहारशयनासने। राजपुत्रमुवाचेदं सुमन्त्रो राजसत्कृतः १२ कौसल्या सुप्रजा राम पिता त्वां द्रष्टुमिच्छति। महिष्यापि हि कैकेय्या गम्यतां तत्र मा चिरम् १३ एवमुक्तस्तु संहृष्टो नरसिंहो महाद्युतिः। ततः संमानयामास सीतामिदमुवाच ह १४ देवि देवश्च देवी च समागम्यमदन्तरे। मन्त्रयेते ध्रुवं किञ्चिदभिषेचनसंहितम् १५ लक्षयित्वा ह्यभिप्रायं प्रियकामा सुदक्षिणा। संचोदयति राजानं मदर्थमसितेक्षणा १६ सा प्रहृष्टा महाराजं हितकामानुवर्तिनी। जननी चार्थकामा मे केकयाधिपतेः सुता १७ दिष्ट्या खलु

---

उत्तम प्रकारचे अलंकार धारण करून मच्छरदाणीनें युक्त असलेल्या सुवर्णमंचकावर बसलेल्या रामाला त्या सारथ्यानें अवलोकन केलें ८. वराहाच्या रक्ताप्रमाणें लाल शुचि आणि सुगंधि अशा उत्कृष्ट चंदनाची त्या शत्रुदमन रामाला उटी लाविलेली होती ९ आणि हातामध्यें विंझोणा घेऊन सीता समीपच उभी असल्यामुळें चित्रा संज्ञक तारेनें युक्त असलेल्या चंद्राप्रमाणें तो फारच शोभत होता १०. असो. स्वतःच्या तेजानें युक्त असल्यामुळें सूर्याप्रमाणें प्रकाशत असलेल्या वरप्रद रामाला विनयज्ञ व विनयशील सुमंत्रानें वंदन केलें ११ आणि विहार, शयन, आसन वगैरे विषयीं राजानें ज्याचा मान राखिलेला आहे असा तो सुमंत्र सारथि हात जोडून व प्रसन्नमुख असलेल्या राजपुत्राला अवलोकन करून त्याला ह्मणाला १२ "हे रामा, तुझ्यामुळें कौसल्या चांगली पुत्रवती झाली आहे. आतां राणी कैकयीसहवतमान तुझा पिता तुझी भेट घेण्याची इच्छा करीत आहे. ह्यास्तव, विलंब न करिता तिकड चलावें" १३. ह्याप्रमाणें महातेजस्वी पुरुषश्रेष्ठ रामाला सारथ्यानें सांगितलें असतां त्यानें आनंदानें सुमंत्राच्या सांगण्याला मान दिला आणि तो सीतेला ह्मणाला १४ "हे देवि, राजा आणि राजपत्नी कैकेयी माझ्याकरित एकठिकाणीं जुळून निःसंशय अभिषेकासंबंधानेंच कांहीं विचार करीत आहेत १५ वर्तनानें अतिशय सरळ आणि राजाचें प्रिय करण्याविषयीं तत्पर असलेली ती कृष्णनयना कैकेयी राजाचा अभिप्राय जाणून त्याला कांहीं तरी सांगत आहे १६. माझा उद्देश सिद्धीस नेण्याविषयीं तत्पर आणि हितावह अशा माझ्या इच्छेप्रमाणें वागणारी अशी माझी माता कैकेय राजाची कन्या

महाराजो महिष्या प्रियया सह । सुमन्त्रं प्राहिणोद्दूतमर्थकामकरं मम १८ यादृशी परिषत्तत्र तादृशो दूत आगतः। ध्रुवमद्यैव मां राजा यौवराज्येऽभिषेक्ष्यति १९ हंत शीघ्रमितो गत्वा द्रक्ष्यामि च महीपतिम् । सह त्वं परिवारेण सुखमास्व रमस्व च २० पति संमानिता सीता भर्तारमसितेक्षणा । आ द्वारमनुवव्राज मंगलान्यभिदध्युषी २१ राज्यं द्विजातिभिर्जुष्टं राजसूयाभिषेचनम् । कर्तुमर्हति ते राजा वासवस्येव लोककृत् २२ दीक्षितं व्रतसंपन्नं वराजिनधरं शुचिम् । कुरङ्गशृङ्गपाणिं च पश्यन्ती त्वां भजाम्यहम् २३ पूर्वां दिशं वज्रधरो दक्षिणां पातु ते यमः । वरुणः पश्चिमामाशां धनेशस्तूत्तरां दिशम् २४ अथ सीतामनुज्ञाप्य कृतकौतुकमङ्गलः । निश्चक्राम सुमन्त्रेण सह रामो निवेशनात् २५ पर्वतादिव निष्क्रम्य सिंहो गिरिगुहाशयः । लक्ष्मणं द्वारि सोपश्यत्प्रह्वाञ्जलिपुटं स्थितम् २६ अथ मध्यमकक्ष्यायां समागच्छत्सुहृज्जनैः । स सर्वानर्थिनो दृष्ट्वा समेत्य प्रति-

---

आनंदित होऊन महाराजाला काहीं तरी सांगत आहे १७. खरोखर आपल्या प्रिय पत्नीसहवर्तमान महाराजानें माझा उद्देश व इच्छा सिद्धीस नेणारा सुमंत्र दूत पाठवून दिला ही फार चांगली गोष्ट झाली १८. ज्याप्रकारची त्या ठिकाणीं सभा आहे, त्याच प्रकारचा दूत येथें आला आहे. ह्यावरून राजा मला आजच यौवराज्याचा अभिषेक करणार हें निश्चित आहे १९. करितां, मी आतां सत्वर येथून जाऊन भूपतीची भेट घेतों. तूं आपल्या परिवारासहवर्तमान सुखानें आनंदांत रहा " २०. ह्याप्रमाणें भर्त्यानें मान राखिला असतां भर्त्याचें अभीष्ट चिंतन करणारी कृष्णनयना सीता द्वारापर्यंत त्याचे मागोमाग गेली ( आणि ह्मणाली ) २१ " इंद्राला अभिषेक करणाऱ्या ब्रह्मदेवाप्रमाणें राजानें राजसूय यागाविषयीं आपणाकडून दीक्षा घेवविणें योग्य आहे आणि राज्यांमध्यें ऋषींनीं वास्तव्य केलेलें आहे २२. ह्यास्तव उत्कृष्ट अजिन धारण करून व मृगशृंग हातांत घेऊन व्रतस्थ, शुचिर्भूत व दीक्षा घेतलेल्या आपणाला अवलोकन करीत असतांना मी आपली सेवा करीन २३. वज्रपाणी इंद्र पूर्व दिशेस आपलें पालन करो, दक्षिण दिशेस यम आपलें रक्षण करो पश्चिम दिशेस वरुण आपलें परिपालन करो आणि उत्तर दिशेस कुबेर आपला सांभाळ करो " २४. ह्याप्रमाणें सीतेचें बोलणें झाल्यावर अभिषेकोत्सवाकरितां मंगल केलेला राम सीतेला निरोप देऊन सुमंत्रासहवर्तमान घरांतून बाहेर निघाला २५ आणि गिरिकंदरामध्यें वास्तव्य करणारा सिंह ज्याप्रमाणें पर्वतापासून निघतो त्याप्रमाणें घरांतून निघाल्यावर त्या रामानें दारामध्यें नम्र होऊन व हात जोडून उभ्या असलेल्या लक्ष्मणाला अव-

नन्द्य च २७ ततः पावकसंकाशमारुरोह रथोत्तमम्। वैयाघ्रं पुरुषव्याघ्रो राजितं राजनन्दनः २८ मेघनादमसम्बाधं मणिहेमविभूषितम्। मुष्णन्तमिव चक्षूंषि प्रभया मेरुवर्चसम् २९ करेणुशिशुकल्पैश्च युक्तं परमवाजिभिः। हरियुक्तं सहस्राक्षो रथमिन्द्र इवाशुगम्॥ प्रययौ तूर्णमास्थाय राघवो ज्वलितः श्रिया ३० स पर्जन्य इवाकाशे स्वनवानभिनादयन्। निकेतान्निर्ययौ श्रीमान्महाभ्रादिव चन्द्रमाः ३१ चित्रचामरपाणिस्तु लक्ष्मणो राघवानुजः। जुगोप भ्रातरं भ्राता रथमास्थाय पृष्ठतः ३२ ततो हलहलाशब्दस्तुमुलः समजायत। तस्य निष्क्रममाणस्य जनौघस्य समन्ततः ३३ ततो हयवरा मुख्या नागाश्च गिरिसंनिभाः। अनुजग्मुस्तथा रामं शतशोऽथ सहस्रशः ३४ अग्रतश्चास्य सन्नद्धाश्चंदनागुरुभूषिताः। खड्गचापधराः शूरा जग्मुराशंसवो जनाः ३५ ततो वादित्रशब्दाश्च स्तुति-

---

लोकन केलें २६. तदनंतर त्या मधल्या चौकांत आल्यावर त्यानें आपल्या मित्रमंडळींची भेट घेतली आणि तेथें सर्व प्रकारचे याचक पाहिल्यावर त्यांची भेट घेऊन व त्यांची इच्छा परिपूर्ण करून २७ अग्नीप्रमाणें तेजस्वी आणि व्याघ्रचर्मानें परिवेष्टित अशा आपल्या सुशोभित व उत्कृष्ट रथावर राजकुमार आरूढ झाला २८. त्या रथाचा ध्वनि मेघासारखा गंभीर होता. त्यामध्यें जागा विस्तीर्ण होती, रत्नांनीं व सुवर्णांनीं त्याला शृंगारिलें होतें आणि मेरुपर्वताप्रमाणें तेजस्वी असलेला तो आपल्या प्रभेनें लोकांची दृष्टि वेधून टाकीत होता २९. असो. हरिसंज्ञक अश्व जोडिलेल्या रथावर आरुढ होणाऱ्या इंद्राप्रमाणें लहानसे हत्तीच कीं काय अशा रीतीनें धिप्पाड असलेल्या उत्कृष्ट अश्वांनीं युक्त अशा आपल्या शीघ्रगामी रथावर ३० सत्वर आरूढ होऊन राज्यलक्ष्मीनें झळकत असलेला तो रघुवंशज राम आकाशामध्यें गर्जना करणाऱ्या मेघांप्रमाणें भूप्रदेश नादित करीत चालला ३१. तेव्हां मोठ्या मेघांतून ज्याप्रमाणें चंद्र बाहेर पडतो त्याप्रमाणें रामाचा कनिष्ठ भ्राता वैभवशाली लक्ष्मण हातामध्यें चित्र विचित्र दंडानें युक्त असलेले चामर घेऊन आपल्या घरांतून निघाला ३२ आणि रथावर आरूढ होऊन पृष्ठभागानें त्यानें भ्रात्याचें रक्षण करण्याचें मनांत योजिलें असतां त्याच्यापुढें निघालेल्या जनसमुदायामध्यें प्रचंड आनंदध्वनि झाला ३३. तेव्हां उत्कृष्ट अश्व व पर्वतासारिखे धिप्पाड असे मुख्य मुख्य गज शेंकडों हजारों रामाच्या मागोमाग चालले ३४ व चंदन आणि अगुरु ह्यांनीं भूषित होऊन खड्ग व धनुष्य धारण केलेले रामाचे हितैषी शूर लोक सज्ज होऊन त्याच्यापुढें चालले ३५. तदनंतर वाद्यांचे व भाटांच्या स्तुतीचे ध्वनि आणि शूरांचे सिंहनाद मार्गामध्यें कानीं येऊं लागले ३६

शब्दाश्च बंदिनाम् । सिंहनादाश्च शूराणां ततः शुश्रुविरे पथि ३६ हर्म्यवातायनस्थाभिर्भूषिताभिः समन्ततः । कीर्यमाणः सुपुष्पौघैर्ययौ स्त्रीभिररिन्दमः ३७ रामं सर्वानवद्यांग्यो रामपिप्रीषया ततः । वचोभिरग्र्यैर्हर्म्यस्थाः क्षितिस्थाश्च ववन्दिरे ३८ नूनं नन्दति ते माता कौसल्या मातृनन्दन । पश्यन्ती सिद्धयात्रं त्वां पित्र्यं राज्यमुपस्थितम् ३९ सर्वसीमन्तिनीभ्यश्च सीता सीमन्तिनीवरा । अमन्यन्त हि ता नार्यो रामस्य हृदयप्रियाम् ४० तया सुचरितं देव्या पुरा नूनं महत्तपः । रोहिणीव शशाङ्केन रामसंयोगमापया ४१ इति प्रासादशृङ्गेषु प्रमदाभिर्नरोत्तमः । शुश्राव राजमार्गस्थः प्रिया वाच उदाहृताः ४२ स राघवस्तत्र तदा प्रलापाञ्शुश्राव लोकस्य समागतस्य । आत्माधिकारा विविधाश्च वाचः प्रहृष्टरूपस्य पुरे जनस्य ४३ एष श्रियं गच्छति राघवोद्य राजप्रसादाद्विपुलां गमिष्यन् । एते वयं सर्वसमृद्धकामा येषामयं नो भविता प्रशास्ता ४४ लाभो जनस्यास्य

---

( आणि असा समारंभ चालला असतांना ) अलंकार धारण केलेल्या स्त्रिया आपआपल्या घराच्या खिडक्यांमध्यें सभोंवति उभ्या राहून उत्कृष्ट पुष्पांच्या राशी रामावर टाकीत असतांना शत्रुदमन राम चालला ३७. तेव्हां ज्यांच्या अवयवांमध्यें कोठेंही नांव ठेवण्याला जागा नाहीं अशा स्त्रिया आपआपल्या घरामध्यें बसून रामाला प्रसन्न करून घेण्याच्या उद्देशानें वंदनपूर्वक उत्कृष्ट शब्दांनीं त्याची स्तुति करूं लागल्या ३८ कीं, " हे मातृप्रिय, परंपरागत चालत आलेलें राज्य तुला प्राप्त होण्याचा समय आला आहे हें पाहून खरोखर तुझ्या कौसल्या मातेला आनंद होत आहे ३९. सर्व स्त्रियांपेक्षां सीता स्त्री श्रेष्ठ आहे आणि रामाला ती मनापासून प्रिय आहे असें इतर स्त्रियां समजत आहेत ४०. चंद्राचा समागम प्राप्त होणाऱ्या रोहिणीप्रमाणें जिला रामसंयोग प्राप्त झाला त्या सीता देवीनें खरोखर पूर्वीं मोठी तपश्चर्या करून ठेविली आहे " ४१. ह्याप्रमाणें वाड्याच्या मनोऱ्यावर बसलेल्या स्त्रियांनीं केलेलीं प्रिय भाषणें राजमार्गामध्यें असलेल्या पुरुषश्रेष्ठ रामानें ऐकिलीं ४२. तात्पर्य, त्या नगरामध्यें आनंदमय होऊन जुळलेल्या लोकांची भाषणें व नाना प्रकारचे शब्द त्या रघुवंशज रामानें आपल्या संबंधानें ऐकिले ४३. ( कांहीं ह्मणाले ) " राजाच्या कृपेनें विपुल संपत्ति प्राप्त होणाच्या उद्देशानें हा रघुवंशज राम आज चालला आहे आणि हा आतां आमचा अधिपति होणार असल्यामुळें आमचे सर्व मनोरथ परिपूर्ण झाले आहेत ४४. आतां बहूकालपर्यंत ह्याला हें राष्ट्र प्राप्त होणार आहे, हा ह्या लोकांना एक लाभच आहे. कारण, या राजाच्या कारकीर्दीमध्यें कोणत्याही मनुष्याला दुःख

यदेष सर्वं प्रपत्स्यते राष्ट्रमिदं चिराय। न ह्यप्रियं किंचन जातु कश्चित्पश्येन्न-दुःखं मनुजाधिपेऽस्मिन् ४५ सघोषवद्भिश्च हयैः सनागैः पुरःसरैः स्वस्तिकसूतमागधैः। महीयमानः प्रवरैश्च वादकैरभिष्टुतो वैश्रवणो यथा ययौ ४६ करेणमातङ्गरथाश्वसंकुलं महाजनौघैः परिपूर्णचत्वरम्। प्रभूतरत्नं बहुपण्यसंचयं ददर्श रामो विमलं महापथम् ४७ [ ७६६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

स रामो रथमास्थाय संप्रहृष्टसुहृज्जनः। पताकाध्वजसंपन्नं महार्हागुरुधूपितम् १ अपश्यन्नगरं श्रीमान्नानाजनसमन्वितम्। सगृहैरभ्रसंकाशैः पाण्डुरैरुपशोभितम् २ राजमार्गं ययौ रामो मध्येनागुरुधूपितम् ३ चन्दनानां च मुख्यानामगुरूणां च संचयैः। उत्तमानां च गन्धानां क्षौमकौशाम्बरस्य च ४ आविद्धाभिश्च मुक्ताभिरुत्तमैः स्फाटिकैरपि। शोभमानमसंबाधं तं राजपथमुत्तमम् ५ संवृतं विविधैः पुष्पैर्भक्ष्यैरुच्चावचैरपि। ददर्श तं राज-

---

पहाण्याची पाळी येणार नाहीं इतकेंच नव्हे परंतु, कोणालाही कसल्याही प्रकारची अप्रिय गोष्ट अनुभवण्याचा प्रसंग येणार नाहीं" ४५. ह्याप्रमाणें लोकांचीं संभाषणें चाललीं असतांना व डंक्याचे घोडे आणि हत्ती ह्यांसहवर्तमान पुढें चाललेले जयजयकार करणारे, भाट, आणि स्तुतिपाठक वंशपाठक प्रोत्साहन देत असतांना श्रेष्ठ स्तुतिपाठक ज्याची स्तुति करीत आहेत अशा कुबेराप्रमाणें राम जाऊं लागला असतां ४६ राजमार्ग त्याच्या दृष्टीं पडला. तो राजमार्ग हत्तिणी. हत्ति, रथ आणि अश्व ह्यांनीं गजबजून गेलेला होता. मोठमोठ्या लोकसमुदायांनीं त्यांतील पटांगणें भरून गेलेलीं होतीं, नानाप्रकारच्या उत्कृष्ट वस्तु त्या ठिकाणीं होत्या आणि अनेक प्रकारचे विक्रीचे पदार्थ त्या ठिकाणीं जुळवून ठेविलेले होते ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सोळावा सर्ग समाप्त झाला.॥ १६॥

तो राम रथावर आरूढ होऊन जाऊं लागला असतां त्याच्या मित्रमंडळींना फारच आनंद झाला. त्या वैभवशाली रामानें मोठमोठ्या मौल्यवान् अगरूंचे ज्या ठिकाणीं धूप जळत आहेत व ज्यामध्यें जिकडे तिकडे पताका व ध्वज उभारिलेले आहेत असें नगर अवलोकन केलें आणि ज्याच्या मध्यभागीं अगरूंचा धूप चाललेला आहे व अभ्रतुल्य श्वेत गृहांनीं ज्याला शोभा आलेली आहे अशा राजमार्गानें तो चालला १, २, ३. उत्कृष्ट चंदन व अगुरु, उत्तम सुगंधि द्रव्यें आणि ताग व रेशीम यांचीं वस्त्रें यांच्या समुदायांनीं ४, सच्छिद्र मोत्यांनीं व उत्कृष्ट स्फटिकांनीं त्या उत्कृष्ट व विस्तीर्ण राजमार्गाला शोभा आलेली असून ५ नाना प्रकारचीं पुष्पें आणि उच्च नीच खाद्य पदार्थ

पथं दिवि देवपतिर्यथा ६ दध्यक्षतहविर्लाजैर्धूपैरगुरुचन्दनैः। नानामाल्योपगन्धैश्च सदाभ्यर्चितचत्वरम् ७ आशीर्वादान्बहूञ्शृण्वन्सुहृद्भिः समुदीरितान्। यथार्हं चापि संपूज्य सर्वानेव नरान्ययौ ८ पितामहैराचरितं तथैव प्रपितामहैः। अद्योपादाय तं मार्गमभिषिक्तोऽनुपालय ९ यथास्म पोषिताः पित्रा यथा सर्वैः पितामहैः। ततः सुखतरं सर्वे रामे वत्स्याम राजनि १० अलमद्य हि भुक्तेन परमार्थैरलं च नः। यदि पश्याम निर्यान्तं रामं राज्ये प्रतिष्ठितम् ११ ततो हि नः प्रियतरं नान्यत्किंचिद्भविष्यति। यथाभिषेको रामस्य राज्येनामिततेजसः १२ एताश्चान्याश्च सुहृदामुदासीनः शुभाः कथाः। आत्मसंपूजनीः शृण्वन्ययौ रामो महापथम् १३ नहि तस्मान्मनः कश्चिच्चक्षुषी वा नरोत्तमात्। नरः शक्नोत्यपाक्रष्टुमतिक्रान्तेपि राघवे १४ यश्च रामं न पश्येत्तु यं च रामो न पश्यति। निन्दितः सर्वलोकेषु स्वात्माप्येनं विगर्हते १५ सर्वेषु स हि धर्मात्मा वर्णानां कुरुते

---

यांनीं तो मार्ग आच्छादिलेला होता आणि तो राजमार्ग स्वर्गामध्यें अवलोकन करणाऱ्या इंद्राप्रमाणें रामानें अवलोकन केला ६. दहि, अक्षता, घृत, लाह्या, अगुरु व चंदन ह्यांचे धूप आणि नानाप्रकारचीं पुष्पें व सुगंधि द्रव्यें यांच्या योगानें त्या राजमार्गातील पटांगणें भूषित केलेलीं होतीं ७ व अशा प्रकारच्या राजमार्गांतून अनेक लोकांनीं उच्चारिलेले अनेक आशीर्वाद श्रवण करीत करीत आणि सर्व लोकांना योग्यतेप्रमाणें मान देत देत तो राम चालला ८ (तेव्हां वृद्ध लोक त्याला ह्मणाले) " आज अभिषेक झाल्यावर तूं आजपणज्यांनीं चालविलेल्या मार्गाचें अवलंबन करून परिपालन कर ९ आणि ज्याप्रमाणें तुझ्या पित्यानें व तुझ्या सर्व पूर्वजांनीं आमचें पोषण केलें त्याप्रमाणें तूं आमचें पोषण कर ह्मणजे तुज रामराजाच्या कारकीर्दीमध्यें आह्मी पूर्वींपेक्षांही अधिक सुखानें राहूं १०. आज घरांतून बाहेर निघालेला हा राम राज्यावर बसलेला जर दृष्टीं पडेल तर आह्मीं ऐहिक विषयसुखाची व पारमार्थिक साधनांचीही पर्वा करणार नाहीं ११. कारण, अत्यंत तेजस्वी रामाच्या राज्याभिषेकापेक्षां दुसरी कोणतीही गोष्ट आह्मांला अधिक प्रिय होणार नाहीं " १२. ह्या व अशाच प्रकारच्या स्वतःच्या प्रशंसेसंबधानें मित्रांच्या शुभ कथा श्रवण करीत करीत उदासीन वृत्तीनें असलेला राम राजमार्गानें चालला १३. असो. राम दूर जरी गेला तरी कोणीही पुरुष आपलें मन अथवा दृष्टि त्याच्या पासून परावृत्त करण्यास समर्थ झाला नाहीं १४. ज्यानें त्यावेळीं रामाला अवलोकन केलें नाहीं आणि ज्याच्याकडे रामाची दृष्टि गेली नाहीं त्याची सर्व लोकांमध्यें निंदा होऊन त्यानें स्वतःही आपली

दयाम् । चतुर्णां हि वयस्थानां तेन ते तमनुव्रताः १६ चतुष्पथान्देवपथांश्चैत्यांश्चायतनानि च । प्रदक्षिणं परिहरञ्जगाम नृपतेः सुतः १७ स राजकुलमासाद्य मेघसङ्घोपमैः शुभैः । प्रासादशृङ्गैर्विविधैः कैलासशिखरोपमैः १८ आवारयद्भिर्गगनं विमानैरिव पाण्डुरैः । वर्धमानगृहैश्चापि रत्नजालपरिष्कृतैः १९ तत्पृथिव्यां गृहवरं महेन्द्रसदनोपमम् । राजपुत्रः पितुर्वेश्म प्रविवेश श्रिया ज्वलन् २० स कक्ष्या धन्विभिर्गुप्तास्तिस्रोऽतिक्रम्य वाजिभिः । पदातिरपरे कक्ष्ये द्वे जगाम नरोत्तमः २१ स सर्वाः समतिक्रम्य कक्ष्या दशरथात्मजः । संनिवर्त्य जनं सर्वं शुद्धान्तःपुरमत्यगात् २२ तस्मिन्प्रविष्टे पितुरन्तिकं तदा जनः स सर्वो मुदितो नृपात्मजे । प्रतीक्षते तस्य पुनः स्म निर्गमं यथोदयं चन्द्रमसः सरित्पतिः २३ [ ७८९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तदशः सर्गः ॥ १७ ॥

स ददर्शासने रामो विषण्णं पितरं शुभे । कैकेय्या सहितं दीनं

---

निंदा करून घतली १५. चारी वर्णांतील सर्वही लोकांचे ठिकाणीं तो त्यांच्या वयोमानानुरूप दया करीत असे आणि त्यामुळें ते सर्वही त्याच्या मनाप्रमाणें वागत असत १६. चौक, देवालयांचे मार्ग प्रसिद्ध वृक्ष आणि देवस्थानें ह्यांना उजवी घालीत घालीत तो राजकुमार गेला १७ आणि राजवाड्यापाशीं आल्यानंतर इंद्राच्या निवासस्थानाप्रमाणें पृथ्वीतील श्रेष्ठ गृह जें पित्याचें निवासस्थान त्यामध्यें तो राज्यलक्ष्मीनें झळकत असलेला राजपुत्र प्रविष्ट झाला. त्या राजवाड्याचीं अनेक शुभ शिखरें मेघपटलाप्रमाणें मोठीं असून कैलासपर्वताच्या शिखरासारखीं उंच होतीं आणि आकाशाला वेष्टून टाकणाऱ्या श्वेतवर्ण विमानाप्रमाणें असलेलीं व रत्नसमुदायांनीं भूषित केलेलीं क्रीडास्थानें त्या राजवाड्यासभोंवतीं होतीं १८, १९, २०. पित्याच्या निवासस्थानाला गेल्यानंतर धनुर्धारी पुरुषांचा जेथें पहारा आहे असे तीन चौक अश्वासहवर्तमानच ओलांडून जाऊन तो पुरुषश्रेष्ठ राम दुसरे दोन चौक पायांनीं चालून गेला २१ आणि ह्याप्रमाणें सर्व चौक ओलांडिल्यावर तो दशरथपुत्र राम सर्व लोकांना परत फिरवून अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाला २२ व तो राजकुमार पित्याच्या अंतःपुरांत प्रविष्ट झाल्यानंतर बाहेरील सर्व लोक आनंदित झाले आणि सागर ज्याप्रमाणें चंद्रोदयाची वाट पहात बसतो त्याप्रमाणें ते राम त्या अंतःपुरांतून बाहेर पडण्याची वाट पहात बसले २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ १७ ॥

अंतःपुरांत गेल्यानंतर आपला पिता दुःखित व दीन झाला असून त्याचें मुख

मुखेन परिशुष्यता १ स पितुश्चरणौ पूर्वमभिवाद्य विनीतवत् । ततो ववन्दे चरणौ कैकेय्याः सुसमाहितः २ रामेत्युक्त्वा तु वचनं बाष्पपर्याकुलेक्षणः । शशाक नृपतिर्दीनो नेक्षितुं नाभिभाषितुम् ३ तदपूर्वं नरपतेर्दृष्ट्वा रूपं भयावहम् । रामोपि भयमापन्नः पदा स्पृष्ट्वेव पन्नगम् ४ इन्द्रियैरप्रहृष्टैस्तं शोकसंतापकर्शितम् । निःश्वसन्तं महाराजं व्यथिताकुलचेतसम् ५ ऊर्मिमालिनमक्षोभ्यं क्षुभ्यन्तमिव सागरम् । उपप्लुतमिवादित्यमुक्तानृतमृषिं यथा ६ अचिन्त्यकल्पं नृपतेस्तं शोकमुपधारयन् । बभूव संरब्धतरः समुद्र इव पर्वणि ७ चिन्तयामास चतुरो रामः पितृहिते रतः । किंस्विदद्यैव नृपतिर्न मां प्रत्यभिनन्दति ८ अन्यदा मां पिता दृष्ट्वा कुपितोपि प्रसीदति । तस्य मामद्य संप्रेक्ष्य किमायासः प्रवर्तते ९ स दीन इव शोकार्तो विषण्णवदनद्युतिः । कैकेयीमभिवाद्यैव रामो वचनमब्रवीत् १०

---

निस्तेज झालें आहे आणि कैकयीसहवर्तमान तो मंचकावर आहे असें त्या रामानें अवलोकन केलें १. तेव्हां प्रथम रामानें पित्याचे चरणाला नम्रपणें अभिवंदन केलें आणि नंतर स्वस्थांतःकरणपूर्वक त्यानें कैकयीचे चरणीं वंदन केलें २. ह्यानंतर दशरथराजा " राम " येवढींच अक्षरें बोलून स्वस्थ राहिला. कारण, अश्रूंनीं डोळे भरून आल्यामुळें व स्वतः दुःखित झाल्यामुळें त्याच्यानें रामाशीं अधिक बोलवेना व वर तोंड करूनही पाहवेना ३. तेव्हां राजाची ती भयकारक अपूर्व मुद्रा अवलोकन करून सर्पाला पादस्पर्श केल्याप्रमाणें रामही भयभीत झाला ४. कारण, इंद्रियें खिन्न होऊन त्या महाराजाचें अंतःकरण क्षुब्ध व व्याकुल झालेलें होतें, शोक व संताप ह्यांनीं तो अगदीं जर्जर झालेला होता ५, स्वभावतः क्षोभरहित असूनही लाटांनीं भरलेल्या सागराप्रमाणें तो क्षुब्ध झालेला होता, ग्रहण लागलेल्या सूर्याप्रमाणें त्याची अवस्था झालेली होती आणि अनृत भाषण केलेल्या ऋषीप्रमाणें त्याचें तेज नाहींसें झालेलें होतें ६. तेव्हां अत्यंत असंभवनीय अशा प्रकारचा तो राजाला शोक होण्याचें कारण काय ह्याचा राम विचार करूं लागला असतां पर्वदिवशीं अधिक क्षुब्ध होणाऱ्या समुद्राप्रमाणें तोही पूर्वीपेक्षां अधिकच क्षुब्ध झाला ७ आणि नंतर पित्याचें हित करण्याविषयीं तत्पर असलेल्या चतुर रामानें मनामध्यें आणिलें " आजच हा राजा अवलोकन करून माझें अभिनंदन कां करीत नाहीं ? ८. पिता जरी क्रुद्ध झाला असला तरी मला अवलोकन करितांक्षणीं तो प्रसन्न होतो असा नेहमींचा अनुभव आहे. तेव्हां आजच मला अवलोकन करूनही त्याला प्रसन्न होण्याला काय आयास पडत आहेत" ?९. ह्यानंतर शोकाकुल झाल्यामुळें मुख खिन्न व निस्तेज होऊन राम दीना-

कच्चिन्मया नापराद्धमज्ञानाद्येन मे पिता । कुपितस्तन्ममाचक्ष्व त्वमेवैनं प्रसादय ११ अप्रसन्नमनाः किं नु सदा मां प्रति वत्सलः । विषण्णवदनो दीनः सदा मां प्रति भाषते १२ शारीरो मानसो वापि कच्चिदेनं न बाधते । संतापो वाभितापो वा दुर्लभं हि सदा सुखम् १३ कच्चिन्न किञ्चिद्भरते कुमारे प्रियदर्शने । शत्रुघ्ने वा महासत्त्वे मातॄणां वा ममाशुभम् १४ अतोषयन्महाराजमकुर्वन्वा पितुर्वचः । मुहूर्तमपि नेच्छेयं जीवितुं कुपिते नृपे १५ यतोमूलं नरः पश्येत्प्रादुर्भावमिहात्मनः । कथं तस्मिन्नवर्तेत प्रत्यक्षे सति दैवते १६ कच्चित्ते परुषं किञ्चिदभिमानात्पिता मम । उक्तो भवत्या रोषेण येनास्य लुलितं मनः १७ एतदाचक्ष्व मे देवि तत्त्वेन परिपृच्छतः । किं निमित्तमपूर्वोयं विकारो मनुजाधिपे १८ एवमुक्ता तु कैकेयी राघवेण महात्मना । उवाचेदं सुनिर्लज्जा धृष्टमात्महितं वचः १९ न राजा कुपितो राम व्यसनं नास्य किंचन । किंचिन्मनो-

---

प्रमाणें कैकयीला अभिवंदन करून ह्मणाला १० " ज्याअर्थी माझा पिता क्रुद्ध झाला आहे त्याअर्थी अज्ञानानें माझ्या हातून कांहीं अपराध घडला नाहींना हें तूं मला सांग आणि तूंच ह्याला प्रसन्न कर ११. माझ्याविषयीं नेहमीं दयाळु असलेल्या पित्याचें मन आजच कां बरें प्रसन्न नाहीं ! खिन्न वदन होऊन व दीन होऊन ज्याअर्थी तो माझ्याशीं बोलत नाहीं त्याअर्थी त्याचें मन प्रसन्न नाहीं हें निश्चित आहे १२. ह्याला कांहीं शारीरिक तापाची अथवा मानसिक व्याधीची पीडा झाली आहे कीं काय ? कारण, नेहमीं सुख असणं दुर्लभ आहे १३. ज्याचें दर्शन प्रिय आहे असा राजकुमार भरत, महाधैर्यवान् शत्रुघ्न, माझ्या माता आणि मी ह्यांपैकीं कोणाचे ठिकाणीं त्याला कांहीं वाईट दिसून येत आहे कीं काय ? १४. राजा जर क्रुद्ध झाला असला तर त्या महाराजाला संतुष्ट केल्यावांचून अथवा त्या पित्याच्या आज्ञाप्रमाणें वागल्यावांचून मी एक क्षणभरही जिवंत रहाण्याची इच्छा करीत नाहीं १५. ज्याच्यापासून आपला जन्म झाला हें समजत आहे तें प्रत्यक्ष दैवत असतांना त्याच्या मनाप्रमाणें कोणता बरें पुरुष वागणार नाहीं ? १६. ज्याअर्थी ह्याचें मन कलुषित झालें आहे त्याअर्थी गर्वाच्या जोरावर रागारागानें तूं माझ्या पित्याला कांहीं कठोर भाषण केलें आहेस कीं काय ? १७. हें मी तुला विचारीत आहे. तर, हे देवि, तूं हें मला खरें खरें सांग. राजाचे ठिकाणीं हा अपूर्व विचार दृष्टोत्पत्तीस येण्याचं काय कारण असावें बरें? " १८. ह्याप्रमाणें महात्मा रघुवंशज राम बोलला असतां अत्यंत निर्लज्ज बनलेली कैकेयी रामाला आपल्या हिताचें व उद्धटपणाचें भाषण करूं लागली

गतं त्वस्य त्वद्भयान्नानुभाषते २० प्रियं त्वामप्रियं वक्तुं वाणी नास्य प्रवर्तते । तदवश्यं त्वया कार्यं यदनेन श्रुतं मम २१ एष मह्यं वरं दत्त्वा पुरा मामभिपूज्य च । स पश्चात्तप्यते राजा यथान्यः प्राकृतस्तथा २२ अतिसृज्य ददानीति वरं मम विशाम्पतिः । स निरर्थं गतजले सेतुं बन्धितुमिच्छति २३ धर्ममूलमिदं राम विदितं च सतामपि । तत्सत्यं न त्यजेद्राजा कुपितस्त्वत्कृते यथा २४ यदि तद्वक्ष्यते राजा शुभं वा यदि वाशुभम् । करिष्यसि ततः सर्वमाख्यास्यामि पुनस्त्वहम् २५ यदि त्वभिहितं राज्ञा त्वयि तन्न विपत्स्यते । ततोहमभिधास्यामि न ह्येष त्वयि वक्ष्यति २६ एतत्तु वचनं श्रुत्वा कैकेय्या समुदाहृतम् । उवाच व्यथितो रामस्तां देवीं नृपसंनिधौ २७ अहोधिङ्नार्हसे देवि वक्तुं मामीदृशं वचः । अहं हि वचनाद्राज्ञः पतेयमपि पावके २८ भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे ।

की १९ "हे रामा, राजा क्रुद्ध झालेला नाहीं व ह्याच्यावर कांहीं संकटही आलेलें नाहीं. ह्याच्या मनामध्यें कांहीं गोष्ट आहे; परंतु तुझ्या भीतीमुळें त्याच्यानें ती बोलवत नाहीं २०. सारांश, तूं ह्याला प्रिय असल्यामुळें तुझ्याशीं अप्रिय भाषण करण्याला ह्याची वाणी प्रवृत्त होत नाहीं; परंतु, ह्यानें जें मला वचन दिलें आहे तें तुला अवश्य शेवटास नेलें पाहिजे २१. ह्यानें आधीं मला वर देऊं करून त्यांच्या योगानें माझा मानही राखिला आणि नंतर हा राजा आतां एकाद्या प्राकृत जनाप्रमाणें पश्चात्ताप करीत बसला आहे २२. ह्या प्रजाधिपतीनें "वर देईन" ह्मणून जर माझ्याशीं प्रतिज्ञा केली आहे तर आतां ह्याचें पश्चात्तापांत पडणें ह्मणजे पाणी निघून गेल्यावर बांध घालण्याची ह्यानें इच्छा करणें त्याप्रमाणेंच निरर्थक आहे २३. हे रामा, सत्य हेंच धर्माचें मूल आहे हेंच सज्जनांना विदित व अभिमत आहे. ह्यास्तव, तुझ्याकरितां हा राजा क्रुद्ध होऊन त्या सत्याचा त्याग करणार नाहीं अशी तूं व्यवस्था कर २४. जे सांगण्याचा राजाचा उद्देश आहे तें शुभ असो अथवा अशुभ असो तूं जर शेवटास नेणार असशील तर मीही पुनरपि तें तुला सर्व सांगेन २५. सारांश, राजाच्या अनुमतीनें मी जें तुला सांगेन तें जर तुझे ठिकाणीं व्यर्थ होणार नसेल ( ह्मणजे तूं जर त्याप्रमाणें वागण्यास तयार असशील ) तर मी तुला सांगेन. ह्याला तुझ्याशीं बोलवणार नाहीं" २६. हे कैकयीनें केलेलें भाषण श्रवण करून दुःखित झालेला राम राजाचे संनिध त्या राजभार्येला ह्मणाला २७ "हे देवि, तुला धिक्कार असो. मला उद्देशून अशा प्रकारचें भाषण करणें तुला योग्य नाहीं. मी राजाच्या सांगण्यावरून अग्नीमध्येंही उडी घालीन २८. तीक्ष्ण विषही भक्षण करीन अथवा गुरु, पिता, राजा

नियुक्तो गुरुणा पित्रा नृपेण च हितेन च २९ तद्ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकाङ्क्षितम् । करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ३० तमार्जवसमायुक्तमनार्यासत्यवादिनम् । उवाच रामं कैकेयी वचनं भृशदारुणम् ३१ पुरा देवासुरे युद्धे पित्रा ते मम राघव । रक्षितेन वरौ दत्तौ सशल्येन महारणे ३२ तत्र मे याचितो राजा भरतस्याभिषेचनम् । गमनं दण्डकारण्ये तव चाद्यैव राघव ३३ यदि सत्यप्रतिज्ञं त्वं पितरं कर्तुमिच्छसि । आत्मानं च नरश्रेष्ठ मम वाक्यमिदं शृणु ३४ संनिदेशे पितुस्तिष्ठ यथानेन प्रतिश्रुतम् । त्वयारण्यं प्रवेष्टव्यं नव वर्षाणि पञ्च च ३५ भरतश्चाभिषिच्येत यदेतदभिषेचनम् । त्वदर्थे विहितं राज्ञा तेन सर्वेण राघव ३६ सप्त सप्त च वर्षाणि दण्डकारण्यमाश्रितः । अभिषेकमिदं त्यक्त्वा जटाचीरधरो भव ३७ भरतः कोसलपतेः प्रशास्तु वसुधामिमाम् । नानारत्नसमाकीर्णां सवाजिरथसंकुलाम् ३८ एतेन त्वां नरेन्द्रोयं

---

आणि माझ्या हिताविषयीं तत्पर असलेल्या ह्यानें आज्ञा केली असतां मी सागरांतही लोटून घेईन २९. तस्मात्, हे देवि, जें कांहीं राजाच्या मनांत असेल तें सांग; मी तें शेंवटास नेण्याची प्रतिज्ञा करीत आहें. राम दोनदां भाषण करीत नसतो " ३०. ह्याप्रमाणें राम ह्मणाला असतां सरळ रीतीनें वागणाऱ्या त्या सत्यवादी रामाला ती दुष्ट कैकेयी अत्यंत कठोर शब्दांनीं ह्मणाली ३१ " हे राघवा, पूर्वीं देवदैत्यांच्या युद्धांमध्यें ह्याला शल्य लागलें असतां तें काढून मीं ह्याचें रक्षण केलें. तेव्हां त्या महासंग्रामामध्यें ह्या तुझ्या पित्यानें मला दोन वर देऊं केले होते ३२; व भरताला राज्याभिषेक आणि तुझें आजच्या आज दंडकारण्यामध्यें गमन ह्मणून ते दोन वर देण्याविषयीं, हे राघवा, मी राजाची प्रार्थना केली आहे ३३. तस्मात्, पित्याची व आपली प्रतिज्ञा खरी करण्याची जर तुला इच्छा असेल तर हें माझें भाषण ऐक ३४. पित्यानें केलेली प्रतिज्ञा शेंवटास नेण्याविषयीं तूं तत्पर हो. सारांश, ह्या तुझ्या पित्यानें मला जर देऊं केल्याप्रमाणें तुला चवदा वर्षे अरण्यामध्यें गेले पाहिजे ३५ आणि हे राघवा, तुझ्याकारितां जी ही अभिषेकसामग्रि राजानें जुळविली आहे त्या सर्व सामग्रीच्या योगानें भरताला अभिषेक झाला पाहिजे ३६. तात्पर्य, ह्या राज्याभिषेकाचा त्याग कर आणि जटा व वल्कलें धारण करून तूं चवदा वर्षेपर्यंत दंडकारण्याच्या आश्रयानें रहा ३७ व नानाप्रकारच्या रत्नांनीं परिपूर्ण आणि अश्व व रथ ह्यांनीं भरलेल्या ह्या कोसलदेशाधिपतीच्या पृथ्वीचें भरताला परिपालन करूं दे ३८. अशा प्रकारचे दोन वर ह्यानें मला दिले आहेत आणि त्यामुळें दयेनें गहिवरून

कारुण्येन समाप्लुतः । शोकैः संक्लिष्टवदनो न शक्नोति निरीक्षितुम् ३९ एतत्कुरु नरेन्द्रस्य वचनं रघुनन्दन । सत्येन महता राम तारयस्व नरेश्वरम् ४० इतीव तस्यां परुषं वदन्त्यां न चैव रामः प्रविवेश शोकम् । प्रविव्यथे चापि महानुभावो राजा च पुत्रव्यसनाभितप्तः ४१ [ ८३० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डेष्टादशः सर्गः ॥१८॥

तदप्रियममित्रघ्नो वचनं मरणोपमम् । श्रुत्वा न विव्यथे रामः कैकेयीं चेदमब्रवीत् १ एवमस्तु गमिष्यामि वनं वस्तुमहं त्वितः । जटाचीरधरो राज्ञः प्रतिज्ञामनुपालयन् २ इदं तु ज्ञातुमिच्छामि किमर्थं मां महीपतिः । नाभिनन्दति दुर्धर्षो यथापूर्वमरिन्दमः ३ मन्युर्न च त्वया कार्यो देवि ब्रूमि तवाग्रतः । गमिष्यामि भव सुप्रीता वनं चीरजटाधरः ४ हितेन गुरुणा पित्रा कृतज्ञेन नृपेण च । नियुज्यमानो विस्रब्धः किं न कुर्यामहं प्रियम् ५ अलीकं मानसं त्वेकं हृदयं दहते मम । स्वयं यन्नाह मां राजा भरतस्याभिषेचनम् ६ अहं हि सीतां राज्यं च प्राणानिष्टान्धनानि च । हृष्टो

---

गेलेला आणि ह्मणूनच शोकामुळें खिन्नवदन झालेला हा राजा तुझ्याकडे पाहण्यास समर्थ होत नाहीं ३९. तस्मात्, हे रघुनंदना रामा, हें राजानें दिलेलें वचन तूं शेंवटास ने आणि ह्या मोठ्या सत्यानें तूं राजाला तार " ४०. ह्याप्रमाणें ती कैकयी कठोर भाषण करीत असतांनाही रामाला वाईट वाटलें नाहीं; परंतु, महाप्रभावी दशरथराजा येणाऱ्या पुत्रवियोगरूप संकटामुळें संतप्त होऊन फारच दुःखित झाला ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ १८ ॥

शत्रूंचा घात करणारा राम तें मरणतुल्य दुःसह भाषण श्रवण करूनही दुःखित न होतां कैकयीला ह्मणाला १ " असें होण्याला कांहीं मी जटा व वल्कलें धारण करून येथून राजाची प्रतिज्ञा शेंवटास जावी ह्या उद्देशानें वनामध्यें वास्तव्य करण्याकरितां जातों २; परंतु, ज्याच्यासमोर जाण्याची इतरांना भीति वाटते असा हा शत्रूंचें दमन करणारा भूपति पूर्वींप्रमाणें माझें अभिनंदन कां करीत नाहीं हें समजण्याची माझी इच्छा आहे ३. हे देवि, तूं क्रुद्ध होऊं नको; तूं प्रसन्न हो; मीं तुझ्या समक्ष वल्कलें व जटा धारण करून वनामध्यें जाईन ४. मित्र, गुरु, पिता आणि कृतज्ञ राजा असा हा मला आज्ञा करूं लागला असतां मी निःशंक होऊन ह्याला प्रिय असलेली कोणती बरें गोष्ट करणार नाहीं ? ५. परंतु भरताला अभिषेक करण्याविषयीं राजानें मला स्वतः सांगितलें नाहीं हें एक दुःख माझ्या मनामध्यें आहे व तें

भ्रात्रे स्वयं दद्यां भरताय प्रचोदितः ७ किं पुनर्मनुजेन्द्रेण स्वयं पित्रा प्रचोदितः । तव च प्रियकामार्थं प्रतिज्ञामनुपालयन् ८ तथाश्वासय ह्रीमन्तं किं त्विदं यन्महीपतिः । वसुधासक्तनयनो मन्दमश्रूणि मुञ्चति ९ गच्छन्तु चैवानयितुं दूताः शीघ्रजवैर्हयैः । भरतं मातुलकुलादद्यैव नृपशासनात् १० दण्डकारण्यमेषोहं गच्छाम्येव हि सत्वरः । अविचार्य पितुर्वाक्यं समावस्तुं चतुर्दश ११ सा हृष्टा तस्य तद्वाक्यं श्रुत्वा रामस्य कैकयी । प्रस्थानं श्रद्दधाना सा त्वरयामास राघवम् १२ एवं भवतु यास्यन्ति दूताः शीघ्रजवैर्हयैः । भरतं मातुलकुलादिहावर्तयितुं नराः १३ तव त्वहं क्षमं मन्ये नोत्सुकस्यविलम्बनम् । राम तस्मादितः शीघ्रं वनं त्वं गन्तुमर्हसि १४ व्रीडान्वितः स्वयं यच्च नृपस्त्वां नाभिभाषते । नैतत्किंचिन्नरश्रेष्ठ मन्युरेषोपनीयताम् १५ यावत्त्वं न वनं यातः पुरादस्मादतित्वरन् । पिता तावन्न

---

माझ्या अंतःकरणाला जाळीत आहे ६. फक्त तूं जरी मला सांगितलेस तरी सीता, राज्य, प्रियप्राण व संपत्ति मी आनंदानें भ्रात्या भरताला स्वतः देईन ७. तेव्हां तुझें प्रिय करण्याचा उद्देश धरून पित्या भूपतीनें स्वतः आज्ञा केली असतां स्वतःची प्रतिज्ञा शेंवटास नेण्याकरितां मी ही गोष्ट करीन ह्यांत काय संशय आहे ! ८. आतां स्वतः ही गोष्ट मला सांगण्याचा संकोच वाटत असल्यामुळें खाली मान घालून बसलेल्या ह्या राजाला तूं धीर दे. हा भूपति खाली मान घालून कां बरें हळू हळू रुदन करीत आहे ? ९. महावेगवान् अश्वावर आरूढ होऊन राजाच्या आज्ञेनें भरताला मतुलगृहाहून आणण्याकरितां आजच दूत जाऊं द्या १०. पित्यानें केलेली आज्ञा युक्त आहे अथवा अयुक्त आहे ह्याचा विचार न करितां हा मी चवदा वर्षेपर्यंत वास्तव्य करण्याच्या उद्देशानें दंडकारण्यामध्यें सत्वर चालता होतों " ११. ह्याप्रमाणें रामाचें तें भाषण श्रवण केल्यावर कैकेयीला आनंद झाला आणि राम आतां खचित जाणार असा विश्वास वाटून ती त्याला गमन करण्याविषयीं त्वरा करूं लागली १२. ( आणि ह्मणाली ) " असें होऊं दे. महावेगवान् अश्वावर आरूढ होऊन भरताला मातुल गृहाहून येथें आणण्याकरितां दूत लोक जातील १३; परंतु, हे रामा, वनांत जाण्याविषयीं उत्सुक झालेल्या तुला आतां विलंब लावणें मला योग्य दिसत नाहीं. तस्मात्, तूं येथून सत्वर वनामध्यें चालता हो १४. हे पुरुषश्रेष्ठा रामा, लज्जित झाल्यामुळें राजाला स्वतः ही गोष्ट तुला सांगतां येत नाहीं. यांत कांहीं विशेष नाहीं. तूं ( आतां विलंब न करितां वनामध्यें चालतां होऊन ) ह्याचा कोप नाहींसा कर १५. हे रामा, जोंपर्यंत ह्या नगरापासून तूं अति

ते राम स्नास्यते भोक्ष्यतेऽपि वा १६ धिक्कष्टमिति निःश्वस्य राजा शोकपरिप्लुतः । मूर्छितो न्यपतत्तस्मिन्पर्यङ्के हेमभूषिते १७ रामोऽप्युत्थाप्य राजानं कैकेय्याभिप्रचोदितः । कशयेव हतो वाजी वनं गन्तुं कृतत्वरः १८ तदप्रियमनार्याया वचनं दारुणोपमम् । श्रुत्वा गतव्यथो रामः कैकेयीं वाक्यमब्रवीत् १९ नाहमर्थपरो देवि लोकमावस्तुमुत्सहे । विद्धि मामृषिभिस्तुल्यं विमलं धर्ममास्थितम् २० यदत्र भवतः किञ्चिच्छक्यं कर्तुं प्रियं मया । प्राणानपि परित्यज्य सर्वथा कृतमेव तत् २१ न ह्यतो धर्मचरणं किञ्चिदस्ति महत्तरम् । यथा पितरि शुश्रूषा तस्य वा वचनक्रिया २२ अनुक्तोऽप्यत्र भवता भवत्या वचनादहम् । वने वत्स्यामि विजने वर्षाणीह चतुर्दश २३ न नूनं मयि कैकेयि किञ्चिदाशंससे गुणान् । यद्राजानमवोचस्त्वं ममेश्वरतरा सती २४ यावन्मातरमापृच्छे सीतां चानुनयाम्यहम् । ततोऽद्यैव गमिष्यामि दण्डकानां महद्वनम् २५ भरतः

---

त्वरा करून वनामध्यें गेला नाहींस तोंपर्यंत तुझा पिता स्नान अथवा भोजन कांहीं एक करणार नाहीं " १६. हें कैकेयीचें भाषण श्रवण केल्यावर " धिक्कार असो ! काय रे दुःखाचा प्रसंग हा "!! असें ह्मणून शोकाकुल झालेला राजा दुःखाचे सुस्कारे टाकूं लागला आणि त्या सुवर्णभूषित मंचकावर मूर्छित होऊन पडला १७. नंतर रामानें दशरथराजाला सावध केलें आणि कैकेयीनें पुनरपि सांगितलें असतां चाबकानें मारिलेल्या घोड्याप्रमाणें वनांत जाण्याविषयीं त्यानें त्वरा केली १८ आणि अप्रिय व परिणामीं भयंकर असें तें दुष्ट कैकेयीचें भाषण श्रवण करूनही कांहीं एक दुःख न झालेला राम कैकेयीला ह्मणाला १९ " हे देवि, मी संपत्तीची आशा धरून ह्या लोकामध्यें वास्तव्य करण्याचें इच्छित नाहीं. मी ऋषिंप्रमाणें निर्मल धर्माचें अवलंबन करून राहिलों आहें हें तूं समजून ठेव २०. त्या राजाचें जें कांहीं प्रिय करणें मला शक्य असेल तें प्राणत्याग करून ही सर्व प्रकारचें केलेंच असें तें समज २१. कारण, पित्याची शुश्रूषा करणें अथवा त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणें ह्यापेक्षां कोणतेंही धर्माचरण श्रेष्ठ नाहीं २२. जरी मला सांगितलें नाहीं तरी तुझ्या सांगण्यावरून मी निर्जन वनामध्यें चवदा वर्षेंपर्यंत वास्तव्य करीन २३. हे कैकेयी, स्वामिणीपेक्षांही तूं मला अधिक असतांना ज्याअर्थी तूं राजापाशीं ही गोष्ट काढिलीस त्याअर्थी माझे ठिकाणीं कांहींच चांगूलपणा तुला दिसत नाहीं काय ? २४. मातेचा निरोप घेऊन सीतेची समजूत घालीपर्यंत तूं धीर धर. हें झाल्यावर मी आजच्या आजच भव्य अशा दंडकारण्यामध्यें चालतां होइन २५. भरत राज्याचें परिपालन करून पित्याच्या शुश्रूषेमध्यें-

पालयेद्राज्यं शुश्रूषेच्च पितुर्यथा । तथा भवत्या कर्तव्यं स हि धर्मः सनातनः २६ रामस्य तु वचः श्रुत्वा भृशं दुःखगतः पिता । शोकादशक्नुवन्वक्तुं प्ररुरोद महास्वनम् २७ वन्दित्वा चरणौ राज्ञो विसंज्ञस्य पितुस्तदा । कैकेय्याश्चाप्यनार्याया निष्पपात महाद्युतिः २८ स रामः पितरं कृत्वा कैकेयीं च प्रदक्षिणम् । निष्क्रम्यान्तःपुरात्तस्मात्स्वं ददर्श सुहृज्जनम् २९ तं बाष्पपरिपूर्णाक्षः पृष्ठतोनुजगाम ह । लक्ष्मणः परमक्रुद्धः सुमित्रानन्दवर्धनः ३० आभिषेचनिकं भाण्डं कृत्वा रामः प्रदक्षिणम् । शनैर्जगाम सापेक्षो दृष्टिं तत्राविचारयन् ३१ न चास्य महतीं लक्ष्मीं राज्यनाशोपकर्षति । लोककान्तस्य कान्तत्वाच्छीतरश्मेरिव क्षयः ३२ न वनं गन्तुकामस्य त्यजतश्च वसुन्धराम् । सर्वलोकातिगस्येव लक्ष्यते चित्तविक्रिया ३३ प्रतिषिध्य शुभं छत्रं व्यजने च स्वलंकृते । विसर्जयित्वा स्वजनं रथं पौरांस्तथा जनान् ३४ धारयन्मनसा दुःखमिन्द्रियाणि निगृह्य च । प्रविवेशात्मवान्वेश्म मातुरप्रियशंसिवान् ३५ सर्वो-

---

तत्पर राहील अशी तूं व्यवस्था कर. कारण, पित्याची शुश्रूषा करणें हा सनातन धर्म आहे " २६. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर अतिशयच दुःखित झालेला पिता दशरथ शोकामुळें बोलण्यास समर्थ न होतां मोठ्या स्वरानें रुदन करूं लागला २७. तेव्हां मूर्छित झालेल्या पित्याच्या चरणांना वंदन करून आणि दुष्ट कैकेयीच्याही चरणांना वंदन करून महातेजस्वी राम तेथून निघाला २८ आणि पित्याला व कैकेयीला प्रदक्षिणा करून त्या अंतःपुरांतून निघाल्यावर रामानें आपल्या मित्रमंडळीला अवलोकन केलें २९. राम अंतःपुरांतून बाहेर निघाल्यावर अश्रूंनीं नेत्र भरून आलेला व सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणारा लक्ष्मण अत्यंत क्रुद्ध होऊन त्याच्या मागोमाग चालला ३०. अभिषेकाकरितां जुळविलेल्या सामग्रीला प्रदक्षिणा करून तिकडे दृष्टि न देतां वनांत जाण्याची अपेक्षा धरून राम हळूं हळूं चालूं लागला ३१. अक्षय कांतीनें युक्त असलेल्या चंद्राची शोभा ज्याप्रमाणें क्षयानें कमी होत नाहीं त्याप्रमाणें एकाएकीं राज्याला मुकण्यानें रामाचे ठिकाणीं स्वाभाविकच असलेलें मोठें सौंदर्य कमी झालें नाहीं ३२. जीवन्मुक्ताचे ठिकाणीं ज्याप्रमाणें चित्तविकार दृष्टोत्पत्तीस येत नाहींत त्याप्रमाणें पृथ्वीचा त्याग करून वनामध्यें जाण्यास उद्युक्त झालेल्या रामाचे ठिकाणीं कांहीं एक मनोविकार दृष्टोत्पत्तीस आला नाहीं ३३. शुभ छत्र व चांगल्याप्रकारें भूषित केलेलीं चामरें टाकून देऊन स्वजन, रथ व पौरजन ह्यांचा निरोप घेऊन ३४ मनामध्यें दुःख आंवरून धरून आणि इंद्रियांचें संयमन करून तो विचारी

प्यभिजनः श्रीमाञ्छ्रीमतः सत्यवादिनः । नालक्षयत रामस्य कंचिदाकारमानने ३६ उचितं च महाबाहुर्न जहौ हर्षमात्मवान् । शारदः समुदीर्णांशुश्चन्द्रस्तेज इवात्मजम् ३७ वाचा मधुरया रामः सर्वं संमानयञ्जनम् । मातुः समीपं धर्मात्मा प्रविवेश महायशाः ३८ तं गुणैः समतां प्राप्तो भ्राता विपुलविक्रमः । सौमित्रिरनुवव्राज धारयन्दुःखमात्मजम् ३९ प्रविश्य वेश्मातिभृशं मुदा युतं समीक्ष्य तां चार्थविपत्तिमागताम् । न चैव रामोऽत्र जगाम विक्रियां सुहृज्जनस्यात्मविपत्तिशङ्कया ४० [ ८६९ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनविंशः सर्गः ॥ १९ ॥

तस्मिंस्तु पुरुषव्याघ्रे निष्क्रामति कृताञ्जलौ । आर्तशब्दो महाञ्जज्ञे स्त्रीणामन्तःपुरे तदा १ कृत्येष्वचोदितः पित्रा सर्वस्यान्तःपुरस्य च । गतिश्च शरणं चासीत्स रामोऽद्य प्रवत्स्यति २ कौसल्यायां यथा युक्तो जनन्यां वर्तते सदा । तथैव वर्ततेऽस्मासु जन्मप्रभृति राघवः ३ न क्रुध्य-

---

राम अप्रिय गोष्ट मातेला विदित करण्याच्या उद्देशानें तिच्या गृहामध्यें प्रविष्ट झाला ३५. तेव्हां अभिषेकोत्सवाकरितां भूषणें धारण करून सभोवता जमलेल्या लोकांना श्रीमान् व सत्यवादी रामाच्या मुखावर कसलाही विकार दिसला नाहीं ३६. इतकेंच नव्हे परंतु, उज्ज्वल किरणांनीं युक्त झालेला शरदृतूंतील चंद्र ज्याप्रमाणें आपलें तेज सोडीत नाहीं त्याप्रमाणें त्या जितेंद्रिय व महापराक्रमी रामानें ( आपल्या स्वाभाविक धैर्याला ) उचित असलेला हर्ष सोडिला नाहीं ३७. असो. मधुरवाणीनें सर्व लोकांचा मान राखीत राखीत तो धर्मात्मा व महायशस्वी राम मातेच्या समीप गेला असतां ३८ गुणांनीं त्याची साम्यता पावलेला महापराक्रमी भ्राता लक्ष्मणही आपलें दुःख आंवरून धरून त्याच्या मागोमाग चालला ३९. ( लोकांना मान देत देत ) तो राम मातेच्या गृहामध्यें प्रविष्ट झाल्यावर तें गृह अत्यंत आनंदित झालेलें आहे असें अवलोकन करून व प्राप्त झालेली ऐश्वर्यहानिही लक्ष्यांत घेऊन ( कौसल्या, दशरथ वगैरे ) सुहृदांना कदाचित् प्राणांतिक दुःख होईल असा विचार मनांत आल्यामुळें रामानें कोणताही विकार दर्शविला नाहीं ४०. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ १९ ॥

तो पुरुषश्रेष्ठ राम हात जोडून बाहेर जाऊं लागला असतां अंतःपुरामध्यें स्त्रियांनीं एकच कल्होळ करून सोडिला १. " सर्व अंतःकरणाचा आश्रय आणि रक्षणकर्ता जो राम तो पित्यानें सांगितलें नसूनही आज वनवासाला जाणार आहे २. जननी कौसल्या हिच्या सेवेविषयीं जसा राम तत्पर असतो तसाच आह्मांविषयींही तो जन्मा-

त्यभिशस्तोपि क्रोधनीयानि वर्जयन् । क्रुद्धान्प्रसादयन्सर्वान्स इतोद्य प्रवत्स्यति ४ अबुद्धिर्बत नो राजा जीवलोकं चरत्ययम् । यो गतिं सर्वभूतानां परित्यजति राघवम् ५ इति सर्वा महिष्यस्ता विवत्सा इव धेनवः । पतिमाचुक्रुशुश्चापि सस्वनं चापि चुक्रुशुः ६ स हि चान्तःपुरे घोरमार्तशब्दं महीपतिः । पुत्रशोकाभिसन्तप्तः श्रुत्वा व्यालीयतासने ७ रामस्तु भृशमायस्तो निःश्वसन्निव कुञ्जरः । जगाम सहितो भ्रात्रा मातुरन्तःपुरं वशी ८ सोपश्यत्पुरुषं तत्र वृद्धं परमपूजितम् । उपविष्टं गृहद्वारि तिष्ठतश्चापरान्बहून् ९ दृष्ट्वैव तु तदा रामं ते सर्वे समुपस्थिताः । जयेन जयतां श्रेष्ठं वर्धयन्ति स्म राघवम् १० प्रविश्य प्रथमां कक्ष्यां द्वितीयायां ददर्श सः । ब्राह्मणान्वेदसंपन्नान्वृद्धान्राज्ञाभिसत्कृतान् ११ प्रणम्य रामस्तान्वृद्धांस्तृतीयायां ददर्श सः । स्त्रियो बालाश्च वृद्धाश्च द्वाररक्षणतत्पराः १२ वर्धयित्वा प्रहृष्टास्ताः प्रविश्य च गृहं स्त्रियः । न्यवेदयन्त त्वरितं राम-

पासून तत्पर आहेच ३. कोणी शिव्या दिल्या असतांही जो रागावत नाहीं आणि दुसऱ्याला क्रोध येण्याचीं कारणें सोडून देऊन जो नेहमीं क्रुद्ध झालेल्यांना प्रसन्न करून घेत असतो तो राम आज प्रवासाला जाणार ४. प्राणिमात्रांचें आश्रयस्थान असलेल्या रामाचा त्याग करणारा हा आमचा राजा खरोखर अविचारी असूनही प्रजा भक्षण करण्यास उद्युक्त झाला आहे " ५. सारांश, वत्सरहित झालेल्या गाईप्रमाणें ज्यांची स्थिति झाली आहे अशा त्या सर्व राजस्त्रिया पतीची निंदा करून मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागल्या ६. तेव्हां अंतःपुरांत झालेला दुःखित जनांचा तो घोर शब्द श्रवण केल्यावर पुत्रशोकानें संतप्त झालेला राजा मंचकांत डोकें खुपसून पडला ७; परंतु, ( स्वजनांना दुःख झाल्यामुळें ) अत्यंत खिन्न झालेला मनोनिग्रही राम हत्तीप्रमाणें सुस्कारे टाकीत भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान मातेच्या अंतःपुरामध्यें गेला ८. तों अत्यंत वृद्ध असा एक पुरुष त्या अंतःपुराच्या द्वाराशीं बसलेला असून इतर पुष्कळ लोक उभे आहेत असें त्यानें अवलोकन केलें ९. ते सर्व लोक राम दृष्टीं पडतांक्षणीं उभे राहिले आणि विजयी व श्रेष्ठ अशा रघुवंशज रामाचा जयजयकार करूं लागले १०. एका चौकांत गेल्यावर दुसऱ्या चौकामध्यें राजानें मानमान्यता राखिलेले असे वैदिक वृद्ध ब्राह्मण त्यानें अवलोकन केले ११ आणि त्या वृद्धांना प्रणाम करून निघाल्यावर तिसऱ्या चौकामध्यें लहानथोर स्त्रिया द्वाररक्षणाविषयीं तत्पर असलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या १२. रामाला अवलोकन केल्यावर त्या स्त्रियांनीं आनंदित होऊन त्याला आशीर्वाद दिले आणि घरांत जाऊन

मातुः प्रियं तदा १३ कौसल्यापि तदा देवी रात्रिं स्थित्वा समाहिता । प्रभाते चाकरोत्पूजां विष्णोः पुत्रहितैषिणी १४ सा क्षौमवसना हृष्टा नित्यं व्रतपरायणा । अग्निं जुहोति स्म तदा मन्त्रवत्कृतमङ्गलम् १५ प्रविश्य तु तदा रामो मातुरन्तःपुरं शुभम् । ददर्श मातरं तत्र हावयन्तीं हुताशनम् १६ देवकार्यनिमित्तं च तत्रापश्यत्समुद्यतम् । दध्यक्षतघृतं चैव मोदकान्हविषस्तथा १७लाजान्माल्यानि शुक्लानि पायसं कृसरं तथा । समिधः पूर्णकुम्भांश्च ददर्श रघुनन्दनः १८ तां शुक्लक्षौमसंवीतां व्रतयोगेन कर्शिताम् । तर्पयन्तीं ददर्शाद्भिर्देवतां वरवर्णिनीम् १९ सा चिरस्यात्मजं दृष्ट्वा मातृनन्दनमागतम् । अभिचक्राम संहृष्टा किशोरं वडवा यथा २० स मातरमुपक्रान्तामुपसंगृह्य राघवः । परिष्वक्तश्च बाहुभ्यामवघ्रातश्च मूर्धनि २१ तमुवाच दुराधर्षं राघवं सुतमात्मनः । कौसल्या पुत्रवात्सल्यादिदं प्रियहितं वचः २२ वृद्धानां धर्मशीलानां राजर्षीणां महात्मनाम् । प्राप्नुह्यायुश्च कीर्तिं च धर्मं चाप्युचितं कुले २३ सत्यप्र-

---

राममातेला ती प्रिय गोष्ट त्यांनीं सत्वर निवेदन केली १३. राजपत्नी कौसल्येनें रात्रीं स्वस्थ राहून पुत्राचें हित व्हावें या उद्देशानें प्रभातसमयीं विष्णूची पूजा केली १४ आणि सोवळ्याचें वस्त्र नेसून समंत्रक स्वस्तिवाचन झालेली व नेहमीं आनंदित व व्रतस्थ असणारी ती कौसल्या अग्नीमध्यें हवन करीत बसली होती १५. मातेच्या शुभ अंतःपुरामध्यें प्रविष्ट झाल्यावर त्या ठिकाणीं माता अग्नीमध्यें ऋत्विजांकडून होम करवीत आहे असें रामाच्या दृष्टीं पडलें १६; देवकार्याकरितां दधि, अक्षता, घृत, मोदक आणि हवि हीं द्रव्यें तेथें सिद्ध ठेविलेलीं त्यानें अवलोकन केलीं १८ आणि लाह्या, श्वेत पुष्पें, पायस, तिलमिश्रित चरु, समिधा व जलपूर्ण कुंभ हीं त्या रघुनंदन रामानें अवलोकन केलीं १८. व्रताचरणानें कृश झालेली आपली माता इष्ट हेतु सिद्धीस नेण्याच्या उद्देशानें पांढरी पैठणी नेसून देवतेचें तर्पण करीत आहे असें रामानें अवलोकन केल्यावर १९ मातेला आनंद देणारा पुत्र आलेला पाहून घोडी ज्याप्रमाणें शिंगराकडे वळते त्याप्रमाणें ती आनंदानें रामाचे संमुख आली २०. तेव्हां आपल्याकडे आलेल्या मातेला रामानें अभिवंदन केल्यावर तिनेंही त्याला हातांनीं कवटाळून धरून त्याचें मस्तक हुंगलें २१ आणि ती कौसल्या आपल्या अजिंक्य रघुवंशज पुत्राला प्रिय आणि हितावह शब्दांनीं पुत्रप्रेमामुळें म्हणाली २२ " वृद्ध आणि धर्मनिष्ठ अशा माहात्म्या राजर्षींचें आयुष्य, कीर्ति आणि कुलाला उचित असा धर्म हीं तुला प्राप्त होवोत २३. हे राघवा, पहा तुझा पिता भूपति कसा

तिष्ठं पितरं राजानं पश्य राघव । अद्यैव त्वां स धर्मात्मा यौवराज्येऽभिषे- क्ष्यति २४ दत्तमासनमालभ्य भोजनेन निमन्त्रितः । मातरं राघवः किंचि- त्प्रसार्याञ्जलिमब्रवीत् २५ स स्वभावविनीतश्च गौरवाच्च तथानतः । प्रस्थितो दण्डकारण्यमाप्रष्टुमुपचक्रमे २६ देवि नूनं न जानीषे महद्भयमुपस्थितम् । इदं तव च दुःखाय वैदेह्या लक्ष्मणस्य च २७ गमिष्ये दण्डकारण्यं किम- नेनासनेन मे । विष्टरासनयोग्यो हि कालोऽयं मामुपस्थितः २८ चतुर्दशहि वर्षाणि वत्स्यामि विजने वने । कन्दमूलफलैर्जीवन्हित्वा मुनिवदामिषम् २९ भरताय महाराजो यौवराज्यं प्रयच्छति । मां पुनर्दण्डकारण्यं विवासयति तापसम् ३० स षट्चाष्टौ च वर्षाणि वत्स्यामि विजने वने । आसेवमानो वन्यानि फलमूलैश्च वर्तयन् ३१ सा निकृत्तेव सालस्य यष्टिः परशुना वने । पपात सहसा देवी देवतेव दिवश्च्युता ३२ तामदुःखोचितां दृष्ट्वा पतितां कदलीमिव । रामस्तूत्थापयामास मातरं गतचेतसम् ३३ उपावृत्यो-

---

सत्यवचनी आहे तो !! तो धर्मात्मा आजच तुला यौवराज्याचा अभिषेक करील २४. आतां तूं येथेंच भोजन करून राजदर्शनाला जा. " असें सांगून कौसल्येनें रामाला आसन दिलें; परंतु, त्याच्यावर न बसतां केवल स्पर्श करून व जोडिलेले हात थोडेसे पुढें करून मातेशीं राम भाषण करूं लागला २५. सारांश, स्वभावतःच विनयी आणि मातेचे ठिकाणीं पूज्य बुद्धि असल्यामुळें अधिकच नम्र झालेला आणि दंडकारण्यामध्यें निघालेला तो राम मातेचा निरोप घेऊं लागला कीं २६ " हे देवि, खरोखर तुला कांहीं माहीतच नाहीं काय ? हें एक मोठें भय तूं, विदेहराजकन्या आणि लक्ष्मण ह्यांच्या दुःखाकरितां उपस्थित झालें आहे २७. मी दंडकारण्यामध्यें जाणार. मला ह्या आस- नाचा काय उपयोग ? आतां हा दर्भासनावर बसण्याचा समय मला प्राप्त झाला आहे २८. मी आतां मुनीप्रमाणें मिष्टान्न वर्ज्य करून कंद मुळें व फळें ह्यांवर उप- जीविका करीत चवदा वर्षेपर्यंत निर्जन वनामध्यें वास्तव्य करणार २९. महाराज भर- ताला यौवराज्य देत असून मला गरीबाला दंडकारण्यामध्यें हांकून लावीत आहेत ३०. तस्मात्, चवदा वर्षेपर्यंत फलमूलांवर उपजीविका करून आणि वानप्रस्थांना योग्य अशा कर्मांचें अवलंबन करून मी चवदा वर्षें निर्जनवनामध्यें वास्तव्य करणार " ३१. ( हे पुत्राचे शब्द ऐकून ) कुऱ्हाडीनें तोडिलेली साल वृक्षाची फांदी जशी वनामध्यें पडते तशी स्वर्गांतून च्युत झालेल्या देवतेप्रमाणें ती राजपत्नी कौसल्या एकाएकीं भूमीवर पडली ३२. तेव्हां दुःख भोगण्याची संवय नसलेली आपली माता मूर्छित होऊन केळाप्रमाणें पडलेली अवलोकन केल्याबरोबर रामानें तिला उठविलें ३३ आणि

स्थितां दीनां वडवामिव वाहिताम् । पांसुगुण्ठितसर्वाङ्गीं विममर्श च पाणिना ३४ सा राघवमुपासीनमसुखार्ता सुखोचिता । उवाच पुरुषव्याघ्रमुपशृण्वति लक्ष्मणे ३५ यदि पुत्र न जायेथा मम शोकाय राघव । न स्म दुःखमतो भूयः पश्येयमहमप्रजा ३६ एकएव हि वन्ध्यायाः शोको भवति मानसः । अप्रजास्मीति सन्तापो न ह्यन्यः पुत्र विद्यते ३७ न दृष्टपूर्वं कल्याणं सुखं वा पतिपौरुषे । अपि पुत्र विपश्येयमिति रामास्थितं मया ३८ सा बहून्यमनोज्ञानि वाक्यानि हृदयच्छिदाम् । अहं श्रोष्ये सपत्नीनामवराणां परा सती ३९ अतो दुःखतरं किन्नु प्रमदानां भविष्यति । मम शोको विलापश्च यादृशोयमनन्तकः ४० त्वयि सन्निहितेप्येवमहमास्मं निराकृता । किं पुनः प्रोषिते तात ध्रुवं मरणमेव हि ४१ अत्यन्तं निगृहीतास्मि भर्तुर्नित्यमसंमता । परिवारेण कैकेय्याः समा वाप्यथवावरा ४२ यो हि मां सेवते कश्चिदपि वाप्यनुवर्तते । कैकेय्याः पुत्रम-

---

पूर्वी भार वाहून थकवा आल्यावर त्याचा परिहार करण्याकरितां भूमीवर लोळून उठलेल्या घोडीप्रमाणें सर्वांग धुळीनें भरलेल्या त्या दीन मातेला त्यानें हस्तानें स्पर्श केला ३४. तेव्हां सुखाची सवय झालेली असून दुःखाकुल झालेली ती कौसल्या समीप बसलेल्या पुरुषश्रेष्ठ रामाला, लक्ष्मण एकत असतांना, ह्मणाली ३५ " हे राघवा, माझ्या शोकाकरितां जर तूं उत्पन्न झालाच नसतास तर मी वंध्या आहे ह्यापेक्षां अधिक दुःख पहाण्याची मला पाळी आली नसती ३६. वंध्या स्त्रीच्या मनाला " मी वंध्या आहें " येवढेंच वाईट वाटत असतें. हे पुत्रा, तिला दुसरें कसलेंही दुःख नसतें ३७. हे रामा, पतीच्या प्रेमामुळें होणारें सुख आजपर्यंत मला जरी प्राप्त झालें नाहीं आणि ( उत्कृष्ट वस्त्रांची वगैरे ) हौस जरी मला आजपर्यंत पुरवून घेतां आली नाहीं तरी माझ्या पुत्राच्या कारकीर्दीमध्यें ह्या गोष्टी मला पहावयास सांपडतील असा विचार करून, हे रामा, मी आजपर्यंत कुडींत प्राण धरून राहिलें आहें ३८. तेव्हां जिनें असे दिवस काढिले तिला कनिष्ठ सवतींच्या मर्जीमध्यें राहून अंतःकरणाला घरें पाडणारीं भाषणें ऐकून घेण्याचा आतांही प्रसंग येणार ३९. अरे, मला अशा प्रकारचा अक्षय शोक व विलाप करीत बसण्याचा प्रसंग आलेला आहे. ह्यापेक्षां स्त्रियांना अधिक दुःखदायक अशी कोणती बरें गोष्ट आहे ? ४०. अरे तूं जवळ असतांनाही जर माझा असा सवत अपमान करीत असते तर, बाबा, तूं वनामध्यें गेल्यावर मला मरण येणार हेंच निश्चित आहे ४१. भर्त्याची मर्जी माझ्यावर कधींच नसल्यामुळें कैकेयीच्या दासीप्रमाणें अथवा दासीपेक्षांही कमी समजून माझा अतिशय अपमान

न्वीक्ष्य स जनो नाभिभाषते ४३ नित्यक्रोधतया तस्याः कथं नु खर-वादिनम् । कैकेय्या वदनं द्रष्टुं पुत्र शक्ष्यामि दुर्गता ४४ सप्त दश च वर्षाणि जातस्य तव राघव । अतीतानि प्रकाङ्क्षन्त्या मया दुःखपरि-क्षयम् ४५ तदक्षयं महद्दुःखं नोत्सहे सहितुं चिरात् । विप्रकारं सपत्नी-नामेवं जीर्णापि राघव ४६ अपश्यन्ती तव मुखं परिपूर्णशशिप्रभम् । कृपणा वर्तयिष्यामि कथं कृपणजीविका ४७ उपवासैश्च योगैश्च बहुभिश्च परिश्रमैः । दुःखसंवर्धितो मोघं त्वं हि दुर्गतया मया ४८ स्थिरं नु हृदयं मन्ये ममेदं यन्न दीर्यते । प्रावृषीव महानद्याः स्पृष्टं कूलं नवाम्भसा ४९ ममैव नूनं मरणं न विद्यते न चावकाशोऽस्ति यमक्षये मम । यदन्तकोऽद्यैव न मां जिहीर्षति प्रसह्य सिंहो रुदतीं मृगीमिव ५० स्थिरं हि नूनं हृदयं ममा-यसं न भिद्यते यद्भुवि नो विदीर्यते । अनेन दुःखेन च देहमर्पितं ध्रुवं ह्यकाले मरणं न विद्यते ५१ इदं तु दुःखं यदनर्थकानि मे व्रतानि दानानि

---

होत असतो ४२. जो माझी सेवा करीत असतो किंवा जो कोणी माझ्या मनाप्रमाणें वागत असतो तो सुद्धां कैकयीचा पुत्र आलेला पाहून माझ्याशीं बोलेनासा होतो ४३ तस्मात्, अशी विपन्न स्थिति मला प्राप्त झाली असतांना, हे पुत्रा, नेहमींच्या रागीटपणामुळें मर्मभेदक भाषण करणारें कैकयीचें तोंड माझ्यानें कसें रे पहावेल ? ४४. हे राघवा, आपल्या दुःखाचा परिहार आज होईल उद्यां होईल अशी वाट पहात पहात तुझ्या जन्मापासून सात दहा आणि दहा ( अशीं सत्तावीस ) वर्षें गेलीं ४५ आणि, हे राघवा, मी जरी अशी थकलेली आहे तरी सवतीनें केलेला अपमान मला आतां सहन करावासा वाटत नाहीं ४६. पूर्ण चंद्राप्रमाणें असलेलें तुझें मुख दृष्टी-आड झालें असतां मीं बिचारीनें दुःखद रीतीनें उपजीविका करून कसे बरें दिवस कंठावेत ? ४७. अतिशयच परिश्रम घेऊन मीं जीं उपोषणें केलीं आणि देवांचीं चिंतनें केलीं व अशा रीतीनें मी भाग्यहीन स्त्रीनें जें दुःख भोगून तुझें पोषण केलें तें व्यर्थच झालें ४८. वर्षाकालीं नवीन उदकाचा स्पर्श झालेल्या महानदीच्या तीराप्रमाणें ज्याअर्थी हें माझें हृदय विदीर्ण होऊन जात नाहीं त्याअर्थी तें मोठें कठिण आहे असें मला वाटतें ४९. अरे, शोक करीत बसलेल्या हरणीला एकाएकीं उचलून नेणाऱ्या सिंहाप्रमाणें मृत्यु मला नेण्याचें मनांत आणित नाहीं ह्यावरून मी अमर आहें व यमाच्या घरीं मला जागा नाहीं ( हेंच खरें ) ५०. खरोखर माझें हृदय ज्याअर्थी ह्या प्रसंगीं फाटून जात नाहीं त्याअर्थी तें लोखंडाचें बनविल्याप्रमाणें बळकट आहे आणि अशा प्रकारच्या दुःखानें देह व्याप्त झाला असतांनाही ज्याअर्थी तो विदीर्ण होऊन पृथ्वीवर पडत नाहीं

च संयमाश्च हि । तपश्च तप्तं यदपत्यकाम्यया सुनिष्फलं बीजमिवोप्तमूषरे ५२ यदि ह्यकाले मरणं यदृच्छया लभेत कश्चिद्गुरुदुःखकर्शितः । गताहमद्यैव परेतसंसदं विना त्वया धेनुरिवात्मजेन वै ५३ अथापि किं जीवितमद्य मे वृथा त्वया विना चन्द्रनिभाननप्रभ । अनुव्रजिष्यामि वनं त्वयैव गौः सुदुर्बला वत्समिवाभिकाङ्क्षया ५४ भृशमसुखममर्षिता यदा बहु विललाप समीक्ष्यराघवम् । व्यसनमुपनिशाम्य सा महत्सुतमिवबद्धमवेक्ष्य किन्नरी ५५ [९२४] इत्यार्षे श्रीमद्रामायणेवाल्मीकीयआदिकाव्येयोध्याकाण्डे विंशः सर्गः ॥ २० ॥

तथा तु विलपन्तीं तां कौसल्यां राममातरम् । उवाच लक्ष्मणो दीनस्तत्कालसदृशं वचः १ न रोचते ममाप्येतदार्ये यद्राघवो वनम् । त्यक्त्वा राज्यश्रियं गच्छेत्स्त्रियावाक्यवशंगतः २ विपरीतश्च वृद्धश्च

त्याअर्थी अकालीं मरण कोणाला येत नाहीं हेंच निश्चित आहे ५१. व्रतें, दानें व संयमनें व्यर्थ होऊन पुत्राकरितां केलेलें तपही उखीर जमीनींमधे पेरलेल्या बीजाप्रमाणें अगदीं निष्फल झालें ही फारच दुःखाची गोष्ट आहे ५२. मोठ्या दुःखानें जर्जर झालेल्या एकाद्याला जर स्वेच्छेनें अकालीं मरण प्राप्त होत असत तर वत्साचा वियोग झालेल्या धेनूप्रमाणें तुझा वियोग झालेली मी आजच्या आजच यमाच्या घरीं चालती झालें असतें ५३. तथापि, हे इंदुवदना, तुझ्यावांचून आज हें माझें निंद्य जीवन व्यर्थ आहे करितां अतिशय थकलेली गायही वात्सल्यामुळें जशी आपल्या वासराच्या मागोमाग वनामध्यें जाते त्याप्रमाणें मी अशी थकलेली असतांनाही तुझ्या मागोमाग वनामध्यें येईन ५४. अतिशय दुःख सहन होईनासें होऊन आणि सवतीमुळें आपणांला आणखीही मोठें दुःख प्राप्त झालें आहे हें अवलोकन करून व आपला पुत्र राघव सत्यपाशानें बद्ध झाला आहे हें मनांत आणून अशा प्रकारें दुःखित झालेल्या किन्नरीप्रमाणें ती कौसल्या फारच विलाप करूं लागली ५५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २० ॥

ह्याप्रमाणें विलाप करीत असलेल्या त्या राममाता कौसल्येला अवलोकन करून लक्ष्मण दीन झाला आणि त्या समयालाच शोभणाऱ्या अशा शब्दांनीं तिला ह्मणाला १ " हे माते, राज्यलक्ष्मीचा त्याग करून राघव वनामध्यें जाणार आहे हें मलाही नीट दिसत नाहीं. स्त्रीच्या भाषणाला वश झालेला २, विषयांच्या तावडींत सांपडलेला आणि बुद्धीला विपर्यास पडलेला हा विषयी व वृद्ध राजा कैकेयी प्रेरणा

विषयैश्च प्रधर्षितः । नृपः किमिव न ब्रूयाच्चोद्यमानः समन्मथः ३ नास्यापराधं पश्यामि नापि दोषं तथाविधम् । येन निर्वास्यते राष्ट्राद्वनवासाय राघवः ४ न तं पश्याम्यहं लोके परोक्षमपि यो नरः । स्वमित्रोपि निरस्तोपि योस्य दोषमुदाहरेत् ५ देवकल्पमृजुं दान्तं रिपूणामपिवत्सलम् । अवेक्षमाणः को धर्मं त्यजेत्पुत्रमकारणात् ६ तदिदं वचनं राज्ञः पुनर्बाल्यमुपेयुषः । पुत्रः को हृदये कुर्याद्राजवृत्तमनुस्मरन् ७ यावदेव न जानाति कश्चिदर्थमिमं नरः । तावदेव मया सार्धमात्मस्थं कुरु शासनम् ८ मया पार्श्वे सधनुषा तव गुप्तस्य राघव । कः समर्थोधिकं कर्तुं कृतान्तस्येव तिष्ठतः ९ निर्मनुष्यामिमां सर्वामयोध्यां मनुजर्षभ । करिष्यामि शरैस्तीक्ष्णैर्यदि स्थास्यति विप्रिये १० भरतस्याथ पक्ष्योवा यो वास्य हितमिच्छति । सर्वांस्तांश्च वधिष्यामि मृदुर्हि परिभूयते ११ प्रोत्साहितोयं कैकेय्या सन्तुष्टो यदि नः पिता । अमित्रभूतो निःसङ्गं बध्यतां वध्यतामपि १२ गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः । उत्पथं प्रतिपन्नस्य

---

करूं लागली असतां कोणती बरें बडबड करणार नाहीं ? ३. दशरथ रामाला राष्ट्रांतून हांकून देऊन वनवासांत पाठवीत आहे अशाप्रकारचा अपराध अथवा दोष रामानें केल्याचें माझ्या दृष्टोत्पत्तीस येत नाहीं ४. आपमान करून सोडिलेला हाडवैरी जरी झाला तरी रामाच्या मागेसुद्धां त्याचा दोष काढणारा पुरुष ह्या जगतामध्यें कोणी असेलसा मला दिसत नाहीं ५. सारांश, देवतुल्य, सुशिक्षित आणि शत्रूंनाही प्रिय अशा पुत्राचा निष्कारण त्याग करण्यास कोण बरें धर्माकडे लक्ष्य देणारा पुरुष उद्युक्त होईल ? ६ आणि पूर्वीच्या राजांचें वर्तन लक्ष्यांत घेणारा कोणता बरें पुत्र पोरकटपणा करणाऱ्या ह्या राजाच्या वचनाला मान देईल ? ७. तस्मात्, ही गोष्ट बाहेर कोणाला समजली नाहीं तोंच माझ्या साहाय्यानें तूं राज्यकारभार आपल्याकडे घे ८. हे राघवा, कालाप्रमाणें मी तुझ्या पाठीमागें धनुष्य घेऊन रक्षण करीत असतांना कोण बरें तुझ्याशीं अतिप्रसंग करण्यास समर्थ आहे ? ९. ही अयोध्या जरी विरुद्ध झाली तरी, हे पुरुषश्रेष्ठा, तीक्ष्ण बाणांनीं मी ती सर्व निर्जन करून टाकीन १० आणि भरताच्या बाजूचा अथवा त्याचें हित इच्छिणारा जो कोणी असेल त्या सर्वांचा मी वध करीन. कारण, मऊ सांपडलें ह्मणजे लोक कोपरानें खणूं लागतात ११. कैकेयीनें प्रोत्साहन दिल्यामुळें तिच्यावर संतुष्ट होऊन पिता जर आमचा शत्रु झाला असेल तर कांहीं एक विचार न करितां ह्याला बांधून टाकण्याला अथवा ह्याचा वध करण्यालाही कांहीं चिंता नाहीं १२. कारण, चढून जाऊन कार्याकार्य विवेक न

कार्यं भवति शासनम् १३ बलमेष किमाश्रित्य हेतुं वा पुरुषोत्तम। दातुमिच्छति कैकेय्यै उपस्थितमिदं तव १४ त्वया चैव मया चैव कृत्वा वैरमनुत्तमम्। कास्य शक्तिः श्रियं दातुं भरतायारिशासन १५ अनुरक्तोऽस्मि भावेन भ्रातरं देवि तत्त्वतः। सत्येन धनुषा चैव दत्तेनेष्टेन ते शपे १६ दीप्तमग्निमरण्यं वा यदि रामः प्रवेक्ष्यति। प्रविष्टं तत्र मां देवि त्वं पूर्वमवधारय १७ हरामि वीर्याद्दुःखं ते तमः सूर्य इवोदितः। देवी पश्यतु मे वीर्यं राघवश्चैव पश्यतु १८ हनिष्ये पितरं वृद्धं कैकेय्यासक्तमानसम्। कृपणं च स्थितं बाल्ये वृद्धभावेन गर्हितम् १९ एतत्तु वचनं श्रुत्वा लक्ष्मणस्य महात्मनः। उवाच रामं कौसल्या रुदती शोकलालसा २० भ्रातुस्ते वदतः पुत्र लक्ष्मणस्य श्रुतं त्वया। यदत्रानन्तरं तत्त्वं कुरुष्व यदि रोचते २१ न चाधर्म्यं वचः श्रुत्वा सपत्न्या मम भाषितम्। विहाय शोकसन्तप्तां गन्तुमर्हसि मामितः २२ धर्मज्ञ इति धर्मिष्ठ धर्मं चरितु-

राहिल्यामुळें उन्मार्गाला प्रवृत्त झालेल्या गुरूलाही शासन करणें अवश्य आहे १३. हे पुरुषोत्तमा, न्यायानें तुला प्राप्त झालेलें हें राज्य हा राजा आज कोणाच्या जोरावर अथवा कोणता हेतु मनांत धरून कैकेयीच्या स्वाधीन करण्याची इच्छा करीत आहे ? १४. हे शत्रुदमना, तुझ्याशीं व माझ्याशीं मोठें वैर बांधून भरताला राज्यलक्ष्मी देण्याला ह्याचें काय सामर्थ्य लागून गेलें आहे ? १५. हे देवि, मी मनापासून आपल्या भ्रात्यावर प्रेम करीत आहें हें मी तुला सत्य, धनुष्य, दान आणि यज्ञयाग ह्यांची शपथ घेऊन सांगत आहें १६. हे देवि, प्रदीप्त अग्नीमध्यें अथवा अरण्यामध्यें जर राम प्रवेश करणार असला तर त्या ठिकाणीं मी आधींच प्रविष्ट होईन हें तूं समजून ऐस १७. उदय पावलेला सूर्य ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश करितो त्याप्रमाणें मी आपल्या सामर्थ्यानें तुझ्या दुःखाचा नाश करून टाकितों. राघवाला आणि देवीला एकदां माझें सामर्थ्य दृष्टीं पडू देच १८. वृद्धपणामुळें विचारशून्य होऊन कैकेयीचे ठिकाणींच मन गुंतल्यामुळें पोरकटपणा धरून शोचनीय झालेल्या ह्या वृद्ध पित्याचा मी आज बंदोबस्त करितों " १९. हे महात्म्या लक्ष्मणाचें भाषण श्रवण करून रडत असलेली ती शोकाकुल झालेली कौसल्या रामाला ह्मणाली २० " हे पुत्रा, तुझा भ्राता लक्ष्मण बोलत असतांना तूं एकिलेंच आहेस. ह्याकरितां, आतां ह्यानंतर जर तुला त्याचें बोलणें उचित दिसत असेल तर तूं त्याप्रमाणें कर २१. माझ्या सवतीनें उच्चारिलेलें धर्मविरुद्ध भाषण श्रवण केल्यावर शोक संतप्त झालेल्या माझा त्याग करून येथून जाणें तुला योग्य नाहीं २२. हे धर्मनिष्ठा, तूं धर्मवेत्ता

मिच्छसि । शुश्रूष मामिहस्थस्त्वं चर धर्ममनुत्तमम् २३ शुश्रूषुर्जननीं पुत्र स्वगृहे नियतो वसन् । परेण तपसा युक्तः काश्यपस्त्रिदिवं गतः २४ यथैव राजा पूज्यस्ते गौरवेण तथा ह्यहम् । त्वां साहं नानुजानामि न गन्तव्यमितोवनम् २५ त्वद्वियोगान्न मे कार्यं जीवितेन सुखेन च । त्वया सह मम श्रेयस्तृणानामपि भक्षणम् २६ यदि त्वं यास्यसि वनं त्यक्त्वा मां शोकलालसाम् । अहं प्रायमिहासिष्ये न च शक्ष्यामि जीवितुम् २७ ततस्त्वं प्राप्स्यसे पुत्र निरयं लोकविश्रुतम् । ब्रह्महत्यामिवाधर्मात्समुद्रः सरितां पतिः २८ विलपन्तीं तथा दीनां कौसल्यां जननीं ततः । उवाच रामो धर्मात्मा वचनं धर्मसंहितम् २९ नास्ति शक्तिः पितुर्वाक्यं समतिक्रमितुं मम । प्रसादये त्वां शिरसा गन्तुमिच्छाम्यहं वनम् ३० ऋषिणा च पितुर्वाक्यं कुर्वता वनचारिणा । गौर्हता जानता धर्मं कण्डुना च विपश्चिता ३१ अस्माकं तु कुले पूर्वं सगरस्याज्ञया पितुः । खनद्भिः

---

आहेस ह्मणून ( आज्ञापरिपालनरूप ) धर्मच आचरण करण्याची जर तुझी इच्छा असेल तर ( राज्याचा त्याग करून ) तूं येथेंच रहा आणि माझी शुश्रूषा कर आणि मातृशुश्रूषारूप उत्कृष्ट धर्माचें तूं आचरण कर २३. हे पुत्रा, मातेची शुश्रूषा करण्याच्या उद्देशानें स्वगृहींच शुद्ध राहून वास्तव्य करणारा काश्यप मोठ्या तपश्चर्येनें युक्त होऊन ( ह्मणजे मोठ्या तपश्चर्येप्रमाणें मातृसेवेचें फल प्राप्त होऊन ) स्वर्गाला गेला २४. ज्याप्रमाणें राजा तुला पूज्य आहे त्याप्रमाणें श्रेष्ठपणामुळें मीही तुला पूज्य आहे. ' तस्मात्, मी तुला अनुज्ञा देत नाहीं; व तूं येथून वनामध्यें जाऊं नको २५. तुझा वियोग झाल्यावर सुखाशीं आणि जीविताशीं तरी मला काय करावयाचें आहे ? तृण भक्षण करूनही तुझ्यासहवर्तमान राहण्यांत माझें कल्याण आहे २६. ह्यावर शोकाकुल झालेल्या माझा त्याग करून जर तूं वनांत जाशील तर मी अन्नपाणी सोडून मरणाच्या द्वारीं बसेन; ( तुझा वियोग झाला असतां ) जीव ठेवण्यास मी समर्थ होणार नाहीं २७. असें झालें असतां सिंधुपति समुद्राला ( मातेला दुःख देणें ह्या ) अधर्मामुळें जसें ब्रह्महत्येचें पातक प्राप्त झालें तसा, हे पुत्रा, लोकविख्यात नरक तुला प्राप्त होईल " २८. ह्याप्रमाणें दीन होऊन विलाप करीत असलेल्या कौसल्या नांवाच्या मातेला धर्मात्मा राम धर्माला अनुसरून असलेल्या शब्दांनीं ह्मणाला २९ " पित्यानें जें सांगितलें त्याचें उल्लंघन करण्याचें मला सामर्थ्य नाहीं. मी चरणीं मस्तक ठेऊन तुझी प्रार्थना करितों ; माझी वनांत जाण्याची इच्छा आहे ३०. वनामध्यें संचार करणाऱ्या धर्मज्ञ व विचारी कंडुऋषीनीं पित्याची आज्ञा परिपालन करण्याकरितां गोवध

सागरैर्भूमिमवाप्तः सुमहान्वधः ३२ जामदग्न्येन रामेण रेणुका जननी स्वयम् । कृत्ता परशुनारण्ये पितुर्वचनकारणात् ३३ एतैरन्यैश्च बहुभिर्दिवि देवसमैः कृतम् । पितुर्वचनमक्लीबं करिष्यामि पितुर्हितम् ३४ न खल्वेतन्मयैकेन क्रियते पितृशासनम् । एतैरपि कृतं देवि ये मया परिकीर्तिताः ३५ नाहं धर्ममपूर्वं ते प्रतिकूलं प्रवर्तये । पूर्वैरयमभिप्रेतो गतो मार्गोनुगम्यते ३६ तदेतत्तु मया कार्यं क्रियते भुवि नान्यथा । पितुर्हि वचनं कुर्वन्न कश्चिन्नाम हीयते ३७ तामेवमुक्त्वा जननीं लक्ष्मणं पुनरब्रवीत् । वाक्यं वाक्यविदां श्रेष्ठ श्रेष्ठः सर्वधनुष्मताम् ३८ तव लक्ष्मण जानामि मयि स्नेहमनुत्तमम् । विक्रमं चैव सत्त्वं च तेजश्च सुदुरासदम् ३९ मम मातुर्महद्दुःखमतुलं शुभलक्षण । अभिप्रायं न विज्ञाय सत्यस्य च शमस्य च ४० धर्मो हि परमो लोके धर्मे सत्यं प्रतिष्ठितम् । धर्मसंश्रितमप्येतत्पितुर्वचनमुत्तमम् ४१ संश्रुत्य च पितुर्वाक्यं मातुर्वा ब्राह्मणस्य वा ।

---

केला ३१ आणि आमच्या कुलामध्येंही पित्या सगराच्या आज्ञेनें भूमि खणूं लागलेल्या सगर पुत्रांना अत्यंत घोर वध प्राप्त झाला ३२ व पित्याच्या सांगण्यामुळें जमदग्निपुत्र परशुरामानें तर अरण्यामध्यें कुऱ्हाडीनें स्वतः आपली जननी रेणुका तोडून टाकिली ३३. ह्यांनीं व स्वर्गांतील देवांप्रमाणें असलेल्या इतरही पुष्कळांनीं ज्याप्रमाणें पित्याचें हित केलें त्याप्रमाणें मी न भितां पित्याचें सांगणें शेवटास नेऊन त्याचें हित करीन ३४. हे देवि, मी एकटाच आज पित्याची आज्ञा परिपालन करीत आहें अशांतली गोष्ट नाहीं ; मीं जें तुला सांगितलें ह्यांनींही तसें केलें आहे ३५. तुला प्रतिकूल असा कांहीं नवीन धर्म मी आज प्रवृत्त करीत नाहीं. पूर्वींच्या लोकांना अभिमत असून त्यांनीं आचरिलेल्या ह्या मार्गानेंच मी जात आहें ३६. तस्मात् , भूलोकामध्यें करण्याला उचित असेंच पित्याचें वचन मी करीत आहें, भलतेंच कांहीं कृत्य मी करीत नाहीं. पित्याच्या सांगण्याप्रमाणें वागण्यानें कोणाचीही हानि होत नाहीं " ३७. ह्याप्रमाणें त्या मातेला सांगून संभाषण करणाऱ्यांमध्यें आणि सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असा राम पुनरपि लक्ष्मणाला ह्मणाला ३८ " लक्ष्मणा, माझे ठिकाणीं तुझें उत्कृष्ट प्रेम, पराक्रम, धैर्य आणि दुसऱ्याला सहन होण्यास अतिशयच कठिण असें तुझें तेज हीं सर्व मी जाणीत आहें ३९. हे सुलक्षणा लक्ष्मणा, सत्य आणि शम ह्यांचें तत्त्व विदित नसल्यामुळें माझ्या मातेला मोठें अनुपम दुःख झालेलें आहे ४०. ह्या जगतामध्यें धर्म श्रेष्ठ असून धर्माच्याच आधारावर सत्य आहे आणि माझ्या पित्याचें हें उत्कृष्ट वचनही धर्मालाच अनुसरून आहे ४१. करितां, हे वीरा, सांगण्याप्रमाणें वागेन असें

न कर्तव्या वृथा वीर धर्ममाश्रित्य तिष्ठता ४२ सोऽहं न शक्ष्यामि पुनर्नियोगमतिवर्तितुम्। पितुर्हि वचनाद्वीर कैकेय्याहं प्रचोदितः ४३ तदेतां विसृजानार्यां क्षत्रधर्माश्रितां मतिम्। धर्ममाश्रय मा तैक्ष्ण्यं मद्बुद्धिरनुगम्यताम् ४४ तमेवमुक्त्वा सौहार्दाद्भ्रातरं लक्ष्मणाग्रजः। उवाच भूयः कौसल्यां प्राञ्जलिः शिरसा नतः ४५ अनुमन्यस्व मां देवि गमिष्यन्तमितो वनम्। शापितासि मम प्राणैः कुरु स्वस्त्ययनानि मे ४६ तीर्णप्रतिज्ञश्च वनात्पुनरेष्याम्यहं पुरीम्। ययातिरिव राजर्षिः पुरा हित्वा पुनर्दिवम् ४७ शोकः सन्धार्यतां मातर्हृदये साधु मा शुचः। वनवासादिहैष्यामि पुनः कृत्वा पितुर्वचः ४८ त्वया मया च वैदेह्या लक्ष्मणेन सुमित्रया। पितुर्नियोगे स्थातव्यमेषधर्मः सनातनः ४९ अम्ब संभृत्य संभारान्दुःखं हृदि निगृह्य च। वनवासकृता बुद्धिर्मम धर्म्यानुवर्त्यताम् ५० एतद्वचस्तस्य निशम्य माता सुधर्म्यमव्यग्रमविक्लवं च। मृतेव संज्ञां प्रतिलभ्य देवी समीक्ष्य रामं पुनरित्युवाच ५१ यथैव ते पुत्र पिता तथाहं

---

पित्याला, मातेला अथवा ब्राह्मणाला वचन दिल्यावर धर्माला अनुसरून वागणाऱ्या पुरुषानें तें व्यर्थ करणें योग्य नाहीं ४२. आज्ञेचें उल्लंघन करण्यास मी समर्थ नाहीं. हे वीरा, पित्याच्या आज्ञेवरून कैकयीनें हें मला सांगितलें आहे ४३. तस्मात्, ही कुबुद्धि सोडून दे; क्षत्रधर्माला उचित असा विचार मनामध्यें आण; संतप्त न होतां धर्माचें अवलंबन कर आणि माझ्या विचाराप्रमाणें वाग " ४४. ह्याप्रमाणें प्रेमामुळें भ्रात्या लक्ष्मणाला सांगितल्यावर, राम हात जोडून व मस्तक नम्र करून कौसल्येला ह्मणाला ४५ " हे देवि, तुला माझ्या प्राणांची शपथ आहे तूं मला येथून वनांत जाण्याला अनुज्ञा दे आणि कल्याणस्थानभूत असे आशीर्वाद तूं मला दे ४६. राजर्षि ययाति पूर्वी स्वर्गांतून च्युत होऊन भूमीवर पडल्यानंतर जसा पुनरपि स्वर्गाला गेला तसा प्रतिज्ञा शेवटास नेऊन मी पुनरपि वनांतून ह्या नगरामध्यें येईन ४७. हे माते, आपल्या मनामध्यें शोक आंवरून धर; असा अमंगलकारक शोक करीत बसूं नको; पित्याची आज्ञा शेवटास नेल्यानंतर मी पुनरपि वनांतून येथें परत येईन ४८. तूं, मी, विदेहराजकन्या, लक्ष्मण आणि सुमित्रा ह्यांनीं पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागावें हा सनातन धर्म आहे ४९. हे माते, मनामध्यें दुःख आंवरून धरून आणि माझ्या वनवासाची तयारी करून वनवाससंबंधी ह्या माझ्या धर्माला अनुसरून असलेल्या विचाराला तूं अनुमोदन दे " ५०. हें अत्यंत धर्मयुक्त, धैर्यसंपन्न आणि निर्भय असें त्याचें भाषण श्रवण केल्यावर मूर्छित झालेली ती राममाता देवी कौसल्या शुद्धीवर येऊन पुनरपि

गुरुः स्वधर्मेण सुहृत्तया च । न त्वानुजानामि न मां विहाय सुदुःखितामर्हसि पुत्र गन्तुम् ५२ किं जीवितेनेह विना त्वया मे लोकेन वा किं स्वधयामृतेन । श्रेयो मुहूर्तं तव सन्निधानं ममैव कृत्स्नादपिजीवलोकात् ५३ नरैरिवोल्काभिरपोह्यमानो महागजो ध्वान्तमभिप्रविष्टः । भूयः प्रजज्वाल विलापमेवं निशम्य रामः करुणं जनन्याः ५४ स मातरं चैव विसंज्ञकल्पामार्तं च सौमित्रिमभिप्रतप्तम् । धर्मे स्थितो धर्म्यमुवाच वाक्यं यथा स एवार्हति तत्र वक्तुम् ५५ अहं हि ते लक्ष्मण नित्यमेव जानामि भक्तिं च पराक्रमं च । मम त्वभिप्रायमसंनिरीक्ष्य मात्रा सहाभ्यर्दसि मा सुदुःखम् ५६ धर्मार्थकामाः खलु जीव लोके समीक्षिता धर्मफलोदयेषु । ये तत्र सर्वे स्युरसंशयं मे भार्येव वश्याभिमता सपुत्रा ५७ यस्मिंस्तु सर्वे स्युरसन्निविष्टा धर्मो यतः स्यात्तदुपक्रमेत । द्वेष्यो भवत्यर्थपरो हि लोके

---

रामाला ह्मणाली ५१ " हे पुत्रा, ज्याप्रमाणें पिता तुला मोठा तशी स्वधर्म आणि प्रेम हीं लक्ष्यांत घेतलीं असतां मीही आहें. ह्यास्तव, मी तुला जाण्याची अनुज्ञा देत नाहीं; व मी अतिशय दुःखित असतांना माझा त्याग करून जाणें, हे पुत्रा, तुलाही योग्य नाहीं ५२. तुझा वियोग झाल्यावर जीविताशीं, जगताशीं, इतर देव इत्यादिकांच्या पूजनाशीं अथवा मोक्षसाधनाशीं मला काय कर्तव्य आहे ? सर्व लोकांच्या सान्निध्यापेक्षां क्षणभर तुझ्या संनिध असण्यांतच माझें कल्याण आहे " ५३. ह्याप्रमाणें मातेचा दीन विलाप श्रवण केल्यावर हातांत चुडी घेऊन लोक टोंचूं लागले असतां रात्रीं अंधकारामध्यें शिरलेल्या महागजाप्रमाणें राम अधिकच क्षुब्ध झाला ५४ आणि जवळ जवळ मूर्छित झालेल्या मातेला व सर्वप्रकारें संतप्त झालेल्या लक्ष्मणाला उद्देशून तो धर्मनिष्ठ राम धर्माला अनुसरून असें भाषण करूं लागला. अशा प्रकारचें भाषण तशा प्रसंगींही करण्याला एक तोच योग्य होता ५५. (तो ह्मणाला )" हे लक्ष्मणा, तुझी भक्ति व पराक्रम मी नेहमीं जाणीत आहें; परंतु, तूं माझा अभिप्राय लक्ष्यांत न घेतां मातेसहवर्तमान दुःखित होत आहेस; ह्याप्रमाणें तूं अति दुःख करूं नकोस ५६. पूर्वार्जित पुण्याचें फल प्राप्त होण्याचा समय आला असतां जगतामध्यें धर्म, अर्थ आणि काम हे जे तिन्ही पुरुषार्थ धर्मफल ह्मणून मन्वादिकांनीं मानिलेले आहेत ते सर्वही त्यांपैकीं एक धर्म असला ह्मणजे अवश्य असतातच; ह्याविषयीं मला कसलाही संदेह नाहीं. सारांश, अनुकूल, अभिमत आणि पुत्रवती अशी एक भार्या असली ह्मणजे धर्म, अर्थ आणि काम ह्या तिहींचीं साधनें जशी ती होते तसा एक धर्म असला ह्मणजे तो इतरांच्याही अस्तित्वाला कारणीभूत होतो. ( तस्मात्, धर्मच मुख्य आहे

कामात्मता खल्वति न प्रशस्ता ५८ गुरुश्च राजा च पिता च वृद्धः क्रोधात्प्रहर्षादथवापि कामात् । यद्व्यादिशेत्कार्यमवेक्ष्य धर्मं कस्तं न कूर्यादनृशंसवृत्तिः ५९ न तेन शक्नोमि पितुःप्रतिज्ञामिमां न कर्तुं सकलां यथावत् । स ह्यावयोस्तात गुरुर्नियोगे देव्याश्च भर्ता स गतिश्च धर्मः६० तस्मिन्पुनर्जीवति धर्मराजे विशेषतः स्वे पथि वर्तमाने। देवी मया सार्धमितोभिगच्छेत्कथंस्विदन्याविधवेव नारी ६१ सा मानुमन्यस्व वनं व्रजन्तं कुरुष्व नः स्वस्त्ययनानि देवि । यथा समाप्ते पुनराव्रजेयं यथा हि सत्येन पुनर्ययातिः ६२ यशो ह्यहं केवलराजकारणान्न पृष्ठतः कर्तुमलं महोदयम् । अदीर्घकाले न तु देवि जीविते वृण वरामद्यमहीमधर्मतः ६३ प्रसादयन्नरवृषभः स मातरं पराक्रमाज्जिगमिषुरेवदण्डकान्।

---

आणि ह्मणून त्याचेंच रक्षण करणें योग्य आहे ) ५७. ज्या कर्मामध्यें ( धर्म, अर्थ आणि काम ) हे सर्व असंबद्ध असतात त्या कर्माला आरंभ करूं नये. ज्याच्यापासून धर्मप्राप्ति होईल त्याचाच उपक्रम करावा. कारण, ( धर्माची पर्वा न करितां केवळ ) अर्थाकडे लक्ष्य देणाऱ्या पुरुषाचा लोकांमध्यें द्वेष होतो आणि ( धर्मविरुद्ध ) विषयतत्परता तर अतिच निंद्य आहे ५८. तात्पर्य, गुरु, राजा, पिता व वृद्ध ( इतकी नातीं लक्ष्यांत घेतलीं असतां तो ) क्रोधामुळें, हर्षामुळें अथवा विषयवासनेमुळें जें कांहीं कार्य सांगेल तें धर्माकडे लक्ष्य देऊन कोण बरें दुर्वर्तनरहित पुत्र करणार नाहीं ? ५९. ह्यास्तव, पित्याची ही प्रतिज्ञा अगदीं पाहिजे तशी पूर्णरीतीनें सिद्धीस नेल्यावांचून माझ्यानें राहवणार नाहीं. कारण, बा लक्ष्मणा, तो आपला गुरु आपणाला आज्ञा करण्याला मुक्त्यार आहे आणि भर्ता असल्यामुळें मातेचाही आधार व धर्म तोच आहे. ( भर्ता असतांना स्त्रीला पुत्रावर अवलंबून रहाणें योग्य नाहीं ) ६०. ह्मणून तो धर्मराज विद्यमान असतांना आणि विशेषतःआपल्या मार्गानें वागत असतांना दुसऱ्या एखाद्या विधवा स्त्रीप्रमाणें मातेला माझ्या बरोबर वनामध्यें येथून कसें बरें येतां येईल ? ६१. ह्यास्तव, हे देवि, वनांत निघालेल्या मला तूं अनुज्ञा दे आणि आह्मांला वनवासामध्यें कल्याणप्रद होतील अशीं मंगलकृत्यें कर. ह्मणजे सत्याच्या योगानें जसा ययाति राजा पुनरपि स्वर्गास गेला तसा मी वनवास समाप्त झाल्यावर पुनरपि येथें येईन ६२. केवळ राज्याकरितां महाफलदायक अशा यशाविषयीं मला पराङ्मुख होतां येणार नाहीं. सारांश, हे देवि, मनुष्याचें जीवित अल्पकालपर्यंत आहे हें जर निश्चित आहे तर अधर्मानें आज ही निकृष्ट पृथ्वी प्राप्त करून घेण्याची मी इच्छा करीत नाहीं "६३. ह्याप्रमाणें मातेचें मन वळविणारा तो पुरुषश्रेष्ठ राम पराक्रमानें दंडकारण्यामध्येंच

अथानुजं भृशमनुशास्य दर्शनं चकार तां हृदि जननीं प्रदक्षिणम् ६४ [ ९८८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकविंशः सर्गः ॥ २१ ॥

अथ तं व्यथया दीनं सविशेषममर्षितम् । सरोषमिव नागेन्द्रं रोषविस्फारितेक्षणम् १ आसाद्य रामः सौमित्रिं सुहृदं भ्रातरं प्रियम् । उवाचेदं स धैर्येण धारयन्सत्त्वमात्मवान् २ निगृह्य रोषं शोकं च धैर्यमाक्रम्य केवलम् । अवमानं निरस्यैनं गृहीत्वा हर्षमुत्तमम् ३ उपक्लृप्तं यदेतन्मे अभिषेकार्थमुत्तमम् । सर्वं निवर्तय क्षिप्रं कुरु कार्यं निरव्ययम् ४ सौमित्रे योऽभिषेकार्थे मम संभारसंभ्रमः । अभिषेकनिवृत्त्यर्थे सोऽस्तु संभारसंभ्रमः ५ यस्यामदभिषेकार्थे मानसं परितप्यति । माता नः सा यथा न स्यात्सविशङ्का तथा कुरु ६ तस्याः शङ्कामयं दुःखं मुहूर्तमपि नोत्सहे । मनसि प्रतिसंजातं सौमित्रेऽहमुपेक्षितुम् ७ न बुद्धिपूर्वं नाबुद्धं स्मरामीह कदाचन । मातॄणां वा पितुर्वाहं कृतमल्पं च विप्रियम् ८

---

जाण्याविषयीं उद्युक्त झाला आणि लक्ष्मणाला आपला विचार आणखी समजावून सांगून मातेला प्रदक्षिणा केल्यावर वनवासास जाण्याचाच विचार त्यानें मनामध्यें निश्चित केला ६४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २१ ॥

नंतर रामाच्या इतर सुहृदांपेक्षां व्यथेनें अधिकच दीन ह्मणून क्रुद्ध नागराजाप्रमाणें क्रोधयुक्त, रोषानें डोळे वटारिलेला १ व सुहृद असा जो प्रिय भ्राता लक्ष्मण त्याला त्याच्याकडे वळून तो मनोनिग्रही राम मन आंवरून धरून धैर्यानें ह्मणाला २ " रोष आणि शोक आंवरून धरून, केवल धैर्याचें अवलंबन करून, हा अवमान झाला आहे अशी समजूत टाकून देऊन आणि उत्कृष्ट प्रकारचा आनंद मानून ३ माझ्या अभिषेकाकरितां जी उत्कृष्ट प्रकारची सामग्री जुळविली आहे ती सर्व सत्वर एकीकडे ठेव आणि आपलें मुख्य कर्तव्य जें वनामध्यें गमन तें अडथळा न येतां सिद्धीस जाण्याची तजवीज कर ४. हे लक्ष्मणा, माझ्या अभिषेकाचें सामान जितक्या त्वरेनें जुळविण्यांत आलें आहे तितक्या त्वरेनें वनवासांत जाण्याच्या सामग्रीची तयारी झाली पाहिजे ५. माझ्या अभिषेकामुळें जिच्या मनाला संताप झालेला आहे ती आपली माता कैकयी निश्चित होईल असें कर ६. हे लक्ष्मणा, तिच्या मनामध्यें उत्पन्न झालेल्या चिंतादुःखाची एक क्षणभरही मी उपेक्षा करणार नाहीं ७. मातांना अथवा पित्याला अप्रिय असलेली क्षुल्लकही गोष्ट समजून अथवा न समजून कधींही केल्याचें मला स्मरत नाहीं ८.

सत्यः सत्याभिसन्धश्च नित्यं सत्यपराक्रमः । परलोकभयाद्भीतो निर्भयोऽस्तु पिता मम ९ तस्यापि हि भवेदस्मिन्कर्मण्यप्रतिसंहृते । सत्यं नेति मनस्तापस्तस्य तापस्तपेच्च माम् १० अभिषेकविधानं तु तस्मात्संहृत्य लक्ष्मण । अन्वगेवाहमिच्छामि वनं गन्तुमितः पुरः ११ मम प्रव्राजनादद्य कृतकृत्या नृपात्मजा । सुतं भरतमव्यग्रमभिषेचयतां ततः १२ मयि चीराजिनधरे जटामण्डलधारिणि । गतेऽरण्यं च कैकेय्या भविष्यति मनःसुखम् १३ बुद्धिः प्रणीता येनेयं मनश्चाप्यु समाहितम् । तं नु नार्हामि संक्लेष्टुं प्रव्रजिष्यामि माचिरम् १४ कृतान्त एव सौमित्रे द्रष्टव्यो मत्प्रवासने । राज्यस्य च वितीर्णस्य पुनरेव निवर्तने १५ कैकेय्याः प्रतिपत्तिर्हि कथं स्यान्मम वेदने । यदि तस्या न भावोऽयं कृतान्तविहितो भवेत् १६ जानासि हि यथा सौम्य न मातृषु ममान्तरम् । भूतपूर्वं विशेषो वा तस्या मयि सुतेऽपि वा १७ सोऽभिषेकनिवृत्त्यर्थैः प्रवासार्थैश्च दुर्वचैः । उग्रैर्वाक्यैरहं तस्या नान्यद्दैवात्समर्थये १८ कथं प्रकृतिसंपन्ना राजपुत्री तथागुणा । ब्रूयात्सा

---

खरें बोलणारा, प्रतिज्ञा खरी करणारा आणि अमोघपराक्रम करणारा असा जो माझा पिता परलोक भीतीस्तव असत्याला भ्याला आहे तो निर्भय होवो ९. हें अभिषेक कृत्य जर बंद केलें नाहीं तर ( कैकयीला दिलेलें आपलें ) वचन सत्य होत नाहीं ह्मणून त्याच्या मनाला पीडा होईल आणि त्याच्या पीडेमुळें मला ताप होईल १०. तस्मात्, हे लक्ष्मणा हें अभिषेक विधान एकीकडे सारून ह्या नगरांतून शीघ्र वनांतच जाण्याची माझी इच्छा आहे ११. माझ्या वनवासांत जाण्यानें राजकन्या कैकयी कृतकृत्य होऊन आपल्या भरतनामक पुत्राला खुशाल राज्याभिषेक करवो १२. वल्कलें, अजिन व जटाजूट धारण करून मी अरण्यामध्यें गेलों, असतां कैकेयीच्या मनाला सुख होईल १३. ज्यानें तिला ही बुद्धि देऊन तिचें मन स्वस्थ राखिलें त्याला दोष देणें मला योग्य नाहीं. मी आतां विलंब न करितां वनामध्यें जाणार १४. पुढें आलेलें राज्य हुसकून लावून माझ्या वनवासाविषयीं प्रेरणा करणारें दैवच आहे असें समजलें पाहिजे १५. कारण, तसें नसतें तर कैकेयीच्या मनांत असें आलें नसतें. यावरून हें कृत्य दैवाचेंच आहे तिचें नाहीं १६. असो. हे सौम्य लक्ष्मणा, सर्व मातांचे ठिकाणीं माझी अंतःकरण वृत्ति सारखी आहे हेंही तुला माहीत आहे व तीही भरत व मी यांस सारखीच लेखीत असून १७ माझ्या अभिषेकाला विघ्न करून मीं वनांत जावें ह्मणून फार उग्र वाक्यें बोललीं हेंही सर्व दैवाचेंच कृत्य आहे असें मीं समजतों १८. नाहीं तर तशा प्रकारच्या गुणांनीं युक्त ती राजकन्या एकाद्या सामान्य-

प्राकृतेव स्त्री मत्पीड्यं भर्तृसंनिधौ १९ यदचिन्त्यं तु तद्दैवं भूतेष्वपि न हन्यते। व्यक्तं मयि च तस्यां च पतितो हि विपर्ययः २० कश्च दैवेन सौमित्रे योद्धुमुत्सहते पुमान्। यस्य नु ग्रहणं किंचित्कर्मणोन्यन्न दृश्यते २१ सुखदुःखे भयक्रोधौ लाभालाभौ भवाभवौ। यस्य किंचित्तथाभूतं ननु दैवस्य कर्म तत् २२ ऋषयोप्युग्रतपसो दैवेनाभिप्रचोदिताः। उत्सृज्य नियमांस्तीव्रान्भ्रश्यन्ते काममन्युभिः २३ असंकल्पितमेवेह यदकस्मात्प्रवर्तते। निवर्त्यारब्धमारम्भैर्ननु दैवस्य कर्म तत् २४ एतया तत्त्वया बुद्ध्या संस्तभ्यात्मानमात्मना। व्याहतेप्यभिषेके मे परितापो न विद्यते २५ तस्मादपरितापः संस्त्वमप्यनुविधाय माम्। प्रतिसंहारय क्षिप्रमाभिषेचनिकीं क्रियाम् २६ एभिरेव घटैः सर्वैरभिषेचनसंभृतैः। मम लक्ष्मण तापस्ये व्रतस्नानं भविष्यति २७ अथवा किं ममैतेन राजद्रव्यमयेन तु। उद्धृतं मे स्वयं तोयं व्रतादेशं करिष्यति २८ मा च लक्ष्मण संतापं कार्षी-

---

स्त्रीप्रमाणें आपल्या पतीसमोर, स्वतः सत्त्वशील असतांना, कसें बरें बोलेल ? १९. मला त्रास देण्यासारखें अतर्क्य असें जें दैव तें कोणत्याही प्राण्याचे ठिकाणीं कुंठित होत नाहीं हें अगदीं निश्चित आहे. तस्मात्, त्या दैवामुळेंच तिच्या मनामध्यें विपरीत गोष्ट आली असून माझ्या संबंधानें ( राज्यलक्ष्मी आलेली नाहींशी होणें हा ) विपरीत प्रकार झालेला आहे २०. ज्या दैवाचें स्वरूप फलावांचून दुसरें [illegible] प्रत्ययास येत नाहीं त्या दैवासहवर्तमान, हे लक्ष्मणा, कोण बरें युद्ध करण्याचें इच्छिणार आहे ?२१. सुख व दुःख, भय आणि क्रोध, लाभ व हानि आणि बंध व मोक्ष ह्यांपैकीं ज्याला जें प्राप्त होतें तें दैवाचेंच कर्म होय २२. उग्र तपश्चर्या करणारे ऋषि देखील दैवानें प्रेरणा केली असतां आपल्या कडकडीत नियमांचा त्याग करितात आणि काम व क्रोध ह्यांच्या तावडींत सांपडतात. २३. यत्नांनीं आरंभिलेलें कार्य हाणून पडून मनामध्येंही कधीं न आणिलेली गोष्ट ज्याअर्थी एकाएकीं होत आहे त्याअर्थी खरोखर तें दैवाचेंच कर्म होय २४. यथार्थ विचार लक्ष्यांत घेऊन स्वतः मन आंवरून धरिलें असल्यामुळें अभिषेक हाणून पडला तरी सुद्धां मला वाईट वाटत नाहीं २५. तस्मात्, संतापून न जातां तूंही माझेंच अनुकरण कर व अभिषेक समारंभाकरितां धारण केलेले हे अलंकार सत्वर काढून टाक २६. हे लक्ष्मणा, अभिषेकाकरितां जळविलेल्या ह्या सर्व कुंभांच्या योगानें तपोरूप व्रताचा संकल्प करण्याकरितां माझें व्रतग्रहणार्थ स्नान होईल २७. अथवा राज्यांतीलच द्रव्य ज्याकरितां खर्चीं पडलेलें आहे असें हें उदक तरी मला कशाला पाहिजे ? मीं स्वतः आणिलेल्या उदकानेंच माझा व्रतग्रह-

लक्ष्म्या विपर्यये। राज्यं वा वनवासो वा वनवासो महोदयः २९ न लक्ष्मणास्मिन्मम राज्यविघ्ने माता यवीयस्यभिशङ्कितव्या। दैवाभिपन्ना न पिता कथंचिज्जानासि दैवं हि तथा प्रभावम् ३० [ १०१८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्वाविंशः सर्गः॥२२॥

इति ब्रुवति रामे तु लक्ष्मणोवाक्शिरा इव। ध्यात्वा मध्यं जगामाशु सहसा दैन्यहर्षयोः १ तथा तु बद्ध्वा भ्रुकुटिं भ्रुवोर्मध्ये नरर्षभः। निशश्वास महासर्पो बिलस्थ इव रोषितः २ तस्य दुष्प्रतिवीक्ष्यं तद्भ्रुकुटीसहितं तदा। बभौ क्रुद्धस्य सिंहस्य मुखस्य सदृशं मुखम् ३ अग्रहस्तं विधुन्वंस्तु हस्ती हस्तमिवात्मनः। तिर्यगूर्ध्वं शरीरं च पातयित्वा शिरोधराम् ४ अग्राक्ष्णा वीक्षमाणस्तु तिर्यग्भ्रातरमब्रवीत्। अस्थाने संभ्रमो यस्य जातो वै सुमहानयम् ५ धर्मदोषप्रसङ्गेन लोकस्यानतिशङ्कया।

---

णाचा संकल्प होईल २८. हे लक्ष्मणा, लक्ष्मीचा उलट प्रकार झाल्याविषयीं तूं संतापून जाऊं नको. कारण, राज्य आणि वनवास ह्यांमध्यें वनवासच मोठा लाभदायक आहे २९. हे लक्ष्मणा, ह्या राज्यविघ्नाचे मुळाशीं आपली कनिष्ठ माता आहे अशी तूं मुळींच शंका घेऊं नकोस. कारण, ती माता आणि पिता हीं दोन्हीही दैवाधीन झालेलीं आहेत आणि दैवाचाही तसा प्रभाव असल्याचें तूं जाणीत आहेस ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं बाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २२ ॥

ह्याप्रमाणें राम भाषण करूं लागला असतां लक्ष्मणानें खालीं मान घातल्यासारिखें केलें, रामाच्या भाषणाचा विचार केल्यानंतर दुःख व हर्ष न होतां तो मध्येंच लोंबकळत राहिला १ आणि क्रोधानें भिंवया चढवून तो पुरुषश्रेष्ठ लक्ष्मण बिळांतील क्रुद्ध झालेल्या महासर्पाप्रमाणें सुस्कार टाकूं लागला २. तेव्हां क्रोधानें भिंवया चढल्यामुळें त्या लक्ष्मणाचें तें मुख क्रुद्ध झालेल्या सिंहाच्या मुखाप्रमाणें पहाण्यालाही फारच भयंकर झालें ३. तदनंतर हत्ती ज्याप्रमाणें आपला सोंड हालवितो त्याप्रमाणें आपला पंजा हालवीत हालवीत रागानें इकडे तिकडे व खालीं मान वेळोवेळां ४ आणि नेत्रकटाक्षानें पहात पहात भ्रात्या रामाला ह्मणाला " पित्याची आज्ञा उल्लंघिली असतां धर्माला विरोध येईल तो न यावा एतदर्थ लोकापवादाची फाजील भीति बाळगून वनांत जाण्याचा जो तुझे ठिकाणीं हा अतिशयच उतावीळपणा उत्पन्न झाला आहे तो अयोग्य आहे. नाहींतर तुझ्यासारिखा निभ्रांत व समर्थ क्षत्रियश्रेष्ठ अशा प्रकारचें पोंचट भाषण करणें बरें करील ? अरे, ( पौरुषाशीं टक्कर देण्यास ) असमर्थ असलेल्या

कथं ह्येतदसंभ्रान्तस्त्वद्विधो वक्तुमर्हति ६ यथा ह्येवमशौण्डीरं शौण्डीरः क्षत्रियर्षभः । किं नाम कृपणं दैवमशक्तमभिशंससि ७ पापयोस्ते कथं नाम तयोः शङ्का न विद्यते । सन्ति धर्मोपधासक्ता धर्मात्मन्किं न बुध्यसे ८ तयोः सुचरितं स्वार्थं शाठ्यात्परिजिहीर्षतोः । यदि नैवं व्यवसितं स्याद्धि प्रागेव राघव ९ तयोः प्रागेव दत्तश्च स्याद्वरः प्रकृतश्च सः । लोकविद्विष्टमारब्धं त्वदन्यस्याभिषेचनम् १० नोत्सहे सहितुं वीर तत्र मे क्षन्तुमर्हसि । येनैवमागता द्वैधं तव बुद्धिर्महामते ११ सोपि धर्मो मम द्वेष्यो यत्प्रसङ्गाद्विमुह्यसि । कथं त्वं कर्मणा शक्तः कैकेयीवशवर्तिनः १२ करिष्यसि पितुर्वाक्यमधर्मिष्ठं विगर्हितम् । यदयं किल्बिषाद्भेदः कृतोप्येवं न गृह्यते १३ जायते तत्र मे दुःखं धर्मसङ्गश्च गर्हितः । तवायं धर्मसंयोगो लोकस्यास्य विगर्हितः १४ मनसापि कथं कामं कुर्यात्त्वां काम-

---

भिकारड्या देवाची तूं कशाकरितां स्तुति करीत आहेस ? ५, ६, ७. त्या दुष्ट स्त्रीपुरुषासंबंधानें ( अर्थात् कैकेयी व दशरथ यांच्या संबंधानें ) तुझ्या मनांत शंका कशी नाहीं ? हे धर्मात्म्या रामा, धर्माचें पांघरूण घेऊन आंतून पुरुष पापासक्त असतात हें तुला माहित नाहीं कीं काय ? ८. कपटानें तुझा त्याग करण्याची इच्छा करणाऱ्या त्या उभयतांचा स्वार्थ ( तुझ्या वनांत जाण्यानें ) चांगला साधला आहे हें तूं जाणीत नाहींस काय ? हे राघवा, असें जर ठरलेलें नसतें ९ तर प्रस्तुत जो वर पुढें आला आहे त्याची देवघेव त्यांच्यांत पूर्वीच व्हावयाला पाहिजे होती ( ज्या अर्थी असें झालें नाहीं त्याअर्थी पूर्वी वर देऊं केला होता व तो आजपर्यंत मागावयाचा राहिला होता हें सर्व कांहीं तरी खोटें निमित्त पुढें केलें आहे ) तुला टाकून दुसऱ्याला अभिषेक करण्याचा जो ह्यांनीं उपक्रम केला आहे तो लोकनिंदेसही पात्र असल्यामुळें १० सहन करण्याची माझी इच्छा नाहीं. ह्यास्तव, हे वीरा, त्याबद्दल तूं मला क्षमा कर. ज्याच्या योगानें, हे महामते, तुझी बुद्धि अशी द्विधा झाली ११ तो धर्मही मला पसंत नाहीं. कारण, त्याच्याचमुळें तूं असा मोह पावला आहेस. अरे, पराक्रम करण्यास तूं समर्थ असतांना कैकेयीचा दास बनलेल्या १२ पित्याचें, धर्माला अतिशय सोडून असलेलें, निंद्य बोलणें कां बरें ऐकत आहेस ? अरे, हें वराचें निमित्त तुझा अभिषेक हाणून पाडण्याच्या दुष्ट बुद्धीनें जाणून बुजून केलेलें आहे हें इतकें स्पष्ट झालें असूनही तुला तसें वाटत नाहीं १३ ह्याबद्दल मला दुःख होत आहे. खरोखर अशा प्रकारची फाजील धर्मनिष्ठा निंद्य आहे. तुझी ही धर्मनिष्ठा ह्या लोकांनाही निंद्य वाटत आहे १४. अरे, मातापितर हें ज्यांना नुसतें नांव आहे अशा ह्या अहितकारक व विषयलंपट शत्रूंचा मनोरथ तुझ्यावांचून

वृत्तयोः । त्वयोस्त्वहितयोर्नित्यं शत्र्वोः पित्रभिधानयोः १५ यद्यपि प्रतिपत्तिस्ते दैवी चापि तयोर्मतम् । तथाप्युपेक्षणीयं ते न मे तदपि रोचते १६ विक्लवो वीर्यहीनो यः स दैवमनुवर्तते । वीराः संभावितात्मानो न दैवं पर्युपासते १७ दैवं पुरुषकारेण यः समर्थः प्रबाधितुम् । न दैवेन विपन्नार्थः पुरुषः सोऽवसीदति १८ द्रक्ष्यन्ति त्वद्य दैवस्य पौरुषं पुरुषस्य च । दैवमानुषयोरद्य व्यक्ताव्यक्तिर्भविष्यति १९ अद्य मे पौरुषहतं दैवं द्रक्ष्यन्ति वै जनाः। यैर्दैवादाहतं तेऽद्य दृष्टं राज्याभिषेचनम् २० अत्यङ्कुशमिवोद्दामं गजं मदजलोद्धतम् । प्रधावितमहं दैवं पौरुषेण निवर्तये २१ लोकपालाः समस्तास्ते नाद्य रामाभिषेचनम् । न च कृत्स्नास्त्रयो लोका विहन्युः किं पुनः पिता २२ यैर्विवासस्तवारण्ये मिथो राजन्समर्थितः । अरण्ये ते विवत्स्यन्ति चतुर्दशसमास्तथा २३ अहं तदाशां धक्ष्यामि पितुस्तस्याश्च या तव । अभिषेकविघातेन पुत्रराज्याय वर्तते २४ मद्बलेन विरुद्धाय न स्याद्दैवबलं तथा । प्रभविष्यति दुःखाय यथोग्रं पौरुषं मम २५ ऊर्ध्वं वर्षसहस्रान्ते

---

इतर कोणी सिद्धीस नेण्याचें मनांत तरी कसें आणील ? १५. आतां " त्यांना जी बुद्धि झाली ती दैवामुळेंच झाली " असें जरी तुझें मत असलें तरी तें एकीकडे ठेविलें पाहिजे. कारण, तें मला पसंत नाहीं १६. अरे, जो भित्रा व वीर्यहीन असतो तो दैवावर अवलंबून रहातो. वीर आणि अनूदार पुरुष दैवाची कांस धरून बसत नाहींत १७. आपल्या पराक्रमानें दैव हाणून पाडण्यास जो समर्थ असतो त्याचा उद्देश दैवानें कधींही नाहींसा होत नाहीं व तो उमेदही सोडीत नाहीं १८. ( फार कशाला ) दैव आणि पुरुष ह्यांचें बल काय आहे हें आज लोक पहातील आणि दैव व पुरुषप्रयत्न ह्यांचें स्वरूप आज स्पष्टपणें व्यक्त होईल १९. दैवामुळें तुझा राज्यभिषेक हाणून पडल्याचें ज्यांनीं पाहिलें आहे तेच लोक माझ्या पराक्रमानें दैव हाणून पडल्याचें आज पहातील २०. अंकुशालाही न जुमानितां साखळदंड तोडून धांवत चाललेल्या मत्त हत्तीप्रमाणें अनावर झालेल्या ह्या दैवाला मी आज आपल्या पराक्रमानें ताळ्यावर आणितों २१. हे रामा, संपूर्ण लोकपाल जरी जुळून आले अथवा संपूर्ण तिन्ही लोक जरी एकत्र झाले तरी तुझा अभिषेक हाणून पाडण्याची त्यांची छाती नाहीं. मग ह्या ( वृद्ध ) पित्याची कथा काय ? २२. हे राजा, ज्यांनीं तुझा वनवास आपआपणांमध्यें ठरविला असेल त्यांनाच त्याप्रमाणें चवदा वर्षेंपर्यंत अरण्यांत रहावें लागेल २३. तुझा अभिषेक हाणून पाडून आपल्या पुत्राला राज्य द्यावयाचें ही जी तिची व पित्याची आशा ती मी दग्ध करून टाकीन २४. माझ्याशीं विरुद्ध वागणाऱ्याला

प्रजापाल्यमनन्तरम् । आर्यपुत्राः करिष्यन्ति वनवासं गते त्वयि २६ पूर्वराजर्षिवृत्त्या हि वनवासोऽभिधीयते । प्रजा निक्षिप्य पुत्रेषु पुत्रवत्परिपालने २७ स चेद्राजन्यनेकाग्रे राज्यविभ्रमशङ्कया । नैवमिच्छसि धर्मात्मन्राज्यं राम त्वमात्मनि २८ प्रतिजाने च ते वीर माभूवं वीरलोकभाक् । राज्यं च तव रक्षेयमहं वेलेव सागरम् २९ मङ्गलैरभिषिञ्चस्व तत्र त्वं व्यापृतो भव । अहमेको महीपालानलं वारयितुं बलात् ३० न शोभार्थाविमौ बाहू न धनुर्भूषणाय मे । नासिराबन्धनार्थाय न शराः स्तम्भहेतवः ३१ अमित्रमथनार्थाय सर्वमेतच्चतुष्टयम् । न चाहं कामयेऽत्यर्थं यः स्याच्छत्रुर्मतो मम ३२ असिना तीक्ष्णधारेण विद्युच्चलितवर्चसा । प्रगृहीतेन वै शत्रुं वज्रिणं वा न कल्पये ३३ खड्गनिष्पेषनिष्पिष्टैर्गहना

---

दुःख देण्यास जसें उग्र पौरुष समर्थ आहे तसें दैवबल नाहीं २५. सहस्र वर्षे प्रजापालन करून तूं वनवासांत गेलास ह्मणजे तुझे पुत्र राज्य करितील. ( तेव्हां सुद्धां भरतादिकांचा राज्यावर अधिकार नाहीं. मग सांप्रतची तर गोष्ट कशाला पाहिजे ? ) २६ पूर्वी जे राजर्षि होऊन गेले त्यांच्या वर्तनावरून तर पुत्रवत् परिपालन करण्याकरितां पुत्रांचे स्वाधीन प्रजा करून नंतर जें वनांत जाणें त्याला वनवास ह्मणतात असें दिसतें २७. आतां, हे धर्मात्म्या रामा, दशरथराजा चित्त स्थिर नसल्यामुळें प्रतिकूल झाला असतांना त्याच्या आज्ञेला मान न देतां आपण जर राज्याचा स्वीकार केला तर ( लोकांना तें रुचणार नाहीं व ) आपल्या हातचें राज्य जाईल अशी शंका येऊन जर तूं स्वतःला राज्य नको असें इच्छित असशील २८ तर, हे वीरा, मर्यादा ज्याप्रमाणें सागराचें रक्षण करिते त्याप्रमाणें मी तुझें राज्य रक्षण करीन. नाहीं तर वीर लोक मला प्राप्त होणार नाहींत ही मी प्रतिज्ञा करितों २९. आतां मंगलावह साधनांनीं तूं आपल्याला अभिषेक करून घे आणि आतां तूं तिकडेच लक्ष्य देऊन रहा. आपल्या बलानें राजांचें निवारण करण्यास मी एकटा समर्थ आहें ३०. अरे, हे माझे बाहु कांहीं शोभेकरितां नाहींत; हें धनुष्य कांहीं भूषण ह्मणून मीं बाळगिलेलें नाहीं; ही तरवार मीं कांहीं कंबरेला बांधून ठेवण्याकरितांच घेतलेली नाहीं व हे बाणही स्वस्थ पडून राहण्याकरितां मीं धारण केलेले नाहींत ३१. ह्या सर्व चारीही वस्तु शत्रूंचा नाश करण्याकरितां आहेत. अरे, जो अत्यंत वैरी ह्मणून मला समजून आला तो साधारण शत्रु असो किंवा साक्षात् वज्रपाणि इंद्र असो विद्युल्लतेप्रमाणें चमकणाऱ्या ह्या तीक्ष्ण धारेच्या खड्गानें मी त्याचे तुकडे तुकडे करणार नाहीं अशी शंकाही कधीं माझ्या मनांत येत नाहीं ३२,३३. माझ्या

दुश्चरा च मे । हस्त्यश्वरथिहस्तोरुशिरोभिर्भविता मही ३४ खड्गधाराहता मेद्य दीप्यमाना इवाग्नयः । पतिष्यन्ति द्विषो भूमौ मेघा इव सविद्युतः ३५ बद्धगोधाङ्गुलित्राणे प्रगृहीतशरासने । कथं पुरुषमानी स्यात्पुरुषाणां मयि स्थिते ३६ बहुभिश्चैकमत्यस्यन्नेकेन च बहूञ्जनान् । विनियोक्ष्याम्यहं बाणान्नृवाजिगजमर्मसु ३७ अद्य मेऽस्त्रप्रभावस्य प्रभावः प्रभविष्यति । राज्ञश्चाप्रभुतां कर्तुं प्रभुत्वं च तव प्रभो ३८ अद्य चन्दनसारस्य केयूरामोक्षणस्य च । वसूनां च विमोक्षस्य सुहृदां पालनस्य च ३९ अनुरूपाविमौ बाहू राम कर्म करिष्यतः । अभिषेचनविघ्नस्य कर्तॄणां ते निवारणे ४० ब्रवीहि कोऽद्यैव मया वियुज्यतां तवासुहृत्प्राणयशःसुहृज्जनैः । यथा तवेयं वसुधा वशा भवेत्तथैव मां शाधि तवास्मि किंकरः ४१ विमृज्य बाष्पं परिसान्त्व्य चासकृत्स लक्ष्मणं राघववंशवर्धनः । उवाच पित्रोर्वचने व्यवस्थितं निबोध मामेष हि सौम्य सत्पथः ४२

खड्गाच्या आघातानें तुटलेल्या हत्तींच्या सोंडा, अश्वांच्या तंगड्या आणि रथी पुरुषांचीं मस्तकें ह्यांनीं ही पृथ्वी गच्च भरून जाऊन वरून जाण्यायेण्याला अडचण पडेल ३४. माझ्या खड्गाच्या धारेनें छिन्नभिन्न झाल्यामुळें इकडे तिकडे उडालेल्या देदीप्यमान अग्नीप्रमाणें अथवा विद्युल्लतेसहवर्तमान असलेल्या मेघाप्रमाणें आज माझे शत्रु भूमीवर पडतील ३५. अरे, अंगुलित्राण चढवून आणि हातांत धनुष्य घेऊन मी उभा राहिलों असतां पुरुषांमध्यें एक तरी स्वतःला पुरुष समजणारा लेंडी निघेल काय ? ३६. पुष्कळांनीं एकाला व एका बाणानें पुष्कळ लोकांना वेध करणारा मी पुरुष, अश्व आणि गज ह्यांच्या मर्मस्थानीं बाण सोडीन ३७. हे प्रभो, आज ह्या माझ्या अस्त्रबलाचा प्रभाव दशरथराजाचें अप्रभुत्व आणि तुझें प्रभुत्व स्थापित करून दाखवील ३८. हे रामा, आजपर्यंत जी कांहीं चंदनाची उटी लाविली, जीं कांहीं बाहुभूषणें धारण केलीं, जें कांहीं द्रव्य दान केलें आणि सुहृदांनीं आजपर्यंत जें कांहीं पालन केलें ३९ त्याचें चीज व्हावें एतदर्थ तुझ्या अभिषेकाला विघ्न आणणाऱ्यांचें निवारण करण्यामध्यें हे माझे योग्य बाहु आज पराक्रम करून दाखवितील ४०. आजच्या आजच तुझ्या कोणत्या शत्रूला प्राण, कीर्ति आणि मित्रगण ह्यांपासून मी वेगळें करूं तें सांग. तात्पर्य, ही पृथ्वी तुझ्या अधीन होईल अशा रीतीनें तूं मला आज्ञा कर; मी तुझा दास आहें ४१. ह्याप्रमाणें लक्ष्मण, बोलत असतांना राघववंश वृद्धिंगत करणाऱ्या रामानें त्याचे अश्रु पुसून अनेक वेळां त्याचें सांत्वन केलें आणि, " हे सौम्या, मातापितरांच्या आज्ञेमध्यें मी आहें व हाच सन्मार्ग आहे असें तूं समज " असें त्याला

[ १०६० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रयोविंशः सर्गः ॥ २३ ॥

तं समीक्ष्य व्यवसितं पितुर्निर्देशपालने । कौसल्या बाष्पसंरुद्धा वचो धर्मिष्ठमब्रवीत् १ अदृष्टदुःखो धर्मात्मा सर्वभूतप्रियंवदः । मयि जातो दशरथात्कथमुञ्छेन वर्तयेत् २ यस्य भृत्याश्च दासाश्च मृष्टान्यन्नानि भुञ्जते । कथं स भोक्ष्यते रामो वने मूलफलान्ययम् ३ क एतच्छ्रद्दधे-च्छ्रुत्वा कस्य वा न भवेद्भयम् । गुणवान्दयितो राज्ञः काकुत्स्थो यद्वि-वास्यते ४ नूनं तु बलवाँल्लोके कृतान्तः सर्वमादिशन् । लोके रामाभि-रामस्त्वं वनं यत्र गमिष्यसि ५ अयं तु मामात्मभवस्तवादर्शनमारुतः । विलापदुःखसमिधो रुदिताश्रुहुताहुतिः ६ चिन्ताबाष्पमहाधूमस्तवागम-नचिन्तजः । कर्शयित्वाधिकं पुत्र निश्वासायाससंभवः ७ त्वया विहीना

सांगितलें ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं तेविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २३ ॥

पित्याची आज्ञा परिपालन करण्याविषयीं त्या रामाचा निश्चय झाला आहे असें अवलोकन करून अश्रूंनीं कंठ दाटून आलेली कौसल्या धर्मिष्ठ रामाला उद्देशून ह्मणाली १ " ह्याला आजपर्यंत कधींही दुःख पहाण्याचा प्रसंग आलेला नाहीं, हा धर्मात्मा आहे, प्राणिमात्राशीं प्रिय भाषण करणारा आहे आणि ( सार्वभौम ) दशरथराजापासून माझे ठिकाणीं उत्पन्न झालेला आहे. तथापि शेतांत पडलेले धान्यकण वेंचून हा आपली उपजीविका कशी बरें करील ? २. ज्याचे पगारी नोकर आणि दासही मिष्ट अन्नें भक्षण करीत असतात तो हा राम वनामध्यें कशी बरें फलमूलांवर उपजीविका करील ? ३. राजाला अतिप्रिय आणि गुणी अशा ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला वनवासांत पाठवीत आहेत हें ऐकून कोणाला बरें खरें वाटणार आहे अथवा एकिल्याबरोबर कोणाला बरें भय वाटणार नाहीं ? ४. हे रामा, त्रैलोक्यामध्यें सुंदर असा तूं ज्याअर्थी वनांत जाणार त्याअर्थी ह्या जगतामध्यें दैवच खरोखर बलवत्तर आहे आणि तेंच सर्व कांहीं करीत आहे ५. हे पुत्रा, माझे ठिकाणीं तुझ्या आगमन-चिंतेमुळें हा अग्नि उत्पन्न झाला आहे; तूं आतां दृष्टीं पडणार नाहींस अशी जी माझी मनःप्रवृत्ति तिनेंच ह्याला वायुप्रमाणें साहाय्य मिळालें आहे; विलाप आणि दुःख ह्यांच्या योगानें हा पेटत आहे; रडतां रडतां पडलेले अश्रु ह्याच आहुति ह्यांत टाकिलेल्या आहेत; चिंता आणि अश्रु हाच ह्याचा प्रचंड धूर आहे; निश्वा-सरूप हालचालीनें ह्याची वृद्धि होत आहे आणि असा हा अनुपम व प्रचंड शोकाग्नि

मिह मां शोकाग्निरतुलो महान्। प्रधक्ष्यति यथा कक्ष्यं चित्रभानुर्हिमात्यये ८ कथं हि धेनुः स्वं वत्सं गच्छन्तमनुगच्छति। अहं त्वानुगमिष्यामि यत्र वत्स गमिष्यसि ९ यथा निगदितं मात्रा तद्वाक्यं पुरुषर्षभः। श्रुत्वा रामोब्रवीद्वाक्यं मातरं भृशदुःखिताम् १० कैकेय्या वञ्चितो राजा मयि चारण्यमाश्रिते। भवत्या च परित्यक्तो न नूनं वर्तयिष्यति ११ भर्तुः पुनः परित्यागो नृशंसः केवलं स्त्रियाः। स भवत्या न कर्तव्यो मनसापि विगर्हितः १२ यावज्जीवति काकुत्स्थः पिता मे जगतीपतिः। शुश्रूषा क्रियतां तावत्स हि धर्मः सनातनः १३ एवमुक्ता तु रामेण कौसल्या शुभदर्शना। तथेत्युवाच सुप्रीता राममक्लिष्टकारिणम् १४ एवमुक्तस्तु वचनं रामो धर्मभृतां वरः। भूयस्तामब्रवीद्वाक्यं मातरं भृशदुःखिताम् १५ मया चैव भवत्या च कर्तव्यं वचनं पितुः। राजा भर्ता गुरुः श्रेष्ठः सर्वेषामीश्वरः प्रभुः १६ इमानि तु महारण्ये विहृत्य नव पञ्च च। वर्षाणि परमप्रीत्या स्थास्यामि वचने तव १७ एवमुक्ता प्रियं पुत्रं बाष्पपूर्णानना तदा। उवाच

---

तुझा वियोग झालेल्या मला अत्यंत कृश करून, ग्रीष्मऋतूमध्यें शुष्कतृणमय प्रदेशाला जाळणाऱ्या वणव्याप्रमाणें, जाळून टाकील ६, ७, ८. जशी पुढें चालणाऱ्या आपल्या वासराच्या मागोमाग गाय जात असते तशी, हे वत्सा, जिकडे तूं जाशील तिकडे मी तुझ्या मागोमाग येईन " ९. हें मातेनें केलेलें भाषण रामानें अगदीं तिनें सांगितल्याप्रमाणें ऐकिलें आणि तें ऐकून घेऊन तो पुरुषश्रेष्ठ राम अत्यंत दुःखित झालेल्या आपल्या मातेला ह्मणाला १० " राजाला कैकेयीनें फसाविलें आहे. तेव्हां मी अरण्यांत गेल्यावर तूंही जर त्याचा त्याग करलास तर खरोखर तो जिवंत रहाणार नाहीं ११. शिवाय, भर्त्याचा त्याग करणें ह्मणजे स्त्रीला केवळ निंद्य आहे. तेव्हां मनामध्यें आणण्यासही निंद्य असा भर्तृत्याग तूं करूं नको १२. जोंपर्यंत माझा ककुत्स्थकुलोत्पन्न पृथ्वीपति पिता जिवंत आहे तोंपर्यंत तूं त्याची शुश्रूषा कर. कारण, तसाच सनातन धर्म आहे " १३. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां चांगलें कोणतें हें पहाणारी कौसल्या प्रसन्न झाली आणि सरळ रीतीनें वागणाऱ्या रामाला " ठीक आहे " असें ह्मणाली १४. तदनंतर कौसल्येनें तसें ह्मटल्यावर तो धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ राम अत्यंत दुःखित झालेल्या त्या आपल्या मातेला फिरून ह्मणाला १५ " मीं आणि तूं पित्याच्या वचनाप्रमाणेंच वागलें पाहिजे. कारण, राजा, भर्ता, गुरु, श्रेष्ठ आणि प्रभु इतकीं नातीं त्याचे ठिकाणीं असल्यामुळें तो आपणां सर्वांचा मुक्त्यार आहे १६. हीं येवढीं चवदा वर्षे महारण्यांत घालविल्यावर मी मोठ्या आनंदानें तुझ्या वचनांत

परमार्ता तु कौसल्या सुतवत्सला १८ आसां राम सपत्नीनां वस्तुं मध्ये न मे क्षमम्। नय मामपि काकुत्स्थ वनं वन्यां मृगीमिव १९ यदि ते गमने बुद्धिः कृता पितुरपेक्षया। तां तथा रुदतीं रामो रुदन्वचनमब्रवीत् २० जीवन्त्या हि स्त्रिया भर्ता दैवतं प्रभुरेव च। भवत्या मम चैवाद्य राजा प्रभवति प्रभुः २१ न ह्यनाथा वयं राज्ञा लोकनाथेन धीमता २२ भरतश्चापि धर्मात्मा सर्वभूतप्रियंवदः। भवतीमनुवर्तेत स हि धर्मरतः सदा २३ यथा मयि तु निष्क्रान्ते पुत्रशोकेन पार्थिवः। श्रमं नावाप्नुयात्किंचिदप्रमत्ता तथा कुरु २४ दारुणश्चाप्ययं शोको यथैनं न विनाशयेत्। राज्ञो वृद्धस्य सततं हितं चर समाहिता २५ व्रतोपवासनिरता या नारी परमोत्तमा। भर्तारं नानुवर्तेत सा च पापगतिर्भवेत् २६ भर्तुः शुश्रूषया नारी लभते स्वर्गमुत्तमम्। अपि या निर्नमस्कारा निवृत्ता देवपूजनात् २७ शुश्रूषामेव कुर्वीत भर्तुः प्रियहिते रता। एष धर्मः स्त्रिया नित्यो वेदे लोके श्रुतः स्मृतः २८

---

राहीनें " १७. ह्याप्रमाणें रामानें कौसल्येला सांगितलें असतां अतिशय दुःखित झालेल्या त्या पुत्रवत्सल कौसल्येचें मुख अश्रूंनीं भरून गेलें आणि ती आपल्या प्रिय पुत्राला ह्मणाली १८ " हे रामा, ह्या सवतीं ( च्या काचा ) मध्यें माझ्यानें नाहीं रे राहवणार. पित्याकरितां वनांत जाण्याचा जर तुझा निश्चयच झाला असेल तर, हे काकुत्स्था, तूं मलाही वनांत संचार करणाऱ्या हरिणीप्रमाणें अरण्यांत घेऊन जा १९,२०. त्याप्रमाणें रडत असलेल्या त्या मातेला डोळ्यामध्यें अश्रु न आणितां राम ह्मणाला " स्त्री जिवंत असतांना भर्ता हेंच तिचें दैवत आणि तिचा प्रभु आहे २१. तेव्हां आज हा राजा तुझा व माझा प्रभु आहे. जगत्पति विचारी राजामुळें आज आपण सनाथ आहोंत २२. भरतही धर्मात्मा असून सर्व लोकांशीं प्रिय भाषण करणारा आहे. तेव्हां तोही तुझ्याच अनुरोधानें वागेल. कारण, तो नेहमीं धर्माविषयीं रत असतो २३. मी गेल्यावर राजा पुत्रशोकानें यत्किंचित्‌ही थकून जाणार नाहीं अशा रीतीनें दक्ष राहून तूं व्यवस्था ठेव २४. तात्पर्य, हा भयंकर शोक ह्याच्या नाशाला कारण होणार नाहीं अशा रीतीनें नेहमीं तूं ह्या वृद्ध राजाचें स्वस्थचित्तपूर्वक हित करीत जा २५. आचरणानें सर्वोत्कृष्ट व नेहमीं व्रतें आणि उपवास करणारी अशी जरी स्त्री असली तरी भर्त्याच्या अनुरोधानें जर ती वागत नसेल तर तिला नरकप्राप्ति होते २६ आणि वंदन व देवपूजन ह्यांचीही पर्वा न बाळगितां फक्त पतीच्या सेवेनेंच स्त्रीला उत्कृष्ट स्वर्ग प्राप्त होतो २७. तेव्हां भर्त्याला प्रिय आणि हितकारक असलेली गोष्ट करण्याविषयीं तत्पर राहून भर्त्याची सेवाच करावी हा स्त्रीचा सनातन धर्म वेदामध्यें श्रुत असून

अग्निकार्येषु च सदा सुमनोभिश्च देवताः । पूज्यास्ते मत्कृते देवि ब्राह्मणाश्चैव सत्कृताः २९ एवं कालं प्रतीक्षस्व ममागमनकाङ्क्षिणी । नियता नियताहारा भर्तृशुश्रूषणे रता ३० प्राप्स्यसे परमं कामं मयि पर्यागते सति । यदि धर्मभृतां श्रेष्ठो धारयिष्यति जीवितम् ३१ एवमुक्ता तु रामेण बाष्पपर्याकुलेक्षणा । कौसल्या पुत्रशोकार्ता रामं वचनमब्रवीत् ३२ गमने सुकृतां बुद्धिं न ते शक्नोमि पुत्रक । विनिवर्तयितुं वीर नूनं कालो दुरत्ययः ३३ गच्छ पुत्र त्वमेकाग्रो भद्रं तेस्तु सदा विभो । पुनस्त्वयि निवृत्ते तु भविष्यामि गतक्लमा ३४ प्रत्यागते महाभागे कृतार्थे चरितव्रते । पितुरानृण्यतां प्राप्ते स्वपिष्ये परमं सुखम् ३५ कृतान्तस्य गतिः पुत्र दुर्विभाव्या सदा भुवि । यस्त्वां संचोदयति मे वच आविध्य राघव ३६ गच्छेदानीं महाबाहो क्षेमेण पुनरागतः । नन्दयिष्यसि मां पुत्र साम्ना श्लक्ष्णेन चारुणा ३७ अपीदानीं स कालः स्याद्वनात्प्रत्यागतं पुनः ।

---

स्मृतीमध्येंही पठित आहे २८. हे देवि, अग्निहोत्रहोमसमयीं माझ्याकरितां पुष्पांनीं सर्वदां देवतांचें पूजन करून ब्राह्मणांचा सत्कार करीत जा २९, अशा रीतीनें काळ घालवीत घालवीत माझ्या आगमनाची वाट पहात रहा आणि शुचि व मिताहारी राहून पतिसेवेविषयीं तत्पर असत जा ३०. धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेला माझा पिता मी परत येई तोंपर्यंत जर जिवंत राहिला तर मी आल्यावर तुला अतिशय इष्ट असलेला तुझा हेतु सिद्धीस जाईल " ३१. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां कौसल्येचे नेत्र अश्रूंनीं अगदीं भरून आले आणि पुत्रशोकानें व्याकुल झालेली ती कौसल्या रामाला ह्मणाली ३२ " हे पुत्रा, जाण्याचा जो तूं निश्चय केला आहेस तो फिरविण्याला मी समर्थ नाहीं. तेव्हां, हे वीरा, खरोखर अनुल्लंघनीय असा काळच प्राप्त झाला आहे ३३. हे पुत्रा, तूं दक्ष राहून जा. हे प्रभो, तुझें सर्वदां कल्याण असो. तूं पुनरपि परत आलास ह्मणजे माझे क्लेश नाहींसे होतील ३४. सारांश, मनांत योजिलेलें व्रत संपवून व पित्याच्या ऋणांतून मुक्त होऊन कृतकृत्य झालेला तूं महाभाग्यवान् परत आलास ह्मणजे मला मोठ्या सुखानें झोंप येईल ३५. हे राघवा, ज्याअर्थी माझ्या सांगण्याचा अव्हेर करून तुला वनांत जाण्याविषयीं काल प्रेरणा करीत आहे त्याअर्थी त्याची गतिच ह्या भूलोकावरील प्राण्यांना सर्वदां अतर्क्य आहे ३६. हे महापराक्रमी पुत्रा, तूं आतां जा; पुनरपि सुखरूप परत आलास ह्मणजे स्पष्ट आणि मनोहर अशा सांत्वनपूर्वक भाषणानें तूं मला आनंद देशील ३७. हे पुत्रा, जटा व वल्कलें धारण केलेल्या तुला वनांतून परत

यत्त्वां पुत्रक पश्येयं जटावल्कलधारिणम् ३८ तथा हि रामं वनवासनिश्चितं ददर्श देवी परमेण चेतसा । उवाच रामं शुभलक्षणं वचो बभूव च स्वस्त्ययनाभिकाङ्क्षिणी ३९ [१०९९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये ऽयोध्याकाण्डे चतुर्विंशः सर्गः ॥ २४ ॥

सा विनीय तमायासमुपस्पृश्य जलं शुचि । चकार माता रामस्य मङ्गलानि मनस्विनी १ न शक्यते वारयितुं गच्छेदानीं रघूत्तम । शीघ्रं च विनिवर्तस्व वर्तस्व च सतां क्रमे २ यत्पालयसि धर्मं त्वं प्रीत्या च नियमेन च । स वै राघवशार्दूल धर्मस्त्वामभिरक्षतु ३ येभ्यः प्रणमसे पुत्र देवेष्वायतनेषु च । ते च त्वामभिरक्षन्तु वने सह महर्षिभिः ४ यानि दत्तानि तेऽस्त्राणि विश्वामित्रेण धीमता । तानि त्वामभिरक्षन्तु गुणैः समुदितं सदा ५ पितृशुश्रूषया पुत्र मातृशुश्रूषया तथा । सत्येन च महाबाहो चिरंजीवाभिरक्षितः ६ समित्कुशपवित्राणि वेद्यश्चायतनानि च । स्थण्डिलानि च विप्राणां शैला वृक्षाः क्षुपा ह्रदाः ॥ पतङ्गाः पन्नगाः सिंहास्त्वां रक्षन्तु नरोत्तम ७ स्वस्ति साध्याश्च विश्वे च मरुतश्च महर्षिभिः । स्वस्ति

---

आलेला मी पाहीन अशी वेळ येईल काय ?" ३८. असो. ह्याप्रमाणें रामाचा वनवासांत जाण्याविषयीं निश्चय झाला आहे असें अवलोकन करून देवी कौसल्येनें अगदीं मनापासून त्याच्याशीं असें शुभ भाषण केलें आणि नंतर ती त्याचें स्वस्तिवाचन करण्याकरितां उद्युक्त झाली ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चोविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २४ ॥

आपला तो शोक एकीकडे ठेवून व शुद्धोदकानें आचमन करून ती विचारी माता कौसल्या रामाला उद्देशून मंगलकारक वाक्यें उच्चारूं लागली १. (ती ह्मणाली) " हे रघूत्तमा, तुझ्या जाण्याला अडथळा आणणें शक्य नाहीं. करितां आतां तूं जा; लवकर परत फीर आणि सज्जनांच्या मार्गानें वागत जा २. ज्या धर्माचें तूं प्रेमानें व निश्चयानें पालन करीत आहेस तो धर्म, हे रघुवंशजश्रेष्ठा, तुझें सर्वप्रकारें रक्षण करो ३. हे पुत्रा, देवालयामध्यें तूं ज्यांना प्रणाम करीत असतोस ते देव महर्षींसहवर्तमान वनामध्यें तुझें रक्षण करोत ४. विचारी विश्वामित्र मुनींनीं जीं तुला अस्त्रें दिलीं आहेत तीं सर्वदां गुणसंपन्न असलेल्या तुझें रक्षण करोत ५. हे महापराक्रमी पुत्रा, पितृसेवा, मातृसेवा आणि सत्य हीं रक्षण करीत असतांना तूं चिरकाल रहा ६. समिधा, कुश, दर्भ, वेदी, देवालयें, विप्रांचीं स्थानें, पर्वत, वृक्ष, अखूड फांद्यांचीं झाडें, सरोवरें, पक्षी, सर्प आणि सिंह, हे नरोत्तमा, तुझें रक्षण करोत ७. साध्य, विश्वेदेव,

धाता विधाता च स्वस्ति पूषा भगोर्यमा ८ लोकपालाश्च ते सर्वे वासवप्रमुखास्तथा । ऋतवः षट् च ते सर्वे मासाः संवत्सराः क्षपाः ९ दिनानि च मुहूर्ताश्च स्वस्ति कुर्वन्तु ते सदा । श्रुतिस्मृतिश्च धर्मश्च पातु त्वां पुत्र सर्वतः १० स्कन्दश्च भगवान्देवः सोमश्च सबृहस्पतिः । सप्तर्षयो नारदश्च ते त्वां रक्षन्तु सर्वतः ११ ते चापि सर्वतः सिद्धा दिशश्च सदिगीश्वराः । स्तुता मया वने तस्मिन्पान्तु त्वां पुत्र नित्यशः १२ शैलाः सर्वे समुद्राश्च राजा वरुण एव च । द्यौरन्तरिक्षं पृथिवी वायुश्च सचराचरः १३ नक्षत्राणि च सर्वाणि ग्रहाश्च सह दैवतैः । अहोरात्रे तथा सन्ध्ये पान्तु त्वां वनमाश्रितम् १४ ऋतवश्चापि षट् चान्ये मासाः संवत्सरास्तथा । कलाश्च काष्ठाश्च तथा तव शर्म दिशन्तु ते १५ महावनेपि चरतो मुनिवेषस्य धीमतः । तथा देवाश्च दैत्याश्च भवन्तु सुखदाः सदा १६ राक्षसानां पिशाचानां रौद्राणां क्रूरकर्मणाम् । क्रव्यादानां च सर्वेषां मा भूत्पुत्रक ते भयम् १७ प्लवगा वृश्चिका दंशा मशकाश्चैव कानने । सरीसृपाश्च कीटाश्च मा भूवन्गहने तव १८ महाद्विपाश्च सिंहाश्च व्याघ्रा ऋक्षाश्च दंष्ट्रिणः । महिषाः शृङ्गिणो रौद्रा न ते द्रुह्यन्तु पुत्रक १९ नृमां-

---

महर्षींसहवर्तमान मरुद्गण, विराट्, सृष्टिकर्ता, पूषा, भग आणि अर्यमा तुझें कल्याण करोत ८. इंद्रप्रभृति सर्व लोकपाल, सहा ऋतु, सर्व महिने, संवत्सर, रात्रि ९, दिवस आणि मुहूर्त हे तुझें रक्षण करोत आणि, हे पुत्रा, श्रुति, स्मृति व धर्म तुझें सर्व बाजूंनीं रक्षण करोत १०. भगवान् स्कंददेव, चंद्र, बृहस्पति, सप्तर्षि आणि नारद हे सर्व-बाजूंनीं तुझें रक्षण करोत ११. सिद्ध, दिशा आणि दिक्पाल ह्यांचें मीं स्तवन केलें आहे. तस्मात् , हे पुत्रा, त्या वनामध्यें ते तुझें नेहमीं सर्व बाजूंनीं रक्षण करोत १२. पर्वत, सर्व समुद्र, राजा वरुण, स्वर्ग, अंतरिक्ष, भूमि, चराचरांसहवर्तमान वायु १३, सर्व नक्षत्रें, अधिदेवता व प्रत्यधिदेवता ह्यांसहवर्तमान सर्व ग्रह, दिवस व रात्रि आणि दोन्ही संध्या वनाच्या आश्रयानें राहिलेल्या तुझें रक्षण करोत १४. सहा ऋतु, महिने, संवत्सर, कला आणि काष्ठा तुझें कल्याण करोत १५. तूं विचारी मुनिवेष धारण करून महावनामध्यें संचार करीत असतांना देव आणि दैत्य तुला नेहमीं सुखदायक होवोत १६. हे पुत्रा, घोर व क्रूरकर्मी राक्षस आणि पिशाच व सर्व प्रकारचे मांस-भक्षक प्राणी ह्यांपासून तुला भय न होवो १७. वानर, वनमक्षिका, मशक, सर्प आणि कीटक गहनवनामध्यें तुझ्यासमीप न येवोत १८. मोठे मोठे गज, सिंह, व्याघ्र, ऋक्ष, विषारी दाढांनीं युक्त असलेले प्राणी, महिष आणि क्रूर अशीं शिगाळूं जनावरें, हे

सभोजना रौद्रा ये चान्ये सर्वजातियाः । मा च त्वां हिंसिषुः पुत्र मया संपूजितास्त्विह २० आगमास्ते शिवाः सन्तु सिध्यन्तु च पराक्रमाः । सर्वसंपत्तयो राम स्वस्तिमान्गच्छ पुत्रक २१ स्वस्ति तेऽस्त्वान्तरिक्षेभ्यः पार्थिवेभ्यः पुनः पुनः । सर्वेभ्यश्चैव देवेभ्यो ये च ते परिपन्थिनः २२ शुक्रः सोमश्च सूर्यश्च धनदोथ यमस्तथा । पान्तु त्वामर्चिता राम दण्डकारण्यवासिनम् २३ अग्निर्वायुस्तथा धूमो मन्त्राश्चर्षिमुखच्युताः । उपस्पर्शनकाले तु पान्तु त्वां रघुनन्दन २४ सर्वलोकप्रभुर्ब्रह्मा भूतकर्तृनथर्षयः । ये च शेषाः सुरास्ते तु रक्षन्तु वनवासिनम् २५ इति माल्यैः सुरगणान्गन्धैश्चापि यशस्विनी । स्तुतिभिश्चानुरूपाभिरानर्चायतलोचना २६ ज्वलनं समुपादाय ब्राह्मणेन महात्मना । हावयामास विधिना राममङ्गलकारणात् २७ घृतं श्वेतानि माल्यानि समिधश्चैव सर्षपान् । उपसंपादयामास कौसल्या परमाङ्गना २८ उपाध्यायः सविधिना हुत्वा शान्तिमनामयम् । हुतहव्यावशेषेण बाह्यं बलिमकल्पयत् २९ मधुदध्यक्षत-

---

पुत्रा, तुझ्याशीं क्रोध न करोत १९. नरमांस भक्षण करणाऱ्या ज्या कांहीं ह्मणून दुसऱ्या सर्व जाति आहेत त्यांचें मीं येथें पूजन केलें आहे. ह्यास्तव, हे पुत्रा, त्या तुझी हिंसा न करोत २०. तुला मार्ग कल्याणकारक होवोत, तुझे पराक्रम सफल होवोत, सर्व प्रकारच्या अपेक्षित समृद्धि वनामध्यें तुला प्राप्त होवोत आणि, हे पुत्रा, तूं कल्याणसंपन्न राहून तुझें गमन होवो २१. आकाश आणि पृथ्वी ह्यांत वास्तव्य करणारे प्राणी व सर्व देव ह्यांपासून आणि तुझे जे कोणी शत्रु असतील त्यांपासून तुझें कल्याण होवो २२. हे रामा, शुक्र, चंद्र, सूर्य, कुबेर आणि यम ह्यांचें मीं पूजन केलें आहे. करितां, तूं दंडकारण्यामध्यें वास्तव्य करीत असतांना तुझें हे रक्षण करोत २३. अग्नि, वायु, धूम व ऋषींच्या मुखापासून निघालेले मंत्र, हे रघुनंदना, स्नानसमयीं तुझें रक्षण करोत २४. सर्वलोकाधिपति ब्रह्मा, जगत्कारण ब्रह्म आणि बाकीचे जे देव ते वनांत वास्तव्य करणाऱ्या तुझें रक्षण करोत " २५. असें ह्मणत ह्मणत त्या विशालनयना यशस्विनी कौसल्येनें पुष्पें, गंध आणि यथायोग्य स्तुति ह्यांच्या योगाने देवगणांचें पूजन केलें २६ व नंतर अग्नि आणून राममंगलार्थ महात्म्या ब्राह्मणांकडून तिनें यथाविधि हवन करविलें २७. घृत, श्वेत पुष्पें, समिधा आणि मोहऱ्या हीं द्रव्यें त्या उत्कृष्ट स्त्री कौसल्येनें जुळविल्यावर २८ रामाला आरोग्य प्राप्त व्हावें या उद्देशानें उपाध्यायानें होम केला आणि होम करून जें हविर्द्रव्य अवशिष्ट राहिलेलें होतें त्याचा त्यानें होमस्थानाहून बाह्य असा लोकपालादिकांना बलि केला २९

घृतैः स्वस्ति वाच्यं द्विजांस्ततः । वाचयामास रामस्य वने स्वस्त्ययनक्रियाम् ३० ततस्तस्मै द्विजेन्द्राय राममाता यशस्विनी । दक्षिणां प्रददौ काम्यां राघवं चेदमब्रवीत् ३१ यन्मङ्गलं सहस्राक्षे सर्वदेवनमस्कृते । वृत्रनाशे समभवत्तत्ते भवतु मङ्गलम् ३२ यन्मङ्गलं सुपर्णस्य विनिताकल्पयत्पुरा । अमृतं प्रार्थयानस्य तत्ते भवतु मङ्गलम् ३३ अमृतोत्पादने दैत्यान्घ्नतो वज्रधरस्य यत् । अदितिर्मङ्गलं प्रादात्तत्ते भवतु मङ्गलम् ३४ त्रिविक्रमान्प्रक्रमतो विष्णोरतुलतेजसः । यदासीन्मङ्गलं राम तत्ते भवतु मङ्गलम् ३५ ऋषयः सागरा द्वीपा वेदा लोका दिशश्च ताः । मङ्गलानि महाबाहो दिशन्तु शुभमङ्गलम् ३६ इति पुत्रस्य शेषाश्च कृत्वा शिरसि भामिनी । गन्धैश्चापि समालभ्य राममायतलोचना ३७ औषधीं च सुसिद्धार्थां विशल्यकरणीं शुभाम् । चकार रक्षां कौसल्या मन्त्रैरभिजजाप च ३८ उवाचापि प्रहृष्टेव सा दुःखवशवर्तिनी । वाङ्मात्रेण न भावेन वाचा संसज्जमानया ३९ आनम्य मूर्ध्नि चाघ्राय परिष्वज्य यशस्विनी । अवदत्पुत्रमिष्टार्थो गच्छ राम यथासुखम् ४० अरोगं सर्वसि-

---

आणि त्यावर मध, दहि, अक्षता व घृत हीं द्रव्यें घातलीं. तदनंतर रामाचें वनामध्यें मंगल असावें एतदर्थ ब्राह्मणांकडून तिनें पुण्याहवाचन करविलें ३०. तेव्हां त्या यशस्वी राममातेनें त्या द्विजश्रेष्ठाला यथेष्ट दक्षिणा दिली आणि रामाला ती ह्मणाली ३१ " सर्व देवांना मान्य अशा इंद्राला वृत्रवधसमयीं जें मंगल झालें तें तुला मंगल होवो ३२. अमृत आणण्याकरितां निघालेल्या गरुडाला जें विनतेनें पूर्वी मंगल केलें तें तुला मंगल होवो ३३. अमृतोत्पादनसमयीं दैत्यांचा घात करणाऱ्या वज्रपाणि इंद्राला अदितीनें जें मंगल केलें तें तुला मंगल होवो ३४. तीन पाउलें टाकतांना अतुलतेजस्वी विष्णूला जें मंगल झालें तें, हे रामा, तुला मंगल होवो ३५. हे महापराक्रमी रामा, ऋषि, सागर, द्वीपें, वेद, लोक आणि दिशा तुला नुसतीं मंगलें करोत इतकेंच नव्हे परंतु, मंगलांचेंही मंगल त्यांच्यापासून तुला प्राप्त होवो " ३६. ह्याप्रमाणें ह्मणून त्या विशालनयना कौसल्येनें रामाच्या मस्तकावर अक्षता टाकिल्या आणि रामाला तिनें गंध चोपडिलें ३७. नंतर जिच्या प्रभावाचा प्रत्यय आलेला आहे अशी विशल्यकरणीनामक शुभ औषधि रामाचें रक्षण होण्याकरितां कौसल्येनें त्याच्या हातांत बांधून मंत्रांनीं तिचें अभिमंत्रणही केलें ३८. तदनंतर दुःखाच्या तावडींत सांपडलेली ही ती कौसल्या आनंदित झाल्यासारिखी झाली आणि रामाला कवटाळून व त्याचें मस्तक हुंगून मनांतून जरा तसा उद्देश नव्हता तरी, केवल शब्दमात्रानें अडखळत

द्धार्थमयोध्यां पुनरागतम् । पश्यामि त्वां सुखं वत्स सन्धितं राजवर्त्मसु ४१ मङ्गलैरुपसंपन्नो वनवासादिहागतः । वध्वाश्च मम नित्यं त्वं कामान्संवर्धयाहि भोः ४२ मयार्चिता देवगणाः शिवादयो महर्षयो भूतगणाः सुरोरगाः । अभिप्रयातस्य वनं चिराय ते हितानि काङ्क्षन्तु दिशश्च राघव ४३ अतीव चाश्रुप्रतिपूर्णलोचना समाप्य च स्वस्त्ययनं यथाविधि । प्रदक्षिणं चापि चकार राघवं पुनः पुनश्चापि निरीक्ष्य सस्वजे ४४ तया हि देव्या च कृतप्रदक्षिणो निपीड्य मातुश्चरणौ पुनःपुनः । जगाम सीतानिलयं महायशाः स राघवः प्रज्वलितस्तया श्रिया ४५ [११४४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे पञ्चविंशतितमः सर्गः ॥२५॥

अभिवाद्य तु कौसल्यां रामः संप्रस्थितो वनम् । कृतस्वस्त्ययनो मात्रा धर्मिष्ठे वर्त्मनि स्थितः १ विराजयन्राजसुतो राजमार्गं नरैर्वृतम् । हृदयान्याममन्थेव जनस्य गुणवत्तया २ वैदेही चापि तत्सर्वं न शुश्राव तपस्विनी । तदेव हृदि तस्याश्च यौवराज्याभिषेचनम् ३ देवकार्यं स्म सा कृत्वा कृतज्ञा

---

अडखळत त्याला ह्मणाली " हे रामा, तूं इष्टकार्याकरितां खुशाल अरण्यामध्यें जा ३९, ४०. हे वत्सा, सर्व हेतु सिद्धीस जाऊन अयोध्येमध्यें तूं पुनरपि रोगरहित परत आलास ह्मणजे राजमार्गामध्यें प्रजाजनांनीं परिवेष्टित झालेल्या तुला मी अवलोकन करीन ४१. हे रामा, तूं मंगलसंपन्न राहून वनवासांतून येथें परत आलास ह्मणजे स्नुषेचे व माझे उद्देश तूं सफल कर आणि आतां जा ४२. हे राघवा, शिवादि देवगण, महर्षि, भूतगण, इतर देव, पन्नग व दिशा वनांत निघालेल्या तुझ्या हिताची चिरकाल इच्छा धरोत " ४३. अश्रूंनीं जिचे नेत्र अतिशयच भरून आलेले आहेत अशा कौसल्येनें ह्याप्रमाणें यथाविधि मंगल केल्यावर रामाला प्रदक्षिणा केली आणि पुन्हां पुन्हां त्याच्याकडे पाहून तिनें त्याला कवटाळिलें ४४. तेव्हां त्या देवीनें प्रदक्षिणा केली असतां रामानें पुन्हां पुन्हां मातेचे चरण धरिले आणि त्या मंगलरूप श्रीनें झळकूं लागलेल्या त्या महाकीर्तिमान् रघुवंशज रामानें सीतेच्या मंदिराकडे गमन केलें ४५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंचविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २५ ॥

मातेनें मंगल केल्यानंतर अत्यंत धर्मानुरूप अशा मार्गानें वागणारा राम कौसल्येला अभिवंदन करून वनांत निघाला १. जातांना प्रजाजनांनीं भरून गेलेला राजमार्ग त्यानें सुशोभित केला आणि गुणसंपन्नतेमुळें लोकांचीं अंतःकरणें त्यानें विह्वल करून टाकिलीं २. इकडे बिचाऱ्या सीतेनें ह्यांतलें कांहींच ऐकिलें नव्हतें आणि रामाला

हृष्टचेतना । अभिज्ञा राजधर्माणां राजपुत्री प्रतीक्षती ४ प्रविवेशाथ रामस्तु स्ववेश्म सुविभूषितम् । प्रहृष्टजनसंपूर्णं ह्रिया किंचिदवाङ्मुखः ५ अथ माता समुत्पत्य वेपमाना च तं पतिम् । अपश्यच्छोकसंतप्तं चिन्ताव्याकुलितेन्द्रियम् ६ तां दृष्ट्वा स हि धर्मात्मा न शशाक मनोगतम् । तं शोकं राघवः सोढुं ततो विवृततां गतः ७ विवर्णवदनं दृष्ट्वा तं प्रस्विन्नममर्षणम् । आह दुःखाभिसंतप्ता किमिदानीमिदं प्रभो ८ अद्य बार्हस्पतः श्रीमान्युक्तः पुष्येण राघव । प्रोच्यते ब्राह्मणैः प्राज्ञैः केन त्वमसि दुर्मनाः९ न ते शतशलाकेन जलफेननिभेन च । आवृतं वदनं वल्गु च्छत्रेणाभिविराजते १० व्यजनाभ्यां च मुख्याभ्यां शतपत्रनिभेक्षणम् । चन्द्रहंसप्रकाशाभ्यां वीज्यते न तवाननम् ११ वाग्मिनो वन्दिनश्चापि प्रहृष्टास्त्वां नरर्षभ । स्तुवन्तो नाद्य दृश्यन्ते मङ्गलैः सूतमागधाः १२ न ते क्षौद्रं च दधि च ब्राह्मणा वेदपारगाः । मूर्ध्नि मूर्धाभिषिक्तस्य ददति स्म विधानतः १३

---

यौवराज्याचा अभिषेक होणार हेंच तिच्या मनामध्यें घोळत होतें ३. राजधर्मांचें जिला ज्ञान आहे अशी ती कृतज्ञ राजकन्या देवांचें पूजन करून रामाची वाट पहात बसली आहे तों इतक्यांत ४ आनंदित लोकांनीं गजबजलेल्या व उत्तमप्रकारें भूषित केलेल्या आपल्या मंदिरामध्यें लज्जेनें किंचित् अधोमुख झालेला राम प्रविष्ट झाला ५. तेव्हां सीता सत्वर उठली आणि शोकानें संतप्त होऊन चिंतेनें मनामध्यें व्याकुल झालेल्या आपल्या पतीकडे कांपत कांपत पाहूं लागली ६. तेव्हां तिला अवलोकन केल्यावर तो धर्मात्मा रघुवंशज राम मनांतील शोक आंवरून धरण्यास समर्थ न झाल्यामुळें तो शोक दृष्टोत्पत्तीस आलाच ७. तेव्हां शोक धारण करण्यास असमर्थ दिसत असलेल्या रामाचें मुख घामानें डवडवून निस्तेज झालें आहे असें अवलोकन करून दुःखसंतप्त झालेली सीता त्याला ह्मणाली " हे प्रभो, ह्या प्रसंगीं हें काय ? ८. हे रघुवंशज, आज चांगला गुरुपुष्ययोग आहे आणि ह्या योगावर आपणांला राज्याभिषेक होणार असें विद्वान् ब्राह्मण सांगत आहेत. तेव्हां आपणाला खिन्न होण्याचें कारण काय ? ९. शेंकडों शलाकांनीं युक्त असलेल्या व उदकाच्या फेंसाप्रमाणें शुभ्र असलेल्या छत्रानें आपलें मनोहर मुख झांकून गेलेलें आज कोठें दिसत नाहीं १०. चंद्र आणि हंस ह्याप्रमाणें दिसणाऱ्या विंझोण्यांचा वारा आज आपल्या कमलासारिख्या मुखावर घातला जात नाहीं ११ आणि, हे पुरुषश्रेष्ठ, बोलके भाट, वंशस्तावक व स्तुतिपाठक हेही आनंदित होऊन मंगलकारक शब्दांनीं आपली स्तुति करीत असल्याचें आज दृष्टोत्पत्तीस येत नाहीं १२. वेदपारंगत ब्राह्मण राज्याभिषेक झालेल्या

न त्वां प्रकृतयः सर्वाः श्रेणीमुख्याश्च भूषिताः । अनुव्रजितुमिच्छन्ति पौरजानपदास्तदा १४ चतुर्भिर्वेगसंपन्नैर्हयैः काञ्चनभूषणैः । मुख्यः पुष्परथो युक्तः किं न गच्छति तेऽग्रतः १५ न हस्ती चाग्रतः श्रीमान्सर्वलक्षणपूजितः । प्रयाणे लक्ष्यते वीर कृष्णमेघगिरिप्रभः १६ न च काञ्चनचित्रं ते पश्यामि प्रियदर्शन । भद्रासनं पुरस्कृत्य यान्तं वीर पुरःसरम् १७ अभिषेको यदा सज्जः किमिदानीमिदं तव । अपूर्वो मुखवर्णश्च न प्रहर्षश्च लक्ष्यते १८ इतीव विलपन्तीं तां प्रोवाच रघुनन्दनः । सीते तत्रभवांस्तातः प्रव्राजयति मां वनम् १९ कुले महति संभूते धर्मज्ञे धर्मचारिणि । शृणु जानकि येनेदं क्रमेणाद्यागतं मम २० राज्ञा सत्यप्रतिज्ञेन पित्रा दशरथेन वै । कैकेय्यै मम मात्रे तु पुरा दत्तौ महावरौ २१ तयाद्य मम सज्जेऽस्मिन्नभिषेके नृपोद्यते । प्रचोदितः स समयो धर्मेण प्रतिनिर्जितः २२ चतुर्दश हि वर्षाणि वस्तव्यं दण्डके मया । पित्रा मे भरतश्चापि यौवराज्ये नियोजितः २३ सोऽहं त्वामागतो द्रष्टुं प्रस्थितो विजनं

---

आपल्या मस्तकीं मध व दही यथाविधि घालीत नाहींत १३ आणि सर्व मंत्रिमंडळ, मुख्य मुख्य सभानायक व नगरवासी आणि देशातांतील लोक आपल्या मागोमाग जाण्याची इच्छा करीत नाहींत १४. सुवर्णाचे अलंकार घातलेले चार वेगवान् अश्व ज्याला जोडिले आहेत असा आपला मुख्य पुष्परथ आपणांपुढें कां चालत नाहीं ? १५. हे वीर, कृष्णवर्ण मेघाप्रमाणें अथवा कृष्णवर्ण पर्वताप्रमाणें दिसणारा सर्वलक्षणसंपन्न वैभवशाली गज तुमच्या स्वारीमध्यें पुढें कां दिसत नाहीं ? १६. हे प्रियदर्शन, हे वीर, सोन्याचें काम ज्यावर केलें आहे असें भद्रासन घेऊन आपल्यापुढें जाणारा सेवक आज मला दिसत नाहीं १७. अभिषेकाची जर तयारी झालेली आहे तर ह्या प्रसंगीं आपल्या मुखावर कांहीं अपूर्व वर्ण दिसत असून हर्ष मुळींच दृष्टोत्पत्तीस येत नाहीं हें काय ?" १८. ह्याप्रमाणें विलाप करणाऱ्या त्या सीतेला रघुनंदन राम ह्मणाला "हे सीते, तो पिता मला वनामध्यें पाठवीत आहे १९. हे कुलीन धर्मवेत्ते धर्मचारिणि जानकि, कोणत्या कारणामुळें आज मला हें वनवासांत जाणें प्राप्त झालें आहे तें ऐक २०. सत्यप्रतिज्ञ पित्या दशरथराजानें माझ्या कैकेयी मातेला पूर्वी दोन वर देऊं केले होते २१ व राजाच्या उपक्रमानें आज माझा अभिषेक होण्याचें ठरल्यावर तिनें तो पूर्वीचा संकेत पुढें करून धर्ममार्गानें राजाला वश करून घेतलें २२. ह्यामुळें चवदा वर्षेपर्यंत मला दंडकारण्यामध्यें वास्तव्य केलें पाहिजे. माझ्या पित्यानें भरताला यौवराज्याचा अभिषेक करण्याचें ठरविलें आहे २३. ह्यास्तव, निर्जन वनांत जाण्यास

वनम् । भरतस्य समीपे ते नाहं कथ्यः कदाचन २४ ऋद्धियुक्ता हि पुरुषा न सहन्ते परस्तवम् । तस्मान्न ते गुणाः कथ्या भरतस्याग्रतो मम २५ अहं ते नानुवक्तव्यो विशेषेण कदाचन । अनुकूलतया शक्यं समीपे तस्य वर्तितुम् २६ तस्मै दत्तं नृपतिना यौवराज्यं सनातनम् । स प्रसाद्यस्त्वया सीते नृपतिश्च विशेषतः २७ अहं चापि प्रतिज्ञां तां गुरोः समनुपालयन् । वनमद्यैव यास्यामि स्थिरी भव मनस्विनि २८ याते च मयि कल्याणि वनं मुनिनिषेवितम् । व्रतोपवासपरया भवितव्यं त्वयानघे २९ कल्यमुत्थाय देवानां कृत्वा पूजां यथाविधि । वन्दितव्यो दशरथः पिता मम जनेश्वरः ३० माता च मम कौसल्या वृद्धा संतापकर्शिता । धर्ममेवाग्रतः कृत्वा त्वत्तः संमानमर्हति ३१ वन्दितव्याश्च ते नित्यं याः शेषा मम मातरः । स्नेहप्रणयसंभोगैः समा हि मम मातरः ३२ भ्रातृपुत्रसमौ चापि द्रष्टव्यौ च विशेषतः । त्वया भरतशत्रुघ्नौ प्राणैः प्रियतरौ मम ३३ विप्रियं च न कर्तव्यं भरतस्य कदाचन । स हि राजा

---

सिद्ध झालेला मी तुला भेटण्याकरितां आलों आहें. भरताजवळ तूं माझी कधींही प्रशंसा करीत जाऊं नकोस २४. वैभवसंपन्न पुरुषांना दुसऱ्याची स्तुति सहन होत नाहीं. तस्मात्, भरतापुढें तूं माझ्या गुणांची प्रशंसा करीत जाऊं नकोस २५. माझ्या संबंधानें तूं विशेषसें कांहीं एक बोलत जाऊं नकोस. भरताच्या मर्जीप्रमाणें वागून त्याच्या समीप राहणें तुला शक्य आहे २६. राजानें यौवराज्य अक्षय त्याला दिलें आहे. तेव्हां, हे सीते, त्याची व विशेषतः राजाची तुला कृपा संपादन केली पाहिजे २७. कैकेयीपाशीं पित्यानें केलेली ती प्रतिज्ञा खरी करण्याकरितां मी आजच वनांत जाणार. करितां, हे विचारी सीते, तूं स्वस्थ हो २८. हे कल्याणि, हे निरुपद्रवी सीते, मुनींनीं सेवित अशा वनांत मी गेल्यानंतर तूं व्रतें व उपवास करीत रहात जा २९. पहाटेस उठून देवांचें यथाविधि पूजन करीत जा आणि माझ्या पित्या दशरथराजाला वंदन करीत जा ३०. माझी माता कौसल्या वृद्ध झाली असून दुःखानें कृश झाली आहे. तेव्हां धर्म हीच गोष्ट मुख्यतः मनामध्यें आणून तूं तिची मानमान्यता ठेवणें योग्य आहे ३१. माझ्या इतर मातांनाही तूं नेहमीं वंदन करीत जा. प्रेम, वात्सल्य आणि लाडि पुरीवणें ह्यांविषयीं सर्वही माता मला सारिख्याच आहेत ३२. प्राणांपेक्षांही मला प्रिय असे जे भ्रात भरत व शत्रुघ्न त्यांना विशेषतः तूं आपल्या भ्रात्यांप्रमाणें अथवा पुत्रांप्रमाणें समजून त्यांच्यावर लक्ष्य ठेवीत जा ३३. परंतु, भरताच्या मर्जीबाहेर तूं कधींही वागत जाऊं नकोस. कारण, हे वैदेहि, तो आपल्या देशाचा व कुळाचा राजा

च वैदेहि देशस्य च कुलस्य च ३४ आराधिता हि शीलेन प्रयत्नैश्चोपसेविताः । राजानः संप्रसीदन्ति प्रकुप्यन्ति विपर्यये ३५ औरस्यानपि पुत्रान्हि त्यजन्त्यहितकारिणः । समर्थान्संप्रगृह्णन्ति जनानपि नराधिपाः ३६ सा त्वं वसेह कल्याणि राज्ञः समनुवर्तिनी । भरतस्य रता धर्मे सत्यव्रतपरायणा ३७ अहं गमिष्यामि महावनं प्रिये त्वया हि वस्तव्यमिहैव भामिनि । यथा व्यलीकं कुरुषे न कस्यचित्तथा त्वया कार्यमिदं वचो मम ३८[११८२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षड्विंशः सर्गः ॥ २६ ॥

एवमुक्ता तु वैदेही प्रियार्हा प्रियवादिनी । प्रणयादेव संक्रुद्धा भर्तारमिदमब्रवीत् १ किमिदं भाषसे राम वाक्यं लघुतया ध्रुवम् । त्वया यदपहास्यं मे श्रुत्वा नरवरोत्तम २ वीराणां राजपुत्राणां शस्त्रास्त्रविदुषां नृप । अनर्हमयशस्यं च न श्रोतव्यं त्वयेरितम् ३ आर्यपुत्र पिता माता भ्राता पुत्रस्तथा स्नुषा । स्वानि पुण्यानि भुञ्जानाः स्वं स्वं भाग्यमुपासते ४ भर्तु-

---

आहे ३४. सुशीलपणानें राजांनें आराधन करून प्रयत्नांनीं त्यांची सेवा केली तरच ते प्रसन्न होतात नाहींतर क्रुद्ध होतात ३५. अहितकारी अशा स्वतःच्या पुत्रांचाही त्याग करून ( आपले उत्तम रीतीनें प्रजापालन करण्याचे हेतु सिद्धीस नेण्यास ) समर्थ असलेल्या तिऱ्हाइत लोकांनाही राजे आपल्या हाताशीं धरितात ३६. ह्यास्तव, हे कल्याणि, राजा भरताच्या अनुरोधानें वागून तूं येथें रहा; धर्माचे ठिकाणीं उत्तम निष्ठा ठेव आणि सत्यरूप व्रताचाच अवलंबन करून रहात जा ३७. हे प्रिये, हे स्त्रिये, मी महावनामध्यें जाणार; तूं येथेंच रहा आणि ज्याअर्थीं तूं कधींही माझें सांगणें व्यर्थ करीत नाहींस त्याअर्थीं ह्या माझ्या सांगण्याप्रमाणें तूं वाग ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सव्विसावा सर्ग समाप्त झाला ॥ २६ ॥

प्रिय गोष्टींचा उपभोग घेण्यासच योग्य असलेल्या प्रियवादिनी वैदेहीला रामानें असें सांगितलें असतां केवल प्रेमामुळेंच क्रुद्ध होऊन ती भर्त्याला ह्मणाली १ " हे पुरुषश्रेष्ठा रामा, मला क्षुल्लक समजून आपण हें काय भाषण करीत आहां? आपण केलेलें हें भाषण ऐकून मला तर अतिशय हंसूंच येत आहे २. हे नृप, वीर, राजकुमार आणि शस्त्रास्त्रवेत्ते ह्यांना काळिमा लावणारें असें जें अयोग्य भाषण आपण केलें आहे तें ऐकण्यासारिखें नाहीं ३. महाराज, पिता, माता, भ्राता, पुत्र आणि स्नुषा हीं सर्व आपआपल्याच सुकृतांचा उपभोग घेणारीं असून आपल्याच भाग्यावर अवलंबून असतात ४;

भाग्यं तु नार्येका प्राप्नोति पुरुषर्षभ । अतश्चैवाहमादिष्टा वने वस्तव्यमित्यपि ५ न पिता नात्मजो वात्मा न माता न सखीजनः । इह प्रेत्य च नारीणां पतिरेको गतिः सदा ६ यदि त्वं प्रस्थितो दुर्गं वनमद्यैव राघव । अग्रतस्ते गमिष्यामि मृद्नन्ती कुशकण्टकान् ७ ईर्ष्यां रोषं बहिष्कृत्य भुक्तशेषमिवोदकम् । नय मां वीर विस्रब्धः पापं मयि न विद्यते ८ प्रासादाग्रे विमानैर्वा वैहायसगतेन वा । सर्वावस्थागता भर्तुः पादच्छाया विशिष्यते ९ अनुशिष्टास्मि मात्रा च पित्रा च विविधाश्रयम् । नास्मि संप्रतिवक्तव्या वर्तितव्यं यथा मया १० अहं दुर्गं गमिष्यामि वनं पुरुषवर्जितम् । नानामृगगणाकीर्णं शार्दूलगणसेवितम् ११ सुखं वने निवत्स्यामि यथैव भवने पितुः । अचिन्तयन्ती त्रीँल्लोकांश्चिन्तयन्ती पतिव्रतम् १२ शुश्रूषमाणा ते नित्यं नियता ब्रह्मचारिणी । सह रंस्ये त्वया वीर वनेषु मधुगन्धिषु १३ त्वं हि कर्तुं वने शक्तो राम संपरिपालनम् । अन्य-

---

परंतु, हे पुरुषश्रेष्ठ, एक स्त्री मात्र भर्त्याच्या भाग्यावर अवलंबून असते. तस्मात्, वनामध्यें वास्तव्य करावें ही आज्ञा मलाही झालीच आहे ५. इहलोकीं आणि परलोकीं स्त्रियांना पति हाच मुख्य आश्रय आहे. पिता, पुत्र, आत्मा, माता आणि सख्या ह्यांपैकी कोणीही नाहीं ६. हे राघव, आजच जर आपण वनांत निघालां आहां तर दर्भ व कांटे तुडवीत तुडवीत मी आपल्यापुढें जाणार ७. ह्यास्तव, ईर्ष्या आणि क्रोध सध्यां दूर ठेवा आणि, हे वीर, ( निर्जन प्रदेशामध्यें प्रवास करण्याचा प्रसंग आला असतांना ) पिऊन शिलक राहिलेलें उदक ज्याप्रमाणें लोक बरोबर घेतात त्याप्रमाणें आपण मला निःशंकपणें वनामध्यें न्या; माझ्या मनांत पाप नाहीं ८. कोणतीही अवस्था प्राप्त झाली तरी स्त्रीनें पतिचरणांच्या छायेला असणेंच—राजवाड्यांत राहण्यापेक्षां, विमानांत बसून फिरण्यापेक्षां अथवा सिद्धि प्राप्त झाल्यामुळें आकाशमार्गानें गमन करण्यापेक्षां—अधिक श्रेयस्कर आहे ९. सांप्रत मीं कसें वागावें हें कांहीं मला शिकविण्याचें कारण राहिलें नाहीं. आईबापांनीं मला पूर्वींच ( संसारांत संभवणाऱ्या ) अनेक प्रकारच्या अवस्था लक्ष्यांत आणून त्या मला पढवून ठेविल्या आहेत १०. अनेक प्रकारच्या पशुसमुदायांनीं व्याप्त व व्याघ्रांच्या कळपांनीं आश्रय केलेल्या अशा निर्जन गहन वनामध्यें मीही जाणार ११. मी अगदीं माहेराप्रमाणें वनामध्यें सुखांत राहीन. पतिसेवारूप व्रताचें चिंतन करीत असतांना त्रैलोक्यापैकीं कशाचेंही मला स्मरण होणार नाहीं १२. हे वीर, मकरंदानें सुगंधित झालेल्या वनामध्यें मी नेहमीं शुचिर्भूत व ब्रह्मचारिणी राहून आपल्या सेवेमध्यें आपणांसहवर्तमान आनंदांत दिवस काढीत जाईन १३. हे संमानास्पद रामा,

स्यापि जनस्येह किं पुनर्मम मानद १४ साहं त्वया गमिष्यामि वनमद्य न संशयः । नाहं शक्या महाभाग निवर्तयितुमुद्यता १५ फलमूलाशना नित्यं भविष्यामि न संशयः । न ते दुःखं करिष्यामि निवसन्ती त्वया सदा १६ अग्रतस्ते गमिष्यामि भोक्ष्ये भुक्तवति त्वयि १७ इच्छामि परतः शैलान्पल्वलानि सरांसि च । द्रष्टुं सर्वत्र निर्भीता त्वया नाथेन धीमता १८ हंसकारण्डवाकीर्णाः पद्मिनीः साधुपुष्पिताः । इच्छेयं सुखिनी द्रष्टुं त्वया वीरेण संगता १९ अभिषेकं करिष्यामि तासु नित्यमनुव्रता । सह त्वया विशालाक्ष रंस्ये परमनन्दिनी २० एवं वर्षसहस्राणि शतं वापि त्वया सह । व्यतिक्रमं न वेत्स्यामि स्वर्गोपि हि न मे मतः २१ स्वर्गेपि च विना वासो भविता यदि राघव । त्वया विना नरव्याघ्र नाहं तदपि रोचये २२ अहं गमिष्यामि वनं सुदुर्गमं मृगायुतं वानरवारणैश्च । वने निवत्स्यामि यथा पितुर्गृहे तवैव पादावुपगृह्य

---

एकाद्या तिऱ्हाईताचेंहीं आपण वनामध्यें संरक्षण करण्यास समर्थ आहां; मग, माझ्या संरक्षणाची तर गोष्ट कशाला पाहिजे ? १४ मी आपल्याबरोबर आज निःसंशय वनामध्यें येणार. हे महाभाग्यवान् , वनांत येणास तयार झालेल्या मला परत फिरविणें शक्य नाहीं १५. मी आपली नेहमीं फळें व मुळें खाऊन राहीन; ह्याविषयीं संशय नको. आपल्या बरोबर रहात असतांना मी आपणांला दुःख देणार नाहीं १६. मी आपल्यापुढें चालत जाईन. ( माझ्याकरितां आपणांला सावकाश चालण्याची अगर थांबण्याची पाळी येणार नाहीं. ) आपलें भोजन झाल्यानंतर ( जें कांहीं उरेल त्यांत ) मी भोजन करीत जाईन १७. पर्वत, तळीं व सरोवरें पहाण्याची माझी इच्छा आहे. आपण विचारी नाथ माझ्याबरोबर असल्यामुळें मला कोठेंही भीति नाहीं १८. आपणा वीराबरोबर सुखानें राहून हंस व कारंडव ह्या पक्ष्यांनीं गजबजलेलीं व चांगल्या रीतीनें प्रफुल्लित झालेलीं कमलयुक्त सरोवरें पहाण्याची मला इच्छा आहे १९. मी त्या सरोवरांचे ठिकाणीं नेहमीं स्नान करीत जाईन; आपल्या सेवेमध्यें नेहमीं तत्पर राहीन आणि, हे विशालनयना, आपल्यासह आनंदानें दिवस काढून मी आपणांला पराकाष्ठेचा आनंद देत जाईन २०. ह्याप्रमाणें आपल्याबरोबर शंभर अथवा हजार वर्षें जरी काढण्याचा प्रसंग आला तरी मला दुःख होणार नाहीं. मला स्वर्गही संमत नाहीं २१. हे राघवा, हे पुरुषश्रेष्ठा, आपल्यावांचून स्वर्गामध्यें जर माझें वास्तव्य होणें असेल, तर तें सुद्धां मला संमत नाहीं २२. मृग, वानर आणि हत्ती ह्यांनीं युक्त अशा अत्यंत दुर्गम वनांत मी जाईन आणि आपल्याच चरणांचा स्वीकार करून व

संमता २३ अनन्यभावामनुरक्तचेतसं त्वया वियुक्तां मरणाय निश्चिताम् । नयस्व मां साधु कुरुष्व याचनां नातो मया ते गुरुता भविष्यति २४ तथा ब्रुवाणामपि धर्मवत्सलां न च स्म सीतां नृवरो निनीषति । उवाच चैनां बहु सन्निवर्तने वने निवासस्य च दुःखितां प्रति २५ [१२०७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तविंशः सर्गः ॥ २७ ॥

स एवं ब्रुवतीं सीतां धर्मज्ञां धर्मवत्सलः । न नेतुं कुरुते बुद्धिं वने दुःखानि चिन्तयन् १ सान्त्वयित्वा तत स्तां तु बाष्पदूषितलोचनाम् । निवर्तनार्थे धर्मात्मा वाक्यमेतदुवाच ह २ सीते महाकुलीनासि धर्मे च निरता सदा । इहाचरस्व धर्मं त्वं यथा मे मनसः सुखम् ३ सीते यथा त्वां वक्ष्यामि तथा कार्यं त्वयाबले । वने दोषा हि बहवो वसतस्तान्निबोध मे ४ सीते विमुच्यतामेषा वनवासकृता मतिः । बहुदोषं हि कान्तारं वनमित्यभिधीयते ५ हितबुद्ध्या खलु वचो मयैतदभिधीयते । सदा सुखं

---

आपल्या वचनांत राहून मी अगदीं माहेराप्रमाणें वनांत वास्तव्य करीन २३. आपल्या वांचून माझ्या मनांत दुसरी कसलीही गोष्ट नाहीं. माझें मन आपले ठिकाणीं अनुरक्त आहे व आपला वियोग झाल्यास माझा मरणाविषयीं निश्चय झालेला आहे. तेव्हां मला वनांत घेऊन जा; माझ्या प्रार्थनेला चांगला मान द्या. मी आल्यानें आपणांला कसलाही भार होणार नाहीं " २४. ती धर्मवत्सल सीता ह्याप्रमाणें ह्मणत असतांनाही पुरुषश्रेष्ठ रामानें तिला घेऊन जाण्याचें मनांत आणिलें नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, तिनें आपला आग्रह सोडावा एतदर्थ वनवासांत होणाऱ्या दुःखासंबंधानें त्यानें पुष्कळच तिला सांगितलें २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्ताविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २७ ॥

ह्याप्रमाणें ती धर्मज्ञ सीता बोलत असतांनाही वनांतील दुःखें मनामध्यें आणून त्या धर्मवत्सल रामानें तिला वनांत नेण्याचा विचार केला नाहीं १. ( तिचें भाषण ऐकून घेतल्या ) नंतर अश्रूंनीं नेत्र दूषित झालेल्या त्या सीतेचें सांत्वन करून तो धर्मात्मा राम वनांत न येण्याविषयीं तिला ह्मणाला २ " हे सीते, तूं महाकुलीन असून धर्माविषयीं नेहमीं तत्पर असतेस. ह्यास्तव, तूं येथेंच राहून धर्माचरण कर; ह्मणजे माझ्या मनाला सुख होईल ३. हे सीते, मी सांगेन तसें तुला वागलें पाहिजे. हे अबले, वनांत राहणाऱ्याला जे क्लेश प्राप्त होत असतात ते तूं माझ्या पासून ऐकून घे ४, आणि, हे सीते, वनवासाला जाण्याचें जें हें तूं मनामध्यें आणिलें आहेस तें सोडून दे. ज्यांत अतिशय क्लेश होतात व ज्यांत प्रवेश होणेंही दुष्कर आहे त्या ( प्रदेशाला )

न जानामि दुःखमेव सदा वनम् ६ गिरिनिर्झरसंभूता गिरिनिर्दरिवासिनाम्। सिंहानां निनदा दुःखाः श्रोतुं दुःखमतो वनम् ७ क्रीडमानाश्च विस्रब्धा मत्ताः शून्ये तथा मृगाः। दृष्ट्वा समभिवर्तन्ते सीते दुःखमतो वनम् ८ सग्राहाः सरितश्चैव पङ्कवत्यस्तु दुस्तराः। मत्तैरपि गजैर्नित्यमतो दुःखतरं वनम् ९ लताकण्टकसंकीर्णाः कृकवाकूपनादिताः। निरपाश्च सुदुःखाश्च मार्गा दुःखमतो वनम् १० सुप्यते पर्णशय्यासु स्वयंभग्नासु भूतले। रात्रिषु श्रमखिन्नेन तस्माद्दुःखमतो वनम् ११ अहोरात्रं च संतोषः कर्तव्यो नियतात्मना। फलैर्वृक्षावपतितैः सीते दुःखमतो वनम् १२ उपवासश्च कर्तव्यो यथा प्राणेन मैथिलि। जटाभारश्च कर्तव्यो वल्कलाम्बरधारणम् १३ देवतानां पितॄणां च कर्तव्यं विधिपूर्वकम्। प्राप्तानामतिथीनां च नित्यशः प्रतिपूजनम् १४ कार्यस्त्रिरभिषेकश्च काले काले च नित्यशः। चरतां नियमेनैव तस्माद्दुःखतरं वनम् १५ उपहारश्च कर्तव्यः

---

वन असें ह्मणतात ५. मी तुझें कल्याण व्हावें ह्या बुद्धीनें खरोखर तुला हें सांगत आहें. वन हें सुखप्रद कधींही नसून नेहमीं दुःखप्रदच आहे ६. गिरिकंदरांत राहणाऱ्या सिंहांच्या गर्जना पर्वतावरील नद्यांच्या ध्वनीनें युक्त अशा नुसत्या ऐकणेंही दुःखप्रद आहे. तस्मात्, वन हें दुःखकारकच आहे ७. त्याचप्रमाणें मत्त वनपशु निर्जन वनामध्यें निःशंकपणें खेळत असतात; परंतु, मनुष्य दृष्टीं पडतांक्षणीं त्याला मारण्याकरितां ते त्याच्या अंगावर चालून जातात. ह्मणून, हे सीते, वन दुःखकारक आहे ८. वनामध्यें सुसरी व चिखल ह्यांनीं भरलेल्या अशा दुस्तर नद्या असतात व त्या वनांत नेहमीं मत्त गज हिंडत असतात. ह्मणून वन हें फारच दुःखदायक आहे ९. वनांतील मार्गामध्यें जिकडे तिकडे लता व कांटे पडलेले असतात व मध्यंतरीं कोठेंही उदक नसून त्या मार्गावरून जाणेंही फार दुःखदायक असतें. ह्मणून वन हें दुःखकारक आहे १०. (दिवसां चालून) श्रमानें थकून गेलेल्या मनुष्याला रात्रीं वृक्षावरून भूतलावर आपोआप गळून पडलेल्या पानांची शय्या करून शयन करावें लागतें. तस्मात्, वन हें दुःखकारक आहे ११. वनवासांत राहणाऱ्या मनुष्यानें जितेंद्रिय राहिलें पाहिजे आणि वृक्षावरून गळून पडलेल्या फलांवर रात्रंदिवस संतोषानें असलें पाहिजे. ह्मणून, हे सीते, वन दुःखकारक आहे १२. हे मैथिलि, सामर्थ्याप्रमाणें तेथें उपवास केले पाहिजेत आणि जटा धारण करून वल्कलवस्त्रें परिधान केलीं पाहिजेत १३. (अशा स्थितींतही) देव आणि पितर ह्यांचें विधिपूर्वक संतर्पण करून आलेल्या अतिथींचें नेहमीं आदरातिथ्य केलें पाहिजे १४. वनवास करणाऱ्यांनीं वेळोवेळीं नियमानेंच वागलें

कुसुमैः स्वयमाहृतैः । आर्षेण विधिना वेद्यां सीते दुःखमतो वनम् १६ यथालब्धेन कर्तव्यः संतोषस्तेन मैथिलि । यथाहारैर्वनचरैः सीते दुःखमतो वनम् १७ अतीव वातस्तिमिरं बुभुक्षा चास्ति नित्यशः । भयानि च महान्त्यत्र अतो दुःखतरं वनम् १८ सरीसृपाश्च बहवो बहुरूपाश्च भामिनि । चरन्ति पथि ते दर्पात्ततो दुःखतरं वनम् १९ नदीनिलयनाः सर्पा नदीकुटिलगामिनः । तिष्ठन्त्यावृत्य पन्थानमतो दुःखतरं वनम् २० पतङ्गा वृश्चिकाः कीटा दंशाश्च मशकैः सह । बाधन्ते नित्यमबले सर्वं दुःखमतो वनम् २१ द्रुमाः कण्टकिनश्चैव कुशाः काशाश्च भामिनि । वने व्याकुलशाखाग्रास्तेन दुःखमतो वनम् २२ कायक्लेशाश्च बहवो भयानि विविधानि च । अरण्यवासे वसतो दुःखमेव सदा वनम् २३ क्रोधलोभौ विमोक्तव्यौ कर्तव्या तपसे मतिः । न भेतव्यं च भेतव्ये दुःखं नित्यमतो वनम् २४ तदलं ते वनं गत्वा क्षेमं न हि वनं तव । विमृशन्निव

---

पाहिजे आणि त्रिकाल स्नान केलें पाहिजे. तस्मात्, वन हें फारच दुःखदायक आहे १५. स्वहस्तांनीं आणिलेल्या पुष्पांच्या योगानें स्थंडिलावर ऋषिप्रोक्त विधीनें नेहमीं देवपूजन केलें पाहिजे. ह्मणून, हे सीते, वन हें दुःखदायक आहे १६. हे मैथिलि, जें प्राप्त होईल त्यांत संतोष मानिला पाहिजे आणि वनचरांनीं जे पदार्थ मिळतील त्यावर उपजीविका केली पाहिजे. ह्मणून, हे सीते, वन दुःखदायक आहे १७. रात्रीं फारच वारा सुटलेला असून अतिशय अंधार पडलेला असतो; भूक ही नेहमींच लागलेली असते आणि ह्या वनांत भयें तर मोठींच असतात. तस्मात्, वन फारच दुःखदायक आहे १८. हे स्त्रिये, नानाप्रकारचे असंख्य सर्प वनांत असून ते मोठ्या तोऱ्यातोऱ्यानें मार्गावरून संचार करीत असतात. ह्मणून वन हें फारच दुःखकारक आहे १९. गतींनेंही नद्यांप्रमाणें वक्र असून नद्यांच्याच आश्रयाला राहणारे सर्प मार्ग अडवून बसलेले असतात. तस्मात्, वन अतिशयच दुःखकारक आहे २०. पक्षी, विंचु, कीटक, रानमाशा आणि मशक हे एकसारिखे कोणालाही पीडा देत असतात. तस्मात् , हे अबले, वन दुःखदायक आहे २१. हे स्त्रिये, कंटक वृक्ष, कुश आणि काश ह्यांच्या शाखांचीं अग्रें वनामध्यें एकमेकांत गुंतलेलीं असतात. ह्मणून वन हें दुःखकारक आहे २२. अरण्यांत राहणाऱ्याला नानाप्रकारचीं भयें असून अतिशयच शारीरिक क्लेश होत असतात. ह्मणून वन हें सर्वदा दुःखकारकच आहे २३. क्रोध आणि लोभ सोडून देऊन आपली मति तपश्चर्येकडे लाविली पाहिजे आणि भिण्यासारिखा प्रसंग आला असतांही भितां उपयोगी नाहीं. तस्मात्, वन हें

पश्यामि बहुदोषकरं वनम् २५ वनं तु नेतुं न कृता मतिर्यदा बभूव रामेण तदा महात्मना । न तस्य सीता वचनं चकार तं ततोऽब्रवीद्राम-मिदं सुदुःखिता २६ [१२३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदि-काव्येयोध्याकाण्डेऽष्टाविंशः सर्गः ॥ २८ ॥

एतत्तु वचनं श्रुत्वा सीता रामस्य दुःखिता । प्रसक्ताश्रुमुखी मन्दमिदं वचनमब्रवीत् १ ये त्वया कीर्तिता दोषा वने वस्तव्यतां प्रति । गुणा-नित्येव तान्विद्धि तव स्नेहपुरस्कृता २ मृगाः सिंहा गजाश्चैव शार्दूलाः शरभास्तथा । चमराः सृमराश्चैव ये चान्ये वनचारिणः ३ अदृष्टपूर्वरू-पत्वात्सर्वे ते तव राघव । रूपं दृष्ट्वापसर्पेयुस्तव सर्वे हि बिभ्यति ४ त्वया च सह गन्तव्यं मया गुरुजनाज्ञया । त्वद्वियोगेन मे राम त्यक्तव्यमिह जीवितम् ५ न हि मां त्वत्समीपस्थामपि शक्रोपि राघव । सुराणामी-श्वरः शक्तः प्रधर्षयितुमोजसा ६ पतिहीना तु या नारी न सा शक्ष्यति

---

दुःखकारकच आहे २४. ह्यास्तव, तुझें तें वनांत जाणें पुरे. वन तुला कल्याणकारक होणार नाहीं. विचार करून पाहूं लागलें असतां वनांत असंख्य दोष असल्याचें मला दिसतें " २५. ह्याप्रमाणें तो महात्मा राम जेव्हां तिला वनांत नेण्याचें मनांत आणीना तेव्हां त्याचें तें बोलणें मनास न आणितां सीता अतिशय दुःखित होऊन त्या रामाला बोलूं लागली २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यां-तील अयोध्याकांडापैकीं अठ्ठाविसावा सर्ग समाप्त झाला ॥ २८ ॥

हें रामाचें भाषण श्रवण करून दुःखित झालेल्या सीतेच्या मुखावर अश्रु गळूं लागले आणि ती हळूं हळूं रामाला ह्मणाली १ " आपण जे वनांत वास्तव्य कर-ण्यासंबंधानें दोष सांगितले ते गुणच आहेत असें आपण समजा. कारण, आपल्या प्रीतीला पात्र अशी मी आहें ( व आपल्या प्रेमाचें जें स्थान तेथें कोणताही दोष असण्याचा संभव नाहीं अशी माझी खात्री आहे ) २. श्वापदें, सिंह, गज, व्याघ्र व शरभ, चमर, सृमर वगैरे मृग आणि इतरही जे कोणी वनांत संचार करणारे अस-तील ३ ते सर्व- हे राघव, आपलें रूप त्यांनीं पाहिलें नसल्यामुळें तें अवलोकन करि-तांक्षणीं- दूर निघून जातील. कारण, आपणांला सर्व भितात ४. हे रामा, गुरुजनांच्या आज्ञेनें मला घेऊनच आपणांला गेलें पाहिजे. नाहींतर, हे राम, आपला वियोग झाला असतां मी येथें प्राणत्याग करीन ५. 'मी आपल्या जवळ असलें ह्मणजे देवराज इंद्रही बलात्कारानें माझा पराभव करण्यास समर्थ होणार नाहीं. ( मग इतरांची कथा कशाला पाहिजे )' ६. ज्या स्त्रीला पतीचा वियोग झाला तिच्यानें जीव धरून रहाणें

जीवितुम्। काममेवंविधं राम त्वया मम निदर्शितम् ७ अथापि च महाप्राज्ञ ब्राह्मणानां मया श्रुतम्। पुरा पितृगृहे सत्यं वस्तव्यं किल मे वने ८ लक्षणिभ्यो द्विजातिभ्यः श्रुत्वाहं वचनं गृहे। वनवासकृतोत्साहा नित्यमेव महाबल ९ आदेशो वनवासस्य प्राप्तव्यः स मया किल। सा त्वया सह भर्त्राहं यास्यामि प्रिय नान्यथा १० कृतादेशा भविष्यामि गमिष्यामि त्वया सह। कालश्चायं समुत्पन्नः सत्यवाग्भवतु द्विजः ११ वनवासे हि जानामि दुःखानि बहुधा किल। प्राप्यन्ते नियतं वीर पुरुषैरकृतात्मभिः १२ कन्यया च पितुर्गेहे वनवासः श्रुतो मया। भिक्षिण्याः शमवृत्ताया मम मातुरिहाग्रतः १३ प्रसादितश्च वै पूर्वं त्वं मे बहुतिथं प्रभो। गमनं वनवासस्य काङ्क्षितं हि सह त्वया १४ कृतक्षणाहं भद्रं ते गमनं प्रति राघव। वनवासस्य शूरस्य मम चर्या हि रोचते १५

---

शक्य नाहीं आणि, हे राम, अशाप्रकारें आपण स्वतः माझ्या निदर्शनालाही आणून दिलेंच आहे. कारण, ( भरताच्या मर्जीनें वागण्याचा जो आपण उपदेश केला आहे त्याप्रमाणें वागणूक होणें माझ्याकडून अशक्यच असल्यामुळें आपला वियोग झाला असतां मरण जवळ केल्यावांचून मला गत्यंतरच नाहीं ) ७. शिवाय, हे महाबुद्धिमान् , माझें खरोखर वनामध्यें वास्तव्य होणें आहे असें पित्याचें घरीं असतांना ब्राह्मणांच्या मुखांतून मीं पूर्वी ऐकिलेलेंही आहे ८. हें सामुद्रिक जाणणाऱ्या ब्राह्मणाचें वचन पित्याचे घरीं ऐकिल्यापासून, हे महाबलाढ्य, वनांत वास्तव्य करण्याविषयीं मी नेहमींच उत्सुक झालें आहें ९. वनवासासंबंधानें असलेला जो ईश्वरी नेमानेम तो माझ्या हातून पार पडलाच पाहिजे. तस्मात् , हे प्रिय, मी आपणांबरोबर वनांत येणार ह्यांत अंतर पडणार नाहीं १०. मी आपल्याबरोबर वनांत येऊन ब्राह्मणांचें तें वचन शेंवटास नेईन. तें सिद्धीस जाण्याचा हा समय प्राप्त झाला आहे. ह्यास्तव, तें ब्राह्मणांचें वचन खरें होवो ११. हे वीरा, वनवासामध्यें जीं दुःखें नानाप्रकारांनीं होत असतात तीं विषयाधीन पुरुषांना होत असतात असें मी समजतें १२. माझ्या मातेसमोर शमाचें अवलंबन करणाऱ्या एका भिक्षेकरिणीनें माझ्या दैवीं वनवास असल्याचें सांगितलें आहे व तें कुमारिका असतांनाच पित्याच्या घरीं मीं ऐकिलें आहे १३. हे प्रभो, मीं कित्येक वेळां वनवासांत जाण्याविषयीं विनवण्या करून आपणांला प्रसन्न करून घेतलें आहे. सारांश, आपल्याबरोबर वनांत जाण्याची माझी इच्छा पुष्कळ दिवसांपासूनची आहे १४. हे राघव, आपलें दैव बरें करो. वनांत निघण्याला मी अगदीं तयार झालें आहें आणि आपण शूर वनवास करीत असतांना आपली शुश्रूषा करणें

शुद्धात्मन्प्रेमभावाद्धि भविष्यामि विकल्मषा । भर्तारमनुगच्छन्ती भर्ता हि परदैवतम् १६ प्रेत्यभावे हि कल्याणः संगमो मे सदा त्वया । श्रुतिर्हि श्रूयते पुण्या ब्राह्मणानां यशस्विनाम् १७ इह लोके च पितृभिर्या स्त्री यस्य महाबल । अद्भिर्दत्ता स्वधर्मेण प्रेत्यभावेपि तस्य सा १८ एवमस्मात्स्वकां नारीं सुवृत्तां हि पतिव्रताम् । नाभिरोचयसे नेतुं त्वं मां केनेह हेतुना १९ भक्तां पतिव्रतां दीनां मां समां सुखदुःखयोः । नेतुमर्हसि काकुत्स्थ समानसुखदुःखिनीम् २० यदि मां दुःखितामेवं वनं नेतुं न चेच्छसि । विषमग्निं जलं वाहमास्थास्ये मृत्युकारणात् २१ एवं बहुविधं तं सा याचते गमनं प्रति । नानुमेने महाबाहुस्तां नेतुं विजनं वनम् २२ एवमुक्ता तु सा चिन्तां मैथिली समुपागता । स्नापयन्तीव गामुष्णैरश्रुभिर्नयनच्युतैः २३ चिन्तयन्तीं तदा तां तु निवर्तयितुमात्मवान् । क्रोधाविष्टां तु वैदेहीं काकुत्स्थो बहुसान्त्व-

---

माझ्या मनाला रुचत आहे १५. हे शुद्धबुद्धे, प्रेमभावानें मी भर्त्याच्या मागोमाग वनामध्यें गेलें ह्मणजे मी लोकापवादापासून अलिप्त राहीन. शिवाय, भर्ता हें स्त्रीचें मुख्य दैवत आहे १६. ह्या देहाचा त्याग करून आपण जाऊं लागला असतांही आपला समागम मला परलोकीं नेहमीं कल्याणकारक होणारा आहे आणि यशस्वी ब्राह्मणांच्या मुखांतून ही पुढील आशयाची श्रुतिही ऐकूं येत आहे १७. हे महाबलाढ्य, "स्वधर्माला अनुसरून इहलोकीं वडील माणसांनीं उदकपूर्वक जी स्त्री ज्याला दिलेली असते तीच त्याची परलोकींही स्त्री होते" १८. तस्मात्, ह्याप्रमाणें सद्वर्तनानें राहून पातिव्रत्यानें वागत असलेल्या मला आपण कोणत्या कार्यास्तव ह्या नगरांतून वनांत घेऊन जाण्याचें मनांत आणीत नाहीं ? १९. "हे ककुत्स्थकुलोत्पन्न, मला आपण वनामध्यें घेऊन जा; मी आपले ठिकाणीं अनुरक्त आहें; पतिव्रता आहें; दीन आहें व आपल्या सुखदुःखांचीही सारखीच वाटेकरीण आहें; ह्मणजे आपलें जें सुखदुःख तेंच माझें सुखदुःख आहे २०. तस्मात्, अशाप्रकारें दुःखित असलेल्या मला आपण जर वनांत नेण्याचें मनांत आणीत नसाल तर मृत्यु येण्याकरितां विषप्राशन करणें, अग्निकाष्ठ भक्षण करणें अथवा उदकांत उडी घालणें ह्यांपैकीं कांहींतरी मी करणारच" २१. ह्याप्रमाणें तिनें नानाप्रकारांनीं आपणांला वनांत नेण्याविषयीं रामाची प्रार्थना केली असतांही महापराक्रमी रामानें निर्जन वनामध्यें तिला घेऊन जाण्याचें मान्य केलें नाहीं २२. तेव्हां तसें रामानें सांगितल्यावर सीता आपल्या नेत्रांतून गळणाऱ्या उष्ण अश्रूंच्या योगानें पृथ्वीला जशी कांहीं स्नानच घालूं लागली आणि चिंताक्रांत झाली २३. नंतर वनांत जाण्याच्या आग्रहापासून निवृत्त करण्याकरितां त्या जितेंद्रिय ककुत्स्थ-

यत् २४ [ १२५७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्ड एकोनत्रिंशः सर्गः ॥ २९ ॥

सान्त्व्यमाना तु रामेण मैथिली जनकात्मजा । वनवासनिमित्तार्थं भर्तारमिदमब्रवीत् १ सा तमुत्तमसंविग्ना सीता विपुलवक्षसम् । प्रणयाच्चाभिमानाच्च परिचिक्षेप राघवम् २ किं त्वामन्यत वैदेहः पिता मे मिथिलाधिपः । राम जामातरं प्राप्य स्त्रियं पुरुषविग्रहम् ३ अनृतं बत लोकोयमज्ञानाद्यदि वक्ष्यति । तेजो नास्ति परं रामे तपतीव दिवाकरे ४ किं हि कृत्वा विषण्णस्त्वं कुतो वा भयमस्ति ते । यत्परित्यक्तुकामस्त्वं मामनन्यपरायणाम् ५ द्युमत्सेनसुतं वीरं सत्यवन्तमनुव्रताम् । सावित्रीमिव मां विद्धि त्वमात्मवशवर्तिनीम् ६ न त्वहं मनसाप्यन्यं द्रष्टास्मि त्वदृतेऽनघ । त्वया राघव गच्छेयं यथान्या कुलपांसनी ७ स्वयं तु भार्यां कौमारीं चिरमध्युषितां सतीम् । शैलूष इव मां राम परेभ्यो दातुमिच्छसि ८ यस्य

---

कुलोत्पन्न रामानें चिंताक्रांत होऊन क्रोधाविष्ट झालेल्या त्या वैदेहीचें पुष्कळ सांत्वन केलें २४. ह्या प्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकोणतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ २९ ॥

जनककन्या सीतेचें राम सांत्वन करूं लागला असतां वनवासांत जाण्यासंबंधानें अनुमति मिळावी एतदर्थ ती भर्त्याला बोलूं लागली १. प्रथमतः अतिभयभीत झालेल्या त्या सीतेनें प्रेमामुळें व अभिमानामुळें विपुल वक्षःस्थलानें युक्त असलेल्या त्या रघुवंशज रामाची निंदा करण्यास सुरवात केली २. ( ती ह्मणाली ) " हे राम, पुरुषरूप धारण करणारा आणि वस्तुतः स्त्री असलेला जामाता मिळविल्यानें माझ्या मिथिलाधिपति पित्या जनकाला काय बरें वाटलें असेल ? ३. रामाचे ठिकाणीं जें उत्कृष्ट तेज आहे तें ह्या प्रकाशित होणाऱ्या सूर्यामध्येंही नाहीं असें जर फिरून हे लोक कधीं अज्ञानानें ह्मणूं लागले तर तें असत्य आहे ( असें मी समजेन ) ४. काय ह्मणून आपण खिन्न झाला आहांत व आपणांला भय तरी कोठून प्राप्त झालें आहे ? कारण, फक्त आपणांवरच अवलंबून असलेल्या माझा त्याग करण्यास आपण उद्युक्त झाला आहांत ५. द्युमत्सेनपुत्र वीर सत्यवानाला जशी सावित्री वश होती तशी मी आपणांला वश आहें असें आपण समजा ६. हे निष्पाप राघव, कुलाला बट्टा लावणारी एकादी स्त्री जशी परपुरुषाकडे पहात असते तशी मी आपल्यावांचून दुसऱ्याकडे पाहण्याचं मनांतही आणणार नाहीं. मी आपल्याबरोबर येईन ७. तरुण, अगदीं लहानपणापासून आपल्याबरोबर राहिलेली आणि पतिव्रता अशी मी आपली भार्या असतांना, हे

पथ्यं च रामात्थ यस्य चार्थेवरुध्यसे । त्वं तस्य भव वश्यश्च विधेयश्च सदानघ ९ स मामनादाय वनं न त्वं प्रस्थितुमर्हसि । तपो वा यदि वारण्यं स्वर्गो वा स्यात्त्वया सह १० न च मे भविता तत्र कश्चित्पथि परिश्रमः। पृष्ठतस्तव गच्छन्त्या विहारशयनेष्विव ११ कुशकाशशरेषीका ये च कण्टकिनो द्रुमाः । तूलाजिनसमस्पर्शा मार्गे मम सह त्वया १२ महावातसमुद्धूतं यन्मामवकरिष्यति । रजो रमण तन्मन्ये परार्ध्यमिव चन्दनम् १३ शाद्वलेषु यदा शिश्ये वनान्तर्वनगोचरा । कुथास्तरणयुक्तेषु किं स्यात्सुखतरं ततः १४ पत्रं मूलं फलं यत्तु अल्पं वा यदि वा बहु । दास्यसे स्वयमाहृत्य तन्मेमृतरसोपमम् १५ न मातुर्न पितुस्तत्र स्मरिष्यामि न वेश्मनः । आर्तवान्युपभुञ्जाना पुष्पाणि च फलानि च १६ न च तत्र ततः किंचिद्द्रष्टुमर्हसि विप्रियम् । मत्कृतेन च ते शोको न भविष्यामि

---

राम, स्त्रीवर उपजीविका करणाऱ्याप्रमाणें आपण मला परपुरुषाला देण्याची इच्छा करीत आहांत ८. हे निष्पाप, ज्याच्या मर्जीप्रमाणें वागत जा ह्मणून आपण मला उपदेश करीत आहां आणि ज्याच्याकरितां आपला अभिषेकसमारंभ हाणून पडलेला आहे त्याच्या मर्जीप्रमाणें आपणच वागत जा आणि त्याचे आज्ञाधारकही आपणच व्हां. (माझ्यानें ती गोष्ट होणार नाहीं.) ९. सारांश, मला घेतल्यावांचून वनांत निघणें आपणांला योग्य नाहीं. आपल्यासहवर्तमान मला तप, अरण्य अथवा स्वर्ग ह्यांपैकीं कांहींही प्राप्त होवो १०. क्रीडास्थानांतील शय्येवर पडल्यानें ज्याप्रमाणें कांहीं श्रम होत नाहींत त्याचप्रमाणें आपल्या मागोमाग मी वनांमध्यें येऊं लागलें असतां मार्गांमध्यें मला कसल्याही प्रकारचे श्रम होणार नाहींत ११. कुश, काश, शर, लव्हाळे आणि इतर जे कांहीं कंटक वृक्ष मार्गामध्यें असतील त्या सर्वांचा स्पर्श मी आपल्या बरोबर असले ह्मणजे मला कापसाच्या अथवा कृष्णाजिनाच्या स्पर्शाबरोबर होईल १२. हे नाथ, मोठा वारा सुटून जी धूळ माझ्या अंगावर येऊन पडेल तें मी अत्युत्तम चंदनच समजत आहे १३. वनचर बनल्यानंतर वनामध्यें मी जेव्हां कोमल तृणांत शयन करीन तेव्हां त्या शयनापेक्षां राजवाड्यामध्यें लोकरीच्या कापडांचीं मऊ मऊ आस्तरणें घातलेल्या मंचकांवरील शयन मला जास्ती कां सुखकर होणार आहे? १४. पानें, मुळें अथवा फळें ह्यांपैकीं जें कांहीं थोडें बहुत आपण स्वतः मला आणून द्याल तें मला अमृतरसासारिखें होईल १५. ऋतूंना अनुसरून जीं जीं पुष्पें अथवा फळें मिळतील त्यांचें सेवन करूं लागले असतां मला मातेचें, पित्याचें अथवा घराचें स्मरण देखील होणार नाहीं १६. मी आल्यानें आपलें कांहीं अप्रिय होईल असें आपण मुळींच

**दुर्भरा १७ यस्त्वया सह स स्वर्गो निरयो यस्त्वया विना। इति जानन्परां प्रीतिं गच्छ राम मया सह १८ अथ मामेवमव्यग्रां वनं नैव नयिष्यसे। विषमद्यैव पास्यामि मा वशं द्विषतां गमम् १९ पश्चादपि हि दुःखेन मम नैवास्ति जीवितम्। उज्झितायास्त्वया नाथ तदैव मरणं वरम् २० इमं हि सहितुं शोकं मुहूर्तमपि नोत्सहे। किं पुनर्दश वर्षाणि त्रीणि चैकं च दुःखिता २१ इति सा शोकसंतप्ता विलप्य करुणं बहु। चुक्रोश पतिमायस्ता भृशमालिङ्ग्य सस्वरम् २२ सा विद्धा बहुभिर्वाक्यैर्दिग्धैरिव गजाङ्गना। चिरसंनियतं बाष्पं मुमोचाग्निमिवारणिः २३ तस्याः स्फटिकसंकाशं वारि संतापसंभवम्। नेत्राभ्यां परिसुस्राव पङ्कजाभ्यामिवोदकम् २४ तत्सितामलचन्द्राभं मुखमायतलोचनम्। पर्यशुष्यत बाष्पेण जलोद्धृतमिवाम्बुजम् २५ तां परिष्वज्य बाहुभ्यां विसंज्ञामिव दुःखिताम्।**

---

मनामध्यें आणूं नका व माझ्याकारितां आपणांला वाईट वाटण्याचेंही कारण नाहीं. माझें पोषण करणें आपल्याला कांहीं कठीण जाणार नाहीं १७. आपल्याबरोबर जी स्थिति मला प्राप्त होईल तो माझा स्वर्ग आहे आणि आपला वियोग होऊन कसलीही स्थिति जरी प्राप्त होणार असली तरी तो मला नरक आहे: हें माझें आपल्या ठिकाणीं असलेलें पराकाष्ठेचें प्रेम जाणून, हे राम, आपण मला बरोबर घेऊन वनांत जा १८. ह्याप्रमाणें एकनिष्ठपणानें सेवा करणाऱ्या मला जर आपण वनांत नेत नसाल तर शत्रूंच्या अधीन होऊन राहण्यापेक्षां मी आजच्या आजच विषप्राशन करीन १९. हे नाथ, आपण माझा त्याग करून गेला ह्मणजे आपल्या मागें तरी दुःखामुळें जिवंत राहणें मला शक्य नाहींच. तेव्हां आपण वनवासांत निघण्यापूर्वींच मरण येणें अधिक श्रेयस्कर आहे. (कारण, असें झाल्यानें वियोगदुःख तरी मला होणार नाहीं )२०. मला हा शोक एक क्षणभर देखील सहन होणार नाहीं; मग दहा, तीन आणि एक इतकीं वर्षें मी कोठून दुःखित राहाणार ?" २१. ह्याप्रमाणें त्या शोकसंतप्त झालेल्या सीतेनें दीन वाणीनें अतिशयच विलाप केले आणि आपल्या जिवाचा फारच त्रास करून घेऊन व पतीला वारंवार कवटाळून धरून तिनें मोठ्या मोठ्यानें आक्रोश केला २२. विषलिप्त बाणांनीं विद्ध झालेल्या हत्तिणीप्रमाणें रामाच्या अनेक भाषणांनीं विद्ध झालेली ती सीता अग्नि बाहेर टाकणाऱ्या अरणीप्रमाणें फार वेळपर्यंत दाबून ठेविलेले अश्रू ढाळूं लागली २३. संतापामुळें तिच्या नेत्रांतून गळूं लागलेलें तें स्फटिकासारिखें स्वच्छ जल कमलांतून गळणाऱ्या उदकाप्रमाणें दिसूं लागलें २४. दीर्घनेत्रांनीं युक्त आणि पौर्णिमेच्या निर्मल चंद्राप्रमाणें असलेलें तें तिचें मुख अश्रूंमुळें, उदकांतून बाहेर काढिलेल्या

उवाच वचनं रामः परिविश्वासयंस्तदा २६ न देवि तव दुःखेन स्वर्ग- मप्यभिरोचये । न हि मेस्ति भयं किंचित्स्वयंभोरिव सर्वतः २७ तव सर्वमभिप्रायमविज्ञाय शुभानने । वासं न रोचयेरण्ये शक्तिमानपि रक्षणे २८ यत्सृष्टासि मया सार्धं वनवासाय मैथिलि । न विहातुं मया शक्या प्रीति- रात्मवता यथा २९ धर्मस्तु गजनासोरु सद्भिराचरितः पुरा । तं चाहमनुव- र्तिष्ये यथा सूर्यं सुवर्चला ३० न खल्वहं न गच्छेयं वनं जनकनन्दिनि। वचनं तन्नयति मां पितुः सत्योपबृंहितम् ३१ एष धर्मश्च सुश्रोणि पितुर्मा- तुश्च वश्यता । आज्ञां चाहं व्यतिक्रम्य नाहं जीवितुमुत्सहे ३२ अस्वाधीनं कथं दैवं प्रकारैरभिराध्यते । स्वाधीनं समतिक्रम्य मातरं पितरं गुरुम् ३३ यत्र त्रयं त्रयो लोकाः पवित्रं तत्समं भुवि । नान्यदस्ति शुभापाङ्गे तेनेदमभि-

---

कमलाप्रमाणें, शुष्क दिसूं लागलें २५. असो. ह्याप्रमाणें दुःखित होऊन गत- प्राण झाल्याप्रमाणें पडलेल्या त्या सीतेला शुद्धीवर आणण्याकरितां हातांनीं कवटाळून धरून राम ह्मणाला २६ " हे देवि, तुला दुःख होत असेल तर स्वर्गाचीही मला अभिरुचि नाहीं आणि स्वयंभू ब्रह्मदेवाप्रमाणें मला कोठूनही भय प्राप्त होण्याचा संभव नाहीं २७. परंतु, हे सुमुखि, तुझा सर्व अभिप्राय न समजल्यामुळें मी तुझें रक्षण करण्यास समर्थ असतांनाही तुझें अरण्यांत वास्तव्य मला बरें वाटलें नाहीं २८. हे मैथिलि, माझ्यासहवर्तमान वनवास करण्याकरितांच जर तुला ब्रह्मदेवानें निर्माण केली आहे तर आत्मवेत्त्या पुरुषाला दयेचा त्याग करणें जसा अशक्य आहे तसाच माझ्या हातून तुझा त्याग होणें अशक्य आहे २९. हे गजनासोरु[1], पूर्वीं सज्जनांनीं जो धर्म आचरिलेला आहे त्याच धर्माच्या अनुरोधानें मी वागेन आणि तूंही सूर्याला अनुसरून वागणाऱ्या सुवर्चलेप्रमाणें मला अनुसरून वाग ३०. हे जनककन्ये, माझें वनांत जाणें होणार नाहीं असें होणेंच नाहीं. कारण, सत्यानें युक्त असलेलें तें पित्याचें वचन मला वनांत नेत आहे ३१. हे सुंदरि, मातापितरांच्या अधीन असणें हा धर्म आहे. तस्मात्, त्यांच्या आज्ञेचें उल्लंघन करून प्राणधारण करण्याची माझी इच्छा नाहीं ३२. माता, पिता व गुरु हें आपलें हातचें दैवत टाकून देऊन आपल्या स्वाधीन जें नाहीं अशा दुसऱ्या दैवताची नाना प्रकारांनीं आराधना करावी तरी कशी ? ३३. ज्यांचें आराधन केलें असतां धर्म, अर्थ व काम ह्या त्रिवर्गाची प्राप्ति होऊन त्रैलोक्याचें आराधन केल्याचें श्रेय येतें त्या मातापितरांच्या सेवेसारिखी दुसरी कोणतीही पवित्र गोष्ट ह्या पृथ्वीवर नाहीं. ह्मणून, हे सुलोचने, मी हें करीत आहें ३४.

---

[1] हत्तीच्या शुंडेसारिख्या जिच्या मांड्या आहेत अशी.

राध्यते ३४ न सत्यं दानमानौ वा यज्ञो वाप्याप्तदक्षिणः। तथा बलकराः सीते यथा सेवा पितुर्मता ३५ स्वर्गो धनं वा धान्यं वा विद्याः पुत्राः सुखानि च। गुरुवृत्त्यनुरोधेन न किंचिदपि दुर्लभम् ३६ देवगन्धर्वगोलोकान्ब्रह्मलोकांस्तथा परान्। प्राप्नुवन्ति महात्मानो मातापितृपरायणाः ३७ स मा पिता यथा शास्ति सत्यधर्मपथे स्थितः। तथा वर्तितुमिच्छामि स हि धर्मः सनातनः ३८ मम सन्ना मतिः सीते नेतुं त्वां दण्डकावनम्। वसिष्यामीति सा त्वं मामनुयातुं सुनिश्चिता ३९ सा हि दिष्टानवद्याङ्गि वनाय मदिरेक्षणे। अनुगच्छस्व मां भीरु सहधर्मचरी भव ४० सर्वथा सदृशं सीते मम स्वस्य कुलस्य च। व्यवसायमनुक्रान्ता कान्ते त्वमतिशोभनम् ४१ आरभस्व शुभश्रोणि वनवासक्षमाः क्रियाः। नेदानीं त्वदृते सीते स्वर्गोपि मम रोचते ४२ ब्राह्मणेभ्यश्च रत्नानि भिक्षुकेभ्यश्च भोजनम्। देहि चाशंसमानेभ्यः संत्वरस्व च मा चिरम् ४३ भूषणानि महार्हाणि वरवस्त्राणि यानि च। रमणीयाश्च ये केचित्क्रीडार्थाश्चाप्युपस्कराः ४४

---

हे सीते, ज्याप्रमाणें पितृसेवा परलोकहितावह होते त्याप्रमाणें सत्य, दान, मान अथवा विपुल दक्षिणेनें युक्त असा यज्ञही होत नाहीं ३५. वडिलांच्या मर्जीप्रमाणें वागणाऱ्याला स्वर्ग, धन, धान्य, विद्या, पुत्र आणि सुख ह्यांपैकीं कांहींच दुर्लभ नाहीं ३६. मातापितरांच्या सेवेमध्यें तत्पर रहाणाऱ्या महात्म्यांना देवलोक, गंधर्वलोक, गोलोक, ब्रह्मलोक व इतरही (शुभ) लोक प्राप्त होतात ३७. सत्य धर्माच्या मार्गानें वागणारा माझा पिता ज्याप्रमाणें आज्ञा करीत आहे त्याप्रमाणें वागण्याची माझी इच्छा आहे. कारण, तोच सनातन धर्म आहे ३८. हे सीते, तुला दंडकारण्यांत नेण्यासंबंधानें माझें जें विरुद्ध मत होतें तें नाहींसें झालें आहे. कारण, वनांत वास्तव्य करणारच अशा दृढ निश्चयानें माझ्या मागोमाग येण्याचें तूं निश्चितच केलें आहेस ३९. तस्मात्, हे सुंदरि, हे आरक्तनयने, मी तुला वनांत येण्याची अनुज्ञा देतों. हे भित्र्ये, तूं माझ्या बरोबर चल आणि सहधर्मचारिणी हो ४०. हे सीते, तूं जो हा अत्युत्कृष्ट निश्चय केला आहेस तो तुझ्या स्वतःच्या व माझ्या कुलाला अनुरूप असाच आहे ४१. हे सुंदरि, आतां वनवासाला योग्य अशीं जीं कांहीं कृत्यें तुला करावयाचीं असतील तीं कर. हे सीते, तुझ्यावांचून आतां मला स्वर्गही रुचणार नाहीं ४२. ब्राह्मणांना रत्नें दान कर, बुभुक्षित भिक्षुकांना भोजन घाल आणि निघण्याची त्वरा कर; विलंब लावूं नको ४३. मोठमोठीं मौल्यवान् भूषणें, मोठमोठीं वस्त्रें, मनोहर अशीं क्रीडासाधनें, शय्या, वाहनें,

शयनीयानि यानानि मम चान्यानि यानि च । देहि स्वभृत्यवर्गस्य ब्राह्मणानामनन्तरम् ४५ अनुकूलं तु सा भर्तुर्ज्ञात्वा गमनमात्मनः । क्षिप्रं प्रमुदिता देवी दातुमेव प्रचक्रम ४६ [ १३०३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्रिंशः सर्गः ॥ ३० ॥

एवं श्रुत्वा स संवादं लक्ष्मणः पूर्वमागतः । बाष्पपर्याकुलमुखः शोकं सोढुमशक्नुवन् १ स भ्रातुश्चरणौ गाढं निपीड्य रघुनन्दनः । सीतामुवाचातियशां राघवं च महाव्रतम् २ यदि गन्तुं कृता बुद्धिर्वनं मृगगजायुतम् । अहं त्वानुगमिष्यामि वनमग्रे धनुर्धरः ३ मया समेतोरण्यानि रम्याणि विचरिष्यसि । पक्षिभिर्भृङ्गयूथैश्च संघुष्टानि समन्ततः ४ न देवलोकाक्रमणं नामरत्वमहं वृणे । ऐश्वर्यं चापि लोकानां कामये न त्वया विना ५ एवं ब्रुवाणः सौमित्रिर्वनवासाय निश्चितः । रामेण बहुभिः सान्त्वैर्निषिद्धः पुनरब्रवीत् ६ अनुज्ञातस्तु भवता पूर्वमेव यदस्म्यहम् । किमिदानीं पुनरपि क्रियते मे निवारणम् ७ यदर्थं प्रतिषेधो मे क्रियते गन्तु-

---

आणि इतरही जें जें ह्मणून कांहीं असेल तें तें ब्राह्मणांना देऊन शिलक राहिल्यावर आपल्या सेवकवर्गाला देऊन टाक " ४४, ४५. ( असें रामानें सांगितल्यानंतर ) आपलें वनांत जाणें भर्त्याला इष्ट आहे असें समजून आल्यामुळें सीतादेवी तत्क्षणीं आनंदित झाली आणि तिनें ( रत्नें वगैरे ) देण्यालाच आरंभ केला ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३० ॥

ह्याप्रमाणें संवाद ऐकून त्यापूर्वीं आलेल्या लक्ष्मणाचें मुख अश्रूंनीं भरून गेलें आणि शोक सहन करणें त्याला अशक्य झालें १. तेव्हां तो रघुनंदन लक्ष्मण भ्रात्याचे चरण घट्ट धरून अतियशस्वी सीतेसहवर्तमान महाव्रतस्थ रामाला ह्मणाला २ " मृग व गज ह्यांनीं युक्त असलेल्या वनांत जाण्याचा जर आपला निश्चय झाला असेल तर धनुष्य धारण करून मी आपल्या बरोबरच वनांत जाण्याला पुढें होणार ३. पक्षी आणि भृंगसमुदाय ह्यांच्या योगानें आसमंतात नादित झालेल्या रम्य अरण्यामध्यें माझ्यासहवर्तमान आपण संचार करा ४. आपणांवांचून देवलोकाला जाण्याची, अमरपणाची अथवा त्रैलोक्याच्या आधिपत्याचीही मला इच्छा नाहीं " ५. ह्याप्रमाणें बोलणाऱ्या लक्ष्मणाचा वनवासाविषयीं निश्चय झाला. तेव्हां रामानें नानाप्रकारच्या सांत्वनांनीं त्याचा निषेध केला असूनही तो ह्मणाला ६ " आपण जर मला पूर्वींच वनांत येण्याची अनुज्ञा दिली आहे तर पुनरपि आतां आपण माझें निवारण कां करितां ? ७. मी जाण्याची

मिच्छतः। एतदिच्छामि विज्ञातुं संशयो हि ममानघ ८ ततोऽब्रवीन्महातेजा रामो लक्ष्मणमग्रतः। स्थितं प्राग्गामिनं धीरं याचमानं कृताञ्जलिम् ९ स्निग्धो धर्मरतो धीरः सततं सत्पथे स्थितः। प्रियः प्राणसमो वश्यो विधेयश्च सखा च मे १० मयाद्य सह सौमित्रे त्वयि गच्छति तद्वनम्। को भजिष्यति कौसल्यां सुमित्रां वा यशस्विनीम् ११ अभिवर्षति कामैर्यः पर्जन्यः पृथिवीमिव। स कामपाशपर्यस्तो महातेजा महीपतिः १२ सा हि राज्यमिदं प्राप्य नृपस्याश्वपतेः सुता। दुःखितानां सपत्नीनां न करिष्यति शोभनम् १३ न स्मरिष्यति कौसल्यां सुमित्रां च सुदुःखिताम्। भरतो राज्यमासाद्य कैकेय्यां पर्यवस्थितः १४ तामार्यां स्वयमेवेह राजानुग्रहणेन वा। सौमित्रे भर कौसल्यामुक्तमर्थममुं चर १५ एवं मयि च ते भक्तिर्भविष्यति सुदर्शिता। धर्मज्ञ गुरुपूजायां धर्मश्चाप्यतुलो महान् १६ एवं कुरुष्व सौमित्रे मत्कृते रघुनन्दन। अस्माभिर्विप्रहीणाया मातुर्नो न भवेत्सुखम् १७ एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणः श्लक्ष्णया गिरा। प्रत्युवाच

---

इच्छा करीत असतांना आपण कशाकरितां मला अडथळा करीत आहां हें जाणण्याची माझी इच्छा आहे. कारण, हे निष्पापा, मला ह्याबद्दल संशय आहे" ८. ह्यानंतर आपल्यापूर्वीं जाण्यास तयार, समंजस आणि हात जोडून प्रार्थना करीत समोर उभ्या असलेल्या लक्ष्मणाला महातेजस्वी राम ह्मणाला ९ "तूं माझे ठिकाणीं प्रेम करणारा, धर्माविषयीं रत, विचारी, नेहमीं सन्मार्गानें वागणारा, प्राणांप्रमाणें मला प्रिय, माझ्या अधीन व माझा आज्ञाधारक असा माझा सखा आहेस १०; परंतु, हे लक्ष्मणा, तूं आज माझ्या बरोबर त्या वनांत निघालास ह्मणजे कौसल्येची अथवा यशस्विनी सुमित्रेची शुश्रूषा कोण करणार ? ११. पृथ्वीवर जलवर्षाव करणाऱ्या पर्जन्याप्रमाणें मनोरथसिद्धींची जो वृष्टि करीत असतो तो महातेजस्वी भूपति आज कामपाशांत जखडून गेलेला आहे १२. तेव्हां अश्वपतिराजाची कन्या ती कैकेयी हें राज्य प्राप्त झाल्यावर दुःखानें गांजलेल्या आपल्या सवतींना चांगलें करणार नाहीं १३. कैकेयीच्याच धोरणानें वागणाऱ्या भरताला, राज्य प्राप्त झाल्यावर, कौसल्येचें अथवा अत्यंत दुःखित झालेल्या सुमित्रेचें स्मरण देखील होणार नाहीं १४. ह्यास्तव, हे लक्ष्मणा, येथें राहून तूं स्वतः अथवा राजाच्या अनुग्रहानें त्या साध्वीचें आणि कौसल्येचें पोषण करून मीं सांगितल्याप्रमाणें वाग १५. असें केलें असतां माझे ठिकाणीं असलेलें तुझें प्रेम तूं चांगल्या प्रकारें दर्शविलेस असें होईल आणि, हे धर्मवेत्त्या, वडिलांना मान देणें हा एक मोठा अनुपम धर्म आहे १६. तस्मात्, हे रघुनंदना लक्ष्मणा, माझ्याकरितां तूं असें कर. आपण टाकून

तदा रामं वाक्यज्ञो वाक्यकोविदम् १८ तवैव तेजसा वीर भरतः पूजयिष्यति । कौसल्यां च सुमित्रां च प्रयतो नास्ति संशयः १९ यदि दुःस्थो न रक्षेत भरतो राज्यमुत्तमम् । प्राप्य दुर्मनसा वीर गर्वेण च विशेषतः २० तमहं दुर्मतिं क्रूरं वधिष्यामि न संशयः । तत्पक्षानपि तान्सर्वांस्त्रैलोक्यमपि किं तु सा २१ कौसल्या बिभृयादार्या सहस्रं मद्विधानपि । यस्याः सहस्रं ग्रामाणां संप्राप्तमुपजीविनाम् २२ तदात्मभरणे चैव मम मातुस्तथैव च । पर्याप्तामद्विधानां च भरणाय मनस्विनी २३ कुरुष्व मामनुचरं वैधर्म्यं नेह विद्यते । कृतार्थोऽहं भविष्यामि तव चार्थः प्रकल्प्यते २४ धनुरादाय सगुणं खनित्रपिटकाधरः । अग्रतस्ते गमिष्यामि पन्थानं तव दर्शयन् २५ आहरिष्यामि ते नित्यं मूलानि च फलानि च । वन्यानि च तथान्यानि स्वाहार्हाणि तपस्विनाम् २६ भवांस्तु सह वैदेह्या गिरिसानुषु रंस्यसे । अहं सर्वं करि-

---

गेलों ह्मणजे आपल्या मातेला सुख होणार नाहीं" १७. ह्याप्रमाणें मधुर वाणीनें रामानें सांगितलें असतांही भाषण कसें करावें हें जाणणारा लक्ष्मण दुसऱ्याच्या भाषणांतील मर्म जाणणाऱ्या रामाला ह्मणाला १८ "हे वीरा, तुझ्याच तेजाच्या योगानें भरत आत्मसंयमन करून कौसल्येला व सुमित्रेला मान देईल ह्यांत संशय नाहीं १९. हे वीरा, उन्मार्गाचें अवलंबन करून दुष्टबुद्धीनें आणि विशेषतः गर्वानें ह्या प्राप्त झालेल्या राज्याचें जर भरत उत्कृष्ट रीतीनें परिपालन न करील २० तर त्या क्रूर व दुष्टमति भरताचा मी निःसंशय वध करीन. इतकेंच नव्हे परंतु, त्याच्या पक्षाचे जे कांहीं असतील त्या सर्वांचा वध करून मी त्रैलोक्याचाही वध करीन. शिवाय, ती २१ साध्वी कौसल्या माझ्यासारिखे हजारों पोसण्यास समर्थ आहे. कारण, तिच्यावर अवलंबून असलेल्या लोकांकरितां हजार गांव तिला मिळालेले आहेत २२. तस्मात्, ती बिचारी कौसल्या आपल्या स्वतःचें, माझ्या मातेचें आणि माझ्यासारिख्या हजारोंचें पोषण करण्यास समर्थ आहे २३. आपण मला अनुयायी करा. ह्यांत कांहीं एक धर्मविरुद्ध होत नाहीं. तसें झाल्यानें मी कृतकृत्य होईन आणि आपलेंही कार्य होईल २४. ह्यास्तव, प्रत्यंचेसहवर्तमान धनुष्य धारण करून आणि कुदळ व एक परडी बरोबर घेऊन आपणांला मार्ग दाखविण्याकरितां मी आपल्या पुढेंच जाणार २५. मी नेहमीं वनांतील मुळें, फळें व तपस्व्यांच्या होमकर्माला योग्य असे इतरही पदार्थ तुह्मांला नित्य आणून देत जाईन २६. तुह्मी खुशाल पर्वतावर वैदेही सीतेसहवर्तमान क्रीडा करीत जा. तुह्मी जागे असतांना अथवा शयन करीत असतांना

ष्यामि जाग्रतः स्वपतश्च ते २७ रामस्त्वनेन वाक्येन सुप्रीतः प्रत्युवाच तम् । व्रजापृच्छस्व सौमित्रे सर्वमेव सुहृज्जनम् २८ ये च राज्ञो ददौ दिव्ये महात्मा वरुणः स्वयम् । जनकस्य महायज्ञे धनुषी रौद्रदर्शने २९ अभेद्ये कवचे दिव्ये तूणी चाक्षय्यसायकौ । आदित्यविमलाभौ द्वौ खड्गौ हेमपरिष्कृतौ ३० सत्कृत्य निहितं सर्वमेतदाचार्यसद्मनि । सर्वमायुधमादाय क्षिप्रमाव्रज लक्ष्मण ३१ स सुहृज्जनमामन्त्र्य वनवासाय निश्चितः। इक्ष्वाकुगुरुमागम्य जग्राहायुधमुत्तमम् ३२ तद्दिव्यं राजशार्दूलः सत्कृतं माल्यभूषितम् । रामाय दर्शयामास सौमित्रिः सर्वमायुधम् ३३ तमुवाचात्मवान्रामः प्रीत्या लक्ष्मणमागतम् । काले त्वमागतः सौम्य काङ्क्षिते मम लक्ष्मण ३४ अहं प्रदातुमिच्छामि यदिदं मामकं धनम् । ब्राह्मणेभ्यस्तपस्विभ्यस्त्वया सह परंतप ३५ वसन्तीह दृढं भक्त्या गुरुषु द्विजसत्तमाः । तेषामपि च मे भूयः सर्वेषां चोपजीविनाम् ३६ वसिष्ठपुत्रं तु सुयज्ञमार्य त्वमानयाशु प्रवरं द्विजानाम् । अपि प्रयास्यामि वने समस्ता-

---

मी सर्व कांहीं करीन " २७. ह्या लक्ष्मणाच्या सांगण्यानें राम अतिशयच प्रसन्न झाला आणि त्याला ह्मणाला "हे लक्ष्मणा, तर मग चल आणि सर्व सुहृदांचा निरोप घे २८. जनकाच्या महायज्ञामध्यें दिसण्यांतही भयंकर अशीं जीं दोन दिव्य धनुष्यें स्वतः जनकराजाला महात्म्या वरुणानें दिलीं होतीं तीं २९, दिव्य अभेद्य कवचें, अक्षय बाणांनीं भरलेले भाते व सुवर्णानीं मढविलेले आणि सूर्याप्रमाणें प्रभा असलेले असे दोन निर्मल खड्ग ३० हे सर्व सत्कारपूर्वक आचार्यांच्या घरीं ठेव आणि, हे लक्ष्मणा, सर्व आयुधें घेऊन तूं सत्वर चल " ३१. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां वनवासाला जाण्याचा निश्चय केलेल्या लक्ष्मणानें आपल्या मित्रमंडळींचा निरोप घेऊन व इक्ष्वाकुकुलांतील गुरूकडे जाऊन त्यानें उत्कृष्ट धनुष्य हातांत घेतलें ३२. तदनंतर नृपश्रेष्ठ लक्ष्मणानें पुष्पांनीं भूषित आणि पूजा केलेलें असें तें सर्व आयुधांच्या ठिकाणीं असलेलें दिव्य धनुष्य रामाला दाखविलें ३३. तेव्हां जवळ आलेल्या लक्ष्मणाला जितेंद्रिय राम प्रीतीनें ह्मणाला "हे सौम्या, हे लक्ष्मणा, मीं मनांत योजिलेल्या वेळींच तूं आला आहेस ३४. हे शत्रुतापना, हें जें ह्मणून कांहीं माझें धन आहे तें तपस्वी ब्राह्मणांना मी तुझ्यासहवर्तमान देऊन टाकण्याची इच्छा करीत आहें ३५. आपल्या गुरूशीं दृढ प्रेमानें वागणारे आणि आपल्यावर उपजीविका करणारे ह्या सर्वांना मला आणखी दान देण्याची इच्छा झाली आहे ३६. ब्राह्मणांमध्यें श्रेष्ठ अशा वसिष्ठपुत्र आर्य सुयज्ञाला तूं सत्वर घेऊन ये ह्मणजे त्या सर्व ब्राह्मणांचें आणि अवशिष्ट राहिलेल्या इतरही

नभ्यर्च्य शिष्टानमरान्द्विजातीन् ३७ [ १३४० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्ड एकत्रिंशः सर्गः ॥ ३१ ॥

ततः शासनमाज्ञाय भ्रातुः प्रियकरं हितम्। गत्वा स प्रविवेशाशु सुयज्ञस्य निवेशनम् १ तं विप्रमग्न्यगारस्थं वन्दित्वा लक्ष्मणोब्रवीत्। सखे-भ्यागच्छ पश्य त्वं वेश्म दुष्करकारिणः २ ततः संध्यामुपास्थाय गत्वा सौमित्रिणा सह। ऋद्धं स प्राविशल्लक्ष्म्या रम्यं रामनिवेशनम् ३ तमागतं वेदविदं प्राञ्जलिः सीतया सह। सुयज्ञमभिचक्राम राघवोग्निमिवार्चितम् ४ जातरूपमयैर्मुख्यैरङ्गदैः कुण्डलैः शुभैः। सहेमसूत्रैर्मणिभिः केयूरैर्वलयैरपि ५ अन्यैश्च रत्नैर्बहुभिः काकुत्स्थः प्रत्यपूजयत्। सुयज्ञं स तदोवाच रामः सीताप्रचोदितः ६ हारं च हेमसूत्रं च भार्यायै सौम्य हारय। रशनां चाथ सा सीता दातुमिच्छति न सखी ७ अङ्गदानि च चित्राणि केयूराणि शुभानि च। प्रयच्छति सखी तुभ्यं भार्यायै गच्छती वनम् ८ पर्यङ्कमग्र्यास्तरणं नानारत्नविभूषितम्। तमपीच्छति वैदेही

---

द्विजांचें पूजन करून मी वनामध्यें जाईन ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकतिसावा सर्ग समाप्त झाला॥ ३१॥

तदनंतर प्रिय आणि हितावह अशी आपल्या भ्रात्याची ती आज्ञा मान्य करून लक्ष्मण सत्वर तेथून निघून सुयज्ञाच्या घरीं गेला १ आणि होमशाळेंत बसलेल्या त्या विप्राला वंदन करून लक्ष्मण ह्मणाला " हे मित्रा, पहा, अघटित कृत्य करणाऱ्या रामाच्या घरीं एकदां चल " २. तदनंतर मध्यान्ह संध्या करून व लक्ष्मणाला बरोबर घेऊन तो रम्य आणि वैभवसंपन्न अशा रामाच्या गृहामध्यें गेला ३. तेव्हां तो वेदवेत्ता सुयज्ञ आला असतां होमकालीं पूजन केलेला अग्निच आला आहे कीं काय असें समजून राम सीतेसहवर्तमान हात जोडून त्याला सामोरा गेला४. सुवर्णमय अशीं श्रेष्ठ बाहुभूषणें, शुभ कुंडलें, सोन्यांत ओंवलेल्या रत्नमाला, कडीं, आंगठ्या ५ आणि इतरही अनेक रत्नें ह्यांच्या योगानें सुयज्ञाचा सत्कार केल्यावर ककुत्स्थकुलोत्पन्न राम ( त्याच्या भार्येला अलंकार वगैरे देण्याविषयीं ) सीतेनें सांगितल्यानंतर सुयज्ञाला ह्मणाला ६ " हे सौम्या, हार आणि ही सोन्याची गळसरी तूं आपल्या भार्येकडे पाठीव आणि तुझ्या भार्येची ती सखी सीता कमरपट्टाही तिला देण्याच्या विचारांत आहे ७. अद्भुत बाहुभूषणें आणि उत्कृष्ट कडीं तुझ्या भार्येला तिची सखी वनांत जातांना देऊन टाकण्याच्या विचारांत आहे ८. नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित आणि उत्कृष्ट आस्तरणांनीं युक्त असा मंचकही दानपूर्वक तुझ्या घरीं वैदेही

प्रतिष्ठापयितुं त्वयि ९ नागः शत्रुंजयो नाम मातुलो यं ददौ मम। तं ते निष्कसहस्रेण ददामि द्विजपुंगव १० इत्युक्तः स तु रामेण सुयज्ञः प्रतिगृह्य तत्। रामलक्ष्मणसीतानां प्रयुयोजाशिषः शिवाः ११ अथ भ्रातरमव्यग्रं प्रियं रामः प्रियंवदम्। सौमित्रिं तमुवाचेदं ब्रह्मेव त्रिदशेश्वरम् १२ अगस्त्यं कौशिकं चैव तावुभौ ब्राह्मणोत्तमौ। अर्चयाहूय सौमित्रे रत्नैः सस्यमिवाम्बुभिः १३ तर्पयस्व महाबाहो गोसहस्रेण राघव। सुवर्णरजतैश्चैव मणिभिश्च महाधनैः १४ कौसल्यां च य आशीर्भिर्भक्तः पर्युपतिष्ठति। आचार्यस्तैत्तिरीयाणामभिरूपश्च वेदवित् १५ तस्य यानं च दासीश्च सौमित्रे संप्रदापय। कौशेयानि च वस्त्राणि यावत्तुष्यति स द्विजः १६ सूतश्चित्ररथश्चार्यः सचिवः सुचिरोषितः १७ तोषयैनं महार्हैश्च रत्नैर्वस्त्रैर्धनैस्तथा। पशुकाभिश्च सर्वाभिर्गवां दशशतेन च १८ ये च मे कठकालापा बहवो दण्डमाणवाः। नित्यस्वाध्यायशीलत्वान्नान्यत्कुर्वन्ति किंचन १९ अलसाः स्वादुकामाश्च महतां चापि संमताः। तेषा-

पोंचविणार आहे ९. शत्रुंजय ह्मणून जो गज मला मातुलानें दिला आहे तो मी सहस्र निष्कांसहवर्तमान, हे द्विजश्रेष्ठ, तुला देतों" १०. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यावर सुयज्ञानें त्या दानाचा स्वीकार करून राम, लक्ष्मण आणि सीता ह्यांना कल्याणकारक आशीर्वाद दिले ११. तेव्हां देवराज इंद्राला ब्रह्मदेवच सांगत आहे कीं काय असा तो प्रिय राम आपल्या एकनिष्ठ व प्रिय भाषण करणाऱ्या भ्रात्या लक्ष्मणाला ह्मणाला १२ "हे लक्ष्मणा, अगस्त्य आणि विश्वामित्र ह्या उभयतां द्विजश्रेष्ठांना बोलावून आणून तूं त्यांचें पूजन कर आणि नंतर पर्जन्य ज्याप्रमाणें उदकांची पिकावर वृष्टि करितो त्याप्रमाणें रत्नांची वृष्टि करून तूं त्यांना तृप्त कर १३. हे महापराक्रमी रघुवंशजा लक्ष्मणा, सहस्र गाई, सुवर्ण, रजत आणि मोठमोठीं रत्नें ह्यांच्या योगानें तूं त्यांचें संतर्पण कर १४. तैत्तिरीय शाखा ह्मणणाऱ्यांचा आचार्य, सद्गुणी आणि वेदवेत्ता असा जो अनुरक्त ब्राह्मण कौसल्येची आशीर्वाद देऊन सेवा करीत असतो १५ त्या ब्राह्मणाला तो संतुष्ट होईपर्यंत वाहनें, दासी आणि रेशमीं वस्त्रें तूं देवीव १६. हा चित्ररथनामक सारथि फार दिवस आपल्या घरीं राहिला असून सभ्य व सल्ला मसलत देणारा आहे १७. तेव्हां मोठमोठीं मौल्यवान् रत्नें, वस्त्रें, संपत्ति, सर्व प्रकारचे पशु आणि सहस्र गाई देऊन तूं त्याला संतुष्ट कर १८. कठकालापशाखांचें अध्ययन करणारे असे जे पुष्कळ दंड धारण करणारे माझे मित्र नेहमीं वेदाध्ययन करण्याविषयीं तत्पर असल्यामुळें दुसरें कांहीं एक करीत नाहींत १९, मिष्टान्नाची इच्छा करणारे असूनही भिक्षेला वगैरे

मशीतियानानि रत्नपूर्णानि दापय २० शालिवाहसहस्रं च द्वे शते भद्रकांस्तथा । व्यञ्जनार्थं च सौमित्रे गोसहस्रमुपाकुरु २१ मेखलीनां महासङ्घः कौसल्यां समुपस्थितः । तेषां सहस्रं सौमित्रे प्रत्येकं संप्रदापय २२ अम्बा यथा नो नन्देच्च कौसल्या मम दक्षिणाम् । तथा द्विजातींस्तान्सर्वांल्लक्ष्मणार्चय सर्वश २३ ततः पुरुषशार्दूलस्तद्धनं लक्ष्मणः स्वयम् । यथोक्तं ब्राह्मणेन्द्राणामददाद्धनदो यथा २४ अथाब्रवीद्बाष्पगलांस्तिष्ठतश्चोपजीविनः । स प्रदाय बहु द्रव्यमेकैकस्योपजीवनम् २५ लक्ष्मणस्य च यद्वेश्म गृहं च यदिदं मम । अशून्यं कार्यमेकैकं यावदागमनं मम २६ इत्युक्त्वा दुःखितं सर्वं जनं तमुपजीविनम् । उवाचेदं धनाध्यक्षं धनमानीयतां मम २७ ततोस्य धनमाजह्रुः सर्व एवोपजीविनः । स राशिः सुमहांस्तत्र दर्शनीयो ह्यदृश्यत २८ ततः स पुरुषव्याघ्रस्तद्धनं सह लक्ष्मणः । द्विजेभ्यो बालवृद्धेभ्यः कृपणेभ्यो ह्यदापयत् २९ तत्रासीत्पिङ्गलो गार्ग्यस्त्रिजटो नाम वै द्विजः । क्षतवृत्तिर्वने नित्यं फालकुद्दाल-

---

जाण्याचा ज्यांना कंटाळा आहे आणि मोठ्या लोकांनाही जे मान्य आहेत त्यांना ऐंशी उंट रत्नें, हजार बैल भात, उसळीला वगैरे उपयोगी पडणारें दोनशें बैल धान्य आणि सहस्र गाई, हे लक्ष्मणा, तूं दे २०, २१. ब्रह्मचारी लोकांचा एक मोठा समुदायच ( विवाहाकरितां ) कौसल्येकडे येत असतो ; त्यांपैकीं प्रत्येकाला, हे लक्ष्मणा, हजार हजार मोहरा तूं देवीव २२. हे लक्ष्मणा, आपल्या कौसल्या मातेला आनंद होईल अशा रीतीनें सर्वप्रकारें तूं त्या सर्व ब्राह्मणांचें पूजन कर " २३. तदनंतर पुरुषश्रेष्ठ लक्ष्मणानें स्वतः रामानें सांगितलेलें तें धन कुबेराप्रमाणें श्रेष्ठ ब्राह्मणांना अर्पण केलें २४. नंतर ,अश्रूंनीं ज्यांचा कंठ दाटून आलेला आहे व जे तेथें उभे राहिले आहेत अशा आपल्या आश्रितांना, उपजीविकेला पुरण्यापुरतें विपुल द्रव्य प्रत्येकाला देऊन, तो राम ह्मणाला २५ " मी येईतोंपर्यंत लक्ष्मणाचें घर व माझें हें घर तुह्मी एकेकजण राखीत जा " २६. असें त्या ( तेथें जुळलेल्या ) सर्व दुःखित व आश्रित लोकांना सांगून " माझ्याकडे धन घेऊन ये "ह्मणून धनाध्यक्षाला रामानें सांगितलें असतां २७ सर्वही सेवक त्याच्याकडे धन घेऊन आले. तेव्हां बघण्यासारिखा फारच मोठा द्रव्याचा ढीग त्या ठिकाणीं दृष्टीं पडूं लागला २८. तदनंतर लक्ष्मणासहवर्तमान त्या पुरुषश्रेष्ठ रामानें बालापासून तों वृद्धापर्यंत दीन ब्राह्मणांना तें द्रव्य देऊन टाकिलें २९. त्या ठिकाणीं वर्णानें पिंगट असा एक गार्ग्यगोत्री त्रिजट ह्मणून ब्राह्मण होता त्याच्या उपजीविकेला कांहीं साधन नसल्यामुळें खोरें,

लाङ्गली ३० तं वृद्धं तरुणी भार्या बालानादाय दारकान् । अब्रवीद्ब्राह्मणं वाक्यं स्त्रीणां भर्ता हि देवता ३१ अपास्य फालं कुद्दालं कुरुष्व वचनं मम । रामं दर्शय धर्मज्ञं यदि किंचिदवाप्स्यसे ३२ स भार्याया वचः श्रुत्वा शाटीमाच्छाद्य दुश्छदाम् । स प्रातिष्ठत पन्थानं यत्र रामनिवेशनम् ३३ भृग्वङ्गिरःसमं दीप्त्या त्रिजटं जनसंसदि । आपञ्चमायाः कक्ष्याया नैतं कश्चिदवारयत् ३४ स राममासाद्य तदा त्रिजटो वाक्यमब्रवीत् । निर्धनो बहुपुत्रोऽस्मि राजपुत्र महाबल ३५ क्षतवृत्तिर्वने नित्यं प्रत्यवेक्षस्व मामिति । तमुवाच ततो रामः परिहाससमन्वितम् ३६ गवां सहस्रमप्येकं न च विश्राणितं मया । परिक्षिपसि दण्डेन यावत्तावदवाप्स्यसे ३७ स शाटीं परितः कट्यां संभ्रान्तः परिवेष्ट्य ताम् । आविध्य दण्डं चिक्षेप सर्वप्राणेन वेगतः ३८ स तीर्त्वा सरयूपारं दण्डस्तस्य कराच्च्युतः । गोव्रजे बहुसाहस्रे पपातोक्षाणसंनिधौ ३९ तं परिष्वज्य धर्मात्मा आवाप्य

---

कुदळ व नांगर घेऊन तो नेहमीं वनामध्यें फिरत असे ३०. त्या वृद्ध ब्राह्मणाकडे आपल्या लहान लहान मुलांना आणून त्याची तरुण भार्या त्याला ह्मणाली " भर्ता हें स्त्रियांचें दैवत आहे ३१ ( असें असल्यामुळें मी आपणांला सांगणें जरी योग्य नव्हे तरी ह्या वेळीं ) आपण माझें ऐकाच. हें खोरें व कुदळ टाकून देऊन आपण जर धर्मज्ञ रामाची भेट घ्याल तर आपणांला कांहीं तरी मिळेल " ३२. हें भार्येचें भाषण श्रवण केल्यावर ( फारच जीर्ण झाला असल्यामुळें ) अंगावर घेण्यासही अयोग्य असा एक पंचा त्यानें अंगावर घेतला आणि ज्या मार्गाला रामाचें घर होतें तिकडे तो वृद्ध ब्राह्मण निघाला ३३. भृगु आणि अंगिरा ह्यांप्रमाणें तो त्रिजट ब्राह्मण देदीप्यमान असल्यामुळें रामाच्या वाड्यांतील पांचव्या चौकांत येईतोंपर्यंत त्याला कोणीही आडकाठी केली नाहीं ३४. तेव्हां रामाकडे जाऊन तो त्रिजट ह्मणाला " हे महाबलाढ्य राजपुत्रा, मी निर्धन असून माझ्या पदरीं बरींच मुलेंबाळें आहेत ३५ व माझ्या उपजीविकेलाकांहीं साधन नसून मी नेहमीं वनामध्यें हिंडत असतों. करितां, माझ्याकडे कृपादृष्टि कर ". ह्यानंतर राम थट्टेनें त्याला ह्मणाला ३६ " गाईंपैकीं मीं अजून एक हजार देखील कोणाला दिल्या नाहींत. ह्यास्तव, आपण हा दंड जितका लांब फेंकाल तितक्या प्रदेशभर आपणांला गाई मिळतील " ३७. असें रामानें सांगितल्यावर त्या त्रिजटानें लगबगीनें तो पंचा कमरेभोंवतालीं गुंडाळिला आणि सर्व सामर्थ्यानें तो दंड गरगर फिरवून वेगावेगानें फेंकून दिला ३८. त्या त्रिजटाच्या हातांतून सुटलेला तो दंड सरयू नदी ओलांडून हजारों गाई ज्यामध्यें

सरयूतटात् । आनयामास ता गावस्त्रिजटस्याश्रमं प्रति ४० उवाच च तदा रामस्तं गार्ग्यमभिसान्त्वयन् । मन्युर्न खलु कर्तव्यः परिहासो ह्ययं मम ४१ इदं हि तेजस्तव यद्दुरत्ययं तदेव जिज्ञासितुमिच्छता मया । इमं भवानर्थमभिप्रचोदितो वृणीष्व किंचेदपरं व्यवस्यसि ४२ ब्रवीमि सत्येन न ते स्म यन्त्रणा धनं हि यद्यन्मम विप्रकारणात् । भवत्सु सम्यक्प्रतिपादनेन मयार्जितं चैव यशस्करं भवेत् ४३ ततः सभार्यस्त्रिजटो महामुनिर्गवामनीकं प्रतिगृह्य मोदितः । यशोबलप्रीतिसुखोपबृंहिणीस्तथाशिषः प्रत्यवदन्महात्मनः ४४ स चापि रामः प्रतिपूर्णपौरुषो महाधनं धर्मबलैरुपार्जितम् । नियोजयामास सुहृज्जनेचिराद्यथार्हसंमानवचःप्रचोदितः ४५ द्विजः सुहृद्भृत्यजनोथ वा तदा दरिद्रभिक्षाचरणश्च यो भवेत् । न तत्र कश्चिन्न बभूव तर्पितो यथार्हसंमाननदानसंभ्रमैः ४६ [ १३८६ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्वात्रिंशः सर्गः ॥ ३२ ॥

---

आहेत अशा गोठ्यांत बैलांचे समीप जाऊन पडला ३९. तदनंतर सरयूच्या ह्या तीरापासून दंडपतनापर्यंत असलेल्या प्रदेशामध्यें ज्या गाई मावल्या त्या गाई त्रिजटाच्या आश्रमाला पोंचवून धर्मनिष्ठ रामानें त्याची कडकडून भेट घेतली ४० आणि गार्ग्यगोत्री त्रिजटाचें सांत्वन करीत करीत राम त्याला ह्मणाला " आपण क्रुद्ध होऊं नका; खरोखर ही मीं थट्टा केली ४१. आपलें जें हें अनुल्लंघनीय तेज तें जाणण्याच्या इच्छेनें मीं आपणांला ही गोष्ट करावयास सांगितली. आतां गाईशिवाय दुसरेंही कांहीं पाहिजे असल्यास आपण मागावें ४२. मी हें आपणांला खरें खरें सांगत आहें; आपण संकोच धरूं नका. माझें जें जें ह्मणून धन आहे तें ब्राह्मणांकरितां आहे. कारण, आपल्याला उत्तमप्रकारें दान केल्यानें मीं मिळविलेलें द्रव्य मला यशस्कर होईल" ४३. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर गायींचा समुदाय घेऊन तो महामुनि त्रिजट भार्येसहवर्तमान आनंदित झाला आणि यश, बल, आनंद व सुख वृद्धिंगत करणारे आशीर्वाद त्यानें महात्म्या रामाला दिले ४४. नंतर महापराक्रमी रामानें धर्माला अनुसरून असलेल्या सामर्थ्यांनीं मिळविलेलें असंख्य धन मित्रांना दिलें. कारण, फार दिवसांपासून ते त्याच्याशीं योग्यतेप्रमाणें मानमान्यतापूर्वक भाषण करीत असल्यामुळें त्यांना देणगी देण्याविषयीं त्याच्या मनांत प्रेरणा झाली होती ४५. सारांश, योग्यतेप्रमाणें मानमान्यता, देणगी आणि आदर ह्यांच्या योगानें संतुष्ट न केलेला असा कोणीही ब्राह्मण, मित्र, सेवक अथवा दरिद्री भिक्षेकरी तेथें नव्हता ४६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं बत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३२ ॥

दत्त्वा तु सह वैदेह्या ब्राह्मणेभ्यो धनं बहु । जग्मतुः पितरं द्रष्टुं सीतया सह राघवौ १ ततो गृहीते प्रेष्याभ्यामशोभेतां तदायुधे । मालादामभिरासक्ते सीतया समलंकृते २ ततः प्रासादहर्म्याणि विमानशिखराणि च । अभिरुह्य जनः श्रीमानुदासीनो व्यलोकयत् ३ न हि रथ्याः सुशक्यन्ते गन्तुं बहुजनाकुलाः । आरुह्य तस्मात्प्रासादाद्दीनाः पश्यन्ति राघवम् ४ पदातिं सानुजं दृष्ट्वा ससीतं च जनास्तदा । ऊचुर्बहुजना वाचः शोकोपहतचेतसः ५ यं यान्तमनुयाति स्म चतुरङ्गबलं महत् । तमेकं सीतया सार्धमनुयाति स्म लक्ष्मणः ६ ऐश्वर्यस्य रसज्ञः सन्कामानां चाकरो महान् । नेच्छत्ययमनृतं कर्तुं वचनं धर्मगौरवात् ७ या न शक्या पुरा द्रष्टुं भूतैराकाशगैरपि । तामद्य सीतां पश्यन्ति राजमार्गगता जनाः ८ अङ्गरागोचितां सीतां रक्तचन्दनसेविनीम् । वर्षमुष्णं च शीतं च नेष्यत्याशु विवर्णताम् ९ अद्य नूनं दशरथः सत्त्वमाविश्य भाषते । न हि राजा प्रियं

---

वैदेहीसहवर्तमान ब्राह्मणांना विपुल द्रव्य दिल्यानंतर रघुवंशज राम व लक्ष्मण त्या सीतेला बरोबर घेऊन पित्याला भेटण्याकरितां गेले १. तेव्हां त्यांचीं धनुष्यें सेवकांनीं घेतलेलीं होतीं आणि सीतेनें पूजा केलेलीं तीं धनुष्यें पुष्पमालारूप रज्जूंनीं युक्त असल्यामुळें शोभत होतीं २. ( रामलक्ष्मण पित्याला भेटण्याकरितां बाहेर पडल्या ) नंतर उदासीन असे श्रीमान् लोक घरें, वाडे आणि सात सात मजली घरांवरील गच्चया ह्यांवर आरूढ होऊन पाहूं लागले ३. लोकांची अतिशय गर्दी झाल्या कारणानें रस्त्यांत जाणें शक्य नसल्यामुळें दीन लोक आपआपल्या घरावर चढून तेथून रामाकडे पाहूं लागले ४ आणि लक्ष्मण व सीता ह्यांसहवर्तमान त्या पादचारी रामाला अवलोकन करून शोकानें ज्यांचें मन गोंधळून गेलेलें आहे असे पुष्कळ लोक ह्मणाले ५ "जो जाऊं लागला असतां मोठें चतुरंग सैन्य मागोमाग जात असें त्या सीतेसहवर्तमान एकाकी चालणाऱ्या रामाच्या मागोमाग आज फक्त लक्ष्मण जात आहे ६. ऐश्वर्याचें सुख जाणणारा असून भोग्य वस्तूंची तर मोठी खाणच कीं काय असा तो राम धर्मगौरवामुळें आपल्या पित्याचें वचन असत्य करण्याचें मनांत आणीतच नाहीं ७. पूर्वीं जी आकाशामध्यें संचार करणाऱ्या प्राण्यांच्याही दृष्टीं पडणें शक्य नव्हती त्या सीतेला आज भर रस्त्यांतील लोक पहात आहेत. ८ उटी आणि रक्तचंदन अंगाला लावण्याची जिला संवय आहे त्या सीतेला पर्जन्यवृष्टि, उष्ण आणि शीत हीं तेव्हांच निस्तेज करून टाकितील ९. खरोखर कोणी तरी पिशाच्यानें झपाटल्यामुळें आज हा दशरथ असें बोलत आहे. कारण, असें जर नसेल तर प्रिय पुत्राला दशरथराजानें हांकून

पुत्रं विवासयितुमर्हति १० निर्गुणस्यापि पुत्रस्य कथं स्याद्विनिवासनम्। किं पुनर्यस्य लोकोयं जितो वृत्तेन केवलम् ११ आनृशंस्यमनुक्रोशः श्रुतं शीलं दमः शमः। राघवं शोभयन्त्येते षड्गुणाः पुरुषर्षभम् १२ तस्मात्तस्योपघातेन प्रजाः परमपीडिताः। औदकानीव सत्त्वानि ग्रीष्मे सलिलसंक्षयात् १३ पीडया पीडितं सर्वं जगदस्य जगत्पतेः। मूलस्येवोपघातेन वृक्षः पुष्पफलोपगः १४ मूलं ह्येष मनुष्याणां धर्मसारो महाद्युतिः। पुष्पं फलं च पत्रं च शाखाश्चास्येतरे जनाः १५ ते लक्ष्मण इव क्षिप्रं सपत्न्यः सह बान्धवाः। गच्छन्तमनुगच्छामो येन गच्छति राघवः १६ उद्यानानि परित्यज्य क्षेत्राणि च गृहाणि च। एकदुःखसुखा राममनुगच्छाम धार्मिकम् १७ समुद्धृतनिधानानि परिध्वस्ताजिराणि च। उपात्तधनधान्यानि हृतसाराणि सर्वशः १८ रजसाभ्यवकीर्णानि परित्यक्तानि दैवतैः। मूषकैः परिधावद्भिरुद्बिलैरावृतानि च १९ अपेतोदक-

---

लावणें हें मुळीं संभवनीयच नाहीं १०. पुत्र गुणहीन जरी झाला तरी पित्यानें त्याला हांकून लावणें संभवेल कसें ? तेव्हां केवल आपल्या वर्तनानें ज्यानें हे लोक आपलेसे करून टाकिले आहेत त्या रामाला हांकून लावण्यास पित्यानें तयार होण्याची गोष्ट पाहिजे कशाला ( तस्मात्, दशरथराजाला कोणीतरी पिशाच्यानें झपाटलें असावें हीच गोष्ट खरी ) ११. अहिंसा, दया, शास्त्राध्ययन, सुस्वभाव, इंद्रियदमन व मनोनिग्रह हे सहा गुण पुरुषश्रेष्ठ रामाला शोभा देत आहेत १२. तस्मात्, ग्रीष्मऋतूमध्यें उदकाचा क्षय झाला असतां ज्याप्रमाणें जलचर प्राण्यांना अति दुःख होतें त्याप्रमाणें त्या रामाच्या पीडेनें प्रजाजनांना पराकाष्ठेचें दुःख झालेलें आहे १३. सारांश, मुळावरतीच कुऱ्हाड घातल्यावर ज्याप्रमाणें पुष्पफलांसहवर्तमान वृक्ष पीडित होतो त्याप्रमाणें ह्या जगदीशाला पीडा झाल्यामुळें सर्व जगत् पीडित झालें आहे १४. धर्म हेंच ज्याचें सार आहे असा हा महातेजस्वी राम प्राणिमात्रांचें मूळ असून इतर प्राणी ह्याच्या शाखा, पुष्पें, फलें व पानें आहेत १५. ह्यास्तव, ज्या मार्गानें रघुवंशज राम जात आहे त्या मार्गानें त्याच्या मागोमाग जाणाऱ्या लक्ष्मणाप्रमाणें आपणही भार्या आणि बांधव ह्यांसहवर्तमान सत्वर त्याच्या मागोमाग जाऊं १६. बागा, शेतें आणि घरें टाकून देऊन आपण धर्मनिष्ठ रामाच्या मागोमाग जाऊं. कारण, त्याचें जें दुःख तेंच आमचें दुःख असून त्याचें जें सुख तेंच आमचें सुख आहे १७. ज्यांतील द्रव्य काढून नेलें आहे; देवतांनींही ज्याचा त्याग केला आहे; उंदीर ज्यांमध्यें इकडे तिकडे धांवत आहेत आणि त्यामुळेंच बिळांनीं जें व्याप्त झालेलें आहे १८, १९; ज्यांतील उदक व धूम हीं नाहींशीं झालीं आहेत;

धूमानि हीनसंमार्जनानि च। प्रणष्टबलिकर्मेज्यामन्त्रहोमजपानि च २० दुष्कालेनेव भग्नानि भिन्नभाजनवन्ति च। अस्मत्त्यक्तानि कैकेयी वेश्मानि प्रतिपद्यताम् २१ वनं नगरमेवास्तु येन गच्छति राघवः। अस्माभिश्च परित्यक्तं पुरं संपद्यतां वनम् २२ बिलानि दंष्ट्रिणः सर्वे सानूनि मृगपक्षिणः। त्यजन्त्वस्मद्भयाद्भीता गजाः सिंहा वनान्यपि २३ अस्मत्त्यक्तं प्रपद्यन्तु सेव्यमानं त्यजन्तु च। तृणमांसफलादानं देशं व्यालमृगद्विजम् २४ प्रपद्यतां हि कैकेयी सपुत्रा सह बान्धवैः। राघवेण वयं सर्वे वने वत्स्याम निर्वृताः २५ इत्येवं विविधा वाचो नानाजनसमीरिताः। शुश्राव राघवः श्रुत्वा न विचक्रेऽस्य मानसम् २६ स तु वेश्म पुनर्मातुः कैलासशिखरप्रभम्। अभिचक्राम धर्मात्मा मत्तमातङ्गविक्रमः २७ विनीतवीरपुरुषं प्रविश्य तु नृपालयम्। ददर्शावस्थितं दीनं सुमन्त्रमविदूरतः २८ प्रतीक्षमाणोऽभिजनं तदार्तमनार्तरूपः प्रहसन्निवाथ। जगाम रामः पितरं

---

सडा संमार्जनही ज्यांत बंद झालेलें आहे; बलिदान, पूजा, मंत्र, होम व जप ह्यांचा ज्यांमध्यें नायनाट झालेला आहे २० व दुष्काळामुळें मोडतोड होऊन ज्यांतील भांडींकुंडीं फुटून गेलेलीं आहेत अशीं आह्मीं टाकिलेलीं घरें कैकेयीला मिळोत २१. ज्याअर्थीं राम वनामध्यें चालला आहे त्याअर्थीं तें वनच नगर होवो आणि आह्मीं सोडिलेलें नगरच वन बनो २२. आह्मांला पाहून भयभीत झालेले सर्व सर्प बिलांचा, पशुपक्षी पर्वतशिखरांचा आणि गज व सिंह वनांचा त्याग करोत २३. आह्मीं सोडिलेलें नगर ह्या सर्पादिकांना मिळो आणि तृण, मांस व फळें जेथें प्राप्त होतात अशा-सर्प, मृग व पक्षी ह्यांनीं युक्त असलेल्या-वनाचें आह्मी सेवन करूं लागलों असतां सर्पादि प्राणी ते सोडून जावोत २४ आणि अशा प्रकारचा प्रदेश बांधव आणि पुत्र ह्यांसहवर्तमान कैकेयीला मिळो. आह्मी सर्व रघुवंशज रामासहवर्तमान वनामध्यें सुखानें वास्तव्य करूं " २५. ह्याप्रमाणें नानाप्रकारचीं भाषणें अनेक प्रकारचे लोक करूं लागले व तीं रामानें ऐकिलीं. तथापि त्याच्या मनाला कांहीं एक विकार झाला नाहीं २६. मत्त गजाप्रमाणें ज्याची चालण्याची ढब आहे असा तो धर्मात्मा राम ( लोकांच्या भाषणाकडे लक्ष्य न देतां ) कैलासपर्वताच्या शिखराप्रमाणें असलेल्या आपल्या मातेच्या निवासस्थानाकडे चालला २७. तदनंतर ज्यामध्यें विनयशील, व शूर पुरुष आहेत अशा राजवाड्यांत प्रविष्ट झाल्यावर तेथें जवळच दीन होऊन बसलेला सुमंत्र रामाच्या दृष्टीं पडला २८. तेव्हां ज्याच्या चेहऱ्यावर दुःखाचें चिन्हही नव्हतें असा तो राम दुःखित झालेल्या तेथील लोकांना पहात पहात पित्याची आज्ञा यथाविधि पाळण्याची इच्छा धरून

दिदृक्षुः पितुर्निदेशं विधिवच्चिकीर्षुः २९ तत्पूर्वमैक्ष्वाकसुतो महात्मा रामो गमिष्यन्नृपमार्तरूपम् । व्यतिष्ठत प्रेक्ष्य तदा सुमन्त्रं पितुर्महात्मा प्रतिहारणार्थम् ३० पितुर्निदेशेन तु धर्मवत्सलो वनप्रवेशे कृतबुद्धिनिश्चयः । स राघवः प्रेक्ष्य सुमन्त्रमब्रवीन्निवेदयस्वागमनं नृपाय मे ३१ [१४१७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्रयस्त्रिंशः सर्गः ॥ ३३ ॥

ततः कमलपत्राक्षः श्यामो निरुपमो महान् । उवाच रामस्तं सूतं पितुराख्याहि मामिति १ स रामप्रेषितः क्षिप्रं संतापकलुषेन्द्रियम् । प्रविश्य नृपतिं सूतो निःश्वसन्तं ददर्श ह २ उपरक्तमिवादित्यं भस्मच्छन्नमिवानलम् । तटाकमिव निस्तोयमपश्यज्जगतीपतिम् ३ आबोध्य च महाप्राज्ञः परमाकुलचेतनम् । राममेवानुशोचन्तं सूतः प्राञ्जलिरब्रवीत् ४ तं वर्धयित्वा राजानं पूर्वं सूतो जयाशिषा । भयविक्लवया वाचा मन्दया श्लक्ष्णमब्रवीत् ५ अयं स पुरुषव्याघ्रो द्वारि तिष्ठति ते सुतः । ब्राह्मणेभ्यो धनं दत्त्वा सर्वं चैवोपजीविनाम् ६ स त्वां पश्यतु भद्रं ते रामः सत्यपराक्रमः ।

---

त्याला अवलोकन करण्याच्या उद्देशानें चालला २९. राम येण्याच्या पूर्वींच दुःखित होऊन बसलेल्या दशरथराजाकडे जाणारा तो महात्मा इक्ष्वाकुवंशज राम सुमंत्राला अवलोकन करून आपल्या आगमनाची वर्दी पित्याला देण्याकरितां दाराशींच उभा राहिला ३०. तात्पर्य, पित्याच्या आज्ञेनें वनांत जाण्याविषयीं मनाचा निश्चय केलेला तो धर्मवत्सल रघुवंशज राम सुमंत्राला पाहून " मी आल्याचें राजाला निवेदन कर " असें त्याला ह्मणाला ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं तेहेतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३३ ॥

तदनंतर श्यामवर्ण, सर्वोत्कृष्ट व उदार असा कमलनयन राम " मी आल्याचें पित्याला निवेदन कर " ह्मणून सारथ्याला ह्मणाला १. तेव्हां रामानें पाठविलेला तो सारथि दशरथराजाकडे सत्वर गेला असतां राजाचीं इंद्रियें संतापानें क्षुब्ध झालीं असून तो दीर्घ सुस्कारे टाकीत आहे असें त्या सारथ्याच्या दृष्टीं पडलें २ व ह्यामुळें ग्रहण लागलेला सूर्य, भस्मानें आच्छादित झालेला अग्नि अथवा उदकावांचून जलाशय ह्यांप्रमाणें तो भूपति त्याला निस्तेज दिसला ३. तेव्हां ज्याचा जीव फारच व्याकुळ झालेला होता व रामाकरितांच जो शोक करीत होता अशा त्या दशरथराजाला तो महाज्ञानवान् सारथि हात जोडून ह्मणाला ४. प्रथमतः त्या राजाचा जयजयकार करून तो सारथि अडखळत , अस्पष्ट आणि भयामुळें चांचरत चांचरत ह्मणाला ५ " हा आपला पुत्र पुरुषश्रेष्ठ राम ब्राह्मणांना व आश्रितांना सर्व द्रव्य देऊन टाकून

सर्वान्सुहृद आपृच्छ्य त्वां हीदानीं दिदृक्षते ७ गमिष्यति महारण्यं तं पश्य जगतीपते । वृतं राजगुणैः सर्वैरादित्यमिव रश्मिभिः ८ स सत्यवाक्यो धर्मात्मा गाम्भीर्यात्सागरोपमः । आकाश इव निष्पङ्को नरेन्द्रः प्रत्युवाच तम् ९ सुमन्त्रानय मे दारान्ये केचिदिह मामकाः । दारैः परिवृतः सर्वै-र्द्रष्टुमिच्छामि राघवम् १० सोन्तःपुरमतीत्यैव स्त्रियस्ता वाक्यमब्रवीत् । आर्यो ह्वयति वो राजा गम्यतां तत्र मा चिरम् ११ एवमुक्ताः स्त्रियः सर्वाः सुमन्त्रेण नृपाज्ञया । प्रचक्रमुस्तद्भवनं भर्तुराज्ञाय शासनम् १२ अर्धसप्तशतास्तत्र प्रमदास्ताम्रलोचनाः । कौसल्यां परिवार्याथ शनैर्जग्मु-र्धृतव्रताः १३ आगतेषु च दारेषु समवेक्ष्य महीपतिः । उवाच राजा तं सूतं सुमन्त्रानय मे सुतम् १४ स सूतो राममादाय लक्ष्मणं मैथिलीं तथा । जगामाभिमुखस्तूर्णं सकाशं जगतीपतेः १५ स राजा पुत्रमायान्तं दृष्ट्वा-चारात्कृताञ्जलिम् । उत्पपातासनात्तूर्णमार्तः स्त्रीजनसंवृतः १६ सोभि-

---

दाराशीं उभा राहिलेला आहे ६. आपलें देव बरें करो, त्या अमोघपराक्रमी रामाला आपलें दर्शन होवो. सर्व सुहृदांचा निरोप घेऊन तो आतां आपली भेट घेण्याची इच्छा करीत आहे ७. हे भूपते, पहा, किरणांनीं युक्त असलेल्या सूर्या-प्रमाणें सर्व राजगुणांनीं युक्त असलेला तो राम घोर वनांत जात आहे " ८. ह्याप्र-माणें सारथ्यानें सांगितलें असतां गंभीरपणामध्यें सागराची बरोबरी करणारा व आका-शाप्रमाणें निर्लेप असलेला तो धर्मनिष्ठ व सत्यवचनी राजाधिराज दशरथ त्याला ह्मणाला ९ " हे सुमंत्रा, माझ्या स्त्रियांना आणि जे कोणी येथें माझे असतील त्यांना तूं घेऊन ये. कारण, सर्व स्त्रियांनीं परिवेष्टित होऊन रामाला अवलोकन कर-ण्याची माझी इच्छा आहे " १०. ह्याप्रमाणें दशरथराजानें सांगितल्यानंतर तो सारथि अंतःपुरामध्यें गेला आणि " आर्य दशरथराजा आपणांला बोलावीत आहे; त्याच्याकडे चला; विलंब लावूं नका " असें जातांक्षणीं त्या स्त्रियांना ह्मणाला ११. ह्याप्रमाणें राजाच्या आज्ञेनें सुमंत्रानें सर्व स्त्रियांना सांगितल्यावर भर्त्याची आज्ञा शिरसा मान्य करून त्या स्त्रिया त्याच्या मंदिराकडे चालल्या १२. आरक्तवर्ण नेत्रांनीं युक्त आणि व्रतस्थ अशा साडेतीनशें तरुण स्त्रिया कौसल्येच्या भोंवताली गराडा घालून हळूं हळूं तिकडे गेल्या १३. तदनंतर स्त्रिया आल्यावर राजानें वर पाहिलें आणि " हे सुमंत्रा, माझ्या पुत्राला घेऊन ये " ह्मणून त्या सारथ्याला सांगितलें १४. तेव्हां राम, लक्ष्मण आणि सीता ह्यांना घेऊन तो सारथि सत्वर भूपतीच्या संमुख होऊन त्याच्याजवळ गेला असतां १५ शिष्टाचाराप्रमाणें हात जोडून आपणांकडे

दुद्राव वेगेन रामं दृष्ट्वा विशांपतिः । तमसंप्राप्य दुःखार्तः पपात भुवि मूर्छितः १७ तं रामोऽभ्यपतत्क्षिप्रं लक्ष्मणश्च महारथः । विसंज्ञमिव दुःखेन सशोकं नृपतिं तथा १८ स्त्रीसहस्रनिनादश्च संजज्ञे राजवेश्मनि । हाहा-रामेति सहसा भूषणध्वनिमिश्रितः १९ तं परिष्वज्य बाहुभ्यां तावुभौ रामलक्ष्मणौ । पर्यङ्के सीतया सार्धं रुदन्तः समवेशयन् २० अथ रामो मुहूर्तस्य लब्धसंज्ञं महीपतिम् । उवाच प्राञ्जलिर्बाष्पशोकार्णवपरिप्लुतम् २१ आपृच्छे त्वां महाराज सर्वेषामीश्वरोसि नः । प्रस्थितं दण्डकारण्यं पश्य त्वं कुशलेन माम् २२ लक्ष्मणं चानुजानीहि सीता चान्वेतु मां वनम् । कारणैर्बहुभिस्तथ्यैर्वार्यमाणौ न चेच्छतः २३ अनुजानीहि सर्वान्नः शोक-मुत्सृज्य मानद । लक्ष्मणं मां च सीतां च प्रजापतिरिवात्मजान् २४ प्रतीक्षमाणमव्यग्रमनुज्ञां जगतीपतेः । उवाच राजा संप्रेक्ष्य वनवासाय

---

येत असलेल्या पुत्राला अवलोकन करितांक्षणीं स्त्रियांनीं परिवेष्टित असलेला तो दुःखित दशरथराजा आसनावरून सत्वर उठला १६ आणि राम दृष्टीं पडतांक्षणीं वेगानें त्याच्याकडे धांवला; परंतु, रामापर्यंत पोंचण्याचे पूर्वींच तो दुःखाकुल झालेला भूपति मूर्च्छा येऊन भूमीवर पडला १७. तेव्हां शोकाकुल आणि दुःखामुळें अगदीं मूर्च्छित होऊन पडलेल्या त्या दशरथराजाकडे राम व महारथि लक्ष्मण हे सत्वर धांवले १८. त्यावेळीं " हे रामा, हे रामा, " असा हजारों स्त्रियांनीं राजवाड्या-मध्यें एकाएकीं एकच कल्होळ करून दिला व ह्या नादांत त्यांच्या भूषणांचा ध्वनिही मिसळला १९. तदनंतर सेवकजनांनीं त्या राजाला व त्या उभयतां रामलक्ष्मणांना हातांनीं कवटाळून धरून सीतेसहवर्तमान त्यांना रडत रडत मंचकावर बसविलें २०. नंतर एक मुहूर्त लोटल्यावर शुद्धीवर आलेल्या आणि दुःखाश्रुसागरांत निमग्न झालेल्या दशरथ-राजाला राम हात जोडून ह्मणाला २१ " हे महाराज, मी आपला निरोप घेण्याकरितां आलों आहें; आपण आह्मां सर्वांचे प्रभु आहां; पहा, मी दंडकारण्यांत निघालों आहें. माझ्याकडे आपण कृपादृष्टि करा २२. लक्ष्मणालाही माझ्याबरोबर जाण्याची अनुज्ञा द्या आणि सीतेलाही माझ्या मागोमाग वनामध्यें येऊं द्या. ह्या उभयतांचा पुष्कळ खऱ्या खऱ्या कारणांनीं मीं वनांत येण्याविषयीं निषेध केला तरी घरीं राहण्याची त्यांची इच्छा नाहीं २३. ह्यास्तव, हे मान्य भूपते, आपल्या सनकादि पुत्रांना ब्रह्मदेवानें ज्याप्रमाणें ( तपश्चर्येला जाण्याची ) अनुज्ञा दिली त्याप्रमाणें शोक टाकून देऊन लक्ष्मण, मी व सीता अशा आह्मां सर्वांना आपण ( अरण्यांत जाण्याची ) अनुज्ञा द्या " २४. ह्या-प्रमाणें यत्किंचित्‌ही विषाद न वाटतां वनवासाला जाण्याकरितां भूपतीच्या अनुज्ञेची

**राघवम् २५ अहं राघव कैकेय्या वरदानेन मोहितः । अयोध्यायां त्वमेवाद्य भव राजा निगृह्य माम् २६ एवमुक्तो नृपतिना रामो धर्मभृतां वरः । प्रत्युवाचाञ्जलिं कृत्वा पितरं वाक्यकोविदः २७ भवान्वर्षसहस्राय पृथिव्या नृपते पतिः । अहं त्वरण्ये वत्स्यामि न मे राज्यस्य काङ्क्षिता २८ नव पञ्च च वर्षाणि वनवासे विहृत्य ते । पुनः पादौ ग्रहीष्यामि प्रतिज्ञान्ते नराधिप २९ रुदन्नार्तः प्रियं पुत्रं सत्यपाशेन संयुतः । कैकेय्या चोद्यमानस्तु मिथो राजा तमब्रवीत् ३० श्रेयसे वृद्धये तात पुनरागमनाय च । गच्छस्वारिष्टमव्यग्रं पन्थानमकुतोभयम् ३१ न हि सत्यात्मनस्तात धर्माभिमनसस्तव । संनिवर्तयितुं बुद्धिः शक्यते रघुनन्दन ३२ अद्य त्विदानीं रजनीं पुत्र मा गच्छ सर्वथा । एकाहं दर्शनेनापि साधु तावच्चराम्यहम् ३३ मातरं मां च संपश्यन्वसेमामद्य शर्वरीम् । तर्पितः सर्वकामैस्त्वं श्वः काल्ये साधयिष्यसि ३४ दुष्करं क्रियते पुत्र सर्वथा राघव**

---

वाट पहाणाऱ्या रामाकडे पाहून दशरथराजा ह्मणाला २५ " हे राघवा, कैकेयीनें वरदानामुळें मला मोहित केलें आहे. तस्मात् , मला बांधून टाकून तूंच आज अयोध्येमध्यें राजा हो " २६. ह्याप्रमाणें दशरथ राजानें सांगितलें असतां संभाषणपटु आणि धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असा तो राम हात जोडून पित्याला ह्मणाला २७ " हे भूपते, आपण हजारों वर्षें पृथ्वीचे पति असा; मी अरण्यामध्यें वास्तव्य करीन; मला राज्याची इच्छा नाहीं २८. चवदा वर्षें वनवासांत हिंडून प्रतिज्ञा शेंवटास गेली ह्मणजे, हे प्रजाधिपते, मी पुनरपि आपले पाय धरीन " २९. ह्याप्रमाणें राम बोलत असतां ( आजच्या आजच त्याला वनांत जाण्याची अनुज्ञा द्या असें ) गुप्तपणें कैकेयी राजाला सांगूं लागली. तेव्हां सत्यपाशानें जखडून गेलेला व शोकाकुल झालेला दशरथराजा रडत रडत त्या आपल्या प्रिय पुत्राला ह्मणाला ३० " ह्या तुझ्या जाण्यापासून पारमार्थिक हित आणि ऐहिक अभ्युदय साधून तुझें पुनरपि आगमन होवो. तूं दक्ष राहून निर्भय मार्गानें सुखरूप जा ३१. बा रघुनंदना, सत्यावर तुझी भिस्त असल्यामुळें आणि धर्मसंपादनाविषयीं तुझ्या मनाचा निश्चय झाला असल्यामुळें अरण्यांत जाण्याचा हा तुझा विचार फिरविणें शक्य नाहीं ३२. परंतु, हे पुत्रा, कांहींही असो, आजची रात्र तरी तूं जाऊंच नकोस. तुझ्या दर्शनानें एक दिवस तरी मी चांगला घालवीन ३३. मातेकडे आणि माझ्याकडे पाहून ही आजची रात्र तूं येथें वास्तव्य कर. सर्वप्रकारच्या भोग्य वस्तूंनीं आज तृप्त होऊन उदयीक प्रभातकालीं तूं वनामध्यें जाशील ३४. हे रघुनंदना प्रिय पुत्रा, तूं हें सर्वस्वीं दुष्कर कर्म करीत आहेस.

प्रिय । त्वया हि मत्प्रियार्थं तु वनमेवमुपाश्रितम् ३५ न चैतन्मे प्रियं पुत्र शपे सत्येन राघव । छन्नया चलितस्त्वास्मि स्त्रिया भस्माग्निकल्पया ३६ वञ्चना या तु लब्धा मे तां त्वं निस्तर्तुमिच्छसि । अनया वृत्तसादिन्या कैकेय्याभिप्रचोदितः ३७ न चैतदाश्चर्यतमं यत्त्वं ज्येष्ठः सुतो मम । अपानृतकथं पुत्र पितरं कर्तुमिच्छसि ३८ अथ रामस्तदा श्रुत्वा पितुरार्तस्य भाषितम् । लक्ष्मणेन सह भ्रात्रा दीनो वचनमब्रवीत् ३९ प्राप्स्यामि यानद्य गुणान्को मे श्वस्तान्प्रदास्यति । अपक्रमणमेवातः सर्वकामैरहं वृणे ४० इयं सराष्ट्रा सजना धनधान्यसमाकुला । मया विसृष्टा वसुधा भरताय प्रदीयताम् ४१ वनवासकृता बुद्धिर्न च मेद्य चलिष्यति । यस्तु युद्धे वरो दत्तः कैकेय्यै वरद त्वया ४२ दीयतां निखिलेनैव सत्यस्त्वं भव पार्थिव । अहं निदेशं भवतो यथोक्तमनुपालयन् ४३ चतुर्दश समा वत्स्ये वने वनचरैः सह । मा विमर्शो वसुमती भरताय प्रदीयताम् ४४ न हि मे काङ्क्षितं राज्यं सुखमात्मनि वा प्रियम् । यथानिदेशं कर्तुं वै तवैव

---

माझ्या मर्जीकरितां तूं वनाचा स्वीकार केलास ३५. परंतु, हे पुत्रा, मी तुला खरोखर शपथपूर्वक सांगतों हें मला पसंत नाहीं. भस्मांत दडून राहिलेल्या अग्निप्रमाणें अंतस्थ क्रूर असलेल्या ह्या स्त्रीनें, हे राघवा, तुझ्या राज्याभिषेकापासून मला निवृत्त केलें आहे ३६. ह्या दुराचारिणी कैकयीनें प्रेरणा केल्यामुळें माझी जी ही फसणूक झाली आहे तिच्यांतून तूं मला पार पाडण्याचें मनांत आण ३७. हे पुत्रा, तूं माझा ज्येष्ठ पुत्र आहेस. तेव्हां आपल्या पित्याला अनृतरहित करण्याची इच्छा करीत आहेस हें कांहीं अत्यंत आश्चर्य नव्हे " ३८. भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान असलेला राम दुःखाकुल झालेल्या पित्याचें भाषण श्रवण केल्यावर दीन होऊन त्याला ह्मणाला ३९ " आज जे गुण मला प्राप्त होतील ते मला उद्यां कोण देणार आहे ? ह्यास्तव, येथून गमन करणें ह्यांतच माझे सर्व मनोरथ परिपूर्ण होत आहेत. करितां, येथून आजच्या आज जाणें हेंच मला पसंत आहे ४०. राष्ट्र व लोक ह्यांनीं युक्त असून धनधान्यांनीं समृद्ध अशी ही मीं सोडिलेली पृथ्वी आपण भरताला द्या ४१. वनवासाला जाण्याचा मीं जो निश्चय केला आहे तो माझा आज फिरणार नाहीं. हे वरप्रद, आपण युद्धसमयीं जो कैकेयीला वर देऊं केला आहे ४२ तो पूर्णपणें तिला द्या आणि, हे भूपते, आपण खरे व्हा. मी आपल्या सांगण्याप्रमाणें आपल्या आज्ञेचें परिपालन करून ४३ वनचरांसहवर्तमान चवदां वर्षेंपर्यंत वनामध्यें वास्तव्य करीन. आपण आतां विचार करूं नका; भरताला पृथ्वी देऊन टाका ४४. हे रघुनंदन भूपते,

रघुनन्दन ४५ अपगच्छतु ते दुःखं मा भूर्बाष्पपरिप्लुतः । न हि क्षुभ्यति दुर्धर्षः समुद्रः सरितां पतिः ४६ नैवाहं राज्यमिच्छामि न सुखं न च मेदिनीम् । नैव सर्वानिमान्कामान्न स्वर्गं न च जीवितम् ४७ त्वामहं सत्यमिच्छामि नानृतं पुरुषर्षभ । प्रत्यक्षं तव सत्येन सुकृतेन च ते शपे ४८ न च शक्यं मया तात स्थातुं क्षणमपि प्रभो । स शोकं धारयस्वेमं न हि मेऽस्ति विपर्ययः ४९ अर्थितो ह्यस्मि कैकेय्या वनं गच्छेति राघव । मया चोक्तं व्रजामीति तत्सत्यमनुपालये ५० मा चोत्कण्ठा कृता देव वने रंस्यामहे वयम् । प्रशान्तहरिणाकीर्णे नानाशकुनिनादिते ५१ पिता हि दैवतं तात देवतानामपि स्मृतम् । तस्माद्दैवतमित्येव करिष्यामि पितुर्वचः ५२ चतुर्दशसु वर्षेषु गतेषु नृपसत्तम । पुनर्द्रक्ष्यसि मां प्राप्तं संतापोऽयं विमुच्यताम् ५३ येन संस्तम्भनीयोऽयं सर्वो बाष्पकलो जनः । स त्वं पुरुषशार्दूल किमर्थं विक्रियां गतः ५४ पुरं च राष्ट्रं च मही च केवला मया

---

आपल्या आज्ञेप्रमाणें वागणें हें जसें माझ्या मनाला प्रिय आहे तसें (ऐहिक) सुख मला प्रिय नाहीं व राज्याचीही मला इच्छा नाहीं ४५. आपण दुःख करूं नका आणि अश्रूंनीं नेत्र भरू देऊं नका. तरून जाण्याला कठीण असा नद्यांचा अधिपति समुद्र कधीं मर्यादेचें आतिक्रमण करीत नसतो ४६. राज्य, सुख, पृथ्वी, कसल्याही प्रकारचें हें विषयसुख, स्वर्ग आणि जीवित ह्यांपैकीं कशाचीही मला इच्छा नाहीं ४७. हे पुरुषश्रेष्ठ, आपण खोटे न होतां सत्य व्हावें हीच माझी इच्छा आहे व हें मी आपणांसमक्ष खरोखर पुण्याला स्मरून शपथेवर सांगत आहें ४८. हे तात, हे प्रभो, आतां एक क्षणभरही माझ्यानें येथें राहवणार नाहीं. हे प्रभो, आपण हा शोक आंवरून धरा; माझ्या निश्चयांत बदल होणार नाहीं ४९. हे राघव, "वनांत जा" ह्मणून कैकेयीनें मला विनंति केली आणि "जातों" ह्मणून मींही तिला सांगितलें. तस्मात्, मला सत्याचेंच परिपालन केलें पाहिजे ५०. मला येथें रहाण्याची उत्कंठा नाहीं. हे प्रभो, नानाप्रकारच्या पक्ष्यांनीं नादित आणि शांत हरिणांनीं व्याप्त अशा वनामध्यें आह्मीं सुखानें दिवस काढूं ५१. हे तात, देवतांना सुद्धां पिता हेंच दैवत ह्मणून ह्मटलें आहे. तस्मात्, पिता हेंच दैवत आहे हीच गोष्ट मनांत आणून मी पित्याच्या आज्ञेप्रमाणें वागणार ५२. हे नृपश्रेष्ठ, चवदा वर्षें लोटल्यावर आपण मला येथें आलेला पहाल; आतां हा संताप सोडून द्या ५३. (कांहीं प्रसंग उद्भवल्यामुळें) लोकांच्या नेत्रामध्यें अश्रु आले असतां आपणच ह्या सर्व लोकांना आंवरून धरणें योग्य आहे; परंतु, असें असतांनाही, हे पुरुषश्रेष्ठ, तुमच्या स्वतःचेच ठिकाणीं हा

विसृष्टा भरताय दीयताम्। अहं निदेशं भवतोनुपालयन्वनं गमिष्यामि चिराय सेवितुम् ५५ मया विसृष्टां भरतो महीमिमां सशैलखण्डां सपुरोपकाननाम्। शिवासु सीमास्वनुशास्तु केवलं त्वया यदुक्तं नृपते तथास्तु तत् ५६ न मे तथा पार्थिव दीयते मनो महत्सु कामेषु न चात्मनः प्रिये। यथा निदेशे तव शिष्टसंमते व्यपैतु दुःखं तव मत्कृतेनघ ५७ तदद्य नैवानघ राज्यमव्ययं न सर्वकामान्वसुधां न मैथिलीम्। न चिन्तितं त्वामनृतेन योजयन्वृणीय सत्यं व्रतमस्तु ते तथा ५८ फलानि मूलानि च भक्षयन्वने गिरींश्च पश्यन्सरितः सरांसि च। वनं प्रविश्यैव विचित्रपादपं सुखी भविष्यामि तवास्तु निर्वृतिः ५९ एवं स राजा व्यसनाभिपन्नस्तापेन दुःखेन च पीड्यमानः। आलिङ्ग्य पुत्रं सुविनष्टसंज्ञो भूमिं गतो नैव विचेष्ट किंचित् ६० देव्यः समस्ता रुरुदुः समेतास्तां वर्जयित्वा नरदेवपत्नीम्। रुदन्सुमित्रोपि जगाम मूर्छां हाहाकृतं तत्र बभूव सर्वम् ६१

---

विपरीत प्रकार कसा झाला ! ५४. नगर, राष्ट्र आणि संपूर्ण पृथ्वी ह्यांचा मीं त्याग केला आहे; तीं आपण भरताला द्या. मी आपली आज्ञा परिपालन करण्याकरितां पुष्कळ दिवसपर्यंत वास्तव्य करण्यास वनामध्यें जातों ५५. शांत अशा सीमांच ठिकाणीं रममाण होऊन ह्या भरताला पर्वत, नगरें आणि अरण्यें ह्यांसहवर्तमान मीं सोडिलेल्या ह्या पृथ्वीचें पूर्णपणें राज्य करूं द्या. हे भूपते, आपण जसें कैकेयीला सांगितलें आहे तसेंच होवो ५६. हे भूपते, शिष्टसंमत अशी आपली आज्ञा परिपालन करण्याकडे जसें मी लक्ष्य देतों तसें मोठमोठ्या भोग्य वस्तूंकडे अथवा मनाला प्रिय अशा वस्तूंकडे मी लक्ष्य देत नाहीं. ह्यास्तव, हे निष्पाप, माझ्याकरितां आपण दुःख करूं नका ५७. आपल्या पदरीं खोटेपणा बांधून अक्षय राज्य, सर्व भोग्य वस्तु, पृथ्वी आणि सीता, ह्यांपैकीं कशाचीही मला इच्छा नाहीं; हें माझें खरें खरें व्रत आहे. करितां, आपलें कैकेयीला दिलेलें वचन खरें होऊं द्या ५८. वनामध्यें फळें व मुळें भक्षण करून त्यांतील पर्वत, नद्या आणि सरोवरें मी पाहूं लागलों असतां मला सुख होईल. इतकेंच नव्हें परंतु, आश्चर्यकारक वृक्षांनीं युक्त असलेल्या वनांत प्रविष्ट होतांक्षणींच मी सुखी होईन; आपण सुखी असावें " ५९. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां संकटांत सांपडून संताप व दुःख ह्यांनीं व्याकुळ होत असलेल्या त्या दशरथ राजानें पुत्राला आलिंगन दिलें; परंतु, (दुःखातिशयानें) तो अत्यंत मूर्छित झाल्यामुळें भूमीवर पडला आणि मुळींच हालचाल करीनासा झाला ६०. तेव्हां, ती कैकेयी राजपत्नी खेरीज करून, तेथें जमलेल्या सर्व राजपत्न्या रडूं लागल्या, लक्ष्मणही रडतां रडतां मूर्छित

[ १४७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुस्त्रिंशः सर्गः ॥ ३४ ॥

ततो निर्धूय सहसा शिरो निःश्वस्य चासकृत् । पाणिं पाणौ विनिष्पिष्य दन्तान्कटकटाय्य च १ लोचने कोपसंरक्ते वर्णं पूर्वोचितं जहत् । कोपाभिभूतः सहसा संतापमशुभं गतः २ मनः समीक्षमाणश्च सूतो दशरथस्य च । कम्पयन्निव कैकेय्या हृदयं वाक्शरैः शितैः ३ वाक्यवज्रैरनुपमैर्निर्भिन्दन्निव चाशुभैः। कैकेय्याः सर्वमर्माणि सुमन्त्रः प्रत्यभाषत ४ यस्यास्तव पतिस्त्यक्तो राजा दशरथः स्वयम्। भर्ता सर्वस्य जगतः स्थावरस्य चरस्य च ५ न ह्यकार्यतमं किंचित्तव देवीह विद्यते। पतिघ्नीं त्वामहं मन्ये कुलघ्नीमपि चान्ततः ६ यन्महेन्द्रमिवाजय्यं दुष्प्रकम्प्यमिवाचलम् । महोदधिमिवाक्षोभ्यं संतापयसि कर्मभिः ७ मावमंस्था दशरथं भर्तारं वरदं पतिम् । भर्तुरिच्छा हि नारीणां पुत्रकोट्या विशिष्यते ८ यथावयो हि राज्यानि प्राप्नुवन्ति नृपक्षये । इक्ष्वाकुकुलनाथेऽस्मिंस्तं लोपयितुमिच्छसि ९ राजा

---

झाला आणि ह्याप्रमाणें त्या सर्व स्थलामध्यें हाहाकार उडून गेला ६१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चवतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३४ ॥

नंतर एकाएकीं मस्तकाला हिसडा देऊन, वारंवार दुःखाचे सुस्कारे टाकून व हातावर हात चोळून सुमंत्र कैकेयीवर दात खाऊं लागला १. त्याचे नेत्र क्रोधानें आरक्तवर्ण झाले, पूर्वी असलेलें त्याच्या मुखावरील तेज अदृश्य झालें आणि क्रोधाविष्ट झालेल्या त्या सुमंत्राला एकाएकीं भयंकर संताप झाला २. दशरथाच्या मनाचा कल पाहून तो सुमंत्र सारथि तीक्ष्ण अशा शब्दरूप बाणांनीं कैकेयीचें हृदय कंपित करीत करीत आणि भयंकर व अनुपम अशा शब्दरूप वज्रांनीं कैकेयीच्या सर्व मर्मांचा भेद करीत करीत तिला ह्मणाला ३,४ " सर्व स्थावरजंगमात्मक जगताचा प्रभु व प्रत्यक्ष तुझा पति अशा दशरथराजाचा तूं स्वतः त्याग केला आहेस ५; ह्यापेक्षां, हे राजभार्ये, अधिक निंद्य अशी कोणतीही गोष्ट ह्या जगतांत नाहीं. मी तुला पतीचा व परिणामीं सर्व कुलाचा घात करणारी आहेस असें समजतों ६. कारण, महेंद्राप्रमाणें अजिंक्य, पर्वताप्रमाणें अचल आणि महासागराप्रमाणें अक्षोभ्य अशा दशरथराजाला आपल्या कर्मांनीं तूं संताप आणीत आहेस ७. वरप्रद आणि पालन करणाऱ्या अशा आपल्या भर्त्या दशरथराजाचा तूं अवमान करूं नको; भर्त्याच्या इच्छेला अनुसरून वागणें हें स्त्रियांना एक कोटि पुत्र प्राप्त होण्यापेक्षांही अधिक आहे ८. राजांच्या मरणानंतर वयाच्या

भवतु ते पुत्रो भरतः शास्तु मेदिनीम् । वयं तत्र गमिष्यामो यत्र रामो गमिष्यति १० न च ते विषये कश्चिद्ब्राह्मणो वस्तुमर्हति । तादृशं त्वममर्यादमद्य कर्म करिष्यसि ११ नूनं सर्वे गमिष्यामो मार्गं रामनिषेवितम् । त्यक्ताया बान्धवैः सर्वैर्ब्राह्मणैः साधुभिः सदा १२ का प्रीती राज्यलाभेन तव देवि भविष्यति । तादृशं त्वममर्यादं कर्म कर्तुं चिकीर्षसि १३ आश्चर्यमिव पश्यामि यस्यास्ते वृत्तमीदृशम् । आचरन्त्या न विदृता सद्यो भवति मेदिनी १४ महाब्रह्मर्षिसृष्टा वा ज्वलन्तो भीमदर्शनाः । धिग्वाग्दण्डा न हिंसन्ति रामप्रव्राजने स्थिताम् १५ आम्रं छित्त्वा कुठारेण निम्बं परिचरेत्तु कः । यश्चैनं पयसा सिञ्चेन्नैवास्य मधुरो भवेत् १६ आभिजात्यं हि ते मन्ये यथा मातुस्तथैव च । न हि निम्बात्स्रवेत्क्षौद्रं लोके निगदितं वचः १७ तव मातुरसद्ग्राहं विद्म पूर्वं यथाश्रुतम् । पितुस्ते वरदः कश्चिद्ददौ वरमनुत्तमम् १८ सर्वभूतरुतं तस्मात्संजज्ञे वसुधाधिपः । तेन तिर्य-

---

क्रमाला अनुसरून त्यांच्या पुत्रांना राज्यें प्राप्त होत असतात; परंतु, हा इक्ष्वाकुकुलाचा अधिपति दशरथ जिवंत असतांनाच त्या क्रमाचा लोप करण्याची तूं इच्छा करीत आहेस ९. बाई, तुझा पुत्र राजा होवो; भरत पृथ्वीचें परिपालन करो; जिकडे राम जाईल तिकडे आह्मी जाऊं १०. तुझ्या देशामध्यें कोणीही ब्राह्मणानें वास्तव्य करणें योग्य नव्हें. कारण, अशाच प्रकारचें अमर्याद कर्म तूं करीत आहेस ११. रामानें स्वीकारिलेल्या मार्गानेंच खरोखर आह्मी सर्व चालते होणार. हे राजपत्नि, सर्व बांधव आणि सज्जन ब्राह्मण ह्यांनीं सर्वदा तुझा त्याग केला असतां राज्यलाभानें तुला काय बरें आनंद होणार आहे ? ( सर्वांनींच तुझा त्याग करावा ) अशाच प्रकारचें अमर्याद कर्म करण्याचें तूं आज मनामध्यें आणीत आहेस १२,१३. तूं हें अशाप्रकारचें आचरण करीत असतांना एकाएकीं ही पृथ्वी विदीर्ण कशी होऊन गेली नाहीं हें मला आश्चर्यासारिखेंच वाटत आहे १४. अग्निप्रमाणें भस्म करून टाकण्यास समर्थ व भयंकर फल देणारे असे मोठमोठ्या महर्षींनीं सोडिलेले धिक्कारशब्दरूप दंड रामाला वनांत हाकून देण्याविषयीं आग्रह धरून बसलेल्या तुझा कसा नाश करीत नाहींत हें-ही मी आश्चर्यच समजत आहें १५. आम्रवृक्ष कुठारानें तोडून टाकून निंब वृक्षाची जोपासना कोण करणार आहे ? कारण, ह्या निंब वृक्षाला जो पाणी घालील त्याच्या-करितां तो कधीं मधुर होणार नाहीं १६. तुझा कुलीनपणा तुझ्या आईप्रमाणेंच मी समजत आहें. कारण, " लिंबाच्या झाडांतून कधीं मध पाघळत नाहीं " ही ह्मण लोकामध्यें प्रसिद्ध आहे १७. तुझ्या मातेची पापकर्माविषयीं आसक्ति पूर्वीं इत्थंभूत

ग्गतानां च भूतानां विदितं वचः १९ ततो जृम्भस्य शयने विरुताद्भूरि-वर्चसः । पितुस्ते विदितो भावः स तत्र बहुधाहसत् २० तत्र ते जननी क्रुद्धा मृत्युपाशमभीप्सती । हासं ते नृपते सौम्य जिज्ञासामीति चाब्रवीत् २१ नृपश्चोवाच तां देवीं हासं शंसामि ते यदि । ततो मे मरणं सद्यो भविष्यति न संशयः २२ माता ते पितरं देवि पुनः केकयमब्रवीत् । शंस मे जीव वा मा वा न मां त्वं प्रहसिष्यसि २३ प्रियया च तथोक्तः स केकयः पृथिवीपतिः । तस्मै तं वरदायार्थं कथयामास तत्त्वतः २४ ततः स वरदः साधू राजानं प्रत्यभाषत । म्रियतां ध्वंसतां वेयं मा शंसीस्त्वं महीपते २५ स तच्छ्रुत्वा वचस्तस्य प्रसन्नमनसो नृपः । मातरं ते निरस्याशु विजहार कुबेरवत् २६ तथा त्वमपि राजानं दुर्जनाचरिते पथि । असद्ग्राहमिमं मोहात्कुरुषे पापदर्शिनि २७ सत्यश्चात्र प्रवादोयं लौकिकः प्रति-

---

ऐकिलेली मला माहीत आहे. एका वरप्रद ऋषीनें तुझ्या पित्याला अनुपम वर दिला होता १८; त्याच्या योगानें सर्व प्राण्यांच्या भाषेचा अर्थ त्या राजाला समजूं लागला व त्यामुळें सर्व पशुपक्ष्यांचें भाषण त्याला विदित झालें १९. पुढें कांहीं दिवसांनीं तुझा पिता केकय शय्येवर शयन करीत असतांना अतिशय तेजस्वी अशा जृंभपक्ष्याचा अभिप्राय त्याच्या शब्दावरून त्याला विदित झाला व तो अभिप्राय विदित झाल्यानंतर त्या शय्येवर तो राजा वारंवार हंसूं लागला २०. तेव्हां मृत्युपाशाची इच्छा करणारी तुझी माता क्रुद्ध झाली आणि " हे सौम्य भूपते, तूं कां हंसलास हें जाणण्याची माझी इच्छा आहे " ह्मणून त्याला ह्मणाली २१. इतकें झाल्यावर राजा त्या राणीला ह्मणाला " मी कां हंसलों हें जर तुला सांगेन तर मला लागलेंच मरण येईल ह्यांत संशय नाहीं " २२.परंतु ( इतकें झाल्यावरही) ती राणी तुझी माता पुनरपि तुझ्या पित्या केकयाला ह्मणाली " तूं जग अथवा मर; हें तूं मला सांगितलेंच पाहिजे. असें झालें ह्मणजे पुनरपि तूं मला हंसणार नाहींस " २३. ह्याप्रमाणें प्रियेनें सांगितलें असतां त्या भूपति केकयानें ती गोष्ट त्या वर देणाऱ्या ऋषीला खरीखरी निवेदन केली २४. तेव्हां तो वर देणारा साधु राजाला ह्मणाला " ही मरो किंवा उठून जावो; हे भूपते, तूं हिला ही गोष्ट कधींही सांगूं नको " २५. प्रसन्न अंतःकरणानें युक्त असलेल्या मुनीचें तें भाषण श्रवण केल्यावर तुझ्या मातेचा सत्वर त्याग करून तुझा पिता कुबेराप्रमाणें सुखानें राहूं लागला २६.सारांश, हे पापिणि, तूंही त्याचप्रमाणें दुर्जनांनीं आचरिलेल्या मार्गाचें अवलंबन केलें आहेस आणि राजाला मोह उत्पन्न करून तूं त्याच्याकडून हें असत्कार्य करवीत आहेस २७. पुरुष पित्याप्रमाणें होतात

भाति मा । पितॄन्समनुजायन्ते नरा मातरमङ्गनाः २८ नैवं भव गृहाणेदं यदाह वसुधाधिपः । भर्तुरिच्छामुपास्येह जनस्यास्य गतिर्भव २९ मा त्वं प्रोत्साहिता पापैर्देवराजसमप्रभम् । भर्तारं लोकभर्तारमसद्धर्ममुपादध ३० न हि मिथ्याप्रतिज्ञातं करिष्यति तवानघः । श्रीमान्दशरथो राजा देवि राजीवलोचनः ३१ ज्येष्ठो वदान्यः कर्मण्यः स्वधर्मस्यापि रक्षिता । रक्षिता जीवलोकस्य बली रामोऽभिषिच्यताम् ३२ परिवादो हि ते देवि महाँल्लोके चरिष्यति । यदि रामो वनं याति विहाय पितरं नृपम् ३३ स्वराज्यं राघवः पातु भव त्वं विगतज्वरा । न हि ते राघवादन्यः क्षमः पुरवरे वसन् ३४ रामे हि यौवराज्यस्थे राजा दशरथो वनम् । प्रवेक्ष्यति महेष्वासः पूर्ववृत्तमनुस्मरन् ३५ इति सान्त्वैश्च तीक्ष्णैश्च कैकेयीं राजसंसदि । भूयः संक्षोभयामास सुमन्त्रस्तु कृताञ्जलिः ३६ नैव सा क्षुभ्यते देवी न च स्म परिदूयते । न चास्या मुखवर्णस्य लक्ष्यते विक्रिया तदा ३७ [१५१५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चत्रिंशः सर्गः ॥ ३५ ॥

---

आणि स्त्रिया मातेप्रमाणें निपजतात ह्या लौकिक ह्मणीची ह्या तुझ्या अचरणांत तर मला अगदीं खरीखरी साक्ष पटत आहे २८. तर बाई, आपल्या आईसारखी होऊं नको. राजानें जें हें सांगितलें आहे तें ऐक आणि भर्त्याच्या इच्छेप्रमाणें वागून तूं ह्या जनांचें रक्षण कर २९. कोणी दुष्टांनीं चढवून दिल्यामुळें चढून जाऊन तूं आपल्या इंद्रतुल्य जगत्पालक भर्त्याकडून अधर्म करवूं नको ३०. हे देवि, निष्पाप व वैभवशाली असा हा कमलनयन दशरथ राजा तुला दिलेलें वचन सिद्धीस नेणार नाहीं; कारण, तें थट्टामध्यें दिललें आहे ३१. तस्मात्, ज्येष्ठ, उदार, कर्मनिष्ठ, स्वधर्मरक्षक आणि जगत्पालक अशा बलाढ्य रामालाच राज्याभिषेक होऊं दे ३२. पित्या दशरथराजाला सोडून जर राम वनांत गेला तर, हे देवि, लोकांमध्यें तुझी मोठी अपकीर्ति होईल ३३. ह्यास्तव, रघुवंशज रामाला आपलें राज्य करूं दे; तूं संतप्त होऊं नको. रामावांचून ह्या श्रेष्ठ नगरामध्यें वास्तव्य करणारा कोणीही पुरुष तुला अनुकूल होणार नाहीं ३४. रामानें यौवराज्याचा स्वीकार केला ह्मणजे महाधनुर्धारी दशरथराजाच पूर्वजांचें आचरण लक्ष्यांत वरून वनामध्यें प्रवेश करील " ३५. ह्याप्रमाणें मृदु व तीक्ष्ण शब्दांनीं सुमंत्रानें राजसभेमध्यें कैकयीला हात जोडून सांगून तिला क्षोभ आणण्याचा यत्न केला ३६. परंतु, त्या राजपत्नीला क्षोभ मुळींच आला नाहीं अथवा वाईटही वाटलें नाहीं. इतकेंच नव्हे परंतु, तिच्या चेहऱ्यावर कसल्याही प्रकारचा बदल दिसण्यांत आला नाहीं ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत० अयोध्याकांडापैकीं पस्तीसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३५ ॥

ततः सुमन्त्रमैक्ष्वाकः पीडितोत्र प्रतिज्ञया । सबाष्पमतिनिःश्वस्य जगादेदं पुनर्वचः १ सूत रत्नसुसंपूर्णा चतुर्विधबला चमूः । राघवस्यानुयात्रार्थं क्षिप्रं प्रतिविधीयताम् २ रूपाजीवाश्च वादिन्यो वणिजश्च महाधनाः । शोभयन्तु कुमारस्य वाहिनीः सुप्रसारिताः ३ ये चैनमुपजीवन्ति रमते यैश्च वीर्यतः । तेषां बहुविधं दत्त्वा तानप्यत्र नियोजय ४ आयुधानि च मुख्यानि नागराः शकटानि च । अनुगच्छन्तु काकुत्स्थं व्याधाश्चारण्यकोविदाः ५ निघ्नन्मृगान्कुञ्जरांश्च पिबंश्चारण्यकं मधु । नदीश्च विविधाः पश्यन्न राज्यं संस्मरिष्यति ६ धान्यकोशश्च यः कश्चिद्धनकोशश्च मामकः । तौ राममनुगच्छेतां वसन्तं निर्जने वने ७ यजन्पुण्येषु देशेषु विसृजंश्चाप्तदक्षिणाः । ऋषिभिश्चापि संगम्य प्रवत्स्यति सुखं वने ८ भरतश्च महाबाहुरयोध्यां पालयिष्यति । सर्वकामैः पुनः श्रीमान्रामः संसाध्यतामिति ९ एवं ब्रुवति काकुत्स्थे कैकेय्या भयमागतम् । मुखं चाप्यगमच्छोषं स्वरश्चापि

---

तदनंतर वचन दिलें गेलें असल्यामुळें व्याकुल झालेला इक्ष्वाकुवंशज दशरथ राजा अतिशय सुस्कारे टाकून अश्रु ढाळीत ढाळीत सुमंत्राला ह्मणाला १ " हे सूता, रामाच्या सेवेकरितां चारी प्रकारच्या सैन्यांनीं युक्त व रत्नांनीं परिपूर्ण अशी सेना लवकर रामाबरोबर पाठवा २. राजकुमाराच्या सेनांचा तळ पडला असतां वेश्या, आपल्या भाषणानें दुसऱ्याचें चित्त वेधणाऱ्या स्त्रिया आणि मोठे धनाढ्य व्यापारी त्यांना शोभा आणोत ३. जे रामावर उपजीविका करितात आणि वीर्यपरीक्षा करण्याकरितां ज्यांच्याबरोबर हा राम क्रीडा करीत असतो त्यांनाही नानाप्रकारचें द्रव्य देऊन रामाबरोबर पाठवा ४. मुख्य मुख्य आयुधें, नगरवासी लोक, गाडे आणि अरण्यांतील माहितगार पारधि ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या बरोबर जाऊं द्या ५. श्वापदांची व गजांची शिकार करीत करीत, अरण्यांतील मधाचें पान करीत करीत आणि नानाप्रकारच्या नद्या अवलोकन करीत करीत राम अरण्यांत वास्तव्य करूं लागला ह्मणजे त्याला राज्याचें स्मरण होणार नाहीं ६. जें कांहीं धान्याचें व द्रव्याचें भांडार माझें असेल तें निर्जन वनामध्यें वास्तव्य करण्याकरितां जाणाऱ्या रामाच्या मागोमाग जाऊं द्या ७. पुण्य प्रदेशांचे ठिकाणीं राम यज्ञयाग करूं लागला, शास्त्रोक्त दक्षिणा देऊं लागला आणि ऋषींना भेटूं लागला ह्मणजे वनामध्यें त्याचें वास्तव्य सुखानें होईल ८. महापराक्रमी भरत अयोध्येचें परिपालन करील; वैभवशाली रामाला सर्व भोग्य वस्तूंसहवर्तमान अरण्यांत पाठवा" ९. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न दशरथ बोलूं लागला असतां कैकेयीला भय प्राप्त झालें, तिचें तोंड कोरडें पडलें व तिच्या मुखांतून शब्दही येईनासा झाला १०.

व्यरुध्यत १० सा विषण्णा च संत्रस्ता मुखेन परिशुष्यता । राजानमेवाभिमुखी कैकेयी वाक्यमब्रवीत् ११ राज्यं गतधनं साधो पीतमण्डां सुरामिव । निरास्वाद्यतमं शून्यं भरतो नाभिपत्स्यते १२ कैकेय्यां मुक्तलज्जायां वदन्त्यामतिदारुणम् । राजा दशरथो वाक्यमुवाचायतलोचनाम् १३ वहन्तं किं तुदसि मां नियुज्य धुरि माहिते । अनार्ये कृत्यमारब्धं किं तु पूर्वमुपारुधः १४ तस्यैतत्क्रोधसंयुक्तमुक्तं श्रुत्वा वराङ्गना । कैकेयी द्विगुणं क्रुद्धा राजानमिदमब्रवीत् १५ तवैव वंशे सगरो ज्येष्ठं पुत्रमुपारुधत् । असमञ्ज इति ख्यातं तथायं गन्तुमर्हति १६ एवमुक्तो धिगित्येव राजा दशरथोब्रवीत् । व्रीडितश्च जनः सर्वः सा च तन्नावबुध्यत १७ तत्र वृद्धो महामात्रः सिद्धार्थो नाम नामतः । शुचिर्बहुमतो राज्ञः कैकेयीमिदमब्रवीत् १८ असमञ्जो गृहीत्वा तु क्रीडतः पथि दार-

---

तथापि खिन्न, त्रस्त व निस्तेज अशा मुखानें युक्त झालेली ती कैकेयी संमुख होऊन रामाला ह्मणाली ११ " सार काढून घेतलेल्या सुरप्रमाणें, धनरहित आणि ह्मणूनच ज्यांत यत्किंचितूही चव राहिली नाहीं असें शून्य राज्य भरत स्वीकारणार नाहीं " १२. ह्याप्रमाणें ती कैकेयी लाज सोडून अति भयंकर भाषण करूं लागली असतां दशरथराजा विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या कैकेयीला ह्मणाला १३ "हे अहितकारिणी स्त्रिये, तूं माझ्या मानवर जूं दिलें आहेस. परंतु, तें मी वहात असतांनाही तूं मला कशाकरितां बरें पीडा देत आहेस ? हे दुष्टे, आतां जें तूं हें कृत्य आरंभिलें आहेस तें तूं पूर्वींच कां मला सांगितलें नाहींस ? ( सारांश, भोग्य वस्तूंसहवर्तमान रामानें वनवासाला जाऊं नये असें जें आतां ह्मणत आहेस तें तूं पूर्वीं वर मागून घेतवेळींच ह्मणावयाला पाहिजे होतें. ज्याअर्थीं त्या वेळीं तूं हें मागून घेतलें नाहींस त्याअर्थीं मीं तें तुला दिलेंही नाहीं आणि ह्मणूनच रामानें भोग्य वस्तु बरोबर नेऊं नये असें ह्मणण्याचा आतां तुझा अधिकारही नाहीं)"१४. हें त्या दशरथाचें क्रोधयुक्त भाषण श्रवण केल्यावर ती श्रेष्ठ स्त्री कैकेयी दुप्पट क्रुद्ध होऊन राजाला ह्मणाली १५ "तुझ्याच वंशामध्यें सगरानें असमंज ह्मणून प्रसिद्ध असलेल्या आपल्या ज्येष्ठ पुत्राला राज्यभोगांचा प्रतिबंध केला होता. तेव्हां त्याचप्रमाणें ह्या रामानें(भोग्य वस्तु बरोबर न घेतां) वनवासांत गेलें पाहिजे " १६. ह्याप्रमाणें कैकेयी बोलली असतां " धिक्कार असो " येवढेंच दशरथ ह्मणाला व त्याच्या योगानें कैकेयीचे सर्व सेवक लज्जित झाले; परंतु, तिच्या तें गांवींही आलें नाहीं १७. त्या ठिकाणीं- पवित्र, राजाला फारच संमत आणि वृद्ध असाएक सिद्धार्थ ह्मणून प्रधान होता तो कैकेयीला ह्मणाला १८ " असमंज मार्गामध्यें

कान् । सरय्वां प्रक्षिपन्नप्सु रमते तेन दुर्मतिः १९ तं दृष्ट्वा नागराः सर्वे क्रुद्धा राजानमब्रुवन् । असमञ्जं वृणीष्वैकमस्मान्वा राष्ट्रवर्धन २० तानुवाच ततो राजा किंनिमित्तमिदं भयम् । ताश्चापि राज्ञा संपृष्टा वाक्यं प्रकृतयोऽब्रुवन् २१ क्रीडतस्त्वेष नः पुत्रान्बालानुद्भ्रान्तचेतसः । सरय्वां प्रक्षिपन्मौर्ख्यादतुलां प्रीतिमश्नुते २२ स तासां वचनं श्रुत्वा प्रकृतीनां नराधिपः । तं तत्याजाहितं पुत्रं तासां प्रियचिकीर्षया २३ तं यानं शीघ्रमारोप्य सभार्यं सपरिच्छदम् । यावज्जीवं विवास्योऽयमिति तानन्वशात्पिता २४ स फालपिटकं गृह्य गिरिदुर्गाण्यलोकयत् । दिशः सर्वास्त्वनुचरन्स यथा पापकर्मकृत् २५ इत्येनमत्यजद्राजा सगरो वै सुधार्मिकः । रामः किमकरोत्पापं येनैवमुपरुध्यते २६ न हि कंचन पश्यामो राघवस्यागुणं वयम् । दुर्लभो ह्यस्य निरयः शशाङ्कस्येव कल्मषम् २७ अथवा देवि त्वं कंचिद्दोषं पश्यसि राघवे । तमद्य ब्रूहि तत्त्वेन तदा रामो विवा-

---

खेळणाऱ्या मुलांना धरून सरयूनदींत टाकीत असे आणि अशा रीतीनें तो आपणाला करमणूक करून घेत असे. ह्यावरून तो दुष्टबुद्धि होता १९. त्याला अवलोकन करून क्रुद्ध झालेले सर्व नगरवासी लोक राजाला ह्मणाले " हे राष्ट्रवर्धना, एक असमंज तरी तूं पतकर किंवा आमचा तरी तूं स्वीकार कर " २०. ह्यावर " हें भय तुह्मांला कशाकरितां प्राप्त झालें आहे ? " असें राजानें विचारिलें असतां राजानें प्रश्न केलेले ते प्रजाजन त्याला ह्मणाले २१ " भान न राहतां आमचीं मुलें खेळूं लागलीं ह्मणजे हा सरयूनदींत त्यांना टाकून देतो आणि ह्या मूर्खपणामुळें त्याला मोठें अनुपम सुख होत असतें " २२. हें प्रजाजनांचें भाषण श्रवण केल्यावर त्यांचें प्रिय करण्याकरितां राजानें त्या आपल्या अहितकारक पुत्राचा त्याग केला २३. " त्याला भार्या आणि सामानसुमान ह्यांसहवर्तमान सत्वर गाडींत घाला आणि जन्मपर्यंत हांकून द्या " असें त्या पित्यानें त्यांना सांगितलें २४. तदनंतर वर सांगितलेलें पापकर्म करणारा तो असमंज एक फाळ व एक पेटारा ( कंदमुळें वगैरे काढून ठेवण्याकरितां ) बरोबर घेऊन पर्वतसंबंधीं गहन प्रदेशावर चारी दिशांमध्यें संचार करूं लागला आणि भक्षणाकरितां कंदमुळें पाहूं लागला २५. तात्पर्य, असा तो दुष्ट होता ह्मणून अत्यंत धार्मिक अशाही सगर राजानें त्याचा त्याग केला. परंतु, भोग्य वस्तु बरोबर नेण्याचा तूं प्रतिबंध करीत आहेस असें रामानें काय बरें पातक केलें आहे ? २६. ह्या रामाचे ठिकाणीं आह्मांला कोणताच दुर्गुण दिसत नाहीं व चंद्राचे ठिकाणीं मालिन्य जसें दुर्लभ आहे तसें ह्याचे ठिकाणीं पाप दुर्लभ आहे २७. अथवा, हे

स्यते २८ अदुष्टस्य हि संत्यागः सत्पथे निरतस्य च। निर्दहेदपि शक्रस्य द्युतिं धर्मविरोधवान् २९ तदलं देवि रामस्य श्रिया विहतया त्वया। लोकतोपि हि ते रक्ष्यः परिवादः शुभानने ३० श्रुत्वा तु सिद्धार्थवचो राजा श्रान्ततरस्वरः। शोकोपहतया वाचा कैकेयीमिदमब्रवीत् ३१ एतद्वचो नेच्छसि पापरूपे हितं न जानासि ममात्मनोथ वा। आस्थाय मार्गं कृपणं कुचेष्टा चेष्टा हि ते साधुपथादपेता ३२ अनुव्रजिष्याम्यहमद्य रामं राज्यं परित्यज्य सुखं धनं च। सर्वे च राज्ञा भरतेन च त्वं यथा सुखं भुङ्क्ष्व चिराय राज्यम् ३३ [१५४८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षट्त्रिंशः सर्गः ॥ ३६ ॥

महामात्रवचः श्रुत्वा रामो दशरथं तदा। अभ्यभाषत वाक्यं तु विनयज्ञो विनीतवत् १ त्यक्तभोगस्य मे राजन्वने वन्येन जीवतः। किं कार्यमनुयात्रेण त्यक्तसङ्गस्य सर्वतः २ यो हि दत्त्वा द्विपश्रेष्ठं कक्ष्यायां कुरुते

---

राजपत्नि, रामाचे ठिकाणीं तुला जर कांहीं दोष दिसत असेल तर तो तूं आज खरा खरा सांग; ह्मणजे रामाला हांकून देतां येईल ( रामाचे ठिकाणीं दोष आहे असें सिद्ध झाल्यावांचून त्याला हांकून देतां येणार नाहीं ) २८. सन्मार्गानें वागण्याविषयीं तत्पर आणि निर्दोष अशाचा त्याग केला असतां तो इंद्राचेंही तेज नाहींसें करील. कारण, असा त्याग धर्मविरुद्ध आहे २९. तस्मात्, हे राजपत्नि, रामाचें राज्यवैभव हाणून पाडण्यापासून तुला कांहीं एक फायदा नाहीं. तरी आतां हा अट्टहास पुरे झाला. लोकापवादाची तरी तुला लाज बाळगणें अवश्य आहे" ३०. हें सिद्धार्थ प्रधानाचें भाषण श्रवण केल्यावर शब्द फारच खोल गेलेला दशरथ राजा शोकाकुल वाणीनें कैकयीला ह्मणाला ३१ "हे पापिणि, हें सिद्धार्थप्रधानाचें ह्मणणें जर तूं न एकशील तर तुला माझें अथवा आपल्या स्वतःचेंही हित कळत नाहीं. कारण, ह्या निंद्य मार्गाचें अवलंबन करून तूं जी ही कुचेष्टारूप चेष्टा केली आहेस ती सन्मार्गाला सोडून आहे ३२. राज्य, सुख आणि धन ह्यांचा त्याग करून मी आज रामाच्या मागोमाग जाईन व अयोध्येंतील सर्व लोकहि त्याच्या मागोमाग जातील; मग तूं राजा भरतासहवर्तमान सुखास येईल त्याप्रमाणें चिरकाल राज्याचा उपभोग घे" ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं छत्तिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३६ ॥

प्रधानाचें भाषण श्रवण केल्यावर विनयज्ञ राम नम्रपणें दशरथाला ह्मणाला १ "हे राजा, भोगाचा त्याग करून व सर्वसंग परित्याग करून वनामध्यें वनांतीलच

मनः । रज्जुस्नेहेन किं तस्य त्यजतः कुञ्जरोत्तमम् ३ तथा मम सतां श्रेष्ठ किं ध्वजिन्या जगत्पते । सर्वाण्येवानुजानामि चीराण्येवानयन्तु मे ४ खनित्रपिटके चोभे समानयत गच्छत । चतुर्दश वने वासं वर्षाणि वसतो मम ५ अथ चीराणि कैकेयी स्वयमाहृत्य राघवम् । उवाच परिधत्स्वेति जनौघे निरपत्रपा ६ स चीरे पुरुषव्याघ्रः कैकेय्याः प्रतिगृह्य ते । सूक्ष्मवस्त्रमवक्षिप्य मुनिवस्त्राण्यवस्त ह ७ लक्ष्मणश्चापि तत्रैव विहाय वसने शुभे । तापसाच्छादने चैव जग्राह पितुरग्रतः ८ अथात्मपरिधानार्थं सीता कौशेयवासिनी । संप्रेक्ष्य चीरं संत्रस्ता पृषती वागुरामिव ९ सा व्यपत्रपमाणेव प्रगृह्य च सुदुर्मनाः । कैकेय्याः कुशचीरे ते जानकी शुभलक्षणा १० अश्रुसंपूर्णनेत्रा च धर्मज्ञा धर्मदर्शिनी । गन्धर्वराजप्रतिमं भर्तारमिदमब्रवीत् ११ कथं नु चीरं बध्नन्ति मुनयो वनवासिनः । इति ह्यकुशला सीता सा मुमोह मुहुर्मुहुः १२ कृत्वा कण्ठे स्म सा चीरमेकमादाय

---

अ.ह. ा.र उपजीविका करणाऱ्या मला लवाजम्याशीं काय कर्तव्य आहे? २. श्रेष्ठ गज देऊन टाकून जो त्याला बांधावयाच्या दोरीवर मन ठेवितो त्याला उत्कृष्ट गजाचा त्याग केल्यानंतर त्या दोरीशीं काय कर्तव्य असतें ? ३. त्याचप्रमाणें, हे सज्जनश्रेष्ठ जगत्पते, आतां सेनेशीं मला काय कर्तव्य आहे? सर्व कांहीं भोग्य वस्तु मी भरताला देतों. आतां मला वल्कलेंच ( कैकेयीच्या दासींनीं ) आणून द्यावीं ४. ( हे दासींनों, ) जा व वनामध्यें चवदा वर्षें वास्तव्य करण्यास सिद्ध झालेल्या मला कुदळ आणि एक पेटारा हीं दोन तुह्मी आणून द्या " ५. ( ह्याप्रमाणें रामानें दासींना सांगितल्या ) नंतर कैकेयीनें स्वतःच वल्कलें आणिलीं " आणि हीं नेस " असें यत्किंचितूही लाज न बाळगितां ती जनसमुदायामध्यें रामाला ह्मणाली ६. तेव्हां कैकेयीपासून त्या पुरुषश्रेष्ठ रामानें तीं वल्कलें घेतलीं आणि आपलीं बारीक वस्त्रें फेंकून देऊन मुनींना योग्य अशीं तीं वस्त्रें त्यानें परिधान केलीं ७. व लक्ष्मणानेंही तेथेंच आपलीं चांगलीं वस्त्रें टाकून देऊन पित्याच्या समोर तपस्वी लोकांनाच योग्य असलेल्या त्या वस्त्रांचा स्वीकार केला ८. तेव्हां पैठणी नेसलेली सीता आपल्याला नेसण्याकरितां कैकेयीनें आणून दिलेलें वल्कल पाहून, जाळें पाहिल्यावर त्रस्त होणाऱ्या हरिणीप्रमाणें, त्रस्त झाली ९. तथापि शुभ लक्षणांनीं युक्त असलेल्या त्या जनककन्येनें लज्जित झाल्यासारिखें करून व अत्यंत खिन्न होऊन कैकेयीपासून तीं वल्कलें घेतलीं १० आणि अश्रूंनीं जिचे नेत्र अगदीं भरून आले आहेत अशी ती धर्मज्ञ व धर्माकडेच नजर देऊन वागणारी सीता आपल्या गंधर्वराजतुल्य भर्त्याला ह्मणाली ११ " वनवासी मुनि वल्कल बांधितात तरी कसें ? ". असें

पाणिना । तस्थौ ह्यकुशला तत्र व्रीडिता जनकात्मजा १३ तस्यास्तत्क्षिप्रमागत्य रामो धर्मभृतां वरः । चीरं बबन्ध सीतायाः कौशेयस्योपरि स्वयम् १४ रामं प्रेक्ष्य तु सीताया बध्नन्तं चीरमुत्तमम् । अन्तःपुरचरा नार्यो मुमुचुर्वारि नेत्रजम् १५ ऊचुश्च परमायत्ता रामं ज्वलिततेजसम् । वत्स नैवं नियुक्तेयं वनवासं मनस्विनी १६ पितुर्वाक्यानुरोधेन गतस्य विजनं वनम् । तावद्दर्शनमस्या नः सफलं भवतु प्रभो १७ लक्ष्मणेन सहायेन वनं गच्छस्व पुत्रक । नेयमर्हति कल्याणी वस्तुं तापसवद्वने १८ कुरु नो याचनां पुत्र सीता तिष्ठतु भामिनी । धर्मनित्यः स्वयं स्थातुं न हीदानीं त्वमिच्छसि १९ तासामेवंविधा वाचः शृण्वन्दशरथात्मजः । बबन्धैव तथा चीरं सीतया तुल्यशीलया २० चीरे गृहीते तु तया सबाष्पो नृपतेर्गुरुः । निवार्य सीतां कैकेयीं वसिष्ठो वाक्यमब्रवीत् २१ अतिप्रवृत्ते दुर्मेधे कैकेयि कुलपांसनि । वञ्चयित्वा तु राजानं न

---

ह्मणून वल्कल बांधण्याविषयीं अनभिज्ञ असलेली ती सीता वारंवार गोंधळूं लागली १२. शेंवटीं एक वल्कल गळ्यांत अडकवून आणि एक हातांत घेऊन ती अडाणी जनककन्या लज्जित होऊन तेथें उभी राहिली १३. तेव्हां धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ असलेला राम सत्वर तिच्या समीप आला आणि सीतेच्या पैठणीवर त्यानें स्वतः तें वल्कल बांधिलें १४. परंतु, तें उत्कृष्ट वल्कल सीतेला राम नेसवीत आहे असें अवलोकन करून अंतःपुरांतील स्त्रियांनीं आपल्या डोळ्यांतून पाणी काढिलें १५ आणि अत्यंत खिन्न होऊन त्या स्त्रिया उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या रामाला ह्मणाल्या " हे वत्सा, तुझ्याप्रमाणें ही विचारी स्त्री वनवासांत जाण्याचें ठरलेलें नाहीं १६. पित्याच्या आज्ञेला अनुसरून तूं निर्जन वनामध्यें गेल्यावर परत येईपर्यंत हिचें तरी दर्शन आह्मांला घडूं दे आणि, हे प्रभो, अशा रीतीनें आमचें जीवित सफल होऊं दे १७. हे पुत्रा, लक्ष्मणालाच बरोबर घेऊन तूं वनांत जा. तापसाप्रमाणें ह्या कल्याणीनें वनामध्यें वास्तव्य करणें उचित नाहीं १८. हे पुत्रा, हें आमचें मागणें ऐक. सीता स्त्री येथें राहूं दे. तूं नेहमीं धर्मानें वागणारा असल्यामुळें जरी सांप्रत येथें राहण्याची इच्छा करीत नसलास तरी हिला आपली येथें राहूं दे"१९. अशा प्रकारची त्यांचीं भाषणें ऐकत असतांना त्या दशरथपुत्र रामानें आपल्यासारिखाच जिचा स्वभाव आहे अशा सीतेला वर सांगितल्याप्रमाणें वल्कल नेसविविलेंच २०. तेव्हां सीतेनें वल्कलें नेसल्यावर अश्रूंनीं नेत्र भरून आलेले राजगुरु वसिष्ठ वनवासांत जाण्याविषयीं सीतेचा निरोध करून कैकेयीला ह्मणाले २१ "हे अतिफाजील कैकेयि, हे दुष्टे, हे कुलकलंकिनि, राजाला फसवूनही तूं आतां सुद्धां प्रामाणिकपणानें वागत नाहींस,

प्रमाणेवतिष्ठसि २२ न गन्तव्यं वनं देव्या सीतया शीलवर्जिते । अनुष्ठास्यति रामस्य सीता प्रकृतमासनम् २३ आत्मा हि दाराः सर्वेषां दारसंग्रहवर्तिनाम् । आत्मेयमिति रामस्य पालयिष्यति मेदिनीम् २४ अथ यास्यति वैदेही वनं रामेण संगता । वयमत्रानुयास्यामः पुरं चेदं गमिष्यति २५ अन्तपालाश्च यास्यन्ति सदारो यत्र राघवः । सहोपजीव्यं राष्ट्रं च पुरं च सपरिच्छदम् २६ भरतश्च सशत्रुघ्नश्चीरवासा वनेचरः । वने वसन्तं काकुत्स्थमनुवत्स्यति पूर्वजम् २७ ततः शून्यां गतजनां वसुधां पादपैः सह । त्वमेका शाधि दुर्वृत्ता प्रजानामहिते स्थिता २८ न हि तद्भविता राष्ट्रं यत्र रामो न भूपतिः । तद्वनं भविता राष्ट्रं यत्र रामो निवत्स्यति २९ न ह्यदत्तां महीं पित्रा भरतः शास्तुमिच्छति । त्वयि वा पुत्रवद्वस्तुं यदि जातो महीपतेः ३० यद्यपि त्वं क्षितितलाद्गगनं चोत्पतिष्यसि । पितृवंशचरित्रज्ञः सोऽन्यथा न करिष्यति ३१ तत्त्वया पुत्रगर्धिन्या पुत्रस्य कृतमप्रियम् । लोके न हि स

---

( सीतेला वनवासांत पाठविण्याविषयीं तूं जर राजापाशीं मागणें मागितलेंच नाहींस तर आतां तिच्यापुढें वल्कलें आणणें तुला उचित नाहीं ) २२. हे सच्छीलशून्य कैकयि, सीता देवी वनांत जाणार नाहीं. रामाला प्रस्तुत प्राप्त होणारें जें सिंहासन त्याचा हीच स्वीकार ( करून राम येईपर्यंत राज्य ) करील २३. सर्व गृहस्थाश्रमी पुरुषांचा स्त्री हा आत्मा आहे. तेव्हां ही रामाचा आत्माच असल्यामुळें ( तो परत येईपर्यंत ) पृथ्वीचें परिपालन करील २४. आतां ( तुझ्या दुराग्रहामुळें ) सीता जर रामाबरोबर वनांत जाणारच असेल तर आम्हीही त्याच्या मागोमाग जाऊं व हें सर्व नगरही जाईल २५. अंतःपुराचें रक्षकही जिकडे राम भार्येसहवर्तमान जाईल तिकडे जातील आणि धन व सामानसुमान बरोबर घेऊन हें नगर व सर्व राष्ट्रही त्याच्या मागोमाग जाईल २६. इतकेंच नव्हे परंतु, ज्येष्ठ भ्राता राम वनामध्यें वास्तव्य करूं लागला असतां भरतही शत्रुघ्नासहवर्तमान वल्कलें परिधान करून वनचर बनेल आणि रामापाशीं राहील २७. नंतर प्रजाजनांच्या वाईटावर असलेली तूं एकटी दुराचारिणी शून्य आणि निर्जन अशा पृथ्वीवर व पृथ्वीवरील वृक्षांवर आपला अंमल चालीव २८. ज्या ठिकाणीं राम राजा नाहीं तें राष्ट्रच होणार नाहीं व ज्या ठिकाणीं राम वास्तव्य करील तें वनच राष्ट्र होईल २९. भरत जर खरोखरी दशरथराजापासूनच झालेला असेल तर पित्यानें न दिलेल्या पृथ्वीचें राज्य तो इच्छिणार नाहीं किंवा पुत्राप्रमाणें तुझ्यासमीप राहण्याचेंही त्याच्या मनांत येणार नाहीं ३०. (फार कशाला) तूं ह्या भूतलावरून जरी आकाशांत उडून गेलीस तरी पितृवंशांतील आचार जाणणारा तो भरत असें भलतेंच

विद्येत यो न राममनुव्रतः ३२ द्रक्ष्यस्यद्यैव कैकेयि पशुव्यालमृगद्विजान् । गच्छतः सह रामेण पादपांश्च तदुन्मुखान् ३३ अथोत्तमान्याभरणानि देवि देहि स्नुषायै व्यपनीय चीरम् । न चीरमस्याः प्रविधीयतेति न्यवारयत्तद्वसनं वसिष्ठः ३४ एकस्य रामस्य वने निवासस्त्वया वृतः केकयराजपुत्रि । विभूषितेयं प्रतिकर्मनित्या वसत्वरण्ये सह राघवेण ३५ यानैश्च मुख्यैः परिचारकैश्च सुसंवृता गच्छतु राजपुत्री । वस्त्रैश्च सर्वैः सहितैर्विधानैर्नेयं वृता ते वरसंप्रदाने ३६ तस्मिंस्तथा जल्पति विप्रमुख्ये गुरौ नृपस्याप्रतिमप्रभावे । नैव स्म सीता विनिवृत्तभावा प्रियस्य भर्तुः प्रतिकारकामा ३७ [ १५८५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे सप्तत्रिंशः सर्गः ॥ ३७ ॥

तस्यां चीरं वसानायां नाथवत्यामनाथवत् । प्रचुक्रोश जनः सर्वो

---

करणार नाहीं ३१. तस्मात्, पुत्राला राज्य प्राप्त होण्याचा अभिलाष धरून तूं खरोखर पुत्राला अप्रिय असलेलीच गोष्ट केली आहेस. कारण, रामाला अनुसरून न वागणारा असा जगतांतही कोणीही नाहीं ( मग रामाला सोडून भरत कसा राज्य करणार? )३२. हे कैकेयि, पशु, सर्प, मृग व पक्षी हे रामाबरोबर जातांना तूं आजच पहाशील; इतकेंच नव्हे परंतु, वृक्षही त्याच्याबरोबर जाण्याकरितां उत्सुक आहेत असें तुझ्या दृष्टोत्पत्तीस येईल. ( मग मनुष्यांची तर गोष्ट कशाला पाहिजे ! ) ३३. करितां, हे राजपत्नि, तें वल्कल पलीकडे करून तूं आपल्या स्नुषेला उत्कृष्ट भूषणें दे. हिला वल्कल देणें योग्य नाहीं ". असें ह्मणून वसिष्ठांनीं सीतेला तें वल्कल परिधान करण्याचा प्रतिबंध केला ३४. ( आणि पुनरपि ते ह्मणाले ) " हे केकयराजकन्ये, एका रामालाच वनवास तूं मागून घतला आहेस. ह्यास्तव, नेहमीं अलंकार धारण करणाऱ्या ह्या सीतेला भूषित होऊन अरण्यामध्यें रामाबरोबर वास्तव्य करूं दे ३५. सारांश, उत्कृष्ट उत्कृष्ट वाहनें, सेवक, सर्वप्रकारचीं वस्त्रें आणि सामानसुमान बरोबर घेऊन ही राजकन्या चांगल्या बंदोबस्तानें जाऊं दे. कारण, वरप्रदानसमयीं तूं हिच्याविषयीं मागणी केलेली नाहींस " ३६. ह्याप्रमाणें अनुपम प्रभावानें युक्त असलेले ते द्विजश्रेष्ठ राजगुरु वसिष्ठ जरी बोलत होते तरी आपल्या प्रिय भर्त्याप्रमाणेंच अवस्था प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या त्या सीतेनें वल्कलें परिधान करण्यापासून आपलें मन परावृत्त केलें नाहीं ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सदतिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ३७ ॥

ती सीता सनाथ असूनही अनाथाप्रमाणें वल्कल परिधान करूं लागली असतां सर्व

धिक्त्वां दशरथं त्विति १ तेन तत्र प्रणादेन दुःखितः स महीपतिः । स निःश्वस्योष्णमैक्ष्वाकस्तां भार्यामिदमब्रवीत् २ सुकुमारी च बाला च सततं च सुखोचिता । नेयं वनस्य योग्येति सत्यमाह गुरुर्मम ३ इयं हि कस्यापकरोति किंचित्तपस्विनी राजवरस्य पुत्री । या चीरमासाद्य वनस्य मध्ये जाता विसंज्ञा श्रमणीव काचित् ४ चीराण्यपास्याज्जनकस्य कन्या नेयं प्रतिज्ञा मम दत्तपूर्वा । यथासुखं गच्छतु राजपुत्री वनं समग्रा सह सर्वरत्नैः ५ अजीवनार्हेण मया नृशंसा कृता प्रतिज्ञा नियमेन तावत् । त्वया हि बाल्यात्प्रतिपन्नमेतत्तन्मा दहेद्वेणुमिवात्मपुष्पम् ६ रामेण यदि ते पापे किंचित्कृतमशोभनम् । अपकारः क इह ते वैदेह्या दर्शितोधमे ७ मृगीवोत्फुल्लनयना मृदुशीला मनस्विनी । अपकारं कमिव ते करोति जनकात्मजा ८ ननु पर्याप्तमेवं ते पापे रामविवासनम् । किमेभिः कृपणैर्भूयः पातकैरपि ते कृतैः ९ प्रतिज्ञातं मया तावत्त्वयोक्तं देवि शृण्वता । रामं

---

लोक " हे दशरथा, तुला धिक्कार असो " असें ह्मणाले १. तेव्हां आक्रोशानें तो भूपति ( अधिकच ) दुःखित झाला आणि उष्ण श्वास टाकून तो इक्ष्वाकुवंशज दशरथ त्या भार्येला ह्मणाला २ " ही सुकुमार व बाला असून नेहमीं हिला सुखांत रहाण्याची संवय आहे. तेव्हां हिनें वनांत जाणें योग्य नाहीं असें जें माझ्या गुरूंनीं सांगितलें आहे तें सत्य आहे ३. एकाद्या अपरिचित भिकारणीप्रमाणें वल्कल परिधान करून वनामध्यें जाण्यास निघालेली ही बिचारी नृपश्रेष्ठ जनकराजाची कन्या कोणाला कांहीं तरी ( अपकार ) करीत आहे काय ४ ? जनककन्येनें वल्कलें टाकून द्यावीं. कारण, ही प्रतिज्ञा मीं पूर्वीं केलेली नाहीं. ह्यास्तव, सर्व रत्नें बरोबर घेऊन ही राजकन्या भरलेलीच खुशाल वनामध्यें जाऊं द्या ५. ( रामाला वनवासांत पाठवीन ) येवढीच दुष्ट प्रतिज्ञा मीं मुमूर्षु होऊन शपथपूर्वक केलेली आहे. परंतु, ( सीतेला वल्कलें परिधान करण्यास लावणें ) हें तूं मूर्खपणामुळें आरंभिलें आहेस. करितां, स्वतःचें पुष्प ज्याप्रमाणें वेळूचा नाश करून टाकितें त्याप्रमाणें तूं आरंभिलेलें हें कृत्य तुला दग्ध न करो ह्मणजे झालें ६. हे पापिणि,हे अधमकैकेयि, रामानें जरी कांहीं तुझा अपराध केला असला तरी, सीतेनें येथें तुला काय अपकार केला आहे ? ७ हरिणीप्रमाणें स्वभावानें गरीब आणि प्रफुल्लित नेत्रकमलांनीं युक्त असलेली ही बिचारी जनककन्या तुला काय बरें अपकार करीत आहे ? ८. हे दुष्टे, ह्याप्रमाणें तूं रामाला वनवासांत हाकून दिलेस हें खरोखर ( संपूर्ण नरकांचा अनुभव घेण्यास ) पुरेसें आहे. मग आणखी ही अनिर्वाच्य दुःखदायक पातकें करून तुला काय प्राप्त करून घ्यावयाचें आहे? ९.

यदभिषेकाय त्वमिहागतमब्रवीः १० तत्त्वेतत्समतिक्रम्य निरयं गन्तुमिच्छसि । मैथिलीमपि या हि त्वमीक्षसे चीरवासिनीम् ११ एवं ब्रुवन्तं पितरं रामः संप्रस्थितो वनम् । अवाक्शिरसमासीनमिदं वचनमब्रवीत् १२ इयं धार्मिक कौसल्या मम माता यशस्विनी । वृद्धा चाक्षुद्रशीला च न च त्वां देव गर्हते १३ मया विहीनां वरद प्रपन्नां शोकसागरम् । अदृष्टपूर्वव्यसनां भूयः संमन्तुमर्हसि १४ इमां महेन्द्रोपमजातगर्धिनीं तथा-विधातुं जननीं ममार्हसि । यथा वनस्थे मयि शोककर्शिता न जीवितं न्यस्य यमक्षयं व्रजेत् १५ [ १६०० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टत्रिंशः सर्गः ॥ ३८ ॥

रामस्य तु वचः श्रुत्वा मुनिवेषधरं च तम् । समीक्ष्य सह भार्याभी राजा विगतचेतनः १ नैनं दुःखेन संतप्तः प्रत्यवेक्षत राघवम् । न चैनमभिसंप्रेक्ष्य प्रत्यभाषत दुर्मनाः २ स मुहूर्तमिवासंज्ञो दुःखितश्च मही-

---

हे देवि, अभिषेकाकरितां राम येथें आला असतां तूं जें त्याला बोललीस तें मीं ऐकून घेऊन तेवढ्यालाच अनुमति दिलेली आहे ( सीतेच्या संबंधानें मीं तुला कसल्याही प्रकारचें वचन दिलेलें नाहीं ) १०. परंतु, स्वतः जें तूं मागितलेंस त्याचाही अतिप्रसंग करून तूं नरकांत जाण्याची इच्छा करीत आहेस. कारण, सीतेलाही वल्कलें परिधान केलेली पहाण्याची तुझी इच्छा आहे" ११. ह्याप्रमाणें खालीं मान घालून बसलेला पिता दशरथ कैकेयीला बोलत असतांना वनामध्यें निघालेला राम त्याला ह्मणाला १२ " हे धर्मनिष्ठ भूपते, ही माझी माता यशस्विनी कौसल्या वृद्ध असून क्षुद्र स्वभावाची नाहीं व तुह्मांलाही नांव ठेवीत नाहीं १३. ह्यास्तव, हे वरप्रद, माझा वियोग झाल्यामुळें शोकसागरांत बुडून जाऊन आजपर्यंत कधींही न अनुभवलेल्या दुःखांत सांपडलेल्या हिच्याकडे आपण जरा अधिक लक्ष्य देत जा १४. सारांश, हे महेंद्रतुल्य भूपते, मी वनांत गेल्यानंतर ही माझी माता शोकानें कृश झाल्यामुळें जीविताचा त्याग करून यमसदनाला न जाईल अशा रीतीनें आपण मला पहाण्याविषयीं अभिलाष उत्पन्न झालेल्या ह्या मातेची व्यवस्था ठेवा १५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मिकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अडतिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३८ ॥

रामाचें भाषण श्रवण करून आणि त्याला मुनिवेष धारण केलेला पाहून भार्यांसहवर्तमान दशरथराजा मूर्छित झाला १. अशाप्रकारें दुःखानें संतप्त झाल्यामुळें रामाकडे कांहीं वेळ तो पाहीनासा झाला व कांहीं वेळानें पाहूं लागल्यावरही मनामध्यें खिन्न झाल्यामुळें त्याच्याशीं त्या दशरथाला कांहीं एक बोलवेना २. अशाप्रकारें सुमारें

पतिः । विललाप महाबाहू राममेवानुचिन्तयन् ३ मन्ये खलु मया पूर्वं विवत्सा बहवः कृताः । प्राणिनो हिंसिता वापि तन्मामिदमुपस्थितम् ४ न त्वेवानागते काले देहाच्च्यवति जीवितम् । कैकेय्या क्लिश्यमानस्य मृत्युर्मम न विद्यते ५ योऽहं पावकसंकाशं पश्यामि पुरतः स्थितम् । विहाय वसने सूक्ष्मे तापसाच्छादमात्मजम् ६ एकस्याः खलु कैकेय्याः कृतेयं क्लिश्यते जनः । स्वार्थे प्रयतमानायाः संश्रित्य निकृतिं त्विमाम् ७ एवमुक्त्वा तु वचनं बाष्पेण विहतेन्द्रियः । रामेति सकृदेवोक्त्वा व्याहर्तुं न शशाक सः ८ संज्ञां तु प्रतिलभ्यैव मुहूर्तात्स महीपतिः । नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां सुमन्त्रमिदमब्रवीत् ९ औपवाह्यं रथं युक्त्वा त्वमायाहि हयोत्तमैः । प्रापयैनं महाभागमितो जनपदात्परम् १० एवं मन्ये गुणवतां गुणानां फलमुच्यते । पित्रा मात्रा च यत्साधुर्वीरो निर्वास्यते वनम् ११ राज्ञो वचनमाज्ञाय सुमन्त्रः शीघ्रविक्रमः । योजयित्वा ययौ तत्र रथमश्वैरलंकृतम् १२ तं रथं राजपुत्राय सूतः कनकभूषितम् । आचचक्षेऽञ्जलिं कृत्वा

---

मुहूर्तभर मूर्छित झाल्यानंतर दुःखित झालेला तो महापराक्रमी दशरथराजा रामाचेंच चिंतन करून विलाप करूं लागला कीं ३, " खरोखर पूर्वी मीं पुष्कळांना पुत्रहीन केलेले आहेत किंवा पुष्कळच प्राण्यांची मीं हिंसाही केलेली आहे ह्मणून मला आतां हें (दुःख) प्राप्त झालें आहे ४. कैकेयी क्लेश देत असतांनाही ज्याअर्थी मला मृत्यु येत नाहीं त्याअर्थी वेळ आल्यावांचून देहांतून जीव जातच नाहीं (हें सत्य आहे) ५. तेजानें अग्नितुल्य असा आपला पुत्र सूक्ष्म वस्त्रांचा त्याग करून तपस्व्यांनाच योग्य अशा वस्त्रांनीं आच्छादित होऊन पुढें उभा असलेला मी पहात आहें ६. ह्या कपटाचा आश्रय करून स्वार्थ साधण्याविषयीं धडपडणाऱ्या एका कैकेयीमुळें हे सर्व लोक दुःखित झाले आहेत " ७. ह्याप्रमाणें बोलल्यानंतर अश्रूंच्या योगानें ( कंठ दाटून आल्यामुळें ) जिव्हा हलेनाशी झाली. तेव्हां " राम " असें एकदांच उच्चारिल्यावर त्याच्या तोंडांतून शब्द निघेनासा झाला ८. तदनंतर एका मुहूर्तानें सावध झाल्यावर अश्रूंनीं नेत्र भरून आलेला तो दशरथराजा सुमंत्राला ह्मणाला ९ " फिरावयाला जाण्याच्या रथाला उत्कृष्ट अश्व जोडून तूं इकडे ये आणि ह्या महाभाग्यवान् रामाला ह्या देशांच्या पलीकडे नेऊन पोंचीव १०. सुशील आणि वीर अशा पुत्राला ज्याअर्थी मातापितर वनांत हांकून देत आहेत त्याअर्थी गुणी लोकांमध्यें माझ्या गुणांचें फल ह्मणजे ह्याप्रमाणें पुत्राला हांकून देणें हेंच ठरणार " ११. राजाची आज्ञा समजून घेऊन सुमंत्र तेथून सत्वर चालता झाला आणि अलंकार युक्त अशा रथाला अश्व जोडून तो तेथें घेऊन

युक्तं परमवाजिभिः १३ राजा सत्वरमाहूय व्यापृतं वित्तसंचये । उवाच देशकालज्ञो निश्चितं सर्वतः शुचिः १४ वासांसि च वरार्हाणि भूषणानि महान्ति च । वर्षाण्येतानि संख्याय वैदेह्याः क्षिप्रमानय १५ नरेन्द्रेणैवमुक्तस्तु गत्वा कोशगृहं ततः । प्रायच्छत्सर्वमाहृत्य सीतायै क्षिप्रमेव तत् १६ सा सुजाता सुजातानि वैदेही प्रस्थिता वनम् । भूषयामास गात्राणि तैर्विचित्रैर्विभूषणैः १७ व्यराजयत वैदेही वेश्म तत्सुविभूषिता । उद्यतोंऽशुमतः काले खं प्रभेव विवस्वतः १८ तां भुजाभ्यां परिष्वज्य श्वश्रूर्वचनमब्रवीत् । अनाचरन्ती कृपणं मूर्ध्न्युपाघ्राय मैथिलीम् १९ असत्यः सर्वलोकेऽस्मिन्सततं सत्कृताः प्रियैः । भर्तारं नाभिमन्यन्ते विनिपातगतं स्त्रियः २० एष स्वभावो नारीणामनुभूय पुरा सुखम् । अल्पामप्यापदं प्राप्य दुष्यन्ति प्रजहत्यपि २१ असत्यशीला विकृता दुर्गा अहृ-

---

आला १२. नंतर " राजकुमाराकरितां सुवर्णभूषित रथ उत्कृष्ट अश्व जोडून तयार आहे " असें हात जोडून त्या सारथ्यानें सांगितलें असतां १३ काल व देश जाणणारा व सर्वप्रकारें शुचिर्भूत असलेला दशरथराजा धनाध्यक्षाला सत्वर हाक मारून निश्चयानें ह्मणाला १४ " उत्कृष्ट उत्कृष्ट वस्त्रें आणि मोठमोठीं भूषणें ह्या ( वनवासविषयक ) वर्षांची गणना करून तूं सीतेला सत्वर आणून दे " १५. ह्याप्रमाणें राजाची आज्ञा झाल्यावर धनाध्यक्ष खजिन्यामध्यें गेला आणि राजाच्या आज्ञेप्रमाणें सर्व आणून त्यानें तें सत्वर सीतेला दिलें १६. तेव्हां वनांत जाण्याला निघालेल्या अयोनिसंभव सीतेनें त्या विचित्र भूषणांच्या योगानें सामुद्रिक शास्त्रोक्त लक्षणांनीं युक्त असलेले आपले अवयव भूषित केले १७ आणि किरणांनीं युक्त असलेला सूर्य उदय पावूं लागला असतां त्याची प्रभा ज्याप्रमाणें आकाशाला शोभा आणिते त्याप्रमाणें उत्कृष्टप्रकारें अलंकृत झालेल्या सीतेनें त्या घराला शोभा आणिली १८. तेव्हां कधींही हलकें कृत्य न करणाऱ्या सीतेचें मस्तकीं अवघ्राण करून व तिला बाहूंनीं कवटाळून धरून सासू कौसल्या तिला ह्मणाली १९ " नेहमीं प्रियवस्तु देऊन सत्कार केलेल्याही ज्या स्त्रिया संकटांत सांपडलेल्या भर्त्याची शुश्रूषा करण्याचें मनामध्यें आणीत नाहींत त्यांची सर्व लोकांमध्यें असतीत्वानेंच गणना होत असते २०. पूर्वी सुखाचा अनुभव घेऊन पुढें थोडी जरी विपत्ति भोगण्याचा प्रसंग आला तरी भर्त्याला दूषण देण्यात इतकेंच नव्हे परंतु, त्याचा त्याग करण्यासही प्रवृत्त होणें हा ( दुष्ट ) स्त्रियांचा स्वभावच आहे २१. जारिणी स्त्रियांचें असत्य भाषण हेंच शील असून उन्मार्गाला जाणें हा त्यांचा स्वभावच आहे. भर्त्याचे ठिकाणीं त्यांचें कधींच खरें प्रेम

दयाः सदा । असत्यः पापसंकल्पाः क्षणमात्रविरागिणः २२ न कुलं न कृतं विद्या न दत्तं नापि संग्रहः । स्त्रीणां गृह्णाति हृदयमनित्यहृदया हिताः २३ साध्वीनां तु स्थितानां तु शीले सत्ये श्रुते स्थिते । स्त्रीणां पवित्रं परमं पतिरेको विशिष्यते २४ स त्वया नावमन्तव्यः पुत्रः प्रव्राजितो वनम् । तव दैवसमस्त्वेष निर्धनः सधनोऽपि वा २५ विज्ञाय वचनं सीता तस्या धर्मार्थसंहितम् । कृताञ्जलिरुवाचेदं श्वश्रूमभिमुखे स्थिता २६ करिष्ये सर्वमेवाहमार्या यदनुशास्ति माम् । अभिज्ञास्मि यथा भर्तुर्वर्तितव्यं श्रुतं च मे २७ न मामसज्जनेनार्या समानयितुमर्हति । धर्माद्विचलितुं नाहमलं चन्द्रादिव प्रभा २८ नातन्त्री विद्यते वीणा नाचक्रो विद्यते रथः । नापतिः सुखमेधेत या स्यादपि शतात्मजा २९ मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितं सुतः । अमितस्य तु दातारं भर्तारं का न पूजयेत् ३० साहमेवंगता श्रेष्ठा श्रुतधर्मपरावरा । आर्ये किमवमन्येयं स्त्रिया भर्ता हि

---

नसतें; पाप करण्याविषयीं त्यांची इच्छा असते आणि क्षणमात्र प्रेम करणाऱ्या त्या स्त्रिया नेहमीं विकृतच असतात २२. कुल, उपकार, धर्माचा उपदेश, दान आणि बंधन ह्यांपैकीं कांहींहीं दुष्ट स्त्रियांचें हृदय पापप्रवृत्तीपासून परावृत्त करण्यास समर्थ होत नाहीं. कारण, त्यांचें चित्त अव्यवस्थित असतें २३. सदाचरण, सत्य वचन, गुरुजनांचा उपदेश आणि मर्यादा ह्यांनाच अनुसरून वागणाऱ्या पतिव्रता स्त्रियांचें पति हाच उत्कृष्ट पुण्यसाधन आहे आणि ह्मणूनच स्त्रीला इतर सर्व पुण्यसाधनांपेक्षां पति अधिक आहे २४. तस्मात्, वनांत घालविलेल्या त्या माझ्या पुत्राचा तूं कधीं अवमान करूं नको. हा निर्धन असो अथवा सधन असो तुला देवतुल्य आहे" २५. हें धर्म व अर्थ ह्यांनीं भरलेलें त्या कौसल्येचें भाषण श्रवण केल्यावर संमुख उभी असलेली सीता हात जोडून आपल्या सासूला ह्मणाली २६ " सासूबाई जो मला उपदेश करीत आहेत तें सर्व कांहीं मी करीन. भर्त्याशीं कसें वागावें ह्याविषयीं मी अभिज्ञ आहे आणि मातापितरांपासूनही मीं तें ऐकून ठेविलेलें आहे २७. सासूबाईंनीं दुष्ट स्त्रीशीं माझी बरोबरी करूं नये. कारण, चंद्रापासून जशी प्रभा दूर होण्यास समर्थ नाहीं तशी धर्मापासून चलित होण्यास मी समर्थ नाहीं २८. ज्याप्रमाणें तारेवांचून वीणा ध्वनि उत्पन्न करण्यास समर्थ होत नाहीं अथवा ज्याप्रमाणें रथ चाकावांचून गमन करण्यास समर्थ होत नाहीं त्याचप्रमाणें शंभर पुत्रही असले तरी स्त्रीला पतीवांचून सुख होत नाहीं २९. पिता, भ्राता आणि पुत्र हे सर्व क्षणिक सुख देणारे आहेत. तेव्हां अपरिमित सुख देणाऱ्या भर्त्याचा मान कोण बरें राखणार नाहीं !! ३०.

दैवतम् ३१ सीताया वचनं श्रुत्वा कौसल्या हृदयंगमम् । शुद्धसत्त्वा मुमोचाश्रु सहसा दुःखहर्षजम् ३२ तां प्राञ्जलिरभिप्रेक्ष्य मातृमध्येऽतिसत्कृताम् । रामः परमधर्मात्मा मातरं वाक्यमब्रवीत् ३३ अम्ब मा दुःखिता भूत्वा पश्येस्त्वं पितरं मम । क्षयोऽपि वनवासस्य क्षिप्रमेव भविष्यति ३४ सुप्तायास्ते गमिष्यन्ति नव वर्षाणि पञ्च च । समग्रमिह संप्राप्तं मां द्रक्ष्यसि सुहृद्वृतम् ३५ एतावदभिनीतार्थमुक्त्वा स जननीं वचः । त्रयः शतशतार्धा हि ददर्शावेक्ष्य मातरः ३६ ताश्चापि स तथैवार्ता मातृर्दशरथात्मजः । धर्मयुक्तमिदं वाक्यं निजगाद कृताञ्जलिः ३७ संवासात्परुषं किंचिदज्ञानादपि यत्कृतम् । तन्मे समुपजानीत सर्वाश्चामन्त्रयामि वः ३८ वचनं राघस्यैतद्धर्मयुक्तं समाहितम् । शुश्रुवुस्ताः स्त्रियः सर्वाः शोकोपहतचेतसः ३९ जज्ञेऽथ तासां सन्नादः क्रौञ्चीनामिव निःस्वनः । मानवेन्द्रस्य भार्याणामेवं वदति राघवे ४० मुरजपणवमेघघोषवद्दशरथवेश्म बभूव यत्पुरा । विलपि-

---

ह्यास्तव, अहो सासूबाई, अशाप्रकारें मी ज्ञानसंपन्न, श्रेष्ठ व स्थूल आणि सूक्ष्म धर्म श्रवण केलेली असतांना पतीचा कसा बरें अवमान करीन? अहो, भर्ता हें स्त्रीचें दैवत आहे " ३१. ह्याप्रमाणें सीतेचें तें मनोवेधक भाषण श्रवण केल्यावर शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेली कौसल्या एकाएकीं हर्षमिश्रित दुःखजन्य अश्रु ढाळूं लागली ३२. तेव्हां मातांमध्यें जिचा अतिशय सत्कार होत आहे अशा कौसल्यामातेकडे पाहून तो परमधर्मात्मा राम हात जोडून तिला ह्मणाला ३३ " हे माते, तूं दुःखित होऊं नको; माझ्या पित्याकडे तुझें लक्ष्य असूं दे; माझा वनवास लवकरच संपून जाईल ३४. चवदा वर्षे हीं अगदीं झोंपेंतील चवदा घटिकांप्रमाणें सत्वर निघून जातील आणि सुहृदांनीं परिवेष्टित असा मी पुनरपि भ्राता व भार्या ह्यांसहवर्तमान येथें आलेला लवकरच तूं पहाशील " ३५. ह्याप्रमाणें मातेशीं निश्चित अर्थाचें भाषण करून आपल्या साडेतीनशें मातांचें रामानें वेगळें वेगळें दर्शन घेतलें ३६; आणि कौसल्येप्रमाणेंच दुःखित झालेल्या त्या मातांना उद्देशून त्या दशरथपुत्र रामानें हात जोडून धर्मानें युक्त असलेलें भाषण केलें ३७. ( तो ह्मणाला ) " सहवासामुळें मीं जें कांहीं कठोर भाषण तुमच्याशीं केलें असेल अथवा अज्ञानामुळें जें कांहीं घोर कृत्य माझ्या हातून झालें असेल त्याची तुह्मी क्षमा करा; मी तुह्मां सर्वांचा आतां निरोप घेतों " ३८. हें रामाचें धर्मयुक्त व गंभीर भाषण त्या स्त्रियांनीं श्रवण केलें तेव्हां त्या सर्व स्त्रियांचें अंतःकरण शोकानें घेरून टाकिलें ३९ आणि ह्याप्रमाणें राम बोलूं लागला असतां दशरथराजाच्या त्या भार्यांमध्यें क्रौंच पक्षिणींच्या ध्वनीप्रमाणें शोकध्वनि उत्पन्न

तपरिदेवनाकुलं व्यसनगतं तदभूत्सुदुःखितम् ४१ [१६४१]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे एकोनचत्वारिंशः सर्गः॥ ३९॥

अथ रामश्च सीता च लक्ष्मणश्च कृताञ्जलिः । उपसंगृह्य राजानं चक्रुर्दीनाः प्रदक्षिणम् १ तं चापि समनुज्ञाप्य धर्मज्ञः सह सीतया । राघवः शोकसंमूढो जननीमभ्यवादयत् २ अन्वक्षं लक्ष्मणो भ्रातुः कौसल्यामभ्यवादयत् । अपि मातुः सुमित्राया जग्राह चरणौ पुनः ३ तं वन्दमानं रुदती माता सौमित्रिमब्रवीत् । हितकामा महाबाहुं मूर्ध्न्युपाघ्राय लक्ष्मणम् ४ सृष्टस्त्वं वनवासाय स्वनुरक्तः सुहृज्जने । रामे प्रमादं मा कार्षीः पुत्र भ्रातरि गच्छति ५ व्यसनी वा समृद्धो वा गतिरेष तवानघ । एष लोके सतां धर्मो यज्ज्येष्ठवशगो भवेत् ६ इदं हि वृत्तमुचितं कुलस्यास्य सनातनम् । दानं दीक्षा च यज्ञेषु तनुत्यागो मृधेषु हि ७ लक्ष्मणं त्वेवमुक्त्वासौ संसिद्धं प्रियराघवम् । सुमित्रा गच्छ गच्छेति

---

झाला ४० आणि मुरज, पणव व मेघ ह्या वाद्यांच्या ध्वनींनीं जें दशरथाचें ग्रह पूर्वी युक्त होतें तें विलाप आणि रोदन ह्यांनीं व्याप्त, संकटांत सांपडलेलें आणि अत्यंत दुःखित असें झालें ४१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मिकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥ ३९ ॥

तदनंतर राम, सीता आणि लक्ष्मण ह्यांनीं हात जोडिले आणि दीन झालेल्या ह्या त्रिवर्गांनीं राजाच्या पायावर मस्तक ठेवून त्याला प्रदक्षिणा केली १. नंतर पित्याची अनुज्ञा घेऊन शोकाकुल झालेल्या त्या धर्मज्ञ रामानें सीतेसहवर्तमान आपल्या मातेला अभिवंदन केलें २. भ्रात्यानें अभिवंदन केल्याबरोबर लक्ष्मणानेंही कौसल्येला अभिवंदन केलें आणि तदनंतर त्यानें सुमित्रामातेचे पाय धरिले ३. तेव्हां पुत्राचें हित इच्छिणारी सुमित्रा माता महापराक्रमी लक्ष्मणाचें मस्तकीं अवघ्राण करून तो वंदन करीत असतांना रडत रडत त्याला ह्मणाली ४"हे पुत्रा, वनवासाला जाण्याची मीं तुला अनुज्ञा दिली आहे. तूं आपल्या मित्रावर चांगलें प्रेम करीत जा आणि भ्राता राम वनांत जाऊं लागला ह्मणजे तूं कधींही गैरसावध राहत जाऊं नकोस ५. संकटांत सांपडलेला असो अथवा समृद्ध असो, हे निष्पापा पुत्रा, हा रामच तुझी गति आहे आणि ज्येष्ठ भ्रात्याला अनुसरून वागणें हाच जगतामध्यें सज्जनांचा धर्म आहे ६. ज्येष्ठाला अनुसरून वागणें हें आचरण ह्या कुलाला उचित असून तें परंपरागत चालत आलेलें आहे व दान, यज्ञदीक्षा आणि युद्धामध्यें देहत्याग हे धर्मही ह्या क्षत्रियकुलाला उचित आहेत " ७. राम प्रिय असल्यामुळें वनवासांत जाण्याला सिद्ध झालेल्या लक्ष्मणाला ह्याप्रमाणें

पुनः पुनरुवाच तम् ८ रामं दशरथं विद्धि मां विद्धि जनकात्मजाम् । अयोध्यामटवीं विद्धि गच्छ तात यथासुखम् ९ ततः सुमन्त्रः काकुत्स्थं प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् । विनीतो विनयज्ञश्च मातलिर्वासवं यथा १० रथमारोह भद्रं ते राजपुत्र महायशः । क्षिप्रं त्वां प्रापयिष्यामि यत्र मां राम वक्ष्यसे ११ चतुर्दश हि वर्षाणि वस्तव्यानि वने त्वया । तान्युपक्रमितव्यानि यानि देव्या प्रचोदितः १२ तं रथं सूर्यसंकाशं सीता हृष्टेन चेतसा । आरुरोह वरारोहा कृत्वालंकारमात्मनः १३ वनवासं हि संख्याय वासांस्याभरणानि च । भर्तारमनुगच्छन्त्यै सीतायै श्वशुरो ददौ १४ तथैवायुधजातानि भ्रातृभ्यां कवचानि च । रथोपस्थे प्रविन्यस्य सचर्म कठिनं च यत् १५ अथो ज्वलनसंकाशं चामीकरविभूषितम् । तमारुरुहतुस्तूर्णं भ्रातरौ रामलक्ष्मणौ १६ सीतातृतीयानारूढान्दृष्ट्वा रथमचोदयत् । सुमन्त्रः संमतानश्वान्वायुवेगसमाञ्जवे १७ प्रयाते तु महारण्यं चिररात्राय राघवे ।

---

सांगितल्यावर " जा जा " असें पुनः पुनः सांगून सुमित्रा त्याला ह्मणाली ८ " बा पुत्रा, राम हा दशरथ, जनककन्या ही मी आणि अरण्य ही अयोध्या असें समजून तूं खुशाल जा " ९. तदनंतर इंद्राला ज्याप्रमाणें मातलि सांगतो त्याप्रमाणें नम्र व विनयशील असा सुमंत्र सारथि हात जोडून ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाला १० " हे महायशस्वी राजपुत्रा, तुझें कल्याण असो; तूं रथावर आरोहण कर. हे रामा, जिकडे सांगशील तिकडे मी तुला सत्वर नेऊन पोंचवीन ११. ज्याअर्थी राजपत्नी कैकेयीनें आजच वनांत जावयास सांगितलें आहे त्याअर्थी वनामध्यें जीं तुला चवदा वर्षें काढावयाचीं आहेत त्यांना आजच आरंभ झाला पाहिजे " १२. ( ह्याप्रमाणें सुमंत्र सारथ्यानें रामाला सांगितल्यानंतर ) सुंदरी सीता कुंकू लावून प्रसन्न मनानें त्या सूर्यासारिख्या तेजस्वी रथावर आरूढ झाली १३. तेव्हां वनवाससंबंधीं वर्षांची गणणा करून श्वशुर दशरथराजानें भर्त्याच्या बरोबर जाणाऱ्या सीतेला वस्त्रें व भूषणें दिलीं ( व तीं तिनें रथामध्यें ठेविलीं ) १४ आणि त्याचप्रमाणें भ्रात्या रामलक्ष्मणाचा आयुधसमुदाय, कवचें, चर्मानें मढविलेला पेटारा व कुदळ तिनें रथावर ठेवून दिली १५. तदनंतर सुवर्णविभूषित आणि अग्निसमान तेजस्वी अशा त्या रथावर भ्राते रामलक्ष्मण सत्वर आरूढ झाले १६. तेव्हां सीतेसहवर्तमान ते तिघे रथावर आरूढ झाले आहेत असें पाहून वेगामध्यें वायूची बरोबरी करणाऱ्या व सर्व लक्षणसंपन्न असलेल्या अश्वांना प्रेरणा करून सुमंत्रानें रथ पुढें हांकला १७. ह्याप्रमाणें रघुवंशज राम पुष्कळ दिवस वास्तव्य करण्याकरितां महावनांत निघाल्यानंतर नगरांत असलेले सर्व लोक अश्व, गजादि-

बभूव नगरे मूर्च्छा बलमूर्च्छा जनस्य च १८ तत्समाकुलसंभ्रान्तं मत्तसंकुपितद्विपम् । हयसिञ्जितनिर्घोषं पुरमासीन्महास्वनम् १९ ततः सबालवृद्धा सा पुरी परमपीडिता । राममेवाभिदुद्राव घर्मार्तः सलिलं यथा २० पार्श्वतः पृष्ठतश्चापि लम्बमानस्तदुन्मुखाः । बाष्पपूर्णमुखाः सर्वे तमूचुर्भृशनिःस्वनाः २१ संयच्छ वाजिनां रश्मीन्सूत याहि शनैः शनैः । मुखं द्रक्ष्याम रामस्य दुर्दर्शं नो भविष्यति २२ आयसं हृदयं नूनं राममातुरसंशयम् । यद्देवगर्भप्रतिमे वनं याति न भिद्यते २३ कृतकृत्या हि वैदेही छायेवानुगता पतिम् । न जहाति रता धर्मे मेरुमर्कप्रभा यथा २४ अहो लक्ष्मणसिद्धार्थः सततं प्रियवादिनम् । भ्रातरं देवसंकाशं यस्त्वं परिचरिष्यसि २५ महत्येषा हि ते बुद्धिरेष चाभ्युदयो महान् । एष स्वर्गस्य मार्गश्च यदेनमनुगच्छसि २६ एवं वदन्तस्ते सोढुं न शेकुर्बाष्पमागतम् ।

---

सैन्य आणि पशुपक्षी ह्या सर्वांना मूर्छा आली १८. त्या नगरामध्यें जिकडे तिकडे गडबड उडून गेली. रामाच्या मागोमाग जाण्याकरितां जिकडे तिकडे धांदल उडाली. रामाच्या वियोगामुळें आर्तील मत्त गज क्रुद्ध झाले व अश्वांच्या खिंकाळण्याचा घोष सुरू होऊन जिकडे तिकडे हलकल्लोळ उडून गेला १९. तदनंतर उन्हानें व्याकुल झालेला पुरुष जसा उदकाकडे धांवतो तशी रामवियोग दुःखामुळें अत्यंत पीडित झालेली ती नगरी बाल व वृद्ध ह्यांसहवर्तमान रामाच्या मागोमाग धांवूं लागली २०. सारांश, बाजूला व मागें लोंबकळून व सारथ्याकडे तोंड करून अश्रूंनीं मुख भरून गेलेले असे सर्व लोक अत्यंत आक्रोश करीत करीत त्याला ह्मणाले २१ " हे सारथ्या, अरे घोड्यांचे लगाम आंवरून धर आणि हलके हलके जा. आह्मी रामाचें मुख पाहून घेतों. आतां आह्मांला त्याचें दर्शन दुर्लभ होणार आहे २२. खरोखर रामाच्या मातेचें हृदय निःसंशय लोखंडाचें आहे. कारण, आपला स्कंदासारिखा पुत्र वनांत निघाला असतांही तें फुटून जात नाहीं २३. छायेप्रमाणें पतीला अनुसरणारी ही वैदेही खरोखर कृतकृत्य आहे. कारण, सूर्याची प्रभा ज्याप्रमाणें मेरुपर्वताला सोडीत नाहीं त्याप्रमाणें धर्माचे ठिकाणीं रत असलेली ही सीता आपल्या पतीला सोडून रहात नाहीं २४. हे लक्ष्मणा, नेहमीं प्रिय भाषण करणाऱ्या आपल्या देवतुल्य भ्रात्याची ज्याअर्थीं तूं सेवा करीत आहेस त्याअर्थीं तूं कृतार्थ आहेस २५; ही तुझी बुद्धि मोठी प्रशंसनीय आहे; ह्यापासूनच तुझा मोठा भाग्योदय होणार आहे आणि ह्या रामाच्या मागोमाग जात आहेस हाच स्वर्गाचा मार्ग आहे " २६. ह्याप्रमाणें ते लोक बोलूं लागले असतां नेत्रांत भरलेले अश्रु त्यांच्यानें थांबवून धरवेनात; परंतु, ते लोक तसेच त्या प्रिय इक्ष्वाकु-

नरास्तमनुगच्छन्ति प्रियमिक्ष्वाकुनन्दनम् २७ अथ राजा वृतः स्त्रीभि-र्दीनाभिर्दीनचेतनः । निर्जगाम प्रियं पुत्रं द्रक्ष्यामीति ब्रुवन्गृहात् २८ शुश्रुवे चाग्रतः स्त्रीणां रुदतीनां महास्वनम् । यथा नादः करेणूनां बद्धे महति कुञ्जरे २९ पिता हि राजा काकुत्स्थः श्रीमान्सन्नस्तदा बभौ । परिपूर्णः शशी काले ग्रहेणोपप्लुतो यथा ३० स च श्रीमानचिन्त्यात्मा रामो दशरथात्मजः । सूतं संचोदयामास त्वरितं वाह्यतामिति ३१ रामो-याहीति तं सूतं तिष्ठेति च जनस्तथा । उभयं नाशकत्सूतः कर्तुमध्वनि चोदितः ३२ निर्गच्छति महाबाहौ रामे पौरजनाश्रुभिः । पतितैरभ्यव-हितं प्रणनाश महीरजः ३३ रुदिताश्रुपरिद्यूनं हाहाकृतमचेतनम् । प्रयाणे राघवस्यासीत्पुरं परमपीडितम् ३४ सुस्राव नयनैः स्त्रीणामस्रमायासंभ-वम् । मीनसंक्षोभचलितैः सलिलं पङ्कजैरिव ३५ दृष्ट्वा तु नृपतिः श्रीमा-नेकचित्तगतं पुरम् । निपपातैव दुःखेन कृत्तमूल इव द्रुमः ३६ ततो हल-हलाशब्दो जज्ञे रामस्य पृष्ठतः । नराणां प्रेक्ष्य राजानं सीदन्तं भृशदुः-

---

वंशजाच्या मागोमाग चालले २७. तदनंतर अंतःकरणामध्यें खिन्न झालेला व दीन स्त्रियांनीं परिवेष्टित असलेला दशरथ राजा " प्रिय पुत्राला अवलोकन करितों " असें ह्मणत ह्मणत घरांतून बाहेर पडला २८. तेव्हां महागज बद्ध झाला असतां ज्याप्रमाणें हत्तिणी आक्रोश करूं लागतात त्याप्रमाणें पुढें जातांच रोदन करीत असलेल्या स्त्रियांचा प्रचंड ध्वनि कांनीं येऊं लागला २९. तेव्हां ककुत्स्थकुलोत्पन्न व श्रीमान् पिता दशरथराजा पर्वदिवशीं राहूनें ग्रस्त केलेल्या पूर्णचंद्राप्रमाणें खिन्न होऊन गेला ३०. ( हें पाहून ) अचिंत्य धैर्यानें युक्त असलेल्या वैभवशाली दशरथपुत्र रामानें " लवकर हांक " ह्मणून सारथ्याला सुचविलें ३१. त्या सारथ्याला " चल " ह्मणून राम सांगूं लागला आणि " थांब " ह्मणून लोक ह्मणं लागले; तेव्हां दोन्ही प्रकारच्या आज्ञा झालेल्या त्या सारथ्याला मार्गामध्यें त्या दोहांपैकीं कांहींच करितां येईना ३२. महापराक्रमी राम नगरांतून जाऊं लागला असतां रथानें उडालेली भूमीवरील धूळ नगरवासी जनांच्या अश्रूंवर पडून नाहींशी झाली ३३. रामाच्या प्रयाणसमयीं नगरांतील लोक अत्यंत कष्टी झाले; जिकडे तिकडे दुःखाश्रु सुरू होऊन कोठेंच उत्साह नाहींसा झाला व हाहाकार उडून सर्व नगरामध्यें लोक मूर्छित झाले ३४ आणि मत्स्यांच्या हालचालीनें चलित झालेल्या कमला-पासून जसें पाणी गळूं लागतें तसें स्त्रियांच्या नेत्रांतून दुःखाश्रु गळूं लागले ३५. ह्याप्रमाणें सर्व नगरांतील लोकांचें चित्त एका दुःखामध्येंच मग्न झालेलें आहे असें दिसून आल्यावर श्रीमान् दशरथराजा मुळें तोडिलेल्या वृक्षाप्रमाणें दुःखानें भूमीवर पडला ३६.

खितम् ३७ हा रामेति जनाः केचिद्राममातेति चापरे । अन्तःपुरसमृद्धं च क्रोशन्तं पर्यदेवयन् ३८ अन्वीक्षमाणो रामस्तु विषण्णं भ्रान्तचेतसम् । राजानं मातरं चैव ददर्शानुगतौ पथि ३९ स बद्ध इव पाशेन किशोरो मातरं यथा । धर्मपाशेन संयुक्तः प्रकाशं नाभ्युदैक्षत ४० पदातिनौ च यानार्हावदुःखार्हौ सुखोचितौ । दृष्ट्वा संचोदयामास शीघ्रं याहीति सारथिम् ४१ न हि तत्पुरुषव्याघ्रो दुःखजं दर्शनं पितुः । मातुश्च सहितुं शक्तस्तोत्रैर्नुन्न इव द्विपः ४२ प्रत्यगारमिवायान्ती सवत्सा वत्सकारणात् । बद्धवत्सा यथा धेनू राममाताभ्यधावत ४३ तथा रुदन्तीं कौसल्यां रथं तमनुधावतीम् । क्रोशन्तीं राम रामेति हा सीते लक्ष्मणेति च ४४ रामलक्ष्मणसीतार्थं स्रवन्तीं वारि नेत्रजम् । असकृत्प्रैक्षत स तां नृत्यन्ती-

---

तेव्हां अत्यंत दुःखित होऊन राजा मूर्छित झाल्याचें पाहून रामाच्या मागें चाललेल्या लोकांमध्यें हाहाकार उडाला ३७; आणि अंतःपुरासहवर्तमान आक्रोश करीत असलेल्या राजाला अवलोकन करून कांहीं लोक "हे रामा" असें ह्मणून व कांहीं लोक "हे राम माते" असें ह्मणून शोक करूं लागले ३८. तेव्हां राम मागें वळून पाहूं लागला असतां राजा व माता आपल्या मागोमाग येत असून राजा खिन्न झाला आहे व त्याचें अंतःकरण गोंधळून गेलें आहे असें मार्गामध्यें त्याच्या दृष्टोत्पत्तीस आलें ३९. परंतु, पाशानें बद्ध झालेल्या शिंगराला जसें आपल्या मातेकडे मोकळेपणानें पहातां येत नाहीं त्याप्रमाणें धर्मपाशानें बद्ध झालेल्या रामाला वर मान करून उघडपणें त्यांच्याकडे पहातां येईना ४०. तेव्हां दुःखाचा ज्यांना कधींच अनुभव नाहीं व नेहमीं ज्यांनीं सुखच भोगिलेलें आहे व रथावर आरोहण करून गमन करणेंच ज्यांना उचित आहे असे आपले मातापितर पायांनीं आपल्या मागोमाग येत आहेत असें आढळून आल्यावर "लवकर चल" ह्मणून रामानें सारथ्याला सांगितलें ४१. कारण अंकुशांनीं ताडित झालेला गज ज्याप्रमाणें आपल्या पाठीमागें असलेली वस्तु पहाण्यास समर्थ होत नाहीं त्याचप्रमाणें पित्याची व मातेची ती दुःखदायक मुद्रा पाहण्यास पुरुषश्रेष्ठ राम समर्थ झाला नाहीं. ४२. परंतु, घरांत वासरूं बांधून ठेविलें असले ह्मणजे गाय परत येतांना वासराकरितां जशी धांवत धांवत घरीं येते तशी राममाता रामाच्या मागोमाग धावूं लागली ४३. तेव्हां त्या आपल्या रथाच्या मागोमाग आपली माता कौसल्या रोदन करीत करीत धांवत येत आहे, "हे रामा, रामा, हे सीते, हे लक्ष्मणा," असा आक्रोश करीत आहे आणि राम, लक्ष्मण व सीता यांच्याकरितां अश्रु ढाळीत ढाळीत थयथयाट करीत आहे असें त्या रामानें अवलो

मिव मातरम् ४५ तिष्ठेति राजा चुक्रोश याहि याहीति राघवः । सुम-न्त्रस्य बभूवात्मा चक्रयोरिव चान्तरा ४६ नाश्रौषमिति राजानमुपाल-ब्धोपि वक्ष्यसि । चिरं दुःखस्य पापिष्ठमिति रामस्तमब्रवीत् ४७ स रामस्य वचः कुर्वन्ननुज्ञाप्य च तं जनम् । व्रजतोपि हयाञ्छीघ्रं चोद-यामास सारथिः ४८ न्यवर्तत जनो राज्ञो रामं कृत्वा प्रदक्षिणम् । मन-साप्याशु वेगेन न न्यवर्तत मानुषम् ४९ यमिच्छेत्पुनरायातं नैनं दूरम-नुव्रजेत् । इत्यमात्या महाराजमूचुर्दशरथं वचः ५० तेषां वचः सर्वगु-णोपपन्नः प्रस्विन्नगात्रः प्रविषण्णरूपः । निशम्य राजा कृपणः सभार्यो व्यवस्थितस्तं सुतमीक्षमाणः ५१ [१६९२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मी-कीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चत्वारिंशः सर्गः ॥ ४० ॥

तस्मिंस्तु पुरुषव्याघ्रे निष्क्रामति कृताञ्जलौ । आर्तशब्दो हि संजज्ञे

---

कन केलें ४४, ४५. "थांब थांब" ह्मणून दशरथराजा सुमंत्रसारथ्याला ओरडून सांगूं लागला आणि " चल चल " असें त्याला राम ह्मणूं लागला. तेव्हां त्या सुमंत्र सारथ्याचें मन एकमेकांशीं युद्ध करण्याकरितां सज्ज झालेल्या दोन सैन्यांच्या मध्यभागीं असलेल्या पुरुषाप्रमाणें उदासीन झालें ४६. " मी थांब थांब ह्मणत असतानांही तूं थांबत नाहींस " ह्मणून राजा जरी तुला रागें भरला तरी " मला राजाचें ह्मणणें ऐकूं आलें नाहीं " असें समजून तूं रथ पुढें हांकीत जा. कारण, जाण्याला विलंब करणें हें माझ्या दुःखाचें कारण असल्यामुळें तें फारच वाईट आहे. ह्यास्तव, "सत्वर चल" असें राम त्याला ह्मणाला ४७. ( असें रामानें सांगितल्यानंतर ) रामाच्या आज्ञेप्रमाणें वागणाऱ्या त्या सुमंत्र सारथ्यानें मागोमाग येत असलेल्या त्या लोकांचा निरोप घेऊन स्वेच्छेनें जात असलेल्या अश्वांना सत्वर जाण्याकरितां इशारत दिली ४८. तेव्हां रामाला प्रदक्षिणा करून राजकीयलोक ( देहानें ) परत फिरले; परंतु, शीघ्रवेगानें युक्त असलेल्या मनानें ते परत फिरले नाहींत आणि रामाच्या मागोमाग चाललेला इतर मनुष्यसमूह तर देहानें व मनानेंही परत फिरला नाहीं ४९. " जो फिरून परत यावा अशी आपल्याला इच्छा असेल त्याला लांब पोंचविण्यास जाऊं नये " असें अमात्य महाराज दशरथाला सांगूं लागले ५०. तेव्हां खिन्न वदन होऊन सर्वांगाला घाम सुटलेला तो सर्वगुणसंपन्न दीन दशरथराजा त्यांचें सांगणें ऐकून भार्येसहवर्तमान त्या आपल्या पुत्राकडे पहात उभा राहिला ५१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चाळि-सावा सर्ग समाप्त झाला ॥ ४० ॥

स्त्रीणामन्तःपुरे महान् १ अनाथस्य जनस्यास्य दुर्बलस्य तपस्विनः । यो गतिः शरणं चासीत्स नाथः क्व नु गच्छति २ न क्रुध्यत्यभिशस्तोपि क्रोधनीयानि वर्जयन् । क्रुद्धान्प्रसादयन्सर्वान्समदुःखः क्व गच्छति ३ कौसल्यायां महातेजा यथा मातरि वर्तते । तथा यो वर्ततेस्मासु महात्मा क्व नु गच्छति ४ कैकेय्या क्लिश्यमानेन राज्ञा संचोदितो वनम् । परित्राता जनस्यास्य जगतः क्व नु गच्छति ५ अहो निश्चेतनो राजा जीवलोकस्य संक्षयम् । धर्म्यं सत्यव्रतं रामं वनवासे प्रवत्स्यति ६ इति सर्वा महिष्यस्ता विवत्सा इव धेनवः । रुरुदुश्चैव दुःखार्ताः सस्वरं च विचुक्रुशुः ७ स तमन्तःपुरे घोरमार्तशब्दं महीपतिः । पुत्रशोकाभिसंतप्तः श्रुत्वा चासीत्सुदुःखितः ८ नाग्निहोत्राण्यहूयन्त सूर्यश्चान्तरधीयत । व्यसृजन्कवलान्नागा गावो वत्सान्न पाययन् ९ त्रिशङ्कुर्लोहिताङ्गश्च बृहस्पतिबुधावपि । दारुणाः सोममभ्येत्य ग्रहाः सर्वे व्यवस्थिताः १० नक्ष-

---

तो पुरुषश्रेष्ठ राम हात जोडून बाहेर जाऊं लागला असतां स्त्रियांच्या अंतःपुरामध्यें मोठाच आक्रोश होऊं लागला १. ( आणि त्या आपल्याशीं ह्मणाल्या ) " आह्मां बिचाऱ्या अनाथ व दुर्बलांचें जो रक्षण करीत असे आणि कोणत्याही प्रकारचें सुख आह्मांला प्राप्त होण्याला जो कारण असे तो नाथ राम कोठें हो जात आहे ? २. कोणीही त्याच्यावर खोटा आरोप केला असतां तो क्रुद्ध होत नाहीं; व प्रजेला क्रोध उत्पन्न होईल अशीं कृत्यें वर्ज्य करून क्रुद्ध झालेल्या सर्व लोकांचें नेहमीं सांत्वन करीत असतो. असो. प्रजाजनांना दुःख झालें असतां दुःखी होणारा राम कोठें बरें जात आहे ? ३. कौसल्या मातेचे ठिकाणीं व अमचे ठिकाणीं जो सारखाच वागत असतो तो महात्मा कोठें हो जात आहे? ४. कैकेयी त्रास देऊं लागल्यामुळें राजानें वनांत जाण्याची आज्ञा केलेला व केवल आमचेंच नव्हे परंतु, सर्व जगताचें रक्षण करणारा राम कोठें बरें जात आहे? ५. अहो, धर्माला अनुसरून वागणाऱ्या, सत्यव्रतानें चालणाऱ्या आणि जगताला आधार असलेल्या रामाला वनवासाकरितां हांकून देणारा राजा खरोखर विचारहीन झालेला आहे" ६. अशारीतीनें वत्सरहित धेनूप्रमाणें दुःखाकुल झालेल्या त्या सर्व राजस्त्रिया रोदन करून उच्च स्वरानें आक्रोश करूं लागल्या ७. व अंतःपुरांतील तो घोर आक्रोश श्रवण करून पुत्रशोकानें अतिशय संतप्त झालेला भूपति दशरथराजा अतिशयच दुःखित झाला ८. राम चालता झाल्यावर अग्निहोत्रहोम होईनासे झाले, सूर्य आच्छादित झाला, हत्ती गवत खाईनासे झाले व गाईही वासरांना पाजीनाशा झाल्या ९. त्रिशंकु, मंगल, बृहस्पति,

आणि गतार्चीषि ग्रहाश्च गततेजसः। विशाखाश्च सधूमाश्च नभसि प्रचकाशिरे ११ कालिकानिलवेगेन महोदधिरिवोत्थितः । रामे वनं प्रव्रजिते नगरं प्रचचाल तत् १२ दिशः पर्याकुलाः सर्वास्तिमिरेणव संवृताः । न ग्रहो नापि नक्षत्रं प्रचकाशे न किंचन १३ अकस्मान्नागरः सर्वो जनो दैन्यमुपागमत् । आहारे वा विहारे वा न कश्चिदकरोन्मनः १४ शोकपर्यायसंतप्तः सततं दीर्घमुच्छ्वसन् । अयोध्यायां जनः सर्वश्चुक्रोश जगतीपतिम् १५ बाष्पपर्याकुलमुखो राजमार्गगतो जनः । न हृष्टो लभ्यते कश्चित्सर्वः शोकपरायणः १६ न वाति पवनः शीतो न शशी सौम्यदर्शनः । न सूर्यस्तपते लोकं सर्वं पर्याकुलं जगत् १७ अनर्थिनः सुताः स्त्रीणां भर्तारो भ्रातरस्तथा । सर्वे सर्वं परित्यज्य राममेवान्वचिन्तयन् १८ ये तु रामस्य सुहृदः सर्वे ते मूढचेतसः । शोकभारेण चाक्रान्ताः शयनं नैव भेजिरे १९ ततस्त्वयोध्या रहिता महात्मना पुरन्द-

---

बुध व इतर सर्व ग्रह दारुण होऊन रात्रीं वक्रगतीनें चंद्रासमीप येऊन राहिले १०. नक्षत्रें निस्तेज झालीं; ग्रहांची कांति नाहींशी झाली. व ते ग्रह आपला मार्ग सोडून आकाशामध्यें धूमयुक्त दिसूं लागले ११. वायूच्या वेगामुळें मेघपंक्ति आकाशांत उद्भवलेल्या सागराप्रमाणेंच दिसूं लागली व राम वनांत गेला असतां तें सर्व नगर भूकंपानें हलूं लागलें १२. अंधकारानें जशा कांहीं सर्व दिशा व्याप्त होऊन जाऊन ग्रह, नक्षत्रें वगैरे कांहींच प्रकाश देईनासे झालें १३. नगरांतील सर्व लोकांना एकाएकीं दैन्य प्राप्त झालें आणि खाण्याकडे अथवा व्यवहाराकडे कोणाचेंही लक्ष्य लागेनासें झालें १४. ( इतकेंच नव्हे परंतु ) वारंवार शोकसंतप्त झाल्यामुळें एकसारखे दीर्घ उच्छ्वास टाकूं लागले; आणि ते अयोध्येंतील सर्व लोक भूपति दशरथाच्या नांवानें आक्रोश करूं लागले १५. राजमार्गामध्यें असलेल्या लोकांचीं मुखें अश्रूंनीं भरून गेलीं आणि सर्वच शोकाकुल झाल्यामुळें आनंदित असा कोणीही दृष्टोत्पत्तीस येईना १६. थंड वारा वाहीनासा झाला, चंद्र ( पूर्वीप्रमाणें ) सौम्य दिसेनासा झाला व सूर्य जगताला प्रकाशित करीनासा झाला. सारांश, सर्व ब्रह्मांडच शोकाकुल होऊन गेलें १७. पुत्र मातापितरांची अपेक्षा धरीनासे झाले आणि भर्ते स्त्रियांची गरज बाळगीनासे झाले आणि भ्राते भ्रात्यांचें आगत्य ठेवीनासे झाले. तात्पर्य, सर्व लोक सर्व कांहीं सोडून देऊन रामाचें चिंतन करूं लागले १८. रामाचे जे सुहृद् होते त्यांचें मन अगदींच मोहित होऊन गेलें व शोकभरानें व्याप्त झाल्यामुळें त्यांना झोंप कसली ती मुळींच येईनाशी झाली १९. तेव्हां पर्वत आणि मेरुपर्वत ह्यांसहवर्तमान पृथ्वी इंद्ररहित

रेणेव मही सपर्वता । चचाल घोरं भयशोकदीपिता सनागयोधाश्वगणा ननाद च २० [१७१२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये योध्याकाण्ड एकचत्वारिंशः सर्गः ॥ ४१ ॥

यावत्तु निर्यतस्तस्य रजोरूपमदृश्यत । नैवेक्ष्वाकुवरस्तावत्संजहारात्मचक्षुषी १ यावद्राजा प्रियं पुत्रं पश्यत्यत्यन्तधार्मिकम् । तावद्व्यवर्धतेवास्य धरण्यां पुत्रदर्शने २ न पश्यति रजोऽप्यस्य यदा रामस्य भूमिपः । तदार्तश्च विषण्णश्च पपात धरणीतले ३ तस्य दक्षिणमन्वागात्कौसल्या बाहुमङ्गना । परं चास्यान्वगात्पार्श्वं कैकेयी सा सुमध्यमा ४ तां नयेन च संपन्नो धर्मेण विनयेन च । उवाच राजा कैकेयीं समीक्ष्य व्यथितेन्द्रियः ५ कैकेयि मामकाङ्गानि मास्प्राक्षीः पापनिश्चये । न हि त्वां द्रष्टुमिच्छामि न भार्या न च बान्धवी ६ ये च त्वामनुजीवन्ति नाहं तेषां न

---

झाली असतां जशी हलूं लागते त्याप्रमाणें महात्म्या रामानें रहित झालेली अयोध्या भय व शोक ह्यांच्या योगानें अगदीं पेटून जाऊन भयंकर रीतीनें हलूं लागली आणि गज, योद्धे व अश्व ह्यांच्या सैन्यासहवर्तमान ती नगरी आक्रोश करूं लागली २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४१ ॥

राम वनांत चालूं झाला असतां त्याच्या रथानें उडालेली धूळ जोंपर्यंत दिसत होती तोंपर्यंत इक्ष्वाकुवंशजश्रेष्ठ दशरथराजानें आपले नेत्र परत फिरविले नाहींत १. जोंपर्यंत अत्यंत धार्मिक अशा आपल्या प्रिय पुत्राला राजा अवलोकन करीत होता तोंपर्यंत पुत्रदर्शनाकरितां भूमीवर त्याचें शरीर जसें कांहीं वृद्धिंगतच होत होतें. ( सारांश, जोंपर्यंत रथानें उडालेली धूळ दृष्टीं पडण्याचा संभव होता तोंपर्यंत दशरथराजा पाय वर करून ती पहातच होता ) २. परंतु, वनांत जाणाऱ्या रामाच्या रथानें उडालेली धूळ सुद्धां जेव्हां दिसेनाशी झाली तेव्हां दशरथ भूपति व्याकुल व खिन्न होऊन भूतलावर पडला ३. तेव्हां त्याला उठवून व त्याचा उजवा हात धरून कौसल्या स्त्री नगरामध्यें परत आली. व ती सुंदरी कैकयी फक्त त्याच्या डाव्या बाजूला राहूनच त्याच्या बरोबर नगरामध्यें आली ४. कारण, न्याय, धर्म व विनय ह्यांनीं युक्त असून अंतःकरणामध्यें क्षुब्ध झालेला तो दशरथराजा कैकेयीला पाहून ह्मणाला ५ "हे कैकयि, तूं माझ्या अवयवांना स्पर्श करूं नको. हे पापनिश्चये, मला तुझें तोंड पहाण्याची इच्छा नाहीं. तूं माझी भार्या नव्हेस इतकेंच नव्हे परंतु, ( लांबची कोणी ) नातेवाईक सुद्धां नव्हेस ६. तुझ्या आश्रयानें जे उपजीविका करणारे अस-

ते मम । केवलार्थपरां हि त्वां त्यक्तधर्मां त्यजाम्यहम् ७ अगृह्णां यच्च ते पाणिमग्निं पर्यणयं च यत् । अनुजानामि तत्सर्वमस्मिँल्लोके परत्र च ८ भरतश्चेत्प्रतीतः स्याद्राज्यं प्राप्यैतदव्ययम् । यन्मे स दद्यात्पित्रर्थं मा मां तद्दत्तमागमत् ९ अथ रेणुसमुद्ध्वस्तं समुत्थाप्य नराधिपम् । न्यवर्तत तदा देवी कौसल्या शोककर्शिता १० हत्वेव ब्राह्मणं कामात्स्पृष्ट्वाग्निमिव पाणिना । अन्वतप्यत धर्मात्मा पुत्रं संचिन्त्य राघवम् ११ निवृत्यैव निवृत्यैव सीदतो रथवर्त्मसु । राज्ञो नातिबभौ रूपं ग्रस्तस्यांशुमतो यथा १२ विललाप स दुःखार्तः प्रियं पुत्रमनुस्मरन् । नगरान्तमनुप्राप्तं बुध्वा पुत्रमथाब्रवीत् १३ वाहनानां च मुख्यानां वहतां तं ममात्मजम् । पदानि पथि दृश्यन्ते स महात्मा न दृश्यते १४ यः सुखेनोपधानेषु शेते चन्दनरूषितः । वीज्यमानो महार्हाभिः स्त्रीभिर्मम सुतोत्तमः १५ स नूनं क्वचिदेवाद्य वृक्षमूलमुपाश्रितः । काष्ठं वा यदि वाश्मानमुपधाय शयिष्यते १६

---

तील त्यांचा मी कोणी नव्हे व ते माझे कोणी नव्हेत. धर्माचा त्याग करून केवल स्वार्थाकडे दृष्टि ठेवणाऱ्या तुझा मी त्याग करितों ७. मीं जें तुझें पाणिग्रहण केलें आणि तुझ्याकडून अग्नीला जी मी प्रदक्षिणा घालविली त्या सर्वांचा इहलोकीं व परलोकीं आतां माझ्याशीं कांहीं संबंध राहिला नाहीं ८. हें अक्षय्य राज्य प्राप्त झाल्यानें भरत जर संतुष्ट होईल तर पिता असें समजून तो जें कांहीं माझें श्राद्ध वगैरे करील तें मला न पोंचो " ९. असो. धुळीनें भरलेल्या राजाला भूतलावरून उठविल्यावर शोकाकुल झालेली राजपत्नी कौसल्या राजासहवर्तमान परत आली असतां १०, तो धर्मनिष्ठ दशरथराजा पुत्ररामाचें चिंतन करून ब्राह्मणाचा वध केल्याप्रमाणें अथवा अग्नीला हस्तस्पर्श केल्याप्रमाणें दुःख करूं लागला ११. ज्या मार्गानें रामाचा रथ गेला तो मार्ग पुनःपुन्हां दशरथ पाहूं लागला असतां त्याला फारच क्लेश होऊं लागले व त्यावेळीं राहुग्रस्त झालेल्या सूर्याप्रमाणें त्या राजाचें रूप तेजोहीन दिसूं लागले १२ आणि पुत्र नगराबाहेर गेला असें जेव्हां त्याला समजून आलें तेव्हां त्या प्रिय पुत्राचें स्मरण करून दुःखाकुल झालेला तो दशरथराजा असा विलाप करूं लागला १३. " त्या माझ्या पुत्राला वाहून नेणाऱ्या श्रेष्ठ अश्वांचीं पाउलें मार्गामध्यें दिसत आहेत परंतु तो महात्मा कोठें दिसत नाहीं १४. उत्कृष्ट अलंकार धारण केलेल्या स्त्रिया वारा घालीत असतांना चंदनाची उटी लाविलेला जो माझा उत्कृष्ट पुत्र गाद्यागिरद्यांवर पडत असे १५ तो आज खरोखर वृक्षमूलांचा आश्रय करून काष्ठ अथवा पाषाण उशाशीं घेऊन कोठें तरी पडेल १६;

उत्थास्यति च मेदिन्याः कृपणः पांसुगुण्ठितः। विनिःश्वसन्प्रस्रवणात्करेणूनामिवर्षभः १७ द्रक्ष्यन्ति नूनं पुरुषा दीर्घबाहुं वनेचराः। राममुत्थाय गच्छन्तं लोकनाथमनाथवत् १८ सा नूनं जनकस्येष्टा सुता सुखसदोचिता। कण्टकाक्रमणक्लान्ता वनमद्य गमिष्यति १९ अनभिज्ञा वनानां सा नूनं भयमुपैष्यति। श्वापदानर्दितं श्रुत्वा गम्भीरं रोमहर्षणम् २० सकामा भव कैकेयि विधवा राज्यमावस। न हि तं पुरुषव्याघ्रं विना जीवितुमुत्सहे २१ इत्येवं विलपन्राजा जनौघेनाभिसंवृतः। अपस्नात इवारिष्टं प्रविवेश गृहोत्तमम् २२ शून्यचत्वरवेश्मान्तां संवृतापणवेदिकाम्। क्लान्तदुर्बलदुःखार्तां नात्याकीर्णमहापथाम् २३ तामवेक्ष्य पुरीं सर्वां राममेवानुचिन्तयन्। विलपन्प्राविशद्राजा गृहं सूर्य इवाम्बुदम् २४ महाह्रदमिवाक्षोभ्यं सुपर्णेन हृतोरगम्। रामेण रहितं वेश्म वैदेह्या लक्ष्मणेन च २५ अथ गद्गदशब्दस्तु विलपन्वसुधाधिपः। उवाच

---

हत्तिणींचा पति पर्वतशिखरप्रभृति प्रदेशावरून जसा उठतो तसा धुळीनें भरलेला तो दीन राम सुस्कारे टाकीत टाकीत पृथ्वीवरून उठेल १७ व तो आजानुबाहु जगत्पति राम उठून जाऊं लागला असतां खरोखर वनांत संचार करणारे लोक अनाथाप्रमाणें त्याला अवलोकन करितील १८. नेहमीं सुखाचा उपभोग घेण्याची संवय झालेल्या त्या प्रिय जनककन्येला कांट्यांतून चालल्यानें क्लेश होतील आणि अशी ती आज वनामध्यें जाईल १९. वनांविषयीं माहिती नसलेल्या त्या जनककन्येनें गंभीर आणि अंगावर कांटा आणणारी अशी श्वापदांची गर्जना ऐकिली म्हणजे तिला खरोखर भय प्राप्त होईल २०. हे कैकेयि, तुझे मनोरथ आतां परिपूर्ण होऊं दे; तूं विधवा होऊन राज्य कर. कारण, त्या पुरुषश्रेष्ठ रामावांचून मला जिवंत रहावेसें वाटत नाहीं" २१. ह्याप्रमाणें जनसमुदायांनीं परिवेष्टित असलेला राजा विलाप करीत करीत मृताबद्दल स्नान करून जाणाऱ्या पुरुषाप्रमाणें दुःखित होऊन आपल्या उत्कृष्ट गृहामध्यें प्रविष्ट झाला २२. तात्पर्य; (सर्व लोक रामाच्या मागोमाग गेले असल्यामुळें) जिच्यांतील घरांच्या पुढल्या बाजूला व मध्यभागांतही कोणी नव्हतें, जिच्यांतील दुकानें बंद केलेलीं होतीं, जिच्यांतील लोक कष्टी, दुर्बल व दुःखी झालेले होते आणि जिच्यांतील मोठमोठे मार्गही विशेषसे गजबजलेले दिसत नव्हते २३ अशी ती सर्व नगरी अवलोकन करून रामाचेंच चिंतन करणारा तो दशरथराजा मेघांमध्यें प्रवेश करणाऱ्या सूर्याप्रमाणें विलाप करीत करीत गृहामध्यें प्रविष्ट झाला २४. त्या घरामध्यें राम, सीता व लक्ष्मण नसल्यामुळें तें घर गरुडानें आंतील सर्प नाहींसे केल्यामुळें क्षोभरहित

मृदु मन्दार्थं वचनं दीनमस्वरम् २६ कौसल्याया गृहं शीघ्रं राममातुर्नयन्तु माम् । न ह्यन्यत्र ममाश्वासो हृदयस्य भविष्यति २७ इति ब्रुवन्तं राजानमनयन्द्वारदर्शिनः । कौसल्याया गृहं तत्र न्यवेशयत विनीतवत् २८ ततस्तत्र प्रविष्टस्य कौसल्याया निवेशनम् । अधिरुह्यापि शयनं बभूव लुलितं मनः २९ पुत्रद्वयविहीनं च स्नुषया च विवर्जितम् । अपश्यद्भवनं राजा नष्टचन्द्रमिवाम्बरम् ३० तच्च दृष्ट्वा महाराजो भुजमुद्यम्य वीर्यवान् । उच्चैः स्वरेण प्राक्रोशद्धा राम विजहासि नौ ३१ सुखिता बत तं कालं जीविष्यन्ति नरोत्तमाः । परिष्वजन्तो ये रामं द्रक्ष्यन्ति पुनरागतम् ३२ अथ रात्र्यां प्रपन्नायां कालरात्र्यामिवात्मनः । अर्धरात्रे दशरथः कौसल्यामिदमब्रवीत् ३३ न त्वां पश्यामि कौसल्ये साधु मां पाणिना स्पृश । रामं मेनुगता दृष्टिरद्यापि न निवर्तते ३४ तं राममेवानुविचिन्तयन्तं समीक्ष्य देवी शयने नरेन्द्रम् । उपोपविश्याधिकमार्तरूपा विनिः-

---

झालेल्या महासरोवराप्रमाणें रात्र दिसूं लागलें २५ अशो. घरांत आल्यानंतर दुःखामुळें ज्याचा शब्द अडखळत आहे असा तो भूपति दशरथराजा विलाप करीत करीत अतिशयच सावकाश, फारच हळू आणि ह्मणूनच अर्थबोधरहित अशा दीन वाणीनें ह्मणाला २६ " राममाता कौसल्येच्या घरीं मला लवकर न्या; दुसऱ्या ठिकाणीं माझ्या अंतःकरणाला बरें वाटणार नाहीं " २७. ह्याप्रमाणें राजा बोलूं लागला असतां दारावरील पहारेकरी त्याला कौसल्येच्या घरीं घेऊन गेले व त्यांनीं त्याला तेथें मंचकावर नेऊन ठेविल्यानंतर तो खालीं मान घालून पडला २८. ह्याप्रमाणें कौसल्येच्या घरीं येऊन तो राजा शय्येवर पडला असतांही त्याचें मन अस्वस्थच होतें २९ व दोन पुत्र आणि स्नुषा ह्यांनीं रहित असलेलें तें घर चंद्ररहित झालेल्या आकाशाप्रमाणें दशरथराजाला दिसूं लागलें ३० आणि तें अवलोकन केल्यावर तो वीर्यवान् महाराज दशरथ हात वर करून उच्च स्वरानें आक्रोश करूं लागला कीं, " हे रामा, तूं आह्मांला टाकून जात आहेस ३१. राम परत येईपर्यंत जे जिवंत रहातील आणि राम परत आल्यावर त्याला कडकडून भेट देऊन जे अवलोकन करतील तेच खरोखर सुखी व धन्य पुरुष होत " ३२. तदनंतर स्वतःची कालरात्रीच कीं काय अशी ती रात्र पडल्यावर मध्यरात्रसमयीं दशरथराजा कौसल्येला ह्मणाला ३३ " हे कौसल्ये, तूं मला दिसत नाहींस. तूं आपल्या हातानें मला चांगला स्पर्श कर; रामाकडे गेलेली माझी दृष्टि अद्यापि निवृत्त होत नाहीं " ३४. (ह्याप्रमाणें दशरथानें सांगितल्यानंतर ) रामाचेंच चिंतन करीत करीत सुस्कारे टाकीत

श्वसन्तं विललाप कृच्छ्रम् ३५ [१७४७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्विचत्वारिंशः सर्गः ॥ ४२ ॥

ततः समीक्ष्य शयने सन्नं शोकेन पार्थिवम् । कौसल्या पुत्रशोकार्ता तमुवाच महीपतिम् १ राघवे नरशार्दूल विषं मुक्त्वा हि जिह्मगा । विचरिष्यति कैकेयी निर्मुक्तेव हि पन्नगी २ विवास्य रामं सुभगा लब्धकामा समाहिता । त्रासयिष्यति मां भूयो दुष्टाहिरिव वेश्मनि ३ अथास्मिन्नगरे रामश्चरन्भैक्षं गृहे वसेत् । कामकारो वरं दातुमपि दासं ममात्मजम् ४ पातयित्वा तु कैकेय्या रामं स्थानाद्यथेष्टतः । प्रवृद्धो रक्षसां भागः पर्वणीवाहिताग्निना ५ नागराजगतिर्वीरो महाबाहुर्धनुर्धरः । वनमाविशते नूनं सभार्यः सह लक्ष्मणः ६ वने त्वदृष्टदुःखानां कैकेय्यनुमते

---

असलेल्या दशरथराजाला शय्येवर अवलोकन करून राजपत्नी कौसल्या जवळ येऊन बसली आणि पूर्वीपेक्षांही अधिक दुःखाकुल होऊन घोर विलाप करूं लागली ३५ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं बेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४२ ॥

तदनंतर शोकानें खिन्न होऊन शय्येवर पडलेल्या त्या भूपाला अवलोकन केल्यावर पुत्रशोकाकुल झालेली कौसल्या त्याला ह्मणाली १ "हे पुरुषश्रेष्ठ, सर्पाप्रमाणें कुटिलगतीनें युक्त असलेली कैकयी रामाचे ठिकाणीं आपलें कौटिल्यरूप विष ओकून कांत टाकून दिलेल्या नागिणीप्रमाणें आतां संचार करूं लागेल २ आणि रामाला हांकून देऊन मनोरथपरिपूर्ण झाल्यामुळें स्वस्थ झालेली ती भाग्यवती कैकयी दुष्ट सर्पाप्रमाणें घरामध्यें मला आतां अधिकच त्रास देऊं लागेल ३. रामानें ह्या नगरामध्यें भिक्षा मागून घरीं रहावें असें जर हिनें मागितलें असतें आणि माझा पुत्र हिचा दास होवो असा जरी आपण हिला वर दिला असतां तरी सुद्धां (त्यांत त्याचा वियोग होणार नसल्यामुळें) मला तें इष्टच झालें असतें ४. स्वस्थानापासून आपल्या इच्छेप्रमाणें रामाला कैकेयीनें पदच्युत केलें आहे व पर्वदिवशीं ( याग समयीं ) अग्निहोत्री ज्याप्रमाणें राक्षसांचा भाग ह्मणून (कांडावगैरे) बाहेर टाकून देत असतात त्याप्रमाणें वनामध्यें तिनें त्याला फेकून दिलें आहे. (सरांश, राक्षसांच्या तावडींतून सुटणें कठीणच असल्यामुळें) पुनरपि त्याचें मला दर्शन होणें संभवनीय नाहीं ५. ज्याची चालण्याची ढब महागजाप्रमाणे आहे असा तो आजानुबाहु, वीर धनुर्धर राम सीता व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान खरोखर वनांत गेला आहे ना ! ६. कैकयीला आपण वश होऊन आजपर्यंत दुःख न पाहिलेल्या अशा ज्यांचा आपण वनवासाकरितां त्याग केला त्यांची वनामध्यें

त्वया । त्यक्तानां वनवासाय कान्यावस्था भविष्यति ७ ते रत्नहीनास्तरुणाः फलकाले विवासिताः । कथं वत्स्यन्ति कृपणाः फलमूलैः कृताशनाः ८ अपीदानीं स कालः स्यान्मम शोकक्षयः शिवः । सहभार्यं सह भ्रात्रा पश्येयमिह राघवम् ९ श्रुत्वैवोपस्थितौ वीरौ कदायोध्या भविष्यति । यशस्विनी हृष्टजना सूच्छ्रितध्वजमालिनी १० कदा प्रेक्ष्य नरव्याघ्रावरण्यात्पुनरागतौ । भविष्यति पुरी हृष्टा समुद्र इव पर्वणि ११ कदायोध्यां महाबाहुः पुरीं वीरः प्रवेक्ष्यति । पुरस्कृत्य रथे सीतां वृषभो गोवधूमिव १२ कदा प्राणिसहस्राणि राजमार्गे ममात्मजौ । लाजैरवकरिष्यन्ति प्रविशन्तावरिन्दमौ १३ प्रविशन्तौ कदायोध्यां द्रक्ष्यामि शुभकुण्डलौ । उदग्रायुधनिस्त्रिंशौ सशृङ्गाविव पर्वतौ १४ कदा सुमनसः कन्या द्विजातीनां फलानि च । प्रदिशन्तः पुरीं हृष्टाः करिष्यन्ति प्रदक्षिणम् १५ कदा परिणतो बुद्ध्या वयसा चामरप्रभः । अभ्युपैष्यति

(राक्षसांच्या तावडींत सांपडल्याबांचून) काय बरें दुसरी अवस्था होणार आहे! ७. राज्योपभोग हें जें यौवनावस्थेचें फल तें प्राप्त होण्याच्या वेळींच आपण त्या तरुणांना कोणतीही उत्कृष्ट वस्तु बरोबर न देतां वनामध्यें हांकून दिलें आहे. तेव्हां फलमूलांवर उपजीविका करून ते दीन कसे बरें वनामध्यें रहातील ! ८ भार्या आणि भ्राता ह्यांसहवर्तमान रामाला मी आवलोकन करीन अशी ती माझ्या शोकाचा नाश करणारी शुभ वेळ आतां कधीं येईल काय ! ९. वीर राम व लक्ष्मण आले आहेत असें ऐकल्याबरोबर उंच उंच ध्वज उभारून ह्या यशस्विनी अयोध्येंतील लोक केव्हां बरें आनंदित होतील ! १०. आरण्यांतून परत आलेले पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण अवलोकन करून पर्वदिवशीं आनंदित होणाऱ्या समुद्राप्रमाणें ही नगरी केव्हां बरें आनंदित होईल ! ११. 'गाईला पुढें करून येणाऱ्या बैलाप्रमाणें रथामध्यें सीतेला पुढें करून आजानुबाहु वीर राम केव्हां बरें अयोध्येमध्यें प्रवेश करील ! १२. शत्रुदमन करणारे माझे पुत्र नगरींत शिरूं लागले असतां राजमार्गामध्यें हजारों प्राणी त्यांच्यावर केव्हां बरें लाह्या उधळतील !! १३. उत्कृष्ट धनुष्य व खड्ग धारण केल्यामुळें सशृंग पर्वताप्रमाणें दिसणारे असे माझे पुत्र उत्कृष्ट कुंडलें धारण करून अयोध्येमध्यें प्रवेश करीत असतांना मी केव्हां बरें पाहीन ! १४. कुमारिका व द्विज ह्यांच्यापासून अनुक्रमें पुष्पें व फलें घेत घेत ते त्रिवर्ग आनंदित होऊन ( सर्व नगरवासी जनांच्या उत्सवाकरितां ) केव्हां बरें अयोध्यानगरीला प्रदक्षिणा करतील! १५. ज्ञानानें वृद्ध आणि वयानें देवांप्रमाणें अत्यंत तरुण असा धर्मात्मा राम वेळेवर पड-

धर्मात्मा सुवर्ष इव लालयन् १६ निःसंशयं मया मन्ये पुरा वीर कदर्यया । पातुकामेषु वत्सेषु मातॄणां शातिताः स्तनाः १७ साहं गौरिव सिंहेन विवत्सा वत्सला कृता । कैकेय्या पुरुषव्याघ्र बालवत्सेव गौर्बलात् १८ न हि तावद्गुणैर्जुष्टं सर्वशास्त्रविशारदम् । एकपुत्रा विना पुत्रमहं जीवितुमुत्सहे १९ न हि मे जीविते किंचित्सामर्थ्यमिह कल्प्यते । अपश्यन्त्याः प्रियं पुत्रं लक्ष्मणं च महाबलम् २० अयं हि मां दीपयतेद्यवह्निस्तनूजशोकप्रभवो महाहितः । महीमिमां रश्मिभिरुत्तमप्रभो यथा निदाघे भगवान्दिवाकरः २१ [ १७६८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्रिचत्वारिंशः सर्गः ॥ ४३ ॥

विलपन्तीं तथा तां तु कौसल्यां प्रमदोत्तमाम् । इदं धर्मे स्थिता धर्म्यं सुमित्रा वाक्यमब्रवीत् १ तवार्ये सद्गुणैर्युक्तः स पुत्रः पुरुषोत्तमः । किं ते विलपितेनैवं कृपणं रुदितेन वा २ यस्तवार्ये गतः पुत्रस्त्यक्त्वा

णाऱ्या पर्जन्याप्रमाणें लोकांना आनंद देत देत केव्हां बरें परत येईल ! १६. हे वीर, पूर्वी मी निःसंशय क्षुद्रवृत्तीनें वागून वत्सें स्तनपान करण्याची इच्छा करीत असतांना त्यांच्या मातांचे स्तन कापून टाकिले आहेत १७; ह्मणून, हे पुरुषश्रेष्ठ भूपते, (त्या पातकामुळें ) सिंह ज्याप्रमाणें पुत्रवत्सल गाईला वत्सहीन करून टाकितो त्याप्रमाणें आपण मला वत्सहीन करून टाकिलें आहे आणि एकादी सिंहीण ज्याप्रमाणें बालवत्सांनीं युक्त असलेल्या गाईला बलात्कारानें वत्सहीन करून टाकिते त्याप्रमाणें कैकेयीनें मला वत्सहीन करून टाकिलें आहे १८. सारांश, मला एकच पुत्र आहे तेव्हां गुणसंपन्न आणि सर्व शास्त्र पारंगत अशा त्या पुत्रावांचून माझी जिवंत राहण्याची इच्छा नाहीं १९. कारण, प्रिय पुत्र आणि महाबलाढ्य लक्ष्मण हे दोघेही दृष्टीआड झाले असल्यामुळें जीव धरून रहाण्यास माझे अंगीं कांहीं सामर्थ्यच नाहीं २०. प्रचंड प्रभेनें युक्त असलेला भगवान् सूर्य ज्याप्रमाणें आपल्या किरणांच्या योगानें ग्रीष्म ऋतूमध्यें ही पृथ्वी तप्त करून टाकितो त्याप्रमाणें महासर्पापेक्षांही तीक्ष्ण असलेला हा पुत्र शोकजन्य अग्नि आज मला संतप्त करीत आहे २१. ह्याप्रमाणें महामुनि वाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्रेचाळिसावा सर्ग समाप्त झाला.॥४३॥

ह्याप्रमाणें ती उत्कृष्ट स्त्री कौसल्या विलाप करीत असतांना धर्मानें वागणारी सुमित्रा धर्माला अनुसरून असलेलें भाषण तिच्याशीं करूं लागली कीं १ " हे आर्ये, तुझा तो पुत्र सद्गुणी व पुरुषांमध्यें श्रेष्ठ आहे. तेव्हां तुझा हा विलाप आणि अशाप्रकारें दीनपणें रोदन करणें हें व्यर्थ आहे २. हे आर्ये, माहात्म्या व सत्यवादी पित्याची प्रतिज्ञा खरी

राज्यं महाबलः । साधु कुर्वन्महात्मानं पितरं सत्यवादिनम् ३ शिष्टाचरिते सम्यक्शश्वत्प्रेत्यफलोदये । रामो धर्मे स्थितः श्रेष्ठो न स शोच्यः कदाचन ४ वर्तते चोत्तमां वृत्तिं लक्ष्मणोस्मिन्सदानघः । दयावान्सर्वभूतेषु लाभस्तस्य महात्मनः ५ अरण्यवासे यद्दुःखं जानन्त्येव सुखोचिता । अनुगच्छति वैदेही धर्मात्मानं तवात्मजम् ६ कीर्तिभूतां पताकां यो लोके भ्रामयति प्रभुः । धर्मः सत्यव्रतपरः किं न प्राप्तस्तवात्मजः ७ व्यक्तं रामस्य विज्ञाय शौचं माहात्म्यमुत्तमम् । न गात्रमंशुभिः सूर्यः संतापयितुमर्हति ८ शिवः सर्वेषु कालेषु काननेभ्यो विनिःसृतः । राघवं युक्तशीतोष्णः सेविष्यति सुखोनिलः ९ शयानमनघं रात्रौ पितेवाभिपरिष्वजन् । घर्मघ्नः संस्पृशञ्छीतश्चन्द्रमा ह्लादयिष्यति १० ददौ चास्त्राणि दिव्यानि यस्मै ब्रह्मा महौजसे । दानवेन्द्रं हतं दृष्ट्वा तिमिध्वजसुतं रणे ११ स शूरः पुरुषव्याघ्रः स्वबाहुबलमाश्रितः । असंत्रस्तो ह्यरण्येसौ वेश्मनीव निवत्स्यते १२ यस्येषुपथमासाद्य विनाशं यान्ति शत्रवः । कथं न पृथिवी

---

करण्याकरितां राज्याचा त्याग करून जो तुझा महाबलाढ्य पुत्र गेला आहे ३ आणि परलोकीं ज्याचें फल नेहमीं चांगलें येतें अशा शिष्टांनीं आचरिलेल्या धर्माविषयीं जो रत आहे त्या श्रेष्ठ रामाबद्दल मुळींच शोक करण्याचें कारण नाहीं ४. निष्पाप लक्ष्मण याच्याशीं नेहमीं उत्कृष्ट रीतीनें वागत आहे व तो लक्ष्मण सर्व भूतांवर दया करणारा आहे. तेव्हां हें एक त्या महात्म्या रामाला सुखच आहे ५. नेहमीं सुख भोगण्याची संवय असलेली ही सीता जरी तुझ्या धर्मात्म्या पुत्राबरोबर जात आहे तरी वनवासामध्यें जें दुःख असतें तें जाणूनच जात आहे ६. आपली कीर्तिरूप पताका जो प्रभु नेहमीं जगतामध्यें फडकवीत आहे त्या तुझ्या धर्मस्वरूप व सत्यव्रतनिष्ठ पुत्राला काय प्राप्त होण्याचें राहिलें आहे ? ७. रामाचा उघड उघड असलेला निर्मलपणा आणि सर्वोत्कृष्ट मोठेपणा जाणून सूर्य त्याला आपल्या किरणांच्या योगानें ताप देणार नाहीं ८. सर्व कालीं वनांतून निघालेला आणि पाहिजे तसा शीत व उष्ण असलेला कल्याण कारक व सुखावह वायु रामाची सेवा करील ९. निष्पाप राम रात्रीं शयन करूं लागला असतां पिता जसा पुत्राला पोटाशीं कवटाळून धरितो त्याप्रमाणें संताप नाहींसा करणारा शीतल चंद्रमा आपल्या किरणांनीं स्पर्श करून त्याला आनंद देईल १०. शंबरासुरपुत्र दैत्यराज सुबाहूचा संग्रामामध्यें वध झाल्याचें पाहून ज्या महातेजस्वी रामाला ब्रह्मदेवानें दिव्य अस्त्रें दिलीं ११ तो शूर, पुरुषश्रेष्ठ व आपल्या बाहुबलावरच अवलंबून असणारा राम यत्किंचितूही

तस्य शासने स्थातुमर्हति १३ या श्रीः शौर्यं च रामस्य या च कल्याणसत्त्वता । निवृत्तारण्यवासः स्वं क्षिप्रं राज्यमवाप्स्यति १४ सूर्यस्यापि भवेत्सूर्यो ह्यग्नेरग्निः प्रभोः प्रभुः । श्रियाः श्रीश्च भवेदग्र्या कीर्त्याः कीर्तिः क्षमाक्षमा १५ दैवतं देवतानां च भूतानां भूतसत्तमः । तस्य के ह्यगुणा देवि वने वाप्यथवा पुरे १६ पृथिव्या सह वैदेह्या श्रिया च पुरुषर्षभः । क्षिप्रं तिसृभिरेताभिः सह रामोभिषेक्ष्यते १७ दुःखजं विसृजत्यश्रु निष्क्रामन्तमुदीक्ष्य यम् । आयोध्यायां जनः सर्वः शोकवेगसमाहतः १८ कुशचीरधरं वीरं गच्छन्तमपराजितम् । सीतेवानुगता लक्ष्मीस्तस्य किं नाम दुर्लभम् १९ धनुर्ग्रहवरो यस्य बाणखड्गास्त्रभृत्स्वयम् । लक्ष्मणो व्रजति ह्यग्रे तस्य किं नाम दुर्लभम् २० निवृत्तवनवासं तं द्रष्टासि पुनरागतम् । जहि शोकं च मोहं च देवि सत्यं ब्रवीमि ते २१ शिरसा चरणावेतौ वन्दमानमनिन्दिते । पुनर्द्रक्ष्यसि कल्याणि पुत्रं चन्द्रमिवो-

---

न भितां वराप्रमाणें अरण्यांत वास्तव्य करील १२. ज्याच्या बाणाच्या टप्प्यांत सांपडून शत्रु नाश पावतात त्याच्या आज्ञेत पृथ्वी तरी कशी बरें रहाणार नाहीं ? १३. रामाची शरीरकांति जशा प्रकारची दिसत आहे, त्याचें शौर्य ज्या प्रकारचें आढळण्यांत येत आहे आणि मनाचा चांगुलपणा त्याचे ठिकाणीं ज्याप्रकारचा दृष्टोत्पत्तीस येत आहे ह्यांवरून पहातां वनवास संपून त्याला लवकरच राज्य प्राप्त होईल ( असें दिसत आहे ) १४. सूर्याचाही सूर्य, अग्नीचाही अग्नि, प्रभूचाही प्रभु, श्रीचीही श्री, कीर्तिचीही कीर्ति, क्षमेचीही क्षमा, १५, देवतांचेंही दैवत आणि प्राण्यामध्येंही श्रेष्ठ असा जो राम त्याला, हे देवि, वनामध्यें अथवा नगरामध्यें दोषजनक अशा काय बरें गोष्टी आहेत ?१६. पृथ्वी, सीता आणि विजयलक्ष्मी ह्या तिन्ही स्त्रियांसहवर्तमान रामाला लवकरच अभिषेक होईल १७. ज्याला जातांना पाहून शोकातिशयानें घेरून गेलेले अयोध्येंतील सर्व लोक दुःखाश्रु ढाळीत आहेत १८ आणि कुश व वल्कलें धारण करून जाणाऱ्या ज्या अजिंक्य वीराच्या मागोमाग लक्ष्मीप्रमाणें सीता गेली आहे त्याला काय बरें दुर्लभ आहे ? १९. धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असा लक्ष्मण बाण, खड्ग आणि अस्त्रें धारण करून ज्याच्यापुढें जात आहे त्याला काय बरें दुर्लभ आहे ? २०. हे देवि, वनवास संपवून तो परत आलेला तूं पहाशील हें मी तुला सत्य सांगत आहें. ह्याकरितां, हे देवि, शोक व मोह ह्यांचा त्याग कर २१. हे निर्दोष कल्याणि, उदय पावलेल्या चंद्राप्रमाणें आल्हादकारक असा तुझा पुत्र ह्या तुझ्या चरणांना मस्तकानें प्रणाम करितांना तूं पुनरपि अवलोकन करशील २२ आणि

दितम् २२ पुनः प्रविष्टं दृष्ट्वा तमभिषिक्तं महाश्रियम् । समुत्स्रक्ष्यसि नेत्राभ्यां शीघ्रमानन्दजं जलम् २३ मा शोको देवि दुःखं वा न रामे दृश्यतेशिवम् । क्षिप्रं द्रक्ष्यसि पुत्रं त्वं ससीतं सह लक्ष्मणम् २४ त्वयाशेषो जनश्चायं समाश्वास्यो यतोनघे । किमिदानीमिदं देवि करोषि हृदि विक्लवम् २५ नार्हा त्वं शोचितुं देवि यस्यास्ते राघवः सुतः । न हि रामात्परो लोके विद्यते सत्पथे स्थितः २६ अभिवादयमानं तं दृष्ट्वा ससुहृदं सुतम् । मुदाश्रु मोक्ष्यसे क्षिप्रं मेघरेखेव वार्षिकी २७ पुत्रस्ते वरदः क्षिप्रमयोध्यां पुनरागतः । कराभ्यां मृदुपीनाभ्यां चरणौ पीडयिष्यति २८ अभिवाद्य नमस्यन्तं शूरं ससुहृदं सुतम् । मुदास्रैः प्रोक्षसे पुत्रं मेघराजिरिवाचलम् २९ आश्वासयन्ती विविधैश्च वाक्यैर्वाक्योपचारे कुशलानवद्या । रामस्य तां मातरमेवमुक्त्वा देवी सुमित्रा विरराम रामा ३० निशम्य तल्लक्ष्मणमातृवाक्यं रामस्य मातुर्नरदेवपत्न्याः । सद्यःशरीरे विननाश शोकः शरद्गतो मेघ इवाल्पतोयः ३१ [ १७९९ ] इत्यार्षे श्रीम-

---

पुनरपि नगरांत प्रविष्ट होऊन त्या महावैभवशाली रामाला अभिषेक झाल्याचें अवलोकन केल्यावर तूं आपल्या नेत्रांतून सत्वरच आनंदाश्रु ढाळूं लागशील २३. हे देवि, शोक अथवा दुःख करूं नको; रामासंबंधानें कांहींही अशुभ दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान तूं आपला पुत्र लवकरच अवलोकन करशील २४. हे निष्पापे देवि, ह्या सर्व लोकांना तूंच धीर देणें योग्य असतांना सांप्रत हें मनामध्यें असें काय दुःख करीत आहेस ? २५ ज्याअर्थी राम तुझा पुत्र आहे त्याअर्थी, हे देवि, त्याबद्दल शोक करणें तुला योग्य नाहीं. कारण, सर्व जगतामध्यें रामापेक्षां कोणीही सन्मार्गानें वागणारा नाहीं २६. सुहृदांसहवर्तमान तो आपला पुत्र अभिवंदन करीत असतांना अवलोकन करून वर्षाकालच्या मेघपंक्तीप्रमाणें तूं सत्वरच आनंदाश्रूंची वृष्टि करूं लागशील २७. दुसऱ्याचे मनोरथ परिपूर्ण करणारा तुझा पुत्र सत्वरच अयोध्येमध्यें परत येईल आणि कोमल व पुष्ट अशा आपल्या हातांनीं तुझे पाय धरील २८. सुहृदांसहवर्तमान तुझा शूर पुत्र चरणस्पर्शपूर्वक नमस्कार करूं लागला असतां पर्वताला सिंचन करणाऱ्या मेघपंक्तीप्रमाणें आनंदाश्रूंनीं तूं त्याला सिंचन करशील " २९. ह्याप्रमाणें संभाषणामध्यें कुशल असलेली निर्दोष व मनोहर राजपत्नी सुमित्रा धीर देण्याच्या उद्देशानें नानाप्रकारच्या शब्दांनीं रामाच्या त्या मातेला अशाप्रकारें सांगून स्वस्थ राहिली ३० व लक्ष्मणाच्या मातेचें तें भाषण श्रवण करून रामाची माता जी राजपत्नी कौसल्या तिच्या शरीरांतील शोक अल्प

द्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुश्चत्वारिंशः सर्गः॥४४॥

अनुरक्ता महात्मानं रामं सत्यपराक्रमम्। अनुजग्मुः प्रशान्तं तं वनवासाय मानवाः १ निवर्तितेऽपि च बलात्सुहृद्धर्मेण राजनि। नैव ते संन्यवर्तन्त रामस्यानुगता रथम् २ अयोध्यानिलयानां हि पुरुषाणां महायशाः। बभूव गुणसंपन्नः पूर्णश्चन्द्र इव प्रियः ३ स याच्यमानः काकुत्स्थस्ताभिः प्रकृतिभिस्तदा। कुर्वाणः पितरं सत्यं वनमेवान्वपद्यत ४ अवेक्षमाणः सस्नेहं चक्षुषा प्रपिबन्निव। उवाच रामः सस्नेहं ताः प्रजाः स्वाः प्रजा इव ५ या प्रीतिर्बहुमानश्च मय्ययोध्यानिवासिनाम्। मत्प्रियार्थं विशेषेण भरते सा विधीयताम् ६ स हि कल्याणचारित्रः कैकेय्यानन्दवर्धनः। करिष्यति यथावद्वः प्रियाणि च हितानि च ७ ज्ञानवृद्धो वयोबालो मृदुर्वीर्यगुणान्वितः। अनुरूपः स वो भर्ता भविष्यति भयापहः ८ स हि राजगुणैर्युक्तो युवराजः समीक्षितः। अपि

---

उदकानें युक्त असलेल्या शरदृतूंतील मेघाप्रमाणें तत्क्षणीं नाहींसा झाला ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चव्वेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४४ ॥

अमोघपराक्रमी व महात्मा राम वनवासाकरितां अरण्यांत जाऊं लागला असतां त्याच्यावर प्रेम करणारे लोक त्याच्या मागोमाग गेले १. मित्रधर्मानें अमात्यांनीं दशरथराजाला परत फिरविलें; परंतु, रामाच्या रथामागोमाग गेलेले लोक नाहींच परत फिरले २. कारण, तो महायशस्वी व गुणसंपन्न राम अयोध्येमध्यें वास्तव्य करणाऱ्या पुरुषांना पूर्णचंद्राप्रमाणें प्रिय झाला होता ३; परंतु, ते प्रजाजन परत फिरण्याविषयीं ककुत्स्थकुलोत्पन्न रामाची प्रार्थना करीत असतांनाही पित्याला सत्य करण्याचा उद्देश मनांत धरून राम वनामध्येंच चालला ४; आणि दृष्टीनें पानच करीत आहे कीं काय अशा रीतीनें त्या प्रजाजनाकडे सप्रेमदृष्टि देऊन आपलीं मुलेंच कीं काय अशारीतीनें राम प्रेमपूर्वक त्यांना ह्मणाला ५ " अयोध्यावासी लोकांचें जें माझ्यावर प्रेम असेल व माझ्याविषयीं जो त्यांना बहुमान वाटत असेल तें सर्व माझें प्रिय करण्याकरितां भरताचे ठिकाणीं त्यांनीं करावें ६. त्याचें आचरण उत्कृष्ट असून तो कैकयीचा आनंद वृद्धिंगत करणारा आहे आणि तो तुह्मांला प्रिय व हितावह अशा गोष्टी अगदीं पूर्णपणें करील ७. वयानें बाल परंतु ज्ञानानें वृद्ध, शौर्यगुणांनीं युक्त व सौम्य असा तो भरत तुह्मांला योग्य व तुमचें भय दूर करणारा राजा होईल ८. माझ्यापेक्षांही उत्कृष्ट अशा राजगुणांनीं तो युक्त आहे व त्यालाच यौवराज्याचा अभिषेक

चापि मया शिष्टैः कार्यं वो भर्तृशासनम् ९ न संतप्येद्यथा चासौ वनवास गते मयि । महाराजस्तथा कार्यो मम प्रियचिकीर्षया १० यथा यथा दाशरथिर्धर्ममेवाश्रितो भवेत् । तथा तथा प्रकृतयो रामं पतिमकामयन् ११ बाष्पेण पिहितं दीनं रामः सौमित्रिणा सह । चकर्षेव गुणैर्बद्धं जनं पुरनिवासिनम् १२ ते द्विजास्त्रिविधं वृद्धा ज्ञानेन वयसौजसा । वयःप्रकम्पशिरसो दूरादूचुरिदं वचः १३ वहन्तो जवना रामं भो भो जात्यास्तुरङ्गमाः । निवर्तध्वं न गन्तव्यं हिता भवत भर्तरि १४ कर्णवन्ति हि भूतानि विशेषेण तुरङ्गमाः । यूयं तस्मान्निवर्तध्वं याचनां प्रतिवेदिताः १५ धर्मतः स विशुद्धात्मा वीरः शुभदृढव्रतः । उपवाह्यस्तु वो भर्ता नापवाह्यः पुराद्वनम् १६ एवमार्तप्रलापांस्तान्वृद्धान्प्रलपतो द्विजान् । अवेक्ष्य सहसा रामो रथादवततार ह १७ पद्भ्यामेव जगामाथ ससीतः सह लक्ष्मणः । संनिकृष्टपदन्यासो रामो वनपरायणः १८ द्विजातीन्हि पदा-

---

करण्याविषयीं राजानें निश्चय केला आहे. ह्यास्तव, तुम्ही आपल्या राजाच्या आज्ञेप्रमाणें वागा ९ आणि मी वनवासांत गेल्यावर ज्या रीतीनें हा महाराज संतप्त होणार नाहीं त्या रीतीनें माझें प्रिय करण्याकरितां तुम्ही व्यवस्था करा " १०. ह्याप्रमाणें जसजसा दाशरथिराम धर्मालाच अनुसरून वागूं लागला तसतसा त्या प्रजाजनांना रामच आपणाला पति पाहिजे असें वाटूं लागलें ११ आणि अश्रूंनीं ज्यांचे नेत्र भरून गेलेले आहेत अशा त्या नगरवासी दीन जनांना लक्ष्मणासहवर्तमान राम आपल्या गुणांनीं बांधून टाकून जसा कांहीं ओढनच नेऊं लागला १२. तेव्हां, ज्ञान, वय आणि तेज ह्या तिहीं प्रकारांनीं वृद्ध झालेले ते द्विज वय झाल्यामुळें मान हालवीत हालवीत दुरूनच ह्मणाले १३ "हे रामाला ओढून नेणाऱ्या जातिवंत व वेगवान् अश्वांनो, तुम्ही परत फिरा; जाऊं नका, आपल्या मालकाचें कल्याण करा १४. अरे, प्राण्यांना कान आहेत आणि विशेषेंकरून अश्वांचे कान तर अधिक तिखट आहेत. तस्मात् , तुम्ही आमच्या ह्या याचनेकडे लक्ष्य देऊन परत फिरा १५. धर्मदृष्ट्या पाहूं गेलें असतां शुद्ध अंतःकरणानें युक्त आणि शुभ व दृढ व्रत चालविणाऱ्या तुम्ही आपल्या वीर प्रभूला नगरांतच आणणें योग्य आहे; नगरांतून तुम्ही त्याला वनांत नेणें उचित नाहीं " १६. ह्याप्रमाणें दुःखानें विलाप करीत करीत बोलत असलेल्या त्या वृद्ध द्विजांना अवलोकन करून राम, एकाएकीं रथांतून खालीं उतरला १७ आणि वनांत जाण्याविषयीं तत्पर झालेला तो राम जवळ जवळ पाउलें टाकून सीता व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान पायानेंच चालला १८. कारण, पायांनीं येत

तांस्तान्रामश्चारित्रवत्सलः। न शशाक घृणाचक्षुः परिमोक्तुं रथेन सः १९ गच्छन्तमेव तं दृष्ट्वा रामं संभ्रान्तमानसाः। ऊचुः परमसंतप्ता रामं वाक्यमिदं द्विजाः २० ब्राह्मण्यं कृत्स्नमेतत्त्वां ब्रह्मण्यमनुगच्छति। द्विजस्कन्धाधिरूढास्त्वामग्नयोऽप्यनुयान्त्वमी २१ वाजपेयसमुत्थानि छत्राण्येतानि पश्य नः। पृष्ठतोऽनुप्रयातानि मेघानिव जलात्यये २२ अनवाप्तातपत्रस्य रश्मिसंतापितस्य ते। एभिश्छायां करिष्यामः स्वैःछत्रै-र्वाजपेयकैः २३ या हि नः सततं बुद्धिर्वेदमन्त्रानुसारिणी। त्वत्कृते सा कृता वत्स वनवासानुचारिणी २४ हृदयेष्ववतिष्ठन्ते वेदा ये नः परं धनम्। वत्स्यन्त्यपि गृहेष्वेव दाराश्चारित्ररक्षिताः २५ पुनर्न निश्चयः कार्यस्त्वद्गतौ सुकृता मतिः। त्वयि धर्मव्यपेक्षे तु किं स्याद्धर्मपथे स्थितम् २६ याचितो नो निवर्तस्व हंसशुक्लशिरोरुहैः। शिरोभिर्निभृताचार महीपतनपांसुलैः २७ बहूनां वितता यज्ञा द्विजानां य इहागताः।

असलेल्या त्या ब्राह्मणांकडे रथामध्यें बसून कृपादृष्टि करण्यास सदाचरणाची पर्वा बाळगणारा तो राम समर्थ झाला नाहीं. १९ असो. (आपल्या प्रार्थनेकडे लक्ष्य न देतां) राम पुढेंच जात आहे असें अवलोकन करून मनामध्यें गोंधळून गेलेले ते ब्राह्मण अतिशय संतप्त होऊन त्याला ह्मणाले २० "हा सर्व ब्राह्मणसमूह ब्राह्मणांच्या हिताविषयीं दक्ष असलेल्या तुझ्या मागोमाग येत आहे ह्मणून त्यांच्या खांद्यावर असलेल्या ह्या अग्नींनाही तुझ्या मागोमाग येऊं दे २१. शरदृतूंतील मेघाप्रमाणें वाजपेय यागांत प्राप्त झालेलीं हीं आमचीं श्वेत छत्रें तुझ्या मागोमाग आलेलीं अवलोकन कर २२. छत्र बरोबर नसल्यामुळें सूर्यकिरणांनीं संतप्त झालेल्या तुला ह्या वाजपेय यागसंबंधीं स्वतःच्या छत्रांनीं आह्मी छाया करूं २३. आमची मति जी नेहमीं वेदमंत्रांच्या अभ्यासाकडे असते ती आज, हे वत्सा, वनवासाकडे लाविलेली आहे २४. वेद हें आमचें मुख्य धन तें तर आमच्या हृदयामध्येंच आहे आणि पातिव्रत्यधर्म रक्षण करण्यास समर्थ असल्यामुळें आमच्या स्त्रिया घरामध्येंच वास्तव्य करणार आहेत. तेव्हां तुझ्या मागोमाग येण्याला आह्मांला कसलीच अड-चण नाहीं २५. तुझ्या बरोबर जाण्याचा आह्मी पक्का विचार केलेला आहे; आतां आमचा पुनरपि निश्चय होणें राहिलें नाहीं. ( तथापि आह्मी तुला कांहीं सांगत आहोंत ) अरे, तूंच जर धर्माची पर्वा बाळगीनासा झालास तर धर्म मार्गानें कोण बरें वागणार आहे ? २६ तस्मात् , हे अत्यंत धर्मनिष्ठ, हंस पक्ष्या-प्रमाणें ज्यांचे केस शुभ्रवर्ण झाले आहेत आणि भूमीवर पडल्यामुळें जीं धूलियुक्त

तेषां समाप्तिरायत्ता तव वत्स निवर्तने २८ भक्तिमन्तीह भूतानि जङ्गमाजङ्गमानि च । याचमानेषु तेषु त्वं भक्तिं भक्तेषु दर्शय २९ अनुगन्तुमशक्तास्त्वां मूलैरुद्धतवेगिनः । उन्नता वायुवेगेन विक्रोशन्तीव पादपाः ३० निश्चेष्टाहारसंचारा वृक्षैकस्थाननिश्चिताः । पक्षिणोऽपि प्रयाचन्ते सर्वभूतानुकम्पनम् ३१ एवं विक्रोशतां तेषां द्विजातीनां निवर्तने । ददृशे तमसा तत्र वारयन्तीव राघवम् ३२ ततः सुमन्त्रोऽपि रथाद्विमुच्य श्रान्तान्हयान्संपरिवर्त्य शीघ्रम् । पीतोदकांस्तोयपरिप्लुताङ्गानचारयद्वै तमसाविदूरे ३३ [१८३२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चचत्वारिंशः सर्गः ॥ ४५ ॥

ततस्तु तमसातीरं रम्यमाश्रित्य राघवः । सीतामुद्वीक्ष्य सौमित्रिमिदं वचनमब्रवीत् १ इयमद्य निशा पूर्वा सौमित्रे प्रहिता वनम् । वनवासस्य

---

झालेलीं आहेत अशा मस्तकांनीं आह्मी तुझी प्रार्थना केली आहे तेव्हां तूं परत फीर २७. येथें आलल्यांपैकीं पुष्कळ ब्राह्मणांच्या यज्ञाची समाप्ति, हे वत्सा रामा, तुझ्या परत फिरण्यावर अवलंबून राहिली आहे. तेव्हां यज्ञ विध्वंस करून वनांत जाणें तुला योग्य नाहीं. २८ स्थावरजंगमात्मक प्राण्यांची तुझे ठिकाणीं भक्ति आहे; तेव्हां परत फिरण्याविषयीं ते प्राणी तुझी प्रार्थना करीत असतांना तूंही त्या भक्तांचे ठिकाणीं आपलें प्रेम दाखीव २९. मुळांनीं जखडून गेल्यामुळें ज्यांची गति अगदीं खुंटली आहे आणि ह्मणूनच तुझ्या मागोमाग जाण्यास जे तयार आहेत असे उंच उंच वृक्ष वायूच्या योगानें जसें कांहीं परत फिरण्याविषयीं तुला ओरडून सांगत आहेत ३०. चलनवलन व आहारार्थ गमन या दोहोंचाही त्याग करून वृक्षरूप एकाच ठिकाणावर निश्चयानें स्थित असलेले हे पक्षीही सर्व प्राण्यांचे ठिकाणीं दया करणाऱ्या तुझी याचना करीत आहेत ३१. ह्याप्रमाणें परत फिरण्याविषयीं ते ब्राह्मण आक्रोश करीत असतांना रामाला अडथळा करण्या करितांच आली कीं काय अशी ती तमसानदी दृष्टीं पडूं लागली ३२. तेव्हां सुमंत्र सारथ्यानेंही श्रमलेले घोडे रथापासून सोडिले आणि श्रम परिहार करण्याकरितां भूमीवर लोळून सत्वर उठल्यानंतर त्यांना पाणी पाजून व धुऊन तमसानदीच्या जवळ त्यानें त्यांना वैरण घातली ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंचेचाळिसावा सर्ग समाप्त झाला. ॥४५॥

तदनंतर तमसानदीच्या रम्य तीराचा आश्रय केल्यावर सीतेकडे पाहून राम लक्ष्मणाला ह्मणाला १ "हे लक्ष्मणा, वनवाससंबंधीं ही आज पहिलीच रात्र आली आहे

भद्रं ते न चोत्कण्ठितुमर्हसि २ पश्य शून्यान्यरण्यानि रुदन्तीव *समन्ततः । यथानिलयमायद्भिर्निलीनानि मृगद्विजैः ३ अद्यायोध्या तु नगरी राजधानी पितुर्मम । सस्त्रीपुंसा गतानस्माञ्छोचिष्यति न संशयः ४ अनुरक्ता हि मनुजा राजानं बहुभिर्गुणैः । त्वां च मां च नरव्याघ्र शत्रुघ्नभरतौ तथा ५ पितरं चानुशोचामि मातरं च यशस्विनीम् । अपि नान्धौ भवेतां नौ रुदन्तौ तावभीक्ष्णशः ६ भरतः खलु धर्मात्मा पितरं मातरं च मे । धर्मार्थकामसहितैर्वाक्यैराश्वासयिष्यति ७ भरतस्यानृशंसत्वं संचिन्त्याहं पुनः पुनः । नानुशोचामि पितरं मातरं च महाभुज ८ त्वया कार्यं नरव्याघ्र मामनुव्रजता कृतम् । अन्वेष्टव्या हि वैदेह्या रक्षणार्थं सहायता ९ अद्भिरेव हि सौमित्रे वत्स्याम्यद्य निशामिमाम् । एतद्धि रोचते मह्यं वन्येपि विविधे सति १० एवमुक्त्वा तु सौमित्रिं सुमन्त्रमपि राघवः । अप्रमत्तस्त्वमश्वेषु भव सौम्येत्यु-

---

कारण, आजपासूनच वनवासाच्या मुदतीला आरंभ झाला आहे. तस्मात्, आजपासून तूं आतां उत्सुकतेमुळें अयोध्येचें वगैरे स्मरण करीत जाऊं नकोस २. आपआपल्या निवासस्थानाला येणाऱ्या पशुपक्ष्यांच्या योगानें व्याप्त झालेलीं हीं शून्य अरण्यें आपल्याला पाहून ( आंत पशुपक्ष्यांची किलबिल चाललली असल्यामुळें ) सर्व बाजूंनीं जशी कांहीं रडत आहेत तीं पहा ३. आज माझ्या पित्याची राजधानी अयोध्या नगरी स्त्रीपुरुषांसहवर्तमान वनांत गेलेल्या आपणांबद्दल शोक करील ह्यांत संशय नाहीं ४. कारण, हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, राजा, तूं, मी आणि भरतशत्रुघ्न ह्यांचे ठिकाणीं अनेक कारणांमुळें अयोध्येंतील लोक प्रीति करीत आहेत ५. पिता आणि यशस्विनी माता ह्या दोहोंबद्दल मला वाईट वाटत आहे. कारण, आपणांकरितां तीं एकसारखीं रडून रडून अंध तर होणार नाहींत नां ! ६. ( अथवा त्यांच्याबद्दल आपण शोक करणें व्यर्थच आहे. ) कारण, धर्म हाच ज्याचा उद्देश आहे असा धर्मात्मा भरत इच्छेनुरूप भाषणांनीं माझ्या पित्याला व मातेला खरोखर धीर देईल ७. तर्व्हां, हे महापराक्रमी लक्ष्मणा, भरताच्या अक्रूरत्वाचा पुन्हां पुन्हां विचार केला म्हणजे पित्याबद्दल आणि मातेबद्दल मला वाईट वाटेनासें होतें ८. हे पुरुषश्रेष्ठा, माझ्या मागोमाग येऊन तूं एक कामच केलें आहेस. नाहींतर सीतेच्या रक्षणाकरितां कोणाचें तरी सहाय्य घेणें भाग होतें ९. हे लक्ष्मणा, ही आजची रात्र आपण उदकावरच काढूं. कारण, अनेक प्रकारचें वन्य भक्ष्य जरी आहे तरी हेंच मला बरें वाटत आहे " १०. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून " हे सौम्या, आश्वांविषयीं सावधपणानें

वाच ह ११ सोऽश्वान्सुमन्त्रः संयम्य सूर्येऽस्तं समुपागते। प्रभूतयवमान्कृत्वा बभूव प्रत्यनन्तरः १२ उपास्य तु शिवां संध्यां दृष्ट्वा रात्रिमुपागताम्। रामस्य शयनं चक्रे सूतः सौमित्रिणा सह १३ तां शय्यां तमसातीरे वीक्ष्य वृक्षदलैर्युताम्। रामः सौमित्रिणा सार्धं सभार्यः संविवेश ह १४ सभार्यं संप्रसुप्तं तु श्रान्तं संप्रेक्ष्य लक्ष्मणः। कथयामास सूताय रामस्य विविधान्गुणान् १५ जाग्रतोरेव तां रात्रिं सौमित्रेरुदितो रविः। सूतस्य तमसातीरे रामस्य ब्रुवतो गुणान् १६ गोकुलाकुलतीरायास्तमसाया विदूरतः। अवसत्तत्र तां रात्रिं रामः प्रकृतिभिः सह १७ उत्थाय च महातेजाः प्रकृतीस्ता निशाम्य च। अब्रवीद्भ्रातरं रामो लक्ष्मणं पुण्यलक्षणम् १८ अस्मद्व्यपेक्षान्सौमित्रे निर्व्यपेक्षान्गृहेष्वपि। वृक्षमूलेषु संसक्तान्पश्य लक्ष्मण सांप्रतम् १९ यथैते नियमं पौराः कुर्वन्त्यस्मन्निवर्तने। अपि प्राणान्न्यसिष्यन्ति न तु त्यक्ष्यन्ति निश्चयम् २० यावदेव

---

रहा " असें सुमंत्र सारथ्यालाही रामानें सांगितलें ११. तेव्हां अश्वांना बांधून सूर्य अस्ताला गेल्यानंतर सुमंत्रानें त्यांना पुष्कळ वैरण घातली आणि मग तो त्यांच्या अगदीं जवळ येऊन बसला १२. रात्र पडूं लागल्याचें आढळून आल्यावर कल्याणकारक अशी सायंसंध्याकरून लक्ष्मणासहवर्तमान सुमंत्र सारथ्यानें रामाकरितां ( कांहीं प्रदेशावरील धोंडे वगैरे काढून टाकून ) शय्या तयार केली १३. तेव्हां लक्ष्मणासहवर्तमान सुमंत्र सारथ्यानें तमसानदीचे तीरीं वृक्षांचीं पानें घालून तयार केलेली ती शय्या अवलोकन केल्यावर भार्येसहवर्तमान रामानें शयन केलें १४. नंतर भार्येसहवर्तमान श्रांत झालेल्या रामाला गाढ झोंप लागली आहे असें अवलोकन करून लक्ष्मण त्या सारथ्याला रामाचे अनेक गुण सांगूं लागला १५. त्या उभयतांनीं ती रात्र जागरणांतच काढिली व लक्ष्मण रामाचे गुण त्या तमसानदीच्या तीरीं सुमंत्र सारथ्याला सांगत असतांनाच सूर्योदयाचा समय प्राप्त झाला १६. गाईंच्या कळपांनीं जिचें तीर व्याप्त झालेलें आहे अशा तमसानदीचे तीरीं ब्राह्मण उतरले होते; तेथून बऱ्याच दूर प्रदेशावर रामानें प्रजाजनांसहवर्तमान त्या रात्रीं वास्तव्य केलें १७ आणि सकाळीं उठल्यावर त्या लोकांकडे पाहून उत्कृष्ट लक्षणांनीं युक्त असलेल्या भ्रात्या लक्ष्मणाला तो महातेजस्वी राम ह्मणाला १८ " हे सुमित्रानंदन लक्ष्मणा, घराचीही पर्वा न बाळगितां आमचीच अपेक्षा धरून वृक्षाच्या मुळाशीं पडलेले हे लोक सांप्रत अवलोकन कर १९. मला परत फिरविण्याविषयीं हे लोक कसा यत्न करीत आहेत हें मी समजत आहे; हे प्राणसुद्धां देतील; परंतु, आपला निश्चय

तु संसुप्तास्तावदेव वयं लघु । रथमारुह्य गच्छामः पन्थानमकुतोभयम् २१ अतो भूयोपि नेदानीमिक्ष्वाकुपुरवासिनः । स्वपेयुरनुरक्ता मां वृक्षमूलेषु संश्रिताः २२ पौरा ह्यात्मकृताद्दुःखाद्विप्रमोच्या नृपात्मजैः । न तु खल्वात्मना योज्या दुःखेन पुरवासिनः २३ अब्रवील्लक्ष्मणो रामं साक्षाद्धर्ममिव स्थितम् । रोचते मे तथा प्राज्ञ क्षिप्रमारुह्यतामिति २४ अथ रामोब्रवीत्सूतं शीघ्रं संयुज्यतां रथः । गमिष्यामि ततोरण्यं गच्छ शीघ्रमितः प्रभो २५ सूतस्ततः संत्वरितः स्यन्दनं तैर्हयोत्तमैः । योजयित्वा तु रामस्य प्राञ्जलिः प्रत्यवेदयत् २६ अयं युक्तो महाबाहो रथस्ते रथिनां वर । त्वरयारोह भद्रं ते ससीतः सह लक्ष्मणः २७ तं स्यन्दनमधिष्ठाय राघवः सपरिच्छदः । शीघ्रगामाकुलावर्तां तमसामतरन्नदीम् २८ स संतीर्य महाबाहुः श्रीमाञ्छिवमकण्टकम् । प्रापद्यत महामार्गमभयं भय-

सोडणार नाहींत २० ह्याकरितां हे गाढ निद्रेमध्यें आहेत तोंच आपण हलकेंच उठून रथावर आरूढ होऊं आणि ( जिकडे हे येण्याचा संभव नाहीं अशा ) निर्भय मार्गाला चालते होऊं २१; म्हणजे आतां फिरून तरी माझ्यावर प्रेम करणाऱ्या ह्या अयोध्यावासी लोकांना वृक्षमूलांच्या मुळाशीं येऊन पडण्याचा प्रसंग येणार नाहीं २२. आपणांकरितां जर लोकांना दुःख होत असेल तर राजकुमारांनीं त्यांना दुःखांतून मुक्त केलें पाहिजे आपल्याकरितां लोकांना दुःख होऊं देणें खरोखर योग्य नाहीं " २३. ह्यानंतर धर्माची प्रत्यक्ष मूर्तीच कीं काय अशा रामाला लक्ष्मण म्हणाला "हे प्राज्ञ, मला तसेंच पसंत आहे; आपण सत्वर रथावर आरूढ व्हा " .२४ ह्यानंतर राम सारथ्याला म्हणाला " लवकर रथ जोड म्हणजे आपण अरण्यांत जाऊं. हे समर्थ सुमंत्रा, येथून लवकर चल " २५. ह्याप्रमाणें रामानें त्वरा केली असतां सारथ्यानें उत्कृष्ट अश्व रथाला जोडिले आणि हात जोडून तो रामाला म्हणाला २६ "हे महापराक्रमी रथिश्रेष्ठ, हा रथ जोडून तयार आहे. आपलें देव बरें करो. सीता व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान आपण सत्वर आरूढ व्हा " २७. तदनंतर सामानसुमान बरोबर घेऊन राम रथावर आरूढ झाला; वेगानें वाहणारी व घोटाळा करणाऱ्या भोंवऱ्यांनीं युक्त असलेली तमसानदी उतरून गेला २८ आणि ती नदी उतरून गेल्यावर तो महापराक्रमी व वैभवशाली राम कल्याणकारक, कंटकरहित[१] आणि

१ राजनीतीचें हें उदात्त तत्त्व राज्य हांकणाऱ्यांनीं आपल्या हृत्पटलावर नेहमीं खोदून ठेविलें पाहिजे. ह्या तत्त्वांनीं वागणारे राज्यकार्यधुरंधर पुरुष ज्या देशांत असतील त्या देशांतील प्रजा सूर्य चंद्र आहेत तोंपर्यंत पूर्ण राजनिष्ठ राहील.

दर्शिनाम् २९ मोहनार्थं तु पौराणां सूतं रामोऽब्रवीद्वचः । उदङ्मुखः प्रयाहि त्वं रथमारुह्य सारथे ३० मुहूर्तं त्वरितं गत्वा निवर्तय रथं पुनः । यथा न विद्युः पौरा मां तथा कुरु समाहितः ३१ रामस्य तु वचः श्रुत्वा तथा चक्रे च सारथिः । प्रत्यागम्य च रामस्य स्यन्दनं प्रत्यवेदयत् ३२ तौ संप्रयुक्तं तु रथं समास्थितौ तदा ससीतौ रघुवंशवर्धनौ । प्रचोदयामास ततस्तुरङ्गमान्ससारथिर्येन पथा तपोवनम् ३३ ततः समास्थाय रथं महारथः स सारथिर्दाशरथिर्वनं ययौ । उदङ्मुखं तं तु रथं चकार प्रयाणमाङ्गल्यनिमित्तदर्शनात् ३४ [१८६६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षट्चत्वारिंशः सर्गः ॥ ४६ ॥

प्रभातायां तु शर्वर्यां पौरास्ते राघवं विना । शोकोपहतनिश्चेष्टा बभूवुर्हतचेतसः १ शोकजाश्रुपरिद्यूना वीक्षमाणास्ततस्ततः । आलोकमपि रामस्य न पश्यन्ति स्म दुःखिताः २ ते विषादार्तवदना रहितास्तेन

भित्र्या लोकांचीही भीति घालविणाऱ्या राजमार्गाला लागला २९. जातांना बरोबर आलेल्या आयोध्यावासी लोकांना मोह पडावा एतदर्थ राम सारथ्याला ह्मणाला "हे सारथे, रथावर आरूढ होऊन तूं प्रथम उत्तरेकडे तोंड करून चल ३०. आणि मुहूर्तपर्यंत तसें जाऊन पुनरपि रथ परत फिरीव. सारांश, आयोध्येंतील लोकांना माझा पत्ता न लागल अशा रीतीनें तूं दक्ष राहून व्यवस्था कर" ३१. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर सारथ्यानें तसें केलें आणि परत येऊन रथ तयार असल्याचें त्यानें पुनरपि रामाला सांगितलें ३२. तेव्हां उत्तम रीतीनें जोडिलेल्या रथावर सीतिसहवर्तमान ते रघुवंशवर्धक रामलक्ष्मण आरूढ झाले असतां त्या सुमंत्र सारथ्यानें तपोवनाला जाणाऱ्या मार्गानें घोडे हांकले ३३. असो. (सारथ्यानें रथ फिरवून आणिल्या) नंतर सारथ्यासहवर्तमान महारथि दशरथपुत्र राम त्या रथावर आरूढ होऊन वनामध्यें गेला आणि प्रयाणाला अपेक्षित असा शुभ शकुन उत्तरेस झाल्यामुळें त्याचें फल मिळावें एतदर्थ प्रथम त्यानें रथ उदङ्मुख उभा केला आणि नंतर त्याच्यावर आरूढ झाल्यानंतर दक्षिणेकडे तोंड करून तो वनांत गेला ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रारामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शेहेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥४६॥

रात्र उजाडल्यानंतर रामावांचून असलेल्या त्या आयोध्यावासी लोकांना कांहीं सुचेनासें झालें आणि शोकानें घेरल्यामुळे ते अगदीं निश्चेष्ट पडले १. दुःखाश्रूंनीं खिन्न झालेले ते लोक इकडे तिकडे पाहूं लागले; परंतु त्या दुःखित लोकांना रथाची धूळ

धीमता । कृपणाः करुणा वाचो वदन्ति स्म मनीषिणः ३ धिगस्तु खलु निद्रां तां ययापहृतचेतसः । नाद्य पश्यामहे रामं पृथूरस्कं महाभुजम् ४ कथं रामो महाबाहुः स तथावितथक्रियः । भक्तं जनमभित्यज्य प्रवासं तापसो गतः ५ यो नः सदा पालयति पिता पुत्रानिवौरसान् । कथं रघूणां स श्रेष्ठस्त्यक्त्वा नो विपिनं गतः ६ इहैव निधनं याम महाप्रस्थानमेव वा । रामेण रहितानां नो किमर्थं जीवितं हितम् ७ सन्ति शुष्काणि काष्ठानि प्रभूतानि महान्ति च । तैः प्रज्वाल्य चितां सर्वे प्रविशामोथवा वयम् ८ किं वक्ष्यामो महाबाहुरनसूयः प्रियं वदः । नीतः स राघवोस्माभिरिति वक्तुं कथं क्षमम् ९ सा नूनं नगरी दीना दृष्ट्वास्मान्राघवं विना । भविष्यति निरानन्दा सस्त्रीबालवयोधिका १० निर्यातास्तेन वीरेण सह नित्यं महात्मना । विहीनास्तेन च पुनः कथं द्रक्ष्याम तां पुरीम् ११ इतीव बहुधा वाचो बाहुमुद्यम्य ते जनाः । विलपन्ति स्म दुःखार्ता हृत-

वगैरे कांहींच सुगावा रामासंबंधानें दृष्टोत्पत्तीस येईना २. तेव्हां त्या विचारी रामाचा वियोग झाल्यामुळें त्यांच्या मुद्रा खिन्न व दुःखित झाल्या आणि ते बिचारे विचारी लोक दैन्ययुक्त शब्द बोलूं लागले ३. ( ते ह्मणाले ) जिनें आमचें अंतःकरण घेरल्यामुळें विशाल वक्षस्थलानें युक्त असलेला महापराक्रमी राम आज आमच्या दृष्टीं पडत नाहीं त्या निद्रेला धिक्कार असो ४. कधींहीं खोटें कर्म न करणारा तो महापराक्रमी तपस्वी राम आह्मां भक्तजनांचा त्याग करून कसा हो, प्रवासाला गेला ! ५. औरस पुत्रांचें परिपालन करणाऱ्या पित्याप्रमाणें जो आमचें नेहमीं परिपालन करितो तो रघुवंशजश्रेष्ठ राम आह्मांला टाकून अरण्यांत कसा गेला ! ६. आतां आह्मी येथेंच प्रायोपवेशन करून मरावें अथवा ( मरणदीक्षापूर्वक उदङ्मुख होऊन ) महाप्रस्थानाला तरी जावें. कारण, रामाचा वियोग झाला असतां जीवितापासून आह्मांला कोणती फलप्राप्ति होणार आहे ! ७. येथें वाळलेलीं काष्ठें पुष्कळ व मोठमोठीं अशीं आहेत तर त्यांनीं तयार केलेली चिता पेटवून देऊन आपण सर्व तिच्यामध्यें प्रवेश तरी करूं ८. ( अयोध्येंत जाऊन ) आपण सांगावें तरी काय ! मत्सररहित आणि प्रिय भाषण करणाऱ्या महापराक्रमी रामाला आह्मी वनामध्यें पोंचविलें असें सांगणें आह्मांला योग्य कसें होईल ! ९. रामावांचून आह्मांला आलेले पाहून ती दीन नगरी स्त्रिया, बाल आणि वृद्ध ह्यांसहवर्तमान खरोखर दुःखित होईल १०. त्या महात्म्या वीराबरोबर जर आपण नगरांतून बाहेर पडलों तर त्याच्याशिवाय आतां आपण ती नगरी पहावी तरी कशी ! " ११. ह्याप्रकारें वत्सहरण करून नेलेल्या उत्कृष्ट

वत्सा इवाग्र्यगाः १२ ततो मार्गानुसारेण गत्वा किंचित्ततः क्षणम् । मार्गनाशाद्विषादेन महता समभिप्लुताः १३ रथमार्गानुसारेण न्यवर्तन्त मनस्विनः । किमिदं किं करिष्यामो दैवेनोपहता इति १४ तदा यथागतेनैव मार्गेण क्लान्तचेतसः । अयोध्यामगमन्सर्वे पुरीं व्यथितसज्जनाम् १५ आलोक्य नगरीं तां च क्षयव्याकुलमानसाः । आवर्तयन्त तेऽश्रूणि नयनैः शोकपीडितैः १६ एषा रामेण नगरी रहिता नातिशोभते । आपगा गरुडेनेव ह्रदादुद्धृतपन्नगा १७ चन्द्रहीनमिवाकाशं तोयहीनमिवार्णवम् । अपश्यन्निहतानन्दं नगरं ते विचेतसः १८ ते तानि वेश्मानि महाधनानि दुःखेन दुःखोपहता विशन्तः । नैव प्रजग्मुः स्वजनं परं वा निरीक्षमाणाः प्रविनष्टहर्षाः १९ [ १८८५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तचत्वारिंशः सर्गः ॥ ४७ ॥

तेषामेव विषण्णानां पीडितानामतीव च । बाष्पविप्लुतनेत्राणां सशो-

---

गाईप्रमाणें दुःखाकुल झालेले ते लोक हात वर करून नानाप्रकारचे शब्द उच्चारून विलाप करूं लागले १२. तदनंतर ते रथाच्या मार्गाला अनुसरून क्षणभर तिकडे गेले; परंतु, पुढें मार्गच नाहींसा झाल्यामुळें ते अत्यंत खिन्न झाले १३ आणि "हे काय ? आतां आम्हीं काय करावें ! आपणांला दैवानेंच पछाडिलें आहे" असें ह्मणत ह्मणत रथाच्याच मार्गाला अनुसरून ते बिचारे लोक परत फिरले १४. नंतर अंतःकरणामध्यें कष्टी होऊन गेलेले ते सर्वजण त्याच मार्गानें जिच्यांतील सज्जन दुःखित झाले आहेत अशा अयोध्यानगरीला परत आले १५. ती नगरी अवलोकन करून हर्षनाशामुळें त्यांचीं अंतःकरणें अगदीं व्याकुळ झालीं आणि शोकपीडित होऊन नेत्रांतून ते अश्रु ढाळूं लागले १६ ( व ह्मणाले )" डोहांतून गरुडानें सर्प काढून नेले असतां स्तब्ध झालेल्या नदीप्रमाणें रामरहित झालेली ही नगरी चांगलीशी शोभत नाहीं १७. सारांश, चंद्रहीन आकाशाप्रमाणें अथवा उदकशून्य सागराप्रमाणें आनंदशून्य झालेलें नगर त्या भांबावून गेलेल्या लोकांनीं अवलोकन केलें १८. आणि हर्ष नाहींसा होऊन दुःखानें पछाडलेले ते लोक कष्टानें मोठमोठ्या मौल्यवान् घरामध्यें शिरूं लागले असतां हें घर आपलें किंवा परक्याचें हेंही त्यांना भान नाहींसें झालें व आंतील माणसें आपलीं किंवा दुसऱ्याचीं हें ते पाहूं लागले असतांही त्यांना कळेनासें झालें १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्तेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४७ ॥

ह्याप्रमाणें अश्रूंनीं नेत्र भरून आलेले, शोकाकुल, खिन्न, अत्यंत दुःखित व कांहीं एक

कानां मुमूर्षया १ अभिगम्य निवृत्तानां रामं नगरवासिनम् । उद्गतानीव सत्वानि बभूवुरमनस्विनाम् २ स्वं स्वं निलयमागम्य पुत्रदारैः समावृताः । अश्रूणि मुमुचुः सर्वे बाष्पेण पिहिताननाः ३ न चाहृष्यन्नचामोदन्वणिजो न प्रसारयन् । न चाशोभन्त पण्यानि नापचन्गृहमेधिनः ४ नष्टं दृष्ट्वा नाभ्यनन्दन्विपुलं वा धनागमम् । पुत्रं प्रथमजं लब्ध्वा जननी नाभ्यनन्दत ५ गृहे गृहे रुदत्यश्च भर्तारं गृहमागतम् । व्यगर्हयन्तदुःखार्ता वाग्भिस्तोत्रैरिव द्विपान् ६ किं नु तेषां गृहैः कार्यं किं दारैः किं धनेन वा । पुत्रैर्वापि सुखैर्वापि ये न पश्यन्ति राघवम् ७ एकः सत्पुरुषो लोके लक्ष्मणः सह सीतया । योनुगच्छति काकुत्स्थं रामं परिचरन्वने ८ आपगाः कृतपुण्यास्ताः पद्मिन्यश्च सरांसि च । येषु यास्यति काकुत्स्थो विगाह्य सलिलं शुचि ९ शोभयिष्यन्ति काकुत्स्थमटव्यो रम्यकाननाः । आपगाश्च महानूपाः सानुमन्तश्च पर्वताः १० काननं वापि शैलं वा यं रामोनुगमिष्यति । प्रियातिथिमिव प्राप्तं नैनं शक्ष्य-

---

सूचनासें झालेले असे नगरवासी लोक रामाकडे जाऊन परत आले असतां मरण येईल तर बरें असें त्यांना वाटूं लागलें व जीव गेल्याप्रमाणें ते निस्तेज झाले १, २. आपल्या घरीं गेल्यावर बायकांमुळें त्यांच्या भोंवताली जमलीं, तेव्हां अश्रूंनीं त्यांचीं मुखें व्याप्त होऊन ते सर्वजण रोदन करूं लागले ३. नगरामध्यें कोणाला हर्ष होईना, कोणाला आनंद वाटेना, उद्मी लोक ( विक्रीचे जिन्नस दुकानांतून ) मांडून ठवीनासे झाले, मांडून ठेविलेले जिन्नस शोभेनासे झाले व घरंदाज लोक स्वयंपाकही करीनासे झाले ४. नष्ट झालेली वस्तु सांपडली असतां अथवा पुष्कळ द्रव्य मिळालें असतांही कोणाला आनंद होईनासा झाला व पहिल्याच खेपेस पुत्र झाला तरी स्त्रीला आनंद होईनासा झाला ५. घरांघरीं स्त्रिया रोदन करूं लागल्या आणि अंकुशांनीं ज्याप्रमाणें गजांना टोंचावें त्याप्रमाणें भर्ता गृहीं आल्यावर त्या दुःखाकुल स्त्रिया शब्दांनीं त्याची निंदा करूं लागल्या ६. ( त्या ह्मणाल्या ) " रामाचें ज्यांना दर्शन होत नाहीं त्यांना घरें, स्त्रिया, धन, पुत्र अथवा सुख ह्यांच्याशीं काय कर्तव्य आहे ? ७. जगतामध्यें लक्ष्मण हाच एक सत्पुरुष आहे. कारण, तो रामाची शुश्रूषा करण्याकरितां सीतेसहवर्तमान वनामध्यें त्याच्या मागोमाग गेला आहे ८. ककुत्स्थकुलोत्पन्न राम ज्यांच्या पवित्र उदकामध्यें स्नान करून जाईल त्या नद्या, तीं सरोवरें आणि त्या कमलयुक्त वापी पुण्यवान् होत ९. रम्य वृक्षसमुदायांनीं युक्त असलेलीं अरण्यें, नद्या, मोठमोठे जलमय देश आणि शिखरयुक्त पर्वत रामाला शोभा आणितील १०. ज्या वनामध्यें

न्त्यनर्चितुम् ११ विचित्रकुसुमापीडा बहुमञ्जरिधारिणः । राघवं दर्शयिष्यन्ति नगा भ्रमरशालिनः १२ अकाले चापि मुख्यानि पुष्पाणि च फलानि च । दर्शयिष्यन्त्यनुक्रोशाद्गिरयो राममागतम् १३ प्रस्रविष्यन्ति तोयानि विमलानि महीधराः । विदर्शयन्तो विविधान्भूयश्चित्रांश्च निर्झरान् १४ पादपाः पर्वताग्रेषु रमयिष्यन्ति राघवम् । यत्र रामो भयं नात्र नास्ति तत्र पराभवः १५ स हि शूरो महाबाहुः पुत्रो दशरथस्य च । पुरा भवति नो दूरादनुगच्छाम राघवम् १६ पादच्छायासुखं भर्तुस्ताद‍ृशस्य महात्मनः । स हि नाथो जनस्यास्य स गतिः स परायणम् १७ वयं परिचरिष्यामः सीतां यूयं च राघवम् । इति पौरस्त्रियो भर्तॄन्दुःखार्तास्तत्तदब्रुवन् १८ युष्माकं राघवोरण्ये योगक्षेमं विधास्यति । सीता नारीजनस्यास्य योगक्षेमं करिष्यति १९ को न्वनेनाप्रतीतेन सोत्कण्ठितजनेन च । संप्रीयेतामनोज्ञेन वासेन हृतचेतसा २० कैकेय्या यदि चेद्राज्यं स्यादधर्म्यमनाथवत् । न हि नो जीवितेनार्थः कुतः पुत्रैः

---

अथवा ज्या पर्वतावर राम जाईल तीं वनें अथवा ते पर्वत प्रिय अतिथि प्राप्त झाला आहे असें समजून त्याचें आदरातिथ्य केल्याशिवाय रहाणार नाहींत ११. भ्रमरांच्या योगानें शोभणारे आश्चर्यकारक पुष्पांचा तुरा लाविलेले आणि असंख्य पुष्पगुच्छ धारण करणारे वृक्ष रामाला दर्शन देतील १२. राम आला असतां करुणेमुळें (आपल्यावरील वृक्षांच्या द्वारानें) पर्वत अकालीं सुद्धां उत्कृष्ट पुष्पें व फलें त्याला दर्शवितील १३. नानाप्रकारचे अद्भुत प्रवाह दाखविण्याकरितां पर्वत निर्मल उदकांचा स्राव करूं लागतील १४. पर्वतांच्या माथ्यांवर वृक्ष रामाला रंजवितील ज्या ठिकाणीं राम आहे तेथें भय नाहीं व पराभवही नाहीं १५. तो दशरथपुत्र महापराक्रमी राम 'अजून आपल्यापासून फारसा लांब गेला नाहीं तोंच आपण त्याच्या मागोमाग जाऊं १६. तशाप्रकारच्या महात्म्या प्रभूची पादच्छाया सुखाचें साधन आहे. कारण, तोच ह्या लोकांचा नाथ असून तोच आमची गति व मुख्य आधार आहे १७. आह्मी सीतेची सेवा करूं व तुह्मी रामाची सेवा करा'' असें त्या नगरवासी लोकांच्या स्त्रिया दुःखाकुल होऊन आपआपल्या पतींना ह्मणूं लागल्या १८. "वनामध्यें राम तुमचा योगक्षेम चालवील आणि आह्मा बायका मनुष्यांचा योगक्षेम सीता चालवील १९. असुखकारक, खेदजनक व भ्रांतिकारक असें रामाची हुरहुर लागलेल्या लोकांसहवर्तमान होणारें येथील वास्तव्य कोणाला बरें रुचणार आहे ? २०. कैकेयीच्या हातींच जर राज्य रहावयाचें असेल तर तें

कुतो धनैः २१ यया पुत्रश्च भर्ता च त्यक्तावैश्वर्यकारणात् । कं मा परिहरेदन्यं कैकेयी कुलपांसनी २२ कैकेय्या न वयं राज्ये भृतका हि वसमहि । जीवन्त्या जातु जीवन्त्यः पुत्रैरपि शपामहे २३ या पुत्रं पार्थिवेन्द्रस्य प्रवासयति निर्घृणा । कस्तां प्राप्य सुखं जीवेदधर्म्यां दुष्टचारिणीम् २४ उपद्रुतमिदं सर्वमनालम्भमनायकम् । कैकेय्यास्तु कृते सर्वं विनाशमुपयास्यति २५ न हि प्रव्राजिते रामे जीविष्यति महीपतिः । मृते दशरथे व्यक्तं विलोपस्तदनन्तरम् २६ ते विषं पिबतालोड्य क्षीणपुण्याः सुदुःखिताः । राघवं वानुगच्छध्वमश्रुतिं वापि गच्छत २७ मिथ्याप्रव्राजितो रामः सभार्यः सह लक्ष्मणः । भरते संनिबद्धाः स्म सौनिके पशवो यथा २८ पूर्णचन्द्राननः श्यामो गूढजत्रुररिन्दमः । आजानुबाहुः पद्माक्षो रामो लक्ष्मणपूर्वजः २९ पूर्वाभिभाषी मधुरः सत्यवादी

---

अधर्मानें युक्त आणि ह्मणूनच अनाथासारिखेंच होणार. अशा राज्यांत राहून आह्मांला जीविताशींही कांहीं कर्तव्य नाहीं. मग पुत्रांची आणि द्रव्याची पर्वा बाळगणार कोण ! २१. ऐश्वर्याकरितां जिनें आपल्या पुत्राचा व भर्त्याचा त्याग केला ती कुलाला कलंक लावणारी कैकेयी ( ऐश्वर्याकरितां ) दुसऱ्या कोणाचा बरें त्याग करण्याला मागें पुढें पहाणार आहे ! २२. कैकेयी जिवंत असतांना तिनें जरी आमचें पोषण केलें तरी जिवांत जीव आहे तोंपर्यंत आह्मांला तिच्या राज्यांत रहाणें नाहीं हें आह्मी आपल्या पुत्रांची शपथ वाहून सांगतों २३. अहो, राजाधिराज दशरथाच्या पुत्राला जी निर्दय स्त्री वनांत हांकून देते त्या अधर्मनिष्ठ व दुराचारिणी स्त्रीशीं प्रसंग आला असतां कोण बरें सुखानें जगणार आहे ? २४. ह्या सर्व जगताला उपद्रव झालेला आहे, ह्यांत कोणी नायक नाहींसा झाला आहे आणि येथें यज्ञयागाचाही नायनाट झाला आहे. तेव्हां कैकेयीकरितां ह्या सर्वांचा नाश होणार २५. राम वनांत गेल्यावर भूपति दशरथ जिवंत रहाणार नाहीं व दशरथ मेल्यानंतर सर्वांचा नाश होणें स्पष्टच दिसत आहे २६. तस्मात्, तुह्मा पुरुषांचें आतां पुण्य संपलें आहे आणि तुह्मीं अत्यंत दुःखित झाला आहांत. तेव्हां तुह्मीं वीष तरी वाटून प्या, रामाच्या तरी मागोमाग चालते व्हा किंवा जेथें ह्या कैकेयीचें नांवसुद्धां कानावर येणार नाहीं अशा ठिकाणीं तरी निघून जा २७. भार्या आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान रामाला कपटानें हांकून दिलें आहे आणि खाटिकाच्या स्वाधीन केलेल्या पशूप्रमाणें आह्मांला भरतापाशीं डांबून ठेविलें आहे २८. पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त, श्यामवर्ण, गूढ जत्रूनें[1] युक्त, शत्रुद-

---

१ मानेचें हाड.

महाबलः । सौम्यश्च सर्वलोकस्य चन्द्रवत्प्रियदर्शनः ३० नूनं पुरुषशार्दूलो मत्तमातङ्गविक्रमः । शोभयिष्यत्यरण्यानि विचरन्स महारथः ३१ तास्तथा विलपन्त्यस्तु नगरे नागरस्त्रियः । चुक्रुशुर्दुःखसंतप्ता मृत्योरिव भयागमे ३२ इत्येवं विलपन्तीनां स्त्रीणां वेश्मसु राघवम् । जगामास्तं दिनकरो रजनी चाभ्यवर्तत ३३ नष्टज्वलनसंतापा प्रशान्ताध्यायसत्कथा । तिमिरेणानुलिप्तेव यदा सा नगरी बभौ ३४ उपशान्तवणिक्पण्या नष्टहर्षा निराश्रया । अयोध्यानगरी चासीन्नष्टतारमिवाम्बरम् ३५ तदा स्त्रियो रामनिमित्तमातुरा यथा सुते भ्रातरि वा विवासिते । विलप्य दीना रुरुदुर्विचेतसः सुतैर्हि तासामधिकोपि सोभवत् ३६ प्रशान्तगीतोत्सवनृत्यवादना व्यभ्रष्टहर्षापिहितापणोदया । तदा ह्ययोध्या नगरी बभूव सा महार्णवः संक्षपितोदको यथा ३७ [ १९२२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डेष्टचत्वारिंशः सर्गः ॥ ४८ ॥

---

मन करणारा, आजानुबाहु, कमलनयन, लक्ष्मणाचा ज्येष्ठ भ्राता आपण होऊन पूर्वी भाषण करणारा, मधुरवचनी, सत्यवादी, महाबलाढ्य, सौम्य, सर्वांना दर्शनीय, चंद्राप्रमाणें प्रियदर्शन आणि मत्त गजाप्रमाणें चालणारा पुरुषश्रेष्ठ महारथी राम खरोखर अरण्यांना शोभा आणील " २९,३०,३१. ह्याप्रमाणें नगरामध्यें विलाप करीत असलेल्या त्या नगरवासी लोकांच्या स्त्रिया मृत्यूचें भय जवळ आल्याप्रमाणेंच कीं काय दुःखानें संतप्त होऊन आक्रोश करूं लागल्या ३२ व ह्याप्रमाणें आपआपल्या घरांतून स्त्रिया रामाकरितां विलाप करीत असतांना सूर्य अस्तास जाऊन रात्र पडली ३३. तेव्हां हामाकरितांसुद्धां त्या नगरीमध्यें कोणी अग्नि प्रज्वलित केला नाहीं; अध्ययन व गोष्टी हीं तर अगदीं नाहींशीं झालीं आणि ती नगरी अंधकारानें व्याप्त झाल्यासारिखी दिसूं लागली ३४. वाण्यांचीं दुकानें बंद झालीं, हर्ष नाहींसा झाला, लोकांचा आश्रय तुटल्यासारिखा झाला आणि अशाप्रकारें ती अयोध्यानगरी नक्षत्रशून्य आकाशाप्रमाणें निस्तेज दिसूं लागली ३५. पुत्राला अथवा भ्रात्याला वनांत हांकून लाविल्याप्रमाणें स्त्रिया रामाकरितां दुःखित झाल्या आणि कसलेंही भान न रहातां विलाप करकरून त्या रडूं लागल्या. कारण, त्यांना तो राम पुत्रापेक्षांही अधिक प्रिय झाला होता ३६. तात्पर्य, अयोध्यानगरीमध्यें गायन, उत्सव, नृत्य आणि वादन ह्यांचा अगदीं शुकशुकाट झाला, हर्ष नाहींसा झाला, दुकानें उघडून माल मांडणें बंद झालें आणि अशाप्रकारें ती अयोध्यानगरी उदक नाहींसें झालेल्या महासागराप्रमाणें शून्य झाली ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-

रामोपि रात्रिशेषेण तेनैव महदन्तरम् । जगाम पुरुषव्याघ्रः पितुराज्ञामनुस्मरन् १ तथैव गच्छतस्तस्य व्यपायाद्रजनी शिवा । उपास्य तु शिवां सन्ध्यां विषयानत्यगाहत २ ग्रामान्विकृष्टसीमान्तान्पुष्पितानि वनानि च । पश्यन्नतिययौ शीघ्रं शरैरिव हयोत्तमैः ३ शृण्वन्वाचो मनुष्याणां ग्रामसंवासवासिनाम् । राजानं धिग्दशरथं कामस्य वशमास्थितम् ४ हा नृशंसाद्य कैकेयी पापा पापानुबन्धिनी । तीक्ष्णासंभिन्नमर्यादा तीक्ष्णकर्मणि वर्तते ५ या पुत्रमीदृशं राज्ञः प्रवासयति धार्मिकम् । वनवासे महाप्राज्ञं सानुक्रोशं जितेन्द्रियम् ६ अहो दशरथो राजा निःस्नेहः स्वसुतं प्रति । प्रजानामनघं रामं परित्यक्तुमिहेच्छति ७ एता वाचो मनुष्याणां ग्रामसंवासवासिनाम् । शृण्वन्नतिययौ वीरः कोसलान्कोसलेश्वरः ८ ततो वेदश्रुतिं नाम शिववारिवहां नदीम् । उत्तीर्याभिमुखः प्रायादगस्त्याध्युषितां दिशम् ९ गत्वा तु सुचिरं कालं ततः शीतवहां नदीम् । गोमतीं गोयु-

---

संज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्ठेचाळिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ४८ ॥

( ब्राह्मणांना चुकविल्यानंतर ) जी कांहीं रात्र अवशेष राहिली होती ती रात्र उजडेपर्यंत पुरुषश्रेष्ठ रामही पित्याची आज्ञा लक्ष्यांत घेऊन बराच लांब गेला १. त्याचप्रमाणें जातां जातां ती सुखावह रात्र संपली आणि प्रातःकालीं कल्याणदायक अशी प्रातःसंध्या करून तो राम आपला देश ओलांडून पुढें गेला २. ज्यांच्या सीमा अगदीं एकमेकाला लागलेल्या आहेत असे गांव आणि प्रफुल्लित वनें अवलोकन करीत करीत धनुष्यापासून सुटलेल्या बाणाप्रमाणें वेगवान् अशा उत्कृष्ट अश्वांच्या योगानें राम सत्वर चालता झाला ३. जातांना गांव आणि खेडींपाडीं ह्यांत रहाणाऱ्या लोकांचीं पुढील भाषणें त्याच्या कानावर येत होतीं " धिक्कार असो ह्या विषयाधीन होऊन बसलेल्या दशरथराजाला ! ४. कायरे तरीही दुष्ट व पापी कैकेयी ! पापकर्म करण्याविषयीं ही तत्पर आहे हिचें दर्शनही भयंकर आहे आणि मर्यादा सोडून ही घोर कर्म करण्यास उद्युक्त झाली आहे ५. कारण, अशाप्रकारच्या धर्मनिष्ठ, महाज्ञानी, दयाळु व जितेंद्रिय राजपुत्राला ती वनवासाकरितां हांकून देत आहे ६. कायहो हा दशरथराजा आपल्या पुत्रासंबंधानें निर्दय आहे ! अहो, प्रजाजनांना प्रिय असलेल्या ह्या निरपराधी रामाचा त्याग करण्याची तो इच्छा करीत आहे " ७. अशा प्रकारचीं गांव व खेडीं ह्यांत रहाणाऱ्या मनुष्यांचीं भाषणें श्रवण करीत करीत तो कोसलाधिपति वीर राम कोसलदेश ओलांडून पुढें गेला ८. तदनंतर मंगलकारक उदक वहाणारी वेदश्रुतिनामक नदी उतरून तो दक्षिण दिशेकडे तोंड करून

तानूपामतरत्सागरङ्गमाम् १० गोमतीं चाप्यतिक्रम्य राघवः शीघ्रगैर्हयैः । मयूरहंसाभिरुतां ततार स्यन्दिकां नदीम् ११ स महीं मनुना राज्ञा दत्तामिक्ष्वाकवे पुरा । स्फीतां राष्ट्रवृतां रामो वैदेहीमन्वदर्शयत् १२ सूत इत्येव चाभाष्य सारथिं तमभीक्ष्णशः । हंसमत्तस्वरः श्रीमानुवाच पुरुषोत्तमः १३ कदाहं पुनरागम्य सरय्वाः पुष्पिते वने । मृगयां पर्यटिष्यामि मात्रा पित्रा च संगतः १४ नात्यर्थमभिकाङ्क्षामि मृगयां सरयूवने । रतिर्ह्येषातुला लोके राजर्षिगणसंमता १५ राजर्षीणां हि लोकेऽस्मिन्नत्यर्थं मृगया वने । काले कृतां तां मनुजैर्धन्विनामभिकाङ्क्षिताम् १६ स तमध्वानमैक्ष्वाकः सूतं मधुरया गिरा । तं तमर्थमभिप्रेत्य ययौ वाक्यमुदीरयन् १७ [१५३९] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनपञ्चाशः सर्गः ॥ ४९ ॥

---

चालला ९. आणि नंतर बऱ्याच वेळानें शीत जलानें युक्त अशा गोमती नदीला जाऊन गाईंनीं भरलेले जलप्राय देश जिच्यामध्यें आहेत आणि जी सागराला जाऊन मिळालेली आहे अशी ती गोमतीनदी तो उतरून गेला १०. गोमतीही ओलांडिल्यावर शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांच्या योगानें तो रघुवंशज राम मयूर आणि हंस ह्यांच्या ध्वनींनीं युक्त असलेली स्यंदिका नदी तरून गेला ११. जातांना मनुराजानें पूर्वीं इक्ष्वाकुला दिलेली समृद्ध व इतर देशांनीं मर्यादित झालेली ( कोशलदेशरूप ) भूमि त्या रामानें सीतेला दाखविली १२. नंतर सूता ह्मणून दीर्घस्वरानें त्या सारथ्याला वारंवार हाक मारून मत्त हंसासारिख्या स्वरानें युक्त असलेला तो पुरुषश्रेष्ठ वैभवशाली राम त्याला ह्मणाला १३ " पुनरपि स्वदेशाला परत येऊन मातापितरांची भेट झाल्यावर सरयूनदीचे तीरीं असलेल्या प्रफुल्लित वनामध्यें मी कधीं बरें मृगया करीन ? १४. सरयूच्या वनामध्यें मृगया करण्याची मला फारशी उत्कंठा नाहीं; परंतु, जगतामध्यें ही क्रीडा राजर्षिगणाला संमत असल्यामुळें सर्वथाच निषिद्ध आहे असें नाहीं १५. ह्या जगामध्यें राजर्षि करमणूक होण्याकरितां वनामध्यें मृगया करीत असत आणि श्राद्धाचा वगैरे समय प्राप्त झाला असतां मनुपुत्रांनींही तिचा स्वीकार केलेला आहे. परंतु, धनुर्धाऱ्यांना इष्ट असलेल्या ह्या मृगयेची मला फारशी उत्कंठा नाहीं " १६. ह्याप्रमाणें वेगळ्या वेगळ्या विषयाला उद्देशून सारथ्याशीं मधुर वाणीनें भाषण करीत करीत तो इक्ष्वाकुवंशज राम त्या मार्गाचें आक्रमण करूं लागला १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकुणपन्नासावा सर्ग समाप्त झाला ॥ ४९ ॥

विशालान्कोसलान्रम्यान्यात्वा लक्ष्मणपूर्वजः । अयोध्यामुन्मुखो धीमान्प्राञ्जलिर्वाक्यमब्रवीत् १ आपृच्छे त्वां पुरिश्रेष्ठे काकुत्स्थपरिपालिते । दैवतानि च यानि त्वां पालयन्त्यावसन्ति च २ निवृत्तवनवासस्त्वामनृणो जगतीपतेः । पुनर्द्रक्ष्यामि मात्रा च पित्रा च सह संगतः ३ ततो रुचिरताम्राक्षो भुजमुद्यम्य दक्षिणम् । अश्रुपूर्णमुखो दीनोब्रवीज्जनपदं जनम् ४ अनुक्रोशो दया चैव यथार्हं मयि वः कृता । चिरं दुःखस्य पापीयो गम्यतामर्थसिद्धये ५ तेभिवाद्य महात्मानं कृत्वा चापि प्रदक्षिणम् । विलपन्तो नरा घोरं व्यतिष्ठंश्च क्वचित्क्वचित् ६ तथा विलपतां तेषामतृप्तानां च राघवः । अचक्षुर्विषयं प्रागाद्यथार्कः क्षणदामुखे ७ ततो धान्यधनोपेतान्दानशीलजनाञ्छिवान् । अकुतश्चिद्भयान्रम्यांश्चैत्ययूपसमावृतान् ८ उद्यानाम्रवणोपेतान्संपन्नसलिलाशयान् । तुष्टपुष्टजनाकीर्णान्गोकुलाकुलसेवितान् ९ रक्षणीयान्नरेन्द्राणां ब्रह्मघोषाभिनादितान् ।

---

विस्तृत आणि रमणीय अशा कोसल देशाला गेल्यानंतर बुद्धिमान् रामानें अयोध्येकडे तोंड केलें आणि हात जोडून तिला ह्मणाला १ " हे काकुत्स्थरक्षित श्रेष्ठ नगरि, मी तुझा निरोप घेतों आणि ज्या देवता तुझें रक्षण करीत असून तुझे ठिकाणीं वास्तव्य करीत असतात त्यांचीही मी प्रार्थना करितों २. वनवास परिपूर्ण होऊन मी भूपतीच्या ऋणांतून मुक्त झालों ह्मणजे मातापितरांशीं संगत होऊन मी पुनरपि तुझें दर्शन घेईन " ३. त्यानंतर अश्रूंनीं ज्याचें मुख भरून गेलें आहे आणि मनोहर व आरक्तवर्ण नेत्रांनीं जो युक्त आहे तो दीन राम उजवा हात वर करून ( आपल्या दर्शनाकरितां तेथें आलेल्या ) स्वदेशांतील लोकांना ह्मणाला ४ " तुह्मी योग्यते प्रमाणें माझे ठिकाणीं आदरबुद्धि व दया केली आहे; परंतु, मला आतां पुष्कळ दिवसपर्यंत अशुभ स्थितीचा अनुभव घेणें आहे. ह्यास्तव तुह्मी आतां जा; आह्मीही आपला उद्देश सिद्धीस नेण्याकारितां आतां पुढें जातों " ५. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर त्या लोकांनीं त्या महात्म्याला अभिवंदन करून प्रदक्षिणा केली आणि घोर विलाप करीत करीत ते लोक ठिकठिकाणीं उभे राहिले ६. तेव्हां रामाच्या दर्शनाविषयीं तृप्त न झालेले ते लोक विलाप करीत असतांना प्रदोषसमयीं ज्याप्रमाणें सूर्य दृष्टीच्या टप्प्यांतून निघून जातो त्याप्रमाणें राम त्यांच्या दृष्टीच्या अटोक्यांतून पलीकडे गेला ७. तदनंतर धनधान्यसंपन्न, दानशूर पुरुषांनीं युक्त, कल्याणकारक, सर्वथा निर्भय, रम्य, देवताधिष्ठानभूत वृक्षांनीं व यज्ञस्तंभांनीं व्याप्त ८, उपवनें, आम्रवृक्षांचीं वनें आणि समृद्ध जलाशय ह्यांनीं युक्त, संतुष्ट अशा प्रजाजनांनीं व्याप्त९

रथेन पुरुषव्याघ्रः कोसलानत्यवर्तत १० मध्येन मुदितं स्फीतं रम्योद्यानसमाकुलम्। राज्यं भोज्यं नरेन्द्राणां ययौ धृतिमतां वरः ११ तत्र त्रिपथगां दिव्यां शीततोयामशैवलाम्। ददर्श राघवो गङ्गां रम्यामृषिनिषेविताम् १२ आश्रमैरविदूरस्थैः श्रीमद्भिः समलंकृताम्। कालेऽप्सरोभिर्हृष्टाभिः सेविताम्भोहृदां शिवाम् १३ देवदानवगन्धर्वैः किंनरैरुपशोभिताम्। नागगन्धर्वपत्नीभिः सेवितां सततं शिवाम् १४ देवाक्रीडशताकीर्णां देवोद्यानयुतां नदीम्। देवार्थमाकाशगतां विख्यातां देवपद्मिनीम् १५ जलाघाताट्टहासोग्रां फेननिर्मलहासिनीम्। क्वचिद्वेणीकृतजलां क्वचिदावर्तशोभिताम् १६ क्वचित्स्तिमितगम्भीरां क्वचिद्वेगसमाकुलाम्। क्वचिद्गम्भीरनिर्घोषां क्वचिद्भैरवनिःस्वनाम् १७ देवसङ्घाप्लुतजलां निर्मलोत्पलसंकुलाम्। क्वचिदाभोगपुलिनां क्वचिन्निर्मलवालु-

---

गाईच्या खिल्लारांनीं अतिशय गजबजून गेलेला, राजांनीं रक्षण करण्यास योग्य व वेदघोषानें नादित असा कोसल देश रथानें ओलांडून तो पुरुषश्रेष्ठ राम पलीकडे गेला १० व तो देश ओलांडिल्यावर मध्यगतीनें धैर्यवानांमध्यें श्रेष्ठ असलेला तो राम इतर राजांच्या ताब्यांत असलेल्या आनंदित, समृद्ध व रमणीय उपवनांनीं व्याप्त अशा देशांतून चालला ११. (अयोध्येच्या राज्यापासून दक्षिण दिशेस असलेल्या) त्या देशामध्यें रामानें तीन मार्गांनीं जाणारी, दिव्य, रमणीय, ऋषींनीं सेवित, शीत उदकानें युक्त आणि शेवाळें नसलेली अशी गंगा अवलोकन केली १२. तीरापासून जवळच असलेल्या भव्य आश्रमांनीं ती भूषित झालेली होती आणि क्रीडासमयीं अप्सरा आनंदित होऊन त्या पुण्यगंगेच्या डोहाचा आश्रय करीत असत १३. देव, दानव, गंधर्व आणि किन्नर ह्यांच्या योगानें तिला शोभा आलेली होती व नागपत्न्या आणि गंधर्व पत्न्या त्या शुभ गंगेचें सतत सेवन करीत होत्या १४. देवांच्या शेकडों क्रीडापर्वतांनीं ती नदी गजबजलेली होती, देवांच्या उपवनांनीं ती युक्त होती आणि देवांकरितां आकाशामध्यें गेलेल्या त्या गंगेमध्यें देवानांच उपभोग घेण्यास योग्य अशीं सुवर्ण कमलें होतीं १५. जलाघातरूप अट्टहासामुळें ती उग्र दिसत होती, फेनरूप निर्मल हास्यानें ती युक्त होती, कोठें कोठें आंत येऊन मिळालेल्या उदकामुळें ती वेणीसारखी दिसत होती आणि कोठें कोठें भोंवऱ्यांनीं तिला शोभा आलेली होती १६. कोठें कोठें ती निश्चल व गंभीर होती, कांहीं ठिकाणीं वेगानें ती खवळून गेली होती, कोठें कोठें गंभीर ध्वनीनें ती युक्त होती आणि कोठें कोठें भयंकर शब्दांनेंही ती संपन्न होती १७. देवगण तिच्या उदका-

काम् १८ हंससारससंघुष्टां चक्रवाकोपशोभिताम् । सदा मत्तैश्च विहगैरभिपन्नामनिन्दिताम् १९ क्वचित्तीररुहैर्वृक्षैर्मालाभिरिव शोभिताम् । क्वचित्फुल्लोत्पलच्छन्नां क्वचित्पद्मवनाकुलाम् २० क्वचित्कुमुदखण्डैश्च कुड्मलैरुपशोभिताम् । नानापुष्परजोध्वस्तां समदामिव च क्वचित् २१ व्यपेतमलसंघातां मणिनिर्मलदर्शनाम् । दिशागजैर्वनगजैर्मत्तैश्च वरवारणैः २२ देवराजोपवाह्यैश्च संनादितवनान्तराम् । प्रमदामिव यत्नेन भूषितां भूषणोत्तमैः २३ फलपुष्पैः किसलयैर्वृतां गुल्मैर्द्विजैस्तथा । विष्णुपादच्युतां दिव्यामपापां पापनाशिनीम् २४ शिशुमारैश्च नक्रैश्च भुजङ्गैश्च समन्विताम् । शंकरस्य जटाजूटाद्भ्रष्टां सागरतेजसा २५ समुद्रमहिषीं गङ्गां सारसक्रौञ्चनादिताम् । आससाद महाबाहुः शृङ्गवेरपुरं प्रति २६ तामूर्मिकलिलावर्तामन्ववेक्ष्य महारथः । सुमन्त्रमब्रवीत्सूतमिहै-

---

मध्यें येऊन स्नान करीत होते, निर्मल कमलांनीं ती व्याप्त झालेली होती, कोठें कोठें तिच्या तीरीं विस्तृत वाळवंटें होतीं आणि कोठें कोठें निर्मल वाळूनें ती युक्त झाली होती १८. हंस व सारस पक्ष्यांनीं ती नादित झालेली होती, चक्रवाक पक्ष्यांनीं तिला शोभा आलेली होती आणि त्या निर्दोष गंगेचा नेहमीं मत्त असलेल्या पक्ष्यांनीं आश्रय केलेला होता १९. कोठें कोठें तीरावर वाढलेल्या वृक्षांमुळें माळा घातल्याप्रमाणें तिला शोभा आलेली होती, कोठें कोठें प्रफुल्लित कमलांनीं ती आच्छादिलेली होती आणि कोठें कोठें कमलवनांनीं ती गजबजून राहिलेली होती २०. कोठें कोठें उमलूं लागलेल्या कमलकलिकांच्या समूहांनीं तिला शोभा आलेली होती आणि कोठें कोठें अनेक प्रकारच्या पुष्पपरागांनीं युक्त झाल्यामुळें ती मत्त स्त्रीप्रमाणें दिसत होती २१. पापसमूह जिनें नाहींसा केला आहे अशा त्या गंगेचें स्वरूप मोत्यांप्रमाणें निर्मल दिसत होतें; दिग्गज, वनगज आणि सुराधिपतींनाच बसण्यास योग्य अशा इतर श्रेष्ठ गजांनीं तिच्या तीरावरील वनें नादित झालेलीं होती आणि यत्नपूर्वक उत्कृष्ट भूषणांनीं भूषित केलेल्या स्त्रीप्रमाणें ती दिसत होती २२, २३. कारण, दिव्य, पापरहित आणि पापनाशक अशी ती विष्णुपदापासून च्युत झालेली गंगा फलें, पुष्पें, पल्लव, झुडपें आणि पक्षी ह्यांनीं व्याप्त झालेली होती २४. जळमाकड, मगर आणि भुजंग ह्यांनीं ती युक्त होती आणि भगीरथाच्या तपश्चर्येमुळें शंकराच्या जटाकलापापासून ती भ्रष्ट झालेली होती २५. असो. सारस व क्रौंच पक्ष्यांनीं नादित झालेली ती समुद्रपत्नी गंगा महापराक्रमी रामाला शृंगवेरपुराजवळ लागली २६. तेव्हां जिच्यांतील भोंवऱ्यांमध्यें लाटा मिसळल्या आहेत अशा

वाद्य वसामहे २७ अविदूरादयं नद्या बहुपुष्पप्रवालवान् । सुमहानिंगुदीवृक्षो वसामोत्रैव सारथे २८ प्रेक्षामि सरितां श्रेष्ठां संमान्यसलिलां शिवाम् । देवमानवगन्धर्वमृगपन्नगपक्षिणाम् २९ लक्ष्मणश्च सुमन्त्रश्च बाढमित्येव राघवम् । उक्त्वा तमिङ्गुदीवृक्षं तदोपययतुर्हयैः ३० रामोभियाय तं रम्यं वृक्षमिक्ष्वाकुनन्दनः । रथादवतरत्तस्मात्सभार्यः सह लक्ष्मणः ३१ सुमन्त्रोप्यवतीर्याथ मोचयित्वा हयोत्तमान् । वृक्षमूलगतं राममुपतस्थे कृताञ्जलिः ३२ तत्र राजा गुहोनाम रामस्यात्मसमः सखा । निषादजात्यो बलवान्स्थपतिश्चेति विश्रुतः ३३ स श्रुत्वा पुरुषव्याघ्रं रामं विषयमागतम् । वृद्धैः परिवृतोमात्यैर्ज्ञातिभिश्चाप्युपागतः ३४ ततो निषादाधिपतिं दृष्ट्वा दूरादुपस्थितम् । सह सौमित्रिणा रामः समागच्छद्गुहेन सः ३५ तमार्तः संपरिष्वज्य गुहो राघवमब्रवीत् ३६ यथायोध्या तथेदं ते राम किंकरवाणि ते । ईदृशं हि महाबाहो कः प्राप्स्यत्यतिथिं प्रियम् ३७

---

त्या गंगेला अवलोकन करून तो महारथि राम सुमंत्र सारथ्याला ह्मणाला " आज आपण येथेंच वास्तव्य करूं २७. ह्या नदीच्या जवळच एक प्रचंड इंगुदीवृक्ष आहे व त्याला असंख्य पुष्पें व पल्लव आहेत. तेव्हां, हे सारथ्या, आपण येथेंच वास्तव्य करूं २८. देव, मनुष्य, गंधर्व, मृग, भुजंग आणि पक्षी ह्यांना जिचें उदक समंत आहे अशी ही शुभ व श्रेष्ठ नदी मी अवलोकन करितों २९. (ह्याप्रमाणें रामानें सारथ्याला सांगितलें असतां ) " ठीक आहे " येवढेंच रामाला ह्मणून लक्ष्मण व सुमंत्र अश्वांच्या योगानें त्या इंगुदीवृक्षाजवळ गेले ३०. तेव्हां त्या रम्य वृक्षाजवळ गेल्यानंतर इक्ष्वाकुवंशज राम भार्या आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान त्या रथांतून खालीं उतरला ३१. नंतर सुमंत्रही खालीं उतरला आणि ते उत्तम अश्व सोडिल्यावर वृक्षमूलांशीं बसलेल्या रामासमीप जाऊन तो हात जोडून उभा राहिला ३२. त्या ठिकाणीं रामाचा आत्मतुल्य मित्र असा एक गुहनामक राजा होता. तो जातीचा निषाध असून बलाढ्य, प्रख्यात आणि निषाधांचा अधिपति होता ३३. पुरुषश्रेष्ठ राम आपल्या प्रदेशाला आल्याचें ऐकून वृद्ध अमात्य आणि ज्ञातिबांधव ह्यांनीं परिवेष्टित असलेला तो गुह रामाच्या समीप आला ३४. तेव्हां निषधाधिपति आला आहे असें दुरून पाहून लक्ष्मणासहवर्तमान रामानें त्याची भेट घेतली असतां ३५ दुःखित झालेला तो गुह रामाला कडकडून भेटल्यावर ह्मणाला ३६ " हे रामा, जशी अयोध्या तसें हें नगर आपलेंच आहे. मीं आपलें काय कार्य करावें ? हे महापराक्रमी रामा, अशा प्रकारच्या प्रिय अतिथीचा लाभ कोणाला बरें होणार आहे ? " ३७.

ततो गुणवदन्नाद्यमुपादाय पृथग्विधम्। अर्घ्यं चोपानयच्छीघ्रं वाक्यं चेदमुवाच ह ३८ स्वागतं ते महाबाहो तवेयमखिला मही। वयं प्रेष्या भवान्भर्ता साधु राज्यं प्रशाधि नः ३९ भक्ष्यं भोज्यं च पेयं च लेह्यं चैतदुपस्थितम्। शयनानि च मुख्यानि वाजिनां खादनं च ते ४० गुहमेवं ब्रुवाणं तु राघवः प्रत्युवाच ह। अर्चिताश्चैव हृष्टाश्च भवता सर्वदा वयम् ४१ पद्भ्यामभिगमाच्चैव स्नेहसंदर्शनेन च। भुजाभ्यां साधुवृत्ताभ्यां पीडयन्वाक्यमब्रवीत् ४२ दिष्ट्या त्वां गुह पश्यामि ह्यरोगं सहबान्धवैः। अपि ते कुशलं राष्ट्रे मित्रेषु च वनेषु च ४३ यत्त्विदं भवता किंचित्प्रीत्या समुपकल्पितम्। सर्वं तदनुजानामि न हि वर्ते प्रतिग्रहे ४४ कुशचीराजिनधरं फलमूलाशनं च माम्। विद्धि प्रणिहितं धर्मे तापसं वनगोचरम् ४५ अश्वानां खादने नाहमर्थी नान्येन केनचित्। एतावतात्र भवता भविष्यामि सुपूजितः ४६ एते हि दयिता राज्ञः

---

असें ह्मटल्यानंतर नानाप्रकारचें चांगलें चांगलें अन्न व पूजासामग्री सत्वर आणून तो गुह रामाला ह्मणाला ३८ " हे महापराक्रमी रामा, आपलें स्वागत असो; ही संपूर्ण पृथ्वी आपली आहे; आह्मी आपले सेवक आहोंत आणि आपण आमचे प्रभु आहांत. ह्मास्तव, आपण खुशाल आमचें राज्य करा ३९. हें भक्ष्य, भोज्य, पेय आणि लेह्य येथें तयार असून उत्कृष्ट शय्या व आपल्या घोड्यांना वैरण हींही तयार आहेत " ४०. ह्माप्रमाणें तो गुह बोलत असतांना राम त्याला ह्मणाले " तूं जो येथपर्यंत पायांनीं आलास आणि हें जें प्रेम दाखविलेंस ह्मामुळें तूं आमचें सर्वदा पूजन केलें आहेस आणि आह्मांला हर्ष झाला आहे. " असें बोलून आपल्या चांगल्या गर्गरीत बाहूंनीं त्याला कडकडून भेटून राम त्याला ह्मणाले ४१,४२ " हे गुहा, बांधवांसहवर्तमान मी तुला आज सुदैवानें अरोग्यसंपन्न अवलोकन करीत आहें. राष्ट्र, मित्र व वनें ह्मासंबंधानें तुझें ठीक आहे नां ? ४३ हें जें तूं कांहीं प्रेमानें येथें आणिलें आहेस त्याला मान देऊन मी तें सर्व तुला परत देतों. कारण, मी भोगविषयक प्रतिग्रह घेत नाहीं ४४. मी कुश, वल्कलें आणि अजिनें धारण करून व फलमूलांवर उपजीविका करून पित्राज्ञापालनरूप धर्माविषयीं दक्ष, तापस व वनवासी बनलों आहें असें तूं समज ४५. अश्वांच्या खाण्यासंबंधानें अथवा दुसऱ्या कसल्याच संबंधानें मला कोणापाशींच कांहीं मागावयाचें नाहीं. तूं जें हें प्रेम दाखविलेंस तेवढ्यानें आज माझें अतिशयच आदरातिथ्य होईल ४६. माझ्या पित्या दशरथराजाचे हे आवडते घोडे आहेत तेव्हां तूं ह्मा अश्वांची उत्तम तऱ्हेनें व्यवस्था लाविलीस

पितुर्दशरथस्य मे । एतैः सुविहितैरश्वैर्भविष्याम्यहमर्चितः ४७ अश्वानां प्रतिपानं च खादनं चैव सोन्वशात् । गुहस्तत्रैव पुरुषांस्त्वरितं दीयतामिति ४८ ततश्चीरोत्तरासंगः सन्ध्यामन्वास्य पश्चिमाम् । जलमेवाददे भोज्यं लक्ष्मणेनाहृतं स्वयम् ४९ तस्य भूमौ शयानस्य पादौ प्रक्षाल्य लक्ष्मणः । सभार्यस्य ततोभ्येत्य तस्थौ वृक्षमुपाश्रितः ५० गुहोपि सह सूतेन सौमित्रिमनुभाषयन् । अन्वजाग्रत्ततो राममप्रमत्तो धनुर्धरः ५१ तथाशयानस्य ततो यशस्विनो मनस्विनो दाशरथेर्महात्मनः । अदृष्टदुःखस्य सुखोचितस्य सा तदा व्यतीता सुचिरेण शर्वरी ५२ [१९९१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे पञ्चाशः सर्गः ॥५०॥

तं जाग्रतमदंभेन भ्रातुरर्थाय लक्ष्मणम् । गुहः संतापसंतप्तो राघवं वाक्यमब्रवीत् १ इयं तात सुखा शय्या त्वदर्थमुपकल्पिता । प्रत्याश्वसिहि साध्वस्यां राजपुत्र यथासुखम् २ उचितोयं जनः सर्वः क्लेशानां त्वं सुखोचितः । गुप्त्यर्थं जागरिष्यामः काकुत्स्थस्य वयं निशाम् ३

---

म्हणजे माझें आदरातिथ्य होईल " ४७. ( ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर ) " त्या अश्वांना खुराक व वैरण सत्वर द्या " म्हणून त्या गुहानें त्याच ठिकाणीं आपल्या सेवकांना आज्ञा केली ४८. तदनंतर सालींचेंच प्रावरण घेतलेल्या रामानें सायंसंध्या केली आणि लक्ष्मणानें स्वतः आणिलेल्या उदकाचाच भोजनाचे एवजीं स्वीकार केला ४९. तदनंतर भार्येसहवर्तमान त्या रामानें भूमीवर शयन केलें असतां लक्ष्मणानें पाय धुतले आणि तेथून उठून जवळच वृक्षापाशीं येऊन बसला ५० व सुमंत्र सारथ्यासहवर्तमान धनुर्धर गुहही रामाचें संरक्षण करण्याकरितां दक्ष राहून लक्ष्मणाशीं संभाषण करीत करीत जागत राहिला ५१. असो. पूर्वी कधींही दुःखाचा अनुभव नसतांना सुखाचा उपभोग घेत असलेला तो यशस्वी व विचारी महात्मा दशरथपुत्र राम तशाप्रकारें भूमीवर शयन करीत असतांना ( झोंप चांगली न आल्यामुळें ) ती रात्र पुष्कळ वेळानें गेल्यासारिखी त्याला भासली ५२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंनासावा सर्ग समाप्त झाला ॥ ५० ॥

अकृत्रिम प्रेमानें भ्रात्याच्या रक्षणाकरितां जागत बसलेल्या त्या रघुवंशज लक्ष्मणाला दुःखसंतप्त झालेला गुह म्हणाला १ " बा राजपुत्रा, ही सुखकारक शय्या तुझ्याकरितां तयार केलेली आहे; तूं विश्रांति घे आणि सुख होईल त्या रीतीनें तूं खुशाल ह्या शय्येवर शयन कर २. आह्मां सर्व लोकांना क्लेश भोगण्याची संवय असून तूं आजपर्यंत सुखाचाच उपभोग घेत आला आहेस. तेव्हां ककुत्स्थकुलोत्पन्न रामाच्या

न हि रामात्प्रियतमो ममास्ते भुवि कश्चन। ब्रवीम्येव च ते सत्यं सत्येनैव च ते शपे ४ अस्य प्रसादादाशंसे लोकेऽस्मिन्सुमहद्यशः। धर्मावाप्तिं च विपुलामर्थकामौ च पुष्कलौ ५ सोऽहं प्रियसखं रामं शयानं सह सीतया। रक्षिष्यामि धनुष्पाणिः सर्वथा ज्ञातिभिः सह ६ न मेऽस्त्यविदितं किंचिद्वनेऽस्मिंश्चरतः सदा। चतुरङ्गं ह्यतिबलं सुमहत्संतरेमहि ७ लक्ष्मणस्तु ततोवाच रक्ष्यमाणस्त्वयानघ। नात्र भीता वयं सर्वे धर्ममेवानुपश्यता ८ कथं दाशरथौ भूमौ शयाने सह सीतया। शक्या निद्रा मया लब्धुं जीवितं वा सुखानि वा ९ यो न देवासुरैः सर्वैः शक्यः प्रसहितुं युधि। तं पश्य सुखसंसुप्तं तृणेषु सह सीतया १० यो मन्त्रतपसा लब्धो विविधैश्च पराक्रमैः। एको दशरथस्यैष पुत्रः सदृशलक्षणः ११ अस्मिन्प्रव्राजिते राजा न चिरं वर्तयिष्यति। विधवा मेदिनी नूनं क्षिप्रमेव भविष्यति १२ विनद्य सुमहानादं श्रमेणोपरताः स्त्रियः। निर्घोषोपरतं तात मन्ये राज-

---

रक्षणाकरितां आह्मी रात्रभर जागूं ३. रामाशिवाय ह्या पृथ्वीमध्यें दुसरा कोणीही मला अत्यंत प्रिय नाहीं हें मी तुला सत्याची शपथ वाहून सांगत आहें ४. ह्या जगतामध्यें ह्याच्याच प्रसादामुळें फारच मोठी कीर्ति, पुण्यप्राप्ति आणि पुष्कळ अर्थ व काम ह्यांची समृद्धि हीं प्राप्त होत असतात असें मी समजतों ५. तव्हां सीतेसहवर्तमान शयन करणाऱ्या प्रिय मित्र रामाचें मी आपल्या ज्ञातींसहवर्तमान हातांत धनुष्य घेऊन सर्वप्रकारें रक्षण करीन ६. नेहमीं ह्या वनांत संचार करणाऱ्या माझ्या गैरमाहितींतलें असें कांहींही नाहीं. शत्रूचें अतिशय प्रचंड चतुरंग बल जरी असलें तरी आह्मी युद्धामध्यें जिंकूं" ७. त्यावर लक्ष्मण ह्मणाला "हे निष्पापा, ह्या प्रदेशामध्यें आह्मांला कोणाला कसलीही भीति नाहीं. कारण, धर्माकडेच दृष्टि देऊन वागणारा तूं आमचें रक्षण करणारा आहेस ८. परंतु दाशरथीराम सीतेसहवर्तमान भूमीवर पडला असतां मला निद्रा, निर्धोर जिवित अथवा सुखोपभोग प्राप्त होणें शक्य कसें ? ९. सर्व देवदैत्यांनाही युद्धामध्यें ज्याचा पराक्रम सहन होणें अशक्य आहे त्या रामाला सीतेसहवर्तमान तृणावर खुशाल गाढ झोंप लागली आहे हें पहा १०. जप, तप व मोठ्या कष्टानें केलेलीं नानाप्रकारचीं अनुष्ठानें ह्यामुळें लक्षणांनीं स्वतःसारिखा असा हा अद्वितीय पुत्र दशरथाला प्राप्त झाला आहे ११. हा वनांत गेल्यावर राजा फार दिवस जगणार नाहीं. खरोखर पृथ्वी सत्वरच अनाथ होऊन जाईल १२. राजगृहांतील आणि अयोध्या नगरांतील स्त्रिया अतिशयच मोठा आक्रोश करून श्रम झाल्यामुळें स्वस्थ झाल्या असतील आणि, बा गुहा, राजगृहांतही थकवा

निवेशनम् १३ कौसल्या चैव राजा च तथैव जननी मम। नाशंसे यदि जीवन्ति सर्वे ते शर्वरीमिमाम् १४ जीवेदपि हि मे माता शत्रुघ्नस्यान्ववेक्षया। तद्दुःखं यदि कौसल्या वीरसूर्विनशिष्यति १५ अनुरक्तजनाकीर्णा सुखालोकप्रियावहा। राजव्यसनसंसृष्टा सा पुरी विनशिष्यति १६ कथं पुत्रं महात्मानं ज्येष्ठपुत्रमपश्यतः। शरीरं धारयिष्यन्ति प्राणा राज्ञो महात्मनः १७ विनष्टे नृपतौ पश्चात्कौसल्या विनशिष्यति। अनन्तरं च मातापि मम नाशमुपैष्यति १८ अतिक्रान्तमतिक्रान्तमनवाप्य मनोरथम्। राज्ये राममनिक्षिप्य पिता मे विनशिष्यति १९ सिद्धार्थाः पितरं तस्मिन्काले ह्युपस्थिते। प्रेतकार्येषु सर्वेषु संस्करिष्यन्ति राघवम् २० रम्यचत्वरसंस्थानां संविभक्तमहापथाम्। हर्म्यप्रासादसंपन्नां गणिकावरशोभिताम् २१ रथाश्वगजसंबाधां तूर्यनादनिनादिताम्। सर्वकल्याणसंपूर्णां हृष्टपुष्टजनाकुलाम् २२ आरामोद्यानसंपन्नां समाजोत्सवशालिनीम्। सुखिता विचरिष्यन्ति राजधानीं पितु-

आल्यामुळें विलाप शब्द बंद होऊन शुकशुकाट झाला असेल असें मला वाटतें १३. कौसल्या, राजा आणि त्याचप्रमाणें माझी माता हे सर्व जिवंत रहातील असें मला दिसत नाहीं. फारतर हीच रात्र ते सर्व जिवंत रहातील १४. शत्रुघ्नाकडे पाहून माझी माता कदाचित् जगेलही; परंतु, वीरमाता कौसल्या नाहींशीच होईल व तें तर अतिशयच दुःख आहे १५. रामाचे ठिकाणीं प्रेम करणाऱ्या प्रजाजनांनीं गजबजलेली आणि सर्वदा सुखोत्पादक व प्रिय अशा गोष्टींनींच युक्त असलेली ती नगरी राजाच्या मरण दुःखानें युक्त होऊन नाश पावेल १६. महात्मा ज्येष्ठ पुत्र दिसनासा झाल्यावर महात्म्या दशरथराजाचे प्राण शरीराला धरून रहातील कसे ? १७ राजाचा नाश झाल्यानंतर कौसल्याही नाश पावेल आणि तदनंतर माझ्या मातेलाही मरण येईल १८. रामराज्याभिषेकरूप मनोरथ प्राप्त न झाल्यामुळें "घात झाला घात झाला" असें ह्मणत ह्मणत माझा पिता परत आलेल्या रामाला राज्यावर न बसवितांच नाश पावेल १९. तो समय प्राप्त झाला असतां मृत झालेल्या रघुवंशज पित्याचा ज्यांच्या हातून सर्व प्रकारच्या क्रियेसंबंधानें संस्कार होईल ते खरोखर कृतकृत्य होत २०. रमणीय चव्हाटे व धर्मशाळा, परिमित अंतरावर असलेले मोठमोठे मार्ग, वाडे आणि देवालयें ह्यांनीं संपन्न उत्कृष्ट गणिकांनीं सुशोभित २१, रथ, अश्व आणि गज ह्यांनीं व्याप्त, तूर्य वाद्यांच्या ध्वनींनें नादित, सर्व प्रकारच्या कल्याणांनीं संपूर्ण, आनंदित व पुष्ट जनांनीं व्याप्त २२, उपवनें व बागा ह्यांनीं समृद्ध व समाजविषयक उत्सवांनीं शोभणाऱ्या माझ्या पित्याच्या

र्मम २३ अपि जीवेद्दशरथो वनवासात्पुनर्वयम् । प्रत्यागम्य महात्मानमपि पश्याम सुव्रतम् २४ अपि सत्यप्रतिज्ञेन सार्धं कुशलिनो वयम् । निवृत्ते वनवासेस्मिन्नयोध्यां प्रविशेमहि २५ परिदेवयमानस्य दुःखार्तस्य महात्मनः । तिष्ठतो राजपुत्रस्य शर्वरी सात्यवर्तत २६ तथा हि सत्यं ब्रुवति प्रजाहिते नरेन्द्रसूनौ गुरुसौहृदाद्गुहः । मुमोच बाष्पं व्यसनाभिपीडितो ज्वरातुरो नाग इव व्यथातुरः २७ [ २०१८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे एकपञ्चाशः सर्गः ॥ ५१ ॥

प्रभातायां तु शर्वर्यां पृथुवक्षा महायशाः । उवाच रामः सौमित्रिं लक्ष्मणं शुभलक्षणम् १ भास्करोदयकालोसौ गता भगवती निशा । असौ सुकृष्णो विहगः कोकिलस्तात कूजति २ बर्हिणानां च निर्घोषः श्रूयते नदतां वने । तराम जाह्नवीं सौम्य शीघ्रगां सागरंगमाम् ३ विज्ञाय रामस्य वचः सौमित्रिर्मित्रनन्दनः । गुहमामन्त्र्य सूतं च सोतिष्ठ-

---

राजधानीमध्यें भरतप्रभृति सुखी होऊन संचार करतील २३. दशरथ जिवंत रहाण्याचा संभव आहे काय ? आह्मी परत येऊन त्या सदाचरणसंपन्न महात्म्याला अवलोकन करूं हें संभवनीय आहे काय ? २४. सत्यप्रतिज्ञ रामासहवर्तमान आह्मी कुशल राहून हा वनवास संपल्यावर पुनरपि अयोध्येंत प्रविष्ट होण्याचा संभव आहे काय?" २५ ह्याप्रमाणें तो महात्मा राजकुमार लक्ष्मण दुःखाकुल होऊन शोक करीत बसला असतांनाच ती रात्र निघून गेली २६ आणि प्रजाजनांच्या हिताविषयीं तत्पर असलेला तो राजकुमार लक्ष्मण त्याप्रमाणें सत्य भाषण करूं लागला असतां अतिशय प्रेमामुळें गुह संतापानें व्याप्त झाला आणि दुःखाकुल झालेल्या गजाप्रमाणें रामाच्या संकटानें पीडित झालेला तो नेत्रांतून अश्रु ढाळूं लागला २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५१ ॥

रात्र उजाडल्यानंतर विशाल वक्षस्थलानें युक्त असलेला महायशस्वी राम शुभलक्षणसंपन्न सुमित्रापुत्र लक्ष्मणाला म्हणाला १ " हा सूर्योदयाचा समय झाला; भगवती रात्र निघून गेली. बा लक्ष्मणा, हा अत्यंत कृष्णवर्ण कोकिलपक्षी शब्द करीत आहे २ आणि वनामध्यें गर्जना करणाऱ्या मयूर पक्ष्यांचाही ध्वनि कानावर येत. तऱ्हां, हे सौम्या, तर वेगयुक्त व समुद्रगामिनी जान्हवी आपण तरून जाऊं " ३. हें रामाचें बोलणें ऐकून घेऊन मित्रांना आनंद देणारा तो सुमित्रापुत्र लक्ष्मण गुहाला व सारथ्याला रामाच्या भाषणाचें तात्पर्य सांगून आपल्या भ्रात्या पुढें येऊन उभा राहिला ४.

भ्रातुरग्रतः ४ स तु रामस्य वचनं निशम्य प्रतिगृह्य च । स्थपतिस्तूर्णमाहूय सचिवानिदमब्रवीत् ५ अस्य वाहनसंयुक्तां कर्णग्राहवतीं शुभाम् । सुप्रतारां दृढां तीर्थे शीघ्रं नावमुपाहर ६ तं निशम्य गुहादेशं गुहामात्यो गतो महान् । उपोह्य रुचिरां नावं गुहाय प्रत्यवेदयत् ७ ततः स प्राञ्जलिर्भूत्वा गुहो राघवमब्रवीत् । उपस्थितेयं नौर्देव भूयः किं करवाणि ते ८ तवामरसुतप्रख्य तर्तुं सागरगामिनीम् । नौरियं पुरुषव्याघ्र शीघ्रमारोह सुव्रत ९ अथोवाच महातेजा रामो गुहमिदं वचः । कृतकामोस्मि भवता शीघ्रमारोप्यतामिति १० ततः कलापान्सन्नह्य खड्गौ बद्ध्वा च धन्विनौ । जग्मतुर्येन तां गङ्गां सीतया सह राघवौ ११ राममेवं तु धर्मज्ञमुपागत्य विनीतवत् । किमहं करवाणीति सूतः प्राञ्जलिरब्रवीत् १२ ततोब्रवीद्दाशरथिः सुमन्त्रं स्पृशन्करेणोत्तमदक्षिणेन । सुमन्त्र शीघ्रं पुनरेव याहि राज्ञः सकाशे भव चाप्रमत्तः १३ निवर्तस्वेत्युवाचै-

---

तेव्हां रामाचें तें वचन ऐकून व शिरसा मान्य करून तो निषादराज गुह सत्वर आपल्या सचिवांना हाक मारून ह्मणाला ५ " पाणी तोडून नाव तीराला नेऊन पोंचविणारें सुकाणू लावलेली, सुखानें तरून जातां येईल अशी, बळकट आणि शुभ नाव सुकाणू चालविणाऱ्यासहवर्तमान उतारावर सत्वर घेऊन ये "६. ही गुहाची आज्ञा ऐकून घेऊन त्याचा एक मोठा अमात्य गेला आणि एक मनोहर नाव समीप आणिल्यावर त्यानें तसें त्याला कळविलें ७. तदनंतर तो गुह हात जोडून रामाला ह्मणाला " हे राजा, ही नाव तयार आहे ; आतां आपलें आणखी काय कार्य मीं करावें ? ८. हे देवकुमारतुल्य पुरुषश्रेष्ठा, समुद्रगामिनी गंगा तुह्मांला तरून जातां येण्याकरितां ही नाव आणिलेली आहे. हे सदाचरणसंपन्न, आतां सत्वर हिच्यामध्यें बसा " ९. ह्यानंतर महातेजस्वी राम गुहाला ह्मणाला " तूं आमचें मोठें काम केलें आहेस; करितां सामान सुमान नावेमध्यें सत्वर ठेवून निघण्याची तयारी करा. " १०. इतकें झाल्यावर कवच चढवून आणि भातें व खड्ग बांधून घेऊन ते धनुर्धारी रामलक्ष्मण सीतेसहवर्तमान ज्या मार्गानें लोक नावेंत बसून गंगा तरून जात असत त्या मार्गानें गंगा उतरून जाण्याकरितां निघाले ११. ह्याप्रमाणें धर्मवेत्ता राम निघाला असतां सुमंत्रसारथि त्याच्या समीप आला आणि " मीं आतां काय करावें " ह्मणून हात जोडून नम्रपणें त्याला ह्मणाला १२. तेव्हां दाशरथिराम उत्कृष्ट अशा आपल्या उजव्या हातानें सुमंत्राला स्पर्श करून ह्मणाला "हे सुमंत्रा, तूं पुनरपि सत्वर परत जा आणि राजापाशीं सावधपणानें असत जा १३. आतांपर्यंत राजाच्या आज्ञेनें आह्मी रथांत बसून आलों; आतां मला ह्या रथाची

नमेतावद्धि कृतं मम । रथं विहाय पद्भ्यां तु गमिष्यामो महावनम् १४ आत्मनस्त्वभ्यनुज्ञातमवेक्ष्यार्तः स सारथिः । सुमन्त्रः पुरुषव्याघ्रमैक्ष्वाकमिदमब्रवीत् १५ नातिक्रान्तमिदं लोके पुरुषेणेह केनचित् । तव सभ्रातृभार्यस्य वासः प्राकृतवद्वने १६ न मन्ये ब्रह्मचर्ये वा स्वधीते वा फलोदयः । मार्दवार्जवयोर्वापि त्वां चेद्व्यसनमागतम् १७ सह राघव वैदेह्या भ्रात्रा चैव वने वसन् । त्वं गतिं प्राप्स्यसे वीर त्रींल्लोकांस्तु जयन्निव १८ वयं खलु हता राम यत्त्वया ह्युपवञ्चिताः । कैकेय्या वशमेष्यामः पापाया दुःखभागिनः १९ इति ब्रुवन्नात्मसमं सुमन्त्रः सारथिस्तथा । दृष्ट्वा दूरगतं रामं दुःखार्तो रुरुदे चिरम् २० ततस्तु विगते बाष्पे सूतं स्पृष्टोदकं शुचिम् । रामस्तु मधुरं वाक्यं पुनः पुनरुवाच तम् २१ इक्ष्वाकूणां त्वया तुल्यं सुहृदं नोपलक्षये । यथा दशरथो राजा मां न शोचेत्तथा कुरु २२ शोकोपहतचेताश्च वृद्धश्च जगती-

---

गरज नाहीं. कारण, रथ सोडून देऊन आह्मांला पायांनींच महावनामध्यें जावयाचें आहे. तस्मात् तूं आतां (कांहींएक मनामध्यें न आणितां) परत फिर " असें राम सुमंत्राला ह्मणाला असतां १४ आपणांला जाण्याची अनुज्ञा झाली असें जाणून तो सुमंत्रसारथि दुःखाकुल झाला आणि पुरुषश्रेष्ठ इक्ष्वाकुवंशज रामाला ह्मणाला १५ " भ्राता आणि भार्या ह्यांसहवर्तमान ज्यानें तुला क्षुद्र जनाप्रमाणें वनांत वास्तव्य करणें भाग पाडिलें आहे त्या ह्या दैवाचें उल्लंघन ह्या जगतामध्यें कोणत्याही पुरुषाला करितां आलें नाहीं १६. ज्याअर्थी तुला हें असलें संकट प्राप्त झालें आहे त्याअर्थी ब्रह्मचर्य, उत्कृष्ट वेदाध्ययन, दया आणि सरलपणा हीं सर्व निष्फल आहेत असें मला वाटतें १७. हे वीरा रामा, सीता आणि भ्राता लक्ष्मण ह्यांसहवर्तमान वनामध्यें ( पित्याची आज्ञा शेवटास नेण्याकरितां ) वास्तव्य करून त्रैलोक्य जिंकल्याप्रमाणें तुझा उत्कर्ष होईल १८. हे रामा, तूं आमचा त्याग केल्यामुळें आह्मां सर्वांचाच घात झाला आहे. आतां आह्मी दुष्ट कैकेयीच्या आधीन होऊन दुःखाचे वांटेकरी होणार " १९. ह्याप्रमाणें आपल्या नांवाला योग्य असें भाषण करीत करीत तो सुमंत्रसारथि राम दूर गेल्याचें पाहून दुःखाकुल झाला आणि पुष्कळ वेळपर्यंत रडत बसला २०. तदनंतर अश्रु थांबल्यावर तो पवित्र सारथि गंगोदकाचें आचमन करूं लागला असतां राम पुन्हां मधुर वाणीनें त्याला ह्मणाला २१ इक्ष्वाकुवंशजांचा तुझ्यासारिखा सुहृद् मला कोणी दिसत नाहीं. ह्यास्तव दशरथराजा माझ्याकरितां शोक न करील असें तूं कर २२. त्या भूपतीचें मन

पतिः। कामभारावसन्नश्च तस्मादेतद्ब्रवीमि ते २३ यद्यथाज्ञापयेत्किंचित्स महात्मा महीपतिः। कैकेय्याः प्रियकामार्थं कार्यं तदविकाङ्क्षया २४ एतदर्थं हि राज्यानि प्रशासति नराधिपाः। यदेषां सर्वकृत्येषु मनो न प्रतिहन्यते २५ यद्यथा स महाराजो नालीकमधिगच्छति। न च ताम्यति शोकेन सुमन्त्र कुरु तत्तथा २६ अदृष्टदुःखं राजानं वृद्धमार्यं जितेन्द्रियम्। ब्रूयास्त्वमभिवाद्यैव मम हेतोरिदं वचः २७ नैवाहमनुशोचामि लक्ष्मणो न च शोचति। अयोध्यायाश्च्युताश्चेति वने वत्स्यामहेति वा २८ चतुर्दशसु वर्षेषु निवृत्तेषु पुनः पुनः। लक्ष्मणं मां च सीतां च द्रक्ष्यसे शीघ्रमागतान् २९ एवमुक्त्वा तु राजानं मातरं च सुमन्त्र मे। अन्याश्च देवीः सहिताः कैकेयीं च पुनः पुनः ३० आरोग्यं ब्रूहि कौसल्यामथपादाभिवन्दनम्। सीताया मम चार्यस्य वचनाल्लक्ष्मणस्य च ३१ ब्रूयाश्चापि महाराजं भरतं क्षिप्रमानय। आगतश्चापि भरतः स्थाप्यो नृपमते पदे ३२ भरतं च परिष्वज्य यौवराज्येभिषिच्य

---

शोकानें अगदीं घेरलें आहे व तो वृद्ध झाला असून त्याचे सर्व मनोरथ भग्न झाले आहेत ह्मणून मी हें तुला सांगत आहें २३. कैकेयीचा प्रिय मनोरथ सिद्धीस नेण्याकरितां तो महात्मा भूपति जी जी कांहीं आज्ञा करील ती ती तुह्मी निःशंकपणें सिद्धीस न्या २४. कारण कोणत्याही कृत्यासंबंधानें आपला मनोभंग होऊं नये एतदर्थच राजे राज्य करीत असतात २५. तस्मात्, हे सुमंत्रा, त्या महाराजाचा ज्या रीतीनें मनोभंग होणार नाहीं आणि ज्या रीतीनें तो शोकानें खिन्न होणार नाहीं त्या रीतीनें तूं तजवीज ठेवीत जा २६ आणि वृद्ध, सभ्य, जितेंद्रिय आणि दुःखाचा अनुभव नसलेल्या राजाला माझ्याकरितां अभिवदन करून तूं असें सांग कीं २७, आह्मी अयोध्येला मुकून वनांमध्यें वास्तव्य करीत आहोंत ह्मणून मला अथवा लक्ष्मणाला वाईट वाटत नाहीं २८. चवदा वर्षें निघून गेलीं ह्मणजे लवकरच परत आलेल्या लक्ष्मणाला, मला व सीतेला आपण वारंवार अवलोकन कराल २९. ह्याप्रमाणें राजाला, माझ्या मातेला, माझ्या मातेबरोबर असलेल्या इतर राजभार्यांना आणि कैकेयीला फिरून फिरून सांगून हे सुमंत्रा, ३०, मी आरोग्य संपन्न आहें असें तूं सर्वांना सांग; कौसल्येला सीतेचा, माझा व आर्य लक्ष्मणाचा माझ्या वचनावरून प्रणिपात कळीव ३१; भरताला सत्वर आणा ह्मणून महाराजालाही सांग आणि भरत आला ह्मणजे दशरथाच्या अनुमतीनें त्याला राज्यावर बसविण्याची तजवीज होऊं द्या ३२. तूं भरताला भेटून त्याला यौवराज्याचा अभिषेक करविलास ह्मणजे आह्मांकरितां संताप

च। अस्मत्सन्तापजं दुःखं न त्वामभिभविष्यति ३३ भरतश्चापि वक्तव्यो यथा राजनि वर्तसे। तथा मातृषु वर्तेथाः सर्वास्वेवाविशेषतः ३४ यथा च तव कैकेयी सुमित्रा चाविशेषतः। तथैव देवी कौसल्या मम माताविशेषतः ३५ तातस्य प्रियकामेन यौवराज्यमवेक्षता। लोकयोरुभयोः शक्यं नित्यदा सुखमेधितुम् ३६ निवर्त्यमानो रामेण सुमन्त्रः प्रतिबोधितः। तत्सर्वं वचनं श्रुत्वा स्नेहात्काकुत्स्थमब्रवीत् ३७ यदहं नोपचारेण ब्रूयाः स्नेहादविक्लवम्। भक्तिमानिति तत्तावद्वाक्यं त्वं क्षन्तुमर्हसि ३८ कथं हि त्वद्विहीनोहं प्रतियास्यामि तां पुरीम्। तव तात वियोगेन पुत्रशोकातुरामिव ३९ सराममपि तावन्मे रथं दृष्ट्वा तदा जनः। विना रामं रथं दृष्ट्वा विदीर्येतापि सा पुरी ४० दैन्यं हि नगरीगच्छेद्दृष्ट्वा शून्यमिमं रथम्। सूतावशेषं स्वं सैन्यं हतवीरमिवाहवे ४१ दूरेपि निवसन्तं त्वां मानसेनाग्रतः स्थितम्। चिन्तयन्त्योद्य नूनं त्वां निराहाराः कृताः प्रजाः ४२

---

उत्पन्न होऊन तुला दुःख होणार नाहीं ३३. भरताला माझा असा निरोप सांग कीं, " जसा तूं राजाशीं वागत असतोस तसाच कांहींएक भेद मनांत न आणितां सर्वही मातांशीं वागत जा ३४. ज्याप्रमाणें तुला कैकेयी व सुमित्रा ह्यांमध्यें भेद नाहीं त्याचप्रमाणें माझी माता कौसल्याही तूं सारखीच समजत जा ३५. पित्याचें प्रिय करण्याचा उद्देश धरून तूं यौवराज्याचा अंगिकार केलास ह्मणजे उभयलोकीं सर्वदा तुझें सुख वृद्धिंगत होणें शक्य आहे " ३६. ह्याप्रमाणें सुमंत्राला परत पाठवितांना रामानें बोध केला असतां त्याचें तें सर्व भाषण श्रवण करून तो सुमंत्र प्रेमामुळें त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला ह्मणाला ३७ " मी तुझ्याशीं सत्कारपूर्वक भीत भीत भाषण न करितां प्रेमामुळें निर्भयपणानें भाषण करीत आहें, परंतु, मी भक्तिमान् आहें असें समजून तूं त्या भाषणाबद्दल मात्र क्षमा कर ३८. बा रामा,'तुझ्या वियोगामुळें पुत्रशोक झाल्यासारिख्या दुःखित झालेल्या त्या अयोध्या नगरीला तुझ्याशिवाय मी कसारें परत जाऊं ! ३९. नगरांतून बाहेर निघतांना रामासहवर्तमान माझा रथ अवलोकन करून लोक अतिशय दुःखित झाले मग रामावांचून रथ परत आलेला पाहून तर ती नगरी विदीर्णच होऊन जाईल ४०. युद्धामध्यें वीरांचा वध झाल्यामुळें वीर रहित झालेल्या अनाथ सैन्याप्रमाणें सारथिच ज्यांत शिलक राहिला आहे असा हा शून्य रथ अवलोकन करून सर्व नगरी दीन होऊन जाईल ४१. तूं दूर रहात असतांनाही समोर असल्याप्रमाणेंच मनामध्यें तुझें चिंतन करणारे प्रजाजन आज खरोखर ( मी एकटा परत गेलों ह्मणजे ) निराहाराचा संकल्प करून बसतील ४२.

दृष्टं तद्धि त्वया राम यादृशं त्वत्प्रवासने । प्रजानां संकुलं वृत्तं त्वच्छोक-क्लान्तचेतसाम् ४३ आर्तनादो हि यः पौरैरुन्मुक्तस्त्वत्प्रवासने । सरथं मां निशाम्येव कुर्युः शतगुणं ततः ४४ अहं किंचापि वक्ष्यामि देवीं तव सुतो मया । नीतोऽसौ मातुलकुलं सन्तापं माकृथा इति ४५ असत्यमपि नैवाहं ब्रूयां वचनमीदृशम् । कथमप्रियमेवाहं ब्रूयां सत्य मिदं वचः ४६ ममतावन्नियोगस्थास्त्वद्बन्धुजनवाहिनः । कथं रथं त्वया हीनं प्रवाह्यन्ति हयोत्तमाः ४७ तन्न शक्ष्याम्यहं गन्तुमयोध्यां त्वदृतेनघ । वनवासानुयानाय मामनुज्ञातुमर्हसि ४८ यदि मे याचमानस्य त्यागमेव करिष्यसि । सरथोऽग्निं प्रवेक्ष्यामि त्यक्तमात्र इह त्वया ४९ भविष्यन्ति वने यानि तपोविघ्नकराणि ते । रथेन प्रतिबाधिष्ये तानि सर्वाणि राघव ५० त्वत्कृतेन मया प्राप्तं रथचर्याकृतं सुखम् । आशंसे त्वत्कृतेनाहं वनवास-

---

हे रामा, तूं वनवासांत निघालास त्यावेळीं तुझ्या शोकानें भांबावून गेलेल्या लोकांच्या वर्तनांत काय गडबड उडाली ती तूं पाहिलीच आहेस ४३. तूं प्रवासाला निघतेवेळीं नगरांतील लोकांनीं जो दुःखानें आक्रोश केला त्या आक्रोशापेक्षां रथासहवर्तमान मला अवलोकन करितांक्षणीं ते शंभरपटीनें जास्त आक्रोश करूं लागतील ४४. मी कौसल्या देवीला तरी काय सांगूं बरें ! " मीं तुझ्या मुलाला अजोळी पोंचविलें आहे; तूं उगीच संताप करून घेऊं नको " असें कां मी तिला सांगूं ! ४५. अशाप्रकारें बोलणें जरी तिला प्रिय होणारें आहे तरी असत्य ह्मणून मी तें कधींही बोलणार नाहीं आणि त्याचप्रमाणें ( रामाला मी मोठ्या अरण्यांत सोडिलें ) हें सांगणें जरी सत्य आहे तरीही पण तें अप्रिय ह्मणून माझ्यानें होणार नाहीं. ( सारांश, मला आतां अयोध्येमध्यें परत जातां येत नाहीं. ) ४६. शिवाय, ( हा रथही मला तिकडे नेतां येणार नाहीं. कारण, ) हे उत्कृष्ट अश्व एक मी हकणारा असलों ह्मणजेच चालणारे आहेत आणि मी जरी हकणारा असलों तरी तुमच्या कुटुंबांतील माणसें जर आंत बसलेलीं असतील तर ते रथ ओढीत असतात. तर्‍हां तुझ्याशिवाय हे अश्व रथ ओढून नेतील कसा ! ४७. तस्मात्, हे निष्पापा रामा, तुझ्याशिवाय मला अयोध्येंत जातां येणें शक्य नाहीं. तर्‍हां तुझ्याबरोबर वनवासाला येण्याची तूं मला अनुज्ञा दे ४८. मी ही प्रार्थना करीत असतांनाही तूं जर माझा त्यागच करशील तर तूं त्याग करितांक्षणीं येथल्या येथेंच मी रथासहवर्तमान अग्नीमध्यें प्रवेश करीन ४९. वनमाध्यें तुझ्या तपाला कांहीं विघ्न करणाऱ्या गोष्टी प्राप्त होण्याचा संभव आहे त्या सर्वांचा, हे राघवा, मी रथाच्या साधनानें बाध करीन ५०. तुझ्यामुळें हें रथांत बस-

कृतं सुखम् ५१ प्रसीदेच्छामि तेरण्ये भवितुं प्रत्यनन्तरः । प्रीत्याभिहितमिच्छामि भव मे प्रत्यनन्तरः ५२ इमेपि च हया वीर यदि ते वनवासिनः । परिचर्यां करिष्यन्ति प्राप्स्यन्ति परमां गतिम् ५३ तव शुश्रूषणं मूर्ध्ना करिष्यामि वने वसन् । अयोध्यां देवलोकं वा सर्वथा प्रजहाम्यहम् ५४ न हि शक्या प्रवेष्टुं सा मयायोध्या त्वया विना । राजधानीमहेन्द्रस्य यथा दुष्कृतकर्मणा ५५ वनवासे क्षयं प्राप्ते ममैष हि मनोरथः । यदनेन रथेनैव त्वां वहेयं पुरीं पुनः ५६ चतुर्दश हि वर्षाणि सहितस्य त्वया वने । क्षणभूतानि यास्यन्ति शतसङ्ख्यानि चान्यथा ५७ भृत्यवत्सल तिष्ठन्तं भर्तृपुत्रगते पथि । भक्तं भृत्यं स्थितं स्थित्या न मां त्वं हातुमर्हसि ५८ एवं बहुविधं दीनं याचमानं पुनः पुनः । रामो भृत्यानुकंपी तु सुमन्त्रमिदमब्रवीत् ५९ जानामि परमां भक्तिमहं ते भर्तृव-

---

ण्याचें सुख मला प्राप्त झालें आहे. ( कारण, अयोध्येंतील लोकांना तुझा वियोग झाला असल्यामुळें ते अत्यंत दुःखी आहेत; परंतु, मला अद्यापपर्यंत तुझा समागम असल्यामुळें तसें दुःख नाहीं.) आतां जर मी तुला सोडून परत गेलों तर रथांत बसण्याचें मला सुख न होतां मोकळा रथ अयोध्येंत घेऊन गेल्यानें मी लोकांच्याही दुःखालाच कारण होणार आहे. तेव्हां तूं मला बरोबर येण्याची अनुज्ञा दिलीस ह्मणजे दुःख न होतां तुझ्यामुळें वनवासाचें सुखच प्राप्त होण्याची मला आशा आहे ५१. तूं मजवर कृपा कर; मी अरण्यामध्यें तुझ्यासमीप रहाण्याची इच्छा करीत आहे व " तूं जवळ रहा " असें प्रीतीनें तूं केलेलें भाषण श्रवण करण्याची माझी इच्छा आहे ५२. हे वीरा, हे अश्वही तूं वनवासामध्यें असतांना जर तुझी सेवा करितील तर ह्यांना उत्कृष्ट गति प्राप्त होईल ५३. वनामध्यें राहून मी अत्यंत नम्रपणानें तुझी सेवा करीत जाईन आणि अयोध्येचाच नव्हे परंतु, देवलोकाचाही तुझ्याकरितां मी सर्वस्वीं त्याग करीन ५४. पापकर्म केलेल्या पुरुषाचा इंद्राच्या (अमरावती) राजधानीमध्यें प्रवेश होणें जसें अशक्य आहे तसेंच तुझ्यावांचून अयोध्येमध्यें माझा प्रवेश होणें अशक्य आहे ५५. वनवास समाप्त झाल्यानंतर ह्याच रथानें मी तुला पुनरपि अयोध्यानगरींत घेऊन जाईन हा माझा मनोरथ आहे. तुझ्यासहवर्तमान माझी वनामध्यें चवदा वर्षें एका क्षणाप्रमाणें निघून जातील; नाहीं तर तीं मला शेंकडों वर्षांसारिखीं होतील ५६,५७. हे सेवकांवर प्रेम करणाऱ्या रामा, आपल्या धन्याच्या पुत्रानें स्वीकारिलेल्या मार्गाचें अवलंबन करून मर्यादेनें वागत असलेल्या मज अनुरक्त सेवकाचा त्याग करणें तुला योग्य नाहीं " ५८. ह्याप्रमाणें नानाप्रकारांनीं अरण्यांत रहाण्याविषयीं काकु-

तसल । शृणु चापि यदर्थं त्वां प्रेषयामि पुरीमितः ६० नगरीं त्वां गतं दृष्ट्वा जननी मे यवीयसी । कैकेयी प्रत्ययं गच्छेदिति रामो वनं गतः ६१ विपरीते तुष्टिहीना वनवासं गते मयि । राजानं नातिशङ्केत मिथ्यावादीति धार्मिकम् ६२ एष मे प्रथमः कल्पो यदंबा मे यवीयसी । भरतारक्षितं वृत्तं पुत्रराज्यमवाप्स्यते ६३ मम प्रियार्थं राज्ञश्च सुमन्त्र त्वं पुरीं व्रज । संदिष्टश्चापि यानर्थांस्तां स्तान्ब्रूयास्तथा तथा ६४ इत्युक्त्वा वचनं सूतं सान्त्वयित्वा पुनः पुनः । गुहं वचनमक्लीबो रामो हेतुमदब्रवीत् ६५ नेदानीं गुह योग्योऽयं वासो मे सजने वने । अवश्यमाश्रमे वासः कर्तव्यस्तद्गतो विधिः ६६ सोऽहं गृहीत्वा नियमं तपस्विजनभूषणम् । हितकामः पितुर्भूयः सीताया लक्ष्मणस्य च ६७ जटाः कृत्वा गमिष्यामि न्यग्रोधक्षीरमानय । तत्क्षीरं राजपुत्राय गुहः क्षिप्रमुपाहरत् ६८ लक्ष्मण-

---

ळतीनें प्रार्थना करणाऱ्या सुमंत्राला सेवकावर दया करणारा राम ह्मणाला ५९ " हे राजनिष्ठा, तुझी उत्कृष्ट भक्ति मी समजून आहे. परंतु, मी तुला कशाकरितां अयोध्यानगरीमध्यें पाठवीत आहें तें तूं ऐकून घे ६०. तूं नगरीमध्यें परत गेल्याचें पाहून माझ्या कनिष्ठ माता कैकेयीला " राम वनामध्यें गेला " असा विश्वास वाटेल ६१. नाहींतर मी वनवासाला गेलों असतांनाही तिला संतोष होणार नाहीं. तस्मात्, " मिथ्यावादी " ह्मणून रामाविषयीं तिला मुळींच शंका न येईल असें केलें पाहिजे ६२. माझ्या कनिष्ठ माता कैकयीला भरतरक्षित झालेल्या पुत्रराज्याचें सुख प्राप्त व्हावें हा माझा तुला अयोध्यानगरीमध्यें पाठविण्याचा मुख्य उद्देश आहे ६३. करितां, हे सुमंत्रा, तूं माझें आणि राजाचें हित करण्याकरितां नगरीमध्यें जा आणि मीं जें जें सांगितलें आहे तें तें सर्व तसें तसें तेथें सांग " ६४. ह्याप्रमाणें सारथ्याला सांगून व पुन्हां पुन्हां त्याचें सांत्वन करून तो वीर राम गुहाला ह्मणाला ६५ " हे गुहा, ज्यांत माणसें आहेत अशा वनामध्यें हें माझें वास्तव्य योग्य नाहीं; निर्जन अशा आश्रमामध्यें मला वास्तव्य करणें अवश्य आहे. तस्मात्, आश्रमवासाला योग्य असा विधि आतां केला पाहिजे ६६. सारांश, ( वन्य आहार, भूमीवर शयन वगैरे ) नेम धरून आणि तपस्वी लोकांच्या भूषणांचा स्वीकार करून सीता आणि लक्ष्मण ह्यांच्या अनुमतीनें पित्याचें हित करण्याचा माझा उद्देश आहे ६७. तात्पर्य, मी आतां जटा धारण करून पुढें जाणार आहें. करितां, वडाचा चीक घेऊन ये ". ( ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां ) गुहानें त्या राजकुमाराला तो चीक सत्वर आणून दिला ६८ व

ऱ्यात्मनश्चैव रामस्तेनाकरोज्जटाः। दीर्घबाहुर्नरव्याघ्रो जटिलत्वमधारयत् ६९ तौ तदा चीरसंपन्नौ जटामण्डलधारिणौ। अशोभेतामृषिसमौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ ७० ततो वैखानसं मार्गमास्थितः सह लक्ष्मणः। व्रतमादिष्टवान्रामः सहायं गुहमब्रवीत् ७१ अप्रमत्तो बले कोशे दुर्गे जनपदे तथा। भवेथा गुह राज्यं हि दुरारक्षतमं मतम् ७२ ततस्तं समनुज्ञाप्य गुहमिक्ष्वाकुनन्दनः। जगाम तूर्णमव्यग्रः सभार्यः सह लक्ष्मणः ७३ स तु दृष्ट्वा नदीतीरे नावमिक्ष्वाकुनन्दनः। तितीर्षुः शीघ्रगां गङ्गामिदं वचनमब्रवीत् ७४ आरोह त्वं नरव्याघ्र स्थितां नावमिमां शनैः। सीतां चारोपयान्वक्षं परिगृह्यमनस्विनीम् ७५ स भ्रातुः शासनं श्रुत्वा सर्वमप्रतिकूलयन्। आरोप्य मैथिलीं पूर्वमारुरोहात्मवांस्ततः ७६ अथारुरोह तेजस्वी स्वयं लक्ष्मणपूर्वजः। ततो निषादाधिपतिर्गुहो ज्ञातीनचोदयत् ७७ राघवोपि महातेजा नावमारुह्य तां ततः। ब्रह्मवत्क्षत्रवच्चैव जजाप हितमात्मनः ७८ आचम्य च यथाशास्त्रं नदीं तां सह सीतया। प्रणमत्प्र-

---

त्याच्या योगानें त्या आजानुबाहु पुरुषश्रेष्ठ रामानें लक्ष्मणाकरितां व आपणाकरितां जटा करून जटिलत्व धारण केलें ६९. तेव्हां वल्कलें व जटामंडल धारण केलेले ते भ्रात रामलक्ष्मण ऋषींप्रमाणें शोभूं लागले ७०. तदनंतर वानप्रस्थाश्रमांतील धर्म स्वीकारण्याचा उद्देश धरून लक्ष्मणासहवर्तमान रामानें वानप्रस्थव्रताचा अंगिकार केला आणि तो राम त्या साहाय्यकर्त्या गुहाला ह्मणाला ७१ "हे गुहा, सैन्य, खजिना, किल्ले आणि देश ह्यांसंबंधानें तूं दक्ष रहात जा. कारण, राज्य रक्षण करणें अतिशय कठिण आहे" ७२. असें सांगून त्या इक्ष्वाकुवंशज रामानें त्या गुहाला परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि भार्या व लक्ष्मण ह्यांसह वर्तमान तो दक्ष राम सत्वर निघाला ७३. नदीचे तीरीं तयार असलेली नाव अवलोकन करून वेगानें वहाणारी गंगा तरून जाण्याच्या उद्देशानें तो इक्ष्वाकुनंदन राम (लक्ष्मणाला) ह्मणाला ७४ "हे पुरुषश्रेष्ठा, उभी असलेली ही नाव हातानें धरून तूं विचारी सीतेला हलकेंच वर चढीव आणि नंतर लगेच तूंही आरूढ हो" ७५. ही भ्रात्याची आज्ञा श्रवण करून त्याच्या आज्ञेविरुद्ध यत्किंचितूही न वागणारा तो जितेंद्रिय लक्ष्मण सीतेला प्रथम वर चढवून नंतर आपणही त्या नावेवर आरूढ झाला ७६. तदनंतर तेजस्वी राम नौकेंत बसल्यावर निषादराज गुहानें आपल्या जातभाईंना जाण्याविषयीं आज्ञा केली ७७ व महातेजस्वी रामही नावेंत आरूढ होऊन आपलें हित होण्याच्या उद्देशानें ब्राह्मण व क्षत्रिय ह्या उभयतांनाही जपण्यास योग्य अशा ( नौकारोहण-

तिसन्तुष्टो लक्ष्मणश्च महारथः ७९ अनुज्ञाय सुमन्त्रं च सबलं चैव तं गुहम् । आस्थाय नावं रामस्तु चोदयामास नाविकान् ८० ततस्तैश्चालिता नौका कर्णधारसमाहिता । शुभस्फ्यवेगाभिहता शीघ्रं सलिलमत्यगात् ८१ मध्यं तु समनुप्राप्य भागीरथ्यास्त्वनिन्दिता । वैदेही प्राञ्जलिर्भूत्वा तां नदीमिदमब्रवीत् ८२ पुत्रो दशरथस्यायं महाराजस्य धीमतः। निदेशं पालयत्वेनं गङ्गे त्वदभिरक्षितः ८३ चतुर्श हि वर्षाणि समग्राण्युष्य कानने । भ्रात्रा सह मया चैव पुनः प्रत्यागमिष्यति ८४ ततस्त्वां देवि सुभगे क्षेमेण पुनरागता । यक्ष्ये प्रमुदिता गङ्गे सर्वकामसमृद्धिनी ८५ त्वं हि त्रिपथगे देवि ब्रह्मलोकं समक्षसे । भार्या चोदधिराजस्य लोकेऽस्मिन्संप्रदृश्यसे ८६ सा त्वां देवि नमस्यामि प्रशंसामि च शोभने । प्राप्तराज्ये नरव्याघ्रे शिवेन पुनरागते ८७ गवां शतसहस्रं च वस्त्राण्यन्नं च पेशलम् । ब्राह्मणेभ्यः प्रदास्यामि तव प्रियचिकीर्षया ८८ सुराघटसहस्रेण मांसभूतौदनेन च । यक्ष्ये त्वां प्रीयतां देवि पुरीं पुनरुपागता ८९

---

संबंधीं ) मंत्राचा जप करूं लागला ७८. नंतर यथाविधि आचमन करून सीतेसहवर्तमान रामानें व महारथि लक्ष्मणानें संतुष्ट होऊन त्या गंगेला प्रणाम केला ७९; नंतर रामानें सुमंत्र सारथ्याला व सैन्यासहवर्तमान आलेल्या त्या गुहाला जाण्याची अनुज्ञा दिली आणि नावेमध्यें नीट बसून त्यानें नावाड्यांना नाव हांकण्यास सांगितली ८०. तेव्हां सुकाणू धरणाऱ्यानें सज्ज ठेविलेली ती नाव ते नावाडी वल्हवूं लागले आणि उत्कृष्ट सकाणूच्या वेगानें अदळत अदळत ती नाव सत्वर पाण्यामध्यें निघाली ८१. भागीरथीच्या मध्यें आल्यावर निर्दोष सीता हात जोडून त्या गंगेला ह्मणाली ८२

गंगे, हा विचारी दशरथ महाराजाचा पुत्र तूं संरक्षण करीत असतांना ही आपल्या पित्याची आज्ञा शेवटास नेवो ८३. संपूर्ण चवदा वर्षें वनामध्यें वास्तव्य करून भ्राता व मी ह्यांसहवर्तमान तो पुनरपि परत येईल ८४. तेव्हां, हे देवि, हे भाग्यशाली गंगे, सर्व मनोरथ परिपूर्ण होऊन मी सुखरूप परत आलें ह्मणजे तुझें मोठ्या आनंदानें पूजन करीन ८५. हे त्रैलोक्यगामिनि देवि, तूं ब्रह्मलोक व्याप्त करीत आहेस आणि महासागराची भार्या असून ह्या लोकामध्यें दृष्टोत्पत्तीस येत आहेस ८६. हे देवि, हे कल्याणि, माझा पुरुषश्रेष्ठ भर्ता वनांतून सुखरूप परत येऊन राज्य करूं लागला ह्मणजे मी तुला नमस्कार करीन, तुझी स्तुति करीन ८७ आणि तुला संतुष्ट करण्याकरितां लक्ष गोप्रदानें, वस्त्रें आणि उत्तम अन्न ब्राह्मणांना देईन ८८. इतकेंच नव्हे परंतु, हे देवि, मी अयोध्यानगरीला परत आल्यें ह्मणजे सहस्र घट मद्य

यानि त्वत्तीरवासीनि दैवतानि च सन्ति हि । तानि सर्वाणि यक्ष्यामि तीर्थान्यायतनानि च ९० पुनरेव महाबाहुर्मया भ्राता च संगतः । अयोध्यां वनवासात्तु प्रविशत्वनघोनघे ९१ तथा संभाषमाणा सा सीता गङ्गामनिन्दिता । दक्षिणा दक्षिणं तीरं क्षिप्रमेवाभ्युपागमत् ९२ तीरं तु समनुप्राप्य नावं हित्वा नरर्षभः । प्रातिष्ठत सह भ्रात्रा वैदेह्या च परन्तमः ९३ अथाब्रवीन्महाबाहुः सुमित्रानन्दवर्धनम् । भव संरक्षणार्थाय सजने विजनेपि वा ९४ अवश्यं रक्षणं कार्यं मद्विधैर्विजने वने । अग्रतो गच्छ सौमित्रे सीता त्वामनु गच्छतु ९५ पृष्ठतोनुगमिष्यामि सीतां त्वां चानुपालयन् । अन्योन्यस्य हि नो रक्षा कर्तव्या पुरुषर्षभ ९६ न हि तावदतिक्रान्ता सुकरा काचनक्रिया । अद्य दुःखं तु वैदेही वनवासस्य वेत्स्यति ९७ प्रणष्टजनसम्बाधं क्षेत्रारामविवर्जितम् । विषमं च प्रपातं च वनमद्यप्रवेक्ष्यति ९८ श्रुत्वा रामस्य वचनं प्रतस्थे लक्ष्मणो-

---

आणि मांसमिश्र ओदन ह्यांचा तुला बलि देईन; गंगे तूं मला प्रसन्न हो ८९. तुझ्या तीराचे ठिकाणीं ज्या कांहीं देवता, तीर्थें आणि पुण्यस्थानें असतील त्या सर्वांचें मी पूजन करीन ९०; परंतु, हे निष्पापे गंगे, मी आणि भ्राता लक्ष्मण ह्यांसहवर्तमान माझा महापराक्रमी निष्पाप भर्ता वनवासांतून अयोध्येंत प्रविष्ट होवो " ९१. ह्याप्रमाणें गंगेला उद्देशून बोलत असलेली ती निर्दोष व सरळ रीतीनें वागणारी सीता लवकरच गंगेच्या दक्षिण तीराला जाऊन पोंचली ९२ व तीर प्राप्त झाल्यानंतर नाव सोडून देऊन तो शत्रुतापन पुरुषश्रेष्ठ राम, भ्राता लक्ष्मण व विदेहकन्या सीता ह्यांसहवर्तमान पुढें निघाला ९३ आणि जातांना तो महापराक्रमी राम सुमित्रेचा आनंद वृद्धिंगत करणाऱ्या लक्ष्मणाला ह्मणाला " कोणताही प्रदेश निर्जन असो अथवा जनयुक्त असो त्यांत तूं सीतेच्या संरक्षणाकरितां सावध रहात जा ९४. निर्जन वनामध्यें माझ्यासारिख्यांनीं तुमच्या सारख्यांचें रक्षण अवश्य केलें पाहिजे. ह्यास्तव, हे लक्ष्मणा, तूं पुढें हो; सीतेला तुझ्या मागोमाग येऊं दे ९५ आणि मी सीतेचें व तुझें रक्षण करण्याकरितां तिच्या मागून येईन. हे पुरुषश्रेष्ठा, आपण एकमेकाचें रक्षण केलें पाहिजे ९६. आजपर्यंत कोणतेंही दुर्घट कर्म आपल्या हातून झालें नाहीं. ( आतांपासून तशा प्रकारच्या कर्मांना आरंभ झाला असें तूं समज. ) आज वनवासाचें दुःख सीतेला कळून येईल ९७. कारण, ज्यांत लोकांची गडबड नाहीं आणि शेतें अथवा उपवनें ह्यांचें जेथें नांव नाहीं असें ऊंच, सखल व खांचखळगे असलेल्या वनामध्यें आज तिला प्रवेश करावा लागेल " ९८. रामाचें बोलणें एकून लक्ष्मण पुढें निघाला आणि नंतर सीतेच्या मागून रघुनंदन

व्रतः । अनन्तरं च सीताया राघवो रघुनन्दनः ९९ गतं तु गङ्गापरपारमाशु रामं सुमन्त्रः सततं निरीक्ष्य । अध्वप्रकर्षाद्विनिवृत्तदृष्टिर्मुमोच बाष्पं व्यथितस्तपस्वी १०० स लोकपालप्रतिमप्रभावस्तीर्त्वा महात्मा वरदो महानदीम् । ततः समृद्धाञ्शुभसस्यमालिनः क्षणेन वत्सान्मुदितानुपागमत् १ तौ तत्र हत्वा चतुरो महामृगान्वराहमृश्यं पृषतं महारुरुम् । आदाय मेध्यं त्वरितं बुभुक्षितौ वासाय काले ययतुर्वनस्पतिम् १०२ [२१२०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्विपञ्चाशः सर्गः ॥ ५२ ॥

स तं वृक्षं समासाद्य सन्ध्यामन्वास्य पश्चिमाम् । रामो रमयतां श्रेष्ठ इतिहोवाच लक्ष्मणम् १ अद्येयं प्रथमा रात्रिर्याता जनपदाद्बहिः । या सुमन्त्रेण रहिता तां नोत्कण्ठितुमर्हति २ जागर्तव्यमतन्द्रिभ्यामद्यप्रभृति रात्रिषु । योगक्षेमौ हि सीताया वर्तेते लक्ष्मणावयोः ३ रात्रिं कथंचिदेवेमां सौमित्रे वर्तयामहे । अपवर्तामहे भूमावास्तीर्य स्वयमर्जितैः ४ स तु संविश्य मेदिन्यां महार्हशयनोचितः । इमाः सौमित्रये

---

राम जाऊं लागला ९९. गंगेच्या पलीकडल्या तीराला सत्वर गेलेल्या रामाकडे सुमंत्र एकसारखा पहात होता आणि जेव्हां फारच अंतर पडलें तेव्हां आपली दृष्टि त्याच्या मार्गापासून निवृत्त करून तो बिचारा सुमंत्र दुःखित होऊन अश्रु ढाळूं लागला १००. असो. लोकपालाप्रमाणें ज्याचा प्रभाव आहे असा तो महात्मा वरप्रद राम महानदी तरून गेल्यावर एका क्षणामध्यें समृद्ध आणि उत्कृष्ट पिकें व आनंदित प्रजा ह्यांनीं युक्त असलेल्या वत्स देशामध्यें गेला १०१. तेथें त्या बुभुक्षित रामलक्ष्मणांनीं ऋश्य पृषत व महारुरु ( हीं तीन प्रकारचीं हरणें ) आणि वराह असे चार मोठे मृग मारून त्यांच्या पैवित्र मांसाचा सत्वर स्वीकार केला आणि सायंकालीं ते वास्तव्य करण्याकरितां एका वृक्षासमीप गेले १०२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं बावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५२॥

त्या वृक्षासमीप उतरून सायंसध्या केल्यावर चित्तरंजन करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो राम लक्ष्मणाला ह्मणाला १ "सुमंत्रसारथ्याशिवाय नगराबाहेरची आजची ही पहिलीच रात्र होय. करितां तूं आतां अयोध्येचें वगैरेस्मरण होऊं देऊं नकोस २. आजपासून आपल्याला सावध राहून रात्रीं जागलें पाहिजे. कारण, हे लक्ष्मणा, सीतेचा योगक्षेम, आपणांवर अवलंबून आहे ३. हे लक्ष्मणा, ही रात्र आपण कशीतरी काढूं आणि स्वतः आणिलेलीं पानें वगैरे भूमीवर अंथरून आपण कसे तरी

रामो व्याजहार कथाः शुभाः ५ ध्रुवमद्य महाराजो दुःखं स्वपिति लक्ष्मण। कृतकामा तु कैकेयी तुष्टा भवितुमर्हति ६ सा हि देवी महाराजं कैकेयी राज्यकारणात् ।अपि न च्यावयेत्प्राणान्दृष्ट्वा भरतमागतम् ७ अनाथश्च हि वृद्धश्च मया चैव विना कृतः । किं करिष्यति कामात्मा कैकेय्या वशमागतः ८ इदं व्यसनमालोक्य राज्ञश्च मतिविभ्रमम् । काम एवार्थधर्माभ्यां गरीयानिति मे मतिः ९ को ह्यविद्वानपि पुमान्प्रमदायाः कृते त्यजेत् । छन्दानुवर्तिनं पुत्रं तातो मामिव लक्ष्मण १० सुखी बत सभार्यश्च भरतः कैकयीसुतः । मुदितान्कोसलानेको यो भोक्ष्यत्यधिराजवत्. ११ स हि राज्यस्य सर्वस्य सुखमेकं भविष्यति । ताते तु वयसातीते मयि चारण्यमाश्रिते १२ अर्थधर्मौ परित्यज्य यः काममनुवर्तते ।एवमापद्यते क्षिप्रं राजा दशरथो यथा १३ मन्ये दशरथांताय मम प्रव्राजनाय च । कैकेयी सौम्य संप्राप्ता राज्याय

---

पडूं ४. ह्याप्रमाणें लक्ष्मणाला सांगून मोठमोठ्या मूल्यवान् मंचकावर शयन करण्याची संवय असलेला तो राम भूमीवर पडला आणि लक्ष्मणाला ह्या शुभ गोष्टी सांगूं लागला ५ “ हे लक्ष्मणा, आज महाराज निःसंशय दुःख करीत शय्येवर पडले असतील कैकयी मात्र मनोरथ सिद्धीस गेल्यामुळें संतुष्ट असणें योग्य आहे ६. परंतु ,ती राजपत्नी कैकेयी भरत आलेला पाहून राज्य कारणाकरितां महाराजाला प्राणत्याग करावयाला लाविल्यावांचून राहील असें दिसत नाहीं ७. अनाथ वृद्ध आणि त्यांतूनही माझा वियोग झालेला आणि विषयलोलुप असल्यामुळें कैकेयीच्या तावडींत सांपडलेला पिता काय बरें करील ! १८. हें संकट आणि राजाच्या बुद्धीला पडलेला भ्रम ह्यांचा विचार केला ह्मणजे अर्थ आणि धर्म ह्यांपेक्षां कामच प्रबल आहे असें मला वाटतें ९. (असें जर नसेल तर ) हे लक्ष्मणा, पित्यानें ज्याप्रमाणें माझा त्याग केला त्याप्रमाणें कोणता बरें अज्ञानी सुद्धां पुरुष स्त्रीकरितां आपल्या मर्जीप्रमाणें वागणाऱ्या पुत्राचा त्याग करील ? १०. खरोखर कैकेयीचा पुत्र भरत आपल्या भार्येसहवर्तमान सुखी आहे. कारण, आनंदित अशा कोशल देशाचा सार्वभौम राजाप्रमाणें तो एकटा उपभोग घेणार आहे ११. पिता वयातीत झाला असूंन मी अरण्याचा आश्रय केल्यामुळें आतां सर्व राज्यसुखाचा उपभोग तो एकटाच घेणार आहे १२. धर्म आणि अर्थ सोडून देऊन जो कामाचेंच अवलंबन करितो त्याला दशरथ राजाप्रमाणें अशी सत्वर विपत्ति प्राप्त होते १३. हे सौम्य, दशरथाच्या मृत्यूकरितां मला हांकून देण्याकरितां आणि भरताला राज्य प्राप्त करून देण्याकरितां कैकेयीचा अवतार आहे

भरतस्य च १४ अपीदानीं तु कैकेयी सौभाग्यमदमोहिता । कौसल्यां च सुमित्रां च सा प्रबाधेत मत्कृते १५ मातास्मात्कारणाद्देवी सुमित्रा दुःखमावसेत् । अयोध्यामितएव त्वं काले प्रविश लक्ष्मण १६ अहमेको गमिष्यामि सीतया सह दण्डकान् । अनाथाया हि नाथस्त्वं कौसल्याया भविष्यसि १७ क्षुद्रकर्मा हि कैकेयी द्वेषादन्यायमाचरेत् । परिदद्याद्धि धर्मज्ञ गरं ते मम मातरम् १८ नूनं जात्यन्तरे तात स्त्रियः पुत्रैर्वियोजिताः । जनन्या मम सौमित्रे तदप्येतदुपस्थितम् १९ मया हि चिरपुष्टेन दुःखसंवर्धितेन च । विप्रयुज्यत कौसल्या फलकाले धिगस्तु माम् २० मास्म सीमन्तिनी काचिज्जनयेत्पुत्रमीदृशम् । सौमित्रे योऽहमम्बाया दद्मि शोकमनन्तकम् २१ मन्ये प्रीतिविशिष्टा सा मत्तो लक्ष्मण सारिका । यत्तस्याः श्रूयते वाक्यं शुक पादमरेर्दश २२ शोचन्त्याश्चाल्पभाग्याया न किंचिदप-

---

असें मला वाटतें १४. पति आपल्या मुठींत आहे ह्या मदानें भांबावून गेलेली ती कैकेयी अजूनसुद्धां माझ्याकरितां कदाचित् कौसल्येला व सुमित्रेला पीडा देईल १५ आणि आपल्याकरितां माता सुमित्रा देवीला दुःखानें दिवस कंठावे लागतील. तस्मात् , हे लक्ष्मणा, अजून वेळ निघून गेली नाहीं तोंच तूं येथूनच अयोध्येला परत जा १६; सीतेसहवर्तमान मी एकटा दंडकारण्यांत जाईन आणि तूं अयोध्येंत गेलास ह्मणजे सध्यां अनाथ असलेल्या कौसल्येचें रक्षण करिशील १७. कैकेयी निःसंशय हलकें कृत्य सुद्धां करील. हे धर्मवेत्त्या लक्ष्मणा, द्वेषामुळें ती आपल्या मातांशीं अन्यायानें वागूं लागेल आणि त्यांना विष देखील घालील १८. बा लक्ष्मणा, माझ्या मातेनें जन्मांतरीं कांहीं स्त्रियांचा पुत्रांशीं वियोग केलेला आहे आणि त्यामुळें आज हें पुत्रवियोग दुःख तिला प्राप्त झालें आहे १९. पुष्कळ दिवसपर्यंत कौसल्येनें मला पोसून कष्टानें वाढविलें आणि शेवटीं(इतके कष्ट सोसल्याचें) फल प्राप्त होण्याचा समय आला असतांना माझा तिला वियोग झाला. तस्मात्, मला धिक्कार असो. २० हे लक्ष्माणा, मी आपल्या मातेला अक्षय्य दुःख देत आहें. तस्मात् , कोणत्याही स्त्रीला असा पुत्र होऊं नये २१. हे लक्ष्मणा, माझ्या मातेनें पालन करून बोलण्याला शिकविलेली सारिका माझ्यापेक्षां माझ्या मातेचे ठिकाणीं अधिक प्रीति करणारी आहे असें मलां वाटतें. कारण," हे शुका, शत्रूच्या पायाला दंश कर " असें तरी त्या सारिकेचें वाक्य तिच्या कानावर पडत असतें. ( परंतु, शत्रूचा पराभव करण्यासंबंधाचे तसे नुसते माझे शब्द देखील तिच्या कानावर पडत नाहींत. ) २२. हे शत्रुदमना लक्ष्मणा, नशीब कमी असल्यामुळें पुत्र असूनही

कुर्वता । पुत्रेण किमपुत्राया मया कार्यमरिन्दम २३ अल्पभाग्या हि मे माता कौसल्या रहिता मया । शेते परमदुःखार्ता पतिता शोकसागरे २४ एको ह्यहमयोध्यां च पृथिवीं चापि लक्ष्मण । तरेयमिषुभिः क्रुद्धो ननु वीर्यमकारणम् २५ अधर्मभयभीतश्च परलोकस्य चानघ । तेन लक्ष्मण नाद्याहमात्मानमभिषेचये २६ एतदन्यच्च करुणं विलप्य विजने बहु । अश्रुपूर्णमुखो दीनो निशि तूष्णीमुपाविशत् २७ विलापोपरतं रामं गतार्चिषमिवानलम् । समुद्रमिवनिर्वेगमाश्वासयत लक्ष्मणः २८ ध्रुवमद्य पुरी राम अयोध्या युधिनां वर । निष्प्रभा त्वयि निष्क्रान्ते गतचन्द्रेव शर्वरी २९ नैतदौपयिकं राम यदिदं परितप्यमे । विषादयसि सीतां च मां चैव पुरुषर्षभ ३० न च सीता त्वया हीना न चाहमपि राघव । मूहूर्तमपि जीवावो जलान्मत्स्याविवोद्धृतौ ३१ न हि तातं न शत्रुघ्नं न सुमित्रां परन्तप । द्रष्टुमिच्छेयमद्याहं स्वर्गं चापि त्वया विना ३२

---

निपुत्रिकाप्रमाणें शोक करीत बसलेल्या माझ्या मातेला यत्किंचितूही उपकार न करणाऱ्या मज पुत्राचा काय बरें उपयोग आहे ? २३. माझी माता कौसल्या निःसंशय दुर्दैवी आहे आणि ह्मणूनच माझा वियोग होऊन शोकसागरांत पडलेली ती सध्यां अत्यंत दुःखाकुल होऊन स्थित आहे २४. हे लक्ष्मणा, मी एकटा क्रुद्ध झालों असतां अयोध्याच नव्हे परंतु, सर्व पृथ्वी बाणांनीं जिंकून टाकीन, परंतु, वीर्याचा ह्या प्रसंगीं कांहीं उपयोग नाहीं २५. हे निष्पापा लक्ष्मणा, मी अधर्माला भीत असून परलोकाचें भय बाळगीत आहें आणि ह्मणूनच आज आपणांला अभिषेक करून घेत नाहीं " २६ व अशाच प्रकारच्या दीनपणानें त्या निर्जन वनामध्यें पुष्कळ विलाप करून अश्रूंनीं मुख व्याप्त झालेला तो दीन राम रात्रीं स्वस्थ बसला २७. विलाप करून स्वस्थ बसलेल्या आणि ह्मणूनच ज्वालारहित झालेल्या अग्नीप्रमाणें अथवा वेगरहित झालेल्या समुद्राप्रमाणें दिसत असलेल्या त्या रामाचें लक्ष्मण सांत्वन करूं लागला कीं २८, " हे योध्यांमध्यें श्रेष्ठ रामा, तूं निघून गेल्यामुळें चंद्र अस्तास गेलेल्या रात्रीप्रमाणें आज अयोध्या नगरी निःसंशय निस्तेज झाली असेल २९. परंतु, हे पुरुषश्रेष्ठा रामा, तूं असें दुःख करून सीतेला व मला खिन्न करीत आहेस हें योग्य नाहीं ३०. हे राघवा, उदकांतून बाहेर काढिलेले मत्स्य ज्याप्रमाणें जिवंत रहाणें अशक्य आहे त्याचप्रमाणें तुझा वियोग झाला असतां सीतेला अथवा मला जिवंत रहाणें अशक्य आहे ३१. हे शत्रुतापना रामा, तुझ्याशिवाय पिता, शत्रुघ्न, सुमित्रा अथवा स्वर्ग हीं आज मला पहाण्याची इच्छा नाहीं " ३२. ह्याप्रमाणें लक्ष्मणानें

ततस्तत्र सुखासीनौ नातिदूरे निरीक्ष्य ताम् । न्यग्रोधे सुकृतां शय्यां भेजाते धर्मवत्सलौ ३३ स लक्ष्मणस्योत्तमपुष्कलं वचो निशम्य चैवं वनवासमादरात् । समाः समस्ता विदधे परंतपः प्रपद्य धर्मं सुचिराय राघवः ३४ ततस्तु तस्मिन्विजने महाबलौ महावने राघववंशवर्धनौ । न तौ भयं संभ्रममभ्युपेयतुर्यथैव सिंहौ गिरिसानुगोचरौ ३५ [२१५५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्रिपञ्चाशः सर्गः ॥ ५३ ॥

ते तु तस्मिन्महावृक्षे उषित्वा रजनीं शुभाम् । विमलेभ्युदिते सूर्ये तस्माद्देशात्प्रतस्थिरे १ यत्र भागीरथीं गङ्गां यमुनाभिप्रवर्तते । जग्मुस्तं देशमुद्दिश्य विगाह्य सुमहद्वनम् २ ते भूमिभागान्विविधान्देशांश्चापि मनोहरान् । अदृष्टपूर्वान्पश्यन्तस्तत्र तत्र यशस्विनः ३ यथा क्षेमेण संपश्यन्पुष्पितान्विविधान्द्रुमान् । निर्वृत्तमात्रे दिवसे रामः सौमित्रिमब्रवीत् ४ प्रयागमभितः पश्य सौमित्रे धूममुत्तमम् । अग्नेर्भगवतः केतुं मन्ये सन्निहितो मुनिः ५ नूनं प्राप्ताः स्म संभेदं गङ्गायमुनयोर्वयम् । तथा हि श्रूयते

---

सांगितल्यानंतर प्रथमतः त्या वटवृक्षापाशींच बसलेले ते धर्मवत्सल सीताराम जवळच चांगली तयार करून ठेविलेली ती शय्या अवलोकन करून तिच्यावर जाऊन पडले ३३. ह्याप्रमाणें वनवासासंबंधानें आदरपूर्वक लक्ष्मणानें केलेलें अत्यंत श्रेष्ठ भाषण श्रवण करून आणि पुष्कळ काल लोटेपर्यंत स्वतः वनवासधर्मानें वागण्याचें ठरवून त्या शत्रुतापन रामानें सर्व वर्षें संपेपर्यंत लक्ष्मणाला वनवासाची अनुज्ञा दिली ३४ व तदनंतर पर्वतशिखरावरून हिंडणाऱ्या सिंहाप्रमाणें त्या निर्जन महा वनांत असलेल्या त्या महाबलाढ्य रघुवंशवर्धक रामलक्ष्मणांना भय वाटलें नाहीं आणि ते घाबरूनही गेले नाहींत ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्रेपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५३ ॥

त्या मोठ्या वृक्षासमीप ती शुभ रात्र काढून चांगला सूर्योदय झाल्यावर ते त्या प्रदेशांतून पुढें चालते झाले १ आणि फारच मोठें वन ओलांडून गेल्यावर जेथें यमुनेचा भागीरथीशीं संगम होत आहे त्या (प्रयाग) देशाला जाण्याकरितां ते निघाले २. पूर्वीं कधीं न पाहिलेले असे नानाप्रकारचे भूमिप्रदेश आणि मनोहर देश ठिकठिकाणीं अवलोकन करीत करीत ते यशस्वी राम लक्ष्मण चालले ३ आणि नानाप्रकारचे प्रफुल्लित वृक्ष त्यांनीं यथेष्ट अवलोकन केले. जातां जातां दिवस अस्ताला जाण्याची वेळ होतांक्षणींच राम लक्ष्मणाला ह्मणाला ४ "हे लक्ष्मणा, भगवान् अग्नीचें चिन्ह असा उत्कृष्ट धूम तूं ह्या प्रयागापाशीं अवलोकन कर. ह्यावरून ह्या ठिकाणीं मुनि असावेत असें वाटतें ५.

शब्दो वारिणोर्वारिघर्षजः ६ दारूणि परिभिन्नानि वनजैरुपजीविभिः। छिन्ना चाप्याश्रमे चैते दृश्यन्ते विविधा द्रुमाः ७ धन्विनौ तौ सुखं गत्वा लम्बमाने दिवाकरे। गङ्गायमुनयोः संधौ प्रापतुर्निलयं मुनेः ८ रामस्त्वाश्रममासाद्य त्रासयन्मृगपक्षिणः। गत्वा मुहूर्तमध्वानं भरद्वाज मुपागमत् ९ ततस्त्वाश्रममासाद्य मुनेर्दर्शनकाङ्क्षिणौ। सीतयानुगतौ वीरौ दूरादेवावतस्थतुः १० स प्रविश्य महात्मानमृषिं शिष्यगणैर्वृतम्। शंसितव्रतमेकाग्रं तपसा लब्धचक्षुषम् ११ हुताग्निहोत्रं दृष्ट्वैव महाभागः कृताञ्जलिः। रामः सौमित्रिणा सार्धं सीतया चाभ्यवादयत् १२ न्यवेदयत चात्मानं तस्मै लक्ष्मणपूर्वजः। पुत्रौ दशरथस्यावां भगवन् रामलक्ष्मणौ १३ भार्या ममेयं कल्याणी वैदेही जनकात्मजा। मां चानुयाता विजनं तपोवनमनिन्दिता १४ पित्रा प्रव्राज्यमानं मां सौमित्रिरनुजः प्रियः।

---

खरोखर आपण गंगायमुनांच्या संगमाशीं आलों आहोत. कारण, विजातीय उदकांचा संबंध झाल्यामुळें गंगा व यमुना ह्यांच्या उदकांचा ध्वनि कानावर येत आहे ६. वनावर उपजीविका करणाऱ्या वनचरांनीं ज्यांचीं काष्ठें तोडून नेलीं आहेत असे हे नानाप्रकारचे तुटके वृक्षही आश्रमांत दिसत आहेत " ७. ( ह्याप्रमाणें बोलणें चाललें आहे तोंच ) सूर्य कलला असतांना सुखानें मार्ग चालून आलेले ते धनुर्धारी रामलक्ष्मण गंगायमुनांच्या संगमासंनिध असलेल्या मुनींच्या निवासस्थानाजवळ गेले ८. राम आश्रमासंनिध आला असतां ( त्यानें धनुष्य धारण केलें असल्यामुळें ) तेथील पशुपक्षी त्रस्त झाले व एक क्षणभर मार्ग चालून पुढें आल्यावर तो राम भरद्वाज मुनींच्या अगदीं आश्रमासमीप गेला ९. तदनंतर भरद्वाज मुनींच्या दर्शनाची इच्छा धरून ते वीर रामलक्ष्मण आश्रमांत येऊन दूर उभे राहिले व सीताही त्यांच्या मागोमाग गेली १०. ( पुढें आंत येण्याची अनुज्ञा मिळाल्यावर ) राम पर्णकुटिकेमध्यें गेला तों शिष्यगणांनीं परिवेष्टित असे महात्मे भरद्वाज ऋषि त्याच्या दृष्टीं पडले. त्यांचें व्रत मोठें कडकडीत होतें; तपःसामर्थ्यानें सर्व जगतांतील सर्व कालचा वृत्तांत त्यांना विदित होता आणि अग्निहोत्र होम देऊन ते एकाग्र बसले होते. त्याचें दर्शन होतांक्षणीं महाभाग्यवान् रामानें लक्ष्मणासहवर्तमान हात जोडून त्यांना अभिवंदन केलें व सीतेकडूनही त्यांना नमस्कार करविला ११,१२. तदनंतर त्या मुनींना राम आपली हकीकत सांगू लागला कीं, " हे भगवन् , आह्मी रामलक्ष्मण दशरथाचे पुत्र आहोत १३. ही माझी कल्याणी भार्या वैदेही जनक राजाची कन्या आहे व ही निर्दोष स्त्री माझ्याबरोबर निर्जन तपोवनामध्यें आली आहे १४. पिता मला वनवासांत

अयमन्वगमद्भ्राता वनमेव धृतव्रतः १५ पित्रा नियुक्ता भगवन्प्रवेक्ष्याम तपोवनम् । धर्ममेवाचरिष्यामस्तत्र मूलफलाशनाः १६ तस्य तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रस्य धीमतः । उपानयत धर्मात्मा गामर्घ्यमुदकं ततः १७ नानाविधानन्नरसान्वन्यमूलफलाश्रयान् । तेभ्यो ददौ तप्ततपा वासं चैवाभ्यकल्पयत् १८ मृगपक्षिभिरासीनो मुनिभिश्च समन्ततः । राममागतमभ्यर्च्य स्वागतेनागतं मुनिः १९ प्रतिगृह्य तु तामर्चामुपविष्टं स राघवम् । भरद्वाजोऽब्रवीद्वाक्यं धर्मयुक्तमिदं तदा २० चिरस्य खलु काकुत्स्थ पश्याम्यहमुपागतम् । श्रुतं तव मया चैव विवासनमकारणम् २१ अवकाशो विविक्तोऽयं महानद्योः समागमे । पुण्यश्च रमणीयश्च वसत्विह भवान्सुखम् २२ एवमुक्तस्तु वचनं भरद्वाजेन राघवः । प्रत्युवाच शुभं वाक्यं रामः सर्वहिते रतः २३ भगवन्नित आसन्नः पौरजानपदो जनः । सुदर्शमिह मां प्रेक्ष्य मन्येऽहमिममाश्र-

---

पाठवूं लागला असतां हा माझा कनिष्ठ भ्राता सुमित्रापुत्र प्रिय लक्ष्मणही माझ्या-सारिखें व्रत धरून माझ्याबरोबर वनामध्येंच आला १५. हे भगवन्, पित्याची आज्ञा झाली असल्यामुळें आह्मी तपोवनामध्यें जाणार आणि तेथें फलमूलांवर उपजीविका करून वानप्रस्थ धर्माचेंच अवलंबन करणार १६. हें त्या विचारी राजकुमाराचें भाषण श्रवण करून धर्मात्म्या भरद्वाजमुनींनीं मधुपर्काकरितां गाय, अर्घ्य आणि उदक हीं तेथें आणिलीं १७; वनांतील फळें व मुळें ह्यांचे तयार केलेले नानाप्रकारचे अन्न-रस त्या मुनींनीं त्यांना दिले व त्या तपस्वी भरद्वाजमुनींनीं त्यांच्या वसतिस्थानाचीही सोय केली १८. राम तेथें आला असतां मृग, पक्षी आणि मुनि ह्यांसहवर्तमान भर-द्वाज मुनींनीं त्याचें स्वागत केलें आणि मुनींसहवर्तमान ते त्याच्या भोंवतालीं बसले १९. तेव्हां त्यांच्या त्या आदरातिथ्याचा स्वीकार करून राम बसला असतां धर्माला अनुसरून भरद्वाजमुनि त्याला असें ह्मणाले २० " हे ककुत्स्थवंशजा रामा, बराच काळ लोटल्यावर तुला मी आज येथें आलेला पहात आहे व तुला निष्कारण वनवासांत पाठविल्याचें हीं मीं ऐकिलें आहे २१. महानद्यांच्या संगमावर असलेला हा प्रदेश जनशून्य, पुण्य व रमणीय आहे. तेव्हां तूं येथें सुखानें रहा २२. ह्याप्रमाणें भरद्वाजमुनींनीं सांगितलें असतां सर्वांच्या हिताविषयीं तत्पर असलेला रघुवंशज राम त्यांच्याशीं शुभ भाषण करूं लागला २३ " हे भगवन्, ह्या आश्रमापासून नगरांतील व देशांतील लोक अगदीं जवळच आहेत आणि ते ह्या आश्रमामध्यें माझी सहज भेट होते असें समजून सीतेला व मला पहाण्याच्या उद्देशानें ह्या आश्र-

मम् २४ आगमिष्यति वैदेहीं मां चापि प्रेक्षको जनः । अनेन कारणे-नाहमिह वासं न रोचये २५ एकान्ते पश्य भगवन्नाश्रमस्थानमुत्तमम् । रमते यत्र वैदेही सुखार्हा जनकात्मजा २६ एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं भरद्वाजो महामुनिः । राघवस्य तु तद्वाक्यमर्थग्राहकमब्रवीत् २७ दश क्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन्निवत्स्यसि । महर्षिसेवितः पुण्यः पर्वतः शुभ-दर्शनः २८ गोलाङ्गूलानुचरितो वानरर्क्षनिषेवितः । चित्रकूट इति ख्यातो गन्धमादनसंनिभः २९ यावता चित्रकूटस्य नरः शृङ्गाण्यवेक्षते । कल्याणानि समाधत्ते न मोहे कुरुते मनः ३० ऋषयस्तत्र बहवो विहृत्य शरदां शतम् । तपसा दिवमारूढाः कपालशिरसा सह ३१ प्रविविक्तमहं मन्ये तं वासं भवतः सुखम् । इह वा वनवासाय वस राम मया सह ३२ स रामं सर्वकामैस्तं भरद्वाजः प्रियातिथिम् । सभार्यं सह च भ्रात्रा प्रति-

---

ांत येऊं लागतील असें मला वाटतें. तस्मात्, ह्या कारणामुळें येथें वास्तव्य करणें मला रुचत नाहीं २४,२५. हे भगवन्, एकांत प्रदेशामध्यें एकादें उत्कृष्ट आश्रम-स्थान आम्हांस पहा; ह्मणजे सुखाचा उपभोग घेत आलेली ही जनककन्या वैदेही तेथें सुखानें आनंदांत राहील " २६. हें शुभ वाक्य श्रवण करून महर्षि भरद्वाज रामानें दर्शविलेला उद्देश सिद्धीस जाईल अशा रीतीनें त्याला ह्मणाले २७ " हे रामा, येथून दहा कोसांवर एक पर्वत आहे त्या ठिकाणीं तूं वास्तव्य कर. त्या पुण्य पर्वताचा महर्षींनीं आश्रय केलेला आहे व त्याचें दर्शनही शुभकारक आहे २८. गाई्च्या शेंपटाप्रमाणें शेंपूट असलेले ) गोलांगूल संज्ञक वानर तेथें संचार करीत असतात व इतर वानर आणि अस्वलें तेथें वास्तव्य करीत असतात. गंधमादन पर्वता-सारखा असलेला तो पर्वत चित्रकूट ह्मणून प्रसिद्ध आहे २९. चित्रकूट पर्वताच्या शिखरांचें दर्शन झालें असतां पुरुषाच्या मनांत चांगल्याच गोष्टी येऊं लागतात; पापाकडे त्याची प्रवृत्ति होत नाहीं ३०. त्या ठिकाणीं अनेक ऋषि शेंकडों वर्षें-पर्यंत शंकरांसहवर्तमान क्रीडा करून तपाच्या योगानें स्वर्गाला गेलेले आहेत ३१. मला वाटतें त्या ठिकाणीं तुझें वास्तव्य एकांतामध्यें सुखानें होईल; अथवा, हे रामा, वनवासाकरितां तूं येथें माझ्या संनिध रहा " ३२. तदनंतर सर्व इष्ट वस्तु अर्पण करून त्या भरद्वाजमुनींनीं भार्या सीता आणि भ्राता लक्ष्मण ह्यांसहवर्तमान त्या प्रिय

---

१ मूळ मध्ये 'कपालशिरसा' सह अशीं पदें आहेत त्यांतील पहिल्या पदाचा अर्थ शंकर असा सरळ होत असतांना टीकाकारांनीं ओढून ताणून कांहीं तरी अर्थ केलेला आहे तो योग्य दिसत नाहीं.

जग्राह हर्षयन् ३३ तस्य प्रयागे रामस्य तं महर्षिमुपेयुषः । प्रपन्ना रजनी पुण्या चित्राः कथयतः कथाः ३४ सीतातृतीयः काकुत्स्थः परिश्रान्तः सुखोचितः । भरद्वाजाश्रमे रम्ये तां रात्रिमवसत्सुखम् ३५ प्रभातायां तु शर्वर्यां भरद्वाजमुपागमत् । उवाच नरशार्दूलो मुनिं ज्वलिततेजसम् ३६ शर्वरीं भगवन्नद्य सत्यशील तवाश्रमे । उषिताः स्मो ह वसतिमनुजानातु नो भगवान् ३७ रात्र्यां तु तस्यां व्युष्टायां भरद्वाजोऽब्रवीदिदम् । मधुमूलफलोपेतं चित्रकूटं व्रजेति ह ३८ वासमौपयिकं मन्ये तव राम महाबल । नानानगगणोपेतः किन्नरोरगसेवितः ३९ मयूरनादाभिरतो गजराजनिषेवितः । गम्यतां भवता शैलश्चित्रकूटः स विश्रुतः ॥ पुण्यश्च रमणीयश्च बहुमूलफलायुतः ४० तत्र कुञ्जरयूथानि मृगयूथानि चैव हि । विचरन्ति वनान्तेषु तानि द्रक्ष्यसि राघव ४१ सरित्प्रस्रवणप्रस्थान्दरीकंदरनिर्झरान् । चरतः सीतया सार्धं नन्दिष्यति मनस्तव ४२ प्रहृष्टकोयष्टिभ-

---

अतिथि रामाचें त्याला आनंद होईल अशा रीतीनें आदरातिथ्य केलें ३३. असो. तेव्हां प्रयाग तीर्थाचे ठिकाणीं त्या महर्षींची भेट घेऊन राम अद्भुत कथा सांगत असतांना शुभकारक अशी रात्र पडली ३४. तिसरी सीता ज्याच्याबरोबर होती असा जो सुखाची संवय असलेला व श्रांत झालेला राम भरद्वाज मुनींच्या रम्य आश्रमामध्यें ती रात्र सुखानें राहिला ३५. नंतर रात्र उजाडल्यावर अग्नीप्रमाणें तेजस्वी असलेल्या त्या भरद्वाजमुनींकडे जाऊन तो पुरुषश्रेष्ठ राम त्यांना ह्मणाला ३६ " हे भगवन् हे सत्यशील मुने, आज आपल्या आश्रमामध्यें आह्मीं वास्तव्य केलें. आतां आपण आह्मांला जाण्याची अनुज्ञा द्या " ३७. असो. ती रात्र निघून गेल्यावर भरद्वाज त्याला ह्मणाले " मध, मुळें आणि फळें ह्यांनीं युक्त असलेल्या चित्रकूट पर्वतावर जा ३८. हे महाबलाढ्य रामा, त्या ठिकाणीं तुझें वास्तव्य होणें योग्य आहे असें मला वाटतें. त्या पर्वतावर नानाप्रकाचे वृक्षसमुदाय आहेत, किन्नर आणि उरग तेथें वास्तव्य करीत आहेत ३९, मयूर पक्षांच्या ध्वनींनीं तो गर्जून राहिलेला आहे व मोठमोठ्या गजांनीं त्याचा आश्रय केलेला आहे, चित्रकूट ह्मणून तो प्रख्यात आहे आणि पवित्र व रमणीय असून नानाप्रकारच्या फलमूलांनीं संपन्न आहे. करितां, अशा पर्वतावर तूं जा ४०. हे राघवा, त्या ठिकाणीं वनांतून गजांचे व मृगांचे कळप संचार करीत असतात ते तूं अवलोकन करशील ४१ व लहान लहान जलप्रवाहांनीं युक्त असलेलीं पर्वतशिखरें, दऱ्या, गुहा, व झरे हींही तुझ्या अवलोकनांत येतील आणि सीतेसहवर्तमान तेथें तूं संचार करूं लागलास ह्मणजे तुझ्या मनाला आनंद होईल ४२. आनं-

कोकिलस्वनैर्विनोदयन्तं च सुखं परं शिवम् । मृगैश्च मत्तैर्बहुभिश्च कुञ्जरैः सुरम्यमासाद्य समावसाश्रयम् ४३ [ २१९८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुष्पञ्चाशः सर्गः ॥ ५४ ॥

उषित्वा रजनीं तत्र राजपुत्रावरिन्दमौ । महर्षिमभिवाद्याथ जग्मतुस्तं गिरिं प्रति १ तेषां स्वस्त्ययनं चैव महर्षिः स चकार ह । प्रस्थितान्प्रेक्ष्य तांश्चैव पिता पुत्रानिवौरसान् २ ततः प्रचक्रमे वक्तुं वचनं स महामुनिः । भरद्वाजो महातेजा रामं सत्यपराक्रमम् ३ गङ्गायमुनयोः संधिमादाय मनुजर्षभ । कालिन्दीमनुगच्छेतां नदीं पश्चान्मुखाश्रिताम् ४ अथासाद्य तु कालिन्दीं प्रतिस्रोतः समागताम् । तस्यास्तीर्थं प्रचरितं प्रकामं प्रेक्ष्य राघव ५ तत्र यूयं प्लवं कृत्वा तरतांशुमतीं नदीम् ६ ततो न्यग्रोधमासाद्य महान्तं हरितच्छदम् । परीतं बहुभिर्वृक्षैः श्यामं सिद्धोपसेवितम् ७ तस्मिन्सीताञ्जलिं कृत्वा प्रयुञ्जीताशिषां क्रियाम् । समासाद्य च तं वृक्षं वसेद्वातिक्रमेतवा ॥ क्रोशमात्रं ततो गत्वा नीलं प्रेक्ष्य

---

दित झालेल्या टिट्टिभ व कोकिल पक्षांच्या शब्दांनीं चित्ताला आनंद देणारा, सुखावह, अत्यंत कल्याणकारक आणि मत्त मृग व अनेक गज ह्यांमुळें अत्यंत रमणीय असा जो आश्रमस्थानभूत असलेला चित्रकूट पर्वत तेथें तूं वास्तव्य कर ४३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चोपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५४ ॥

त्या भरद्वाज मुनींच्या आश्रमामध्यें ती रात्र काढिल्यावर ते शत्रुदमनकरणारे राजपुत्र रामलक्ष्मण भरद्वाजमहर्षींना अभिवंदन करून त्या पर्वताकडे निघाले असतां १, त्यांना निघालेले पाहून ज्याप्रमाणें औरसपुत्रांकरितां पिता पुण्याहवाचन करितो त्याप्रमाणें त्यांनीं त्यांच्याकरितां पुण्याहवाचन केलें २. नंतर महातेजस्वी भरद्वाज महामुनींनीं अमोघपराक्रमी रामाशीं भाषण करण्यास सुरवात केली कीं ३ " हे पुरुषश्रेष्ठा रामा, गंगा आणि यमुना ह्यांच्या संगमापासून पश्चिम बाजूलाच जिच्या नांवानें व्यवहार चालतो त्या यमुना नदीला अनुलक्षून तुह्मी जा ४. आणि ती नदी जेथें उलटी वहात आहे तेथें अतिशय प्रचारांत असलेला नावेचा उतार दृष्टोत्पत्तीस आल्यावर, हे राघवा ५, त्या ठिकाणीं तुह्मी कांहीं तरी तरून जाण्याचें साधन करा आणि यमुना नदी तरून जा ६. तदनंतर हिरव्या पानांनीं युक्त, अनेक वृक्षांनीं परिवेष्टित श्यामवर्ण आणि सिद्धांनीं आश्रित असा मोठा वटवृक्ष लागला ह्मणजे ७ सीतेनें हात जोडून त्याची प्रार्थना करावी आणि त्या वृक्षापाशीं आल्यावर तुह्मी तेथें

च काननम् ८ सल्लकीबदरीमिश्रं राम वन्यैश्च यामुनैः । स पन्थाश्चित्रकूटस्य गतस्य बहुशो मया ९ रम्यो मार्दवयुक्तश्च दावैश्चैव विवर्जितः । इति पन्थानमादिश्य महर्षिः संन्यवर्तत १० अभिवाद्य तथेत्युक्त्वा रामेण विनिवर्तितः । उपावृत्ते मुनौ तस्मिन्रामो लक्ष्मणमब्रवीत् ११ कृतपुण्याः स्म भद्रं ते मुनिर्यन्नोनुकंपते । इति तौ पुरुषव्याघ्रौ मन्त्रयित्वा मनस्विनौ १२ सीतामेवाग्रतः कृत्वा कालिन्दीं जग्मतुर्नदीम् । अथासाद्य तु कालिन्दीं शीघ्रस्रोतस्विनीं नदीम् १३ चिन्तामापेदिरे सद्यो नदीजलतितीर्षवः । तौ काष्ठसंघाटमथो चक्रतुः सुमहाप्लवम् १४ शुष्कैर्वंशैः समाकीर्णमुशीरैश्च समावृतम् । ततो वैतसशाखाश्च जंबुशाखाश्च वीर्यवान् १५ चकार लक्ष्मणश्छित्त्वा सीतायाः सुखमासनम् । तत्र श्रियमिवाचिन्त्यां रामो दाशरथिः प्रियाम् १६ ईषत्सलज्जमानां तामध्यारोपयत प्लवम् । पार्श्वे तत्र च वैदेह्या वसने भूषणानि च १७ प्लवे कठिनकाजं च रामश्चक्रे समाहितः । आरोप्य सीतां प्रथमं संघाटं

---

रहावें अथवा तेथून पुढें जावें ८. तेथून एक कोसभर गेल्यानंतर सल्लकी व बदरी ह्या वृक्षांनीं युक्त व यमुनातीराला असलेल्या श्वापदांनीं संपन्न असें नीलवर्ण वन दृष्टोत्पत्तीस आलें ह्मणजे ९ तोच चित्रकूट पर्वताचा मार्ग होय; मी त्या मार्गानें पुष्कळ वेळ गेलोलों आहें. तो मोठा रमणीय व मृदु असून त्यांत कधीं वणवे लागत नाहींत " १०. ह्याप्रमाणें मार्ग सांगितल्यावर महर्षि परत फिरले व " ठीक आहे " असें ह्मणून रामानेंही अभिवंदन पूर्वक त्यांना परत फिरविलें ११. ते मुनि परत फिरल्यावर राम लक्ष्मणाला ह्मणाला " तुझें कल्याण असो. ज्याअर्थीं भरद्वाजमुनि आपणांवर दया करीत आहेत त्याअर्थीं आपण कांहींतरी पुण्य केलें आहे " १२. ह्याप्रमाणें विचारी पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण आपआपसांत बोलून आणि सीतेलाच पुढें घालून यमुनानदीकडे गेले १३. तदनंतर शीघ्रप्रवाहानें युक्त असलेल्या यमुनानदीसमीप आल्यावर त्या नदीच्या उदकांतून लगेच तरून जाण्याची इच्छा करणाऱ्या त्या त्रिवर्गांना चिंता पडली १४. तेव्हां काष्ठें एकत्र बांधून त्यांनीं एक मोठासा पेटा तयार केला व वनांतील वाळलेलीं काष्ठें त्यांत घातलीं होतीं आणि काळ्या वाळ्यानें तो मढविलेला होता १५. तदनंतर वीर्यवान् लक्ष्मणानें वेतस वृक्षांच्या व जंबू वृक्षांच्या फांद्या तोडून आणून सुखानें बसतां येईल अशी जागा सीतेकरितां तयार केली. अचिंत्य प्रभावानें युक्त असलेली लक्ष्मीच कीं काय अशा त्या आपल्या किंचित् लाजणाऱ्या प्रियेला दाशरथिरामानें पेट्यावर चढविलें आणि त्या पेट्यावर एका बाजूला

परिगृह्य तौ १८ ततः प्रतेरतुर्यत्तौ प्रीतौ दशरथात्मजौ १९ कालिन्दीमध्यमायाता सीतात्वेनामवन्दत । स्वस्ति देवि तरामि त्वां पारयेन्मे पतिर्व्रतम् ॥ यक्ष्ये त्वा गोसहस्रेण सुराघटशतेन च २० स्वस्ति प्रत्यागते रामे पुरीमिक्ष्वाकुपालिताम् । कालिन्दीमथसीता तु याचमाना कृताञ्जलिः २१ तीरमेवाभिसंप्राप्ता दक्षिणं वरवर्णिनी । ततः प्लवेनांशुमतीं शीघ्रगामूर्मिमालिनीम् २२ तीरजैर्बहुभिर्वृक्षैः संतेरुर्यमुनां नदीम् । ते तु प्लवमुत्सृज्य प्रस्थाय यमुनावनात् २३ श्यामं न्यग्रोधमासेदुः शीतलं हरितच्छदम् । न्यग्रोधं समुपागम्य वैदेहीचाभ्यवन्दत २४ नमस्तेस्तु महावृक्ष पारयेन्मेपतिर्व्रतम् । कौसल्यां चैव पश्येम सुमित्रां च यशस्विनीम् २५ इति सीताञ्जलिं कृत्वा पर्यगच्छन्मनस्विनी । अवलोक्य ततः सीतामायाचंतीमनिन्दिताम् २६ दयितां च विधेयां च रामो लक्ष्मणमब्रवीत् । सीतामादाय गच्छत्वमग्रतो भरतानुज २७ पृष्ठतोनुगमिष्यामि

---

सीतेचीं वस्त्रें, भूषणें, कुदळ व पेटी हें सामान दक्ष राहून ठेवून दिलें १६,१७,१८. ह्याप्रमाणें सीतेला प्रथम पेट्यावर चढवून आणि नंतर स्वतः त्याचा स्वीकार करून ते जितेंद्रिय दशरथपुत्र आनंदानें तरून जाऊं लागले १९. यमुनेच्या मध्यभागीं आल्यानंतर सीता वंदन करून तिला ह्मणाली " हे देवि, मी जशी तुझ्यांतून तरून जात आहें तसें माझ्या पतीनें स्वीकारिलेलें व्रत पार पाडावें राम इक्ष्वाकुवंशजांनीं रक्षण केलेल्या अयोध्यानगरीला सुखरूप परत आल्यावर सहस्र गाई व शंभर मद्यघट ह्यांच्या योगानें मी तुझें पूजन करीन " २०,२१. ह्याप्रमाणें सीता यमुनेची हात जोडून प्रार्थना करीत असतांनाच ती उत्कृष्ट स्त्री नदीच्या दक्षिण तीराला जाऊन पोंचली २२. सारांश, ( भरद्वाजमुनींचा निरोप घेऊन निघाल्यानंतर ) तीरावर असलेल्या अनेक वृक्षांनीं, लाटांनीं व शीघ्रप्रवाहानें युक्त असलेली सूर्यकन्या यमुनानदी ते तरून गेले २३. त्या तीरावरील वृक्षांमध्यें तो पेटा टाकून देऊन ते यमुनेच्या वनांतून पुढें गेले असतां हिरव्या पानांनीं युक्त, शीतल आणि श्यामवर्ण असा वटवृक्ष त्यांना लागला २४. व त्या वटवृक्षासमीप आल्यानंतर सीता अभिवंदनपूर्वक त्याला ह्मणाली " हे महावृक्षा, तुला माझा नमस्कार असो. माझ्या पतीच्या हातून ( चवदा वर्षें वनवास करण्याचें ) व्रत शेंवटास जावें २५ आणि कौसल्येचें व यशस्विनी सुमित्रेचें मला दर्शन व्हावें ". ह्याप्रमाणें हात जोडून प्रार्थना करीत करीत त्या विचारी सीतेनें त्या वटवृक्षाला प्रदक्षिणा केली २६. तेव्हां प्रिय, आज्ञेंत वागणारी आणि निर्दोषी अशी सीता वृक्षाची प्रार्थना करीत आहे असें अवलोकन करून

सायुधो द्विपदां वर । यद्यत्फलं प्रार्थयते पुष्पं वा जनकात्मजा २८ तत्त-त्प्रयच्छ वैदेह्या यत्रास्या रमते मनः । एकैकं पादपं गुल्मं लतां वा पुष्प-शालिनीम् २९ अदृष्टरूपां पश्यन्ती रामं पप्रच्छ साबला । रमणीयान्बहुवि-धान्पादपान्कुसुमोत्करान् ३० सीतावचनसंरब्ध आनयामास लक्ष्मणः ३१ विचित्रवालुकजलां हंससारसनादिताम् । रेमे जनकराजस्य सुता प्रेक्ष्य तदा नदीम् ३२ क्रोशमात्रं ततो गत्वा भ्रातरौ रामलक्ष्मणौ । बहून्मे-ध्यान्मृगान्हत्वा चेरतुर्यमुनावने ३३ विहृत्य ते बर्हिणपूगनादिते शुभे वने वारणवानरायुते । समं नदीवप्रमुपेत्य सत्वरं निवासमाजग्मुरदीनद-र्शनाः ३४ [२२३२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयो-ध्याकाण्डे पञ्चपञ्चाशः सर्गः ॥ ५५ ॥

अथ रात्र्यां व्यतीतायामवसुप्तमनन्तरम् । प्रबोधयामास शनैर्लक्ष्मणं रघुपुङ्गवः १ सौमित्रे शृणु वन्यानां वल्गु व्याहरतां स्वनम् । संप्रतिष्ठा-

---

राम लक्ष्मणाला ह्मणाला २७ " हे लक्ष्मणा, तूं सीतेला घेऊन पुढें चल; हे पुरुषश्रेष्ठा, मी धनुष्य घेऊन मागून येतों २८. ही जनककन्या जें जें फल अथवा पुष्प मागेल आणि ज्या ज्या वस्तूवर हिचें मन बसेल ती ती तूं हिला आणून दे २९. (ह्याप्रमाणें रामानें लक्ष्मणाला सांगितल्यानंतर) वृक्ष, झुडूप अथवा पुष्पवली असें जें कांहीं पूर्वी पहाण्यांत न आलेलें सीतेच्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागलें त्या प्रत्येकाबद्दल ती अबला रामाला वेग-वेगळें विचारूं लागली ३०. आणि सीतेनें सांगतांक्षणीं लक्ष्मणही त्वरा करून नानाप्रकारच्या रमणीय वृक्षांचे पुष्पगुच्छ तिला आणून देऊं लागला ३१. जातां जातां आश्चर्य कारक वाळू व उदक ह्यांनीं युक्त आणि हंस व सारस पक्ष्यांनीं नादित अशी यमुना नदी अवलोकन करून जनककन्येच्या चित्ताला आनंद होऊं लागला ३२. असो. तेथून एक कोस गेल्यावर भ्राते रामलक्ष्मण अनेक पवित्र मृग मारून यमुनेच्या वनांत संचार करूं लागले ३३ आणि मयूर पक्ष्यांच्या समुदायांनीं नादित व गज आणि वानर ह्यांनीं युक्त अशा त्या शुभवनामध्यें विहार केल्यावर सत्वर नदीच्या तीरीं येऊन ते भव्य त्रिवर्ग निवासस्थानाला गेले ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंचावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५५ ॥

तदनंतर रात्र उजाडली असतांही निद्रिस्थ असलेल्या लक्ष्मणाला रघुवंशजश्रेष्ठ राम

---

१ ह्यावरून लक्ष्मणानें चवदा वर्षे पर्यंत झोंप घेतली नाहीं असा जो लोकप्रवाद आहे तो इतर रामायणांत दृष्ट असून ह्यांच्या ह्या विधानावरून वैकल्पिक असावासें होतें.

महे कालः प्रस्थानस्य परंतपः २ प्रसुप्तस्तु ततो भ्रात्रा समये प्रतिबोधितः । जहौ निद्रां च तन्द्रीं च प्रसक्तं च परिश्रमम् ३ तत उत्थाय ते सर्वे स्पृष्ट्वा नद्याः शिवं जलम् । पन्थानमृषिभिर्जुष्टं चित्रकूटस्य तं ययुः ४ ततः संप्रस्थितः काले रामः सौमित्रिणा सह । सीतां कमलपत्राक्षीमिदं वचनमब्रवीत् ५ आदीप्तानिव वैदेहि सर्वतः पुष्पितान्नगान् । स्वैः पुष्पैः किंशुकान्पश्य मालिनः शिशिरात्यये ६ पश्य भल्लातकान्बिल्वान्नरैरनुपसेवितान् । फलपुष्पैरवनतान्नूनं शक्ष्याम जीवितुम् ७ पश्य द्रोण प्रमाणानि लम्बमानानि लक्ष्मण । मधूनि मधुकारीभिः संभृतानि नगे नगे ८ एष क्रोशति नत्यूहस्तं शिखी प्रतिकूजति । रमणीये वनोद्देशे पुष्पसंस्तरसंकटे ९ मातङ्गयूथानुसृतं पक्षिसंघानुनादितम् । चित्रकूटमिमं पश्य प्रवृद्धशिखरं गिरिम् १० समभूमितले रम्ये द्रुमैर्बहुभिरावृते । पुण्ये रंस्यामहे तात चित्रकूटस्य कानने ११ ततस्तौ पादचारेण

---

हळू हळू जागें करून ह्मणाला १. " हे लक्ष्मणा, किलबिल करूं लागलेल्या वनांतील पक्ष्यांचा शब्द तूं श्रवण कर. हे शत्रुतापना आतां आपण चालूं लागूं कारण, निघण्याची वेळ झाली " २. ह्याप्रमाणें भ्रात्या रामानें गाढ निद्रिस्थ असलेल्या लक्ष्मणाला वेळेवर जागें केलें असतां लक्ष्मणानें निद्रा व आळस ह्यांचा त्याग केला आणि त्याला झालेल्या श्रमाचाही परिहार झाला ३. तदनंतर त्या सर्वांनीं उठून यमुनानदीच्या पुण्य उदकामध्यें स्नान वगैरे केलें आणि ऋषींनीं अवलंबन केलेल्या चित्रकूट मार्गाला ते लागले ४. तेव्हां प्रातःकालीं लक्ष्मणासहवर्तमान पुढें जाण्यास निघालेला राम कमलनयन सीतेला ह्मणाला ५ " हे सीते, वसंतऋतूमध्यें स्वतःच्या पुष्पामुळें माला धारण केल्याप्रमाणें दिसत असलेले हे सर्व बाजूंनीं प्रफुल्लित झालेले उज्ज्वल पलाशवृक्ष तूं अवलोकन कर ६. पहा हे भल्लातकवृक्ष आणि बिल्ववृक्ष फलपुष्पांनीं वांकलेले आहेत आणि लोकांनीं ह्यांच्या फलपुष्पांचा उपयोग केलेला नाहीं. तेव्हां आपली उपजीविका चालण्याला खरोखर पंचाइत पडणार नाहीं ७. हे लक्ष्मणा, चार चार पायली मध सांपडेल अशी ही मधुमक्षिकानीं तयार केलेलीं मोहें प्रत्येक वृक्षाला लोंबत आहेत तीं पहा ८. हा पाणकावळा ओरडत आहे आणि त्याचा शब्द ऐकून पुष्पांच्या थव्यानें गच्च भरून गेलेल्या रमणीय वनप्रदेशामध्यें मयूरपक्षी उलट गर्जना करीत आहे ९. मोठमोठ्या शिखरांनीं युक्त असलेला हा चित्रकूटपर्वत अवलोकन कर ह्याच्यावर हत्तींचे कळप असून पक्षिसमुदायांनीं हा नादित झाला आहे १०. बा लक्ष्मणा, अनेक वृक्षांनीं व्याप्त, रम्य, पवित्र व सपाट प्रदेशांर असलेल्या ह्या चित्रकूटपर्वताच्या

गच्छन्तौ सह सीतया। रम्यमासेदतुः शैलं चित्रकूटं मनोरमम् १२ तं तु पर्वतमासाद्य नानापक्षिगणायुतम्। बहुमूलफलं रम्यं संपन्नसरसोदकम् १३ मनोज्ञोयं गिरिः सौम्य नानाद्रुमलतायुतः। बहुमूलफलो रम्यः स्वाजीवः प्रतिभाति मे १४ मुनयश्च महात्मानो वसन्त्यस्मिञ्शिलोच्चये। अयं वासो भवेत्तात वयमत्र वसेमहि १५ इति सीता च रामश्च लक्ष्मणश्च कृताञ्जलिः। अभिगम्याश्रमं सर्वे वाल्मीकिमभिवादयन् १६ तान्महर्षिः प्रमुदितः पूजयामास धर्मवित्। आस्यतामिति चोवाच स्वागतं तं निवेद्य च १७ ततोब्रवीन्महाबाहुर्लक्ष्मणं लक्ष्मणाग्रजः। सन्निवेद्य यथान्यायमात्मानमृषये प्रभुः १८ लक्ष्मणानय दारूणि दृढानि च वराणि च। कुरुष्वावसथं सौम्य वासे मेभिरतं मनः १९ तस्य तद्वचनं श्रुत्वा सौमित्रिर्विविधान्द्रुमान्। आजहार ततश्चक्रे पर्णशालामरिन्दमः २० तां निष्ठितां बद्धकटां दृष्ट्वा रामः सुदर्शनाम्। शुश्रूषमाणमे-

---

वनामध्यें आपण करमणूक करूं" ११. नंतर सीतेसहवर्तमान ते पादचारी रामलक्ष्मण मनोहर आणि रम्य अशा चित्रकूटपर्वताजवळ गेले १२. आणि अनेक प्रकारचे पक्षिसमुदाय, विपुल फळें व मुळें आणि स्वादिष्ट उदक ह्यांनीं युक्त असलेल्या त्या रम्य पर्वताशीं गेल्यानंतर राम लक्ष्मणाला ह्मणाला १३ "हे सौम्या, नानाप्रकारच्या वृक्षलतांनीं युक्त आणि विपुल फलमूलांनीं संपन्न अशा ह्या मनोहर रम्य पर्वतावर उपजीविकेचें साधन चांगलेंच आहे असें मला वाटतें १४. बा लक्ष्मणा, ह्या पर्वतावर महात्मे मुनि वास्तव्य करीत आहेत. तेव्हां आपणालाही हें निवासस्थान बरें आहे; आपण येथें वास्तव्य करूं" १५. ह्याप्रमाणें बोलणें चाललें आहे तोंच वाल्मीकिमुनींच्या[1] आश्रमासमीप येऊन सीता, राम आणि लक्ष्मण ह्या सर्वांनीं वाल्मीकि मुनींना अभिवंदन केलें १६. तेव्हां त्या धर्मवेत्त्या महर्षींनीं आनंदित होऊन त्यांचें पूजन केलें आणि स्वागत प्रश्न झाल्यावर "बसा" ह्मणून त्यांना सांगितलें १७. तदनंतर आपण कोण हें योग्यप्रकारें त्या मुनींना निवेदन करून महापराक्रमी समर्थ राम लक्ष्मणाला ह्मणाला १८ "हे लक्ष्मणा, बळकट आणि उत्कृष्ट अशीं काष्ठें घेऊन ये आणि, हे सौम्य, रहाण्याला एक जागा तयार कर. ह्या ठिकाणीं वास्तव्य करण्याचें माझ्या मनाला रुचत आहे" १९. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर शत्रुदमन लक्ष्मणानें नानाप्रकारचे वृक्ष आणून पर्णकुटिका तयार

---

[1] हे वाल्मीकिमुनि रामायण ग्रथित करणाऱ्या प्राचेतस् वाल्मीकिमुनिहून भिन्न होते असें टीकाकार ह्मणतात व हें त्यांचें ह्मणणें कांहीं अंशीं संभवत आहे.

कात्रमिदं वचनमब्रवीत् २१ ऐणेयं मांसमाहृत्य शालां यक्ष्यामहे वयम् २२ कर्तव्यं वास्तुशमनं सौमित्रे चिरजीविभिः । मृगं हत्वानय क्षिप्रं लक्ष्मणेह शुभेक्षण २३ कर्तव्यः शास्त्रदृष्टो हि विधिर्धर्ममनुस्मर । भ्रातुर्वचनमाज्ञाय लक्ष्मणः परवीरहा २४ चकार च यथोक्तं हि तं रामः पुनरब्रवीत् । ऐणेयं श्रपयस्वैतच्छालां यक्ष्यामहे वयम् २५ त्वर सौम्य मुहूर्तोयं ध्रुवश्च दिवसो ह्ययम् । स लक्ष्मणः कृष्णमृगं हत्वा मेध्यं प्रतापवान् ॥ अथ चिक्षेप सौमित्रिः समिद्धे जातवेदसि २६ तत्तु पक्वं समाज्ञाय निष्टप्तं छिन्नशोणितम् २७ लक्ष्मणः पुरुषव्याघ्रमथ राघवमब्रवीत् । अयं सर्वः समस्ताङ्गः श्रितः कृष्णमृगो मया २८ देवता देवसङ्काश यजस्व कुशलो ह्यसि । रामः स्नात्वा तु नियतो गुणवाञ्जप्यकोविदः २९ संग्रहेणाकरोत्सर्वान्मन्त्रान्सत्रावसानिकान् । इष्ट्वा देव-

---

केली २०. तेव्हां चांगल्या रीतीनें उभारिलेली आणि पाऊस आंत न येण्याकरितां गवती छपऱ्या घातलेली ती मनोहर पर्णकुटिका अवलोकन करून एकचित्तानें आपली सेवा करण्यास तत्पर असलेल्या लक्ष्मणाला राम ह्मणाले २१, " हे लक्ष्मणा, मृगमांस आणून आपण ह्या पर्णशालेची वास्तुशांति करूं. कारण, चिरजीवी होऊं इच्छिणाऱ्या पुरुषांनीं वास्तुशांति अवश्य केली पाहिजे २२. ह्यास्तव, हे सुलोचना लक्ष्मणा, तूं सत्वर मृग मारून घेऊन ये हा विधि शास्त्रविहित आहे; धर्मशास्त्राचें स्मरण कर " २३. हें भ्रात्याचें भाषण ऐकून शत्रुपक्षीयवीरनाशक लक्ष्मणानें रामानें सांगितल्याप्रमाणें केलें. तेव्हां राम त्याला ह्मणाला २४ " त्वरा कर आणि हें मृगमांस सत्वर शिजीव. आपण आतांच वास्तुशांति करूं हा सौम्य मुहूर्त आहे आणि हा दिवस ध्रुवसंज्ञक आहे " २५. ह्यानंतर प्रतापी सुमित्रापुत्र, लक्ष्मणानें यज्ञाला योग्य असा कृष्णमृग मारून आणून प्रज्वलित झालेल्या अग्नीमध्यें तो टाकिला २६. व तो पक्व झाला आहे आणि अत्यंत तप्त होऊन त्याच्यांतील रक्तस्रावही बंद झाला आहे २७ असें आढळून आल्यावर लक्ष्मण पुरुषश्रेष्ठ रामाला ह्मणाला " हे देवतुल्य रामा, संपूर्ण अवयवांनीं युक्त असा हा सर्व कृष्णमृग मीं भाजून काढिला आहे. आतां आपण देवतांना उद्देशून याग करा; त्या कामामध्यें आपण कुशल आहांत " २८. इतकें झाल्यावर जपजाप्याविषयीं अभिज्ञ, गुणवान् आणि जितेंद्रिय अशा रामानें स्नान करून व यागसमाप्तिविषयक सर्व मंत्र घेऊन थोडक्यांत वास्तुशांति केली २९. सर्व देवगणांना उद्देशून यजन केल्यावर शुचिर्भूत रामानें त्या वास्तूमध्यें प्रवेश केला असतां अत्यंत तेजस्वी रामाच्या मनाला

गणान्सर्वान्विवेशावसथं शुचिः ३० बभूव च मनोल्हादो रामस्यामिततेजसः । वैश्वदेवं बलिं कृत्वा रौद्रं वैष्णवमेव च ३१ वास्तुशंसमनीयानि मङ्गलानि प्रवर्तयन् । जपं च न्यायतः कृत्वा स्नात्वा नद्यां यथा विधि ३२ पापसंशमनं रामश्चकार बलिमुत्तमम् । वेदिस्थलविधानानि चैत्यान्यायतनानि च । आश्रमस्यानुरूपाणि स्थापयामास राघवः ३३ तां वृक्षपर्णच्छदनां मनोज्ञां यथाप्रदेशं सुकृतां निवाताम् । वासाय सर्वे विविशुः समेताः सभां यथा देवगणाः सुधर्माम् ३४ सुरम्यमासाद्य तु चित्रकूटं नदीं च तां माल्यवतीं सुतीर्थाम् । ननंद हृष्टो मृगपक्षिजुष्टां जहौ च दुःखं पुरविप्रवासात् ३५ [२२६७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षट्पञ्चाशः सर्गः ॥ ५६

कथयित्वा तु दुःखार्तः सुमन्त्रेण चिरं सह । रामे दक्षिणकूलस्थे जगाम स्वगृहं गुहः १ भरद्वाजाभिगमनं प्रयागे च सभाजनम् । आगिरेर्गमनं तेषां तत्रस्थैरभिलक्षितम् २ अनुज्ञातः सुमन्त्रोथ योजयित्वा

---

आल्हाद झाला ३०. तदनंतर वास्तुदोष शमनार्थ मंगलकारक सूक्तें वगैरे ब्राह्मणांना ह्मणावयाला सांगून रामानें नदीमध्यें यथाविधि स्नान केलें आणि यथायोग्यरीतीनें जप करून विश्वदेव, रुद्र आणि विष्णु ह्या देवतांना उद्देशून बलि दिल्यानंतर पापशमनार्थ असा दुसराही उत्कृष्ट बलि रामानें दिला ३१,३२. नंतर आश्रमाला अनुरूप अशीं जीं देवालयें, पार आणि बलि नेऊन ठेवण्याच्या जागा होत्या तेथें रामानें बलि नेऊन ठेविले ३३. तदनंतर देवगण ज्याप्रमाणें सुधर्मासंज्ञक सभेमध्यें प्रवेश करितात त्याप्रमाणें वृक्षपर्णांचें आच्छादन घातलेल्या आणि जागेच्या आदमासाप्रमाणें उत्कृष्ट रीतीनें उभारून वाऱ्याचा बंदोबस्त केलेल्या त्या मनोहर पर्णकुटिकेमध्यें त्या सर्वांनीं एकदम प्रवेश केला ३४ व ह्याप्रमाणें अत्यंत मनोहर चित्रकूट पर्वत आणि उत्कृष्ट जलानें युक्त व पशुपक्ष्यांनीं सेवित अशी ती माल्यवती नदी प्राप्त झाल्यामुळें रामाला हर्ष झाला आणि नगरापासून बाहेर जाण्यासंबंधाचें दुःख त्याला वाटेनासें झालें ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील छपन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५६ ॥

राम गंगेच्या दक्षिण तीराला गेल्यानंतर दुःखाकुल झालेला गुह बराच वेळपर्यंत सुमंत्रसारथ्याशीं गोष्टी सांगून आपल्या घरीं गेला १. तदनंतर राम प्रयागतीर्थावर भरद्वाज मुनीकडे गेला असतां तेथें त्यांनीं त्याचा सत्कार केला व पुढें तो चित्रकूट पर्वताला जाऊन पोंचला अशी गुहाच्या हेरांकडून बातमी लागल्यावर २ गुहाची

हयोत्तमान् । अयोध्यामेव नगरीं प्रययौ गाढदुर्मनाः ३ स वनानि सुगन्धीनि सरितश्च सरांसि च । पश्यन्यत्तो ययौ शीघ्रं ग्रामाणि नगराणि च ४ ततः सायाह्नसमये द्वितीयेहनि सारथिः । अयोध्यां समनुप्राप्य विरानन्दां ददर्श ह ५ स शून्यामिव निःशब्दां दृष्ट्वा परमदुर्मनाः । सुमन्त्रश्चिन्तयामास शोकवेगसमाहतः ६ कच्चिन्न सगजा साश्वा सजना सजनाधिपा । रामसन्तापदुःखेन दग्धा शोकाग्निना पुरी ७ इति चिन्तापरः सूतो वाजिभिः शीघ्रयायिभिः । नगरद्वारमासाद्य त्वरितः प्रविवेश ह ८ सुमन्त्रमभिधावन्तः शतशोथ सहस्रशः । क्व राम इति पृच्छन्तः सूतमभ्यद्रवन्नराः ९ तेषां शशंस गङ्गायामहमापृच्छ्य राघवम् । अनुज्ञातो निवृत्तोस्मि धार्मिकेण महात्मना १० ते तीर्णा इति विज्ञाय बाष्पपूर्णमुखा नराः । अहो धिगिति निःश्वस्य हा रामेति विचुक्रुशुः ११ शुश्राव च वचस्तेषां वृन्दं वृन्दं च तिष्ठताम् । हताः

---

अनुज्ञा घेऊन सुमंत्रसारथ्यानें उत्कृष्ट घोडे रथाला जोडिले व अत्यंत खिन्न होऊन तो अयोध्यानगरीकडेच चालता झाला ३. सावधपणानें असलेला व सावधपणानें वागणारा तो सुमंत्र सारथि सुगंधी वनें, नद्या, सरोवरें, गांव आणि नगरें अवलोकन करीत करीत चालला ४. तदनंतर दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं तो अयोध्येपाशीं आला असतां ती आनंद रहित आहे असें त्याला दिसलें ५. तेव्हां जिच्यामध्यें कसलीही गडबड नाहीं अशी ती जणु शून्य झालेली अयोध्या अवलोकन करून आधींच अत्यंत खिन्न झालेला तो सुमंत्र शोकवेगानें अगदीं घेरून गेला आणि " रामविषयक संतापदुःखानें युक्त अशा शोकाग्नीनें गज, अश्व, प्रजा व राजा ह्यांसहवर्तमान ही नगरी दग्ध तर झाली नाहीं नां ! " असें त्याच्या मनांत येऊं लागलें ६,७. व ह्याप्रमाणें चिंताक्रांत झालेला तो सारथि शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांच्या योगानें नगराच्या द्वाराशीं येऊन सत्वर आंत प्रविष्ट झाला ८. तेव्हां शेंकडों हजारों लोक " राम कोठें आहे " असें विचारीत विचारीत सुमंत्र सारथ्याकडे धांवत धांवत गेले ९. त्यांना सुमंत्र ह्मणाला " गंगेच्या तीरीं गेल्यावर महात्म्या धर्मनिष्ठ रामानें मला परत जाण्याची अनुज्ञा दिली आणि तेथें त्याला विचारून मी आलों " १०. ( ह्याप्रमाणें त्यानें सांगितलें असतां ) ते त्रिवर्ग गंगातरून गेले असें समजतांक्षणीं लोकांचीं मुखें अश्रुपातानें भरून गेलीं आणि " धिक्कार धिक्कार " ह्मणून सुस्कारे टाकीत टाकीत " हे रामा, हे रामा, " असा ते आक्रोश करूं लागले ११. टोळ्या टोळ्यांनीं मार्गामध्यें उभे राहिलेल्या त्या लोकांचें आणखीही बोलणें त्या सुमंत्र

स्म खलु येनेह पश्याम इति राघवम् १२ दानयज्ञविवाहेषु समाजेषु महत्सु च । न द्रक्ष्यामः पुनर्जातु धार्मिकं राममन्तरा १३ किं समर्थं जनस्यास्य किं प्रियं किं सुखावहम् । इति रामेण नगरं पित्रेव परिपालितम् १४ वातायनगतानां च स्त्रीणामन्वंतरापणम् । राममेवाभितप्तानां शुश्राव परिदेवनाम् १५ स राजमार्गमध्येन सुमन्त्रः पिहिताननः । यत्र राजा दशरथस्तदेवोपययौ गृहम् १६ सोवतीर्य रथाच्छीघ्रं राजवेश्म प्रविश्य च । कक्ष्याः सप्ताभिचक्राम महाजनसमाकुलाः १७ हर्म्यैर्विमानैः प्रासादैरवेक्ष्याथ समागतम् । हाहाकारकृतानार्यो रामादर्शनकर्शिताः १८ आयतैर्विमलैर्नेत्रैरश्रुवेगपरिप्लुतैः । अन्योन्यमभिवीक्षन्ते व्यक्तमार्ततरा स्त्रियः १९ ततो दशरथस्त्रीणां प्रासादेभ्यस्ततस्ततः । रामशोकाभितप्तानां मन्दं शुश्राव जल्पितम् २० सह रामेण निर्यातो विना राममिहागतः । सूतः किं नाम कौसल्यां क्रोशन्तीं प्रतिवक्ष्यति २१

---

सारथ्यानें ऐकिलें. ( ते ह्मणूं लागले ) " फुटलें आमचें नशीब ! राम आमच्या दृष्टीं पडत नाहीं १२ आणि दान यज्ञ व विवाह हीं कृत्यें सुरू झालीं असतां मोठमोठ्या समाजामध्यें आतां धर्मनिष्ठ राम मध्यंतरीं पुनरपि आमच्या दृष्टीं पडणें नाहीं १३. ह्या लोकांना काय योग्य आहे, त्यांना काय प्रिय आहे, कोणती गोष्ट ह्यांना सुखावह होणारी आहे असा विचार करून रामानें ह्या नगराचें पित्याप्रमाणें परिपालन केलें होतें " १४. तदनंतर तो सुमंत्र सारथि बाजारांतून जाऊं लागला असतां रामाकरितांच शोकाकुल झालेल्या स्त्रिया खिडक्यांतून उभ्या राहून विलाप करीत होत्या तें त्याच्या कानांवर आलें १५. राजमार्गांतून जातांना त्या सुमंत्रसारथ्यानें तोंडावर बुरखा घेतला होता ( व मध्यंतरीं कोठेंही न थांबतां ) दशरथराजा ज्या घरांत होता तेथेंच तो सुमंत्र गेला १६. जवळ आल्यानंतर रथांतून सत्वर खाली उतरून तो राजवाड्यांत शिरला आणि मोठमोठ्या लोकांनीं भरलेले सात चौक ओलांडून तो पुढें गेला १७. दर्शन न झाल्यामुळें कृश झालेल्या नगरवासी स्त्रिया, वाडे, प्रासाद आणि सात मजली हवेल्या ह्यांतून सुमंत्र ( रामाशिवाय ) आल्याचें पाहून हाहाकार करूं लागल्या १८ आणि दीर्घ निर्मल व अश्रुप्रवाहानें परिप्लुत अशा नेत्रांनीं त्या अतिशय दुःखित झालेल्या स्त्रिया एकमेकींकडे भांबावून पाहूं लागल्या १९. असो. तदनंतर रामाच्या शोकानें तप्त झालेल्या दशरथ स्त्रियांचें हळूं हळूं बोलणें प्रासादावरून सुमंत्राच्या कानीं येऊं लागलें २०. " रामाबरोबर नगरांतून बाहेर गेलेला हा सारथि रामावांचून येथें आला आहे. तेव्हां आतां हा आक्रोश करीत बसलेल्या कौसल्येला

यथा च मन्ये दुर्जीवमेवं न सुकरं ध्रुवम् । आच्छिद्य पुत्रे निर्याते कौसल्या यत्र जीवति २२ सत्यरूपं तु तद्वाक्यं राजस्त्रीणां निशामयन् । प्रदीप्त इव शोकेन विवेश सहसा गृहम् २३ स प्रविश्याष्टमीं कक्ष्यां राजानं दीनमातुरम् । पुत्रशोकपरिद्यूनमपश्यत्पाण्डुरे गृहे २४ अभिगम्य तमासीनं राजानमभिवाद्य च । सुमन्त्रो रामवचनं यथोक्तं प्रत्यवेदयत् २५ स तूष्णीमेव तच्छ्रुत्वा राजा विद्रुतमानसः । मूर्छितो न्यपतद्भूमौ रामशोकाभिपीडितः २६ ततोन्तःपुरमाविद्धं मूर्छिते पृथिवीपतौ । उच्छ्रित्य बाहू चुक्रोश नृपतौ पतिते क्षितौ २७ सुमित्रया तु सहिता कौसल्या पतितं पतिम् । उत्थापयामास तदा वचनं चेदमब्रवीत् २८ इमं तस्य महाभाग दूतं दुष्करकारिणः । वनवासादनुप्राप्तं कस्मान्न प्रतिभाषसे २९ अद्येममनयं कृत्वा व्यपत्रपसि राघव । उत्तिष्ठ सुकृतं तेऽस्तु शोकेन स्यात्सहायता ३० देव यस्याभयाद्रामं नानुपृच्छसि सारथिम् । नेह तिष्ठति कैकेयी विश्रब्धं प्रतिभाष्यताम् ३१ सा तथोक्त्वा महाराजं

---

काय बरें सांगेल ! २१. राज्यलक्ष्मीचा त्याग करून पुत्र अरण्यांत निघून गेला असतांही ज्याअर्थी कौसल्या जिवंत आहे त्याअर्थी जीवन जसें दुःखदायक आहे तसें निश्चयानें तें सुखकारक नाहीं असें वाटतें " २२. हें राजस्त्रियांचें सत्य भाषण श्रवण करीत करीत शोकानें जसा कांहीं प्रदीप्त झालेला तो सुमंत्रसारथि घरांत गेला २३ व आठव्या चौकांत गेल्यावर एका श्वेतवर्ण दिवाणखान्यामध्यें पुत्रशोकानें खिन्न, दीन व दुःखाकुल होऊन बसलेल्या अशा राजाला त्यानें अवलोकन केलें २४. तेव्हां तेथें बसलेल्या राजाकडे जाऊन व त्याला अभिवंदन करून सुमंत्रानें रामाचें भाषण त्याच्या सांगण्याप्रमाणें त्याला कळविलें २५. तेव्हां स्वस्थ बसूनच तें ऐकून घेऊन मनामध्यें क्षुब्ध झालेला दशरथराजा रामाच्या शोकानें व्याप्त झाल्यामुळें भूमीवर मूर्छा येऊन पडला २६. भूपति मूर्छित झाला असतां अंतःपुरांतील सर्व स्त्रिया दुःखित झाल्या आणि राजा भूमीवर पडतांक्षणीं हात वर करून आक्रोश करूं लागल्या २७. सुमित्रेसहवर्तमान कौसल्या भूमीवर पडलेल्या आपल्या पतीला उठवून ह्मणाली २८ " हे महाभाग्यवान् भूपते, दुर्घट कर्म करणाऱ्या रामाचा हा वनवासांतून दूत येथें आला आहे त्याच्याशीं आपण भाषण कां करीत नाहीं ? २९. हे रघुवंशज, आज हा अनर्थ केल्यामुळें आपणांला ( त्याच्याशीं बोलण्याची ) लाज कां वाटत आहे ? उठा; आपलें कल्याण असो. आपणच जर शोक करूं लागला तर आपणांला धीर कोण देणार ? ३०. हे भूपते, जिच्या भीतीमुळें रामाचा वृत्तांत आपण सारथ्याला विचारीत नाहीं ती कैकेयी

कौसल्या लोकलालसा । धरण्यां निपपाताशु बाष्पविप्लुतभाषिणी ३२ विलपन्तीं तथा दृष्ट्वा कौसल्यां पतितां भुवि । पतिं चावेक्ष्य ताः सर्वाः समंताद्रुरुदुः स्त्रियः ३३ ततस्तमन्तःपुरनादमुत्थितं समीक्ष्य वृद्धास्तरुणाश्च मानवाः । स्त्रियश्च सर्वा रुरुदुः समंततः पुरं तदा सीत्पुनरेव सङ्कुलम् ३४ [२३०१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये योध्याकाण्डे सप्तपञ्चाशः सर्गः ॥ ५७ ॥

प्रत्याश्वस्तो यदा राजा मोहात्प्रत्यागतस्मृतिः । तदाजुहाव तं सूतं रामवृत्तान्तकारणात् १ तदा सूतो महाराजं कृताञ्जलिरुपस्थितः । राममेवानुशोचन्तं दुःखशोकसमन्वितम् २ वृद्धं परमसन्तप्तं नवग्रहमिवद्विपम् । विनिःश्वसन्तं ध्यायन्तमस्वस्थमिवकुञ्जरम् ३ राजा तु रजसा सूतं ध्वस्ताङ्गं समुपस्थितम् । अश्रुपूर्णमुखं दीनमुवाच परमार्तवत् ४ क्व नु वत्स्यति धर्मात्मा वृक्षमूलमुपाश्रितः । सोत्यन्तसुखितः सूत किमशिष्यति

---

येथें नाहीं; आपण निर्भयपणानें त्याच्याशीं बोला" ३१. ह्याप्रमाणें महाराज दशरथाला सांगून शोकाकुल झालेली व अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत भाषण करणारी ती कौसल्या एकदम भूमीवर पडली ३२. तेव्हां विलाप करितां करितां भूमीवर पडलेल्या पतीला व कौसल्येला अवलोकन करून त्या सर्व स्त्रिया सभोंवतीं रडूं लागल्या ३३. तदनंतर अंतःपुरांतून निघालेला तो ध्वनि कानावर येतांक्षणीं वृद्ध व तरुण असे सर्व पुरुष आणि सर्व स्त्रिया रडूं लागल्या आणि पुनरपि तें नगर सर्व बाजूंनीं क्षुब्ध झालें ३४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्तावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥५७॥

तदनंतर मूर्छा जाऊन सावध झालेल्या त्या दशरथराजानें कैकेयी येथें नाहीं अशी खात्री करून घेतल्यावर रामवृत्तांत विचारण्याकरितां त्या सारथ्याला हाक मारिली १. तेव्हां तो सारथि हात जोडून महाराज दशरथापाशीं आला. तो राजा दुःखशोकांनीं युक्त होऊन रामाकरितांच विलाप करीत होता २. नवीन धरून आणलेल्या गजाप्रमाणें तो अत्यंत संतप्त झालेला वृद्ध राजा सुस्कारे टाकीत होता आणि आपल्या कळपांतून चुकलेल्या हत्तीप्रमाणें चिंताक्रांत होऊन बसला होता ३. असो. ह्याप्रमाणें असलेला तो दशरथ राजा मार्गावरील धुळीनें ज्याचें शरीर भरलेलें आहे; ज्याचें मुख अश्रूंनीं व्याप्त झालें आहे अशा त्या समीप आलेल्या दीन सारथ्याला अत्यंत दुःखानें विचारूं लागला ४ " हे सारथे, वृक्षमूलाचा आश्रय करून तो महात्मा राम आतां कोठें बरें वास्तव्य करील आणि आजपर्यंत अतिशय सुखामध्यें असलेला तो

राघवः ५ दुःखस्यानुचितो दुःखं सुमन्त्र शयनोचितः। भूमिपालात्मजो भूमौ शेते कथमनाथवत् ६ यं यान्तमनुयान्ति स्म पदातिरथकुञ्जराः। स वत्स्यति कथं रामो विजनं वनमाश्रितः ७ व्यालैर्मृगैराचरितं कृष्णसर्पनिषेवितम्। कथं कुमारौ वैदेह्या सार्धं वनमुपाश्रितौ ८ सुकुमार्या तपस्विन्या सुमन्त्र सह सीतया। राजपुत्रौ कथं पादैरवरुह्य रथाद्गतौ ९ सिद्धार्थः खलु सूत त्वं येन दृष्टौ ममात्मजौ। वनान्तं प्रविशन्तौ तावश्विनाविव मन्दरम् १० किमुवाच वचो रामः किमुवाच च लक्ष्मणः। सुमन्त्र वनमासाद्य किमुवाच च मैथिली ११ आसितं शयितं भुक्तं सूत रामस्य कीर्तय। जीविष्याम्यहमेतेन ययातिरिव साधुषु १२ इति सूतो नरेन्द्रेण चोदितः सज्जमानया। उवाच वाचा राजानं सबाष्पपरिबद्धया १३ अब्रवीन्मे महाराज धर्ममेवानुपालयन्। अञ्जलिं राघवः कृत्वा शिरसाभिप्रणम्य च १४ सूत मद्वचनात्तस्य तातस्य विदिता-

---

राम आतां काय बरें खाईल! ५. हे सुमंत्रा, ज्याला दुःखाचा कधींही अनुभव नाहीं व उत्कृष्ट शय्येवर शयन करण्याची ज्याला संवय आहे तो दुःख प्राप्त झालेला राजकुमार अनाथाप्रमाणें कसारें भूमीवर पडत असेल! ६. जो बाहेर निघाला असतां पायदळ, रथ व हत्ती बरोबर जातात तो राम निर्जन वनामध्यें आश्रय करून कसा बरें राहील? ७. अजगर व श्वापदें ज्यामध्यें संचार करीत असतात आणि कृष्ण सर्प ज्यांत वास्तव्य करीत असतात त्या वनाचा आश्रय सीतेसहवर्तमान त्या राजकुमारांनीं कसा बरें केला असेल? ८. हे सुमंत्रा, बिचाऱ्या सुकुमार सीतेसहवर्तमान रथांतून उतरून ते राजकुमार कसें बरें पायांनीं (अरण्यांत) गेले? ९. हे सूता, खरोखर तूं धन्य आहेस. कारण, मंदर पर्वतावर जाणाऱ्या अश्विनीकुमाराप्रमाणें वनामध्यें माझे पुत्र प्रवेश करीत असतांना तूं पाहिले आहेस १०. हे सुमंत्रा, वनांत गेल्यावर रामानें काय सांगितलें, लक्ष्मण काय ह्मणाला आणि सीता काय ह्मणाली (हें तूं मला सांग) ११. हे सूता, रामाचें बसणें, निजणें व भोजन करणें हें सर्व तूं मला सांग; ह्मणजे स्वर्गांतून साधूमध्यें पडलेल्या ययातिराजाप्रमाणें तुझ्यासारख्या सज्जनामध्यें पुत्ररूप स्वर्गसुखापासून भ्रष्ट झालेला मी हा पुत्राचा वृत्तांत ऐकून जिवंत राहीन" १२. ह्याप्रमाणें रामाचा वृत्तांत सांगण्याविषयीं राजानें आज्ञा केल्यावर तो सुमंत्र सारथि अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत राजाला ह्मणाला १३ "हे महाराजा, धर्माचेंच परिपालन करणारा राम हात जोडून आणि मस्तकानें प्रणाम करून मला ह्मणाला १४ "हे सूता, माझ्या सांगण्यावरून तूं त्या आत्मवेत्त्या, महात्म्या व

त्मनः । शिरसा वन्दनीयस्य वन्द्यौ पादौ महात्मनः १५ सर्वमन्तःपुरं वाच्यं सूत मद्वचनात्त्वया । आरोग्यमविशेषेण यथार्हमभिवादनम् १६ माता च मम कौसल्या कुशलं चाभिवादनम् । अप्रमादं च वक्तव्या ब्रूयाश्चैनामिदं वचः १७ धर्मनित्या यथाकालमग्न्यगारपरा भव । देवि देवस्य पादौ च देववत्परिपालय १८ अभिमानं च मानं च त्यक्त्वा वर्तस्व मातृषु । अनुराजानमार्यां च कैकेयीमम्ब कारय १९ कुमारे भरते वृत्तिर्वर्तितव्या च राजवत् । अप्यज्येष्ठा हि राजानो राजधर्ममनुस्मर २० भरतः कुशलं वाच्यो वाच्यो मद्वचनेन च । सर्वास्वेव यथान्यायं वृत्तिं वर्तस्व मातृषु २१ वक्तव्यश्च महाबाहुरिक्ष्वाकुकुलनन्दनः । पितरं यौवराज्यस्थो राज्यस्थमनुपालय २२ अतिक्रान्तवया राजा मा स्मैनं व्यपरोरुधः । कुमारराज्ये जीवस्व तस्यैवाज्ञाप्रवर्तनात् २३ अब्रवीच्चापि मां भूयो भृशमश्रूणि वर्तयन् । मातेव मम माता ते द्रष्टव्या पुत्रगर्धिनी २४ इत्येवं मां महाबाहुर्ब्रुवन्नेव महायशाः । रामो राजीवप-

---

वंद्य अशा पित्याच्या पायांना माझ्या वतीनें मस्तकानें वंदन कर १५ आणि, हे सूता, माझ्या सांगण्यावरून आरोग्यप्रश्नपूर्वक अंतःपुरांतील सर्व स्त्रियांना तूं भेद न करितां योग्यतेप्रमाणें माझा नमस्कार सांग १६. माझ्या कौसल्या मातेला कुशलप्रश्नपूर्वक प्रणाम सांग आणि सावधपणानें वागत जा असें सांगून तिला असाही माझा निरोप सांग कीं १७, " हे देवि, नेहमीं धर्माविषयीं तत्पर राहून वेळेवर होमशाळेमध्यें असत जा आणि राजाच्या पायांचें देवांप्रमाणें परिपालन करीत जा १८. ( श्रेष्ठपणासंबंधानें ) अहंकार व मान सोडून देऊन इतर मातांशीं वागत जा व जिच्या मर्जीनें राजा वागत आहे त्या कैकेयीशीं, हे माते, विरोध धरूं नको १९. राजकुमार भरताशींही तूं राजाप्रमाणेंच आदरानें वागत जा. कारण, राजे वयानें जरी लहान असले तरी ते पूज्यच आहेत. पाहिजे असल्यास तूं राजधर्माचें स्मरण करून पहा "२०. ( हे सूता ) भरतालाही मी खुशाल आहें असें सांग आणि सर्वही मातांचे ठिकाणीं तूं आपलें वर्तन यथान्याय ठेवीत जा असाही माझा त्याला निरोप कळीव २१. त्या इक्ष्वाकुकुलनंदन महापराक्रमी भरताला आणखी असेंही सांग कीं, " तूं यौवराज्याचा स्वीकार करून मुख्य राज्यावर बसलेल्या पित्याचें परिपालन कर २२. राजाचें वय होऊन गेलें असल्यामुळें त्याला तूं राज्यापासून पदच्युत करूं नकोस. त्याच्याच आज्ञेनें व्यवहार चालवून तूं यौवराज्यावरच संतोषानें रहा " २३. डोळ्यांमध्यें वारंवार अश्रू आणून त्यानें " माझ्या पुत्रवत्सल मातेचा तूं आपल्या मातेप्रमाणेंच समाचार घेत जा "

त्राक्षो भृशमश्रूण्यवर्तयत् २५ लक्ष्मणस्तु सुसंक्रुद्धो निःश्वसन्वाक्यमब्रवीत् । केनायमपराधेन राजपुत्रो विवासितः २६ राज्ञा तु खलु कैकेय्या लघु चाश्रुत्य शासनम् । कृतं कार्यमकार्यं वा वयं येनाभिपीडिताः २७ यदि प्रव्राजितो रामो लोभकारणकारितम् । वरदाननिमित्तं वा सर्वथा दुष्कृतं कृतम् २८ इदं तावद्यथाकाममीश्वरस्य कृतं कृतम् । रामस्य तु परित्यागे न हेतुमुपलक्षये २९ असमीक्ष्य समारब्धं विरुद्धं बुद्धिलाघवात् । जनयिष्यति संक्रोशं राघवस्य विवासनम् ३० अहं तावन्महाराजे पितृत्वं नोपलक्षये । भ्राता भर्ता च बंधुश्च पिता च मम राघवः ३१ सर्वलोकप्रियं त्यक्त्वा सर्वलोकहिते रतं । सर्वलोकोनुरज्येत कथं चानेन कर्मणा ३२ सर्वप्रजाभिरामं हि रामं प्रव्राज्य धार्मिकम् । सर्वलोकविरोधेन कथं राजा भविष्यति ३३ जानकी तु महाराज निःश्व-

---

असेंही आणखी भरताला कळविण्याविषयीं मला सांगितलें आहे २४. ह्याप्रमाणें तो महापराक्रमी, महायशस्वी व कमलनयन राम माझ्यापाशीं निरोप सांगत असतांना त्यानें वारंवार डोळ्यांतून पाणी काढिलें २५. लक्ष्मण तर अत्यंत क्रुद्ध होऊन सुस्कारे टाकीत टाकीतच मला ह्मणाला " कोणत्या अपराधामुळें राजपुत्र रामाला वनांत हंकून दिलें आहे? २६. खरोखर उतावीळपणानें कैकेयीला वचन देऊन राजानें ही गोष्ट बरी केलेली असो अथवा वाईट केलेली असो त्यामुळें आह्मांला अतिशय संताप झालेला आहे २७. रामाला वनांत हंकून दिलें हें लोभामुळें झालेलें असो अथवा कैकयीला वरदान दिल्यामुळें झालेलें असो राजानें ही गोष्ट सर्वस्वी वाईट केली हें खचित आहे २८. आतां ईश्वराची प्रेरणा झाल्यामुळें त्याच्या इच्छेचें उल्लंघन न करितां राजानें ती गोष्ट केली असें ह्मणावें तर रामाचा त्याग करण्याविषयीं ही सबब मला मुळींच योग्य वाटत नाहीं २९. ( ईश्वराच्या प्रेरणेनें झालेलें असो किंवा दुसऱ्या कांहीं कारणानें हें घडून आलेलें असो ) क्षुद्रबुद्धि धरून रामाला वनवासांत पाठविण्याचें जें हें धर्मशास्त्रविरूद्ध कर्म झालें आहे तें इहलोकीं व परलोकीं दुःखदायक होईलच ३०. ( इतरांचें मत कांहींही असो ) महाराज दशरथाचे ठिकाणीं बापाचें नातें राहिलें आहे असें आतां मला दिसत नाहीं. माझा भ्राता, अधिपति, बांधव व पिता रामच आहे ३१. सर्व लोकांच्या हिताविषयीं तत्पर आणि ह्मणूनच सर्व लोकांना प्रिय अशा रामाचा जर त्याग केला आहे तर या कृत्यानें सर्व लोकांची राजाचे ठिकाणीं भक्ति राहील कशी ? ३२. सारांश, सर्व प्रजेला प्रिय आणि धर्मानें वागणाऱ्या रामाला हंकून देऊन सर्व प्रजाजनाशीं विरोध संपादन करणाऱ्याला राजा कसें ह्मणतां

सन्ती तपस्विनी । भूतोपहतचित्तेव विष्ठिता विस्मृता स्थिता ३४ अदृष्टपूर्वव्यसना राजपुत्री यशस्विनी । तेन दुःखेन रुदती नैव मां किंचिदब्रवीत् ३५ उद्वीक्षमाणा भर्तारं मुखेन परिशुष्यता । मुमोच सहसा बाष्पं प्रयान्तमुपवीक्ष्य सा ३६ तथैव रामोऽश्रुमुखः कृताञ्जलिः स्थितोऽब्रवील्लक्ष्मणबाहुपालितः । तथैव सीता रुदती तपस्विनी निरीक्षते राजरथं तथैव माम् ३७ [२३३८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टपञ्चाशः सर्गः ॥ ५८ ॥

मम त्वश्वा निवृत्तस्य न प्रावर्तन्त वर्त्मनि । उष्णमश्रु विमुञ्चन्तो रामे संप्रस्थिते वनम् १ उभाभ्यां राजपुत्राभ्यामथ कृत्वाहमञ्जलिम् । प्रस्थितो रथमास्थाय तद्दुःखमपि धारयन् २ गुहेन सार्धं तत्रैव स्थितोऽस्मि दिवसान्बहून् । आशया यदि मां रामः पुनः शब्दापयेदिति ३ विषये ते महाराज महाव्यसनकर्शिताः । अपि वृक्षाः परिम्लानाः सपुष्पाङ्कुरकोरकाः ४ उपतप्तोदका नद्यः पल्वलानि सरांसि च । परिशुष्कपलाशानि वनान्यु-

---

येईल ? " ३३. हे महाराजा, बिचारी जनककन्या तर भुतानें झपाटल्याप्रमाणें निरोप वगैरे सांगण्याचें सर्व कांहीं विसरून जाऊन दुःखाचे सुस्कारे टाकीत टाकीत उभी राहिली होती ३४ व पूर्वी कधींच अशा संकटाचा अनुभव नसल्यामुळें त्या दुःखानें रडत असलेली ती यशस्विनी राजकन्या मला कांहींच बोलली नाहीं ३५. मी निघालों असें पाहून निस्तेज मुखानें युक्त असलेली ती राजकन्या भर्त्याकडे दृष्टि देऊन एकाएकीं अश्रू मात्र ढाळूं लागली ३६. ( मी निघालों तेव्हां ) लक्ष्मणानें रामाचा हात धरिला होता, रामाच्या मुखावर अश्रूंचे ओघळ आलेले होते व हात जोडून उभा असलेल्या त्या रामानें मला मीं आपणांला कळविल्याप्रमाणेंच निरोप सांगितला. परंतु, बिचारी सीता ( कांहींएक न बोलतां ) रडत रडत त्या राजरथाकडे व त्याचप्रमाणें माझ्याकडे पहात होती ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्ठावन्नावा सर्ग समाप्त झाला ॥ ५८ ॥

राम वनामध्यें चालता झाल्यावर मी परत फिरलों असतां दुःखाश्रु ढाळूं लागलेले अश्व मार्गावरून रथ ओढून नेण्यास उत्सुक होईनात १. ( तथापि ) उभयतां राजपुत्रांना मीं हात जोडिले आणि त्यांच्या वियोगामुळें झालेलें दुःख धारण करून मी रथांत बसून निघालों २; परंतु, " राम मला फिरून कदाचित् बोलावणें पाठवील " ह्या आशेनें मी ( निषादाधिपति ) गुहाबरोबर बरेच दिवस तेथेंच राहिलों होतों ३. असो. हे महाराज, आपल्या देशामध्यें वृक्षसुद्धां अतिशय दुःखानें व्याप्त झाले असून पुष्प, अंकुर व कळ्या ह्यांसहवर्तमान

पवनानि च ५ न च सर्पन्ति सत्त्वानि व्याला न प्रसरन्ति च । रामशोकाभिभूतं तं निष्कूजमिव तद्वनम् ६ लीनपुष्करपत्राश्च नद्यश्च कलुषोदकाः । सन्तप्तपद्माः पद्मिन्यो लीनमीनविहंगमाः ७ जलजानि च पुष्पाणि माल्यानि स्थलजानि च । नातिभान्त्यल्पगन्धीनि फलानि च यथापुरम् ८ अत्रोद्यानानि शून्यानि प्रलीनविहगानि च । न चाभिरामानारामान्पश्यामि मनुजर्षभ ९ प्रविशन्तमयोध्यायां न कश्चिदभिनन्दति । नरा राममपश्यन्तो निःश्वसन्ति मुहुर्मुहुः १० देव राजरथं दृष्ट्वा विना राममिहागतम् । दूरादश्रुमुखः सर्वो राजमार्गे गतो जनः ११ हर्म्यैर्विमानैः प्रासादैरवेक्ष्य रथमागतम् । हाहाकारकृता नार्यो रामादर्शनकर्शिताः १२ आयतैर्विमलैर्नेत्रैरश्रुवेगपरिप्लुतैः । अन्योन्यमभिवीक्षन्तेऽव्यक्तमार्ततराः स्त्रियः १३ नामित्राणां न मित्राणामुदासीनजनस्य च । अहमार्ततया

---

अगदीं कोमेजून गेलेले आहेत ४. नद्या, तळीं व सरोवरें ह्यांतील उदक शुष्क होऊन गेलेलें आहे आणि वनांतील व उपवनांतील वृक्षांचीं पानेंही वाळून चाललीं आहेत ५. श्वापदें भक्ष्य धुंडून काढण्याकरितां बाहेर पडत नाहींत व अजगरही पसरत नाहींत. सारांश, रामसंबंधीं शोकानें आंतील प्राणी व्याप्त झाले असल्यामुळें मार्गांतील त्या अरण्यांत अगदीं शुकशुकाट झालेला आहे ६. नद्यांतील उदक कलुषित झालें असून आंत असलेल्या कमलवेलींचीं पानें अवळून गेलेलीं आहेत आणि त्याचप्रमाणें सरोवरांतील मासे व जलांत रहाणारे पक्षी आंत लीन झाले असून त्यांतील कमलेंही शुष्क झालीं आहेत ७. जलामध्यें आणि स्थलामध्यें होणारीं पुष्पें व फलें पूर्वीप्रमाणें चांगलीं दिसतही नाहींत व त्यांचा गंधही अगदीं कमी झाला आहे ८. हे पुरुषश्रेष्ठा, पक्षी आपआपल्या घरट्यांतूनच बसले असल्यामुळें येथील बागा अगदीं शून्य दिसत आहेत आणि उपवनेंही मला मनोहर दिसेनाशीं झालीं आहेत ९. मी अयोध्येमध्यें शिरलों असतां कोणालाही चांगलें वाटत नाहीं व राम दृष्टीं पडत नसल्यामुळें लोक वारंवार सुस्कारे टाकीत आहेत १०. हे भूपते, रामावांचून येथें आलेला राजरथ लांब दृष्टीं पडतांक्षणींच राजमार्गामध्यें असलेल्या सर्व लोकांच्या मुखांवरून अश्रूंचे ओघळ येऊं लागले ११. वाडे, सात मजली हवेल्या आणि प्रासाद ह्यांतून, रथ आलेला पाहून राम दृष्टीं न पडल्यामुळें कृश झालेल्या स्त्रिया, हाहाकार करीत आहेत १२ आणि अत्यंत दुःखित झालेल्या त्या स्त्रियांना दीर्घ व निर्मल असे आपले नेत्र अश्रूंच्या प्रवाहानें भरून गेले असल्यामुळें एकमेकींकडे नीट पहातांही येईनासें

कंचिद्विशेषं नोपलक्षये १४ अप्रहृष्टमनुष्या च दीननागतुरङ्गमा । आर्तस्वरपरिम्लानविनिःश्वसितनिःस्वना १५ निरानन्दा महाराज रामप्रव्राजनातुरा । कौसल्या पुत्रहीनेव अयोध्या प्रतिभाति मे १६ सूतस्य वचनं श्रुत्वा वाचा परमदीनया । बाष्पोपहतया सूतमिदं वचनमब्रवीत् १७ कैकेय्या विनियुक्तेन पापाभिजनभावया । मया न मन्त्रकुशलैर्वृद्धैः सह समर्थितम् १८ न सुहृद्भिर्न चामात्यैर्मन्त्रयित्वा स नैगमैः । मयायमर्थः संमोहात्स्त्रीहेतोः सहसा कृतः १९ भवितव्यतया नूनमिदं वा व्यसनं महत् । कुलस्यास्य विनाशाय प्राप्तं सूत यदृच्छया २० सूत यद्यस्ति ते किंचिन्मयापि सुकृतं कृतम् । त्वं प्रापयाशु मां रामं प्राणाः संत्वरयन्ति माम् २१ यद्यद्यापि ममैवाज्ञा निवर्तयतु राघवम् । न शक्ष्यामि विना रामं मुहूर्तमपि जीवितुम् २२ अथवापि महाबाहुर्गतो दूरं भविष्यति ।

---

झालें आहे १३. लोक सर्वच आर्त होऊन गेल्यामुळें मित्र, शत्रु आणि उदासीन असा भेदच मला कोठें राहिलेला दृष्टोत्पत्तीस येत नाहीं १४. अयोध्यानगरींतील सर्व लोक हर्षरहित झाले आहेत; गज व अश्वही दीन होऊन गेलेले आहेत व जिकडे तिकडे विलाप, ग्लानि, दुःखाचे सुस्कारे आणि आक्रोश दृष्टोत्पत्तीस येत आहेत १५. हे महाराजा, नगरीमध्यें कोठेंही आनंद नाहीं व आंतील सर्व लोक राम वनवासांत गेल्यामुळें दुःखित झाले आहेत. ह्यामुळें पुत्रहीन झालेल्या कौसल्येसारिखी अयोध्येची स्थिति झालेली मला दिसत आहे " १६. हें सारथ्याचें भाषण श्रवण करून अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत अतिशयच निराशेच्या शब्दांनीं दशरथ त्या सारथ्याला ह्मणाला १७ " दुष्ट कुलामध्यें व दुष्ट देशामध्यें उत्पन्न झालेल्या ह्या दुष्टबुद्धि कैकेयीनें रामाला वनवासांत पाठविण्याविषयीं मला सांगितलें असतां मीं सल्लामसलतीमध्यें निपुण असलेल्या वृद्धांबरोबर त्याचा विचार केला नाहीं १८. सुहृद, अमात्य आणि नगरवासी लोक ह्यांपैकीं कोणाचाही विचार न घेतां स्त्रीकरितां मोहामुळें मीं ही गोष्ट एकदम अविचारानें केलेली आहे १९. हे सूता, भवितव्यतेमुळें दुर्दैवानें खरोखर ह्या कुलाच्या नाशाकरितां हा मोठा अनर्थ येऊन गुदरला आहे २०. हे सूता, तुझें जर माझ्या हातून कांहीं चांगलें झालें असेल तर तूं माझ्याकडे रामाला घेऊन ये; माझे प्राण निघून जाण्याविषयीं मला अगदीं त्वरा करीत आहेत २१. अद्यापपर्यंत जर माझी आज्ञा चालत असेल तर तूं रामाला परत आण; रामावांचून मी आतां एकक्षणभरही जिवंत रहाण्यास समर्थ होणार नाहीं २२. अथवा महापराक्रमी राम अजून जर दूर गेला नसेल तर मला रथामध्यें घाल आणि सत्वर

मामेव रथमारोप्य शीघ्रं रामाय दर्शय २३ वृत्तदंष्ट्रो महेष्वासः क्वासौ लक्ष्मणपूर्वजः । यदि जीवामि साध्वेनं पश्येयं सीतया सह २४ अतो नु किं दुःखतरं योऽहमिक्ष्वाकुनन्दनम् । इमामवस्थामापन्नो नेह पश्यामि राघवम् २५ हा राम रामानुज हा हा वैदेहि तपस्विनि । न मां जानीत दुःखेन म्रियमाणमनाथवत् २६ स तेन राजा दुःखेन भृशमर्पितचेतनः । अवगाढः सुदुष्पारं शोकसागरमब्रवीत् २७ रामशोकमहावेगः सीताविरहपारगः । श्वसितोर्मिमहावर्तो बाष्पवेगजलाविलः २८ बाहुविक्षेपमीनोऽसौ विक्रन्दितमहास्वनः । प्रकीर्णकेशशैवालः कैकेयीवडवामुखः २९ ममाश्रुवेगप्रभवः कुब्जावाक्यमहाग्रहः । वरवेलो नृशंसाया रामप्रव्राजनायतः ३० यस्मिन्बत निमग्नोऽहं कौसल्ये राघवं विना । दुस्तरो जीवता देवि मयायं शोकसागरः ३१ अशोभनं योऽहमिहाद्य राघवं दिदृक्षमाणो न लभे सलक्ष्मणम् । इतीव राजा विलपन्महायशाः पपात तूर्णं शयने

---

रामाला दाखीव २३. वर्तुल दाढांनीं युक्त असलेला तो महाधनुर्धारी राम कोठें गेला! तिकडे जाऊन सीतेसहवर्तमान त्याला अवलोकन करीपर्यंत मी जिवंत राहिलों तर भाग्यच ह्मणावयाचें २४. अरे, ही मरणाची अवस्था प्राप्त झाली असतांनाही इक्ष्वाकुनंदन राम येथें माझ्या दृष्टीं पडत नाहीं; तेव्हां ह्यापेक्षां आतां अधिक दुःखदायक तें काय आहे! २५. हे रामा, हे लक्ष्मणा, हे तपस्विनी सीते, मी दुःखानें अनाथासारिखा मरत आहें हें तुह्मांला समजत नाहीं काय?" २६. ह्याप्रमाणें त्या दुःखामुळें यत्किंचित्‌ही भान न राहिलेला तो दशरथराजा अत्यंत दुस्तर अशा शोकसागरांत बुडून जाऊन ( कौसल्येला ) ह्मणाला २७ " रामसंबंधीं शोक हाच ज्याचा प्रचंड वेग आहे, सीतेचा विरह हेंच ज्याचें तीर आहे, दुःखाचे सुस्कारे हेच ज्यांतील लाटांनीं भरलेले मोठमोठे भोंवरे आहेत, बाष्पप्रवाहरूप नदीजलांनीं जो कलुषित झालेला आहे २८, शोकभरांत होणारे हस्तविक्षेप हेच ज्यांतील मत्स्य आहेत, आक्रोश हीच ज्याची मोठी गर्जना आहे, अस्ताव्यस्त झालेले केश हेंच ज्यांतील शेवाळें आहे, कैकेयी हाच ज्यांतील वडवानल आहे २९, माझ्या अश्रुप्रवाहांचा जो उत्पादक आहे, कुबड्या मंथरेचीं भाषणें हेंच ज्यांतील मोठमोठे मगर आहेत, दुष्ट कैकेयीला दिलेला वर हीच ज्याची मर्यादा आहे आणि रामाला वनवासांत हंकून देणें हेंच कालकूट विष ज्यापासून निघालें आहे ३० अशा ह्या शोकसागरांत मी निमग्न झालों आहें व, हे देवि कौसल्ये, रामावांचून हा शोकसागर मला जिवंतपणें तरून जातां येणें अशक्य आहे ३१. लक्ष्मणासहवर्तमान रामाला अवलोकन करण्याची उत्कंठा असतांनाही तो आज माझ्या

स मूर्च्छितः ३२ इति विलपति पार्थिवे प्रनष्टे करुणतरं द्विगुणं च रामहेतोः। वचनमनुनिशम्य तस्य देवी भयमगमत्पुनरेव राममाता ३३ [२३७१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्ड एकोनषष्टितमः सर्गः ॥ ५९ ॥

ततो भूतोपसृष्टेव वेपमाना पुनःपुनः। धरण्यां गतसत्त्वेव कौसल्या सूतमब्रवीत् १ नय मां यत्र काकुत्स्थः सीता यत्र च लक्ष्मणः। तान्विना क्षणमप्यद्य जीवितुं नोत्सहे ह्यहम् २ निवर्तय रथं शीघ्रं दण्डकान्नय मामपि। अथ तान्नानुगच्छामि गमिष्यामि यमक्षयम् ३ बाष्पवेगोपहतया स वाचा सज्जमानया। इदमाश्वासयन्देवीं सूतः प्राञ्जलिरब्रवीत् ४ त्यज शोकं च मोहं च संभ्रमं दुःखजं तथा। व्यवधूय च संतापं वने वत्स्यति राघवः ५ लक्ष्मणश्चापि रामस्य पादौ परिचरन्वने। आराधयति धर्मज्ञः परलोकं जितेन्द्रियः ६ विजनेपि वने सीता वासं प्राप्य गृहेष्विव। विस्रम्भं लभतेभीता रामे विन्यस्तमानसा ७ नास्या

---

दृष्टीं पडत नाहीं हें एक माझें मोठें पातकच आज उभें राहिलें आहे." असा विलाप करीत करीत तो महाकीर्तिमान् दशरथराजा मूर्छित होऊन एकाएकीं शय्येवर पडला ३२; व ह्याप्रमाणें रामाकरितां विलाप करीत करीत राजा मूर्छित होऊन पडला असतां त्याचें तें अतिशय करुणा आणणारें भाषण श्रवण करून राममाता कौसल्यादेवीला (ह्या दुःखांत आणखी पतिवियोगदुःखाचीही भर पडणार कीं काय असें मनांत येऊन) दुप्पट भय वाटूं लागलें ३३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणसाठावा सर्ग समाप्त झाला ॥ ५९ ॥

तदनंतर गतप्राण झाल्यासारखी होऊन भूमीवर मूर्छित पडलेली ती कौसल्या (सावध झाल्यावर) पिशाच्चानें झपाटल्याप्रमाणें कांपत कांपत त्या सारथ्याला ह्मणाली १ "जिकडे राम, सीता व लक्ष्मण असतील तिकडे मला ने; त्यांच्यावांचून एक क्षणभर देखील आज जिवंत रहाण्याला मी तयार नाहीं २. रथ लवकर परत फिरीव आणि मलाही सत्वर दंडकारण्यांत घेऊन जा. माझें जर त्यांच्याकडे जाणें होत नसेल तर मी यमसदनाचीच वाट धरणार" ३. ह्यावर तो सारथि सुमंत्र हात जोडून बाष्पप्रवाहानें कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत राजपत्नि कौसल्येला धीर देण्याकरितां ह्मणाला ४ "शोक मोह व दुःखजन्य भ्रम तूं सोडून दे. राम दुःखाचा त्याग करून वनामध्यें रहात आहे ५; धर्मवेत्ता व जितेंद्रिय लक्ष्मणही वनामध्यें रामाच्या पायाची सेवा करून परलोकसंपादन करीत आहे ६ आणि निर्जन वनामध्येंही होणारें

दैन्यं कृतं किंचित्सुसूक्ष्ममपि लक्ष्यते । उचितेव प्रवासानां वैदेही प्रतिभाति मे ८ नगरोपवनं गत्वा यथा स्म रमते पुरा । तथैव रमते सीता निर्जनेषु वनेष्वपि ९ बालेव रमते सीताबालचन्द्रनिभानना । रामारामे ह्यदीनात्मा विजनेपि वने सती १० तद्गतं हृदयं यस्यास्तदधीनं च जीवितम् । अयोध्या हि भवेदस्या रामहीना तथा वनम् ११ परिपृच्छति वैदेही ग्रामांश्च नगराणि च । गतिं दृष्ट्वा नदीनां च पादपान्विविधानपि १२ रामं वा लक्ष्मणं वापि दृष्ट्वा जानाति जानकी । अयोध्या क्रोशमात्रे तु विहारमिव संश्रिता १३ इदमेव स्मराम्यस्याः सहसैवोपजल्पितम् । कैकेयीसंश्रितं जल्पं नेदानीं प्रतिभाति माम् १४ ध्वंसयित्वा तु तद्वाक्यं प्रमादात्पर्युपस्थितम् । ह्लादनं वचनं सूतो देव्या मधुरमब्रवीत् १५ अध्वना वातवेगेन संभ्रमेणातपेन च । न विगच्छति वैदेह्याश्चन्द्रां-

---

वास्तव्य घराप्रमाणें समजून व रामाचेच ठिकाणीं मन ठेवून सीता भीति न बाळगितां विश्वासानें रहात आहे ७. तिचे ठिकाणीं अत्यंत सूक्ष्म देखील दैन्य दृष्टोत्पत्तीस येत नाहीं; इतकेंच नव्हे परंतु, प्रवासांची जशी काय तिला नेहमीं संवयच आहे अशाप्रकारें मला सीता भासत आहे ८. नगरांतील उपवनामध्यें गेल्यावर जसें सीतेचें मन पूर्वीं रमत असें तसेंच निर्जन वनामध्येंही तिचें मन रमत आहे ९. पूर्णचंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त, मनोहर आणि रामाविषयीं उदार मन असलेली बाला सीता निर्जन वनामध्यें असूनही आनंदांत रहात आहे १०. त्या सीतेचें मन रामाचेच ठिकाणीं खिळून गेलें असून तिचें जीवितही रामावरच अवलंबून आहे. ह्यामुळें रामावांचून असलेली ही अयोध्यानगरी तिला वनासारखीच वाटत आहे आणि रामाचा समागम असल्यामुळें तें वनच तिला अयोध्येप्रमाणें भासत आहे ११. गांव, नगरें, नद्यांची गति आणि नानाप्रकारचे वृक्ष अवलोकन करून सीता रामाला अथवा लक्ष्मणाला त्या संबंधाची माहिती विचारीत असते, विचारून समजून घेत असते आणि अयोध्येपासून एका कोसावरच फिरावयाला गेली आहे कीं काय अशा उत्साहानें ती वनामध्यें असते १२, १३. हें ( ग्राम, नगर, वृक्ष वगैरेबद्दल विचारण्यासंबंधानें ) तिनें केलेलें भाषण येवढेंच काय तें मला स्मरत आहे; कैकेयीसंबंधानें ती काय बोलली हें मला आठवत नाहीं " १४. ह्याप्रमाणें सारथि कौसल्येला सांगत असतांना कैकेयीसंबंधाचें सीतेचें बोलणें अवधान न राहिल्यामुळें एकाएकीं त्याच्या तोंडांत आलें होतें; परंतु, ते तोंडापुढें आलेले शब्द एकाएकीं नाहींसे करून कौसल्या देवीला आल्हादकारक असें मधुर भाषण तो तिच्याशीं करूं लागला १५. ( तो ह्मणाला )

शुसदृशी प्रभा १६ सदृशं शतपत्रस्य पूर्णचन्द्रोपमप्रभम् । वदनं तदुदारन्याया वैदेह्या न विकम्पते १७ अलक्तरसरक्ताभावलक्तरसवर्जितौ । अद्यापि चरणौ तस्याः पद्मकोशसमप्रभौ १८ नूपुरोत्कृष्टलीलेव खेलं गच्छति भामिनी । इदानीमपि वैदेही तद्रागान्यस्तभूषणा १९ गजं वा वीक्ष्य सिंहं वा व्याघ्रं वा वनमाश्रिता । नाहारयति संत्रासं बाहू रामस्य संश्रिता २० न शोच्यास्ते न चात्मा ते शोच्यो नापि जनाधिपः । इदं हि चरितं लोके प्रतिष्ठास्यति शाश्वतम् २१ विधूय शोकं परिहृष्टमानसा महर्षियाते पथि सुव्यवस्थिताः । वने रता वन्यफलाशनाः पितुः शुभां प्रतिज्ञां प्रतिपालयन्ति ते २२ तथापि सूतेन सुयुक्तवादिना निवार्यमाणा सुतशोककर्शिता । न चैव देवी विरराम कूजिताप्रियेति पुत्रेति च राघवेति च २३ [२३९४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षष्टितमः सर्गः ॥ ६० ॥

---

"मार्ग चालून जाण्यानें, वाऱ्याचे तडाके बसल्यानें, धांदल उडाल्यानें अथवा उन्हानेंही चंद्रकिरणांप्रमाणें असलेली सीतेची कांति कमी होत नाहीं १६. त्या उदार सीतेचें तें पूर्णचंद्राप्रमाणें तेजस्वी असलेलें कमलतुल्य मुख म्लान होत नाहीं १७. अळत्याच्या रसाप्रमाणें लाल परंतु वास्तविक तो रस न लाविलेलीं अशीं तिचीं पाउलें अद्यापि कमलकोशाप्रमाणेंच ( सुकुमार ) आहेत १८. नूपुरांच्या योगानें हंसादिकांच्या लीलेला जिनें मागें टाकिलेलें आहे अशी ती सीता वनांतून विलासपूर्वक जात आहे आणि पतिप्रेम वृद्धिंगत करणाऱ्या भूषणांची आवड असल्यामुळें तिनें अद्यापीही आपल्या भूषणांचा त्याग केलेला नाहीं १९. वनाचा आश्रय करून राहिलेली सीता रामाच्या बाहूंचा आश्रय करून असली ह्मणजे ( अर्थात् रामानें कवटाळून घेतलेली असली ह्मणजे ) गज, सिंह अथवा व्याघ्र दृष्टीं पडल्यासही भीत नाहीं २०. तात्पर्य, त्यांच्याबद्दल, स्वतःबद्दल अथवा राजाबद्दल तुला शोक करण्याचें मुळींच कारण नाहीं. हें रामचरित्र लोकांमध्यें अक्षय्य राहील २१. शोकाचा त्याग करून आनंदित अंतःकरणानें युक्त असलेले ते त्रिवर्ग, महर्षींनीं आचारलेल्या मार्गाचें अगदीं उत्तम रीतानें अवलंबन करून, राहिलेले आहेत. वनांमध्यें त्यांचें मन रमत आहे आणि वनांतील फलें भक्षण करून पित्याची शुभ प्रतिज्ञा ते शेवटास नेत आहेत" २२. ह्याप्रमाणें अत्यंत योग्य भाषण करणारा तो सारथि जरी कौसल्येला शोक करूं नको ह्मणून ह्मणत होता तरी पुत्रशोकानें कृश झालेली ती कौसल्या "हे प्रिया, हे पुत्रा, हे रामा," असें ह्मणतांना थांबेना २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं साठावा सर्ग समाप्त झाला ॥ ६० ॥

वनं गते धर्मरते रामे रमयतां वरे । कौसल्या रुदती चार्ता भर्तारमिदमब्रवीत् १ यद्यपि त्रिषु लोकेषु प्रथितं ते महद्यशः । सानुक्रोशो वदान्यश्च प्रियवादी च राघवः २ कथं नरवरश्रेष्ठ पुत्रौ तौ सह सीतया । दुःखितौ सुखसंवृद्धौ कथं दुःखं सहिष्यतः ३ सा नूनं तरुणी श्यामा सुकुमारी सुखोचिता । कथमुष्णं च शीतं च मैथिली विसहिष्यते ४ भुक्त्वाशनं विशालाक्षी सूपदंशान्वितं शुभम् । वन्यं नैवारमाहारं कथं सीतोपभोक्ष्यते ५ गीतवादित्रनिर्घोषं श्रुत्वा शुभसमन्विता । कथं क्रव्यादसिंहानां शब्दं श्रोष्यत्यशोभनम् ६ महेन्द्रध्वजसङ्काशः क्व नु शेते महाभुजः । भुजं परिघसङ्काशमुपाधाय महाबलः ७ पद्मवर्णं सुकेशान्तं पद्मनिःश्वासमुत्तमम् । कदा द्रक्ष्यामि रामस्य वदनं पुष्करेक्षणम् ८ वज्रसारमयं नूनं हृदयं मे न संशयः । अपश्यन्त्या न तं यद्वै फलतीदं सहस्रधा ९ यत्त्वया करुणं कर्म व्यपोह्य मम बान्धवाः । निरस्ताः

---

चित्तविनोद करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ आणि धर्माचे ठिकाणीं रत असलेला राम वनांत गेला असतां दुःखाकुल झालेली कौसल्या रडत रडत भर्त्याला ह्मणाली १ “ रघुवंशज दशरथ दयालु, दाता आणि प्रिय भाषण करणारा आहे अशी त्रैलोक्यामध्यें आपली कीर्ति पसरली आहे २. तेव्हां, हे नृपश्रेष्ठ, सीतेसहवर्तमान त्या पुत्रांचा आपण त्याग कसा केला? सुखानें वाढलेल्या त्या पुत्रांना आज दुःख प्राप्त झालें आहे; परंतु, त्यांना तें दुःख सहन कसें होईल!३. खरोखर कौमारावस्था संपून यौवनावस्थेला प्राप्त झालेली, सुकुमार आणि सुखाची संवय असलेली ती सीता ऊन व थंडी सहन कशी करील ! ४. आजपर्यंत चमचमित चटण्या कोशिंबिरी वगैरेंनीं युक्त असें चांगलें भोजन करून ती विशालनयना सीता वनांतील देवभाताचें अन्न कसें बरें भक्षण करील! ५. गीत आणि वाद्य ह्यांचा ध्वनि श्रवण करून नेहमीं मंगलयुक्त असलेल्या त्या सीतेला श्वापदें आणि सिंह ह्यांचा अमंगल शब्द कसा बरें ऐकवेल! ६. इंद्राच्या ध्वजाप्रमाणें सर्व लोकांना आल्हाद देणारा महाबलाढ्य आजानुबाहु राम आपला अडसरासारिखा हात उशाशीं घेऊन कोठें बरें पडत असेल! ७. कमलपत्रासारखा वर्ण, कमलपत्राप्रमाणें सुगंधि निश्वास, उत्कृष्ट केश आणि कमलपत्राप्रमाणें नेत्र ह्यांनीं युक्त असलेलें रामाचें उत्कृष्ट मुख माझ्या कधीं बरें दृष्टीं पडेल! ८. खरोखर माझें हृदय वज्रासारिखें कठिण आहे ह्यांत संशय नाहीं. कारण, राम माझ्या दृष्टीं पडत नसतांनाही ह्याचे हजारों तुकडे तुकडे होऊन जात नाहींत ९. आपण विचार न करितां जें हें शोचनीय कृत्य केलें त्यामुळें कैकयीनें हांकून दिलेलीं माझीं माणसें सुखोपभोगालाच

परिधावन्ति सुखार्हाः कृपणा वने १० यदि पञ्चदशे वर्षे राघवः पुनरेष्यति । जह्याद्राज्यं च कोशं च भरतो नोपलक्ष्यते ११ भोजयन्ति किल श्राद्धे केचित्स्वानेव बान्धवान् । ततः पश्चात्समीक्षन्ते कृतकार्या द्विजोत्तमान् १२ तत्र ये गुणवन्तश्च विद्वांसश्च द्विजातयः । न पश्चात्तेभिमन्यन्ते सुधामपि सुरोपमाः १३ ब्राह्मणेष्वपि वृत्तेषु भुक्तशेषं द्विजोत्तमाः । नाभ्युपेतुमलं प्राज्ञाः शृङ्गच्छेदमिवर्षभाः १४ एवं कनीयसा भ्रात्रा भुक्तं राज्यं विशांपते । भ्राता ज्येष्ठो वरिष्ठश्च किमर्थं नावमन्यते १५ न परेणाहृतं भक्ष्यं व्याघ्रः खादितुमिच्छति । एवमेव नरव्याघ्रः परलीढं न मन्यते १६ हविराज्यं पुरोडाशः कुशा यूपाश्च खादिराः । नैतानि यातयामानि कुर्वन्ति पुनरध्वरे १७ तथा ह्यात्तमिदं राज्यं हृतसारां सुरामिव । नाभिमन्तुमलं रामो नष्टसोमामिवाध्वरम् १८ नैवंविधमसत्कारं राघवो मर्षयिष्यति । बलवानिव शार्दूलो वालधेरभिम-

---

योग्य असतांनाही दीन होऊन वनामध्यें धांवत आहेत १०. पंधराव्या वर्षीं राम जरी परत आला तरी भरत राज्य आणि खजिना सोडून देईल असा संभव दिसत नाहीं ११. कांहीं लोक खरोखर चांगल्या ब्राह्मणांना श्राद्धाचें आमंत्रण देऊन आपल्या बांधवांनाच श्राद्धाला बसवून भोजन घालतात आणि नंतर श्राद्धकृत्य आटोपल्यावर निमंत्रित श्रेष्ठ ब्राह्मणांना इष्ट पंक्तीला भोजनास बसविण्याचा विचार करितात १२; परंतु, त्या निमंत्रित ब्राह्मणांमध्यें जे कोणी गुणी, विद्वान् व देवतुल्य ब्राह्मण असतात ते इष्ट पंक्तीला अमृताप्रमाणें स्वादिष्ट अन्न जरी असलें तरी मान्य करीत नाहींत १३. सारांश, ब्राह्मणच जरी प्रथम भोजन करून गेलेले असतात तरी शृंगच्छेद ज्याप्रमाणें बैलांना सहन होत नाहीं त्याप्रमाणें श्रेष्ठ ब्राह्मणांना दुसरे भोजन करून गेल्यावर अवशिष्ट राहिलेलें अन्न स्वीकारण्याचा अवमान सहन होत नाहीं १४. त्याचप्रमाणें, हे प्रजाधिपते, कनिष्ठ भ्रात्यानें उपभोग घेतलेलें राज्य ज्येष्ठ आणि गुणांनींही श्रेष्ठ असा भ्राता कसें बरें स्वीकारील ? १५. ज्याप्रमाणें दुसऱ्यानें आणिलेलें भक्ष्य खाण्याची व्याघ्र इच्छा करीत नाहीं त्याचप्रमाणें श्रेष्ठ पुरुष दुसऱ्याचें उष्टें कधीं घेत नाहीं १६. हवी, आज्य, पुरोडाश, कुश आणि खदिरवृक्षाचे यूप हीं एकदां यज्ञांमध्यें उपयोगांत आणिलीं असतां पुनरपि यज्ञांत त्यांचा उपयोग करीत नाहींत १७. त्याचप्रमाणें भरतानें उपभोग घेतलेलें हें राज्य सार काढून घेतलेल्या सुरेप्रमाणें अथवा यज्ञ होऊन अवशिष्ट राहिलेल्या सोमरूप हवीप्रमाणें ( निरुपयोगी झालें असल्यामुळें ) रामाला स्वीकार करितां येईल असें दिसत नाहीं १८.

र्शनम् १९ नैतस्य सहिता लोका भयं कुर्युर्महामृधे। अधर्मं त्विह धर्मात्मा लोकं धर्मेण योजयेत् २० नन्वसौ काञ्चनैर्बाणैर्महावीर्यो महाभुजः। युगान्त इव भूतानि सागरानपि निर्दहेत् २१ स तादृशः सिंहबलो वृषभाक्षो नरर्षभः। स्वयमेव हतः पित्रा जलजेनात्मजो यथा २२ द्विजातिचरितो धर्मः शास्त्रे दृष्टः सनातनैः। यदि ते धर्मनिरते त्वया पुत्रे विवासिते २३ गतिरेका पतिर्नार्या द्वितीया गतिरात्मजः। तृतीया ज्ञातयो राजंश्चतुर्थी नैव विद्यते २४ तत्र त्वं मम नैवासि रामश्च वनमाहितः। न वनं गन्तुमिच्छामि सर्वथा हा हता त्वया २५ हतं त्वया राष्ट्रमिदं सराज्यं हताः स्म सर्वाः सह मन्त्रिभिश्च। हता सपु-

---

बलाढ्य व्याघ्राला ज्याप्रमाणें पुच्छस्पर्श सहन होत नाहीं त्याचप्रमाणें अशाप्रकारचा अवमान रामाला सहन होणार नाहीं १९. महासंग्रामामध्यें देवदैत्यांसहवर्तमान जरी लोक आले तरी ते ह्याला भयभीत करण्यास समर्थ होणार नाहींत. ( तेव्हां " माझा निग्रह करून त्यानेंच ज्याअर्थी राज्याचा स्वीकार केला नाहीं त्याअर्थी तो तसें करण्याला असमर्थ होता " अशी मात्र शंका आपण मनांत आणूं नका. कारण, ) जो धर्मात्मा अधर्मनिष्ठ लोकांचीही प्रवृत्ति धर्माकडे करीत असतो तो स्वतः ( पित्याच्या आज्ञेचा अवमान करणें असला अधर्म करण्यास कसा बरें प्रवृत्त होईल ! ) २०. युगांतसमयीं ईश्वर ज्याप्रमाणें भूतांचा संहार करितो त्याप्रमाणें हा महावीर्यवान् व महापराक्रमी राम आपल्या सुवर्णभूषित पिसांनीं युक्त असलेल्या बाणांच्या योगानें समुद्रांनाही दग्ध करून टाकील २१. परंतु, मासा ज्याप्रमाणें आपल्या पुत्रालाच भक्षण करून टाकितो त्याप्रमाणें सिंहतुल्य पराक्रमी व वृषभनयन पुरुषश्रेष्ठ पुत्र स्वतः पित्यानेंच राज्यभ्रष्ट करून टाकिला २२. धर्मनिष्ठ पुत्राला ज्याअर्थी आपण हांकून दिलें आहे त्याअर्थी द्विजांनीं आचरिलेला व पुरातन लोकांना वेदामध्यें आढळलेला धर्म आपणांला संमत नाहीं असें दिसतें २३. हे भूपते, स्त्रीला एक पति, दुसरी पुत्र आणि तीसरी ज्ञाति अशा तीनच गति शास्त्रानें सांगितल्या आहेत; व ह्यांशिवाय चवथी गति स्त्रीला सांगितली नाहीं २४. त्यांपैकीं आपण जी माझी पहिली गति ती मला नाहींच. ( कारण, आपण माझ्या सवतीच्या अधीन आहांत ) रामाला आपण वनांत पाठविलें आहे आणि ( मी सभर्तृक असल्यामुळें ) वनांत जाण्याची माझी इच्छा नाहीं. तेव्हां दुसरी गति मला नाहींच; आणि तिसरी गति जीं माहेरचीं माणसें तीं मुळींच जवळ नाहींत. ) तस्मात्, सर्व प्रकारें आपण माझा घात केला आहे २५. आपणांमुळें राज्यासहवर्तमान राष्ट्राचा,

अस्मि हताश्च पौराः सुतश्च भार्या च तव प्रहृष्टौ २६ इमां गिरं दारुणशब्दसंहितां निशम्य रामेति मुमोह दुःखितः । ततः स शोकं प्रविवेश पार्थिवः स्वदुष्कृतं चापि पुनस्तथास्मरत् २७ [२४२१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्ड एकषष्टितमः सर्गः ॥६१॥

एवं तु क्रुद्धया राजा राममात्रा सशोकया । श्रावितः परुषं वाक्यं चिन्तयामास दुःखितः १ चिन्तयित्वा स च नृपो मोहव्याकुलितेन्द्रियः । अथ दीर्घेण कालेन संज्ञामाप परंतपः २ स संज्ञामुपलभ्यैव दीर्घमुष्णं च निःश्वसन् । कौसल्यां पार्श्वतो दृष्ट्वा ततश्चिन्तामुपागमत् ३ तस्य चिन्तयमानस्य प्रत्यभात्कर्म दुष्कृतम् । यदनेन कृतं पूर्वमज्ञानाच्छब्दवेधिना ४ अमनास्तेन शोकेन रामशोकेन च प्रभुः । द्वाभ्यामपि महाराजः शोकाभ्यामभितप्यते ५ दह्यमानस्तु शोकाभ्यां कौसल्यामाह दुःखितः । वेपमानोऽञ्जलिं कृत्वा प्रसादार्थमवाङ्मुखः ६ प्रसादये त्वां कौसल्ये रचितोऽयं मयाञ्जलिः । वत्सला चानृशंसा च त्वं हि नित्यं

---

मंत्र्यासहवर्तमान सर्व स्त्रियांचा, पुत्रांसहवर्तमान माझा आणि प्रजाजनांचा घात झाला असून आपला पुत्र भरत आणि भार्या कैकेयी ह्यांना मात्र आनंद झाला आहे " २६. हें घोर शब्दांनीं युक्त असलेलें भाषण श्रवण करून दुःखित झालेला दशरथराजा " हे रामा " असें ह्मणून मूर्छित झाला व नंतर तो शोकाकुल झाला असतां आपल्या दुष्कृत्याचें त्याला पुनरपि स्मरण झालें २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६१ ॥

ह्याप्रमाणें क्रुद्ध व शोकाकुल झालेली राममाता कठोर शब्दांनीं राजाला बोलली असतां तो दुःखित झालेला राजा चिंतन करूं लागला १. चिंता करितां करितां मोहानें त्याचें मन व्याकुल झालें व बराच काल लोटल्यावर तो शत्रुतापन दशरथभूपति शुद्धीवर आला २. शुद्धीवर येतांक्षणीं दीर्घ आणि उष्ण असे सुस्कारे टाकूं लागलेला तो राजा बाजूला बसलेल्या कौसल्येला अवलोकन करून विचार करूं लागला ३. तेव्हां त्या शब्दवेधी राजानें अज्ञानामुळें जें एक पूर्वीं दुष्कर्म केलें होतें त्याचें त्याला चिंतन करितां करितां स्मरण झालें असतां ४ तो शोक आणि रामसंबंधीं शोक अशा दोन शोकांनीं तो खिन्न झालेला प्रभु दशरथ महाराज व्याकुल होऊं लागला ५ आणि शोकांनीं दग्ध होत असलेला तो दुःखाकुल राजा तोंड खालीं करून आणि हात जोडून कौसल्येला प्रसन्न करून घेण्याकरितां कांपत कांपत ह्मणाला ६, " हे कौसल्ये, माझ्यावर कृपा कर; हे मीं हात जोडिले आहेत आणि तूं शत्रूशींही

परेष्वपि ७ भर्ता तु खलु नारीणां गुणवान्निर्गुणोपि वा । धर्मं विमृशमानानां प्रत्यक्षं देवि दैवतम् ८ सा त्वं धर्मपरा नित्यं दृष्टलोकपरावरा । नार्हसे विप्रियं वक्तुं दुःखितापि सुदुःखितम् ९ तद्वाक्यं करुणं राज्ञः श्रुत्वा दीनस्य भाषितम् । कौसल्या व्यसृजद्बाष्पं प्रणालीव नवोदकम् १० सा मूर्ध्नि बद्ध्वा रुदती राज्ञः पद्मविमाञ्जलिम् । संभ्रमादब्रवीत्रस्ता त्वरमाणाक्षरं वचः ११ प्रसीद शिरसा याचे भूमौ निपतितास्मि ते । याचितास्मि हता देव क्षन्तव्याहं नहि त्वया १२ नैषा हि सा स्त्री भवति श्लाघनीयेन धीमता । उभयोर्लोकयोर्लोके पत्या या संप्रसाद्यते १३ जानामि धर्मं धर्मज्ञ त्वां जाने सत्यवादिनम् । पुत्रशोकार्तया तत्तु मया किमपि भाषितम् १४ शोको नाशयते धैर्यं शोको नाशयते श्रुतम् । शोको नाशयते सर्वं नास्ति शोकसमो रिपुः १५ शक्यमापतितः सोढुं प्रहारो रिपुहस्ततः । सोढुमापतितः शोकः सुसूक्ष्मोपि

---

नेहमीं प्रेमानें व चांगुलपणानें वागणारी आहेस. ( ह्यास्तव, माझ्यावर कृपा कर ) ७. हे देवि, भर्ता गुणी अथवा निर्गुणी जरी असला तरी धर्म जाणणाऱ्या स्त्रियांनें खरोखर तो प्रत्यक्ष दैवतच आहे ८; व तूं नेहमीं धर्माविषयीं तत्पर असून जगांतील बऱ्या वाईट गोष्टी पाहिलेल्या आहेस. तेव्हां तूं जरी दुःखित झाली असलीस तरी अत्यत दुःखित झालेल्या भर्त्याला उद्देशून असें अप्रिय भाषण करणें तुला योग्य नाहीं ९. ह्याप्रमाणें दीन दशरथ राजाचें तें करुणा आणणारें भाषण श्रवण केल्यावर गटारांतून ज्याप्रमाणें पावसाचें पाणी वाहूं लागतें त्याप्रमाणें कौसल्येच्या नेत्रांतून अश्रू वाहूं लागले १०. त्या कौसल्येनें रडतां रडतां राजाला उद्देशून मस्तकीं कमलाप्रमाणें हात जोडिले आणि भयभीत होऊन घाईघाईनें अत्यंत आदरपूर्वक राजाला ह्मणाली ११ " आपण कृपा करा; मी मस्तक नम्र करून आपली प्रार्थना करीत आहें; व हा मी आपणांला साष्टांग नमस्कार घातला. हे देव, माझी प्रार्थना करण्याचा आपणांला प्रसंग आला हा माझा घातच झाला आहे ( कारण, पतीनें स्त्रीला हात जोडणें योग्य नव्हे. ) तस्मात्, माझी आपण कधींही क्षमा करितां उपयोगी नाहीं १२. दोन्ही लोकांमध्यें श्लाघ्य असलेल्या विचारी भर्त्याकडून जी हात जोडून घेणारी असेल ती खरोखर जगतामध्यें कुलीन स्त्री समजली जात नाहीं १३. हे धर्मज्ञ, मला पातिव्रत्य धर्म अवगत असून आपण सत्यवचनी आहांत हेंही मी जाणीत आहें. तात्पर्य, पुत्रशोकानें व्याकुल झाल्यामुळें तें मी कांहीं तरी बोलून गेलें १४. शोक धैर्याचा नाश करितो; शोकामुळें विद्या व्यर्थ होते आणि शोकामुळें सर्वांची विधुळवाट लागते. सारांश, शोकासारिखा शत्रु नाहीं १५.

न शक्यते १६ वनवासाय रामस्य पञ्चरात्रोऽत्र गण्यते । यः शोकहतहर्षायाः पञ्चवर्षोपमो मम १७ तं हि चिन्तयमानायाः शोकोऽयं हृदि वर्धते । नदीनामिव वेगेन समुद्रसलिलं महत् १८ एवं हि कथयन्त्यास्तु कौसल्यायाः शुभं वचः । मन्दरश्मिरभूत्सूर्यो रजनी चाभ्यवर्तत १९ अथ प्रल्हादितो वाक्यैर्देव्या कौसल्यया नृपः । शोकेन च समाक्रान्तो निद्राया वशमेयिवान् २० [२४४१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्विषष्टितमः सर्गः ॥ ६२ ॥

प्रतिबुद्धो मुहूर्तेन शोकोपहतचेतनः । अथ राजा दशरथः स चिन्तामभ्यपद्यत १ रामलक्ष्मणयोश्चैव विवासाद्वासवोपमम् । आपेदे उपसर्गस्तं तमः सूर्यमिवासुरम् २ सभार्ये हि गते रामे कौसल्यां कोसलेश्वरः । विवक्षुरसितापाङ्गीं स्मृत्वा दुष्कृतमात्मनः ३ स राजा रजनीं षष्ठीं रामे प्रव्राजिते वनम् । अर्धरात्रे दशरथः सोऽस्मरद्दुष्कृतं कृतम् ४ स

---

शत्रूच्या हातांनीं झालेला शस्त्रप्रहार सहन करणें शक्य आहे; परंतु, अतिशय सूक्ष्मही शोक प्राप्त झाला असतां तो सहन होणें शक्य नाहीं १६. रामाच्या वनवासाला आज पांच रात्रि होऊन गेल्या व ह्या पांच रात्री, शोकानें माझा हर्ष नाहींसा झाल्यामुळें, मला पांच वर्षांप्रमाणें गेल्या १७. समुद्राला भरती आली असतां त्याचें विपुल उदक भरतीच्या वेगानें ज्याप्रमाणें आंत येऊन मिळालेल्या नद्यांच्या पात्रांतून वाढूं लागतें त्याचप्रमाणें रामाचें चिंतन करितां करितां हा शोक माझ्या हृदयामध्यें वृद्धिंगत होत आहे " १८. ह्याप्रमाणें कौसल्या शुभ भाषण करीत असतांना सूर्यकिरणांचा प्रकाश कमी होऊन रात्र पडूं लागली १९. तेव्हां शोकाकुल झालेल्या राजाला राजपत्नि कौसल्येनें ( मधुर ) भाषणांनीं आनंदित केलें असतां त्याला डुलकी लागली २०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं बासष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६२ ॥

नंतर शोकानें मूर्छित झालेला तो दशरथराजा एका मुहूर्तानें जागा झाल्यावर चिंतन करूं लागला १. तेव्हां राहूची छाया ज्याप्रमाणें सूर्याला घेरून टाकिते त्याप्रमाणें त्या इंद्रतुल्य दशरथ राजाला रामलक्ष्मणांच्या हांकून देण्यामुळें उत्पन्न झालेल्या शोकानें घेरून टाकिलें २. सारांश, ह्याप्रमाणें राम भार्येसहवर्तमान वनामध्यें निघून गेला असतां कोसलाधिपति दशरथराजाला आपल्या दुष्कृत्याचें स्मरण झालें आणि कृष्णवर्ण नेत्रप्रांतानें युक्त असलेल्या कौसल्येला तें सांगण्याची त्याची इच्छा झाली ३. राम वनामध्यें जाऊन सहावी रात्र प्राप्त झाली असतां मध्यरात्रीं त्या दशरथाला

राजा पुत्रशोकार्तः स्मृत्वा दुष्कृतमात्मनः । कौसल्यां पुत्रशोकार्तामिदं वचनमब्रवीत् ५ यदाचरति कल्याणि शुभं वा यदि वाशुभम् । तदेव लभते भद्रे कर्ता कर्मजमात्मनः ६ गुरुलाघवमर्थानामारम्भे कर्मणां फलम् । दोषं वा यो न जानाति स बाल इति ह्योच्यते ७ कश्चिदाम्रवणं छित्त्वा पलाशांश्च निषिञ्चति । पुष्पं दृष्ट्वा फले गृध्नुः स शोचति फलागमे ८ अविज्ञाय फलं यो हि कर्म त्वेवानुधावति । स शोचेत्फलवेलायां यथा किंशुकसेवकः ९ सोहमाम्रवणं छित्त्वा पलाशांश्च न्यषेचयम् । रामं फलागमे त्यक्त्वा पश्चाच्छोचामि दुर्मतिः १० लब्धशब्देन कौसल्ये कुमारेण धनुष्मता । कुमारः शब्दवेधीति मया पापमिदं कृतम् ११ तदिदं मेनुसंप्राप्तं देवि दुःखं स्वयंकृतम् । संमोहादिह बालेन यथा स्याद्भक्षितं विषम् १२ यथान्यः पुरुषः कश्चित्पलाशैर्मोहितो भवेत् । एवं मयाप्यविज्ञातं शब्दवेध्यमिदं फलम् १३ देव्यनूढा

आपल्या हातून घडलेल्या दुष्कृत्याचें स्मरण झालें ४ व आपल्या दुष्कृत्याचें स्मरण झाल्यावर पुत्रशोकानें व्याप्त झालेला तो दशरथराजा पुत्रशोकानें घेरून टाकिलेल्या कौसल्येला ह्मणाला ५ " हे कल्याणि, हे भद्रे, शुभ अथवा अशुभ जें कांहीं पुरुष करितो त्याचें फल त्या कर्त्या पुरुषाला प्राप्त होतेंच ६. ऐहिक आणि पारलौकिक कर्मांना आरंभ करिते वेळीं त्यांच्या फलासंबंधानें उत्कृष्टनिकृष्ट भाव आणि गुणदोष जो जाणीत नाहीं त्याला मूर्ख असें ह्मणतात ७. पुष्प पाहून तशाच प्रकारचें फल प्राप्त होईल या आशेनें अमराई तोडून टाकून जो पळसांना पाणी घालूं लागतो त्याला फलप्राप्तीसंबंधानें रडत बसण्याची पाळी येते ८. तेव्हां विचार न करितां जो उतावीळ होऊन कर्म मात्र करूं लागतो त्याला फलप्राप्तीचे वेळीं पळसांना पाणी घालणाऱ्या पुरुषाप्रमाणें शोक करण्याची पाळी येते ९. सारांश, रामाचा त्याग करून कैकेयीच्या मताप्रमाणें वागण्यांत मीं अमराई तोडून पळसांना पाणी घातलें आहे. तेव्हां फलप्राप्तीचे वेळीं आतां मज अविचाऱ्याला पश्चात्ताप होत आहे १०. अजराजाचा पुत्र शब्दवेधी आहे अशी माझी ख्याति झाली होती व मीं धनुष्य धारण करून लहानपणीं, हे कौसल्ये, हें पाप केलें आहे ११. तेव्हां, हे देवि, न समजतांही बालानें भक्षण केलेलें विष जसा त्याचा घात करितें त्याप्रमाणें स्वतः केलेल्या त्या पापकर्माचें हें दुःखरूप फल मला आतां प्राप्त झालें आहे १२. ज्याप्रमाणें एकादा अज्ञानी पुरुष फल माहीत नसल्यामुळें पलाशपुष्पांनीं मोहित होऊन जातो त्याचप्रमाणें शब्दवेधित्व ह्या गुणाला भुलून जाऊन ह्याप्रमाणें असलेलें त्याचें क्रूर

त्वमभवो युवराजो भवाम्यहम् । ततः प्रावृडनुप्राप्ता मम कामविवर्धिनी १४ अपास्य हि रसान्भौमांस्तप्त्वा च जगदंशुभिः। परेताचरितां भीमां रविराचरते दिशम् १५ उष्णमन्तर्दधे सद्यः स्निग्धा ददृशिरे घनाः। ततो जहृषिरे सर्वे भेकसारङ्गबर्हिणः १६ क्लिन्नपक्षोत्तराः स्नाताः कृच्छ्रादिव पतत्रिणः । वृष्टिवातावधूताग्रान्पादपानभिपेदिरे १७ पतितेनाम्भसा च्छन्नः पतमानेन चासकृत् । आबभौ मत्तसारङ्गस्तोयराशिरिवाचलः १८ पाण्डुरारुणवर्णानि स्रोतांसि विमलान्यपि । सुस्रुवुर्गिरिधातुभ्यः सभस्मानि भुजङ्गवत् १९ तस्मिन्नतिसुखे काले धनुष्मानिषुमान्रथी । व्यायामकृतसंकल्पः सरयूमन्वगां नदीम् २० निपाने महिषं रात्रौ गजं वाभ्यागतं मृगम् । अन्यद्वा श्वापदं किंचिज्जिघांसुरजितेन्द्रियः २१ अथान्धकारे त्वश्रौषं जले कुम्भस्य पूर्यतः । अचक्षुर्विषये घोषं वारणस्येव नर्दतः २२ ततोऽहं शरमुद्धृत्य दीप्तमाशीविषोपमम् २३ शब्दं प्रति गजप्रेप्सुरभिलक्ष्यमपातयम् । अमुञ्चं निशितं बाणमहमा-

फल जाणिलें नाहीं १३. हे देवि, तुझें पाणिग्रहण होण्याचे पूर्वी मी युवराज असतांना माझी इच्छा वृद्धिंगत करणारा पर्जन्यकाल प्राप्त झाला १४. भूमीसंबंधीं रसांचें शोषण करून आणि आपल्या किरणांनीं जगत् तप्त करून रवि घोर अशा दक्षिण दिशेला जाऊं लागला असतां १५ एकाएकीं उष्मा नाहींसा होऊन सजल मेघ दृष्टीं पडूं लागले आणि त्यामुळें सर्व मंडूक, चातक व मयूरपक्षी आनंदित झाले १६. पंखाचे वरचे भाग चिंब होऊन गेल्यामुळें तपश्चर्येकरितां स्नानें केल्याप्रमाणेंच कीं काय दिसूं लागलेले पक्षी पर्जन्यकालच्या वायूनें ज्यांचे शेंडे हालत आहेत अशा वृक्षांचा आश्रय करूं लागले १७. पडलेल्या आणि सतत पडणाऱ्या उदकामुळें मत्त चातक पक्ष्यांनीं युक्त असलेला पर्वत जलराशीप्रमाणें दिसूं लागला १८. पर्वतावरील धातूमुळें कोठें कोठें श्वेतवर्ण, कोठें ताम्रवर्ण व कोठें भस्ममिश्रित असे निर्मल प्रवाह भुजंगासारिख्या कुटिलगतीनें पर्वतावरून वाहूं लागले १९. तेव्हां त्या अत्यंत सुखकर वेळीं मृगया करण्याचा संकल्प करून मी रथ, धनुष्य व बाण ह्यांसहवर्तमान निघालों आणि रात्रीं पाण्यावर आलेला महिष, गज, मृग अथवा दुसरें कांहीं श्वापद मारण्याची इच्छा धरून मीं मन स्वाधीन न ठेवितां सरयूनदीचे तीरानें चाललों २०, २१. तेव्हां अंधेर पडल्यानंतर दृष्टीच्या टप्यांत नसलेल्या उदकामध्यें कोणी घागर भरून नेत असतांना गर्जना करणाऱ्या गजाच्या ध्वनीप्रमाणें तो शब्द माझ्या कानीं आला. तेव्हां गजाचा वध करण्याच्या इच्छेनें मीं भात्यांतून बाण काढिला २२, २३ आणि जिकडून शब्द आला होता तिकडे

शीविषोपमम् २४ तत्र वागुषसि व्यक्ता प्रादुरासीद्वनौकसः। हा हेति पततस्तोये बाणाव्यथितमर्मणः २५ तस्मिन्निपतिते भूमौ वागभूत्तत्र मानुषी। कथमस्मद्विधे शस्त्रं निपतेच्च तपस्विनि २६ प्रविविक्तां नदीं रात्रावुदाहारोऽहमागतः। इषुणाभिहतः केन कस्य वापकृतं मया २७ ऋषेर्हि न्यस्तदण्डस्य वने वन्येन जीवतः। कथं नु शस्त्रेण वधो मद्विधस्य विधीयते २८ जटाभारधरस्यैव वल्कलाजिनवाससः। को वधेन ममार्थी स्यात्किं वास्यापकृतं मया २९ एवं निष्फलमारब्धं केवलानर्थसंहितम्। न कश्चित्साधु मन्येत यथैव गुरुतल्पगम् ३० नेमं तथानुशोचामि जीवितक्षयमात्मनः। मातरं पितरं चोभावनुशोचामि मद्वधे ३१ तदेतन्मिथुनं वृद्धं चिरकालभृतं मया। मयि पञ्चत्वमापन्ने कां वृत्तिं वर्तयिष्यति ३२ वृद्धौ च मातापितरावहं चैकेषुणा हतः। केन स्म निहताः

---

नेम धरून सर्पाच्या विषाप्रमाणें तीक्ष्ण असलेला तो उज्ज्वल बाण सोडिला २४. तेव्हां ज्या ठिकाणीं मीं तो सर्पविषतुल्य बाण सोडिला होता त्या ठिकाणीं, बाण मर्मी लागून उदकांत पडत असलेल्या अरण्यवासी पुरुषाच्या तोंडांतून, "हाय हाय" असे शब्द उषःकालीं स्पष्टपणें निघाले २५. आणि तो भूमीवर पडल्यानंतर तर चांगली मनुष्यवाणिच तेथें सुरू झाली. ( तो ह्मणाला ) " माझ्यासारिख्या तपस्व्यावर शस्त्रपात कां बरें व्हावा! २६. उदक नेण्याकरितां मी रात्रीं निर्जन नदीवर आलों असतांना मला कोणी बरें बाण मारिला! मीं कोणाचा बरें अपराध केला आहे! २७. परपीडेचा त्याग करून ऋषींप्रमाणें वनामध्यें वन्य आहारावर उपजीविका करणाऱ्या माझ्यासारख्याचा शस्त्रानें वध कां बरें केला आहे! २८. अरे, जटाभार धारण करून आणि वल्कलें व अजिनें परिधान करून रहाणाऱ्या माझ्या वधाची कोणाला बरें गरज पडली होती! अथवा ह्या वध करणाऱ्याचा मीं तरी काय बरें अपराध केला आहे! २९. ह्याप्रमाणें केवल अनर्थालाच कारण होणारें व इहलोकींही कांहींएक फल न देणारें असें जें कर्म कोणी केलें आहे तें कर्म करणाऱ्याला ज्याप्रमाणें मातृगमन करणाऱ्याला इहलोकीं अथवा परलोकीं कोणीही चांगलें ह्मणणार नाहीं, त्याचप्रमाणें कोणीही चांगलें ह्मणणार नाहीं ३०. माझ्या ह्या जीविताचा क्षय झाला ह्याबद्दल मला विशेषें वाईट वाटत नाहीं; परंतु; माझा वध झाल्यामुळें माझ्या उभयतां मातापितरां ( चा वध झाल्या ) बद्दल मला फार वाईट वाटत आहे ३१. ह्या वृद्ध दंपतीचें मीं पुष्कळ दिवसपर्यंत पोषण केलें आहे. तेव्हां आतां मी मृत्यु पावल्यानंतर हे आपली उपजीविका कशी करणार ? ३२. मातापितर वृद्ध असून माझा तर एकाच

सर्वे सुबालेनाकृतात्मना ३३ तां गिरं करुणां श्रुत्वा मम धर्मानुकाङ्क्षिणः । कराभ्यां सशरं चापं व्यथितस्यापतद्भुवि ३४ तस्याहं करुणं श्रुत्वा ऋषेर्विलपतो निशि । संभ्रान्तः शोकवेगेन भृशमासं विचेतनः । तं देशमहमागम्य दीनसत्त्वः सुदुर्मनाः ३५ अपश्यमिषुणा तीरे सरय्वास्तापसं हतम् ३६ अवकीर्णजटाभारं प्रविद्धकलशोदकम् । पांसुशोणितदिग्धाङ्गं शयानं शल्यवेधितम् ३७ स मामुद्वीक्ष्य नेत्राभ्यां त्रस्तमस्वस्थचेतनम् । इत्युवाच वचः क्रूरं दिधक्षन्निव तेजसा ३८ किं तवापकृतं राजन्वने निवसता मया । जिहीर्षुरम्भो गुर्वर्थं यदहं ताडितस्त्वया ३९ एकेन खलु बाणेन मर्मण्यभिहते मयि । द्वावन्धौ निहतौ वृद्धौ माता जनयिता च मे ४० तौ नूनं दुर्बलावन्धौ मत्प्रतीक्षौ पिपासितौ । चिरमाशां कृतां कष्टां तृष्णां संधारयिष्यतः ४१ न नूनं तपसो वास्ति फलयोगः श्रुतस्य वा । पिता यन्मां न जानीते शयानं पतितं

---

बाणानें वध झाला आहे. तेव्हां अजितेंद्रिय अशा कोणी बरें महामूर्खानें आह्मां सर्वांचा वध केला आहे ! " ३३. हें करुणा आणणारें भाषण श्रवण करितांक्षणीं मला दुःख झालें आणि धर्माला अनुसरून वागणाऱ्या माझ्या हातांतून बाणासह धनुष्य गळून खालीं पडलें ३४. विलाप करीत असलेल्या त्या ऋषितुल्य पुरुषाचे ते करुणा आणणारे शब्द रात्रीं ऐकतांक्षणीं मी घाबरून गेलों आणि अतिशयच दुःख झाल्यामुळें मला कांहीं सुचेनासें झालें ३५. माझें मन दीन झालें आणि अत्यंत खिन्न होऊन मी त्या प्रदेशावर गेलों असतां सरयूनदीचे तीरीं बाण लागून पडलेला एक तपस्वी माझ्या दृष्टीं पडला ३६. त्याच्या जटा विखुरलेल्या होत्या, कलशांतील उदक सांडून गेलें होतें आणि बाण लागून पडलेला तो तपस्वी धुराळ्यानें व रक्तानें शरीर भरून जाऊन तेथें लोळत होता ३७. घाबरून व मनामध्यें अस्वस्थ होऊन तेथें गेलेल्या मला नेत्रांनीं अवलोकन केल्यावर, तेजानें मला जाळून टाकण्याचेंच मनांत आणीत आहे कीं काय असा, तो तपस्वी माझ्याशीं क्रूर भाषण करूं लागला कीं ३८, " हे राजा, वडिलांकरितां उदक नेण्याला मी येथें आलों असतांना ज्याअर्थी तूं मला बाणानें वेध केलास त्याअर्थी वनांत रहाणाऱ्या माझ्या हातून तुझा काय बरें अपराध झाला आहे ? ३९. एक बाण मला मर्मीं मारल्यानें तूं खरोखर माझी माता आणि माझा पिता अशा दोन वृद्ध अंधांचाही घात केला आहेस ४०. ते खरोखर दुर्बल, अंध व तृषाक्रांत असून माझी वाट पहात आहेत. ( इकडे काय प्रकार घडला ह्याची त्यांना वार्ताच नसल्यामुळें इतक्यांत आपला पुत्र उदक घेऊन येईल अशी ) आशा धरून पुष्कळ

भुवि ४२ जानन्नपि च किं कुर्यादशक्तश्चापरिक्रमः । भिद्यमानमिवाशक्तस्त्रातुमन्यो नगो नगम् ४३ पितुस्त्वमेव मे गत्वा शीघ्रं माचक्ष्व राघव। न त्वामनुदहेत्क्रुद्धो वनमग्निरिवैधितः ४४ इयमेकपदी राजन्यतो मे पितुराश्रमः। तं प्रसादय गत्वा त्वं न त्वा संकुपितः शपेत् ४५ विशल्यं कुरु मां राजन्मर्म मे निशितः शरः । रुणद्धि मृदु सोत्सेधं तीरमम्बुरयो यथा ४६ सशल्यः क्लिश्यते प्राणैर्विशल्यो विनशिष्यति । इति मामविशच्चिन्ता तस्य शल्यापकर्षणे ४७ दुःखितस्य च दीनस्य मम शोकातुरस्य च । लक्षयामास स ऋषिश्चिन्तां मुनिसुतस्तदा ४८ ताम्यमानं स मां कृच्छ्रादुवाच परमार्थवित् । सीदमानो विवृत्ताङ्गोचेष्टमानो गतः क्षयम् ४९ संस्तभ्य शोकं धैर्येण स्थिरचित्तो भवाम्यहम् । ब्रह्महत्याकृतं तापं हृदयादपनीयताम् ५० न द्विजातिरहं राजन्मा भूत्ते

---

वेळपर्यंत ते तृषा दाबून ठेवितील ४१. मी येथें भूमीवर लोळत पडलों आहें ही वार्ताही पित्याला नाहीं. ह्यावरून माझ्या तपाचें अथवा विद्येचें कांहींच फल नाहीं४२. अथवा ही वार्ता जरी त्याला ठाऊक असली तरी अशक्त व पंगू असल्यामुळें तो करणार काय ? एक वृक्ष मोडून पडूं लागला असतां दुसरा वृक्ष त्याचें रक्षण करण्यास जसा असमर्थ असतो तसा माझें रक्षण करण्यास तो असमर्थ आहे ४३. तस्मात्, हे रघुवंशजा, तूंच माझ्या पित्याकडे सत्वर जाऊन त्याला हा वृत्तांत कळीव. वृद्धिंगत झालेला अग्नी ज्याप्रमाणें वन दग्ध करितो त्याप्रमाणें तो तुला क्रुद्ध होऊन दग्ध न करो ४४. हे राजा, ही पाऊलवाट आहे व ह्या वाटेनें गेलें असतां माझ्या पित्याचा आश्रम लागतो. त्या पाऊलवाटेनें तूं जा आणि ज्या रीतीनें तो क्रुद्ध होऊन तुला शाप न देईल त्या रीतीनें तूं त्याला प्रसन्न करून घे ४५. हे राजा, माझ्या शरीरांत रुतलेला हा बाण काढून टाक; भुसभुशीत अशा नदीतीराला उदकाचा वेग ज्याप्रमाणें पीडा देतो त्याप्रमाणें हा तीक्ष्ण बाण माझ्या मर्माला पीडा देत आहे" ४६. ( ह्याप्रमाणें त्या तपस्व्यानें सांगितलें असतां ) " ह्याचें शल्य न काढिलें तर ह्याच्या प्राणांना क्लेश होत आहेत आणि शल्य काढिलें तर हा मृत्यु पावेल " अशी त्याचें शल्य काढण्यासंबंधानें मला चिंता प्राप्त झाली४७. तेव्हां दुःखित, दीन व शोकाकुल झालेल्या माझी ती चिंता त्या ऋषितुल्य तपस्वी व निरुपद्रवी मातापितरांच्या पुत्रानें जाणिली ४८. तेव्हां शक्तिपात होऊन हालचाल करीनासा झालेला तो शास्त्रतत्त्वज्ञ मुमूर्षु व डोळे फिरवूं लागलेला तपस्वी धैर्यानें शोक आंवरून धरून मोठ्या कष्टानें दुःख करीत असलेल्या मला ह्मणाला "माझें मन स्वस्थ आहे; ब्रह्महत्येच्या पातकासंबंधाची भीति तूं आपल्या हृद-

मनसो व्यथा । शूद्रायामस्मि वैश्येन जातो नरवराधिप ५१ इतीव वदतः कृच्छ्राद्बाणाभिहतमर्मणः । विघूर्णतो विचेष्टस्य वेपमानस्य भूतले ५२ तस्य त्वाताम्यमानस्य तं बाणमहमुद्धरम् । स मामुद्वीक्ष्य संत्रस्तो जहौ प्राणांस्तपोधनः ५३ जलार्द्रगात्रं तु विलप्य कृच्छ्रं मर्मव्रणं संततमुच्छ्वसंतम् । ततः सरय्वां तमहं शयानं समीक्ष्य भद्रे सुभृशं विषण्णः ५४ [ २४९५ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्रिषष्टितमः सर्गः ॥ ६३ ॥

वधमप्रतिरूपं तु महर्षेस्तस्य राघवः । विलपन्नेव धर्मात्मा कौसल्यामिदमब्रवीत् १ तदज्ञानान्महत्पापं कृत्वा संकुलितेन्द्रियः । एकस्त्वचिन्तयं बुद्ध्या कथं नु सुकृतं भवेत् २ ततस्तं घटमादाय पूर्णं परमवारिणा । आश्रमं तमहं प्राप्य यथाख्यातपथं गतः ३ तत्राहं दुर्बलावन्धौ वृद्धावपरिणायकौ । अपश्यं तस्य पितरौ लूनपक्षाविव द्विजौ ४ तन्निमित्ताभि-

---

यांतून काढून टाक ४९,५०. हे राजा, मी ब्राह्मण नव्हे; तुझ्या मनाला ( ब्रह्महत्येची ) रुखरुख नको. हे राजाधिराज, वैश्यापासून शूद्रस्त्रीचे ठिकाणीं मी उत्पन्न झालों आहें " ५१. ह्याप्रमाणें—बाण मर्मी लागल्यामुळें कंप सुटून भूतलावर तडफड करीत करीत लोळत असलेला आणि वेदना होत असलेला—तो तपस्वी कष्टानें बोलूं लागला असतां मीं तो बाण उपसून काढिला ( व बाण निघाल्यानंतर ) अतिशय व्याकुल झालेल्या त्या तपस्व्यानें माझ्याकडे पाहून प्राण सोडिले ५२,५३. तेव्हां उदकानें भिजलेला व भयंकर मर्मव्रण प्राप्त झाल्यामुळें विलाप करून आणि एकसारिखे कण्हून कण्हून सरयूचे तीरीं मरून पडलेल्या त्या तपस्व्याला अवलोकन करून, हे भद्रे कौसल्ये, मी अतिशयच खिन्न झालों ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं त्रेसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥६३॥

ह्याप्रमाणें आपल्या हातून त्या महर्षितुल्य तपस्व्याचा अयोग्य वध झाल्याचें स्मरण होऊन तो दशरथराजा पुत्राकरितां विलाप करीत करीतच कौसल्येला ह्मणाला १ " अज्ञानामुळें तें महापाप घडून आल्यावर माझीं इंद्रियें व्याकुल झालीं आणि आतां आपलें कल्याण कसें होईल ह्मणून मी एकटाच आपल्या मनानें विचार करूं लागलों २. तदनंतर उत्कृष्ट जलानें भरलेला तो घट घेऊन सांगितलेल्या मार्गानें मी त्या आश्रमाला गेल्यावर ३ तेथें दुर्बल, अंध, वृद्ध व हातांत धरून नेणारा दुसरा कोणी नसल्यामुळें पंख तुटलेल्या पक्ष्याप्रमाणें झालेले त्याचे पितर अवलोकन केले ४. कांहीं खटपटींत न पडतां त्या पुत्रासंबंधानें गोष्टी बोलत बोलत ते बसले होते आणि

रासीनौ कथाभिरपरिश्रमौ । तामाशां मत्कृते हीनावुपासीनावनाथवत् ५ शोकोपहतचित्तश्च भयसंत्रस्तचेतनः । तच्चाश्रमपदं गत्वा भूयः शोकमहं गतः ६ पदशब्दं तु मे श्रुत्वा मुनिर्वाक्यमभाषत । किं चिरायसि मे पुत्र पानीयं क्षिप्रमानय ७ यन्निमित्तमिदं तात सलीले क्रीडितं त्वया । उत्कण्ठिता ते मातेयं प्रविश क्षिप्रमाश्रमम् ८ यद्व्यलीकं कृतं पुत्र मात्रा ते यदि वा मया । न तन्मनसि कर्तव्यं त्वया तात तपस्विना ९ त्वं गतिस्त्वगतीनां च चक्षुस्त्वं हीनचक्षुषाम् । समासक्तास्त्वयि प्राणाः कथं त्वं नाभिभाषसे १० मुनिमव्यक्तया वाचा तमहं सज्जमानया । हीनव्यञ्जनया प्रेक्ष्य भीतचित्त इवाब्रुवम् ११ मनसः कर्म चेष्टाभिरभिसंस्तभ्य वाग्बलम् । आचचक्षे त्वहं तस्मै पुत्रव्यसनजं भयम् १२ क्षत्रियोऽहं दशरथो नाहं पुत्रो महात्मनः । सज्जनावमतं दुःखमिदं प्राप्तं स्वकर्मजम् १३ भगवंश्चापहस्तोऽहं सरयूतीरमागतः । जिघांसुः श्वापदं किंचिन्निपाने वागतं गजम् १४ ततः श्रुतो मया शब्दो जले कुम्भस्य

---

वस्तुतः जरी ते माझ्यामुळें निराश झाले होते तरी ( आतां आपला पुत्र उदक घेऊन येईल अशी ) अनाथाप्रमाणें ते आशा धरून राहिले होते ५. माझें मन शोकाकुल होऊन भीतीनें मी अगदीं घाबरून गेलों होतों; आणि त्या आश्रमस्थानाला गेल्यावर तर मी अधिकच शोकाकुल झालों ६. माझ्या पाउलांचा आवाज ऐकतांक्षणीं तो बिचारा पिता ह्मणाला " हे पुत्रा, कां रे उशीर लावीत आहेस ? लवकर उदक घेऊन ये ७. तूं आतांपर्यंत उदकामध्यें खेळत होतास ह्यामुळ, बाबा, ही तुझी माता फारच उत्सुक झाला आहे. तेव्हां तूं लवकर आश्रमांत ये ८. बा पुत्रा, तुझ्या मातेच्या हातून अथवा माझ्या हातून जी कांहीं गोष्ट तुझ्या मनाविरूद्ध झाली असेल ती तपस्व्यानें मनामध्यें ठेवूं नये ९. आह्मा पंगूंची गति तूंच असून आह्मां अंधांची दृष्टिही तूंच आहेस व तुझ्यावरच आमचे प्राण अवलंबून आहेत. तेव्हां तूं आज भाषण कां करीतनाहींस?" १०. ह्याप्रमाणें व्यंजनांचा ( शब्दाक्षरांचा ) उच्चार चांगला होत नसल्यामुळें अस्पष्टपणें व अडखळत अडखळत भाषण करीत असलेल्या त्या बिचाऱ्या वृद्धाला अवलोकन करून मनांत भिऊन गेलेला मी त्याच्याशीं बोललों ११. इकडून तिकडून मनांतली भीति मीं अवरून धरिली आणि बोलण्याचा नेट धरून मी त्याला तें पुत्रमरणजन्म भय निवेदन केलें १२. ( मी ह्मणालों ) " मी क्षत्रिय दशरथ आहें; आपणा महात्म्यांचा पुत्र नव्हे. सज्जनांनीं निंद्य मानिलेली अशी ही दुःखकारक गोष्ट पूर्वसंचितामुळें माझ्या हातून झाली आहे १३. हे भगवन्, उदकासमीप आलेला गज अथवा कांहीं श्वापद

पूर्यतः । द्विपोऽयमिति मत्वाहं बाणेनाभिहतो मया १५ गत्वा तस्यास्ततस्तीरमपश्यमिषुणा हृदि । विनिर्भिन्नं गतप्राणं शयानं भुवि तापसम् १६ ततस्तस्यैव वचनादुपेत्य परितप्यतः । स मया सहसा बाण उद्धृतो मर्मतस्तदा १७ स चोद्धृतेन बाणेन सहसा स्वर्गमास्थितः । भगवन्तावुभौ शोचन्नन्धाविति विलप्य च १८ अज्ञानाद्भवतः पुत्रः सहसाभिहतो मया । शेषमेवं गते यत्स्यात्तत्प्रसीदतु मे मुनिः १९ स तच्छ्रुत्वा वचः क्रूरं मया तदघशंसिना । नाशकत्तीव्रमायासं स कर्तुं भगवानृषिः २० स बाष्पपूर्णवदनो निःश्वसञ्शोकमूर्छितः । मामुवाच महातेजाः कृताञ्जलिमुपस्थितम् २१ यद्येतदशुभं कर्म न स्म मे कथयेः स्वयम् । फलेन्मूर्धा स्म ते राजन्सद्यः शतसहस्रधा २२ क्षत्रियेण वधो राजन्वानप्रस्थे विशेषतः । ज्ञानपूर्वं कृतः स्थानाच्च्यावयेदपि वज्रिणम् २३ सप्तधा तु

---

मारावें या उद्देशानें मी हातांत धनुष्य घेऊन सरयूतीरीं आलों असतां १४ उदकामध्यें भरणाऱ्या कुंभाचा मीं शब्द ऐकिला आणि हा गज असावा असें समजून मीं त्याला बाण मारिला १५. तदनंतर त्या तीरापाशीं गेल्यावर एक तपस्वी बाणानें हृदय फुटून जाऊन जीव जाण्याच्या बेतांत आलेला आहे आणि भुईवर पडला आहे असें मीं अवलोकन केलें १६. तेव्हां त्यानेंच सांगितल्यावरून मी त्याच्या शेजारी गेलों आणि त्याला वेदना होत असतांना मीं तो बाण एकदम त्याच्या मर्मापासून उपसून काढिला १७. तेव्हां बाण निघतांक्षणीं " अंध मातापितरांचें आतां कोण रक्षण करील " असा तुह्मां उभयतां भगवंतांकरितां शोक करून तो एकदम स्वर्गाला गेला १८ ह्याप्रमाणें न समजतां आपल्या पुत्राचा माझ्या हातून वध झाला आहे. तेव्हां असा प्रकार झाल्यावर आतां पुढें काय करावयाचें त्याविषयीं आपण मुनींनीं मला आज्ञा करावी " १९. असें तें दुःख निवेदन करणाऱ्या माझें भयंकर भाषण श्रवण केल्यावर तो भगवान् ऋषि मला प्रचंड शाप देण्यास समर्थ होईना २०. तेव्हां अश्रूंनीं ज्याचें मुख भरून गेलेलें आहे असा तो शोकानें व्याप्त झालेला महातेजस्वी वृद्ध सुस्कारे टाकीत टाकीत हात जोडून उभा राहिलेल्या मला ह्मणाला २१ " हे राजा, हें अशुभ कर्म जर तूं स्वतः मला विदित केलें नसतेस तर तुझ्या मस्तकाचे शेंकडों किंवा हजारों तुकडे तुकडे होऊन गेले असते २२. हे राजा, विशेषतः वानप्रस्थधर्मानें वागणाऱ्याचा समजून उमजून जर क्षत्रियानें वध केला असतां तर तो वध करणारा प्रत्यक्ष जरी इंद्र असतां तरी सुद्धां माझ्या कोपानें त्याला स्थानभ्रष्ट केलें असतें ( मग तुझ्यासारिख्या गरीबाची कथा काय ! ) २३. मातापितरसेवारूपतपश्चर्येविषयीं तत्पर

भवेन्मूर्धा मुनौ तपसि तिष्ठति । ज्ञानाद्विसृजतः शस्त्रं तादृशे ब्रह्मवादिनि २४ अज्ञानाद्धि कृतं यस्मादिदं ते तेन जीवसे । अपि ह्यकुशलं न स्याद्राघवाणां कुतो भवान् २५ नय नौ नृप तं देशमिति मां चाभ्यभाषत । अथ तं द्रष्टुमिच्छावः पुत्रं पश्चिमदर्शनम् २६ रुधिरेणावसिक्ताङ्गं प्रकीर्णाजिनवाससम् । शयानं भुवि निःसंज्ञं धर्मराजवशंगतम् २७ अथाहमेकस्तं देशं नीत्वा तौ भृशदुःखितौ । अस्पर्शयमहं पुत्रं तं मुनिं सह भार्यया २८ तौ पुत्रमात्मनः स्पृष्ट्वा तमासाद्य तपस्विनौ । निपेततुः शरीरेऽस्य पिता चैनमुवाच ह २९ नाभिवादयसे माद्य न च मामभिभाषसे । किं च शेषे तु भूमौ त्वं वत्स किं कुपितो ह्यसि ३० नन्वहं तेऽप्रियः पुत्र मातरं पश्य धार्मिकीम् । किं च नालिङ्गसे पुत्र सुकुमार वचो वदः ३१ कस्य वा पररात्रेऽहं श्रोष्यामि हृदयंगमम् । अधीयानस्य मधुरं शास्त्रं वान्यद्विशेषतः ३२ को मां संध्यामुपास्यैव स्नात्वा हुतहुताशनः । श्लाघयिष्यत्युपासीनः ।

---

व वेदवेत्त्या ब्राह्मणासमान असलेल्या त्या तशाप्रकारच्या मुनितुल्य पुरुषावर समजून उमजून शस्त्र सोडणाऱ्याच्या मस्तकाचे सात तुकडे व्हावेत २४; परंतु, हें कृत्य अज्ञानानें तुझ्या हातून घडल्यामुळें तूं जिवंत राहिला आहेस. बुद्धिपूर्वक जर ही गोष्ट झाली असती तर सर्व रघुवंशजांचें कुलच जाग्यावर राहिलें नसतें. ( मग तूं कोठून जगणार ) २५. हे राजा तूं आम्हांला त्या प्रदेशावर घेऊन जा. रक्तानें ज्याचें शरीर भरलें आहे व ज्याचीं अजिनें व वस्त्रें अस्ताव्यस्त झालेलीं आहेत अशा त्या मृत्यूच्या अधीन होऊन व गतप्राण होऊन भूमीवर पडलेल्या पुत्राची आज शेंवटची भेट घ्यावी अशी आमची इच्छा आहे" २६, २७. ( ह्याप्रमाणें त्यानें सांगितल्या ) नंतर अत्यंत दुःखित झालेल्या त्या उभयतांना मी एकटा त्या प्रदेशावर घेऊन गेलों आणि भार्येसहवर्तमान त्या बिचाऱ्या पित्याकडून त्या पुत्राला मीं स्पर्श करविला २८. तेव्हां आपल्या पुत्राच्या जवळ येऊन व त्याला स्पर्श करून ते बिचारे मातापितर त्याच्या शरीरावर पडले आणि पिता त्याला ह्मणाला २९ " आज तूं मला अभिवंदन करीत नाहींस परंतु, भूमीवर निजला आहेस. तेव्हां, हे पुत्रा, तूं माझ्यावर रागावला आहेस काय रे ३०. हे पुत्रा, अरे, मी जरी तुला अप्रिय असलों तरी ह्या धर्मानें वागणाऱ्या आपल्या मातेकडे तरी तूं पहा. तूं कां रें आह्मांला आलिंगन देत नाहींस. हे पुत्रा, हे सुकुमारा, आमच्याशीं एकदां बोल रे ३१. अरे, शास्त्र अथवा दुसरें कांहीं ह्मणत असलेल्या कोणाचें तरी मी आतां चित्तवेधक अध्ययन पहाटेस ऐकूं ! ३२. संध्या करून व होम अटोपून तुझ्याप्रमाणें शुश्रूषा करण्याविषयीं तत्पर

पुत्रशोकभयार्दितम् ३३ कन्दमूलफलं हृत्वा यो मां प्रियमिवातिथिम् । भोजयिष्यत्यकर्मण्यमप्रग्रहमनायकम् ३४ इमामन्धां च वृद्धां च मातरं ते तपस्विनीम् । कथं पुत्र भरिष्यामि कृपणां पुत्रगर्धिनीम् ३५ तिष्ठ मा मागमः पुत्र यमस्य सदनं प्रति । श्वो मया सह गन्तासि जनन्या च समेधितः ३६ उभावपि च शोकार्तावनाथौ कृपणौ वने । क्षिप्रमेव गमिष्यावस्त्वया हीनौ यमक्षयम् ३७ ततो वैवस्वतं दृष्ट्वा तं प्रवक्ष्यामि भारतीम् । क्षमतां धर्मराजो मे बिभृयात्पितरावयम् ३८ दातुमर्हति धर्मात्मा लोकपालो महायशाः । ईदृशस्य ममाक्षय्यामेकामभयदक्षिणाम् ३९ अपापोसि यथा पुत्र निहतः पापकर्मणा । तेन सत्येन गच्छाशु ये लोकास्त्वस्त्रयोधिनाम् ४० यां हि शूरा गतिं यान्ति सङ्ग्रामेष्वनिवर्तिनः । हतास्त्वभिमुखाः पुत्र गतिं तां परमां व्रज ४१ यां गतिं सगरः शैब्यो दिलीपो जनमेजयः । नहुषो धुन्धुमारश्च प्राप्तास्तां गच्छ पुत्रक ४२ या गतिः सर्वभूतानां स्वाध्यायात्तपसश्च या ।

---

असलेला असा कोण रे आतां पुत्रशोकभयानें व्याप्त झालेल्या मला उद्वर्तनपूर्वक स्नान घालील ! ३३. कंद, मुळें व फळें आणून आतां निश्चेष्ट, निराधार व अनाथ अशा मला कोण रे प्रिय अतिथीप्रमाणें भोजन घालील ! ३४. हे पुत्रा, अंध, वृद्ध, दीन आणि पुत्राकरितां हळहळणाऱ्या ह्या बिचाऱ्या तुझ्या मातेचें मी आतां कसें रे पोषण करूं ! ३५. हे पुत्रा, माझ्याकरितां थांब ; इतक्यांत यमसदनाला जाऊं नको; तूं माझ्यासहवर्तमान आणि आपल्या मातेसहवर्तमान उद्यां जाशील ३६. बा पुत्रा, शोकाकुल, अनाथ, दीन आणि वनामध्यें तुझा वियोग होऊन पडलेले आह्मी उभयतां आतां सत्वरच यमसदनाला चालते होऊं ३७. तेथें गेल्यावर " धर्मराजानें माझ्या अपराधाची क्षमा करावी आणि ह्या माझ्या पुत्रानें आतां आपल्या मातापितरांचें परिपालन करावें " अशी मी त्या यमधर्माला पाहून प्रार्थना करीन ३८. कारण, मी जर असा अनाथ आहें तर तो महायशस्वी धर्मात्मा लोकपाल मला अभयदान देईल ३९. हे पुत्रा, तूं निरपराधी असतांनाही पापकर्म करणाऱ्यानें तुझा वध केला आहे. हें जर खरें असेल तर अस्त्रयुद्धामध्यें पडणाऱ्यांना जे लोक प्राप्त होत असतात त्या लोकांना तूं सत्वर जा ४०. संग्रामापासून परावृत्त न होतां संमुख युद्ध करितां करितां वध पावलेल्या शूरांना जी गति प्राप्त होत असते त्या उत्कृष्ट गतीला, हे पुत्रा, तूं जा ४१. सगर, शैब्य, दिलीप, जनमेजय, नहुष आणि धुंधुमार ह्यांना जी गति प्राप्त झाली ती गति, हे पुत्रा, तुला प्राप्त होवो ४२. प्राणिमात्रांचा आश्रय जें ब्रह्म

भूमिदस्याहिताग्नेश्च एकपत्नीव्रतस्य च ४३ गोसहस्रप्रदातृणां गुरुसेवाभृतामपि। देहन्यासकृतां या च तां गतिं गच्छ पुत्रक ४४ न हि त्वस्मिन्कुले जातो गच्छत्यकुशलां गतिम्। स तु यास्यति येन त्वं निहतो मम बान्धवः ४५ एवं स कृपणं तत्र पर्यदेवयतासकृत्। तथोक्त्वा कर्तुमुदकं प्रवृत्तः सह भार्यया ४६ स तु दिव्येन रूपेण मुनिपुत्रः स्वकर्मभिः। स्वर्गमध्यारुहत्क्षिप्रं शक्रेण सह धर्मवित् ४७ आबभाषे च तौ वृद्धौ शक्रेण सह तापसः। आश्वस्य च मुहूर्तं तु पितरं वाक्यमब्रवीत् ४८ स्थानमस्मि महत्प्राप्तो भवतोः परिचारणात्। भवन्तावपि च क्षिप्रं मम मूलमुपैष्यतः ४९ एवमुक्त्वा तु दिव्येन विमानेन वपुष्मता। आरुरोह दिवं क्षिप्रं मुनिपुत्रो जितेन्द्रियः ५० स कृत्वाथोदकं तूर्णं तापसः सह भार्यया। मामुवाच महातेजाः कृताञ्जलिमुपस्थितम् ५१ अद्यैव जहि मां राजन्मरणे नास्ति मे व्यथा। यः शरेणैकपुत्रं मां त्वमकार्षीरपुत्रकम् ५२ त्वयापि च यदज्ञानान्निहतो मे स बा-

---

तें तुला प्राप्त होवो. वेदाध्ययन, तप, व पृथ्वी दान करणारे, आहिताग्नि, एकपत्नीव्रतानें वागणारे ४३, हजारों गायी देणारे, गुरुसेवा करणारे आणि ( महाप्रस्थानादि साधनांनीं परलोकप्राप्तीकरितां ) देहत्याग करणारे ह्यांना जी गति प्राप्त होत असते ती गति, हे पुत्रा, तुला प्राप्त होवो ४४. आमच्या ह्या कुलामध्यें उत्पन्न झालेल्या तुला वाईट गति प्राप्त होणार नाहीं. ज्यानें तुझा म्हणजे माझ्या पुत्राचा वध केला त्याला ती असद्गति प्राप्त होईल " ४५. ह्याप्रमाणें करुण स्वरानें एकसारिखा विलाप करणारा तो पिता तसें म्हणून आपल्या भार्येसहवर्तमान आपल्या पुत्राला संस्कारपूर्वक पाणी देण्यास तयार झाला ४६ व तो धर्मवेत्ता मुनिपुत्र तर ( तूं अस्त्रयुद्धामध्यें पडणाऱ्यांना जे लोक प्राप्त होत असतात त्या लोकांना जा असे शब्द पित्यानें उच्चारिल्यावर ) तत्क्षणींच दिव्य देह धारण करून आपल्याला नेण्याकरितां आलेल्या इंद्राबरोबर स्वर्गाला गेला ४७. नंतर इंद्रासहवर्तमान परत येऊन तो तपस्वी त्या वृद्ध मातापितरांशीं बोलूं लागला. क्षणभर थांबून तो आपल्या पित्याला म्हणाला ४८ " तुमच्या शुश्रूषेमुळें मला मोठें स्थान प्राप्त झालें आहे व तुह्मींही सत्वर माझ्यासमीप याल " ४९. ह्याप्रमाणें सांगितल्यानंतर तो तेजस्वी व जितेंद्रिय मुनिपुत्र दिव्य विमानांत बसून स्वर्गाला गेला ५०. इकडे तो महातेजस्वी वृद्ध तापस भार्येसहवर्तमान सत्वर पुत्राला उदक दिल्यावर हात जोडून उभा असलेल्या मला म्हणाला ५१ " हे राजा, माझा आजच वध कर. एका बाणानें तूं एक पुत्र असलेल्या मला निपुत्रिक करून टाकिलें आहेस

लकः । तेन त्वामपि शप्स्येहं सुदुःखमतिदारुणम् ५३ पुत्रव्यसनजं दुःखं यदेतन्मम सांप्रतम् । एवं त्वं पुत्रशोकेन राजन्काले करिष्यसि ५४ अज्ञानात्तु हतो यस्मात्क्षत्रियेण त्वया मुनिः । तस्मात्त्वां नाविशत्याशु ब्रह्महत्या नराधिप ५५ त्वामप्येतादृशो भावः क्षिप्रमेव गमिष्यति । जीवितान्तकरो घोरो दातारमिव दक्षिणाम् ५६ एवं शापं मयि न्यस्य विलप्य करुणं बहु । चितामारोप्य देहं तन्मिथुनं स्वर्गमभ्ययात् ५७ तदेतच्चिन्तयानेन स्मृतं पापं मया स्वयम् । तदा बाल्यात्कृतं देवि शब्दवेध्यनुकर्षिणा ५८ तस्यायं कर्मणो देवि विपाकः समुपस्थितः । अपथ्यैः सह संभुक्ते व्याधिरन्नरसे यथा ५९ तस्मान्मामागतं भद्रे तस्योदारस्य तद्वचः । इत्युक्त्वा स रुदंस्त्रस्तो भार्यामाह तु भूमिपः ६० यदहं पुत्रशोकेन संत्यजिष्यामि जीवितम् । चक्षुर्भ्यां त्वां न पश्यामि कौसल्ये त्वं हि मां स्पृश ॥ यमक्षयमनुप्राप्ता द्रक्ष्यन्ति नहि मानवाः ६१ यदि मां संस्पृ-

तेव्हां मला मरणाची भीति नाहीं ५२. ज्याअर्थी अज्ञानानें तूं माझ्या बालकाचा वध केलास त्याअर्थी मीही तुला अत्यंत दुःखद व भयंकर शाप देतों ५३. सांप्रत ज्याप्रमाणें हें पुत्रमरणजन्य दुःख मला प्राप्त झालें आहे त्याचप्रमाणें, हे राजा, तुला पुत्रशोकानें मृत्यु प्राप्त होईल ५४. ज्याअर्थी तूं क्षत्रियानें न समजून माझ्या मुनितुल्य पुत्राचा वध केला आहेस त्याअर्थी, हे प्रजाधिपते, तुला एकदम ब्रह्महत्येसमान पातक लागणार नाहीं ५५; परंतु, दिलेली दक्षिणा ज्याप्रमाणें दात्याला परलोकाच्या ठिकाणीं प्राप्त होते त्याप्रमाणें तुलाही अशाच प्रकारची प्राणनाशक घोर अवस्था एकाएकीं प्राप्त होईल " ५६. ह्याप्रमाणें करुण स्वरानें अतिशय विलाप केल्यावर त्या स्त्रीपुरुषांनीं मला शाप दिला आणि देह चितेवर ठेवून ते स्वर्गाला चालते झाले ५७. सारांश, हे देवि, शब्दवेध करून नतर शल्य काढून टाकणाऱ्या माझ्या हातून मूर्खपणामुळें जें हें पातक घडलें आहे त्याचें मला चिंतन करितां करितां स्मरण झालें आहे ५८; आणि, हे देवि, अपथ्य पदार्थांसहवर्तमान अन्नरस भक्षण केला असतां ज्याप्रमाणें त्या भक्षणाचें व्याधिरूप फल प्राप्त होतें त्याचप्रमाणें त्या कर्माचें हें फल मला प्राप्त झालें आहे ५९. हे कल्याणि, त्या श्रेष्ठ पुरुषाच्या त्या शापाचें हें फल मला प्राप्त झालें आहे ". ह्याप्रमाणें बोलून मरणाच्या भीतीनें त्रस्त झालेला तो राजा पुनरपि भार्येला ह्मणाला ६०. " हे कौसल्ये, ज्याअर्थी पुत्रशोकानें माझा आतां प्राण जाणार आहे त्याअर्थी डोळ्यांनीं तूं मला दिसत नाहींस. ह्यास्तव, तूं मला स्पर्श कर. कारण, यमसदनाला निघालेल्या मानवांना कांहीं दिसेनासें होतें ६१.

शेद्रामः सकृदन्वारभेत वा । धनं वा यौवराज्यं वा जीवेयमिति मे मतिः ६२ न तन्मे सदृशं देवि यन्मया राघवे कृतम् । सदृशं तत्तु तस्यैव यदनेन कृतं मयि ६३ दुर्वृत्तमपि कः पुत्रं त्यजेद्भुवि विचक्षणः । कश्च प्रव्राज्यमानो वा नासूयेत्पितरं सुतः ६४ चक्षुषा त्वां न पश्यामि स्मृतिर्मम विलुप्यते । दूता वैवस्वतस्यैते कौसल्ये त्वरयन्ति माम् ६५ अतस्तु किं दुःखतरं यदहं जीवितक्षये । न हि पश्यामि धर्मज्ञं रामं सत्यपराक्रमम् ६६ तस्यादर्शनजः शोकः सुतस्याप्रतिकर्मणः । उच्छोषयति वै प्राणान्वारि स्तोकमिवातपः ६७ न ते मनुष्या देवास्ते ये चारुशुभकुण्डलम् । मुखं द्रक्ष्यन्ति रामस्य वर्षे पञ्चदशे पुनः ६८ पद्मपत्रेक्षणं सुभ्रु सुदंष्ट्रं चारुनासिकम् । धन्या द्रक्ष्यन्ति रामस्य ताराधिपसमं मुखम् ६९ सदृशं शारदस्येन्दोः फुल्लस्य कमलस्य च । सुगन्धि मम रामस्य धन्या द्रक्ष्यन्ति ये मुखम् ७० निवृत्तवनवासं तमयोध्यां पुनरागतम् । द्रक्ष्यन्ति

---

जर मला एकदां प्रत्यक्ष अथवा परंपरेनें राम स्पर्श करील तर अथवा तो कोश किंवा यौवराज्य प्राप्त करून घेईल तर मी जगेन असें मला वाटतें ६२. हे देवि, मी जें राघवापाशीं वर्तन केलें तें मला योग्य नाहीं; परंतु, त्यानें मात्र जी माझ्याशीं वर्तणूक ठेविली ती फक्त त्यालाच योग्य आहे ६३. पुत्र दुराचारी जरी असला तरी कोण बरें समंजस पुरुष त्याचा त्याग करील आणि पिता हांकून देऊं लागला असतां कोणता बरें पुत्र त्याचा द्रोह करणार नाहीं ? ६४. असो. दृष्टीनें तूं मला दिसत नाहींस व मला स्मरण राहीनासें झालें आहे. ह्यावरून, हे कौसल्ये, यमधर्माचे हे दूत मला त्वरा करीत आहेत ( असें दिसतें ) ६५. सत्यपराक्रमी व धर्मवेत्त्या रामाचें मरणसमयींही मला दर्शन होत नाहीं ह्यापेक्षां आणखी दुःखकारक गोष्ट ती कोणती ! ६६. ज्याच्या कृतीला कोठें जोड नाहीं अशा त्या पुत्राचें दर्शन होत नसल्यामुळें उत्पन्न झालेला शोक, अल्प उदकाला शुष्क करून टाकणाऱ्या सूर्याच्या तापाप्रमाणें, माझे प्राण शोषून घेत आहे ६७. पंधराव्या वर्षीं मनोहर व शुभ कुंडलांनीं युक्त असलेलें रामाचें मुख जे पुनरपि अवलोकन करतील ते मनुष्य नव्हेत तर त्यांची देवांतच गणना केली पाहिजे ६८. कमलपत्राप्रमाणें नेत्र, उत्कृष्ट भिंवया, उत्तम दांत व मनोहर नासिका ह्यांनीं युक्त असलेलें रामाचें चंद्रतुल्य मुख जे अवलोकन करतील ते धन्य आहेत ६९. शरदृतूंतील चंद्राप्रमाणें आल्हादकारक व फुललेल्या कमळाप्रमाणें सुगंधि असें रामाचें मुख जे अवलोकन करतील ते धन्य होत ७०. ( पूर्वी वक्री झालेला असून नंतर ) मार्गाला लागलेल्या शुक्राप्रमाणें वनवास संपून अयोध्येला पुनरपि आलेल्या रामाला जे

सुखिनो रामं शुक्रं मार्गगतं यथा ७१ कौसल्ये चित्तमोहेन हृदयं सीदतेतराम् । वेदये न च संयुक्ताञ्शब्दस्पर्शरसानहम् ७२ चित्तनाशाद्विपद्यन्ते सर्वाण्येवेन्द्रियाणि हि । क्षीणस्नेहस्य दीपस्य संरक्ता रश्मयो यथा ७३ अयमात्मभवः शोको मामनाथमचेतनम् । संसाधयति वेगेन यथा कूलं नदीरयः ७४ हा राघव महाबाहो हा ममायासनाशन । हा पितृप्रिय मे नाथ हा ममासि गतः सुत ७५ हा कौसल्ये न पश्यामि हा सुमित्रे तपस्विनि । हा नृशंसे ममामित्रे कैकेयि कुलपांसनि ७६ इति मातुश्च रामस्य सुमित्रायाश्च संनिधौ । राजा दशरथः शोचञ्जीवितान्तमुपागमत् ७७ तथा तु दीनः कथयन्नराधिपः प्रियस्य पुत्रस्य विवासनातुरः । गतेऽर्धरात्रे भृशदुःखपीडितस्तदा जहौ प्राणमुदारदर्शनः ७८ [२५७३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुःषष्टितमः सर्गः ॥ ६४ ॥

अथ रात्र्यां व्यतीतायां प्रातरेवापरेहनि । बन्दिनः पर्युपातिष्ठंस्तत्पार्थिवनिवेशनम् १ सूताः परमसंस्कारा मागधाश्चोत्तमश्रुताः । गायकाः

---

पहातील ते सुखी आहेत ७१. हे कौसल्ये, चित्ताला भ्रम झाल्यामुळें माझा धीर फारच जात चालला आहे. कानांनीं मला ऐकूं येत नाहीं, त्वगिंद्रियाला स्पर्श समजत नाहीं आणि जिव्हेला रसही उमगत नाहींसा झाला आहे. ७२. तेल संपून गेलेल्या दिव्याचीं किरणें जशीं भस्मीभूत होऊन नाश पावतात तशीं चित्तभ्रमामुळें सर्वच इंद्रियें नाहींशीं होत आहेत ७३. ज्याप्रमाणें नदीचा वेग जोराजोरानें तीराचा नाश करितो त्याचप्रमाणें हा मानसिक शोक मूर्छित झालेल्या मज अनाथाचा जोराजोरानें नाश करीत आहे ७४. हे राघवा, हे महाबाहो, हे माझें दुःख नाहींसें करणाऱ्या, हे पितृप्रिया, हे नाथा, हे पुत्रा, तूं माझा असून मला टाकून गेला आहेस रे ! ७५. हे कौसल्ये, हे निरुपद्रवि सुमित्रे, तुह्मी मला दिसत नाहीं. हे दुष्टे, हे शत्रुरूपिणि, हे कैकेयि, हे कुलकलंकिनि, ( तुला धिक्कार असो )" ७६. ह्याप्रमाणें राममाता कौसल्या आणि सुमित्रा ह्यांचे संनिध शोक करीत करीत असलेला दशरथराजा मृत्यु पावला ७७. मध्यरात्र उलटून गेल्यावर प्रियपुत्राला हांकून दिल्यामुळें आतुर, दीन व अत्यंत दुःखानें पीडित झालेला तो महाबुद्धिमान् दशरथराजा बोलतां बोलतां मृत्यु पावला ७८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६४ ॥

तदनंतर रात्र निघून गेल्यावर दुसऱ्या दिवशीं सकाळींच त्या राजवाड्यामध्यें भाट

श्रुतिशीलाश्च निगदन्तः पृथक्पृथक् २ राजानं स्तुवतां तेषामुदात्ताभिहिताशिषाम् । प्रासादाभोगविस्तीर्णः स्तुतिशब्दो ह्यवर्तत ३ ततस्तु स्तुवतां तेषां सूतानां पाणिवादकाः । अपदानान्युदाहृत्य पाणिवादानवादयन् ४ तेन शब्देन विहगाः प्रतिबुद्धाश्च सस्वनुः । शाखास्थाः पञ्जरस्थाश्च ये राजकुलगोचराः ५ व्याहृताः पुण्यशब्दाश्च वीणानां चापि निःस्वनाः । आशीर्गेयं च गाथानां पूरयामास वेश्म तत् ६ ततः शुचिसमाचाराः पर्युपस्थानकोविदाः । स्त्रीवर्षवरभूयिष्ठा उपतस्थुर्यथा पुरा ७ हरिचन्दनसंपृक्तमुदकं काञ्चनैर्घटैः । आनिन्युः स्नानशिक्षाज्ञा यथाकालं यथाविधि ८ मङ्गलालम्भनीयानि प्राशनीयान्युपस्करान् । उपानिन्युस्तथा पुण्याः कुमारीबहुलाः स्त्रियः ९ सर्वलक्षणसंपन्नं सर्वं विधिवदर्चितम् । सर्वं सगुणलक्ष्मीवत्तद्बभूवाभिहारिकम् १० ततः सूर्योदयं यावत्सर्वं परिसमु-

---

आले १ आणि महाविद्वान् पुराणिक, उत्कृष्ट रीतीनें वंशपरंपरा श्रवण केलेले वंशस्तावक, मागध आणि वादनकलेंत निपुण असणारे गवयी वगैरे वेगवेगळी राजाची स्तुति करूं लागले २. ह्याप्रमाणें उच्च स्वरानें आशीर्वाद देऊन ते राजाची स्तुति करूं लागले असतां त्यांच्या स्तुतीचा ध्वनि प्रतिध्वनीच्या द्वारानें प्रासादामध्यें पसरला ३. तदनंतर ते सूतप्रभृति स्तुति करीत असतांनाच पाणिवादक राजाच्या चोंहीकडे चरित्रांचा व अद्भुत कर्मांचा उल्लेख करून हातांनीं ताल धरूं लागले ४. राजवाड्यामध्यें असणारे पिंजऱ्यांतील व वृक्षशाखांवरील पक्षी त्या ध्वनींच्या योगानें जागे होऊन शब्द करूं लागले ५. पौराणिकप्रभृतींनीं उच्चारिलेले मंगलकारक ध्वनि, वीण्यांचे अवाज आणि गवयी लोकांचे आशीर्वादप्रधान गायन ह्यांच्या योगानें तें गृह भरून गेलें ६. तदनंतर स्त्रिया आणि षंढ ह्यांचीच संख्या ज्यांच्यामध्यें पुष्कळ आहे असे सेवेविषयीं निपुण व शुद्ध आचरण करणारे सेवक पूर्वीप्रमाणें तेथें आले ७. तसेंच स्नानविधि जाणणारे सेवक केशर घातलेलें उदक सोन्याच्या घागरींतून वेळेवर आणि योग्यप्रकारानें आणून ठेऊं लागले ८. ज्यांत मुलींची संख्याच पुष्कळ आहे अशा पवित्र स्त्रिया, मंगलसिद्ध्यर्थ स्पर्श करण्यास योग्य असलेल्या गाई वगैरे, मुखशुद्धीनंतर प्राशन करण्यास योग्य असलेलें नारळाचें उदक वगैरे आणि दर्पण, वस्त्रें, भूषणें इत्यादि-सामान घेऊन आल्या ९. सारांश, प्रातःकालीं राजाकडे मंगलसिद्ध्यर्थ आणावयाचे जे पदार्थ ते सर्व कांहीं तेथें आणून ठविले होते. ते सर्व पदार्थ सर्वलक्षणांनीं युक्त होते, यथायोग्यप्रकारें आदरपूर्वक ते ठेविलेले होते व ते सर्वही गुणसंपन्न असून वैभवदायक होते १०. तदनंतर सूर्योदयापर्यंत राजाचें दर्शन न झाल्यामुळें ते सर्वही

त्सुकम् । तस्थावनुपसंप्राप्तं किंस्विदित्युपशङ्कितम् ११ अथ याः कोशलेन्द्रस्य शयनं प्रत्यनन्तराः । ताः स्त्रियस्तु समागम्य भर्तारं प्रत्यबोधयन् १२ अथाप्युचितवृत्तास्ता विनयेन नयेन च । नह्यस्य शयनं स्पृष्ट्वा किंचिदप्युपलेभिरे १३ ताः स्त्रियः स्वप्नशीलज्ञाश्चेष्टां संचलनादिषु । ता वेपथुपरीताश्च राज्ञः प्राणेषु शङ्किताः १४ प्रतिस्रोतस्तृणाग्राणां सदृशं संचकाशिरे १५ अथ संदेहमानानां स्त्रीणां दृष्ट्वा च पार्थिवम् । यत्तदाशाङ्कितं पापं तदा जज्ञे विनिश्चयः १६ कौसल्या च सुमित्रा च पुत्रशोकपराजिते । प्रसुप्ते न प्रबुद्ध्येते यथाकालसमन्विते १७ निष्प्रभा सा विवर्णा च सन्ना शोकेन संनता । न व्यराजत कौसल्या तारेव तिमिरावृता १८ कौसल्यानन्तरं राज्ञः सुमित्रा तदनन्तरम् । न स्म विभ्राजते देवी शोकाश्रुलुलितानना १९ ते च दृष्ट्वा तदा सुप्ते उभे देव्यौ च तं नृपम् । सुप्तमे-

---

सेवक " हें काय " अशी शंका येऊन मोठ्या उत्सुकतेनें उभे राहिले ११. तदनंतर कोसलराज दशरथाच्या शय्येजवळच ज्या स्त्रिया होत्या त्या जवळ येऊन भर्त्याला उठवूं लागल्या १२; परंतु, विनय आणि वर्तणूक ह्यांच्या योगानें ज्यांना राजाला स्पर्श वगैरे करण्याची योग्यता आलेली होती अशा स्त्रियांनीं त्याची शय्या चाचपून पाहिली असतांही कांहींएक हालचाल त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली नाहीं १३. तेव्हां निद्रेची स्थिति जाणणाऱ्या त्या स्त्रिया चलन पावणाऱ्या नाड्या तपासून पाहूं लागल्या असतां कांहीं चलनवलन त्यांच्या आढळण्यांत येईना. तेव्हां राजाच्या प्राणांविषयीं शंका येऊन त्या थरथर कांपूं लागल्या १४. आणि प्रवाहाचे संमुख असलेल्या वेतसप्रभृतींच्या अग्रांप्रमाणें त्या आपला कंप दर्शवूं लागल्या १५. नंतर राजाकडे पाहिल्यावर तर संशययुक्त झालेल्या त्या स्त्रियांना ज्या वाईट गोष्टीची शंका आली होती तिचा निश्चयच झाला १६. कौसल्या व सुमित्रा ह्या पुत्रशोकानें व्याकूल झाल्यामुळें अगदीं मेल्याप्रमाणें झोंप लागून पडल्या होत्या त्या जाग्या झाल्या नाहींत १७. शोकानें जर्जर झालेली व हात पाय पोटाशीं धरून पडलेली कौसल्या काळवंडून गेलेली होती आणि त्यामुळें अंधकारानें व्याप्त झालेल्या तारेप्रमाणें निस्तेज दिसत होती १८. दुःखाश्रूंचे ओघळ तोंडावर आल्यामुळें राजपत्नी सुमित्रा पूर्वीप्रमाणें झळकत नव्हती. कौसल्या तर सुमित्रेपेक्षांही निस्तेज झाली होती आणि राजाच्या मुखावर तर कांहींच तेज राहिलें नव्हतें १९. त्या उभयतां राजपत्न्या कौसल्या आणि सुमित्रा झोंपी गेल्या असून राजाचे तर निद्रावस्थेमध्येंच प्राण गेलेले आहेत असें आढळून आल्यावर तें सर्व अंतःपुर गतप्राण झाल्यासारिखें ( कांहीं वेळ )

वोद्गतप्राणमन्तःपुरमदृश्यत २० ततः प्रचुक्रुशुर्दीनाः सुस्वरं ता वराङ्गनाः। करेणव इवारण्ये स्थानप्रच्युतयूथपाः २१ तासामाक्रन्दशब्देन सहसोद्गतचेतने । कौसल्या च सुमित्रा च त्यक्तनिद्रे बभूवतुः २२ कौसल्या च सुमित्रा च दृष्ट्वा स्पृष्ट्वा च पार्थिवम् । हा भर्तेति परिक्रुश्य पेततुर्धरणीतले २३ सा कोशलेन्द्रदुहिता चेष्टमाना महीतले । न भ्राजते रजोध्वस्ता तारेव गगनच्युता २४ नृपे शान्तगुणे जाते कौसल्यां पतितां भुवि । अपश्यंस्ताः स्त्रियः सर्वा हतां नागवधूमिव २५ ततः सर्वा नरेन्द्रस्य कैकेयीप्रमुखाः स्त्रियः । रुदत्यः शोकसंतप्ता निपेतुर्गतचेतनाः २६ ताभिः स बलवान्नादः क्रोशन्तीभिरनुद्रुतः । येन स्फीतीकृतो भूयस्तद्गृहं समनादयत् २७ तत्परित्रस्तसंभ्रान्तपर्युत्सुकजनाकुलम् । सर्वतस्तुमुलाक्रन्दं परितापार्तबान्धवम् २८ सद्योनिपतितानन्दं दीनं विक्लवदर्शनम् । बभूव नरदेवस्य सद्म दिष्टान्तमीयुषः २९ अतीतमाज्ञाय तु पार्थिवर्षभं यशस्विनं

---

दिसूं लागलें २०. तदनंतर निवासस्थानांतून कळपाचें रक्षण करणारा महान् गज नाहींसा झाला असतां हत्तिणी ज्याप्रमाणें अरण्यांमध्यें आक्रोश करूं लागतात त्याचप्रमाणें त्या अनाथ झालेल्या श्रेष्ठ स्त्रिया उच्चस्वरानें आक्रोश करूं लागल्या २१. त्यांच्या रोदनध्वनीनें कौसल्या आणि सुमित्रा एकाएकीं दचकून जाग्या झाल्या २२ आणि राजाला पाहून व स्पर्श करून त्या कौसल्या सुमित्रा "हे नाथ" अशी किंकाळी फोडून भूतलावर पडल्या २३. तेव्हां आकाशांतून च्युत झालेली तारा ज्याप्रमाणें झळकेनाशी होते त्याप्रमाणें कोसलराजकन्या कौसल्या धुळीनें भरून जाऊन भूतलावर धडपडूं लागली असतां झळकेनाशी झाली २४. राजा गतप्राण झाल्यानंतर भूमीवर पडलेली ती कौसल्या सर्व स्त्रियांना मारून टाकलेल्या नागिणीप्रमाणें दिसूं लागली २५. तेव्हां राजाच्या कैकयीप्रभृति सर्व स्त्रिया शोकाकुल होऊन रडूं लागल्या आणि कांहीं सुचेनासें होऊन तिकडे लोटल्या २६. त्या मागून आलेल्या स्त्रिया आक्रोश करूं लागल्या असतां प्रथम तेथें सुरू झालेल्या प्रचंड ध्वनीमध्यें अधिक भर पडली व त्याच्या योगानें वृद्धिंगत झालेल्या त्या नादानें तें घर दणाणून गेलें २७. त्या घरामध्यें जिकडे तिकडे प्रचंड आक्रोश होऊं लागला. आंतील सर्व लोक शोकाकुल झाले आणि ( रडारड ऐकिल्यामुळें ) भयभीत होऊन व गांधळून जाऊन ( पूर्वी काय वृत्तांत झाला आहे हें कळण्याकरितां ) उत्सुक झालेल्या लोकांची तेथें गर्दी झाली १८. सारांश, गतप्राण होऊन पडलेल्या राजाचें तें गृह एकाएकीं आनंद रहित, दीन व भयाण असें दिसूं लागलें २९; आणि तो यशस्वी राजा-

तं परिवार्य पत्नयः । भृशं रुदन्त्यः करुणं सुदुःखिताः प्रगृह्य बाहू व्यलपन्ननाथवत् ३० [ २६०३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीय आदिकाव्येयोध्याकाण्डे पञ्चषष्टितमः सर्गः ॥ ६५ ॥

तमग्निमिव संशान्तमम्बुहीनमिवार्णवम् । गतप्रभमिवादित्यं स्वर्गस्थं प्रेक्ष्य भूमिपम् १ कौसल्या बाष्पपूर्णाक्षी विविधं शोककर्शिता । उपगृह्य शिरो राज्ञः कैकेयीं प्रत्यभाषत २ सकामा भव कैकेयि भुङ्क्ष्व राज्यमकण्टकम् । त्यक्त्वा राजानमेकाग्रा नृशंसे दुष्टचारिणि ३ विहाय मां गतो रामो भर्ता च स्वर्गतो मम । विपथे सार्थहीनेव नाहं जीवितुमुत्सहे ४ भर्तारं तु परित्यज्य का स्त्री दैवतमात्मनः । इच्छेज्जीवितुमन्यत्र कैकेय्यास्त्यक्तधर्मणः ५ न लुब्धो बुध्यते दोषान्किंपाकमिव भक्षयन् । कुब्जानिमित्तं कैकेय्या राघवाणां कुलं हतम् ६ अनियोगे नियुक्तेन राज्ञा रामं विवासितम् । सभार्यं जनकः श्रुत्वा परितप्स्यत्यहं यथा ७

---

धिराज परलोकास गेला असें समजून आल्यावर अत्यंत दुःखित झालेल्या त्या स्त्रियांनीं त्याच्या भोंवतालीं गराडा घातला आणि अत्यंत करुणस्वरानें रोदन करणाऱ्या त्या स्त्रिया कपाळावर हात देऊन अनाथाप्रमाणें रडूं लागल्या ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पासष्टावा सर्ग समाप्त झाला॥६५॥

विझून गेलेल्या अग्नीप्रमाणें, उदकहीन झालेल्या समुद्राप्रमाणें आणि प्रभारहित झालेल्या सूर्याप्रमाणें स्वर्गस्थ झालेल्या त्या राजाला अवलोकन करून १ अश्रूंनीं नेत्र भरून आलेली व अनेक प्रकारांनीं शोकानें जर्जर झालेली कौसल्या राजाचें मस्तक मांडीवर घेऊन कैकेयीला ह्मणाली २ "हे कैकेयि, आतां आपलें मनोरथ परिपूर्ण करून घे. हे पापिणि, हे दुराचारिणि, राजाला मारून तूंच एकटी आतां ह्या निष्कंटक झालेल्या राज्याचा उपभोग घे ३. राम मला सोडून वनांत गेला आणि माझा भर्ताही स्वर्गाला गेला. तेव्हां पांथसमुदायांतून अरण्यांत चुकलेल्या स्त्रीप्रमाणें ( माझी अवस्था झाली असल्यामुळें ) मला आतां जगण्याची इच्छा नाहीं ४. आपलें दैवत जो भर्ता त्याला सोडून धर्माचा त्याग केलेल्या कैकेयीवांचून इतर कोणती बरें स्त्री जिवंत रहाण्याची इच्छा करील ? ५. धनाला लुब्ध होऊन दुसऱ्याला विष घालण्यास उद्युक्त होणाऱ्याला ज्याप्रमाणें दोष समजत नाहींत त्याचप्रमाणें ( राज्यवैभवाला लुब्ध होऊन रामाला वनवासांत पाठविण्याचा परिणाम काय होईल ह्याचा विचार न करितां ) कैकेयीनें कुबडीच्या प्रेरणेमुळें रघुवंशजांच्या कुलाचा घात केला ६. अयोग्य कृत्य करण्यास प्रवृत्त केलेल्या राजानें रामाला भार्येसहवर्तमान वनामध्यें हांकून

स मामनाथां विधवां नाद्य जानाति धार्मिकः । रामः कमलपत्राक्षो जीवन्नाशमितो गतः ८ विदेहराजस्य सुता तथा चारुतपस्विनी । दुःखस्यानुचिता दुःखं वने पर्युद्विजिष्यति ९ नदतां भीमघोषाणां निशासु मृगपक्षिणाम् । निशम्यमाना संत्रस्ता राघवं संश्रयिष्यति १० वृद्धश्चैवाल्पपुत्रश्च वैदेहीमनुचिन्तयन् । सोपि शोकसमाविष्टो नूनं त्यक्ष्यति जीवितम् ११ साहमद्यैव दिष्टान्तं गमिष्यामि पतिव्रता । इदं शरीरमालिङ्ग्य प्रवेक्ष्यामि हुताशनम् १२ तां ततः संपरिष्वज्य विलपन्तीं तपस्विनीम् । व्यपनिन्युः सुदुःखार्तां कौसल्यां व्यावहारिकाः १३ तैलद्रोण्यां तदामात्याः संवेश्य जगतीपतिम् । राज्ञः सर्वाण्यथादिष्टाश्चक्रुः कर्माण्यनन्तरम् १४ न तु संकालनं राज्ञो विना पुत्रेण मन्त्रिणः । सर्वज्ञाः कर्तुमीषुस्ते ततो रक्षन्ति भूमिपम् १५ तैलद्रोण्यां शायितं तं सचिवैस्तु नराधिपम् । हा मृतोयमिति ज्ञात्वा स्त्रियस्ताः पर्यदेवयन् १६ बाहनु-

---

विलें हें ऐकून जनकही माझ्याप्रमाणेंच तळमळूं लागेल ७. जिवंत असूनही नाश पावल्याप्रमाणें येथून माझ्या दृष्टीआड गेलेला तो कमलनयन धर्मनिष्ठ राम मी आज अनाथ व विधवा झालें आहें हें जाणीत नाहीं ८. असो. दुःखाचा जिला कधीं अनुभव नाहीं अशी ती भर्तृसेवारूप उत्कृष्ट तपश्चर्या करणारी विदेहराजकन्या सीता वनामध्यें दुःख प्राप्त झालें असतां अगदीं गांगरून जाईल ९ आणि भयंकर गर्जना करणारे पशुपक्षी रात्रीं गर्जना करूं लागले असतां त्यांची गर्जना ऐकून ती भयभीत होईल आणि रामाचें अवलंबन करील १०. सीता हीच ज्याला संतति आहे असा तो वृद्ध जनक सीतेविषयीं विचार करूं लागला ह्मणजे शोकाकुल होईल आणि खरोखर प्राणत्याग करील ११. मी तर पतिव्रता असल्यामुळें आजच मृत्यूची वाट धरणार आणि ह्या राजशरीराला आलिंगन देऊन अग्नीमध्यें प्रवेश करणार " १२. ह्याप्रमाणें ती बिचारी कौसल्या अत्यंत दुःखाकुल होऊन विलाप करूं लागली असतां राज्यव्यवहार पहाण्याकरितां नमलेल्या अमात्यांनीं ( अंतःपुरांतील स्त्रियांकडून ) दशरथापासून तिला सोडविलें आणि तेथून दूर नेलें १३. तदनंतर तेलानें भरलेल्या एका कढईमध्यें अमात्यांनीं त्या भूपतीला निजविलें आणि वसिष्ठादिकांची आज्ञा झाल्यावर राजाच्या सर्व पुढल्या कर्मांची व्यवस्था ते करूं लागले १४. त्या सर्वज्ञ मन्त्र्यांना पुत्रावांचून राजाचें प्रेत नेणें योग्य न वाटल्यामुळें ते त्या भूपतीला तेलाच्या कढईंत ठेवून रक्षण करीत बसले १५ व अमात्यांनीं त्या राजाला तेलाच्या कढईंत निजविलें असें कळून आल्यावर त्या स्त्रिया " हाय हाय ! हा मृत्यु पावला "

च्छ्रित्य कृपणा नेत्रप्रस्रवणैर्मुखैः । रुदत्यः शोकसंतप्ताः कृपणं पर्यदेवयन् १७ हा महाराज रामेण संततं प्रियवादिना । विहीनाः सत्यसंधेन किमर्थं विजहासि नः १८ कैकेय्या दुष्टभावाया राघवेण विवर्जिताः । कथं सपत्न्या वत्स्यामः समीपे विधवा वयम् १९ स हि नाथः स चास्माकं तव च प्रभुरात्मवान् । वनं रामो गतः श्रीमान्विहाय नृपतिश्रियम् २० त्वया तेन च वीरेण विना व्यसनमोहिताः । कथं वयं निवत्स्यामः कैकेय्या च विदूषिताः २१ यया च राजा रामश्च लक्ष्मणश्च महाबलः । सीतया सह संत्यक्ताः सा कमन्यं न हास्यति २२ ता बाष्पेण च संवीताः शोकेन विपुलेन च । व्याचेष्टन्त निरानन्दा राघवस्य वरस्त्रियः २३ निशा नक्षत्रहीनेव स्त्रीव भर्तृविवर्जिता । पुरी नाराजतायोध्या हीना राज्ञा महात्मना २४ बाष्पपर्याकुलजना हाहाभूतकुलाङ्गना । शून्यचत्वरवेश्मान्ता न बभ्राज यथापुरम् २५ गते तु शोकात्त्रिदिवं नराधिपे महीत-

---

असा विलाप करूं लागल्या १६. त्यांच्या मुखांवर अश्रूंच्या धारा चालल्या आणि शोकाकुल व दीन झालेल्या त्या स्त्रिया हात उभारून रडत रडत करुण स्वरानें विलाप करूं लागल्या कीं १७, "हे महाराजा, नेहमीं प्रिय भाषण करणाऱ्या सत्यप्रतिज्ञ अशा रामाचा वियोग झाला असतांही तूं आमचा कशाकरितां त्याग करीत आहेस ! १८. जिचा उद्देश दुष्ट आहे अशा ह्या कैकयी सवतीच्या समीप रामरहित झालेल्या आह्मीं विधवांनीं कसें बरें रहावें ! १९. तो राम आमचा नाथ असून आपल्या व आमच्या उभयतांच्या जीविताचा प्रभुही तोच आहे; असें असतांनाही ज्याअर्थीं तो जितेंद्रिय व वैभवशाली राम राज्यलक्ष्मीचा त्याग करून वनामध्यें चालता झाला २० त्याअर्थीं कैकयीनें तिरस्कार केलेल्या आणि शोकानें व दुःखानें मोहित झालेल्या आह्मी आपल्यावांचून आणि त्या वीरावांचून कशा बरें राहूं ! २१. राजा, राम व महाबलाढ्य लक्ष्मण ह्या त्रिवर्गांचा सीतेसहवर्तमान जिनें त्याग केला ती दुसऱ्या कोणाचा बरें त्याग करण्यास मागें पुढें पहाणार आहे ! " २२. ह्याप्रमाणें अतिशय शोकानें व अश्रूंनीं व्याप्त झालेल्या दशरथराजाच्या त्या आनंदरहित श्रेष्ठ स्त्रिया तळमळ करूं लागल्या २३. तेव्हां महात्म्या राजानें रहित झालेली ती अयोध्यानगरी नक्षत्ररहित रात्रीप्रमाणें अथवा भर्तृरहित स्त्रीप्रमाणें शोभेनाशी झाली २४. सारांश, त्या नगरींतील लोक दुःखाश्रूंनीं व्याप्त होऊन गेले, कुलस्त्रिया हाहाकार करूं लागल्या, अंगणांतून व घरांतून सडासंमार्जन होईनासें झालें आणि ह्यामुळें ती नगरी पूर्वीप्रमाणें शोभेनाशी झाली २५. पुत्रशोकामुळें राजा स्वर्गाला जाऊन राजस्त्रिया भूतलावर पडल्या अस-

लब्ध्यासु नृपाङ्गनासु च। निवृत्तचारः सहसा गतो रविः प्रवृत्तचारा रजनी ह्युपस्थिता २६ ऋते तु पुत्राद्दहनं महीपतेर्नारोचयंस्ते सुहृदः समागताः। इतीव तस्मिञ्छयने न्यवेशयन्विचिन्त्य राजानमचिन्त्यदर्शनम् २७ गतप्रभा द्यौरिव भास्करं विना व्यपेतनक्षत्रगणेन शर्वरी । पुरी बभासे रहिता महात्मना कण्ठास्रकण्ठाकुलमार्गचत्वरा २८ नराश्च नार्यश्च समेत्य संघशो विगर्हमाणा भरतस्य मातरम् । तदा नगर्यां नरदेवसंक्षये बभूवुरार्ता न च शर्म लेभिरे २९ [२६३२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षट्षष्टितमः सर्गः ॥ ६६ ॥

आक्रन्दिता निरानन्दा सास्रकण्ठजनाविला । अयोध्यायामवतता सा व्यतीयाय शर्वरी १ व्यतीतायां तु शर्वर्यामादित्यस्योदये ततः। समेत्य राजकर्तारः सभामीयुर्द्विजातयः २ मार्कण्डेयोथ मौद्गल्यो वामदेवश्च कश्यपः। कात्यायनो गौतमश्च जाबालिश्च महायशाः ३ एते द्विजाः सहामात्यैः पृथग्वाचमुदीरयन् । वसिष्ठमेवाभिमुखाः श्रेष्ठं राजपुरोहितम् ४ अतीता

---

तांना सूर्य एकाएकीं आपला संचार आटोपून चालता झाला आणि रात्र पडून तिनें आपला अंधकाराचा प्रचार करण्यास सुरवात केली २६. तेथें आलेल्या सुहृदांना पुत्रावांचून राजाचें दहन करणें बरोबर वाटलें नाहीं. ह्मणून त्यांनीं त्या अचिंत्यज्ञानवान् राजाला तैलकटाहरूप शय्येवर निजविलें २७. त्या नगरीला महात्म्या राजाचा वियोग झाला असतां ज्यांच्या नेत्रांतील अश्रूंच्या धारा कंठापर्यंत आलेल्या आहेत अशा लोकांनीं तिच्यांतील मार्ग व चवाठे गजबजून गेले आणि सूर्यरहित आकाशाप्रमाणें अथवा नक्षत्ररहित रात्रीप्रमाणें ती नगरी निस्तेज दिसूं लागली २८; त्यावेळीं अयोध्यानगरींत त्या राजवाड्यांमध्यें स्त्रिया व पुरुष ह्यांच्या झुंडींच्या झुंडी लोटल्या आणि भरताच्या मातेची निंदा करूं लागलेल्या त्या सुखित न होतां दुःखित झाल्या २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सहासष्टावा सर्ग समाप्त झाला॥६६॥

आक्रोशयुक्त, आनंदरहित व अश्रूनीं कंठ दाटून आलेल्या लोकांनीं भरलेली अशी ती रात्र अयोध्येमध्यें फारच लांब वाटून शेंवटीं निघून गेली १. तेव्हां रात्र संपून सूर्योदय झाल्यावर राजकार्यधुरंधर द्विज जुळून सभेमध्यें आले २. मार्कंडेय, मौद्गल्य, वामदेव, कश्यप, कात्यायन, गौतम आणि महायशस्वी जाबालि ३ हे द्विज अमात्यांसहवर्तमान श्रेष्ठ राजपुरोहित वसिष्ठमुनींकडे तोंड करून बसले आणि राजकार्यासंबंधानें वेगवेगळीं बोलणीं बोलूं लागले ४. ( ते ह्मणाले ) " पुत्रशोकानें हा

शर्वरी दुःखं या नो वर्षशतोपमा । अस्मिन्पञ्चत्वमापन्ने पुत्रशोकेन पार्थिवे ५ स्वर्गस्थश्च महाराजो रामश्चारण्यमाश्रितः । लक्ष्मणश्चापि तेजस्वी रामेणैव गतः सह ६ उभौ भरतशत्रुघ्नौ केकयेषु परंतपौ । पुरे राजगृहे रम्ये मातामहनिवेशने ७ इक्ष्वाकूणामिहाद्यैव कश्चिद्राजा विधीयताम् । अराजकं हि नो राष्ट्रं विनाशं समवाप्नुयात् ८ नाराजके जनपदे विद्युन्माली महास्वनः । अभिवर्षति पर्जन्यो महीं दिव्येन वारिणा ९ नाराजके जनपदे बीजमुष्टिः प्रकीर्यते । नाराजके पितुः पुत्रो भार्या वा वर्तते वशे १० अराजके धनं नास्ति नास्ति भार्याप्यराजके । इदमत्याहितं चान्यत्कुतः सत्यमराजके ११ नाराजके जनपदे कारयन्ति सभां नराः । उद्यानानि च रम्याणि हृष्टाः पुण्यगृहाणि च १२ नाराजके जनपदे यज्ञशीला द्विजातयः । सत्राण्यन्वासते दान्ता ब्राह्मणाः संशितव्रताः १३ नाराजके जनपदे महायज्ञेषु यज्वनः । ब्राह्मणा वसुसंपूर्णा विसृजन्त्याप्तदक्षिणाः १४ नाराजके जनपदे प्रहृष्टनटनर्तकाः । उत्सवाश्च समाजाश्च वर्धन्ते राष्ट्रव-

---

राजा मृत्यु पावल्यामुळें दुःखानें आम्हांला शंभर वर्षांसारिखी झालेली ती रात्र एकदाची निघून गेली ५. महाराज दशरथ स्वर्गवासी झाला आहे, राम अरण्यांत गेला आहे, तेजस्वी लक्ष्मणही रामाबरोबरच चालता झाला आहे ६ आणि उभयतां शत्रुतापन भरतशत्रुघ्न केकय देशांतील राजधानीमध्यें रमणीय राजवाड्यांत आपल्या अजोळीं आहेत ७. तेव्हां इक्ष्वाकुवंशजांपकीं आजच्या आज कोणी तरी राजा करावा. कारण, हें आपलें राष्ट्र असेंच अराजक राहूं दिलें असतां नाश पावेल ८. अराजक देशामध्यें विद्युल्लतारूप मालांनीं युक्त व मोठी गर्जना करणारा पर्जन्य दिव्य उदकानें पृथ्वीवर वृष्टि करीत नाहीं ९. अराजक राष्ट्रामध्यें मूठभर बीं देखील कोणी पेरीत नाहीं व राज्य अराजेक झालें असतां पुत्र पित्याच्या अथवा स्त्री भर्त्याच्या अधीन रहात नाहीं १०. अराजकामध्यें धन नाहीं आणि अराजकामध्यें भार्याही नाहीं हें एक मोठेंच भय आहे. मग पितापुत्ररूप आणि स्त्रीपुरुषरूप सत्याला जर ठिकाण नाहीं तर क्रयविक्रयादिरूप सत्याची गोष्ट अराजकामध्यें पाहिजे कशाला? ११. राष्ट्र अराजक झालें असतां लोक सभा भरवीत नाहींत, रम्य बागा तयार करीत नाहींत व आनंदित होऊन पुण्यसंपादक अशा धर्मशाळा वगैरेही बांधीत नाहींत १२. अराजक देशामध्यें यज्ञयाग करणारे द्विज नाहींसे होतात आणि कडकडीत व्रतानें चालणारे जितेंद्रिय ब्राह्मणही सत्रांचें अनुष्ठान करीनासे होतात १३. अराजक देशामध्यें मोठमोठ्या यागांमध्यें धनसंपन्न ब्राह्मण शास्त्रविहित दक्षिणा ऋत्विजांना देत नाहींत १४.

र्धनाः १५ नाराजके जनपदे सिद्धार्था व्यवहारिणः । कथाभिरभिरज्यन्ते कथाशीलाः कथाप्रियैः १६ नाराजके जनपदे तूद्यानानि समागताः । सायाह्ने क्रीडितुं यान्ति कुमार्यो हेमभूषिताः १७ नाराजके जनपदे धनवन्तः सुरक्षिताः । शेरते विवृतद्वाराः कृषिगोरक्षजीविनः १८ नाराजके जनपदे वाहनैः शीघ्रवाहिभिः । नरा निर्यान्त्यरण्यानि नारीभिः सह कामिनः १९ नाराजके जनपदे बद्धघण्टा विषाणिनः । अटन्ति राजमार्गेषु कुञ्जराः षष्टिहायनाः २० नाराजके जनपदे शरान्संततमस्यताम् । श्रूयते तलनिर्घोष इष्वस्त्राणामुपासने २१ नाराजके जनपदे वणिजो दूरगामिनः । गच्छन्ति क्षेममध्वानं बहुपण्यसमाचिताः २२ नाराजके जनपदे चरत्य-

---

अराजक देशामध्यें आनंदित नट व सूत्रधार ज्यामध्यें आहेत असे देवादिकांचे, राष्ट्राच्या अभ्युदयाला कारण होणारे, उत्सव आणि समाज वृद्धिंगत होत नाहींत १५. अराजक राष्ट्रामध्यें कांहीं विषयाला उद्देशून लोक वादविवाद करूं लागले असतां त्यांच्या मुद्याचा निर्णय होत नाहीं आणि कथा ऐकण्याची ज्यांना गोडी आहे अशा लोकांचें, कथाप्रिय लोकांनीं कथन केलेल्या कथांच्या योगानें, चित्तरंजन होईनासें होतें १६. अराजक देशामध्यें सुवर्ण भूषणांनीं भूषित झालेल्या कुमारिका एकत्र जुळून सायंकाळीं बागांतून क्रीडा करण्याला जात नाहींत १७. अराजक देशामध्यें धनिक लोक सुरक्षित नसतात आणि शेतकी व गोरक्षण ह्यांच्यावर उपजीविका करणाऱ्या लोकांनाही दार उघडें टाकून बाहेर पडतां येत नाहीं १८. अराजक राष्ट्रामध्यें विषयी पुरुष सत्वर नेणाऱ्या वाहनांच्या योगानें स्त्रियांसहवर्तमान वनांत जात नाहींत १९. अराजक देशामध्यें उत्कृष्ट दंतांनीं युक्त व घंटा बांधलेले असे साठ वर्षांचे ( तरुण ) हत्ति राजमार्गावरून फिरत नाहींत २०. अराजक देशामध्यें बाण व अस्त्रें ह्यांचा अभ्यास सुरू राहून एकसारिखे बाण मारून पहाणाऱ्या लोकांचा तलनिर्घोष ऐकण्यांत येत नाहीं २१. अराजक देशामध्यें दूर प्रदेशाला निघालेले उदमी पुष्कळ माल बरोबर घेऊन मार्गानें सुखरूप जात नाहींत २२. अराजक देशामध्यें चालतां चालतां जेथें सायंकाळ होईल

---

१ देवादिकांचे उत्सव राष्ट्राचा अभ्युदय करणारे आहेत हें तत्त्व अनादि कालापासून ह्या भरतभूमीमध्यें प्रसिद्ध आहे आणि उत्सवामध्यें देवांना वगैरे उद्देशून भजन वगैरे करणारे लोकही समाजाच्या अंतःकरणांत स्फूर्ति उत्पन्न करून राष्ट्राचा अभ्युदयच करणारे आहेत हेंही तत्त्व ह्या भरतभूमीमध्यें अनादिकालापासून चालत आलेलें आहे असें ह्या श्लोकावरून निःसंशय ठरतें. असे उत्सव सुरू न होणें अथवा जे पूर्वापार चालत आले आहेत त्यांचाही प्रचार कमी होत जाणें हें राष्ट्राच्या ऱ्हासाचें लक्षण असून कांहीं अंशीं अराजक स्थितीचें द्योतक आहे.

कचरो वशी । भावयन्नात्मनात्मानं यत्र सायंगृहो मुनिः २३ नाराजके जनपदे योगक्षेमः प्रवर्तते । न चाप्यराजके सेना शत्रून्विषहते युधि २४ नाराजके जनपदे हृष्टैः परमवाजिभिः । नराः संयान्ति सहसा रथैश्च प्रतिमण्डिताः २५ नाराजके जनपदे नराः शास्त्रविशारदाः । संवदन्तोपतिष्ठन्ते वनेषूपवनेषु वा २६ नाराजके जनपदे माल्यमोदकदक्षिणाः । देवताभ्यर्चनार्थाय कल्प्यन्ते नियतैर्जनैः २७ नाराजके जनपदे चन्दनागुरुरूषिताः । राजपुत्रा विराजन्ते वसन्ते इव शालिनः २८ यथा ह्यनुदका नद्यो यथा वाप्यतृणं वनम् । अगोपाला यथा गावस्तथा राष्ट्रमराजकम् २९ ध्वजो रथस्य प्रज्ञानं धूमो ज्ञानं विभावसोः । तेषां यो नो ध्वजो राजा स देवत्वमितो गतः ३० नाराजके जनपदे स्वकं भवति कस्यचित् । मत्स्या इव जना नित्यं भक्षयन्ति परस्परम् ३१ ये हि संभिन्नमर्यादा नास्तिकाश्छिन्नसंशयाः । ते पि भावाय कल्पन्ते राजदण्डनिपीडिताः ३२ यथा दृष्टिः शरीरस्य नित्यमेव प्रवर्तते । तथा नरेन्द्रो राष्ट्रस्य

---

तेथें रहाणारे, मनांत ब्रह्मचिंतन करणारे आणि एकटेच संचार करणारे जितेंद्रिय यति दृष्टोत्पत्तीस यत नाहींत २३. अराजक देशामध्यें अवश्य असलेलें मिळतही नाहीं व जें मिळालें असेल त्याचें रक्षणही होत नाहीं आणि राज्य अराजक झालें असतां युद्धामध्यें सेना शत्रूंशीं तोंड देण्यास समर्थही होत नाहीं २४. अराजक देशामध्यें आनंदित झालेले उत्कृष्ट अश्व ज्यांना लाविले आहेत अशा रथांनीं भूषित झालेले पुरुष एकाएकीं वनाला जात नाहींत २५. अराजक देशामध्यें शास्त्रामध्यें प्रवीण असलेले पुरुष वनांतून अथवा उपवनांतून बोलत उभे रहात नाहींत २६. अराजक देशामध्यें नियमानें वागणारे लोक देवतांच्या पूजनाकरितां पुष्पें, मोदक व दक्षिणा देत नाहींत २७ व अराजक देशामध्यें चंदन आणि अगुरु ह्यांनीं चर्चित झालेले राजपुत्र वसंत ऋतूंतील शालवृक्षाप्रमाणें झळकत नाहींत २८. उदकरहित जशा नद्या, तृणरहित जसें वन आणि गोपालरहित जशा गाई, तसेंच राजरहित राष्ट्र होय २९. ध्वज ज्याप्रमाणें रथाची खूण आहे अथवा धूम ज्याप्रमाणें अग्नीची खूण आहे त्याचप्रमाणें जे राज्यकर्ते आहेत त्यांची राजा ही खूण आहे; परंतु, तो राजाच येथून देवलोकाला निघून गेला आहे ( ह्यामुळें आतां आह्मांला कोणीही मानणार नाहींत ) ३०. अराजक देशामध्यें कोणाचाही जीव स्वस्थ नसतो. कारण, लोक मत्स्याप्रमाणें नेहमीं एकमेकाला खाऊं लागतात ३१. मर्यादेचें उल्लंघन केल्यामुळें पूर्वी राजदंड झालेले जे नास्तिक असतात तेही राजदंडाविषयीं निर्भय होऊन अशा वेळीं प्रभु होऊं पहा-

प्रभवः सत्यधर्मयोः ३३ राजा सत्यं च धर्मश्च राजा कुलवतां कुलम् । राजा माता पिता चैव राजा हितकरो नृणाम् ३४ यमो वैश्रवणः शक्रो वरुणश्च महाबलः । विशिष्यन्ते नरेन्द्रेण वृत्तेन महता ततः ३५ अहो तम इवेदं स्यान्न प्रज्ञायेत किंचन । राजा चेन्न भवेल्लोके विभजन्साध्वसाधुनी ३६ जीवत्यपि महाराजे तवैव वचनं वयम् । नातिक्रमामहे सर्वे वेलां प्राप्येव सागरः ३७ स नः समीक्ष्य द्विजवर्य वृत्तं नृपं विना राष्ट्रमरण्यभूतम् । कुमारमिक्ष्वाकुसुतं तथान्यं त्वमेव

---

तात ३२. ज्याप्रमाणें शरीराचें हिताहित पहाण्याविषयीं दृष्टि नेहमीं तत्पर असते त्याचप्रमाणें सत्य आणि धर्म ह्यांची प्रवृत्ति करणारा राजा राष्ट्राच्या हिताहिताविषयीं नेहमीं दक्ष असतो ३३. सत्य, धर्म आणि कुलवानांचें कुल ह्यांचा प्रवर्तक राजाच असून माता, पिता व प्रजा ह्यांचें हित पहाणारा राजाच आहे ३४. यम, कुबेर, इंद्र आणि महाबलाढ्य वरुण ह्यांना उदार आचरणानें युक्त असलेला राजा मागें टाकितो. ( यमाचे ठिकाणीं अपराध्याला दंड करणें येवढाच गुण आहे, कुबेराचे ठिकाणीं द्रव्य देणें येवढाच गुण आहे, इंद्राचे ठिकाणीं रक्षण करणें येवढाच गुण आहे आणि वरुणाचे ठिकाणीं प्रजेला सदाचारामध्यें ठेवणें येवढाच गुण आहे. तेव्हां हे चारी गुण ज्याचे ठिकाणीं आहेत तो राजा ह्या सर्वांपेक्षां श्रेष्ठ असणार हें उघड आहे ) ३५. अहो, बऱ्यावाईटाची व्यवस्था लावणारा राजा जर जगतामध्यें नसेल तर हें जगत् अंधकारासारिखें होऊन कशाचाच उमज पडणार नाहीं ३६. असो. महाराज दशरथ जिवंत असतांनाही, समुद्र ज्याप्रमाणें मर्यादेपाशीं आल्यानंतर तिचें कधींही अतिक्रमण करीत नाहीं त्याचप्रमाणें, आह्मीं आपल्या आज्ञेचें कधींही अतिक्रमण केलेलें नाहीं ३७. हे द्विजश्रेष्ठ वसिष्ठमुने, आपण आमच्या ( ह्मणण्या ) कडे लक्ष्य द्या

---

१ राष्ट्राचा राजा राष्ट्रांतीलच असला पाहिजे असें गृहीत धरून हा श्लोक महर्षि वाल्मीकींनीं लिहिलेला दिसत आहे. तेव्हां सर्वच राष्ट्रांसंबंधानें ही गोष्ट खरी ठरत नसल्यास त्याबद्दल त्या महर्षींना दोष देणें योग्य होणार नाहीं.

२ असा राजा ज्या देशाला प्राप्त झाला असेल तोच देश खरोखर भाग्यवान् होय. देशांतील राजा ह्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें आहे किंवा नाहीं हें समजण्याचें एक साधन रामायणादि ग्रंथांतून ठिकठिकाणीं आढळण्यांत येतें. हें साधन ह्मणजे " हृष्टपुष्टजनाकीर्ण " हें विशेषण राष्ट्राला लावून पहाणें होय. हें विशेषण ज्या राष्ट्राला लागत असेल त्या राष्ट्रांतील राजाचे अंगीं ह्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व गुण आहेत असें समजण्यास हरकत नाहीं. हें विशेषण न लागतां " कृशाहृष्टजनाकीर्ण " अशा प्रकारचें विशेषण ज्या राष्ट्राला लागू पडत असेल त्या राष्ट्रांतील राजाच्या अंगीं ह्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्व अथवा एखादा तरी गुण असेल किंवा नाहीं ह्याचा काय तो निश्चय सूज्ञ पुरुषांनींच करणें योग्य आहे.

राजानमिहाभिषेचय ३८ [२६७०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तषष्टितमः सर्गः ॥६७॥

तेषां तद्वचनं श्रुत्वा वसिष्ठः प्रत्युवाच ह। मित्रामात्यजनान्सर्वान्ब्राह्मणांस्तानिदं वचः १ यदसौ मातुलकुले दत्तराज्यः परं सुखी। भरतो वसति भ्रात्रा शत्रुघ्नेन मुदान्वितः २ तच्छीघ्रं जवना दूता गच्छन्तु त्वरितं हयैः। आनेतुं भ्रातरौ वीरौ किं समीक्षामहे वयम् ३ गच्छन्त्विति ततः सर्वे वसिष्ठं वाक्यमब्रुवन्। तेषां तद्वचनं श्रुत्वा वसिष्ठो वाक्यमब्रवीत् ४ एहि सिद्धार्थ विजय जयन्ताशोकनन्दन। श्रूयतामितिकर्तव्यं सर्वानेव ब्रवीमि वः ५ पुरं राजगृहं गत्वा शीघ्रं शीघ्रजवैर्हयैः। त्यक्तशोकैरिदं वाच्यः शासनाद्भरतो मम ६ पुरोहितस्त्वां कुशलं प्राह सर्वे च मन्त्रिणः। त्वरमाणश्च निर्याहि कृत्यमात्ययिकं त्वया ७ मा चास्मै प्रोषितं रामं मा चास्मै पितरं मृतम्। भवन्तः शंसिषुर्गत्वा राघवाणामितः क्षयम् ८

---

आणि इक्ष्वाकुकुलांतील एकाद्या राजपुत्राला अथवा दुसऱ्या कोणाला आपण आजच्याआजच ह्या राज्याचा राज्याभिषेक करा. कारण, राजावांचून हें राष्ट्र अरण्यवत् झालेलें आहे ३८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सदुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६७ ॥

त्यांचें तें भाषण श्रवण करून सुमंत्रप्रभृति मित्र व अमात्य आणि मार्कंडेयप्रभृति ब्राह्मण ह्या सर्वांना वसिष्ठ ह्मणाले १ " ज्याअर्थी दशरथानें राज्य दिलेला भरत भ्रात्या शत्रुघ्नासहवर्तमान आनंदित होऊन आपल्या मातुलगृहीं अतिशय सुखानें रहात आहे २ त्याअर्थी सत्वर गमन करणारे दूत त्या वीर भ्रात्यांना आणण्याकरितां अश्व घेऊन लवकर तिकडे जाऊं द्या. ह्याचा विचार करावयाचें कांहीं कारण नाहीं. कारण(राजानेंच भरताला राज्य देऊन ठेविलें आहे " ३. ह्यावर "जाऊं द्या" असें सर्वांनीं वसिष्ठांना सांगितलें आणि त्यांचें तें सांगणें ऐकून घेऊन वसिष्ठ ह्मणाले ४ " हे सिद्धार्था, हे विजया, हे जयंता, हे अशोकनंदना, आतां काय करावयाचें तें ऐका; मी तुह्मांला सर्वांनाच सांगतों ५. शीघ्र गमन करणाऱ्या अश्वांच्या योगानें केकयदेशाच्या राजधानीमध्यें असलेल्या राजवाड्यांत जाऊन दूतांनीं शोकाचा त्याग करून माझ्या सांगण्यावरून भरताला ह्मणावें कीं ६, " पुरोहित वसिष्ठ आणि सर्व मंत्रि ह्यांनीं तुला कुशल विचारिलें आहे, आतां तूं सत्वर येथून नीघ; तुझ्याशीं मोठें जरूरीचें काम आहे ७. राम वनवासांत गेला, पिता परलोकवासी झाला आणि कैकेयीमुळें ह्या रघुकुलाचा घात झाला ह्यांतलें कांहींएक तुह्मीं तेथें गेल्यावर त्याला सांगूं नका ८. रेशमी वस्त्रें

कौशेयानि च वस्त्राणि भूषणानि वराणि च । क्षिप्रमादाय राज्ञश्च भरतस्य च गच्छत ९ दत्तपथ्यशना दूता जग्मुः स्वं स्वं निवेशनम् । केकयांस्ते गमिष्यन्तो हयानारुह्य संमतान् १० ततः प्रास्थानिकं कृत्वा कार्यशेषमनन्तरम् । वसिष्ठेनाभ्यनुज्ञाता दूताः संत्वरितं ययुः ११ न्यन्तेनापरतालस्य प्रलम्बस्योत्तरं प्रति । निषेवमाणास्ते जग्मुर्नदीं मध्येन मालिनीम् १२ ते हास्तिनपुरे गङ्गां तीर्त्वा प्रत्यङ्मुखा ययुः । पञ्चालदेशमासाद्य मध्येन कुरुजाङ्गलम् १३ सरांसि च सुफुल्लानि नदीश्च विमलोदकाः । निरीक्षमाणा जग्मुस्ते दूताः कार्यवशाद्द्रुतम् १४ ते प्रसन्नोदकां दिव्यां नानाविहगसेविताम् । उपातिजग्मुर्वेगेन शरदण्डां जलाकुलाम् १५ निकूलवृक्षमासाद्य दिव्यं सत्योपयाचनम् । अभिगम्याभिवाद्यं तं कुलिङ्गां प्राविशन्पुरीम् १६ अभिकालं ततः प्राप्य तेजोभिभवनाच्च्युताः । पितृपैतामहीं पुण्यां तेरुरिक्षुमतीं नदीम् १७ अवेक्ष्याञ्जलिपानांश्च ब्राह्मणान्वेदपा-

---

आणि उत्कृष्ट भूषणें केकयराजाला व भरताला देण्याकरितां घेऊन तुह्मीं सत्वर चालते व्हा " ९. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितल्यावर मार्गांत पडणाऱ्या भोजनाकरितां ज्यांच्यापाशीं द्रव्य दिलें आहे असे ते दूत आपणाला पसंत अशा अश्वांवर आरूढ होऊन केकय देशाला जाण्याकरितां आपआपल्या घरीं गेले १०. तदनंतर जाण्यासंबंधानें उरलें सुरलेली तयारी करून वसिष्ठमुनींनीं अनुज्ञा दिलेले ते दूत सत्वर चालते झाले ११. अपरता देशाच्या पश्चिम बाजूला आणि प्रलंब देशाच्या उत्तर बाजूला असलेल्या मालतीनदीवर उतरून ते त्या नदींतून पलीकडे गेले १२. ( ईशान्य दिशेस जाण्याकरितां निघालेले ) ते दूत पंचालदेशाला येऊन हास्तिनपुरासमीप गंगा उतरल्यावर पश्चिमेकडे वळून कुरुजांगलदेशाला जाणाऱ्या मधल्या रस्त्यानें चालले १३. पुष्पांनीं फुललेलीं सरोवरें आणि निर्मल उदकानें युक्त असलेल्या नद्या मार्गांमध्यें दृष्टीं पडत असतांनाही ते दूत ( मध्यें न थांबतां ) जरूरीच्या कामामुळें सत्वर पुढें चालते झाले १४. निर्मल उदक, नानाप्रकारचे पक्षी आणि उदकानें क्षुब्ध अशा शरदंडानामक दिव्य नदीसमीप जाऊन ते ती नदी ओलांडून पुढें गेले १५. शरदंडानदीच्या पश्चिम तीरावर अभिवंदन करण्यास योग्य असलेल्या सत्योपयाचननामक दिव्य वृक्षाशीं गेल्यावर दूतांनीं त्याला प्रदक्षिणा केली आणि नंतर ते कुलिंगानामक राजाधनीमध्यें प्रविष्ट झाले १६. तदनंतर तेजोभिभवन गांवांतून निघून अभिकालनामक गांवाला आल्यावर इक्ष्वाकूंचा पिता व पितामह यांचा जिच्याशीं संबंध आहे अशी पुण्य इक्षुमतीनदी ते तरून गेले १७. बाल्हीक देशांत रहाणाऱ्या वेदपारंगत ब्राह्मणांनाही ( सदाचाराची

रगान् । ययुर्मध्येन बाल्हीकान्सुदामानं च पर्वतम् १८ विष्णोः पदं प्रेक्षमाणा विपाशां चापि शाल्मलीम् । नदीर्वापीतटाकानि पल्वलानि सरांसि च १९ पश्यन्तो विविधांश्चापि सिंहान्व्याघ्रान्मृगान्द्विपान् । ययुः पथातिमहता शासनं भर्तुरीप्सवः २० ते श्रान्तवाहना दूता विकृष्टेन सता पथा । गिरिव्रजं पुरवरं शीघ्रमासेदुरञ्जसा २१ भर्तुः प्रियार्थं कुलरक्षणार्थं भर्तुश्च वंशस्य परिग्रहार्थम् । अहेडमानास्त्वरया स्म दूता रात्र्यां तु ते तत्पुरमेव याताः २२ [ २६९२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टषष्टितमः सर्गः ॥ ६८ ॥

यामेव रात्रिं ते दूताः प्रविशन्ति स्म तां पुरीम् । भरतेनापि तां रात्रिं स्वप्नो दृष्टोऽयमप्रियः १ व्युष्टामेव तु तां रात्रिं दृष्ट्वा तं स्वप्नमप्रियम् । पुत्रो राजाधिराजस्य सुभृशं पर्यतप्यत २ तप्यमानं तमाज्ञाय वयस्याः प्रियवादिनः । आयासं विनयिष्यन्तः सभायां चक्रिरे कथाः ३ वादयन्ति तदा शान्तिं

---

पर्वा न करितां ) ओंजळींनीं पाणी पितांना पाहून ते दूत बाल्हीकदेशांतून सुदामपर्वताला चालते झाले १८. तदनंतर सुदाम पर्वतावर असलेलें विष्णूचें स्थान पहाण्याचा उद्देश मनांत धरून आणि विपाशा व शाल्मली ह्या नद्या अवलोकन करून नद्या, वापी, तडाग, तळीं, सरोवरें १९, नानाप्रकारचे सिंह, व्याघ्र, मृग आणि गज अवलोकन करीत करीत त्यांना पाठविणाऱ्या प्रभु वसिष्ठांची आज्ञा सिद्धीस नेण्याची इच्छा धरणारे ते दूत मोठ्या मार्गानें चालते झाले २०. नंतर उपद्रवरहित असा बराच लांब मार्ग चालून आल्यामुळें वाहनें श्रांत होऊन गेलेले ते दूत गिरिव्रजनामक श्रेष्ठ नगराला अनायासें सत्वर गेले. सारांश, प्रभु वसिष्ठांची मर्जी संपादन करण्याकरितां, प्रजाकुलरक्षण करण्याकरितां आणि दशरथराजाच्या वंशजांचें जें वंशपरंपरागत राज्य त्याचा भरताकडून स्वीकार होण्याकरितां उपेक्षा न करणारे ते दूत रात्रीच्या रात्रींच त्वरेनें त्या नगराला चालते झाले २१, २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अडुसष्टावा सर्ग समाप्त झाला ॥ ६८ ॥

ज्या रात्रीं त्या दूतांनीं त्या नगरीमध्यें प्रवेश केला त्याच रात्रीं भरतानेंही एक अप्रिय स्वप्न अवलोकन केलें १. ती रात्र उजाडण्याचे सुमारासच तें अप्रिय स्वप्न अवलोकन केल्यावर राजाधिराजाचा पुत्र भरत अत्यंत चिंताक्रांत झाला २. तो चिंताक्रांत झाला आहे असें समजून प्रिय भाषण करणारे त्याचे मित्र स्वप्नजन्य दुःखाचा त्याला विसर पडावा एतदर्थ सभेमध्यें ( नानाप्रकारच्या ) गोष्टी सांगूं लागले ३. त्याचा खेद दूर करण्याकरितां कांहीं मित्र वाद्यें वाजवूं लागले, कांहीं

लासयन्त्यपि चापरे। नाटकान्यपरे स्माहुर्हास्यानि विविधानि च ४ स तैर्महात्मा भरतः सखिभिः प्रियवादिभिः। गोष्ठीहास्यानि कुर्वद्भिर्न प्राहृष्यत राघवः ५ तमब्रवीत्प्रियसखो भरतं सखिभिर्वृतम्। सुहृद्भिः पर्युपासीनः किं सखे नानुमोदसे ६ एवं ब्रुवाणं सुहृदं भरतः प्रत्युवाच ह। शृणु त्वं यन्निमित्तं मे दैन्यमेतदुपागतम् ७ स्वप्ने पितरमद्राक्षं मलिनं मुक्तमूर्धजम्। पतन्तमद्रिशिखरात्कलुषे गोमये ह्रदे ८ प्लवमानश्च मे दृष्टः स तस्मिन्गोमये ह्रदे। पिबन्नञ्जलिना तैलं हसन्निव मुहुर्मुहुः ९ ततस्तिलोदनं भुक्त्वा पुनः पुनरधःशिराः। तैलेनाभ्यक्तसर्वाङ्गस्तैलमेवान्वगाहत १० स्वप्नेऽपि सागरं शुष्कं चन्द्रं च पतितं भुवि। उपरुद्धां च जगतीं तमसेव समावृताम् ११ औपवाह्यस्य नागस्य विषाणं शकलीकृतम्। सहसा चापि संशान्ता ज्वलिता जातवेदसः १२ अवदीर्णां च पृथिवीं शुष्कांश्च विविधान्द्रुमान्। अहं पश्यामि विध्वस्तान्सधूमांश्चैव पर्वतान् १३ पीठे

---

वेश्यांकडून नृत्य करवूं लागले आणि कांहीं हास्यरसप्रधान अशीं नानाप्रकारचीं नाटकें कथन करूं लागले ४; परंतु, नेहमीं वार्ताच कथन करणारे ते हितकारक गोष्टी आणि हास्योत्पादक थट्टा जरी करीत होते तरी त्यांच्या योगानें रघुवंशज भरताला हर्ष झाला नाहीं ५. तदनंतर मित्रांनीं परिवेष्टित असलेल्या त्या भरताला सुहृदांसहवर्तमान सभेमध्यें बसलेला एक प्रिय मित्र " हे मित्रा, आज तुला ह्या गायनानें वगैरे आनंद कां होत नाहीं ? " असें ह्मणाला ६. तेव्हां असा प्रश्न विचारणाऱ्या त्या मित्राला भरत ह्मणाला " मला हें दैन्य प्राप्त होण्याचें कारण काय तें ऐक ७. मलिन व केस मोकळे सुटलेला असा माझा पिता पर्वतशिखरापासून शेणानें भरलेल्या एका घाणेरड्या डबक्यांत पडतांना मीं स्वप्नामध्यें पाहिला ८. गोमयानें भरलेल्या त्या डबक्यांत तो तरंगत आहे व ओंझळीनें तेल पिऊन वारंवार हंसत आहे असें मीं पाहिलें ९. तदनंतर तिलमिश्र ओदन भक्षण करून फिरून फिरून खालीं मान घालून असलेला व तेलानें सर्वांग चोपडून गेलेला तो पिता तेलांतच बुचकळ्या मारीत आहे असें मीं पाहिलें १०. सागर शुष्क झाला आहे, चंद्र भूमीवर पडला आहे, पृथ्वी अंधकारानें व्याप्त होऊन असुरांनीं व राक्षसांनीं ग्रासून टाकिली आहे व राजाची स्वारी ज्याच्यावर बसून निघते त्या हत्तीच्या दाताचे तुकडे तुकडे झाले आहेत असें हें मीं स्वप्नामध्यें पाहिलें आणि प्रज्वलित झालेले अग्नि एकाएकीं विजून गेले असेंही मीं अवलोकन केलें ११, १२. विदीर्ण झालेली पृथ्वी, शुष्क होऊन गेलेले नानाप्रकारचे वृक्ष आणि जमीनदोस्त झालेले सधूम पर्वतही मीं पाहिले १३. लोखंडाच्या आसनावर कृष्णवस्त्रें परिधान करून

कार्ष्णायसे चैव निषण्णं कृष्णवाससम् । प्रहरन्ति स्म राजानं प्रमदाः कृष्णपिङ्गलाः १४ त्वरमाणश्च धर्मात्मा रक्तमाल्यानुलेपनः । रथेन खरयुक्तेन प्रयातो दक्षिणामुखः १५ प्रहसन्तीव राजानं प्रमदा रक्तवासिनी । प्रकर्षन्ती मया दृष्टा राक्षसी विकृतानना १६ एवमेतन्मया दृष्टमिमां रात्रिं भयावहाम् । अहं रामोथवा राजा लक्ष्मणो वा मरिष्यति १७ नरो यानेन यः स्वप्ने खरयुक्तेन याति हि । अचिरात्तस्य धूम्राग्रं चितायां संप्रदृश्यते १८ एतन्निमित्तं दीनोहं न वचः प्रतिपूजये । शुष्यतीव च मे कण्ठो न स्वस्थमिव मे मनः १९ न पश्यामि भयस्थानं भयं चैवोपधारये । भ्रष्टश्च स्वरयोगो मे छाया चापगता मम । जुगुप्स इव चात्मानं न च पश्यामि कारणम् २० इमां च दुःस्वप्नगतिं निशम्य हि त्वनेकरूपामवितर्कितां पुरा । भयं महत्तद्धृदयान्न याति मे विचिन्त्य राजानमचिन्त्यदर्शनम् २१ [२७१३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनसप्ततितमः सर्गः ॥ ६९ ॥

---

बसलेल्या राजाला कृष्णवर्णाच्या व पिंगटवर्णाच्या स्त्रिया मारीत आहेत असें पाहिलें १४. रक्तपुष्पांच्या माला धारण करून व रक्तचंदन अंगाला लावून तो धर्मात्मा राजा गर्दभयुक्त रथांत बसून सत्वर दक्षिणाभिमुख निघून गेला असें अवलोकन केलें १५. अक्राळविक्राळ जिचें तोंड आहे व जिनें रक्तवस्त्र परिधान केलीं आहेत अशी एक तरुण राक्षसी हंसत हंसत राजाला ओढून नेत असतांना मीं पाहिली १६. ह्याप्रमाणें ह्या भयंकर रात्रीं माझ्या दृष्टीं पडलें. तेव्हां मीं, राम, राजा, अथवा लक्ष्मण कोणी तरी मृत्यु पावणार १७. स्वप्नामध्यें जो पुरुष गर्दभयुक्त रथांत बसून जातो त्याची धूमशिखा चितेवर लवकरच दृष्टोत्पत्तीस येते १८. ह्याकरितां मी खिन्न झालों आहें, तुमच्या भाषणाचें अभिनंदन करावेंसें मला वाटत नाहीं , माझ्या घशाला जशी कांहीं कोरड पडत आहे व माझें मन अस्वस्थ झालें आहे १९. भयाचें कारण तर प्रत्यक्ष मला दिसत नाहीं; परंतु, भीति तर वाटत आहे. माझा शब्द खोल गेला आहे आणि माझें तेजही नाहींसें झालें आहे. स्वतःबद्दल मला वाईट मात्र वाटत आहे; परंतु, वाईट वाटण्याचें कारण काय हें लक्ष्यांत येत नाहीं २०. पूर्वीं ज्याच्याबद्दल कधीं तर्कही झालेला नाहीं असें हें अनेक प्रकारचें दुःस्वप्न पडलेलें आठवलें ह्मणजे अचिंत्य ज्ञानवान् राजाकडे लक्ष्य जाऊन माझ्या अंतःकरणांतून तें भय जात नाहीं २१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ६९ ॥

भरते ब्रुवति स्वप्नं दूतास्ते क्लान्तवाहनाः । प्रविश्यासह्यपरिखं रम्यं राजगृहं पुरम् १ समागम्य च राज्ञा ते राजपुत्रेण चार्चिताः । राज्ञः पादौ गृहीत्वा च तमूचुर्भरतं वचः २ पुरोहितस्त्वां कुशलं प्राह सर्वे च मन्त्रिणः । त्वरमाणश्च निर्याहि कृत्यमात्ययिकं त्वया ३ इमानि च महार्हाणि वस्त्राण्याभरणानि च । प्रतिगृह्य विशालाक्ष मातुलस्य च दापय ४ अत्र विंशतिकोट्यस्तु नृपतेर्मातुलस्य ते । दशकोट्यस्तु संपूर्णास्तथैव च नृपात्मज ५ प्रतिगृह्य तु तत्सर्वं स्वनुरक्तः सुहृज्जने । दूतानुवाच भरतः कामैः संप्रतिपूज्य तान् ६ कच्चित्स कुशली राजा पिता दशरथो मम । कच्चिदारोग्यता रामे लक्ष्मणे च महात्मनि ७ आर्या च धर्मनिरता धर्मज्ञा धर्मवादिनी । अरोगा चापि कौसल्या माता रामस्य धीमतः ८ कच्चित्सुमित्रा धर्मज्ञा जननी लक्ष्मणस्य या । शत्रुघ्नस्य च वीरस्य अरोगा चापि मध्यमा ९ आत्मकामा सदा चण्डी क्रोधना प्राज्ञमानिनी । अरोगा चापि मे माता कैकेयी किमुवाच ह १० एवमुक्तास्तु ते दूता भरतेन

---

ह्याप्रमाणें भरत स्वप्न सांगत आहे तोंच ज्यांचे घोडे थकून गेलेले आहेत असे ते दूत उल्लंघन करण्यास अशक्य असा खंदक ज्याच्या भोंवतालीं आहे अशा त्या नगरांत प्रविष्ट होऊन रम्य राजवाड्यापाशीं आले १. तदनंतर राजाची भेट होऊन राजपुत्रानें त्यांचें आदरातिथ्य केल्यावर राजाचे पाय धरून ते त्या भरताला ह्मणाले २ " पुरोहित वसिष्ठ आणि सर्व मंत्री ह्यांनीं तुला इकडे सर्व कुशल आहे असें सांगितलें आहे. आतां सत्वर येथून नीघ; तुझ्याशीं अत्यंत जरूरीचें काम आहे ३. हे कमलनयना, हीं मोठमोठीं मोल्यवान् वस्त्रं व भूषणें तूं घे आणि आपल्या मातुलालाही दे ४. ह्या वस्त्रांपैकीं वीस कोटींचीं वस्त्रं केकय राजाला दिलीं असून तुझ्या मातुलाला, हे राजकुमारा, तब्बल दहा कोटींचीं वस्त्रं दिलीं आहेत " ५. ( ह्याप्रमाणें दूतांनीं सांगितल्यावर ) सुहृदांचे ठिकाणीं अतिशय प्रेम करणारा तो भरत तें सर्व स्वीकारून आणि इच्छित वस्तूंनीं त्या दूतांचा मान राखून त्यांना विचारूं लागला कीं ६, " माझा पिता दशरथराजा कुशल आहे नां आणि राम व महात्मा लक्ष्मण ह्यांना आरोग्य आहे नां ? ७. सभ्य, धर्मनिष्ठ, धर्मज्ञ आणि धर्माला अनुसरून भाषण करणारी अशी विचारी रामाची माता कौसल्या रोगरहित आहे नां ? ८. लक्ष्मण व वीर शत्रुघ्न ह्यांची माता जी मध्यम राजपत्नि धर्मज्ञ सुमित्रा ती रोगरहित आहे नां ? ९. स्वार्थाकडेच दृष्टि देणारी, नेहमींच जलाल, क्रुद्ध आणि आपणाला शहाणी समजणारी माझी माता कैकेयीही बरी असून तिनें मला कांहीं सांगितलें आहे काय ?" १०.

महात्मना । ऊचुः संप्रश्रितं वाक्यमिदं तं भरतं तदा ११ कुशलास्ते नरव्याघ्र येषां कुशलमिच्छसि । श्रीश्च त्वां वृणुते पद्मा युज्यतां चापि ते रथः १२ भरतश्चापि तान्दूतानेवमुक्तोऽभ्यभाषत । आपृच्छेहं महाराजं दूताः संत्वरयन्ति माम् १३ एवमुक्त्वा तु तान्दूतान्भरतः पार्थिवात्मजः । दूतैः संचोदितो वाक्यं मातामहमुवाच ह १४ राजन्पितुर्गमिष्यामि सकाशं दूतचोदितः । पुनरप्यहमेष्यामि यदा मे त्वं स्मरिष्यसि १५ भरतेनैव मुक्तस्तु नृपो मातामहस्तदा । तमुवाच शुभं वाक्यं शिरस्याघ्राय राघवम् १६ गच्छ तातानुजाने त्वां कैकेयी सुप्रजा त्वया । मातरं कुशलं ब्रूयाः पितरं च परंतप १७ पुरोहितं च कुशलं ये चान्ये द्विजसत्तमाः । तौ च तात महेष्वासौ भ्रातरौ रामलक्ष्मणौ १८ तस्मै हस्त्युत्तमांश्चित्रान्कम्बलानजिनानि च । सत्कृत्य केकयो राजा भरताय ददौ धनम् १९ अन्तःपुरेऽतिसंवृद्धान्व्याघ्रवीर्यबलोपमान् । दंष्ट्रायुक्तान्महाकायाञ्शुनश्चोपायनं ददौ २० रुक्मनिष्कसहस्रे

ह्याप्रमाणें महात्म्या भरतानें प्रश्न केला असतां ते दूत विनयपूर्वक आणि थोडक्यांत त्या भरताला ह्मणाले ११ " हे पुरुषश्रेष्ठा, ज्यांचें कुशल तूं इच्छित आहेस ते कुशल आहेत; कमलनिवासिनी लक्ष्मी तुला वरण्यास तयार आहे. करितां, आतां तुझा रथ जोडून तयार असूं दे " १२. ह्याप्रमाणें त्यांनीं भरताला सांगितलें असतां " दूत मला घाई करीत आहेत असें सांगून मी महाराज केकयाधिपतीचा निरोप घेतों " असें भरतानें त्या दूतांना सांगितलें १३ आणि असें त्या दूतांना सांगून दूतांनीं " सत्वर चल " ह्मणून प्रेरणा केलेला तो राजकुमार भरत आपल्या मातामहाला ह्मणाला १४ " हे राजा, मी पित्याकडे जातों; दूतांनीं मला त्वरा केली आहे. जेव्हां आपणाला माझें स्मरण होईल तेव्हां मी पुनरपि येईन " १५. ह्याप्रमाणें भरतानें सांगितलें असतां त्याचा मातामह केकयदेशाधिपति रघुवंशज भरताचें मस्तकीं अवघ्राण करून शुभ शब्दांनीं त्याला ह्मणाला १६ " बा भरता, जा; मी तुला अनुज्ञा देतों. तुझ्या योगानें कैकेयी सुप्रजा आहे. हे शत्रुतापना, आपल्या मातेला व पित्याला आह्मी खुशाल आहोंत ह्मणून सांग १७ आणि त्याचप्रमाणें पुरोहित व इतरही जे कांहीं द्विजश्रेष्ठ असतील ते आणि, बा भरता, ते महाधनुर्धारी राम लक्ष्मण ह्यांनाही कुशल सांग " १८. (असें सांगितल्यानंतर )उत्कृष्ट हत्ति, आश्चर्यकारक शुभ्र वस्त्रें, अजिनें आणि द्रव्य सत्कारपूर्वक केकयराजानें त्या भरताला दिलें १९. अंतःपुरामध्यें यत्नानें वाढविलेले, वीर्य आणि बल ह्यांमध्यें व्याघ्राची बरोबरी करणारे आणि मोठमोठ्या दाढांनीं युक्त अस-

द्वे षोडशाश्वशतानि च । सत्कृत्य कैकयीपुत्रं केकयो धनमादिशन् २१ तदामात्यानभिप्रेतान्विश्वास्यांश्च गुणान्वितान् । ददावश्वपतिः शीघ्रं भरतायानुयायिनः २२ ऐरावतानैन्द्रशिरान्नागान्वै प्रियदर्शनान् । खराञ्शीघ्रान्सुसंयुक्तान्मातुलोऽस्मै धनं ददौ २३ स दत्तं केकयेन्द्रेण धनं तन्नाभ्यनन्दत । भरतः कैकयीपुत्रो गमनत्वरया तदा २४ बभूव ह्यस्य हृदये चिन्ता सुमहती तदा । त्वरया चापिदूतानां स्वप्नस्यापि च दर्शनात् २५ स स्ववेश्माभ्यतिक्रम्य नरनागाश्वसंकुलम् । प्रपेदे सुमहच्छ्रीमान्राजमार्गमनुत्तमम् २६ अभ्यतीत्य ततापश्यदन्तःपुरमनुत्तमम् । ततस्तद्भरतः श्रीमानाविवेशानिवारितः २७ स मातामह मापृच्छ्य मातुलं च युधाजितम् । रथमारुह्य भरतः शत्रुघ्नसहितो ययौ २८ रथान्मण्डलचक्रांश्च योजयित्वा परं शतम् । उष्ट्रगोश्वखरैर्भृत्या भरतं यान्तमन्वयुः २९ बलेन गुप्तो भरतो महात्मा सहार्यकस्यात्मसमैरमात्यैः । आदाय

लेले असे धिप्पाड कुत्रे देणगीदाखल त्याला दिले २०. तदनंतर सोन्याच्या दोन हजार मोहोरा आणि सोळाशें घोडे इतकें धन कैकेयीच्या पुत्राचा सत्कार करून त्याला केकयराजानें दिलें २१. त्या वेळीं बरोबर जाण्याकरितां आपणाला पसंत विश्वासु आणि गुणी असे अमात्यही अश्वपति केकय राजानें सत्वर भरताच्या स्वाधीन केले २२. ह्याप्रमाणें केकयराजानें देणगी दिल्यावर ऐरावत कुलांतील आणि इंद्रशिरनामक देशांतील दिसण्यांतही मनोहर असलेले गज आणि उत्कृष्ट रीतीचें सामानसुमान घातलेलें शीघ्रगामी खर असें द्रव्य मातुलानेंही त्याला दिलें २३. परंतु, कैकेयीपुत्र भरतानें गमनाच्या त्वरेमुळें त्या वेळीं केकयराजानें दिलेल्या त्या द्रव्याबद्दल आनंद दर्शविला नाहीं २४. कारण, दूताच्या त्वरेमुळें आणि स्वप्न पाहिल्यामुळें त्याच्या अंतःकरणाला फारच मोठी चिंता लागून राहिलेली होती २५. असो. तो महावैभवशाली भरत आपल्या घरांतून बाहेर पडला आणि पुरुष, गज व अश्व ह्यांनीं गजबजून गेलेल्या उत्कृष्ट राजमार्गावर आला २६. तदनंतर आपल्या घरापासून राजवाड्यापर्यंत राजमार्गानें गेल्यावर त्यानें उत्कृष्ट अंतःपुर अवलोकन केलें आणि त्या अंतःपुरामध्यें तो वैभवशाली भरत मज्जाव न होतां गेला २७. तदनंतर मातामह व मातुल युधाजित ह्यांचा निरोप घेऊन व रथावर आरूढ होऊन तो भरत शत्रुघ्नासहवर्तमान चालतां झाला २८. रथ सत्वर वळवून घेण्याकरितां चार चक्रांच्यामध्यें असलेले मंडलचक्र ज्या रथांना आहे अशा आणखी शंभर रथांना उंट, बैल, घोडे व खेंचरें लावून अयोध्येला निघालेल्या भरताच्या मागोमाग सेवकही चालते झाले २९. *मातामहांनीं

शत्रुघ्नमपेतशत्रुर्गृहाद्ययौ सिद्ध इवेन्द्रलोकात् ३० [२७४३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्ततितमः सर्गः ॥ ७० ॥

स प्राङ्मुखो राजगृहादभिनिर्याय वीर्यवान् । ततः सुदामां द्युतिमान्संतीर्यावेक्ष्य तां नदीम् १ ह्रादिनीं दूरपारां च प्रत्यक्स्रोतस्तरङ्गिणीम् । शतद्रूमतरच्छ्रीमान्नदीमिक्ष्वाकुनन्दनः २ ऐलधाने नदीं तीर्त्वा प्राप्य चापरपर्वतान् । शिलामाकुर्वतीं तीर्त्वा आग्नेयं शल्यकर्षणम् ३ सत्यसंधः शुचिर्भूत्वा प्रेक्षमाणः शिलावहाम् । अभ्यगात्स महाशैलान्वनं चैत्ररथं प्रति ४ सरस्वतीं च गङ्गां च युग्मेन प्रतिपद्य च । उत्तरान्वीरमत्स्यानां भारुण्डं प्राविशद्वनम् ५ वेगिनीं च कुलिङ्गाख्यां ह्रादिनीं पर्वतावृताम् । यमुनां प्राप्य संतीर्णो बलमाश्वासयत्तदा ६ शीतीकृत्वा तु गात्राणि क्लान्तानाश्वास्य वाजिनः । तत्र स्नात्वा च पीत्वा च प्रायादादाय चोदकम् ७ राजपुत्रो महारण्यमनभीक्ष्णोपसेवितम् । भद्रो भद्रेण यानेन मारुतः खमिवात्य-

---

बरोबर दिलेलें आत्मतुल्य अमात्य आणि सैन्य ह्यांनीं रक्षित असलेला तो महात्मा शत्रुरहित भरत इंद्रलोकांतून निघणाऱ्या सिद्धाप्रमाणें शत्रुघ्नाला बरोबर घेऊन आपल्या मातामहाच्या घरांतून बाहेर पडला ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७० ॥

राजगृहांतून पूर्वेकडे तोंड करून निघाल्यावर तो तेजस्वी व वीर्यवान् भरत सुदामा नदी अवलोकन करून ती तरून गेला १. तदनंतर जिचें पलीकडलें तीर फार दूर आहे व जिचा प्रवाह पश्चिमेकडे वहात जात आहे अशी ह्रादिनीनदी व नंतर शतद्रूनदी तो इक्ष्वाकुवंशज वैभवशाली भरत तरून गेला २. नंतर ऐलधान गांवापाशीं तेथील नदी उतरून तो अपरपर्वतनामक देशाला गेला आणि आपल्या पात्रांत पडलेली वस्तु पाषाणासारखी कठीण करून टाकणारी शिलानदी तरून जाऊन आग्नेय दिशेस असलेल्या शल्यकर्षणदेशाला तो चालता झाला ३. तदनंतर शिलावहानदी पहात पहात तिच्यामध्यें स्नान करून व शुचिर्भूत होऊन तो सत्यप्रतिज्ञ भरत मोठमोठे पर्वत ओलांडून चैत्ररथवनाला गेला ४. नंतर गंगा आणि सरस्वती ह्यांच्या तीरावर ( संगमस्थलीं ) तो एकदम गेला आणि वीरमत्स्य देशाच्या उत्तरेस असलेल्या देशांना गेल्यावर तो भारुंडनामक वनामध्यें गेला ५. तदनंतर वेगानें युक्त आणि पर्वतांनीं व्याप्त अशी कुलिंगानदी उतरल्यानंतर यमुनेवर येऊन त्यानें आपल्या सैन्याला विसावा दिला ६. तेथें अश्वांचीं शरीरें उदकानें गार करून त्या श्रमलेल्या अश्वांना त्यानें विसावा दिला आणि स्नानपान करून व तीर्थबुद्धीनें यमुनेचें उदक बरोबर घेऊन तो पुढें चालता झाला ७.

गात् ८ भागीरथीं दुष्प्रतरां सोंऽशुधाने महानदीम् । उपायाद्राघवस्तूर्णं प्राग्वटे विश्रुते पुरे ९ स गङ्गां प्राग्वटे तीर्त्वा समायात्कुटिकोष्टिकाम् । सबलस्तां स तीर्त्वाथ समगाद्धर्मवर्धनम् १० तोरणं दक्षिणार्धेन जम्बूप्रस्थं समागमत् । वरूथं च ययौ रम्यं ग्रामं दशरथात्मजः ११ तत्र रम्ये वने वासं कृत्वासौ प्राङ्मुखो ययौ । उद्यानमुज्जिहानायाः प्रियका यत्र पादपाः १२ स तांस्तु प्रियकान्प्राप्य शीघ्रानास्थाय वाजिनः । अनुज्ञाप्याथ भरतो वाहिनीं त्वरितो ययौ १३ वासं कृत्वा सर्वतीर्थे तीर्त्वा चोत्तरगां नदीम् । अन्या नदीश्च विविधैः पार्वतीयैस्तुरङ्गमैः १४ हस्तिपृष्ठकमासाद्य कुटिकामभ्यवर्तत १५ ततार च नरव्याघ्रो लौहित्ये च कपीवतीम् । एकसाले स्थाणुमतीं विनते गोमतीं नदीम् १६ कलिङ्गनगरे चापि प्राप्य सालवनं तदा । भरतः क्षिप्रमागच्छत्सुपरिश्रान्त-

---

तदनंतर वायु ज्याप्रमाणें आकाशाचें अतिक्रमण करून जातो त्याप्रमाणें प्रशस्त रथामध्यें बसून तो कल्याणसंपन्न राजकुमार भरत ज्यामध्यें लोक नेहमीं जात नाहींत अशा अरण्यांतून निघून गेला ८. तदनंतर अंशुधान गांवापाशीं महानदी गंगा तरून जाण्याला दुर्घट आहे असें समजून आल्यावर तो प्राग्वट ह्मणून प्रसिद्ध असलेल्या नगराकडे सत्वर चालता झाला ९. प्राग्वट नगरासमीप गंगा उतरून तो कुटिकोष्टिकानदीसमीप गेला आणि सैन्यासहवर्तमान ती नदी तरून गेल्यावर तो भरत धर्मवर्धन गांवाकडे चालता झाला १०. तोरणनामक गांवाच्या दक्षिण बाजूला असलेल्या जंबुप्रस्थनामक गांवाला तो गेला आणि तो दशरथपुत्र भरत वरूथनामक रम्य ग्रामाकडे चालता झाला ११. तेथें रम्यवनामध्यें वास्तव्य केल्यावर तो भरत प्राङ्मुख वळून प्रियकनामक वृक्ष ज्याठिकाणीं आहेत अशा उज्जिहानानामक नगरीच्या बागेत गेला १२. प्रियकवृक्षासमीप आल्यावर शीघ्र गमन करणारे अश्व भरतानें आपल्या रथाला लाविले आणि (उज्जिहानानामकनगरीपासून आपला मुलूख जवळ असल्या कारणानें भय बाळगण्याचें कारण नसल्यामुळें तुह्मी मागून सावकास या, अशी ) सैन्याला आज्ञा देऊन तो भरत सत्वर पुढें चालता झाला १३. सर्वतीर्थग्रामामध्यें वास्तव्य करून तथील उत्तर गामिनी-नदी आणि इतरही नद्या नानाप्रकारच्या डोंगरी अश्वांच्या योगानें तो तरून गेला १४. पुढें हास्तिपृष्ठक गांवाला आल्यानंतर कुटिकानदीही तो ओलांडून गेला १५. नंतर लोहित्य गांवापाशीं कपीवती, एकसाल गांवापाशीं स्थानुमति आणि विनत गांवापाशीं गोमतीनदी अशा नद्या तरून तो पुरुषश्रेष्ठ भरत पुढें चालला १६. तदनंतर कलिंग नगरामध्यें सालवनापाशीं आल्यावर भरत सत्वर अयोध्येकडे आला असतां

वाहनः १७ वनं च समतीत्याशु शर्वर्यामरुणोदये । अयोध्यां मनुना राज्ञा निर्मितां स ददर्श ह १८ तां पुरीं पुरुषव्याघ्रः सप्तरात्रोषितः पथि । अयोध्यामग्रतो दृष्ट्वा सारथिं चेदमब्रवीत् १९ एषा नातिप्रतीता मे पुण्योद्याना यशस्विनी । अयोध्या दृश्यते दूरात्सारथे पाण्डुमृत्तिका २० यज्विभिर्गुणसंपन्नैर्ब्राह्मणैर्वेदपारगैः । भूयिष्ठमृद्धैराकीर्णा राजर्षिवरपालिता २१ अयोध्यायां पुरा शब्दः श्रूयते तुमुलो महान् । समंतान्नरनारीणां तमद्य न शृणोम्यहम् २२ उद्यानानि हि सायाह्ने क्रीडित्वोपरतैर्नरैः । समंताद्विप्रधावद्भिः प्रकाशन्ते ममान्यथा २३ तान्यद्यानुरुदन्तीव परित्यक्तानि कामिभिः । अरण्यभूतेव पुरी सारथे प्रतिभाति माम् २४ नह्यत्र यानैर्दृश्यन्ते न गजैर्न च वाजिभिः । निर्यान्तो वाभियान्तो वा नरमुख्या यथा पुरा २५ उद्यानानि पुरा भान्ति मत्तप्रमुदितानि च । जनानां रतिसंयोगेष्वत्यन्तगुणवन्ति च २६ तान्येतान्यद्य पश्यामि निरानन्दानि सर्वशः ।

---

त्याचे घोडे अतिशय थकून गेले १७. तथापि, तें वन रातोरातच सत्वर ओलांडून जाऊन अरुणोदयसमयीं मनुराजानें वसविलेली अयोध्यानगरी त्यानें पाहिली १८. मार्गामध्यें सात रात्रीं राहिलेला तो पुरुषश्रेष्ठ भरत पुढें असलेल्या त्या अयोध्यानगरीकडे पाहून सारथ्याला ह्मणाला १९ "हे सारथे, चांगल्या चांगल्या बागांनीं युक्त असलेली ही यशस्विनी अयोध्या मला आनंदित दिसत नाहीं. यथाविधि याग केलेल्या, गुणसंपन्न व वेदपारंगत समृद्ध ब्राह्मणांनीं जरी ही पुष्कळ अंशीं व्याप्त झालेली आहे आणि राजर्षिश्रेष्ठांनीं जरी हिचें रक्षण केलें आहे तरी दुरून ती मला पांढऱ्या मृत्तिकेप्रमाणें निःसत्व दिसत आहे २०,२१. अयोध्येमध्यें असलेल्या स्त्रीपुरुषांची पूर्वी मोठी प्रचंड गडबड सभोंवतीं ऐकूं येत असे ती आज ऐकूं येत नाहीं २२. सायंकाळीं आंत प्रवेश करून व रात्रीं तेथें क्रीडा करून विसावा घेतलेले पुरुष प्रातःकालीं इकडे तिकडे धावाधाव करूं लागले असतां यांच्या योगानें ज्या बागा पूर्वी सुशोभित दिसत असत त्या आज विषयी पुरुषांनीं त्याग केलेल्या व मला पाहून रडत असल्यासारिख्या दिसत आहेत, आणि मला विपरीतच भासत आहेत. व, हे सारथे, ही नगरीही मला अरण्यरूप झाल्यासारिखी भासत आहे २३,२४. रथ, गज अथवा अश्व ह्यांवरून आरूढ होऊन आंत जाणारे अथवा बाहेर येणारे श्रेष्ठ श्रेष्ठ लोक पूर्वीप्रमाणें ह्यांत दिसत नाहींत २५, लोकांच्या रतिक्रीडा चालण्यास अत्यंत अनुकूल अशा ज्या बागा पूर्वी बेगुमान व आनंदित भासत असत त्या आतां सर्व प्रकारें मला आनंदरहित दिसत आहेत; इतकेंच नव्हे परंतु, त्या बागांच्या मार्गासमीप असलेले पर्णरहित वृक्षही

स्रस्तपर्णैरनुपथं विक्रोशद्भिरिव द्रुमैः २७ नाद्यापि श्रूयते शब्दो मत्तानां मृगपक्षिणाम् । स रक्तां मधुरां वाणीं कलं व्याहरतां बहु २८ चन्दनागुरुसंपृक्तधूपसंमूर्छितोमलः । प्रवाति पवनः श्रीमान्किं नु नाद्य यथा पुरा २९ भेरीमृदङ्गवीणानां कोणसंघट्टितः पुनः । किमद्य शब्दो विरतः सदादीनगतिः पुरा ३० अनिष्टानि च पापानि पश्यामि विविधानि च । निमित्तान्यमनोज्ञानि तेन सीदति मे मनः ३१ सर्वथा कुशलं सूत दुर्लभं मम बन्धुषु । तथा ह्यसति संमोहे हृदयं सीदतीव मे ३२ विषण्णः श्रान्तहृदयस्त्रस्तः संलुलितेन्द्रियः । भरतः प्रविवेशाशु पुरीमिक्ष्वाकुपालिताम् ३३ द्वारेण वैजयन्तेन प्राविशच्छ्रान्तवाहनः । द्वाःस्थैरुत्थाय विजयं पृष्टस्तैः सहितो ययौ ३४ स त्वनेकाग्रहृदयो द्वास्थं प्रत्यर्च्य तं जनम् । सूतमश्वपतेः क्लान्तमब्रवीत्तत्र राघवः ३५ किमहं त्वरयानीतः कारणेन विनानघ । अशुभाशङ्कि हृदयं शीलं च पततीव मे ३६ श्रुता

---

आक्रोश करीत असल्यासारिखे दिसत आहेत २६, २७. अतिशय अस्पष्ट रीतीनें अनुरागयुक्त मधुर शब्द करणाऱ्या मत्त पशुपक्ष्यांचा ध्वनि अद्यापि ( सूर्योदय झाला असतांही व आह्मी अगदीं जवळ आलों असतांही ) ऐकण्यांत येत नाहीं २८. चंदन आणि अगुरु ह्यानीं मिश्र असलेला, धूपानें व्याप्त झालेला, निर्मल आणि टवटवी आणणारा असा वायु पूर्वीप्रमाणें आज कां बरें वहात नाहीं ? २९. नगारे, मृदंग आणि वीणा ह्यांचा टिपरें मारून वगैरे निघालेला ध्वनि पूर्वी खेदनाशक तालानें युक्त असलेला अनुभवाला येत असे तो आज कां बरें बंद झाला आहे ? ३०. अनिष्टसूचक असे नानाप्रकारचे क्रूर शकुन मला होत असून वामनेत्रस्फुरणादि अशुभसूचक चिन्हेंही होत आहेत व ह्यामुळें माझें मन खिन्न होत आहे ३१. हे सूता, माझ्या माणसांचें सर्वथा कुशल असणें दुर्लभ आहे. असें जर न ह्मणावें तर कांहीं एक कारण नसतांना माझ्या मनाला कां बरें असा खेद वाटावा ?" ३२. ( ह्याप्रमाणें सारथ्याला सांगितल्यानंतर ) दीन, खिन्न, त्रस्त आणि अंतःकरण क्षुब्ध झालेला भरत इक्ष्वाकुवंशजांनीं परिपालन केलेल्या अयोध्या नगरीमध्यें सत्वर प्रविष्ट झाला ३३. ज्याचे अश्व थकून गेले आहेत असा तो भरत वैजयंतनामक वेशीनें नगरीमध्यें प्रवेश करूं लागला असतां वेशींतील द्वारपालांनीं विजयप्रश्न केल्यावर तो त्यांच्याबरोबर नगरीमध्यें गेला ३४. तदनंतर चित्त स्वस्थ नसलेला तो रघुवंशज भरत त्या द्वारपालांना संमानपूर्वक परत पाठवून अश्वपति केकयराजाच्या श्रमलेल्या सारथ्याला ह्मणाला ३५ " हे निष्पापा, कारणाशिवाय मला येथें सत्वर कां बरें आणिलें ? माझ्या मनाला कांहीं अशुभाची शंका येत असून माझें

नु यादृशाः पूर्वं नृपतीनां विनाशने । आकारांस्तानहं सर्वानिह पश्यामि सारथे ३७ संमार्जनविहीनानि परुषाण्युपलक्षये । असंयतकवाटानि श्रीविहीनानि सर्वशः ३८ बलिकर्मविहीनानि धूपसंमोदनेन च । अनाशितकुटुम्बानि प्रभाहीनजनानि च ३९ अलक्ष्मीकानि पश्यामि कुटुम्बिभवनान्यहम् । अपेतमाल्यशोभानि असंमृष्टाजिराणि च ४० देवागाराणि शून्यानि न भान्तीह यथा पुरा । देवतार्चाः प्रविद्धाश्च यज्ञगोष्ठास्तथैव च ४१ माल्यापणेषु राजन्ते नाद्य पण्यानि वा तथा । दृश्यन्ते वणिजोप्यद्य न यथापूर्वमत्र वै ४२ ध्यानसंविग्नहृदया नष्टव्यापारयन्त्रिताः । देवायतनचैत्येषु दीनाः पक्षिमृगास्तथा ४३ मलिनं चाश्रुपूर्णाक्षं दीनं ध्यानपरं कृशम् । सस्त्रीपुंसं च पश्यामि जनमुत्कण्ठितं पुरे ४४ इत्येवमुक्त्वा भरतः सूतं तं दीनमानसः । तान्यनिष्टान्ययोध्यायां प्रेक्ष्य राज-

---

धैर्य वगैरेही गळत चाललें आहे ३६. कारण, हे सारथे, राजांचा नाश झाला असतां जे प्रकार होत असल्याचें मीं पूर्वी एकिलें आहे ते सर्व मला दिसत आहेत ३७. सडासमार्जन नसल्यामुळें कुटुंबी लोकांचीं घरें भयंकर दिसत आहेत, त्यांचीं दारें अस्ताव्यस्त उघडींच पडलीं आहेत व कसल्याही प्रकारची शोभा त्यांना राहिलेली नाहीं ३८. ह्या घरांतून कोठें पूजाअर्चा चाललेली दिसत नाहीं; धूपांचा सुगंधही ह्यांतून येत नाहीं, आंतील कुटुंबेही जेवल्यासारिखीं दिसत नाहींत, आंतील लोक निस्तेज दिसत आहेत ३९ आणि ह्मणूनच हीं कुटुंबी लोकांचीं घरें मला लक्ष्मीरहित वाटत आहेत. त्याचप्रमाणें पुष्पांचा शोभा नाहींशी झाली असून आंतील पटांगणेंही झाडलीं नसल्यामुळें ४० हीं शून्य देवालयें पूर्वीप्रमाणें मला येथें दिसत नाहींत. देवतांच्या पूजा बंद झाल्यासारिख्या दिसत आहेत आणि यज्ञशालाही यज्ञरहित दिसत आहेत ४१. पुष्पांच्या बाजारामध्यें पुष्पांच्या वस्तु मांडलेल्या आज दिसत नाहींत आणि व्यापारी लोकही पूर्वीप्रमाणें आज येथें आढळत नाहींत ४२. खरेदी, विक्री वगैरे व्यापार नाहींसा झाल्यामुळें लोकांनीं आपआपलीं दुकानें लाविलेलीं आहेत आणि मनामध्यें चिंताक्रांत होऊन दीन झालेले हे लोक देवालयांतून व पारावरून दृष्टीं पडत आहेत आणि नगरींतील पशुपक्षीही दीन झालेले दिसत आहेत ४३. सारांश, स्त्रीपुरुषांसहवर्तमान नगरांतील लोक मलिन, अश्रुपूर्ण नेत्रांनीं युक्त, दीन, चिंताक्रांत व कृश दिसत असून स्त्रीपुरुषांसहवर्तमान सर्वही प्रजाजनांना हुरहुर लागल्यासारखी दिसत आहे " ४४. ह्याप्रमाणें मनामध्यें खिन्न झालेला तो भरत त्या सारथ्याला सांगून आणि अयोध्येमध्यें तीं अनिष्टसूचक चिन्हें अवलोकन करून राज-

गृहं ययौ ४५ तां शून्यशृङ्गाटकवेश्मरथ्यां रजोरुणद्वारकवाटयन्त्राम् । दृष्ट्वा पुरीमिन्द्रपुरीप्रकाशां दुःखेन संपूर्णतरो बभूव ४६ बभूव पश्यन्मनसाप्रियाणि यान्यन्यदा नास्य पुरे बभूवुः । अवाक्शिरा दीनमना न हृष्टः पितुर्महात्मा प्रविवेश वेश्म ४७ [२७९०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकसप्ततितमः सर्गः ॥ ७१ ॥

अपश्यंस्तु ततस्तत्र पितरं पितुरालये । जगाम भरतो द्रष्टुं मातरं मातुरालये १ अनुप्राप्तं तु तं दृष्ट्वा कैकेयी प्रोषितं सुतम् । उत्पपात तदा हृष्टा त्यक्त्वा सौवर्णमासनम् २ स प्रविश्यैव धर्मात्मा स्वगृहं श्रीविवर्जितम् । भरतः प्रेक्ष्य जग्राह जनन्याश्चरणौ शुभौ ३ तं मूर्ध्नि समुपाघ्राय परिष्वज्य यशस्विनम् । अङ्के भरतमारोप्य प्रष्टुं समुपचक्रमे ४ अद्य ते कतिचिद्रात्र्यश्च्युतस्यार्यकवेश्मनः । अपि नाध्वश्रमः शीघ्रं रथेनापततस्तव ५ आर्यकस्ते सुकुशली युधाजिन्मातुलस्तव । प्रवासाच्च

---

वाड्याकडे गेला ४५. सारांश, इंद्राच्या अमरावतीनगरीप्रमाणें असलेल्या त्या आपल्या अयोध्यानगरींतील चौक, घरें आणि मार्ग अगदीं सामसूम झाले आहेत आणि आंतील दरवाजे हा मळानें काळवंडून गेले आहेत असें अवलोकन केल्यावर त्या भरताला दुःखाचें अतिशयच भरतें आलें ४६. पूर्वी आपल्या नगरामध्यें कधींही दृष्टोत्पत्तीस न आलेले असे मनाला प्रिय नसलेले प्रकार अवलोकन करणाऱ्या त्या भरतानें आपली मान खालीं घातली आणि मनामध्यें खिन्न झालेला तो हर्षरहित महात्मा भरत आपल्या पित्याच्या गृहामध्यें प्रविष्ट झाला ४७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकाहत्तरावा सर्ग समाप्त झाला॥७१॥

पितृगृहीं गेल्यावर तेथें पिता दृष्टीं पडत नाहीं असें पाहून भरत मातेचें दर्शन घेण्याकरितां मातेच्या घरीं गेला १. तेव्हां परगांवीं गेलेला तो आपला पुत्र परत आलेला पहातांक्षणीं कैकेयी आनंदित झाली आणि सुवर्णमंचक सोडून देऊन त्याच्याकडे धांवली २. आंत प्रविष्ट होतांक्षणींच शोभारहित झालेलें मातृगृह अवलोकन करून त्या धर्मात्म्या भरतानें आपल्या मातेचे पवित्र चरण धरिले ३. तेव्हां त्याचें मस्तकीं अवघ्राण करून कैकेयीनें त्या यशस्वी भरताला आलिंगन दिलें आणि त्याला मांडीवर घेऊन ती त्याला विचारूं लागली ४ " आजोबांच्या घरून निघून आज तुला किती दिवस झाले ? रथांत बसून धांवपळ करीत सत्वर आल्यामुळें तुला प्रवासाचे श्रम झाले नाहींत ना ? ५. तुझे आजोबा व तुझा मामा युधाजित हे चांगले कुशल आहेत ना ? हे पुत्रा, येथून तूं प्रवासाला गेल्यापासून अजोळीं तुला सुख झालें किंवा नाहीं

एवं पुत्र सर्वं मे वक्तुमर्हसि ६ एवं पृष्टस्तु कैकेय्या प्रियं पार्थिवनन्दनः। आचष्ट भरतः सर्वं मात्रे राजीवलोचनः ७ अद्य मे सप्तमी रात्रिश्च्युतस्यार्यकवेश्मनः । अम्बायाः कुशली तातो युधाजिन्मातुलश्च मे ८ यन्मे धनं च रत्नं च ददौ राजा परन्तपः । परिश्रान्तं पथ्यभवत्ततोऽहं पूर्वमागतः ९ राजवाक्यहरैर्दूतैस्त्वर्यमाणोऽहमागतः । यदहं प्रष्टुमिच्छामि तदम्बा वक्तुमर्हति १० शून्योऽयं शयनीयस्ते पर्यङ्को हेमभूषितः । न चायमिक्ष्वाकुजनः प्रहृष्टः प्रतिभाति मे ११ राजा भवति भूयिष्ठमिहाम्बाया निवेशने । तमहं नाद्य पश्यामि द्रष्टुमिच्छन्निहागतः १२ पितुर्ग्रहीष्ये पादौ च तं ममाख्याहि पृच्छतः । आहोस्विदम्ब ज्येष्ठायाः कौसल्याया निवेशने १३ तं प्रत्युवाच कैकेयी प्रियवद्घोरमप्रियम् । अजानन्तं प्रजानन्ती राज्यलोभेन मोहिता १४ या गतिः सर्व[illegible] तां गतिं ते पिता गतः । राजा महात्मा तेजस्वी यायजूकः सतां गतिः १५ तच्छ्रुत्वा भरतो वाक्यं धर्माभिजनवाञ्छुचिः । पपात सहसा भूमौ पितृशोकबलार्दितः १६ हा

---

हें सर्व तूं मला सांग" ६. ह्याप्रमाणें कैकयीनें विचारिलें असतां त्या कमलनयन राजकुमार भरतानें आपल्या मातेला सर्व कांहीं प्रिय वृत्तांत कथन केला ७. (तो ह्मणाला) "आजोबांच्या घरून मी निघाल्याला आज सातवा दिवस. माझे आजोबा व मामा युधाजित् हे खुशाल आहेत ८. शत्रुतापन केकयराजानें जें धन व रत्नें मला दिलीं होतीं तीं ओढून आणणारीं वाहनें मार्गांत थकून गेलीं आणि ह्मणून मी पुढें निघून आलों ९. सारांश, राजाचा निरोप घेऊन येणाऱ्या दूतांनीं त्वरा केल्यामुळें मी आलों आहें. तेव्हां मला जें विचारावेंसें वाटतें तें मातेनें सांगावें १०. हा तुझा शयन करण्याचा सुवर्णभूषित पलंग आज शून्य दिसत आहे आणि इक्ष्वाकुकुलांतील हे लोकही आज मला आनंदित दिसत नाहींत ११. येथें मातेच्या घरामध्येंच प्रायः राजा असतो; परंतु, आज त्याचें दर्शन घेण्याकरितां मी येथें आलों असतांना तो कोठें माझ्या दृष्टीं पडत नाहीं १२. मला [illegible] पाय धरावयाचे आहेत. तेव्हां तो कोठें आहे हें मी विचारीत आहें, तें मला सांग. ज्येष्ठ माता कौसल्येचे घरीं तो आहे काय?" १३. (ह्याप्रमाणें त्यानें विचारिलें असतां) राज्यलोभानें मोहित झालेली व सर्व कांहीं जाणीत असलेली ती कैकेयी पूर्वीं घडलेला वृत्तांत जाणीत नसलेल्या त्या भरताला घोर आणि अप्रिय असलेलाही तो वृत्तांत प्रिय असल्यासारिखा सांगूं लागली १४. (ती ह्मणाली) "सर्व प्राण्यांची जी वाट होत असते ती तेजस्वी, यज्ञशील व महात्म्या अशा तुझ्या भूपति पित्याची झाली आहे" १५. तें मातेचें भाषण श्रवण करितांक्षणीं

हतोस्मीति कृपणं दीनां वाचमुदीरयन्। निपपात महाबाहुर्बाहू विक्षिप्य वीर्यवान् १७ ततः शोकेन संवीतः पितुर्मरणदुःखितः। विललाप महातेजा भ्रान्ताकुलितचेतनः १८ एतत्सुरुचिरं भाति पितुर्मे शयनं पुरा। शशिनेवामलं रात्रौ गगनं तोयदात्यये १९ तदिदं न विभात्यद्य विहीनं तेन धीमता। व्योमेव शशिना हीनमप्शुष्क इव सागरः २० बाष्पमुत्सृज्य कण्ठेण स्वात्मना परिपीडितः। प्रच्छाद्य वदनं श्रीमद्वस्त्रेण जयतां वरः २१ तमार्तं देवसंकाशं समीक्ष्य पतितं भुवि। निकृत्तमिव सालस्य स्कन्धं परशुना वने २२माता मातङ्गसंकाशं चन्द्रार्कसदृशं सुतम्। उत्थापयित्वा शोकार्तं वचनं चेदमब्रवीत् २३ उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे राजन्नत्र महायशः। त्वद्विधा नहि शोचन्ति सन्तः सदसि संमताः २४ दानयज्ञाधिकारा हि शीलश्रुतितपोनुगा। बुद्धिस्ते बुद्धिसंपन्न प्रभेवार्कस्य मन्दिरे २५ स रुदित्वा चिरं कालं भूमौ परिविवृत्य च। जननीं

---

आचरणानें पवित्र व धर्मनिष्ठ वंशांत उत्पन्न झालेला तो भरत पितृशोकाच्या वेगानें घेरून जाऊन एकाएकीं भूमीवर पडला १६. "हाय हाय! माझा घात झाला!" असे करुणा उत्पन्न करणारे दीन शब्द उच्चारीत उच्चारीत तो महापराक्रमी वीर्यवान् भरत हात अपटून भूमीवर पडला असतां १७ पितृमरणानें दुःखित झाल्यामुळें शोकाकुल होऊन अनवस्थित आणि व्याकुल चित्तानें युक्त झालेला तो महातेजस्वी भरत विलाप करूं लागला कीं १८, "मेघ निघून गेल्यावर चंद्राच्या योगानें रात्रीं शोभणाऱ्या निर्मल आकाशाप्रमाणें जी ही माझ्या पित्याची शय्या अत्यंत मनोहर दिसत असे १९ ती आज त्यानें रहित झाल्यामुळें चंद्ररहित आकाशाप्रमाणें अथवा शुष्क सागराप्रमाणें निस्तेज दिसत आहे" २०. मनामध्यें अतिशय दुःखित झालेला तो विजयीश्रेष्ठ भरत वस्त्रानें आपलें सुंदर मुख आच्छादित करून आणि रडत रडत अश्रु ढाळून ह्याप्रमाणें विलाप करूं लागला २१. तेव्हां कुऱ्हाडीनें तुटून जाऊन वनामध्यें पडलेल्या शाल वृक्षाच्या खोडाप्रमाणें दुःखाकुल होऊन भूमीवर पडलेल्या देवतुल्य भरताला अवलोकन केल्यावर कैकेयीमातेनें, गतीनें गजतुल्य आणि तेजानें चंद्रसूर्यासमान असलेल्या, आपल्या पुत्राला भूमीवरून उठविलें आणि ती माता कैकेयी शोकाकुल झालेल्या त्या भरताला ह्मणाली २२,२३ "हे महाकीर्तिमान् राजा, ऊठ; ऊठ; असा येथें पडलास कां? अरे, सभेमध्यें संमत असलेले तुझ्यासारिखे सज्जन शोक करीत नसतात २४. हे बुद्धिमान् पुत्रा, दान व यज्ञ ह्यांकडेच असलेली तुझी बुद्धि ज्याप्रमाणें सूर्याची प्रभा सूर्यमंडलाला अनुसरून असते त्याप्रमाणें सद्वर्तन, विद्या

प्रत्युवाचेदं शोकैर्बहुभिरावृतः २६ अभिषेक्ष्यति रामं तु राजा यज्ञं नु यक्ष्यते । इत्यहं कृतसंकल्पो हृष्टो यात्रामयासिषम् २७ तदिदं ह्यन्यथाभूतं व्यवदीर्णं मनो मम । पितरं यो न पश्यामि नित्यं प्रियहिते रतम् २८ अम्ब केनात्यगाद्राजा व्याधिना मय्यनागते । धन्या रामादयः सर्वे यैः पिता संस्कृतः स्वयम् २९ न नूनं मां महाराजः प्राप्तं जानाति कीर्तिमान् । उपजिघ्रेत्तु मां मूर्ध्नि तातः संनाम्य सत्वरम् ३० क्व स पाणिः सुखस्पर्शस्तातस्याक्लिष्टकर्मणः । यो हि मां रजसा ध्वस्तमभीक्ष्णं परिमार्जति ३१ यो मे भ्राता पिता बन्धुर्यस्य दासोस्मि संमतः । तस्य मां शीघ्रमाख्याहि रामस्याक्लिष्टकर्मणः ३२ पिता हि भवति ज्येष्ठो धर्ममार्यस्य जानतः । तस्य पादौ ग्रहीष्यामि स हीदानीं गतिर्मम ३३ धर्मविद्धर्मशीलश्च महाभागो दृढव्रतः । आर्ये किमब्रवीद्राजा पिता मे सत्यविक्रमः ३४ पश्चिमं साधुसंदेशमिच्छामि श्रोतुमात्मनः । इति पृष्टा यथा-

---

व तप ह्यांना अनुसरून आहे " २५. ( ह्याप्रमाणें कैकयीनें सांगितलें असतांही ) अनेक प्रकारच्या शोकांनीं व्याकुल झालेला तो भरत पुष्कळ वेळपर्यंत रडून आणि भूमीवर लोळून आपल्या मातेला ह्मणाला २६ " ( दूत जेव्हां मला तेथें त्वरेनें आणूं लागले तेव्हां ) राजा रामाला राज्याभिषेक तरी करीत असला पाहिजे किंवा यज्ञ तरी करीत असला पाहिजे असा मीं मनामध्यें संकल्प केला आणि आनंदित होऊन येथें निघून आलों २७; परंतु, तें हें सर्वच विपरीत झाल्यामुळें माझें मन विदीर्ण होऊन गेलें आहे. कारण, नेहमीं प्रिय आणि हित करण्याविषयीं रत असलेला पिता आज माझ्या दृष्टीं पडत नाहीं २८. हे माते, मी येथें नसतांना कोणत्या रोगानें राजा गेला बरें ! ज्यांनीं आपल्या पित्याचा स्वतः संस्कार केला ते रामप्रभृति धन्य होत २९. त्या कीर्तिमान् महाराजाची आज खरोखर वार्ताच नाहीं. नाहींतर माझें मस्तक लववून पित्यानें सत्वर माझें मस्तकीं अवघ्राण केलें असतें ३०. धुळीनें मी भरून गेलों असतां झाडून टाकणारा व स्पर्श झाला असतां सुखदायक वाटणारा तो उत्कृष्ट कर्म करणाऱ्या पित्याचा हात कोठें आहे ! ३१. जो माझा भ्राता, पिता व बंधू असून ज्याचा मी दास ह्मणून ठरलेलें आहे त्या उत्कृष्ट कर्म करणाऱ्या रामाला मी आल्याचें सत्वर निवेदन कर ३२. कारण, धर्मवेत्त्या सभ्य पुरुषाचा ज्येष्ठ भ्राता हाच पिता होय. तेव्हां मी त्याचे पाय धरीन. आतां तोच माझा आधार आहे ३३. हे श्रेष्ठ माते, धर्मशील, महाभाग्यवान्, स्वीकारिलेलें व्रत निश्चयपणें चालविणारा आणि अमोघ पराक्रमी असा माझा पिता काय ह्मणाला ? ३४. माझ्या

तत्त्वं कैकेयी वाक्यमब्रवीत् ३५ रामेति राजा विलपन्हा सीते लक्ष्मणेति च । स महात्मा परं लोकं गतो मतिमतां वरः ३६ इतीमां पश्चिमां वाचं व्याजहार पिता तव । कालधर्म परिक्षिप्तः पाशैरिव महागजः ३७ सिद्धार्थास्तु नरा राममागतं सह सीतया । लक्ष्मणं च महाबाहुं द्रक्ष्यन्ति पुनरागतम् ३८ तच्छ्रुत्वा विषसादैवं द्वितीयाप्रियशंसनात् । विषण्णवदनो भूत्वा भूयः पप्रच्छ मातरम् ३९ क्व चेदानीं स धर्मात्मा कौसल्यानन्दवर्धनः । लक्ष्मणेन सह भ्रात्रा सीतया च समागतः ४० तथा पृष्टा यथान्यायमाख्यातुमुपचक्रमे । मातास्य युगपद्वाक्यं विप्रियं प्रियशंसया ४१ स हि राजसुतः पुत्र चीरवासा महावनम् । दण्डकान्सह वैदेह्या लक्ष्मणानुचरो गतः ४२ तच्छ्रुत्वा भरतस्त्रस्तो भ्रातुश्चारित्रशङ्कया । स्वस्य वंशस्य माहात्म्यात्प्रष्टुं समुपचक्रमे ४३ कच्चिन्न ब्राह्मणधनं हृतं रामेण कस्यचित् । कच्चिन्नाढ्यो दरिद्रो वा तेनापापो विहिं-

---

नां ? ४४ संबंधानें जो कांहीं त्यानें चांगला निरोप सांगितला असेल तो श्रवण करण्याची माझी इच्छा आहे." ह्याप्रमाणें भरतानें विचारिलें असतां कैकेयी त्याला खरें खरें सांगूं लागली कीं ३५, "हे रामा, हे सीते, अरे लक्ष्मणा, असा विलाप करीत करीत बुद्धिमानांत श्रेष्ठ असलेला तो महात्मा भूपति परलोकीं गेला ३६. पाशांनीं बद्ध झालेल्या महागजाप्रमाणें मरणधर्मानें ग्रस्त झालेल्या तुझ्या पित्यानें—सीतेसहवर्तमान आलेल्या रामाला आणि परत आलेल्या महापराक्रमी लक्ष्मणाला जे पुरुष अवलोकन करतील ते धन्य होत—असेंही शेंवटलें भाषण केलें आहे"३७, ३८. हें कैकेयीचें भाषण ऐकून दुसरी अप्रिय गोष्ट तिनें सांगितल्यामुळें तो खिन्न झाला आणि दीनवदन होऊन पुनरपि मातेला ह्मणाला ३९ "कौसल्येचा आनंद वृद्धिंगत करणारा तो धर्मात्मा, भ्राता लक्ष्मण आणि सीता ह्यांच्या बरोबर, सध्यां कोठें गेला आहे ?" ४०. असें भरतानें विचारिलें असतां त्याची माता, आपण सांगणार ही गोष्ट भरताला मोठी प्रिय होईल ह्या उद्देशानें, दुसरें एक अप्रिय वृत्त त्याला यथायोग्य रीतीनें एकदम सांगूं लागली कीं ४१, "हे पुत्रा, राजकुमार राम लक्ष्मणासहवर्तमान सीतेला बरोबर घेऊन आणि वल्कलें परिधान करून दंडकानामक महावनामध्यें गेला" ४२. हें श्रवण करून भ्रात्याच्या वर्तनाविषयीं शंका आल्यानें भरत त्रासून गेला आणि आपल्या वंशाचा मोठेपणा मनांत आणून तिला विचारूं लागला ४३ "रामानें कोणा एकाद्या ब्राह्मणाचें धन तर हरण केलें नाहीं ना ? अथवा एकाद्या निरुपद्रवी धनाढ्याचा किंवा गरीबाचा त्यानें प्राण घेतला नाहीं नां? ४४.

सितः ४४ कच्चिन्न परदारान्वा राजपुत्रोभिमन्यते । कस्मात्स दण्डकारण्ये भ्राता रामो विवासितः ४५ अथास्य चपला माता तत्स्वकर्म यथातथम् । तेनैव स्त्रीस्वभावेन व्याहर्तुमुपचक्रमे ४६ एवमुक्ता तु कैकेयी भरतेन महात्मना । उवाच वचनं हृष्टा वृथापण्डितमानिनी ४७ न ब्राह्मणधनं किंचिद्धृतं रामेण कस्यचित् । कश्चिन्नाढ्यो दरिद्रो वा तेनापापो विहिंसितः । न रामः परदारान्स चक्षुर्भ्यामपि पश्यति ४८ मया तु पुत्र श्रुत्वैव रामस्येहाभिषेचनम् । याचितस्ते पिता राज्यं रामस्य च विवासनम् ४९ स स्ववृत्तिं समास्थाय पिता ते तत्तथाकरोत् । रामस्तु सहसौमित्रिः प्रेषितः सह सीतया ५० तमपश्यन्प्रियं पुत्रं महीपालो महायशाः । पुत्रशोकपरिद्यूनः पञ्चत्वमुपपेदिवान् ५१ त्वया त्विदानीं धर्मज्ञ राजत्वमवलम्ब्यताम् । त्वत्कृते हि मया सर्वमिदमेवंविधं कृतम् ५२ मा शोकं मा च संतापं धैर्यमाश्रय पुत्रक । त्वदधीना हि नगरी राज्यं चैतदनामयम् ५३ तत्पुत्र शीघ्रं विधिना विधिज्ञैर्वसिष्ठमुख्यैः सहितो द्विजेन्द्रैः । संकाल्य राजा-

---

किंवा एकाद्या परस्त्रीवर तर डोळा ठेविला नाहीं ना ! त्या माझ्या भ्रात्या रामाला दंडकारण्यामध्यें कशाकरितां हांकून दिलें आहे ?" ४५. असें भरतानें विचारिल्यानंतर उतावीळ झालेली त्याची माता त्याच स्त्रीस्वभावामुळें स्वतःचें तें कर्म त्याला इत्थंभूत सांगूं लागली ४६. सारांश, ह्याप्रमाणें महात्म्या भरतानें प्रश्न केला असतां स्वतःला विनाकारण शहाणी समजत असलेली कैकेयी आनंदित होऊन त्याला ह्मणाली ४७ " रामानें कोणाचेंही ब्रह्मस्वाचा अपहार केला नाहीं; त्यानें निरपराधी अशा धनाढ्य पुरुषाचा अथवा दरिद्र्याचा प्राणही घेतला नाहीं आणि परस्त्रीकडे तर राम कधीं नेत्रांनीं पहात देखील नाहीं ४८; परंतु, हे पुत्रा, रामाला येथें अभिषेक होणार हें ऐकतांक्षणीं तुला राज्य आणि रामाला वनवास हे दोन वर मीं तुझ्या पित्यापासून मागून घेतले ४९ व ( दिलेलें वचन खरें करणें ह्या ) आपल्या वर्तनाचें अवलंबन करून तुझ्या पित्यानें तसें केलें आणि लक्ष्मणासहवर्तमान राम सीतेसहवर्तमान अरण्यांत निघून गेला ५०. तेव्हां आपला प्रिय पुत्र दृष्टीआड झाल्यामुळें पुत्रशोकानें अगदीं खंगून गेलेला तो महाकीर्तिमान् भूपति मृत्यु पावला ५१. आतां, हे धर्मज्ञ भरता, तूं राजत्वाचा स्वीकार कर; तुझ्याचकरितां मी हा सर्व अशा प्रकारचा खटाटोप केला आहे ५२. आतां शोक व संताप न करितां, हे पुत्रा, धैर्याचें अवलंबन कर. अयोध्यानगरी आणि हें निष्कंटक राज्य हीं दोन्हीं तुझ्या आधीन आहेत ५३. तस्मात्, हे पुत्रा, शास्त्रज्ञ अशा वसिष्ठप्रभृति द्विजश्रेष्ठांसहवर्त-

नमदीनसत्त्वमात्मानमुर्व्यामभिषेचयस्व ५४[२८४४]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्विसप्ततितम सर्गः ॥ ७२ ॥

श्रुत्वा च स पितुर्वृत्तं भ्रातरौ च विवासितौ । भरतो दुःखसंतप्त इदं वचनमब्रवीत् १ किं नु कार्यं हतस्येह मम राज्येन शोचतः । विहीनस्याथ पित्रा च भ्रात्रा पितृसमेन च २ दुःखे मे दुःखमकरोर्व्रणे क्षारमिवाददाः । राजानं प्रेतभावस्थं कृत्वा रामं च तापसम् ३ कुलस्य त्वमभावाय कालरात्रिरिवागता । अङ्गारमुपगुह्य स्म पिता मे नावबुद्धवान् ४ मृत्युमापादितो राजा त्वया मे पापदर्शिनि । सुखं परिहृतं मोहात्कुलेस्मिन्कुलपांसनि ५ त्वां प्राप्य हि पिता मेद्य सत्यसंधो महायशाः । तीव्रदुःखाभिसंतप्तो वृत्तो दशरथो नृपः ६ विनाशितो महाराजः पिता मे धर्मवत्सलः । कस्मात्प्रव्राजितो रामः कस्मादेव वनं गतः ७ कौसल्या च सुमित्रा च पुत्रशोकाभिपीडिते । दुष्करं यदि जीवेतां प्राप्य त्वां जननीं मम ८ नन्वार्योपि च धर्मात्मा त्वयि वृत्तिमनुत्तमाम् । वर्तते गुरुवृत्तिज्ञो

---

मान तूं महात्म्या राजाचा यथाविधि और्ध्वदेहिक संस्कार कर व आपल्याला पृथ्वीचा रा[illegible]याभिषेक करून घे " ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदि[illegible]काव्यांतील अयोध्याकांडापैकीं बाहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७२ ॥

पित्याचें मरण आणि भ्रात्यांना वनवासांत घालवून देणें हें ऐकून दुःखानें संतप्त झालेला तो भरत कैकेयीला ह्मणाला १ " पिता आणि पितृतुल्य भ्राता ह्यांचा वियोग होऊन सर्वस्वी घात झाल्यामुळें शोक करीत बसलेल्या मला आतां ह्या जगतामध्यें राज्याशीं काय कर्तव्य आहे ? २. राजाला मारून आणि रामाला तापस बनवून तूं माझ्या दुःखावर डाग दिला आहेस आणि व्रणावर क्षार घातला आहेस ३. आमच्या कुलाचा घात करण्याकरितां तूं एक कालरात्रिच प्राप्त झाली आहेस आणि तुला आलिंगन दिल्यानें आपण ( स्वतःला दग्ध करून टाकणाऱ्या ) अंगाराला कवटाळीत आहोंत हें माझ्या पित्याला समजलें नाहीं ४. हे पापिणि, तूं माझ्या राजाला मृत्यु आणिलास आणि, हे कुलकलंकिनि, तूं मोहामुळें ह्या कुलांतील सुखावर धाड आणिलीस ५. माझा सत्यप्रतिज्ञ व महाकीर्तिमान् पिता दशरथराजा तुझें अवलंबन केल्यामुळें दुःसह दुःखानें संतप्त होऊन मृत्यु पावला ६. माझ्या धर्मवत्सल महाराज पित्याचा तूं कां नाश केलास, रामाला तूं कशाकरितां वनामध्यें पाठविलेस आणि तो तरी कां ह्मणून वनामध्यें गेला ! ७ माझी जननी जी तूं त्या तुझ्याशीं प्रसंग पडल्यावर पुत्रशोकानें संतप्त झालेल्या कौसल्या व सुमित्रा जर जिवंत

यथा मातरि वर्तेत ९ तथा ज्येष्ठा हि मे माता कौसल्या दीर्घदर्शिनी । त्वयि धर्मं समास्थाय भगिन्यामिव वर्तते १० तस्याः पुत्रं महात्मानं चीरवल्कलवाससम् । प्रस्थाप्य वनवासाय कथं पापे न शोचसे ११ अपापदर्शिनं शूरं कृतात्मानं यशस्विनम् । प्रव्राज्य चीरवसनं किं नु पश्यसि कारणम् १२ लुब्धाया विदितो मन्ये न तेऽहं राघवं यथा । तथा ह्यनर्थो राज्यार्थं त्वया नीतो महानयम् १३ अहं हि पुरुषव्याघ्रावपश्यन्रामलक्ष्मणौ । केन शक्तिप्रभावेण राज्यं रक्षितुमुत्सहे १४ तं हि नित्यं महाराजो बलवन्तं महौजसम् । उपाश्रितोऽभूद्धर्मात्मा मेरुर्मेरुवनं यथा १५ सोऽहं कथमिमं भारं महाधुर्यसमुद्यतम् । दम्यो धुरमिवासाद्य सहेयं केन चौजसा १६ अथवा मे भवेच्छक्तिर्योगैर्बुद्धिबलेन वा । सकामां न करिष्यामि त्वामहं पुत्रगर्धिनीम् १७ न मे विकाङ्क्षा जायेत त्यक्तुं

---

रहातील ह्मणावें तर तेंही दुर्लभ दिसतें ८. खरोखर वडिलांशीं कसें वागावें हें जाणणारा धर्मात्मा श्रेष्ठ रामही कौसल्या मातेप्रमाणें तुझ्याशीं उत्कृष्ट रीतीनें वागत होता ९ आणि ती दूरवर विचार करून पहाणारी माझी ज्येष्ठ माता कौसल्याही धर्माचें अवलंबन करून तुझ्याशीं अगदीं बहिणीप्रमाणें वागत असते १०. तेव्हां तिच्या महात्म्या पुत्राला, झाडाच्या सालीं व वल्कलें परिधान करावयास लाविल्यानंतर, अरण्यांत पाठवून, हे पापिणि, तुला वाईट कसें वाटत नाहीं ! ११. वाईट गोष्ट मनामध्येंही न आणणारा, शूर, जितेंद्रिय आणि यशस्वी अशा रामाला चीर वस्त्रें परिधान करावयाला लावून अरण्यांत हांकून दिल्यावर तुला काय बरें फलप्राप्ति दृष्टीं पडत आहे ! १२. रामाशीं माझें वर्तन कसें आहे हें राज्यलुब्ध झालेल्या तुला समजलें नाहीं असें मला वाटतें. खरोखर राज्याकरितां तूं हा मोठा अनर्थच उत्पन्न केला आहेस १३. पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण दृष्टीं पडत नसतांना कोणत्या शक्तीच्या प्रभावानें राज्यरक्षण करण्याचा मी उत्साह धरूं ? १४. मेरुपर्वत ज्याप्रमाणें स्वतः उत्पन्न केलेल्या मेरुवनावरच स्वरक्षणार्थ अवलंबून राहिलेला असतो त्याचप्रमाणें धर्मात्मा महाराज त्या महातेजस्वी बलाढ्य रामावरच नेहमीं अवलंबून रहात होता १५. तेव्हां मोठमोठ्या धुरीच्या बलांनीं उचललेलें जूं ज्याप्रमाणें वांसराच्या मानेवर ठेविलें असतां त्याला तें सहन करितां येत नाहीं त्याचप्रमाणें हा राज्यभार मी कोणत्या बलानें सहन करूं ? १६. अथवा योगसाधनांनीं किंवा बुद्धिसामर्थ्यानें जरी मला राज्य हांकण्याची शक्ति आली तरी पुत्राकरितां राज्याचा अभिलाष करणाऱ्या तुझा मनोरथ मी कधींही सिद्धिस नेणार नाहीं १७. राम जर तुला नेहमीं मातेप्रमाणें मानीत नसता तर दुष्ट हेतु मनांत

त्वां पापनिश्चयाम् । यदि रामस्य नावेक्षा त्वयि स्यान्मातृवत्सदा १८ उत्पन्ना तु कथं बुद्धिस्तवेयं पापदर्शिनि । साधुचारित्रविभ्रष्टे पूर्वेषां नो विगर्हिता १९ अस्मिन्कुले हि सर्वेषां ज्येष्ठो राज्येऽभिषिच्यते । अपरे भ्रातरस्तस्मिन्प्रवर्तन्ते समाहिताः २० न हि मन्ये नृशंसे त्वं राजधर्ममवेक्षसे । गतिं वा न विजानासि राजवृत्तस्य शाश्वतीम् २१ सततं राजपुत्रेषु ज्येष्ठो राजाभिषिच्यते । राज्ञामेतत्समं तत्स्यादिक्ष्वाकूणां विशेषतः २२ तेषां धर्मैकरक्षाणां कुलचारित्रशोभिनाम् । अद्य चारित्रशौटीर्यं त्वां प्राप्य विनिवर्तितम् २३ तवापि सुमहाभागे जनेन्द्रकुलपूर्वके । बुद्धिमोहः कथमयं संभूतस्त्वयि गर्हितः २४ न तु कामं करिष्यामि तवाहं पापनिश्चये । यया व्यसनमारब्धं जीवितान्तकरं मम २५ एषा त्विदानीमेवाहमप्रियार्थं तवानघे । निवर्तयिष्यामि वनाद्भ्रातरं स्वजनप्रियम् २६ निव-

---

धरून असलेल्या तुझा त्याग करण्यास मला कधींच शंका आली नसती; ( परतु, राम तुला स्वतःच्या मातेप्रमाणें समजत आहे. तेव्हां तुझा मीं त्याग केला असतां त्यालाही दुःख होणार ह्मणून येथें माझा निरुपायच झाला आहे) १८. हे सदाचरणापासून भ्रष्ट झालेली दुष्ट, आमच्या पूर्वजांनीं निंद्य मानिलेला हा (कनिष्ठाला राज्याभिषेक करण्याचा) विचार तुझ्या मनामध्यें आला कसा ? १९. ह्या कुलामध्यें जो सर्वांमध्यें ज्येष्ठ असेल त्यालाच राज्याचा अभिषेक होत असतो आणि दुसरे कनिष्ठ भ्राते त्याच्या आधीन होऊन वागत असतात २०. हे दुष्टे, तूं राजधर्म जाणीत आहेस असें मला वाटत नाहीं आणि राजधर्माचें निश्चित फलही तुला विदित आहे असें दिसत नाहीं २१. राजकुमारांमध्यें जो ज्येष्ठ असेल त्यालाच नेहमीं राज्याभिषेक होत असतो; ही गोष्ट सर्व राजांना सारखीच लागू असून इक्ष्वाकुकुलांतील राजांमध्यें तर विशेषेंकरून हा नियमच आहे २२. केवल धर्मानेंच ज्यांचें रक्षण झालेलें आहे आणि कुलपरंपरागत आलेल्या आचारानेंच ज्यांना शोभा आलेली आहे त्यांचा सद्वर्तनसंबंधीं गर्व तुझ्याशीं प्रसंग पडल्यामुळें आज नाहींसा झाला २३. हे अत्यंत महाभाग्यवति, केकयराजाच्या कुलाचा मूळ पुरुष जनेंद्र होता. तेव्हां अशा कुलामध्यें तूं उत्पन्न झाली असूनही सज्जनांनीं निंद्य [illegible] हा बुद्धिभ्रम तुला कसा झाला ? २४. हे दुष्टबुद्धि, मी तुझी इच्छा [illegible] परिपूर्ण करणार नाहीं; तूं माझ्या जीविताचा अंत करणारं संकट उत्पन्न केलें आहेस २५. हे निष्पापे, हा मी आतांच्या आतांच तुझें अप्रिय करण्याकरितां स्वजनांना प्रिय असलेल्या आपल्या भ्रात्याला वनांतून परत आणितों २६. रामाला परत आणिल्यावर त्या उज्ज्वल, तेजस्वी ज्येष्ठ

र्तयित्वा रामं च तस्याहं दीप्ततेजसः । दासभूतो भविष्यामि सुस्थितेनान्तरात्मना २७ इत्येवमुक्त्वा भरतो महात्मा प्रियेतरैर्वाक्यगणैस्तुदंस्ताम् । शोकार्दितश्चापि ननाद भूयः सिंहो यथा मन्दरकन्दरस्थः २८ [२८७२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रिसप्ततितमः सर्गः ॥ ७३ ॥

तां तथा गर्हयित्वा तु मातरं भरतस्तदा । रोषेण महताविष्टः पुनरेवाब्रवीद्वचः १ राज्याद्भ्रंशस्व कैकेयि नृशंसे दुष्टचारिणि । परित्यक्तासि धर्मेण मा मृतं रुदती भव २ किं नु तेदूषयद्रामो राजा वा भृशधार्मिकः । ययोर्मृत्युर्विवासश्च त्वत्कृते तुल्यमागतौ ३ भ्रूणहत्यामसि प्राप्ता कुलस्यास्य विनाशनात् । कैकेयि नरकं गच्छ मा च तातसलोकताम् ४ यत्त्वया हीदृशं पापं कृतं घोरेण कर्मणा । सर्वलोकप्रियं हित्वा ममाप्यापादितं भयम् ५ त्वत्कृते मे पिता वृत्तो रामश्चारण्यमाश्रितः ।

---

भ्रात्याचा मी अगदीं स्वस्थ मनानें दास होऊन राहीन " २७. अप्रिय वाक्यसमुदायांनीं त्या कैकेयीला दुःख देणारा तो शोकाकुल झालेला महात्मा भरत ह्याप्रमाणें तिला बोलून मंदरपर्वताच्या गुहेंतील सिंहाप्रमाणें आणखी गर्जना करूं लागला २८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्र्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७३ ॥

त्याप्रमाणें त्या मातेची निंदा केल्यावर अतिशयच क्रुद्ध झालेला तो भरत पुनरपि तिला ह्मणाला १ " हे कैकेयि, हे दुष्टे, हे दुराचारिणि, जा; तूं वनांत चालती हो; धर्मानें तुझा त्याग केला आहे. तेव्हां तूं आतां मृत झालेल्या माझ्या पित्याबद्दल कधीं रडूं नकोस २, ( कारण, त्याच्याशीं तुझें आतां भार्येचें नातें राहिलेलें नाहीं.) ज्यांना मृत्यु आणि वनवास तुझ्याकरितां एकदम प्राप्त झाले आहेत त्या रामानें अथवा अत्यंत धार्मिक राजानें तुझें काय वाईट केलें होतें ? ३. ह्या कुलाचा नाश केल्यामुळें तुला ब्रह्महत्येचें पातक लागलेलें आहे. तस्मात्, हे कैकेयि, तूं नरकांत जा; पित्याला प्राप्त झालेल्या लोकाला जाऊं नकोस ४. घोर कर्मानें सर्व लोकांना प्रिय असलेल्या रामाचा त्याग करून हें जें ब्रह्महत्येसारिखें पातक तूं केलें आहेस त्याच्या योगानें मलाही तूं मोठें भयच उत्पन्न करून ठेविलें आहेस. ( कारण, रामाच्या वनवासाला आणि राजाच्या मरणाला तूंच कारण असल्यामुळें महापातक तुझ्या हातून घडलें आहे आणि महापातक केलेल्या तुझ्या संसर्गानें मलाही महापातकाचाच दोष लागणार आहे ) ५. तुझ्याकरितां माझा पिता मृत्यु पावला असून

अयशो जीवलोके च त्वयाहं प्रतिपादितः ६ मातृरूपे ममामित्रे नृशंसे राज्यकामुके । न तेहमभिभाष्योस्मि दुर्वृत्ते पतिघातिनि ७ कौसल्या च सुमित्रा च याश्चान्या मम मातरः । दुःखेन महताविष्टास्त्वां प्राप्य कुलदूषिणीम् ८ न त्वमश्वपतेः कन्या धर्मराजस्य धीमतः । राक्षसी तत्र जातासि कुलप्रध्वंसिनी पितुः ९ यत्त्वया धार्मिको रामो नित्यं सत्यपरायणः । वनं प्रस्थापितो वीरः पितापि त्रिदिवं गतः १० यत्प्रधानासि तत्पापं मयि पित्रा विना कृते । भ्रातृभ्यां च परित्यक्ते सर्वलोकस्य चाप्रिये ११ कौसल्यां धर्मसंयुक्तां वियुक्तां पापनिश्चये । कृत्वा कं प्राप्स्यसे ह्यद्य लोकं निरयगामिनी १२ किं नावबुध्यसे क्रूरे नियतं बन्धुसंश्रयम् । ज्येष्ठं पितृसमं रामं कौसल्यायात्मसंभवम् १३ अङ्गप्रत्यङ्गजः पुत्रो हृदयाच्चाभिजायते । तस्मात्प्रियतरो मातुः प्रिया एव तु बान्धवाः १४ अन्यदा किल धर्मज्ञा सुरभिः सुरसंमता । वहमानौ

---

रामानें वनाचें अवलंबन केलें आहे आणि ह्यामुळें ह्या जगतामध्यें तूं माझी अपकीर्ति केलेली आहेस ६. मातेच्या रूपानें माझ्याशीं शत्रुत्व करणाऱ्ये दुष्टे, हे राज्याभिलाष करणाऱ्ये दुराचारिणि, हे पतिघातिनी, तूं माझ्याशीं भाषणही करीत जाऊं नकोस ७. तुज कुलकलंकिनीशीं प्रसंग पडल्यामुळें कौसल्या, सुमित्रा आणि इतरही माझ्या माता मोठ्या दुःखानें व्याप्त झाल्या आहेत ८. त्या विचारी धर्मराज अश्वपतिराजाची मुळीं तूं खरी कन्याच नव्हेस. आपल्या पित्याच्या कुलाचा घात करण्याकरितां तूं राक्षसीच त्या कुलामध्यें अवतीर्ण झाली आहेस ९. कारण, नित्य सत्यावलंबन करून असणाऱ्या धर्मनिष्ठ वीर रामाला तूं वनांत घालविलेस आणि माझा पिताही तूं येथून स्वर्गाला पोंचविलास १०; परंतु, ज्याच्याकरितां तूं हें पातक केलेस त्या माझे ठिकाणीं तें तुझें पातक फलद्रूप झालें. कारण, पित्याचा मला वियोग झाला आणि भ्रात्यांनींही माझा त्याग केल्यामुळें सर्व लोकांना मी अप्रिय होऊन बसलों ११. हे दुष्टबुद्धि कैकयि, धर्माला अनुसरून वागणाऱ्या कौसल्येला पतीचा व पुत्राचा वियोग करून आज तुला कोणता लोक प्राप्त होणार आहे ! तूं नरकांत जाणार ( हें दिसतेंच आहे ) १२. हे क्रूर कैकयि, बंधूंचा ठरीव आश्रय आणि कौसल्येचा औरस पुत्र राम माझा ज्येष्ठ भ्राता असल्यामुळें मला पित्यासमान आहे हें तुला ठाऊक नाहीं काय ? १३. अंगप्रत्यंगापासून होणारा पुत्र हृदयापासून उत्पन्न होत असल्यामुळें मातेला तो अतिशय प्रिय असतो आणि बांधव हे साधारणच प्रिय असतात. ( सारांश, औरसपुत्राचा वियोगदुःख तिला झाल्यामुळें तें अत्यंत दुःसह आहे ) १४.

ददर्शोर्व्यां पुत्रौ विगतचेतसौ १५ तावर्धदिवसं श्रान्तौ दृष्ट्वा पुत्रौ महीतले । रुरोद पुत्रशोकेन भाष्पपर्याकुलेक्षणम् १६ अधस्ताद्व्रजतस्तस्याः सुरराज्ञो महात्मनः । बिन्दवः पतिता गात्रे सूक्ष्माः सुरभिगन्धिनः १७ निरीक्षमाणस्तां शक्रो ददर्श सुरभिं स्थिताम् । आकाशे विष्ठितां दीनां रुदतीं भृशदुःखिताम् १८ तां दृष्ट्वा शोकसंतप्तां वज्रपाणिर्यशस्विनीम् । इन्द्रः प्राञ्जलिरुद्विग्नः सुरराजोब्रवीद्वचः १९ भयं कच्चिन्न चास्मासु कुतश्चिद्विद्यते महत् । कुतोनिमित्तः शोकस्ते ब्रूहि सर्वहितैषिणि २० एवमुक्ता तु सुरभिः सुरराजेन धीमता । प्रत्युवाच ततो धीरा वाक्यं वाक्यविशारदा २१ शान्तं पापं न वः किंचित्कुतश्चिदमराधिप । अहं तु मग्नौ शोचामि स्वपुत्रौ विषमे स्थितौ २२ एतौ दृष्ट्वा कृशौ दीनौ सूर्यरश्मिप्रतापितौ । वध्यमानौ बलीवर्दौ कर्षकेण दुरात्मना २३ मम कायात्प्रसूतौ हि दुःखितौ भारपीडितौ । यौ दृष्ट्वा परितप्येहं नास्ति पुत्रसमः प्रियः २४ यस्याः पुत्रसहस्रैस्तु कृत्स्नं व्याप्तमिदं जगत् । तां

असें सांगतात कीं, एकदां देवसंमत असलेल्या कामधेनु धर्मज्ञ सुरभीनें, भान नाहींसें होऊन गेलेले आपले दोन पुत्र पृथ्वीवर अवलोकन केले १५. दोन प्रहर उलटून जाईतोंपर्यंत ओढतां ओढतां थकलेले ते पुत्र भूतलावर अवलोकन केल्यावर पुत्रशोकानें अश्रूंनीं नेत्र व्याप्त होऊन ती रडूं लागली १६. तेव्हां महात्मा देवराज इंद्र खालून जात असतांना त्याच्या शरीरावर ते तिचे सुगंधि सूक्ष्म अश्रुबिंदु पडले १७. नंतर इंद्र वर पाहूं लागला तो आकाशामध्यें स्थित असलेली कामधेनु सुरभि अत्यंत दुःखित व दीन होऊन रडत बसली आहे असें त्याच्या दृष्टीं पडलें १८. तेव्हां ती यशस्विनी कामधेनु शोकाकुल झालेली पाहून उद्विग्न झालेला देवराज वज्रपाणि इंद्र हात जोडून तिला ह्मणाला १९ " आह्मांला कोठून मोठें भय तर प्राप्त झालें नाहीं नां ? हे सर्वलोकहितैषिणि, तुझा शोक कशाकरितां आहे तें सांग " २०. ह्याप्रमाणें बुद्धिमान् देवराजानें सुरभीला विचारिलें असतां संभाषण करण्यामध्यें निपुण असलेली ती विचारी कामधेनु त्याला ह्मणाली २१ " इडापिडा टळो, हे देवराजा, तुह्मांला कोठूनही यत्किंचित्सुद्धां भय नाहीं; परंतु, संकटांत सांपडून दुःखमग्न झालेल्या दोन पुत्रांना अवलोकन करून मी शोक करीत आहें. हे माझे पुत्र बलीवर्द अधींच कृश व दीन झाले असून सूर्यकिरणांचा त्यांना ताप झालेला आहे आणि दुष्ट शेतकरी त्यांना मारीत आहेत २२, २३. हे माझ्या शरीरापासून उत्पन्न झालेले पुत्र भारानें पीडिल्यामुळें दुःखित झाले आहेत व त्यांना अवलोकन करून मी शोक करीत आहें.

दृष्ट्वा रुदतीं शक्रो न सुतान्मन्यते परम् २५ इन्द्रो ह्यश्रुनिपातं तं स्वगात्रे पुण्यगन्धिनम् । सुरभिं मन्यते दृष्ट्वा भूयसीं तामिहेश्वरः २६ समाप्रतिमवृत्ताया लोकधारणकाम्यया । श्रीमत्या गुणमुख्यायाः स्वभावपरिचेष्टया २७ यस्याः पुत्रसहस्राणि सापि शोचति कामधुक् । किं पुनर्या विना रामं कौसल्या वर्तयिष्यति २८ एकपुत्रा च साध्वी च विवत्सेयं त्वया कृता । तस्मात्त्वं सततं दुःखं प्रेत्य चेह च लप्स्यसे २९ अहं त्वपचितिं भ्रातुः पितुश्च सकलामिमाम् । वर्धनं यशसश्चापि करिष्यामि न संशयः ३० आनाय्य च महाबाहुं कोशलेन्द्रं महाबलम् । स्वयमेव प्रवेक्ष्यामि वनं मुनिनिषेवितम् ३१ नह्यहं पापसंकल्पे पापे पापं त्वया कृतम् । शक्तो धारयितुं पौरैरश्रुकण्ठैर्निरीक्षितः ३२ सा त्वमग्निं प्रविश वा स्वयं वा विश दण्डकान् । रज्जुं बध्वाथवा कण्ठे नहि तेन्यत्परायणम्

---

कारण, पुत्रासारिखा कोणी प्रिय नाहीं " २४. असो. जिच्या हजारों पुत्रांनीं हें संपूर्ण जगत् व्याप्त झालें आहे अशी ती कामधेनू (दोघां पुत्रांकरितां) रडतांना पाहिल्यापासून इंद्रालाही पुत्रापेक्षां कांहीं अधिक आहे असें वाटेनासें झालें २५. आपल्या शरीरावर झालेला तो सुगंधि अश्रुपात अवलोकन करून देवराज इंद्र जगतामध्यें त्या कामधेनूला सर्वोत्कृष्ट समजूं लागला २६. सर्वांशीं सारिखें असें जिचें अप्रतिम वर्तन आहे, सत्य हा जिचे ठिकाणीं मुख्य गुण आहे व वाटेल ती कामना परिपूर्ण करण्याचें जिचें सामर्थ्य आहे अशा कामधेनूचे–जगताचें परिपालन करण्याच्या उद्देशानें सर्व सामान्य असलेल्या ग्राम्यधर्मसेवनाच्या द्वारानें प्राप्त झालेले–हजारों पुत्र असतांना ती कामधेनु सुद्धां ( दोघां पुत्रांकरितांही ) जर शोक करिते तर ( एकुलत्या एक ) रामाचा वियोग झालेली कौसल्या जिवंत राहील ही गोष्ट तरी कशाला पाहिजे ? २७, २८. जिला एकच पुत्र अशा ह्या साध्वी कौसल्येला तूं पुत्ररहित करून टाकिलें आहेस. तस्मात्, इहलोकीं आणि मेल्यानंतरही तुला नेहमीं दुःखच प्राप्त होत जाईल २९. मी ( पुढें सांगतों त्याप्रमाणें ) भ्रात्याच्या व पित्याच्या ह्या ऋणांतून मुक्त होऊन आपली कीर्ति वृद्धिंगत करीन ह्यांत संशय नाहीं ३०. कोसलदेशाधिपति, महाबलाढ्य व महापराक्रमी रामाला येथें आणवून मी स्वतःच मुनींनीं आश्रय केलल्या वनामध्यें प्रवेश करीन ३१; परंतु, हे दुष्टबुद्धे पापिणि, अश्रूंनीं ज्यांचे कंठ दाटून आले आहेत असे नगरांतील लोक माझ्याकडे पाहूं लागले असतां तूं केलेलें हें पातक सहन करण्यास मी समर्थ नाहीं ३२. ( ह्या पातकाची निष्कृति होण्याकरितां ) तूं हवी तर अग्नीमध्यें प्रवेश कर, पाहिजे तर स्वतांच दंडकारण्यांत चालती हो

णम् ३३ अहमप्यवनीं प्राप्ते रामे सत्यपराक्रमे । कृतकृत्यो भविष्यामि विप्रवासितकल्मषः ३४ इति नाग इवारण्ये तोमराङ्कुशतोदितः । पपात भुवि संक्रुद्धो निःश्वसन्निव पन्नगः ३५ संरक्तनेत्रः शिथिलाम्बरस्तथा विधूतसर्वाभरणः परंतपः । बभूव भूमौ पतितो नृपात्मजः शचीपतेः केतुरिवोत्सवक्षये ३६ [२९०८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुःसप्ततितमः सर्गः ॥ ७४ ॥

दीर्घकालात्समुत्थाय संज्ञां लब्ध्वा स वीर्यवान् । नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां दीनामुद्वीक्ष्य मातरम् १ सोमात्यमध्ये भरतो जननीमभ्यकुत्सयत् । राज्यं न कामये जातु मन्त्रये नापि मातरम् २ अभिषेकं न जानामि योभूद्राज्ञा समीक्षितः । विप्रकृष्टे ह्यहं देशे शत्रुघ्नसहितोभवम् ३ वनवासं न जानामि रामस्याहं महात्मनः । विवासनं च सौमित्रेः सीतायाश्च यथाभवत् ४ तथैव क्रोशतस्तस्य भरतस्य महात्मनः । कौसल्याश-

---

अथवा गळ्याला फांस लावून मर. ह्यांवांचून आतां तुला दुसरी गति नाहीं. ( कारण, असल्या महापातकाला असलेंच प्रायश्चित्त अवश्य आहे ) ३३. अमोघपराक्रमी राम राज्यावर आला ह्मणजे ( तुझ्यामुळें ) मला लागलेला हा कलंक नाहींसा होऊन मीही कृतकृत्य होईन " ३४. ह्याप्रमाणें विलाप करून बरच्या व अंकुश ज्याला टोंचिले आहेत अशा अरण्यांतील गजाप्रमाणें अत्यंत क्रुद्ध झालेला तो भरत भुजंगाप्रमाणें सुस्कारे टाकीत टाकीत भूमीवर पडला ३५. भूमीवर पडलेल्या शत्रुतापन भरताचे नेत्र लाल झाले होते, वस्त्रें सैल झालीं होतीं, अंगावरील सर्व भूषणें अस्ताव्यस्त होऊन गेलीं होतीं, आणि ह्यामुळें तो राजकुमार उत्सव अटोपल्यानंतर खाली पाडून ठेविलेल्या इंद्रध्वजाप्रमाणें दिसत होता ३६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौऱ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७४ ॥

बऱ्याच वेळानें शुद्धीवर येऊन उठल्यानंतर अश्रूंनीं भरून आलेल्या नेत्रांच्या योगानें त्या दीन मातेकडे पाहून तो १ भरत अमात्यांमध्येंही आपल्या मातेची निंदा करूं लागला. ( तो ह्मणाला ) " राज्याची मला कधींही इच्छा नाहीं व मी आपल्या मातेशीं कधीं भाषणही करणार नाहीं २. राजानें जो माझा राज्याभिषेक ठरविला असेल तो मला ठाऊक नाहीं. शत्रुघ्नासहवर्तमान मी त्यावेळीं येथून दूर असलेल्या त्या प्रदेशामध्यें होतों ३. महात्म्या रामाचा वनवास मी जाणीत नाहीं आणि सीतेला व लक्ष्मणाला कां हांकून दिलें हेंही मला माहीत नाहीं " ४. ह्याप्रमाणें तो

श्रुमाज्ञाय सुमित्रां चेदमब्रवीत् ५ आगतः क्रूरकार्यायाः कैकेय्या भरतः सुतः । तमहं द्रष्टुमिच्छामि भरतं दीर्घदर्शिनम् ६ एवमुक्त्वा सुमित्रां तां विवर्णवदना कृशा । प्रतस्थे भरतो यत्र वेपमाना विचेतना ७ स तु राजात्मजश्चापि शत्रुघ्नसहितस्तदा । प्रतस्थे भरतो येन कौसल्याया निवेशनम् ८ ततः शत्रुघ्नभरतौ कौसल्यां प्रेक्ष्य दुःखितौ । पर्यष्वजेतां दुःखार्तां पतितां नष्टचेतनाम् ९ रुदन्तौ रुदती दुःखात्समेत्यार्या मनस्विनी । भरतं प्रत्युवाचेदं कौसल्या भृशदुःखिता १० इदं ते राज्यकामस्य राज्यं प्राप्तमकण्टकम् । संप्राप्तं बत कैकेय्या शीघ्रं क्रूरेण कर्मणा ११ प्रस्थाप्य चीरवसनं पुत्रं मे वनवासिनम् । कैकेयी कं गुणं तत्र पश्यति क्रूरदर्शिनी १२ क्षिप्रं मामपि कैकेयी प्रस्थापयितुमर्हति । हिरण्यनाभो यत्रास्ते सुतो मे सुमहायशाः १३ अथवा स्वयमेवाहं सुमित्रानुचरा सुखम् । अग्निहोत्रं पुरस्कृत्य प्रस्थास्ये येन राघवः १४ कामं वा स्वयमेवाद्य तत्र मां नेतुमर्हसि । यत्रासौ पुरुषव्याघ्रस्तप्यते मे सुतस्ततः १५

---

महात्मा भरत पूर्वीप्रमाणेंच आक्रोश करूं लागला असतां त्याचा शब्द ऐकून कौसल्या सुमित्रेला ह्मणाली ५ " क्रूर कर्म करणाऱ्या कैकेयीचा पुत्र आला आहे. तेव्हां दूरवर विचार करणाऱ्या त्या भरताला पहाण्याची मला इच्छा आहे "६. ह्याप्रमाणें त्या सुमित्रेला सांगून निस्तेज मुखानें युक्त, कृश आणि कांहीं सुचेनासें झालेली कौसल्या जिकडे भरत होता तिकडे कांपत कांपत चालली ७. तेव्हां तो राजपुत्र भरतही शत्रुघ्नासहवर्तमान कौसल्येच्या घराला जाणाऱ्या मार्गानें तिच्याकडे निघाला ८. तदनंतर दुःखित झालेले भरतशत्रुघ्न दुःखाकुल झाल्यामुळें मूर्छित होऊन (मार्गामध्येंच) पडलेल्या कौसल्येला कडकडून भेटले ९. तेव्हां रोदन करीत असलेल्या त्या भरतशत्रुघ्नांची दुःखानें भेट घेऊन ती अत्यंत दुःखित झालेली बिचारी श्रेष्ठ कौसल्या रडत रडत भरताला ह्मणाली १० " राज्याचा अभिलाष धरणाऱ्या तुला हें निष्कंटक राज्य क्रूर कर्म करून कैकयीनें सत्वर प्राप्त करून दिलें आहे ११. वृक्षाच्या साली नेसावयाला लावून वनवासी बनविलेल्या माझ्या पुत्राला रानांत पाठवून क्रूर विचार मनांत आणणाऱ्या कैकयीला कोणता बरें फायदा दिसत आहे ! १२. सुवर्णवर्ण नाभीनें युक्त असलेला माझा महायशस्वी पुत्र जिकडे असेल तिकडे मलाही कैकयीनें लवकर पाठवून द्यावें १३. अथवा मी स्वतःच सुमित्रेला बरोबर घेऊन आणि अग्निहोत्र ( व राजदेह ) पुढें घालून ज्या मार्गानें राम गेला आहे त्या मार्गानें सुखानें वनांत चालती होईन १४. किंवा तो माझा पुरुषश्रेष्ठ पुत्र जिकडे तप करणार असेल तिकडे तूं स्वतःच

इदं हि तव विस्तीर्णं धनधान्यसमाचितम् । हस्त्यश्वरथसंपूर्णं राज्यं निर्यातितं तया १६ इत्यादिबहुभिर्वाक्यैः क्रूरैः संभर्त्सितोनघः । विव्यथे भरतो तीव्रव्रणे तुद्येव सूचिना १७ पपात चरणौ तस्यास्तदा संभ्रान्त-चेतनः । विलप्य बहुधासंज्ञो लब्धसंज्ञस्तदाभवत् १८ एवं विलपमानां तां प्रांजलिर्भरतस्तदा । कौसल्यां प्रत्युवाचेदं शोकैर्बहुभिरावृताम् १९ आर्ये कस्मादजानन्तं गर्हसे मामकल्मषम् । विपुलां च मम प्रीतिं स्थितां जानासि राघवे २० कृतशास्त्रानुगा बुद्धिर्मा भूत्तस्य कदाचन । सत्य-संधः सतां श्रेष्ठो यस्यार्योनुमते गतः २१ प्रैष्यं पापीयसां यातु सूर्यं च प्रति मेहतु । हन्तु पादेन गां सुप्तां यस्यार्योनुमते गतः २२ कारयित्वा महत्कर्म भर्ता भृत्यमनर्थकम् । अधर्मो योम्य सोस्यास्तु यस्यार्योनुमते गतः २३ परिपालयमानस्य राज्ञो भूतानि पुत्रवत् । ततस्तु द्रुह्यतां पापं यस्यार्योनुमते गतः २४ बलिषड्भागमुद्धृत्य नृपस्यारक्षितुः प्रजाः ।

---

आपल्या इच्छेनें मला नेऊन पोंचीव १५. धनधान्यांनीं समृद्ध व गज, अश्व आणि रथ ह्यांनीं भरलेलें हें विस्तीर्ण राज्य तुला त्या कैकेयीनें दिलें आहे " १६. ह्या व आशा प्रकारच्या अनेक क्रूर वाक्यांनीं निरपराधी भरताची कौसल्येनें निर्भत्सना केली असतां तीक्ष्ण व्रणावर सुई टोंचल्याप्रमाणें तो भरत व्यथित झाला १७. मना-मध्यें गोंधळून गेलेला तो भरत त्यांच्या पायां पडला, नानाप्रकारें विलाप करून मूर्छित झाला व नंतर कांहीं वेळानें सावध झाला १८. तेव्हां नानाप्रकारच्या शोकांनीं व्याप्त होऊन ह्याप्रमाणें विलाप करीत असलेल्या कौसल्येला भरत हात जोडून ह्मणाला १९ "हे आर्ये, मला ह्यापैकीं कांहींच माहीत नसतांना व मी अगदीं निर-पराधी असतांना तूं कां बरें दोष देत आहेस? रामाचे ठिकाणीं असलेलें माझें परा-काष्ठेचें प्रेम तर तुला विदितच आहे २०. सत्यप्रतिज्ञ आणि सज्जनश्रेष्ठ असा आर्य राम ज्याच्या अनुमतीनें वनांत गेला असेल त्याची बुद्धि गुरूनीं शिकविलेल्या शास्त्राला अनुसरून कधींही होणार नाहीं २१. ज्याच्या संमतीनें आर्य राम वनांत गेला असेल तो पापी लोकांचा दास होईल आणि सूर्याकडे मुख करून मूत्रकर्म केल्याचें व निद्रिस्थ गाईला लाथ मारल्याचें त्याला पातक लागेल २२. सेवकांकडून मोठें काम करून घेऊन त्याला कांहीं एक न देणाऱ्या मालकाला जें पातक लागतें तें पातक ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल २३. प्राणिमात्रांचें पुत्रवत् परिपालन करणाऱ्या राजाचा द्रोह करणाऱ्यांना जें पातक लागतें तें पातक ज्याच्या मतानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला

अधर्मो योस्य सोस्यास्तु यस्यार्योनुमते गतः २५ संश्रुत्य च तपस्विभ्यः सत्रे वै यज्ञदक्षिणाम् । तां चापलपतां पापं यस्यार्योनुमते गतः २६ हस्त्यश्वरथसंबाधे युद्धे शस्त्रसमाकुले । मा स्म कार्षित्सतां धर्मं यस्यार्योनुमते गतः २७ उपदिष्टं सुसूक्ष्मार्थं शास्त्रं यत्नेन धीमता । स नाशयतु दुष्टात्मा यस्यार्योनुमते गतः २८ मा च तं व्यूढबाह्वंसं चन्द्रभास्करतेजसम् । द्राक्षीद्राज्यस्थमासीनं यस्यार्योनुमते गतः २९ पायसं कृसरं छागं वृथा सोश्नातु निर्घृणः । गुरूंश्चाप्यवजानातु यस्यार्योनुमते गतः ३० गवां स्पृशतु पादेन गुरून्परिवदेत च । मित्रे द्रुह्येत सोत्यर्थं यस्यार्योनुमते गतः ३१ विश्वासात्कथितं किंचित्परिवादं मिथः क्वचित् । विवृणोतु स दुष्टात्मा यस्यार्योनुमते गतः ३२ अकर्ता चाकृतज्ञश्च त्यक्तश्च निरपत्रपः ।

---

लागेल २४. कराच्या रूपानें एकंदर उत्पन्नाचा सहावा अंश घेऊनही प्रजांचें परिपालन न करणाऱ्या राजांना जें पातक लागतें तें पातक ज्याच्या मतानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल २५. यागामध्यें तपस्वी ऋत्विजांना यागदक्षिणा देण्याचें वचन देऊनही ती दाबून ठेवणाऱ्यांना जें पातक लागतें तें पातक ज्याच्या मतानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल २६. गज, अश्व आणि रथ ह्यांची खेंचाखेंच होऊन शस्त्रांची गर्दी झालेल्या युद्धामध्यें जो सद्धर्मानें वागला नसेल ( ह्मणजे पराङ्मुख न होतां शत्रूंशीं ज्यानें युद्ध केलें नसेल ) त्याला लागणारें पातक ज्याच्या अनुमतानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल २७. ज्याच्या अनुमतानें आर्य राम वनवासांत गेला असेल त्या दुरात्म्याला विवेकी आचार्यानें यत्नपूर्वक पढविलेल्या वेदाचा त्याग केल्याचें पातक लागेल २८. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला विशाल बाहु व स्कंध ह्यांनीं युक्त असून चंद्र सूर्यासमान तेजस्वी असलेला राम राज्यावर बसल्याचें आढळण्यांत येणार नाहीं २९. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्या निर्दयाला खीर, तिलोदन व छागमांस श्राद्धादिकांवांचून भक्षण केल्याचें आणि गुरूंची अवज्ञा केल्याचें पातक लागेल ३०. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला गाईंना पादस्पर्श केल्याचें, गुरूंची निंदा केल्याचें आणि मित्राचा अतिशय द्रोह केल्याचें पातक लागेल ३१. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्या दुरात्म्याला बाहेर परिस्फुटता करावयाची नाहीं या विश्वासावर एकाद्याचा गुप्तपणें सांगितलेला दोष बाहेर फोडण्याचें पातक लागेल ३२. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याचा लोक द्वेष करूं लागतील, त्याच्याशीं संबंध तोडून टाकतील, तो निर्लज्ज

लोके भवतु विद्विष्टो यस्यार्योनुमते गतः ३३ पुत्रैर्दासैश्च भृत्यैश्च स्वगृहे परिवारितः । स एको मृष्टमश्नातु यस्यार्योनुमते गतः ३४ अप्राप्य सदृशान्दारानपत्यः प्रमीयताम् । अनवाप्य क्रियां धर्म्यां यस्यार्योनुमते गतः ३५ मात्मनः संततिं द्राक्षीत्स्वेषु दारेषु दुःखितः । आयुःसमग्रमप्राप्य यस्यार्योनुमते गतः ३६ राजस्त्रीबालवृद्धानां वधे यत्पापमुच्यते । भृत्यत्यागे च यत्पापं तत्पापं प्रतिपद्यताम् ३७ लाक्षया मधुमांसेन लोहेन च विषेण च । सदैव बिभृयाद्भृत्यान्यस्यार्योनुमते गतः ३८ सङ्ग्रामे समुपोढे च शत्रुपक्षभयंकरे । पलायमानो वध्येत यस्यार्योनुमते गतः ३९ कपालपाणिः पृथिवीमटतां चीरसंवृतः । भिक्षमाणो यथोन्मत्तो यस्यार्योनुमते गतः ४० मद्यप्रसक्तो भवतु स्त्रीष्वक्षेषु च नित्यशः । कामक्रोधाभिभूतश्च यस्यार्योनुमते गतः ४१ मास्या धर्मे मनो भूयादधर्मं स

---

बनेल आणि एकाद्यावर प्रत्युपकार न करितां त्याच्याशीं कृतघ्न बनल्याचें त्याला पातक लागेल ३३. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला पुत्र, दास आणि सेवक ह्यांनीं स्वगृहामध्यें परिवेष्टित असूनही एकट्यानेंच मिष्टान्न भक्षण केल्याचें पातक लागेल ३४. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासामध्यें गेला असेल त्याला योग्य स्त्रीचें पाणिग्रहण न करितां धर्मानुसार यज्ञयाग केल्यावांचून निपुत्रिकपणें मरण्याचें पातक लागेल ३५. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनामध्यें गेला असेल त्याला आपल्या स्त्रीचे ठिकाणीं स्वतःची संतती पहावयाला सांपडणार नाहीं आणि तो अल्पायुषीच मरण पावेल ३६; इतकेंच नव्हे परंतु, राजा, स्त्री, बाल आणि वृद्ध ह्यांच्या वधाला जें पातक सांगितलें आहे आणि सेवकाच्या त्यागाला जें पातक सांगितलें असेल तें पातक त्याला लागेल ३७. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनामध्यें गेला असेल त्याला लाख, मद्य, मांस, लोखंड आणि विष ह्यांचा व्यापार करून नेहमीं सेवकांना पोसल्याचें पातक लागेल ३८. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला शत्रुपक्षास भयंकर असा संग्राम प्राप्त झाला असतां पळतां पळतां वध पावल्याचें पातक लागेल ३९. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासामध्यें गेला असेल तो हातांत नरकपाल घेऊन आणि वल्कलें परिधान करून उन्मत्ताप्रमाणें पृथ्वीवर भिक्षा मागत हिंडूं लागेल. ( सारांश, त्याला ब्रह्महत्येचें पातक लागेल ) ४०. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला मद्य, स्त्रिया आणि द्यूत ह्यांचें ठिकाणीं आसक्ति ठेऊन नित्य काम व क्रोध ह्यांनीं व्याप्त असल्याचें पातक लागेल ४१. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला

निषेवताम्। अपात्रवर्षी भवतु यस्यार्योनुमते गतः ४२ संचितान्यस्य वित्तानि विविधानि सहस्रशः। दस्युभिर्विप्रलुप्यन्तां यस्यार्योनुमते गतः ४३ उभे संध्ये शयानस्य यत्पापं परिकल्प्यते। तच्च पापं भवेत्तस्य यस्यार्योनुमतः गतः ४४ यदग्निदायके पापं यत्पातं गुरुतल्पगे। मित्रद्रोहे च यत्पापं तत्पापं प्रतिपद्यताम् ४५ देवतानां पितॄणां च मातापित्रोस्तथैव च। मा स्म कार्षीत्स शुश्रूषां यस्यार्योनुमते गतः ४६ सतां लोकात्सतां कीर्त्याः सज्जुष्टात्कर्मणस्तथा। भ्रश्यतु क्षिप्रमद्यैव यस्यार्योनुमते गतः ४७ अपास्य मातृशुश्रूषामनर्थे सोवतिष्ठताम्। दीर्घबाहुर्महावक्षा यस्यार्योनुमते गतः ४८ बहुभृत्यो दरिद्रश्च ज्वररोगसमन्वितः। समायात्सततं क्लेशं यस्यार्योनुमते गतः ४९ आशामाशंसमानानां दीनानामूर्ध्वचक्षुषाम्। अर्थिनां वितथां कुर्याद्यस्यार्योनुमतेः गत ५० मायया रमतां नित्यं पुरुषःपिशुनोशुचिः। राज्ञो भीतस्त्वधर्मात्मा यस्यार्योनुमते

---

असेल त्याला धर्माकडे मनाची प्रवृत्ति न होतां अधर्मसेवन करून अपात्रीं दान केल्याचें पाप लागेल ४२. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याचें नानाप्रकारचें संचित केलेलें द्रव्य चोरून नेतील ४३. दोन्ही संध्यांचे वेळीं शयन करणाऱ्याला जें पातक लागत असतें तें पातक ज्याच्या संमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल ४४; इतकेंच नव्हे परंतु, आग लावणाऱ्याला, गुरुपत्नीशीं गमन करणाऱ्याला आणि मित्रद्रोह करणाऱ्याला जें पातक लागत असतें तेंही पातक त्याला प्राप्त होईल ४५. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला देव, पितर आणि माता व पिता ह्यांची शुश्रूषा न केल्याचें पातक लागेल ४६. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनामध्यें गेला असेल तो आजच्या आज सज्जनांना प्राप्त होणाऱ्या लोकांपासून, सज्जनांच्या कीर्तीपासून आणि सज्जनांनीं केलेल्या कृत्यांपासून सत्वर भ्रष्ट होवो ४७. अजानुबाहु व भव्य वक्षस्थल ह्यांनीं युक्त असलेल्या आर्य रामाला वनवासांत जाण्यास ज्याची संमति असेल त्याला मातेची सेवा सोडून देऊन स्त्रीसेवारूप अनर्थाचा आश्रय केल्याचें पातक लागेल ४८. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल तो मोठा कुटुंबी होऊन दरिद्री होईल, नेहमीं ज्वर रोगानें तो युक्त होईल आणि त्याला सतत क्लेश होतील ४९, ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनामध्यें गेला असेल त्याला मोठ्या आशेनें तोंडाकडे पहात असलेल्या दीन याचकांची आशा ( सामर्थ्य असून ) व्यर्थ केल्याचें पातक लागेल ५० ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्या धर्मशून्य पुरुषाला नित्य लोकांना फसविण्यांतच आनंद वाटू लागेल,

गतः ५१ ऋतुस्नातां सतीं भार्यामृतुकालानुरोधिनीम् । अतिवर्तेत दुष्टात्मा यस्यार्योनुमते गतः ५२ विप्रलुप्तप्रजातस्य दुष्कृतं ब्राह्मणस्य यत् । तदेतत्प्रतिपद्येत यस्यार्योनुमते गतः ५३ ब्राह्मणायोद्यतां पूजां विहन्तु कलुषेन्द्रियः । बालवत्सां च गां दोग्धुर्यस्यार्योनुमते गतः ५४ धर्मदारान्परित्यज्य परदारान्निषेवताम् । त्यक्तधर्मरतिर्मूढो यस्यार्योनुमते गतः ५५ पानीयदूषके पापं तथैव विषदायके । यत्तदेकः स लभतां यस्यार्योनुमते गतः ५६ तृषार्ते सति पानीये विप्रलम्भेन योजयन् । यत्पापं लभते तत्स्याद्यस्यार्योनुमते गतः ५७ भक्त्या विवदमानेषु मार्गमाश्रित्य पश्यतः । तेन पापेन युज्येत यस्यार्योनुमते गतः ५८ एवमाश्वासयन्नेव दुःखार्तोनुपपात ह। विहीनां पतिपुत्राभ्यां कौसल्यां पार्थिवात्मजः ५९ तदा तं शपथैः कष्टैः शपमानमचेतनम् । भरतं शोकसंतप्तं कौसल्या

---

तो चहाडखोर होईल, अपवित्र राहील आणि राजाचें त्याला भय बाळगावें लागेल ५१. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्या दुरात्म्याला ऋतुकालसंबंधीं ( सोळा दिवसांची वगैरे ) मुदत जिची गेली नाहीं अशा संनिध असलेल्या साध्वी ऋतुस्नात भार्येशीं समागम न केल्याचें पातक लागेल ५२. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला संतान नष्ट झालेल्या ब्राह्मणाचें ( संताननाशाला कारण होणारें ) पातक लागेल ५३. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला ब्राह्मणाकरितां केलेली पूजेची तयारी हुसकून दिल्याचें आणि मनाला मोह उत्पन्न होऊन वासरूं लहान असतांना ( त्याच्या पुरतें दूध राखून न ठवितां ) गाईची धार काढल्याचें पातक लागेल ५४. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्या मूढाला धर्माची पर्वा न बाळगितां धर्मपत्नीचा त्याग करून परस्त्रीसेवन केल्याचें पातक लागेल ५५. ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनवासांत गेला असेल त्याला एकट्यालाच जलदूषित केल्याचें आणि विष घातल्याचें पातक लागेल ५६. उदक असूनही तृषाक्रांताला तें न देणाऱ्याला जें पातक प्राप्त होतें तें पातक ज्याच्या अनुमतीनें आर्य राम वनांत गेला असेल त्याला प्राप्त होईल ५७. भिन्न भिन्न मार्ग स्वीकारून भक्तीविषयीं वाद करणाऱ्या पुरुषांना ( ह्मणजे शिवभक्तिश्रेष्ठ किंवा विष्णुभक्ति श्रेष्ठ इत्यादि प्रकारचा वादविवाद करणाऱ्यांना ) आणि त्यांचा तो कलह श्रवण करणाऱ्याला जें पातक लागतें तें पातक ज्याच्या योगानें आर्य राम वनांत गेला असेल त्याला लागेल "५८. ह्याप्रमाणें आपल्या निरपराधीपणाविषयीं कौसल्येची खात्री करितां करितांच तो दुःखाकुल झालेला राजकुमार भरत पति व पुत्र ह्यांचा

वाक्यमब्रवीत् ६० मम दुःखमिदं पुत्र भूयः समुपजायते । शपथैः शपमानो हि प्राणानुपरुणत्सि मे ६१ दिष्ट्या न चलितो धर्मादात्मा ते सहलक्षणः । वत्स सत्यप्रतिज्ञो हि सतां लोकानवाप्स्यसि ६२ इत्युक्त्वा चाङ्कमानीय भरतं भ्रातृवत्सलम् । परिष्वज्य महाबाहुं रुरोद भृशदुःखिता ६३ एवं विलपमानस्य दुःखार्तस्य महात्मनः । मोहाच्च शोकसंरम्भाद्बभूव लुलितं मनः ६४ लालप्यमानस्य विचेतनस्य प्रनष्टबुद्धेः पतितस्य भूमौ । मुहुर्मुहुर्निःश्वसतश्च दीर्घं सा तस्य शोकेन जगाम रात्रिः ६५ [ २९७३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चसप्ततितमः सर्गः ॥ ७५ ॥

तमेवं शोकसंतप्तं भरतं कैकयीसुतम् । उवाच वदतां श्रेष्ठो वसिष्ठः श्रेष्ठवागृषिः १ अलं शोकेन भद्रं ते राजपुत्र महायशः । प्राप्तकालं नरपतेः कुरु संयानमुत्तमम् २ वसिष्ठस्य वचः श्रुत्वा भरतो धरणीं गतः ।

---

वियोग झालेल्या कौसल्येसमीप पडला ५९. तेव्हां भयंकर शपथा वाहून रामाला वनवासांत पाठविण्यास संमति देणाऱ्याला शाप देत असलेल्या त्या शोकाकुल व मूर्छित भरताला कौसल्या ह्मणाली ६० " हे पुत्रा, ह्याच्या योगानें मला अधिकच दुःख होत आहे. असल्या शपथा वाहून रामाच्या वनवासाला संमति देणाऱ्याला शाप देणारा तूं ( अशा करण्यानें ) माझे प्राण व्याकुल करीत आहेस ६१. शुभलक्षणांनीं युक्त असलेलें तुझें अंतःकरण धर्मापासून चळलें नाहीं हें मोठें सुदैवच समजलें पाहिजे. हे वत्सा, तूं आपली प्रतिज्ञा खरी केलीस तर तुला सज्जनांचे लोक प्राप्त होतील " ६२. असें बोलून कौसल्येनें त्या भ्रातृवत्सल महापराक्रमी भरताला मांडीवर घेतलें आणि त्याला कडकडून भेटून अत्यंत दुःखित झालेली ती कौसल्या रोदन करूं लागली ६३. ह्याप्रमाणें दुःखाकुल होऊन विलाप करणाऱ्या त्या महात्म्या भरताचें मन मोहामुळें व शोकाच्या अतिरेकामुळें क्षुब्ध झालें ६४. आणि कांहींएक सुचेनासें होऊन कसलेंही भान न रहातां भूमीवर पडून वारंवार दीर्घ सुस्कारे टाकीत टाकीत अत्यंत विलाप करीत असलेल्या त्या भरताच्या शोकामध्येंच रात्र निघून गेली ६५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंचाहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७५ ॥

ह्याप्रमाणें शोकसंतप्त झालेल्या कैकयीपुत्र भरताला वक्त्यांमध्यें श्रेष्ठ आणि उत्कृष्ट वाणीनें युक्त असे वसिष्ठ ऋषि ह्मणाले १ " हे महाकीर्तिमान् राजपुत्रा, तुझें कल्याण असो; आतां शोक पुरे. हा प्राप्त झालेला भूपतीचा और्ध्वदेहिक संस्कार

प्रेतकृत्यानि सर्वाणि कारयामास धर्मवित् ३ उद्धृत्य तैलसंसेकात्स तु भूमौ निवेशितम् । आपीतवर्णवदनं प्रसुप्तमिव भूमिपम् ४ संवेश्य शयने चाग्र्ये नानारत्नपरिष्कृते । ततो दशरथं पुत्रो विललाप सुदुःखितः ५ किं ते व्यवसितं राजन्प्रोषिते मय्यनागते । विवास्य रामं धर्मज्ञं लक्ष्मणं च महाबलम् ६ क यास्यसे महाराज हित्वेमं दुःखितं जनम् । हीनं पुरुषसिंहेन रामेणाक्लिष्टकर्मणा ७ योगक्षेमं तु तेऽव्यग्रं कोऽस्मिन्कल्पयिता पुरे । त्वयि प्रयाते स्वस्तात रामे च वनमाश्रिते ८ विधवा पृथिवी राजंस्त्वया हीना न राजते । हीनचन्द्रेव रजनी नगरी प्रतिभाति माम् ९ एवं विलपमानं तं भरतं दीनमानसम् । अब्रवीद्वचनं भूयो वसिष्ठस्तु महामुनिः १० प्रेतकार्याणि यान्यस्य कर्तव्यानि विशांपतेः । तान्यव्यग्रं महाबाहो क्रियतामविचारितम् ११ तथेति भरतो वाक्यं वसिष्ठस्याभिपूज्य तत् । ऋत्विक्पुरोहिताचार्यांस्त्वरयामास सर्वशः १२

---

उत्कृष्ट रीतीनें कर " २. हें वसिष्ठांचें भाषण श्रवण केल्यावर भरतानें त्यांना साष्टांग नमस्कार घातला आणि त्या धर्मवेत्त्या भरतानें पित्याचीं सर्व और्ध्वदेहिक कर्में करण्याकरितां मंत्र्यांना सांगितलें ३. पीतवर्ण मुखानें युक्त आणि निद्रिस्थाप्रमाणें दिसत असलेल्या त्या भूपति दशरथाला तेलाच्या कढईतून काढून भूमीवर बसविलें असतां आणि नानाप्रकारच्या रत्नांनीं भूषित अशा उत्कृष्ट मंचकावर निजविलें असतां त्याला अवलोकन करून अत्यंत दुःखित झालेला तो पुत्र भरत विलाप करूं लागला कीं ४,५ "हे राजा, मी देशांतराला गेलों असून येथें आलों नसतांना धर्मवेत्त्या रामाला व महाबलाढ्य लक्ष्मणाला वनांत हांकून देऊन तूं मनांत तरी काय आणिलें आहेस ! ६. हे महाराजा, उत्कृष्ट कर्म करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ रामानें रहित अशा ह्या दुःखित जनाचा त्याग करून तूं कोठें जात आहेस ! ७. हे तात, रामानें वनाचा आश्रय केला असून तूंही स्वर्गाला चालता झाल्यावर तुझ्या नगरींतील प्रजाजनांचा योगक्षेम दक्षतापूर्वक कोण बरें चालवील ! ८. हे राजा, तुझा वियोग झालेली ही पृथ्वी विधवा झाल्यामुळें पूर्वींप्रमाणें शोभत नाहीं आणि ही अयोध्यानगरीही चंद्ररहित रात्रीप्रमाणें मला निस्तेज दिसत आहे " ९. ह्याप्रमाणें मनामध्यें खिन्न होऊन विलाप करीत असलेल्या भरताला महामुनि वसिष्ठ पुनरपि ह्मणाले १० " हे महापराक्रमी भरता, ह्या भूपतीचे जे कांहीं और्ध्वदेहिक संस्कार करावयाचे आहेत ते तूं आतां विचार करीत न बसतां काळजीपूर्वक कर " ११. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां " ठीक आहे " ह्मणून त्यानें वसिष्ठांच्या त्या सांगण्याला मान दिला आणि ऋत्विज, पुरो-

ये त्वग्नयो नरेन्द्रस्य अग्न्यगाराद्बहिष्कृताः । ऋत्विग्भिर्याजकैश्चैव ते हूयन्ते यथाविधि १३ शिबिकायामथारोप्य राजानं गतचेतनम् । बाष्पकण्ठा विमनसस्तमूचुः परिचारकाः १४ हिरण्यं च सुवर्णं च वासांसि विविधानि च । प्रकिरन्तो जना मार्गं नृपतेरग्रतो ययुः १५ चन्दनागुरुनिर्यासान्सरलं पद्मकं तथा । देवदारूणि चाहृत्य क्षेपयन्ति तथापरे १६ गन्धानुच्चावचांश्चान्यांस्तत्र गत्वाथ भूमिपम् । तत्र संवेशयामासुश्चितामध्ये तमृत्विजः १७ तदा हुताशनं हुत्वा जेपुस्तस्य तदृत्विजः । जगुश्च ते यथाशास्त्रं तत्र सामानि सामगाः १८ शिबिकाभिश्च यानैश्च यथार्हं तस्य योषितः । नगरान्निर्ययुस्तत्र वृद्धैः परिवृतास्तथा १९ प्रसव्यं चापि तं चक्रुरृत्विजोऽग्निचितं नृपम् । स्त्रियश्च शोकसंतप्ताः कौसल्याप्रमुखास्तदा २० क्रौञ्चीनामिव नारीणां निनादस्तत्र शुश्रुवे । आर्तानां करुणं काले क्रोशन्तीनां सहस्रशः २१ ततो रुदन्त्यो विवशा विलप्य च पुनःपुनः । यानेभ्यः सरयूतीरमवतेरुर्नृपा-

---

हित व आचार्य ह्यांना त्यानें ते संस्कार करण्याविषयीं सर्वस्वीं त्वरा केली १२. दशरथराजानें जे अग्नि होमशालेंतून बाहेर ठेविले होते त्यांच्यामध्यें ऋत्विज आणि याजक ह्यांनीं यथाविधि हवन केलें १३. नंतर गतप्राण झालेल्या राजाला पालखीमध्यें ठेविल्यावर अश्रूंनीं कंठ दाटून आलेले सेवक खिन्न झाले आणि त्याला उद्देशून विलाप करूं लागले १४. तदनंतर रौप्य, सुवर्ण आणि नानाप्रकारचीं वस्त्रें मार्गामध्यें उधळीत उधळीत लोक भूपतीच्या पुढें चालले १५ आणि काहीं लोक चंदन व अगुरु ह्यांचा चीक सरल व पद्मक हीं काष्ठें आणि देवदारुकाष्ठें अग्नीमध्यें टाकूं लागले १६. नंतर जेथें चिता रचली होती तेथें गेल्यावर लहानमोठीं इतरही सुगंधीं द्रव्यें चितेमध्यें घालून ऋत्विजांनीं त्या भूपतीला चितेवर निजविलें १७. तेव्हां अग्नीमध्यें हवन करून ऋत्विज अवश्य मंत्र जपूं लागले आणि सामगायन करणारे त्या ठिकाणीं यथाविधि सामें गाऊं लागले १८. योग्यतेप्रमाणें पालख्यांतून व रथांतून बसून वृद्धांनीं परिवेष्टित असलेल्या त्याच्या स्त्रिया नगरांतून तेथें निघून गेल्या १९. अश्वमेधांत यज्ञ केलेल्या त्या राजाला ऋत्विजांनीं उलट्या प्रदक्षिणा घातल्या व कौसल्याप्रभृति स्त्रिया त्याच्याकरितां शोकाकुल झाल्या २०. त्या दहनसमयीं हजारों स्त्रिया दुःखाकुल होऊन करुणस्वरानें आक्रोश करूं लागल्या असतां क्रौंचपक्षिणीप्रमाणें त्यांचा शब्द एकूं येऊं लागला २१. नंतर शोकाधीन होऊन रडत असलेल्या त्या राजस्त्रिया वारंवार विलाप करून सरयूचे तीरीं आपआपल्या वाहनांतून खालीं उतरल्या २२

ङ्गनाः २२ कृत्वोदकं ते भरतेन सार्धं नृपाङ्गनामन्त्रिपुरोहिताश्च । पुरं प्रविश्याश्रुपरीतनेत्रा भूमौ दशाहं व्यनयन्त दुःखम् २३ [२९९६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षट्सप्ततितमः सर्गः ॥ ७६ ॥

ततो दशाहेऽतिगते कृतशौचो नृपात्मजः । द्वादशेऽहनि संप्राप्ते श्राद्धकर्माण्यकारयत् १ ब्राह्मणेभ्यो धनं रत्नं ददावन्नं च पुष्कलम् । बास्तिकं बहु शुक्लं च गाश्चापि बहुशस्तदा २ दासीर्दासांश्च यानानि वेश्मानि सुमहान्ति च । ब्राह्मणेभ्यो ददौ पुत्रो राज्ञस्तस्यौर्ध्वदेहिकम् ३ ततः प्रभातसमये दिवसे च त्रयोदशे । विललाप महाबाहुर्भरतः शोकमूर्च्छितः ४ शब्दापिहितकण्ठश्च शोधनार्थमुपागतः । चितामूले पितुर्वाक्यमिदमाह सुदुःखितः ५ तात यस्मिन्निसृष्टोऽहं त्वया भ्रातरि राघवे । तस्मिन्वनं प्रव्रजिते शून्ये त्यक्तोऽस्म्यहं त्वया ६ यस्या गतिरनाथायाः पुत्रः प्रव्राजितो वनम् । तामम्बां तात कौसल्यां त्यक्त्वा त्वं क्व गतो नृप ७ दृष्ट्वा भस्मारुणं तच्च दग्धास्थि स्थानमण्डलम् । पितुः शरीरनिर्वाणं निष्टन-

---

आणि राजाची उदकक्रिया करून अश्रूंनीं नेत्र भरून आलेले ते मंत्रि व पुरोहित आणि राजस्त्रिया हे सर्व भरतासहवर्तमान नगरीमध्यें परत आले आणि दहा दिवसपर्यंत भूमीवर पडून त्यानें त्याचें अशौच काढिलें २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शहात्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७६ ॥

तदनंतर दहा दिवस होऊन बारावा दिवस प्राप्त झाल्यावर प्रेतविमुक्तिदायक एकादशाह श्राद्ध करून शुचि झालेल्या भरतानें पुढलीं श्राद्धकर्में करविलीं १. धन, रत्नें, विपुल अन्न, छागसमुदाय, असंख्य रौप्य आणि विपुल गाई त्यानें ब्राह्मणांना दिल्या २ आणि राजपुत्र भरतानें त्या राजाचें पारलौकिक हित व्हावें एतदर्थ दासी, दास, रथ आणि मोठमोठीं घरेंही ब्राह्मणांना दिलीं ३. तदनंतर तेराव्या दिवशीं प्रभातसमयीं शोकाकुल झालेला तो महापराक्रमी भरत विलाप करूं लागला ४ आणि रडून रडून घसा बसलेला तो भरत चिताभस्म पलीकडे करून भूमीची शुद्धि करण्याकरितां पित्याच्या चितेसमीप आल्यावर अत्यंत दुःखित होऊन ह्मणाला ५ " हे तात, ज्या भ्रात्या रामाच्या स्वाधीन तूं मला केलें आहेस तो राम वनामध्यें चालता झाल्यामुळें तूं मला कांहीं एक आधार न ठेवितां सांप्रत शून्य प्रदेशांत टाकून दिलें आहेस ६. ज्या अनाथ कौसल्येचा मुख्य आधार पुत्र तूं वनामध्यें पाठविलास त्या कौसल्या मातेचा त्याग करून तूं कोठें रे गेलास ! " ७. नंतर ज्यांतील भस्म अरुणवर्ण झालें आहे, ज्यांतील अस्थि दग्ध झाल्या आहेत आणि जेथें पित्याचें शरीर नाहींसें झालें

न्विषसाद ह ८ स तु दृष्ट्वा रुदन्दीनः पपात धरणीतले । उत्थाप्यमानः शक्रस्य यन्त्रध्वज इवोच्छ्रितः ९ अभिपेतुस्ततः सर्वे तस्यामात्याः शुचिव्रतम् । अन्तकाले निपतितं ययातिमृषयो यथा १० शत्रुघ्नश्चापि भरतं दृष्ट्वा शोकपरिप्लुतम् । विसंज्ञो न्यपतद्भूमौ भूमिपालमनुस्मरन् ११ उन्मत्त इव निश्चित्तो विललाप सुदुःखितः । स्मृत्वा पितुर्गुणाङ्गानि तानि तानि तदा तदा १२ मन्थराप्रभवस्तीव्रः कैकेयीग्राहसंकुलः । वरदानमयोऽक्षोभ्योऽमज्जयच्छोकसागरः १३ सुकुमारं च बालं च सततं लालितं त्वया । क्व तात भरतं हित्वा विलपन्तं गतो भवान् १४ ननु भोज्येषु पानेषु वस्त्रेष्वाभरणेषु च । प्रवारयति सर्वान्नस्तन्नः कोऽद्य करिष्यति १५ अवदारणकाले तु पृथिवी नावदीर्यते । विहीना या त्वया राज्ञा धर्मज्ञेन महात्मना १६ पितरि स्वर्गमापन्ने रामे चारण्यमाश्रिते । किं मे जीवितसा-

---

आहे असें तें चितास्थानमंडल अवलोकन करून अत्यंत शोक करूं लागलेला तो भरत खिन्न झाला ८; इतकेंच नव्हे परंतु, तें अवलोकन करितांक्षणीं रोदन करूं लागलेला तो दीन भरत भूतलावर पडला आणि लोक त्याला उठवूं लागले असतां तो उन्नत भरत भूमीवरून उभारिलेल्या यंत्रबद्ध इंद्रध्वजाप्रमाणें दिसूं लागला ९. पुण्यक्षयसमयीं स्वर्गांतून भूतलावर पडलेल्या ययातीकडे जसे ऋषि धांवून गेले तसे त्या भरताचे सर्व अमात्य, आचरणानें शुद्ध असलेला तो भरत भूमीवर पडला असतां, त्याच्याकडे धांवले १०. शोकाकुल झालेल्या भरताला अवलोकन करून शत्रुघ्नही रामाचें स्मरण करीत करीत मूर्छित होऊन भूमीवर पडला ११ आणि पित्याच्या गुणांचीं दर्शक असलेलीं तीं तीं कर्में स्मरून तो अत्यंत दुःखित झालेला शत्रुघ्न उन्मत्त पुरुषाप्रमाणें भान नाहींसें होऊन विलाप करूं लागला १२. सारांश, मंथरमुळें उत्पन्न झालेल्या कैकयीरूप, सुसरीनें व्याप्त झालेल्या आणि वरप्रदानरूप उदकानें युक्त असल्यामुळें क्षोभरहित असलेल्या प्रचंड शोकसागरानें त्या शत्रुघ्नाला बुडवून टाकिलें होतें १३. ( तो ह्मणाला ) " हे तात, तूं ज्याचें नेहमीं लाड केलेस त्या विलाप करीत असलेल्या सुकुमार बाल भरताला टाकून देऊन तूं कोठें बरें गेला आहेस ! १४. अरे, "भोज्य, पेय, वस्त्रें आणि आभरणें ह्यासंबंधानें " ह्यांतलें तुला काय हवें तें घे " असें ह्मणून तूं आमची इच्छा तृप्त करीत होतास ती खरोखर आतां आज कोण रे तृप्त करील! १५. तुज धर्मज्ञ महात्म्या राजाचा ह्या पृथ्वीला वियोग झाल्यामुळें हा तिचा विदीर्ण होऊन जाण्याचा काल प्राप्त झाला असतांही ती विदीर्ण होऊन जात नाहीं १६. पिता स्वर्गस्थ होऊन रामानेंही अरण्याचें अवलंबन केलें असतां आतां मला जगण्याचें

मर्थ्यं प्रवेक्ष्यामि हुताशनम् १७ हीनो भ्रात्रा च पित्रा च शून्यामिक्ष्वाकुपालिताम् । अयोध्यां न प्रवेक्ष्यामि प्रवेक्ष्यामि तपोवनम् १८ तयोर्विलपितं श्रुत्वा व्यसनं चाप्यवेक्ष्य तत् । भृशमार्ततरा भूयः सर्व एवानुगामिनः १९ ततो विषण्णौ श्रान्तौ च शत्रुघ्नभरतावुभौ । धरायां स्म व्यचेष्टतां भग्नशृङ्गाविवर्षभौ २० ततः प्रकृतिमान्वैद्यः पितुरेषां पुरोहितः । वसिष्ठो भरतं वाक्यमुत्थाप्य तमुवाच ह २१ त्रयोदशोऽयं दिवसः पितुर्वृत्तस्य ते विभो । सावशेषास्थिनिचये किमिह त्वं विलम्बसे २२ त्रीणि द्वन्द्वानि भूतेषु प्रवृत्तान्यविशेषतः । तेषु चापरिहार्येषु नैवं भवितुमर्हसि २३ सुमन्त्रश्चापि शत्रुघ्नमुत्थाप्याभिप्रसाद्य च । श्रावयामास तत्त्वज्ञः सर्वभूतभवाभवौ २४ उत्थितौ तौ नरव्याघ्रौ प्रकाशेते यशस्विनौ । वर्षातपपरिग्लानौ पृथगिन्द्रध्वजाविव २५ अश्रूणि परिमृन्दन्तौ रक्ताक्षौ दीनभाषिणौ । अमात्यास्त्वरयन्ति स्म तनयौ चापराः क्रियाः २६

---

सामर्थ्य काय आहे; मी अग्नीमध्यें प्रवेश करीन ! १७. भ्रातृरहित व पितृरहित झालेला मी इक्ष्वाकुवंशजांनीं परिपालन केलेल्या शून्य अयोध्यानगरीमध्यें प्रवेश करणार नाहीं; मी तपोवनांत प्रवेश करीन !" १८. ह्याप्रमाणें त्या उभयतांचा विलाप श्रवण करून व त्यांचें तें दुःख पाहून त्यांच्याबरोबर गेलेले सर्वही लोक पुनरपि अत्यंत दुःखाकुल झाले १९. तदनंतर खिन्न व श्रांत झालेले ते उभयतां भरतशत्रुघ्न शिंगें मोडलेल्या बैलाप्रमाणें पृथ्वीवर लोळूं लागले २०. तेव्हां सत्त्वप्रकृतिसंपन्न व सर्वज्ञ असे त्यांच्या पित्याचे पुरोहित वसिष्ठमुनि त्या भरताला उठवून ह्मणाले २१ " हे प्रभो, तुझ्या पित्याच्या मरणाला आज हा तेरावा दिवस. तेव्हां सावशेष अस्थिसंचय करण्याला तूं आतां येथें कां विलंब लावीत आहेस ? २२. क्षुधा व तृषा, शोक आणि मोह व जरा आणि मरण ह्या तीन दुकलीं प्राणिमात्रांना एकसारख्याच प्राप्त होत असतात. तेव्हां त्या जर अपरिहार्य आहेत तर तुला अशी अवस्था करून घेणें योग्य नाहीं " २३. ( ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितल्यानंतर ) तत्त्ववेत्त्या सुमंत्रानें शत्रुघ्नाला उठवून त्याचें सांत्वन केलें आणि प्राणिमात्रांच्या उत्पत्तिविनाशसंबंधानें त्यानेंही त्याला कांहीं सांगितलें २४. असो. ते पुरुषश्रेष्ठ यशस्वी भरतशत्रुघ्न उठले असतां पर्जन्य आणि उष्णता ह्यांनीं म्लान होऊन गेलेल्या दोन इंद्रध्वजाप्रमाणें दिसूं लागले २५ आणि ज्यांचे डोळे लाल झाले आहेत, जे दीन वाणीनें भाषण करीत आहेत व जे अश्रु पुशीत आहेत अशा त्या राजकुमारांना दुसरीं कृत्यें करण्याविषयीं अमात्य त्वरा करूं लागले २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसं-

[ ३०२२ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे सप्तसप्ततितमः सर्गः ॥ ७७ ॥

अथ यात्रां समीहन्तं शत्रुघ्नो लक्ष्मणानुजः। भरतं शोकसंतप्तमिदं वचनमब्रवीत् १ गतिर्यः सर्वभूतानां दुःखे किं पुनरात्मनः । स रामः सत्वसंपन्नः स्त्रिया प्रव्राजितो वनम् २ बलवान्वीर्यसंपन्नो लक्ष्मणो नाम योप्यसौ । किं न मोचयते रामं कृत्वापि पितृनिग्रहम् ३ पूर्वमेव तु निग्राह्यः समवेक्ष्य नयानयौ । उत्पथं यः समारूढो नार्या राजा वशं गतः ४ इति संभाषमाणे तु शत्रुघ्ने लक्ष्मणानुजे । प्राग्द्वारेभूत्तदा कुब्जा सर्वाभरणभूषिता ५ लिप्ता चन्दनसारेण राजवस्त्राणि बिभ्रती । विविधं विविधैस्तैस्तैर्भूषणैश्च विभूषिता ६ मेखलादामभिश्चित्रैरन्यैश्च वरभूषणैः । बभासे बहुभिर्बद्धा रज्जुभिरिव वानरी ७ तां समीक्ष्य तदा द्वाःस्थो भृशं पापस्य कारिणीम् । गृहीत्वाकरुणं कुब्जां शत्रुघ्नाय न्यवेदयत् ८ यस्याः कृते वने रामो न्यस्तदेहश्च वः पिता । सेयं पापा नृशंसा च तस्याः कुरु यथामति ९ शत्रुघ्नश्च तदाज्ञाय वचनं भृशदुःखितः। अन्तःपुरचरान्सर्वा-

---

ज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७७ ॥

तदनंतर रामाचे समीप जाण्याविषयीं विचार करणाऱ्या शोकसंतप्त भरताला लक्ष्मणाचा कनिष्ठ भ्राता शत्रुघ्न ह्मणाला १ " आपली तर गोष्ट पाहिजे कशाला; परंतु, दुःखसमयीं सर्व प्राण्यांनाही जो आधार त्या धैर्यवान् रामाला स्त्रीनें वनांत हांकून दिलें २; परंतु, बलाढ्य आणि वीर्यवान् ह्मणून जो प्रसिद्ध आहे त्या लक्ष्मणानें पित्याचा निग्रह करूनही रामाला कां सोडविलें नाहीं ? ३. स्त्रीला वश होऊन जो राजा कुमार्गाला प्रवृत्त झाला त्याचा न्यायान्याय पाहून पूर्वींच निग्रह करणें योग्य होतें " ४. ह्याप्रमाणें लक्ष्मणाचा कनिष्ठ भ्राता शत्रुघ्न बोलत असतांना पूर्वेकडील द्वारामध्यें सर्व प्रकारचें अलंकार धारण केलेली कुबडी मंथरा उभी होती ५. तिनें उत्कृष्ट चंदनाची उटी लावून राजांना योग्य असलेलीं वस्त्रें परिधान केलेलीं होतीं, नाना प्रकारच्या भूषणांनीं ती अनेक प्रकारें सजली होती ६ आणि कमरपट्ट्याचें अद्भुत पदर आणि इतरही उत्कृष्ट भूषणें ह्यांच्या योगानें ती मंथरा पुष्कळशा दोऱ्यांनीं बांधून ठेविलेल्या वानरीप्रमाणें दिसत होती ७. वारंवार अनर्थ उत्पन्न करणाऱ्या त्या कुबडीला अवलोकन करितांक्षणीं तेथील द्वारपालानें निर्दयपणानें तिला धरून शत्रुघ्नाला सांगितलें ८ " जिच्यामुळें राम वनवासांत गेला व जिच्यामुळें तुमच्या पित्यानें देहत्याग केला ती ही दुष्ट पापिणी कुबडी; हिचें आपण हवें तें करा " ९. हे शब्द

नित्युवाच धृतव्रतः १० तीव्रमुत्पादितं दुःखं भ्रातॄणां मे तथा पितुः। यथा सेयं नृशंसस्य कर्मणः फलमश्नुताम् ११ एवमुक्त्वा च तेनाशु सखीजनसमावृता। गृहीत्वा बलवत्कुब्जा सा तद्गृहमनादयत् १२ ततः सुभृशसंतप्तस्तस्याः सर्वः सखीजनः। क्रुद्धमाज्ञाय शत्रुघ्नं व्यपलायत सर्वशः १३ अमन्त्रयत कृत्स्नश्च तस्याः सर्वः सखीजनः। यथायं समुपक्रान्तो निःशेषं नः करिष्यति १४ सानुक्रोशां वदान्यां च धर्मज्ञां च यशस्विनीम्। कौसल्यां शरणं यामः सा हि नोऽस्ति ध्रुवा गतिः १५ स च रोषेण संवीतः शत्रुघ्नः शत्रुशासनः। संचकर्ष तदा कुब्जां क्रोशन्तीं पृथिवीतले १६ तस्यां ह्याकृष्यमाणायां मन्थरायां ततस्ततः। चित्रं बहुविधं भाण्डं पृथिव्यां तद्व्यशीर्यत १७ तेन भाण्डेन विस्तीर्णं श्रीमद्राजनिवेशनम्। अशोभत तदा भूयः शारदं गगनं यथा १८ स बली बलवत्क्रोधाद्गृहीत्वा पुरुषर्षभः। कैकेयीमभिनिर्भर्त्स्य बभाषे परुषं वचः १९ तैर्वाक्यैः परुषैर्दुःखैः कैकेयी भृशदुःखिता। शत्रुघ्नभयसंत्रस्ता पुत्रं शरणमागता २०

---

ऐकल्याबरोबर शत्रुघ्न अत्यंत दुःखित झाला आणि तो व्रतस्थ शत्रुघ्न अंतःपुरावरील सर्व लोकांना ह्मणाला १० " ज्याअर्थी हिनें माझ्या भ्रात्यांना व पित्याला तीव्र दुःख उत्पन्न केलें आहे त्याअर्थी हिला आतां आपल्या दुष्कर्माचें फल प्राप्त होऊं दे " ११. असें ह्मणून त्या शत्रुघ्नानें सख्यांनीं परिवेष्टित असलेली ती कुबडी बलात्कारानें एकदम धरिली. तेव्हां तिनें तें घर दणाणून दिलें १२. हें पाहून तिच्या सर्व सख्या अतिशय घाबरून गेल्या आणि शत्रुघ्न क्रुद्ध झाला आहे असें जाणून जिकडून वाट सांपडली तिकडून पळून गेल्या १३. तदनंतर तिच्या त्या सर्व सख्या आपआपल्यांत ह्मणाल्या " ज्याअर्थी ह्या शत्रुघ्नानें आरंभ केला आहे त्याअर्थी हा आतां आह्मांपैकीं कोणालाही शिल्लक ठेवीलसें दिसत नाहीं १४. तेव्हां दयालू, उदार, धर्मज्ञ आणि यशस्विनी अशा कौसल्येला आपण शरण जाऊं; ती आपला आधार ठरलेलीच आहे " १५. इकडे शत्रूंचें शासन करणारा तो शत्रुघ्न रोषानें व्याप्त होऊन आक्रोश करीत असलेल्या त्या कुबडीला भूतलावर फरफरा ओढूं लागला १६. तेव्हां मंथरेला तो ओढूं लागला असतां नानाप्रकारचीं तिचीं चित्रविचित्र भूषणें भूमीवर अस्ताव्यस्त पडलीं १७ व त्या भूषणांनीं तें वैभवसंपन्न विस्तीर्ण राजगृह शरदृतूंतील आकाशाप्रमाणें फारच शोभूं लागलें १८. असो. त्या पुरुषश्रेष्ठ बलाढ्य शत्रुघ्नानें क्रोधामुळें बलात्कारानें मंथरेला धरून कैकयीची निर्भर्त्सना केली आणि तिला उद्देशून कठोर भाषण केलें १९. तेव्हां त्या दुःखदायक

तं प्रेक्ष्य भरतः क्रुद्धं शत्रुघ्नमिदमब्रवीत् । अवध्याः सर्वभूतानां प्रमदाः क्षम्यतामिति २१ हन्यामहमिमां पापां कैकेयीं दुष्टचारिणीम् । यदि मां धार्मिको रामो नासूयेन्मातृघातकम् २२ इमामपि हतां कुब्जां यदि जानाति राघवः । त्वां च मां चैव धर्मात्मा नाभिभाषिष्यते ध्रुवम् २३ भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नो लक्ष्मणानुजः । न्यवर्तत ततो दोषात्तां मुमोच च मूर्छिताम् २४ सा पादमूले कैकेय्या मन्थरा निपपात ह । निःश्वसन्ती सुदुःखार्ता कृपणं विललाप ह २५ शत्रुघ्नविक्षेपविमूढसंज्ञां समीक्ष्य कुब्जां भरतस्य माता । शनैः समाश्वासयदार्तरूपां क्रौञ्चीं विलग्नामिव वीक्षमाणाम् २६ [३०४८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टसप्ततितमः सर्गः ॥ ७८ ॥

ततः प्रभातसमये दिवसेथ चतुर्दशे । समेत्य राजकर्तारो भरतं वाक्यमब्रुवन् १ गतो दशरथः स्वर्गं यो नो गुरुतरो गुरुः । रामं प्रव्राज्य वै ज्येष्ठं लक्ष्मणं च महाबलम् २ त्वमद्य भव नो राजा राजपुत्र महायशः ।

---

कठोर भाषणांनीं अत्यंत दुःखित झालेली कैकयी शत्रुघ्नाच्या भीतीनें गांगरून जाऊन पुत्राला शरण आली २०. असें झाल्यावर क्रुद्ध झालेल्या शत्रुघ्नाकडे पाहून भरत ह्मणाला " स्त्रिया सर्वही प्राण्यांना अवध्य आहेत ह्मणून तूं क्षमा कर २१. अरे, धर्मनिष्ठ राम मातृघातक ह्मणून जर मला दोष देणार नसेल तर मी ह्या दुराचारिणी दुष्ट कैकेयीचा वध करून टाकीन २२; परंतु, ह्या कुबडीलाही मारल्याचें जर त्याला समजलें तर तो धर्मात्मा राम तुझ्याशीं आणि माझ्याशीं भाषण सुद्धां निःसंशय करणार नाहीं २३." हें भरताचें भाषण श्रवण केल्यावर लक्ष्मणाचा कनिष्ठ भ्राता शत्रुघ्न त्या स्त्रीवधाच्या दोषापासून परावृत्त झाला आणि मूर्छित पडलेली ती कुबडी मंथरा त्यानें सोडून दिली २४. तदनंतर अत्यंत दुःखित झालेली ती मंथरा कैकेयीच्या पायापाशीं येऊन पडली आणि उस्मारून उस्मारून सुस्कारे टाकीत टाकीत करुणस्वरानें विलाप करूं लागली २५. तेव्हां शत्रुघ्नाच्या हिसडाहिसडीमुळें बेशुद्ध होऊन गांगरून गेलेल्या क्रौंच पक्षिणीप्रमाणें कैकेयीच्या तोंडाकडे पाहुं लागलेल्या त्या आर्त कुबडीला अवलोकन करून भरताच्या मातेनें हळू हळू तिचें सांत्वन केलें २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्याहत्तरावा सर्ग समाप्त झाला ॥ ७८ ॥

तदनंतर चौदाव्या दिवशीं प्रभातकालीं राजकार्यधुरंधर पुरुष एकत्र जुळून भरताला ह्मणाले १ " आमच्या गुरूचाही गुरु जो दशरथ तो ज्येष्ठ राम व महाब

संगत्या नापराप्नोति राज्यमेतदनायकम् ३ आभिषेचनिकं सर्वमिदमादाय राघव। प्रतीक्षते त्वां स्वजनः श्रेणयश्च नृपात्मज ४ राज्यं गृहाण भरत पितृपैतामहं ध्रुवम्। अभिषेचय चात्मानं पाहि चास्मान्नरर्षभ ५ आभिषेचनिकं भाण्डं कृत्वा सर्वं प्रदक्षिणम्। भरतस्तं जनं सर्वं प्रत्युवाच धृतव्रतः ६ ज्येष्ठस्य राजता नित्यमुचिता हि कुलस्य नः। नैवं भवन्तो मां वक्तुमर्हन्ति कुशला जनाः ७ रामः पूर्वो हि नो भ्राता भविष्यति महीपतिः। अहं त्वरण्ये वत्स्यामि वर्षाणि नव पञ्च च ८ युज्यतां महती सेना चतुरङ्गमहाबला। आनयिष्याम्यहं ज्येष्ठं भ्रातरं राघवं वनात् ९ आभिषेचनिकं चैव सर्वमेतदुपस्कृतम्। पुरस्कृत्य गमिष्यामि रामहेतोर्वनं प्रति १० तत्रैव तं नरव्याघ्रमभिषिच्य पुरस्कृतम्। आनयिष्यामि वै रामं हव्यवाहमिवाध्वरात् ११ न सकामां करिष्यामि स्वामिमां पुत्रगृद्धिनीम्। वने वत्स्याम्यहं दुर्गे रामो राजा भविष्यति १२ क्रियतां शिल्पिभिः पन्थाः समानि विषमाणि च।

---

लाढ्य लक्ष्मण ह्यांना वनवासांत पाठवून स्वर्गाला गेला २. तेव्हां, हे महाकीर्तिमान् राजपुत्रा, तूं आमचा राजा हो. तूं राजा होणें पित्याच्या आज्ञेशीं जुळत असल्यामुळें तुझ्याकडे कांहीं दोष येणार नाहीं. सांप्रत ह्या राज्याला कोणी नायक नाहीं ३. हे रघुवंशजा राजपुत्रा, अभिषेकाचें हें सर्व सामान घेऊन स्वजन आणि नगरवासी लोक तुझी वाट पहात आहेत ४. हे भरता, पितृपितामह परंपरेनें चालत आलेल्या ह्या अक्षय राज्याचा तूं स्वीकार कर आणि, हे पुरुषश्रेष्ठा, स्वतःला अभिषेक करून घेऊन आमचें परिपालन कर " ५. (ह्याप्रमाणें त्यांनीं सांगितलें असतां) अभिषेकाच्या त्या सर्व साहित्याला प्रदक्षिणा करून तो व्रतस्थ भरत ( तेथें जुळलेल्या ) सर्व लोकांना ह्मणाला ६ " हे कुशल लोकहो, ज्येष्ठाचें राजत्व ही आमच्या कुलांतील पद्धत आहे. तेव्हां मला उद्देशून असें बोलणें तुह्मांला योग्य नाहीं ७. आमचा ज्येष्ठ भ्राता राम राजा होईल आणि मी अरण्यामध्यें चवदा वर्षें वास्तव्य करीन ८. गज, रथ, घोडेस्वार आणि पायदळ अशा मोठ्या चतुरंगबलांनीं युक्त असलेली प्रचंड सेना सज्ज करा; मी ज्येष्ठ भ्रात्या राघवाला वनांतून घेऊन येतों ९. हें सर्व अभिषेकाचें सामान पुढें घालून मी रामाकरितां वनांत जाणार १० आणि तेथेंच त्या पुरुषश्रेष्ठ रामाला अभिषेक करून यज्ञशालेपासून अग्नी ज्याप्रमाणें घरीं आणितात त्याप्रमाणें रामाला पुढें घालून मी घेऊन येईन ११. पुत्राकरितां राज्याचा अभिलाष धरणाऱ्या ह्या सुताच्या मातेचा मनोरथ मी सिद्धीस नेणार नाहीं. सारांश, दुर्गम वनामध्यें मी वास्तव्य करीन आणि राम राजा होईल १२. कामगार लोकांकडून मार्ग तयार करवा. ज्या प्रदेशांवर चढ उतार असेल तो

रक्षिणश्चानुसंयान्तु पथि दुर्गविचारकाः १३ एवं संभाषमाणं तं रामहेतोर्नृपात्मजम् । प्रत्युवाच जनः सर्वः श्रीमद्वाक्यमनुत्तमम् १४ एवं ते भाषमाणस्य पद्मा श्रीरुपतिष्ठताम् । यस्त्वं ज्येष्ठे नृपसुते पृथिवीं दातुमिच्छसि १५ अनुत्तमं तद्वचनं नृपात्मजः प्रभाषितं संश्रवणे निशम्य च । प्रहर्षजास्तं प्रति बाष्पबिन्दवो निपेतुरार्याननेत्रसंभवाः १६ ऊचुस्ते वचनमिदं निशम्य हृष्टाः सामात्याः सपरिषदो वियातशोकाः । पन्थानं नरवर भक्तिमाञ्जनश्च व्यादिष्टस्तव वचनाच्च शिल्पिवर्गः १७ [३०६५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनाशीतितमः सर्गः ॥७९॥

अथ भूमिप्रदेशज्ञाः सूत्रकर्मविशारदाः । स्वकर्माभिरताः शूराः खनका यन्त्रकास्तथा १ कर्मान्तिकाः स्थपतयः पुरुषा यन्त्रकोविदाः । तथा वर्धकयश्चैव मार्गिणो वृक्षतक्षकाः २ सूपकाराः सुधाकारा वंशचर्मकृतस्तथा। समर्था ये च द्रष्टारः पुरतश्च प्रतस्थिरे ३ स तु हर्षात्तमुद्देशं जनौघो॰

---

प्रदेश (रथ जातां येण्याजोगा) सारिखा करा आणि दुर्गम प्रदेशांतून पार पाडून नेणारे रक्षक मार्गामध्यें बरोबर असूं द्या" १३. ह्याप्रमाणें रामाकरितां भाषण करीत असलेल्या त्या राजकुमार भरताला तेथें जमलेले सर्व लोक शुभ आणि उत्कृष्ट अशा शब्दांनीं ह्मणाले १४ " ज्येष्ठ राजपुत्राला जो तूं पृथ्वी देण्याची इच्छा करीत आहेस त्या ह्याप्रमाणें भाषण करणाऱ्या तुझी पद्मचिन्ह धारण करणारी लक्ष्मी सेवा करो " १५. लोकांनीं उच्चारिलेलें तें उत्कृष्ट आशीर्वचन आपल्या कानावर पडलेलें ऐकून राजकुमार भरताला आनंद झाला आणि त्या लोकांना उद्देशून आर्य भरताच्या मुखावर असलेल्या नेत्रांतून आनंदजन्य अश्रुबिंदु गळाले १६. असो. हे भरताचें भाषण श्रवण केल्यावर सभा आणि अमात्य ह्यांसहवर्तमान ते सर्व लोक अगदीं शोकरहित होऊन आनंदित झाले आणि त्याला ह्मणाले " हे पुरुषोत्तमा, तुझ्याविषयीं अनुरक्त असलेल्या ह्या लोकांना तुझ्या सांगण्यावरून मार्ग तयार करण्याविषयीं आणि रक्षकांना रक्षण करण्याविषयीं आज्ञा केली आहे " १७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकुणऐंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ७९ ॥

तदनंतर भूप्रदेशाची माहिती असणारे, गवंडी, खणणारे आणि जलप्रवाह वगैरे अडवून धरणारे असे आपआपल्या कर्मामध्यें दक्ष असलेले शूर कारागीर लोक १, मजुर, रथ वगैरे करणारे, यंत्रांची माहिती असलेले लोक, सुतार, मार्गरक्षक, झाडें तोडणारे २, आचारी, सफेती देणारे, बुरूड, चांभार आणि ( नलिकायंत्रादि साधनांनीं) दूरपर्यंत पहाण्यास समर्थ असलेले असे लोक पुढें निघाले ३. तो प्रचंड जनसमूह

विपुलः प्रयान् । अशोभत महावेगः सागरस्येव पर्वणि ४ ते स्ववारं समास्थाय वर्त्मकर्मणि कोविदाः । करणैर्विविधैस्तैः पुरस्तात्संप्रतस्थिरे ५ लता वल्लीश्च गुल्मांश्च स्थाणूनश्मन एव च । जनास्ते चक्रिरे मार्गं छिन्दन्तो विविधान्द्रुमान् ६ अवृक्षेषु च देशेषु केचिद्वृक्षानरोपयन् । केचित्कुठारैष्टङ्कैश्च दात्रैश्छिन्दन्क्वचित्क्वचित् ७ अपरे वीरणस्तम्बान्बलिनो फलवत्तराः । विधमन्ति स्म दुर्गाणि स्थलानि च ततस्ततः ८ अपरेऽपूरयन्कूपान्पांसुभिः श्वभ्रमायतम् । निम्नभागास्तथैवाशु समांश्चक्रुः समन्ततः ९ बबन्धुर्बन्धनीयांश्च क्षोद्यान्संचुक्षुदुस्तथा । बिभिदुर्भेदनीयांश्च तांस्तान्देशान्नरास्तदा १० अचिरेण तु कालेन परिवाहान्बहूदकान् । चक्रुर्बहुविधाकारान्सागरप्रतिमान्बहून् ११ निर्जलेषु च देशेषु खानयामासुरुत्तमान् । उदपानान्बहुविधान्वेदिकापरिमण्डितान् १२ ससुधाकुट्टिमतलः प्रपुष्पितमहीरुहः । मत्तोद्घुष्टद्विजगणः पताकाभिरलंकृतः १३ चन्दनोदकसंसिक्तो

---

हर्षानें त्या प्रदेशावरून जाऊं लागला असतां पर्वदिवशीं शोभणाऱ्या सागराच्या जलराशीप्रमाणें शोभूं लागला ४. मार्ग करण्यांत निपुण असलेले ते लोक आपआपल्या टोळीचा आश्रय करून नानाप्रकारच्या साधनांसहवर्तमान पुढें चालूं लागले ५ आणि फांद्या, वेल, झुडपें, सड आणि धोंडे एकीकडे करून आणि अनेक प्रकारचे वृक्ष तोडून त्यांनीं मार्ग तयार केला ६. वृक्षरहित प्रदेशामध्यें कांहींनीं वृक्ष रोविले, कांहीं लोक कुऱ्हाडी, टाक्या आणि कोयते घेऊन मार्गांतील झाडें तोडूं लागले व मोठमोठे धोंडे फोडून काढूं लागले ७. कांहीं फारच बलाढ्य लोक खाल मुळें गेलेलीं वाळ्यांचीं बेटें हातांनींच उपटून टाकूं लागले आणि कांहीं लोक दुर्गम स्थलें ( खोरीं कुदळीं घेऊन ) साफ करूं लागले ८. दुसरे कांहीं लोक मार्गामध्यें असलेले कूप व तशाच प्रकारचे मोठमोठे खाडे माती टाकून भरून काढूं लागले आणि त्याचप्रमाणें सखल प्रदेश माती टाकून साफ करूं लागले ९. कांहींजण पाट वगैरे बांधून काढूं लागले, कांहीं पायाला बोचणाऱ्या खड्यांचें पीठ करूं लागले व मर्गांतील पाणी निघून जाण्याकरितां कांहींजण पाट फोडून देऊं लागले १०. ह्याप्रमाणें थोडक्याच वेळांत त्या लोकांनीं ठिकठिकाणच्या अनेक प्रदेशांना नानाप्रकारचे आकार आणिले आणि जेथें उदकाचे प्रवाह अगदीं लहान होते तेथें बांध वगैरे घालून त्यांनीं ते प्रवाह सागराप्रमाणें विपुल जलानें युक्त करून सोडिले ११. निर्जन प्रदेशामध्यें कांहीं लोकांनीं विहिरी वगैरे नानाप्रकारचे उत्कृष्ट जलाशय खणून तयार केले आणि भोंवतालीं कट्टे बांधून त्याला सुशोभित केले १२. तव्हां विटेबंदी फरशा, प्रफुल्लित वृक्ष, व ध्वनि करणारे मत्त पक्षिसमुदाय ह्यांनीं युक्त, पताकांनीं भूषित १३,

नानाकुसुमभूषितः । बभ्वशोभत सेनायाः पन्थाः सुरपथोपमः १४ आज्ञाप्याथ यथाज्ञप्ति युक्तास्तेधिकृता नराः । रमणीयेषु देशेषु बहुस्वादुफलेषु च १५ यो निवेशस्त्वभिप्रेतो भरतस्य महात्मनः । भूयस्तं शोभयामासुर्भूषाभिर्भूषणोपमम् १६ नक्षत्रेषु प्रशस्तेषु मुहूर्तेषु च तद्विदः । निवेशान्स्थापयामासुर्भरतस्य महात्मनः १७ बहुपांसुचयाश्चापि परिखाः परिवारिताः । तत्रेन्द्रनीलप्रतिमाः प्रतोलीवरशोभिताः १८ प्रासादमालासंयुक्ताः सौधप्राकारसंवृताः । पताकाशोभिताः सर्वे सुनिर्मितमहापथाः १९ वितर्दिभिरिवाकाशे विटङ्काग्रविमानकैः । समुच्छ्रितैर्निवेशास्ते बभुः शक्रपुरोपमाः २० जाह्नवीं तु समासाद्य विविधद्रुमकाननाम् । शीतलामलपानीयां महामीनसमाकुलाम् २१ सचन्द्रतारागणमण्डितं यथा नभः क्षपायाममलं विराजते । नरेन्द्रमार्गः स तदा व्यराजत क्रमेण रम्यः शुभशिल्पिनिर्मितः २२ [३०८७] इत्यार्षे श्रीमद्रामायणेऽशीतितमः सर्गः ॥८०॥

---

गंधोदक शिंपडलेला आणि नानाप्रकारच्या पुष्पांनीं भूषित असा तो देवमार्गतुल्य सैन्यमार्ग फारच शोभूं लागला १४. मार्ग तयार करण्याकडे नेमलेल्या अधिकारी पुरुषांनीं आज्ञेप्रमाणें मार्ग तयार झाल्याची वर्दी दिल्यानंतर रमणीय आणि विपुल व स्वादिष्ट फलांनीं युक्त अशा प्रदेशामध्यें १५ महात्म्या भरताला जसे जसे तंबू हवे होते तसे तसे ठिकठिकाणीं तयार करून मार्गाच्या भूषणाप्रमाणें असलेले ते त्यांनीं नानाप्रकारच्या अलंकारांनीं सुशोभित केले १६. नंतर प्रशस्त नक्षत्रें व मुहूर्त पाहून महात्म्या भरताचे तंबू त्यांनीं ठिकठिकाणीं उभे केले १७. त्या शिबिराभोंवतीं खंदकासहवर्तमान बांधिलेले कोट इंद्रकील पर्वताप्रमाणें उंच उंच असून उत्कृष्ट मार्गांनीं सुशोभित झालेले होते व मृत्तिकेचे असंख्य गोळे एकावर एक रचून ते तयार केलेले होते १८. असो. तीं सर्व शिबिरें प्रासादसमुदायांनीं युक्त होतीं, राजवाड्यासारिख्या आकारांनीं व्याप्त होतीं, पताकांनीं सुशोभित केलेलीं होतीं आणि त्यांत जाण्याकरितां मोठमोठे रस्ते उत्कृष्ट रीतीनें तयार केले होते १९. कपोतगृहांनीं युक्त आणि आकाशांतील वेदीप्रमाणें दिसणाऱ्या सात सात मजली उंच इमारतींनीं युक्त असलेलीं तीं शिबिरें इंद्राच्या नगरीप्रमाणें दिसत होतीं २०. शीतल व निर्मल उदकानें युक्त, मोठमोठ्या जलचर प्राण्यांनीं व्याप्त आणि नानाप्रकारच्या वृक्षवनांनीं संपन्न अशा जान्हवीवरूनही गेलेला २१, पुढें पुढें अधिक अधिकच रम्य झालेला व चांगल्या कारागिरांनीं निर्माण केलेला तो राजमार्ग— चंद्रासहवर्तमान तारागणांनीं मंडित झालेलें निर्मल आकाश ज्याप्रमाणें रात्रीं शोभूं लागतें त्याप्रमाणें— शोभूं लागला २२. ह्याप्रमाणें ० अयोध्याकांडापैकीं ऐंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८० ॥

ततो नान्दीमुखीं रात्रिं भरतं सूतमागधाः । तुष्टुवुः सविशेषज्ञाः स्तवैर्मङ्गलसंस्तवैः १ सुवर्णकोणाभिहतः प्राणदद्यामदुन्दुभिः । दध्मुः शङ्खांश्च शतशो वाद्यांश्चोच्चावचस्वरान् २ स तूर्यघोषः सुमहान्दिवमापूरयन्निव । भरतं शोकसंतप्तं भूयः शोकैररन्धयत् ३ ततः प्रबुद्धो भरतस्तं घोषं संनिवर्त्य च । नाहं राजेति चोक्त्वा तं शत्रुघ्नमिदमब्रवीत् ४ पश्य शत्रुघ्न कैकेय्या लोकस्यापकृतं महत् । विसृज्य मयि दुःखानि राजा दशरथो गतः ५ तस्यैषा धर्मराजस्य धर्ममूला महात्मनः । परिभ्रमति राजश्रीर्नौरिवाकर्णिका जले ६ यो हि नः सुमहान्नाथः सोपिप्रव्राजितो वनं । अनया धर्ममुत्सृज्य मात्रा मे राघवः स्वयम् ७ इत्येवं भरतं वीक्ष्य विलपन्तमचेतनम् । कृपणा रुरुदुः सर्वाः सुस्वरं योषितस्तदा ८ तथा तस्मिन्विलपति वसिष्ठो राजधर्मवित् । सभामिक्ष्वाकुनाथस्य प्रविवेश महायशाः ९ शातकुम्भमयीं रम्यां मणिहेमसमाकुलाम् । सुधर्मामिव धर्मात्मा सगणः प्रत्यप-

---

तदनंतर भरताला ज्या दिवशीं अभिषेक करण्याचें वसिष्ठांनीं ठरविलें होतें त्या दिवसापूर्वींची रात्र थोडी राहिली आहे असें अवलोकन करून स्तुतिसंबंधानें विशेष माहितगार असलेले सूत व मागध मंगलकारक स्तवांनीं भरताची स्तुति करूं लागले १. प्रहराप्रहरानें वाजणारी नौबद सोन्याचीं टिपरीं वर पडूं लागलीं असतां वाजूं लागली आणि वाद्यें वाजविणारे लोक शंख व लहान मोठ्या ध्वनींनीं युक्त असलेलीं इतरही शेंकडों वाद्यें वाजवूं लागले २. परंतु, आकाश दुमदुमून टाकणाऱ्या त्या प्रचंड वाद्यघोषानें अधिकच शोकसंतप्त झालेल्या भरताला पुनरपि अधिक शोकग्रस्त करून टाकिलें ३. तेव्हां भरत जागा झाला आणि " मी राजा नव्हे " असें ह्मणून तो वाद्यघोष बंद केल्यावर त्या शत्रुघ्नाला ह्मणाला ४ " हे शत्रुघ्ना, कैकेयीमुळें माझ्यासंबंधानें लोकांचें हें मोठें अनुचित कर्म तूं पहा. अशा प्रकारचीं दुःखें माझ्यावर सोंपवून जो राजा स्वर्गाला चालता झाला ५ त्या महात्म्या धर्मराज दशरथाची ही धर्ममूलक राज्यलक्ष्मी उदकांत भ्रमण करणाऱ्या नाविकरहित नौकेप्रमाणें सांप्रत भ्रमण करीत आहे ६. आमचा जो अतिपूज्य प्रभु राम तोही ह्या मातेनें धर्माचा त्याग करून स्वतः वनामध्यें हांकून दिला आहे " ७. ह्याप्रमाणें भांबवून गेलेला तो भरत विलाप करीत असल्याचें अवलोकन करून सर्व अनाथ स्त्रिया गळा काढून रडूं लागल्या ८. तेव्हां तो भरत त्याप्रमाणें विलाप करीत असतांना राजधर्म जाणणारे महाकीर्तिमान् वसिष्ठमुनि इक्ष्वाकुराजाच्या सभेमध्यें प्रविष्ट झाले ९. ती रमणीय सभा सुवर्णाचीच केलेली असून रत्नमय व सुवर्णमय सामानानें भरलेली होती आणि देवसभेप्रमाणें असलेल्या त्या सभेंत

यत १० स काञ्चनमयं पीठं स्वस्त्यास्तरणसंवृतम् । अध्यास्त सर्ववेदज्ञो दूताननुशशास च ११ ब्राह्मणान्क्षत्रियान्योधानमात्यागणवल्लभान् । क्षिप्रमानयताव्यग्राः कृत्यमात्ययिकं हि नः १२ सराजपुत्रं शत्रुघ्नं भरतं च यशस्विनम् । युधाजितं सुमन्त्रं च ये च तत्र हिता जनाः १३ ततो हलहलाशब्दो महान्समुदपद्यत । रथैरश्वैर्गजैश्चापि जनानामुपगच्छताम् १४ ततो भरतमायान्तं शतक्रतुमिवामराः । प्रत्यनन्दन्प्रकृतयो यथा दशरथं तथा १५ ह्रद इव तिमिनागसंवृतः स्तिमितजलो मणिशङ्खशर्करः । दशरथसुतशोभिता सभा सदशरथेव बभूव सा पुरा १६ [३१०३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकाशीतितमः सर्गः ॥ ८१ ॥

तामार्यगणसंपूर्णां भरतः प्रग्रहां सभाम् । ददर्श बुद्धिसंपन्नः पूर्णचन्द्रां

---

धर्मात्मे वसिष्ठमुनि आपल्या शिष्यगणासहवर्तमान प्रविष्ट झाले १०. ( सभेंत प्रविष्ट झाल्यानंतर ) स्वस्तिकाकार मंडलांनीं युक्त असलेले आस्तरण ज्याच्यावर घातलें आहे अशा सुवर्णमय आसनावर बसल्यानंतर त्या सर्ववेदवेत्त्या वसिष्ठमुनींनीं दूतांना अशी आज्ञा केली कीं ११, " हे स्वकार्यदक्ष दूतहो, ब्राह्मण, क्षत्रिय, योद्धे, अमात्य, सेनानायक इतर राजकुमारांसहवर्तमान शत्रुघ्न, यशस्वी भरत, युधाजित्, सुमंत्र आणि जे कांहीं हित इच्छिणारे लोक असतील ते अशा सर्वांना तुम्ही सत्वर घेऊन या; आमचें जरूरीचें काम आहे १२.१३. (ह्याप्रमाणें वसिष्ठांची आज्ञा झाल्या ) नंतर रथ, अश्व आणि गज ह्यांवर आरूढ होऊन लोक येऊं लागले असतां हलहल असा मोठा ध्वनि होऊं लागला १४. तदनंतर इंद्र येऊं लागला असतां देव ज्याप्रमाणें त्याचें अभिवंदन करूं लागतात त्याप्रमाणें अमात्य. दशरथाचें जसें अभिवंदन करीत होते तसें, सभेंत येऊं लागलेल्या भरताचें अभिवंदन करूं लागले १५. दशरथपुत्र भरतामुळें सुशोभित झालेली ती सभा ( तेजोरूप जल, चित्रांतील तिमिमत्स्य, गज, शंख, भिंतीवरील सोनेरी रंग आणि स्तंभादिकांचे ठिकाणीं असलेलीं रत्नें ह्यांनीं युक्त असल्यामुळें ) तिमिमत्स्य व जलगज ह्यांनीं व्याप्त, स्तिमित जलानें युक्त आणि रत्नें, शंख व सुवर्णमृत्तिका ह्यांनीं भरलेल्या सामुद्रडोहाप्रमाणें भासूं लागली आणि (भरत हुबेहुब आपले पित्याप्रमाणेंच असल्या कारणानें ) पूर्वीप्रमाणें दशरथसहित असल्यासारखीच दिसूं लागली १६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एक्यायंशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८१ ॥

आर्यगणांनीं भरलेली आणि वसिष्ठप्रभृतींनीं अधिष्ठित असलेली ती सभा गुरुप्रभृति श्रेष्ठ ग्रह व पूर्ण चंद्र ह्यांनीं युक्त असलेल्या रात्रीप्रमाणें बुद्धिमान् भरतानें अवलोकन केली १.

निशामिव १ आसनानि यथान्यायमार्याणां विशतां तदा । वस्त्राङ्गरागप्रभया द्योतिता सा सभोत्तमा २ सा विद्वज्जनसंपूर्णा सभासु रुचिरा तथा । अदृश्यत घनापाये पूर्णचन्द्रेव शर्वरी ३ राज्ञस्तु प्रकृतीः सर्वाः स संप्रेक्ष्य च धर्मवित् । इदं पुरोहितो वाक्यं भरतं मृदु चाब्रवीत् ४ तात राजा दशरथः स्वर्गतो धर्ममाचरन् । धनधान्यवतीं स्फीतां प्रदाय पृथिवीं तव ५ रामस्तथा सत्यवृत्तिः सतां धर्ममनुस्मरन् । नाजहात्पितुरादेशं शशी ज्योत्स्नामिवोदितः ६ पित्रा भ्रात्रा च ते दत्तं राज्यं निहतकण्टकम् । तद्भुङ्क्ष्व मुदितामात्यः क्षिप्रमेवाभिषेचय ७ उदीच्याश्च प्रतीच्याश्च दाक्षिणात्याश्च केवलाः । कोटयापरान्ताः सामुद्रा रत्नान्युपहरन्तु ते ८ तच्छ्रुत्वा भरतो वाक्यं शोकेनाभिपरिप्लुतः । जगाम मनसा रामं धर्मज्ञो धर्मकाङ्क्षया ९ सबाष्पकलया वाचा कलहंसस्वरो युवा । विललाप सभामध्ये जगर्हे च पुरोहितम् १० चरितब्रह्मचर्यस्य विद्यास्नातस्य धीमतः । धर्मे प्रयतमानस्य को राज्यं मद्विधो हरेत् ११ कथं

---

सभ्य लोक आपआपल्या आसनावर वसूं लागले असतां त्यांचीं वस्त्रें व अंगाला लाविलेली उटि ह्यांच्या प्रभेनें ती उत्कृष्ट सभा प्रकाशित झाली २ आणि अत्यंत मनोहर अशी ती विद्वज्जनांनीं भरलेली सभा पूर्णचंद्रानें युक्त असलेल्या शरदृतूतील रात्रीप्रमाणें दिसूं लागली ३. असो. ( भरत सभेमध्यें आल्यानंतर ) ते धर्मवेत्ते पुरोहित वसिष्ठमुनि राजाच्या सर्व अमात्यांकडे पाहून मृदु स्वरानें भरताला ह्मणाले ४ " बा भरता, ( सत्यपरिपालनरूप ) धर्मानें वागणारा तुझा पिता दशरथराजा धनधान्यांनीं युक्त असलेली ही समृद्ध पृथ्वी तुला देऊन स्वर्गाला गेला ५ व त्याचप्रमाणें सत्यानें वागणाऱ्या रामानें सज्जनांनीं आचरिलेल्या धर्माकडे लक्ष्य देऊन, उदय पावलेला चंद्र ज्याप्रमाणें चंद्रिकेचा त्याग करीत नाहीं त्याप्रमाणें, आपल्या पित्याच्या आज्ञेचा त्याग केला नाहीं ६. तस्मात्, तूं आपणाला अभिषेक करून घे आणि पित्यानें व भ्रात्यानें तुला दिलेल्या ह्या निष्कंटक राज्याचा तूं आनंदित अमात्यांसहवर्तमान उपभोग घे ७. उत्तरेकडील पश्चिमेकडील, दक्षिणेकडील ( पूर्वेकडील ) बेटांतून राहणारे, समुद्रांत वास्तव्य करणारे आणि सिंहासनरहित असे राजे तुला रत्नें आणून देवोत " ८. हें वसिष्ठांचें भाषण श्रवण केल्यावर भरत शोकानें अगदीं उचंबळूं लागला आणि तो धर्मज्ञ भरत धर्माला अनुसरून वागण्याची इच्छा धरून मनामध्यें रामाचें स्मरण करूं लागला ९ व नंतर कलहंसाप्रमाणें मधुर स्वरानें युक्त असलेला तो तरुण भरत अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत सभेमध्यें विलाप करून पुरोहित वसिष्ठांनाच राग भरला १०. ( तो ह्मणाला ) " ब्रह्मचर्यव्रताचें परिपालन करून विद्यापारंगत झालेल्या व धर्माविषयीं

दशरथाज्जातो भवेद्राज्यापहारकः । राज्यं चाहं च रामस्य धर्मं वक्तुमिहार्हसि १२ ज्येष्ठः श्रेष्ठश्च धर्मात्मा दिलीपनहुषोपमः । लब्धुमर्हति काकुत्स्थो राज्यं दशरथो यथा १३ अनार्यजुष्टमस्वर्ग्यं कुर्यां पापमहं यदि । इक्ष्वाकूणामहं लोके भवेयं कुलपांसनः १४ यद्धि मात्रा कृतं पापं नाहं तदपि रोचये । इहस्थो वनदुर्गस्थं नमस्यामि कृताञ्जलिः १५ राममेवानुगच्छामि स राजा द्विपदां वरः । त्रयाणामपि लोकानां राघवो राज्यमर्हति १६ तद्वाक्यं धर्मसंयुक्तं श्रुत्वा सर्वे सभासदः । हर्षान्मुमुचुरश्रूणि रामे निहितचेतसः १७ यदि त्वार्यं न शक्ष्यामि विनिवर्तयितुं वनात् । वने तत्रैव वत्स्यामि यथार्यो लक्ष्मणस्तथा १८ सर्वोपायं तु वर्तिष्ये विनिवर्तयितुं बलात् । समक्षमार्यमिश्राणां साधूनां गुणवर्तिनाम् १९ विष्टिकर्मान्तिकाः

---

तत्पर असलेल्या विवेकी रामाच्या राज्याचा अपहार करण्यास माझ्यासारिखा कोण बरें उद्युक्त होईल ? ११. दशरथापासून उत्पन्न झालेला पुत्र राज्याचा अपहार करणारा कसा बरें होईल ? राज्य आणि मी ह्या दोहोंचाही स्वामी रामच आहे. तेव्हां आपण ह्याचा विचार करून ह्या सभेमध्यें धर्मानें बोलत जा १२. दिलीप आणि नहुष ह्यांचो बरोबरी करणारा धर्मात्मा ककुत्स्थकुलोत्पन्न राम ज्येष्ठ व श्रेष्ठ आहे आणि ह्मणूनच दशरथाप्रमाणें त्यालाच राज्य मिळणें योग्य आहे १३. आर्यांनीं कधींही न केलेलें असें स्वर्गप्रतिबंधक पापकर्म जर मीं केलें तर मी ह्या जगतामध्यें इक्ष्वाकुवंशजांच्या कुलाला कलंक लावणारा होईन १४. मातेनें जें पाप केलें आहे तेंही मला संमत नाहीं. मी येथूनच वनरूप दुर्गम प्रदेशामध्यें रहाणाऱ्या रामाला नमस्कार करीत जाईन १५. मी रामाच्याच मागोमाग चालता होतो. तो पुरुषश्रेष्ठ रामच ह्या राज्याचा राजा आहे; इतकेंच नव्हे परंतु, त्रैलोक्याचेंही राज्य करण्याला तो योग्य आहे''१६. हें धर्माला अनुसरून असलेलें भरताचें भाषण श्रवण केल्यावर रामाकडे अंतःकरण लागून राहिलेल्या सर्व सभासदांच्या नेत्रांतून आनंदाश्रु गळूं लागले १७. ( तेव्हां पुनरपि भरत ह्मणाला ) " आर्य रामाला वनांतून परत आणण्यास जर मी समर्थ झालों नाहीं तर आर्य लक्ष्मणाप्रमाणें मीही तेथें वनांत राहीन १८. मी आपलें सर्व सामर्थ्य खर्च करून सज्जन व गुणसंपन्न अशा तुह्मा पूज्य द्विजांसमक्ष रामाला वनांतून परत आणण्याविषयीं सर्व उपाय करीन १९. वेठ वहाणारे आणि मजुरीचे असे सर्व मार्ग-

---

१ कांहीं तरी निमित्त उपस्थित करून अगर आपोआप उपस्थित झाले असतां त्याचा फायदा घेऊन उगीच एकाद्याचें राज्य हरण करण्याची पद्धति ह्या भरतखंडांतील अमूदार राजांनीं स्वीकारिलेली नव्हती असें ह्या श्लोकावरून दिसतें.

सर्वे मार्गशोधकदक्षकाः । प्रस्थापिता मया पूर्वं यात्रा च मम रोचते २० एवमुक्त्वा तु धर्मात्मा भरतो भ्रातृवत्सलः । समीपस्थमुवाचेदं सुमन्त्रं मन्त्रकोविदम् २१ तूर्णमुत्थाय गच्छ त्वं सुमन्त्र मम शासनात् । यात्रामाज्ञापय क्षिप्रं बलं चैव समानय २२ एवमुक्तः सुमन्त्रस्तु भरतेन महात्मना । प्रहृष्टः सोदिशत्सर्वं यथासंदिष्टमिष्टवत् २३ ताः प्रहृष्टाः प्रकृतयो बलाध्यक्षा बलस्य च । श्रुत्वा यात्रां समाज्ञप्तां राघवस्य निवर्तने २४ ततो योधाङ्गनाः सर्वा भर्तॄन्सर्वान्गृहे गृहे । यात्रागमनमाज्ञाय त्वरयन्ति स्म हर्षिताः २५ ते हयैर्गोरथैः शीघ्रं स्यन्दनैश्च मनोजवैः । सहयोषिद्बलाध्यक्षा बलं सर्वमचोदयन् २६ सज्जं तु तद्बलं दृष्ट्वा भरतो गुरुसंनिधौ । रथं मे त्वरयस्वेति सुमन्त्रं पार्श्वतो ब्रवीत् २७ भरतस्य तु तस्याज्ञां परिगृह्य प्रहर्षितः । रथं गृहीत्वोपययौ युक्तं परमवाजिभिः २८ स राघवः सत्यधृतिः प्रतापवान्ब्रुवन्सुयुक्तं दृढसत्यविक्रमः । गुरुं महारण्यगतं यशस्विनं प्रसादयिष्यन्भरतोब्रवीत्तदा २९ तूर्णं त्वमुत्थाय सुमन्त्र गच्छ बलस्य योगाय

---

शोधक व दक्ष लोक मी आधींच पुढें पाठविले आहेत आणि रामाच्या मागोमाग वनांत जाणेंच मला रुचत आहे " २०. ह्याप्रमाणें बोलून तो धर्मात्मा भ्रातृवत्सल भरत सल्लामसलतीमध्यें निपुण अशा समीप बसलल्या सुमंत्र अमात्याला ह्मणाला २१ " हे सुमंत्रा, तूं लवकर उठून जा आणि माझ्या आज्ञेनें स्वारीच्या तयारीचा हुकम करून सैन्य सत्वर घेऊन ये " २२. ह्याप्रमाणें महात्म्या भरतानें सांगितलें असतां त्या सुमंत्राला आनंद झाला आणि आपल्या इच्छेप्रमाणें असलेली ती भरताची आज्ञा त्यानें सर्व होती तशी कळविली २३. तेव्हां रामाला परत आणण्याकरितां सैन्याला स्वारीची तयारी करण्याविषयीं झालेली आज्ञा ऐकिल्यावर ते अमात्य व सेनाधिपति आनंदित झाले २४ आणि स्वारी निघण्याची बातमी ऐकून आनंदित झालेल्या सर्व वीरांगना घरोघरीं आपआपल्या भर्त्यांना त्वरा करूं लागल्या २५. नंतर घोडे, बैलगाड्या आणि मनाप्रमाणें वेगानें जाणारे रथ ह्यांवर आरूढ होऊन स्त्रिया व सेनानायक ह्यांसहवर्तमान त्या अमात्यांनीं सर्व सैन्य चालू केलें २६. तेव्हां गुरु वसिष्ठमुनींचे संनिध बसलेला भरत तें सैन्य सज्ज झाल्याचें अवलोकन करून " माझा रथ सत्वर घेऊन ये " असें बाजूला बसलेल्या सुमंत्राला ह्मणाला असतां २७ सुमंत्र आनंदित झाला आणि त्या भरताची आज्ञा मान्य करून व त्याप्रमाणें उत्कृष्ट अश्व जोडिलेला रथ घेऊन तो आला २८. तेव्हां सत्यनिष्ठ, प्रतापी, अतिशय योग्य भाषण करणारा, दृढ व अमोघपराक्रम करणारा आणि महावनांत गेलेल्या पितृतुल्य यशस्वी रामाचें मन परत

बलप्रधानान्। आनेतुमिच्छामि हि तं वनस्थं प्रसाद्य रामं जगतो हिताय ३० स सूतपुत्रो भरतेन सम्यगाज्ञापितः संपरिपूर्ण कामः । शशास सर्वान्प्रकृतिप्रधानान्बलस्य मुख्यांश्च सुहृज्जनं च ३१ ततः समुत्थाय कुले कुले ते राजन्यवैश्या वृषलाश्च विप्राः । अयूयुजन्नुष्ट्ररथान्खरांश्च नागान्हयांश्चैव कुलप्रसूतान् ३२ [३१३५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्व्यशीतितमः सर्गः ॥ ८२ ॥

ततः समुत्थितः कल्यमास्थाय स्यन्दनोत्तमम् । प्रययौ भरतः शीघ्रं रामदर्शनकाम्यया १ अग्रतः प्रययुस्तस्य सर्वे मन्त्रिपुरोहिताः । अधिरुह्य हयैर्युक्तान्रथान्सूर्यरथोपमान् २ नवनागसहस्राणि कल्पितानि यथाविधि । अन्वयुर्भरतं यान्तमिक्ष्वाकुकुलनन्दनम् ३ षष्टीरथसहस्राणि धन्विनो विविधायुधाः । अन्वयुर्भरतं यान्तं राजपुत्रं यशस्विनम् ४ शतं सहस्राण्यश्वानां समारूढानि राघवम् । अन्वयुर्भरतं यान्तं राजपुत्रं यशस्विनम् ५ कैकेयी च सुमित्रा च कौसल्या च यशस्विनी । रामानयनसंतुष्टा ययुर्यानेन भास्वता ६

---

येण्याविषयीं वळविण्याची इच्छा करणारा तो भरत सुमंत्राला ह्मणाला २९ "हे सुमंत्रा, तूं लवकर उठून जा आणि सैन्य जुळविण्याकरितां सेनापतींना आज्ञा कर. कारण, वनामध्यें असलेल्या त्या रामाला प्रसन्न करून घेऊन जगताच्या हिताकरितां परत आणण्याची माझी इच्छा आहे " ३०. ह्याप्रमाणें भरतानें स्पष्ट आज्ञा केली असतां मनोरथ परिपूर्ण झालेल्या त्या सुमंत्र सारथ्यानें सर्व मुख्य मुख्य अमात्य, सेनानायक आणि सुहृद ह्यांना ती आज्ञा कळविली ३१. तेव्हां क्षत्रिय, वैश्य, शूद्र आणि विप्र हे उठले आणि उंटांच्या गाड्या, गर्दभ, हत्ती आणि कुलीन अश्व स्वारीला जाण्याकरितां त्यांनीं घरोघर तयार केले ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं ब्यायशीवा अध्याय समाप्त झाला ॥ ८२ ॥

तदनंतर भरत प्रातःकाळीं उठला आणि श्रेष्ठ रथावर आरूढ होऊन रामदर्शनाच्या उद्देशानें सत्वर चालता झाला १. मंत्री आणि पुरोहित हे सर्व अश्व जोडिलेल्या सूर्यरथासमान रथावर आरूढ होऊन त्याच्या पुढेंच चालते झाले २ आणि तो इक्ष्वाकुकुलनंदन भरत जाऊं लागला असतां यथायोग्य रीतीनें सज्ज केलेले नऊ हजार हत्ती त्याच्या मागोमाग गेले ३. नानाप्रकारचीं आयुधें धारण केलेले धनुर्धारी योद्धे राजपुत्र यशस्वी भरत जाऊं लागला असतां साठ हजार रथांवर आरूढ होऊन त्याच्या मागोमाग गेले ४. एक लक्ष स्वार राजपुत्र यशस्वी भरत जाऊं लागला असतां त्याच्या मागोमाग अश्वांवर आरूढ होऊन चालते झाले ५. कैकेयी, सुमित्रा आणि यशस्विनी

प्रयाताश्चार्यसंघाता रामं द्रष्टुं सलक्ष्मणम् । तस्यैव च कथाश्चित्राः कुर्वाणा हृष्टमानसाः ७ मेघश्यामं महाबाहुं स्थिरसत्त्वं दृढव्रतम् । कदा द्रक्ष्यामहे रामं जगतः शोकनाशनम् ८ दृष्ट एव हि नः शोकमपनेष्यति राघवः । तमः सर्वस्य लोकस्य समुद्यन्निव भास्करः ९ इत्येवं कथयन्तस्ते संप्रहृष्टाः कथाः शुभाः । परिष्वजानाश्चान्योन्यं ययुर्नागारिकास्तदा १० ये च तत्रापरे सर्वे संमता ये च नैगमाः । रामं प्रतिययुर्हृष्टाः सर्वाः प्रकृतयः शुभाः ११ मणिकाराश्च ये केचित्कुम्भकाराश्च शोभनाः । सूत्रकर्मविशेषज्ञा ये च शास्त्रोपजीविनः १२ मायूरकाः क्राकचिका वेधका रोचकास्तथा । दन्तकाराः सुधाकारा ये च गन्धोपजीविनः १३ सुवर्णकाराः प्रख्यातास्तथा कम्बलकारकाः । स्नापकोष्णोदका वैद्या धूपकाः शौण्डिकास्तथा १४ रजकास्तुन्नवायाश्च ग्रामघोषमहत्तराः । शैलूषाश्च सह स्त्रीभिर्यान्ति कैवर्तकास्तथा १५ समाहिता वेदविदो ब्राह्मणा वृत्तसं-

---

कौसल्या रामाला आणावयाचें हें ऐकून संतुष्ट झाल्या आणि उज्ज्वल रथांत बसून भरताबरोबर गेल्या ६. सभ्य लोकांचे समुदाय लक्ष्मणासहवर्तमान रामाला अवलोकन करण्याकरितां त्याच्याच अद्भुत गोष्टी कथन करीत करीत मनामध्यें आनंदित होऊन चालते झाले ७. " मेघाप्रमाणें श्यामवर्ण, महापराक्रमी, बुद्धीचा स्थिर, स्वीकारलेलें व्रत निश्चयानें चालविणारा आणि जगताचा शोक नाहींसा करणारा राम आह्मीं केव्हां बरें पाहूं ? ८. उदय पावणारा सूर्य दृष्टीं पडतांक्षणीं ज्याप्रमाणें सर्व जगताचा अंधार नाहींसा करितो त्याप्रमाणें रघुवंशज दृष्टीं पडतांक्षणीं आमचें दुःख नाहींसें करील " ९. ह्याप्रमाणें शुभ गोष्टी बोलत असलेले व एकमेकाला कवटाळीत असलेले ते अयोध्यानगरींतील लोक अत्यंत आनंदित होऊन चालते झाले १० त्या अयोध्यानगरीमध्यें जे इतर प्रसिद्ध लोक होते आणि जे विख्यात व्यापारी होते तेही सर्व रामाकडे गेले आणि समयीक धंदा करणारे व्यापारी लोकांचे सर्व चांगले चांगले समुदायही आनंद होऊन रामाकडे चालते झाले ११. सराफ, प्रतिष्ठित कुंभार, साळी, शस्त्र तयार करणारे लोक १२, मोरांच्या पिसांचे विंझोणे वगैरे करणारे, अरकस, विंधारी, काचेच्या कुप्या वगैरे करणारे, हस्तीदंती काम करणारे, सफेति देणारे, गधी १३, विख्यात सोनार, सनगर, स्नान घालणारे, आंग चोळणारे, वैद्य, धूपावर उपजीविका करणारे, कलाल १४, धोबी, शिंपी, गांवांतून व खेड्यापाड्यांतून रहाणारे, मोठमोठे नट आणि नावाडी आपल्या स्त्रियांसहवर्तमान जाऊं लागले १५. स्वस्थ अंतःकरणानें युक्त आणि आचरणामुळें लोकांना मान्य असे वेदवेत्ते हजारों ब्राह्मण भरत

मताः । गोरथैर्भरतं यान्तमनुजग्मुः सहस्रशः १६ सुवेषाः शुद्धवसनास्ताम्रमृष्टानुलेपिनः । सर्वे ते विमलैर्यानैः शनैर्भरतमन्वयुः १७ प्रहृष्टमुदिता सेना सान्वयात्कैकयीसुतम् । भ्रातुरानयने यातं भरतं भ्रातृवत्सलम् १८ ते गत्वा दूरमध्वानं रथयानाश्वकुञ्जरैः । समासेदुस्ततो गङ्गां शृङ्गवेरपुरं प्रति १९ यत्र रामसखा वीरो गुहो ज्ञातिगणैर्वृतः । निवसत्यप्रमादेन देशं तं परिपालयन् २० उपेत्य तीरं गङ्गायाश्चक्रवाकैरलंकृतम् । व्यवतिष्ठत सा सेना भरतस्यानुयायिनी २१ निरीक्ष्यानुत्थितां सेनां तां च गङ्गां शिवोदकाम् । भरतः सचिवान्सर्वानब्रवीद्वाक्यकोविदः २२ निवेशयत मे सैन्यमभिप्रायेण सर्वतः । विश्रान्ताः प्रतरिष्यामः श्व इमां सागरंगमाम् २३ दातुं च तावदिच्छामि स्वर्गतस्य महीपतेः । और्ध्वदेहनिमित्तार्थमवतीर्योदकं नदीम् २४ तस्यैवं ब्रुवतोमात्यास्तथेत्युक्त्वा समाहिताः । न्यवेशयंस्तां छन्देन स्वेन स्वेन पृथक्पृथक् २५ निवेश्य गङ्गामनु

---

जाऊं लागला असतां बैलगाड्यांतून बसून त्याच्या मागोमाग गेले[1] १६. सारांश, शुद्ध वस्त्रें परिधान करून, ताम्रवर्ण व उज्ज्वल अशी उटी अंगाला लावून आणि चांगला पोशाख करून ते सर्व निर्मल यानावर आरूढ होऊन हळू हळू भरताच्या मागोमाग चालले १७. भ्रात्याला आणण्याकरितां जाणाऱ्या कैकेयीपुत्र भ्रातृवत्सल भरताच्या मागोमाग ती हर्षयुक्त व आनंदित झालेली सेना गेली १८. असो. रथ, गाड्या, अश्व आणि गज ह्यांवर आरूढ होऊन बराच दूर मार्ग आक्रमण केल्यानंतर ते लोक शृंगवेरपुराजवळ गंगेसमीप जाऊन पोंचले १९. त्या ठिकाणीं आपल्या जातभाईंच्या टोळ्यांनीं परिवेष्टित असलेला रामसखा वीर गुह त्या प्रदेशाचें दक्षतापूर्वक रक्षण करीत रहात होता २०. असो. चक्रवाक पक्ष्यांनीं भूषित असलेल्या गंगातीराला आल्यावर भरताच्या मागोमाग जाणारें तें सैन्य उभें राहिलें २१. तेव्हां पुढें जाण्याविषयीं उद्युक्त नसलेली सेना आणि पुण्य उदकानें युक्त असलेली ती गंगा अवलोकन करून वक्ता भरत सर्व सचिवांना ह्मणाला २२ " माझ्या अभिप्रायाला अनुसरून सर्व सैन्याचा आज येथें तळ द्या. आपण विश्रांति घेतल्यावर उदयीक ही समुद्रगामिनी नदी तरून जाऊं २३. प्रथम आधीं गंगेमध्यें उतरून स्वर्गस्थ झालेल्या भूपतीचें परलोकप्राप्त्यर्थ तर्पण करण्याची माझी इच्छा आहे " २४. ह्याप्रमाणें तो भरत बोलूं लागला असतां

---

१ बैलगाडीमध्यें बसून जाणें कांहीं ब्राह्मण अयोग्य समजत असतात; परंतु, धर्मशास्त्रामध्यें बैलाच्या पाठीवर बसून जाणें ब्राह्मणाला दोषावह सांगितलें आहे. त्याची अतिव्याप्ति करून बैलगाडींत बसण्याला दोष मानणें योग्य नाहीं असें ह्या श्लोकावरून स्पष्ट होतें.

तां महानदीं चमूं निधानैः परिबर्हगोभिनीम् । उवास रामस्य तदा महात्मनो विचिन्तमानो भरतो निवर्तनम् २६ [ ३१६१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्र्यशीतितमः सर्गः ॥ ८३ ॥

ततो निविष्टां ध्वजिनीं गङ्गामन्वाश्रितां नदीम् । निषादराजो दृष्ट्वैव ज्ञातीन्सपरितोब्रवीत् १ महतीयमितः सेना सागराभा प्रदृश्यते । नास्यान्तमवगच्छामि मनसापि विचिन्तयन् २ यदा तु खलु दुर्बुद्धिर्भरतः स्वयमागतः । स एष हि महाकायः कोविदारध्वजो रथे ३ बन्धयिष्यति वा पाशैरथ वास्मान्वधिष्यति । अनु दाशरथिं रामं पित्रा राज्याद्विवासितम् ४ संपन्नां श्रियमन्विच्छंस्तस्य राज्ञः सुदुर्लभाम् । भरतः कैकयीपुत्रो हन्तुं समधिगच्छति ५ भर्ता चैव सखा चैव रामो दाशरथिर्मम । तस्यार्थकामाः सन्नद्धा गङ्गानूपेत्र तिष्ठत ६ तिष्ठन्तु सर्वदाशाश्च गङ्गामन्वाश्रिता नदीम् । बलयुक्ता नदीरक्षा मांसमूलफलाशनाः ७ नावां शतानां पञ्चानां

---

दक्ष असलेले त्याचे अमात्य " ठीक आहे " असें ह्मणाले आणि आपल्या इच्छेप्रमाणें त्यांनीं त्या सैन्याचा वेगवेगळा तळ दिला २५. सारांश, बाडबिछाईत वगैरे बरोबर घेतलेल्या सामानानें शोभणाऱ्या त्या सेनेची रहाण्याची व्यवस्था करून भरत, त्या महानदी गंगेशीं तळ दिल्यावर महात्म्या रामाच्या परत येण्याविषयीं चिंतन करीत करीत, तेथें राहिला २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं त्र्यायशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८३ ॥

तदनंतर गंगेचा आश्रय करून त्या सैन्याचा तळ पडलेला पाहिल्यावर तो निषधराज गुह आपल्या सर्व ज्ञातींना ह्मणाला १ " ही समुद्रासारखी प्रचंड सेना ह्या गंगातीरीं उतरलेली दिसत आहे व मनामध्यें विचार करूं लागलों असतांही हिचा उद्देश माझ्या लक्ष्यांत येत नाहीं २. ज्याअर्थी हा प्रचंड कोविदारध्वज रथावर दृष्टीं पडत आहे त्याअर्थी दुष्टबुद्धि भरतच स्वतः आला आहे असें दिसतें ३. हा कदाचित् अमात्यांकडून आमच्या मुसक्या बांधवील अथवा आह्मांला मारून टाकील आणि नंतर पित्यानें राज्यापासून हांकून दिलेल्या दाशरथि रामाचाही हा वध करील असें वाटतें ४. त्या दशरथराजाची अत्यंत दुर्लभ राज्यलक्ष्मी अक्षय्य प्राप्त व्हावी अशी इच्छा धरून कैकेयीचा पुत्र भरत रामाचा वध करण्याकरितां जात आहे ५. दाशरथी राम माझा अधिपति व सखा आहे. तऱ्हां त्याचें हित करण्याची इच्छा धरून तुह्मी ह्या गंगातीरीं माझ्यापाशीं उभे रहा ६. मांस, मुळें, फळें वगैरे आपलें खाणें बरोबर घेऊन माझ्या ताब्यांतील सर्व बलाढ्य धीवर गंगानदीचाच आश्रय करून तिचें रक्षण करीत

कैवर्तानां शतं शतम्। संनद्धानां तथा यूनां तिष्ठन्त्वित्यभ्यचोदयत् ८ यदि तुष्टस्तु भरतो रामस्येह भविष्यति। इयं स्वस्तिमती सेना गङ्गामद्य तरिष्यति ९ इत्युक्त्वोपायनं गृह्य मत्स्यमांसमधूनि च। अभिचक्राम भरतं निषादाधिपतिर्गुहः १० तमायान्तं तु संप्रेक्ष्य सूतपुत्रः प्रतापवान्। भरतायाचचक्षेथ समयज्ञो विनीतवत् ११ एष ज्ञातिसहस्रेण स्थपतिः परिवारितः। कुशलो दण्डकारण्ये वृद्धो भ्रातुश्च ते सखा १२ तस्मात्पश्यतु काकुत्स्थ त्वां निषादाधिपो गुहः। असंशयं विजानीते यत्र तौ रामलक्ष्मणौ १३ एतत्तु वचनं श्रुत्वा सुमन्त्राद्भरतः शुभम्। उवाच वचनं शीघ्रं गुहः पश्यतु मामिति १४ लब्ध्वानुज्ञां संप्रहृष्टो ज्ञातिभिः परिवारितः। आगम्य भरतं प्रह्वो गुहो वचनमब्रवीत् १५ निष्कुटश्चैव देशोऽयं वञ्चिताश्चापि ते वयम्। निवेदयाम ते सर्वं स्वके दाशगृहे वस १६ अस्ति मूलफलं चैतन्निषादैः स्वयमर्जितम्। आर्द्रं शुष्कं यथामांसं वन्यं

---

रहा. ( कोणाला नदी उतरूं देऊं नका ) ७. युद्धाच्या तयारीनें असलेले शंभर शंभर तरुण नावाडी प्रत्येक नावेंत ठेवून पांचशें नावा तयार ठेवा " असा त्या गुहानें आपल्या जातभाईंना हुकूम केला ८. ( नंतर पुनरपि तो त्यांना ह्मणाला ) " भरत जर रामावर संतुष्ट असून येथें उतरला असेल तर मात्र ही सेना आज सुखरूप गंगा तरून जाईल " ९. असें त्यांना सांगून आणि मत्स्य, मांस व मद्य हा नजराणा बरोबर घेऊन निषाधराज गुह भरताकडे निघाला १०. तेव्हां तो गुह येत आहे असें अवलोकन करून समय ओळखणारा प्रतापी सुमंत्र सारथि भरताला ह्मणाला ११ " दंडकारण्यामध्यें अधिकार चालवीत असलेला हा निषाधराज वृद्ध गुह आपले हजार जातभाई बरोबर घेऊन इकडे येत आहे व हा तुझ्या भ्रात्याचा सखा आहे १२. तस्मात्, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना भरता, त्या निषाधराज गुहाला तुझी भेट घेऊं दे. ते रामलक्ष्मण कोठें आहेत हें ह्याला निःसंशय विदित आहे १३. सुमंत्रापासून हें शुभ भाषण श्रवण केल्यावर "गुहाला सत्वर माझी भेट घेऊं दे" असें भरतानें सांगितलें १४. तेव्हां भेटीची अनुज्ञा मिळाल्यानंतर ज्ञातींनीं परिवेष्टित असलेला तो गुह आनंदित झाला आणि भरतासमीप येऊन नम्र झालेला तो गुह त्याला ह्मणाला १५ " हा प्रदेश तुला अगदीं आपल्या घरच्या बागेप्रमाणें आहे. आज तूं आह्मांला अगदींच फसविलें आहेस. ( कारण, येण्याची खबर देखील आह्मांला दिली नाहींस; खबर दिली असतीस ह्मणजे आह्मी कांहीं तरी तयारी करून ठेविली असती) असो. आतां हें सर्व राज्य आह्मी तुला अर्पण करितों. आतां तूं स्वतःच्याच धीवरगृहामध्यें वास्तव्य कर १६. निषाधांनीं स्वतः

चोच्चावचं तथा १७आशंसे स्वाशिता सेना वत्स्यत्येनां विभावरीम्। अर्चितो विविधैः कामैः श्वः ससैन्यो गमिष्यसि १८ [३१७९]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुरशीतितमः सर्गः ॥ ८४ ॥

एवमुक्तस्तु भरतो निषादाधिपतिं गुहम्। प्रत्युवाच महाप्राज्ञो वाक्यं हेत्वर्थसंहितम् १ ऊर्जितः खलु ते कामः कृतो मम गुरोः सखे। यो मे त्वमीदृशीं सेनामभ्यर्चयितुमिच्छसि २ इत्युक्त्वा स महातेजा गुहं वचनमुत्तमम्। अब्रवीद्भरतः श्रीमान्पन्थानं दर्शयन्पुनः ३ कतरेण गमिष्यामि भरद्वाजाश्रमं पथा। गहनोयं भृशं देशो गङ्गानूपो दुरत्ययः ४ तस्य तद्वचनं श्रुत्वा राजपुत्रस्य धीमतः। अब्रवीत्प्राञ्जलिर्भूत्वा गुहो गहनगोचरः ५ दाशास्त्वनुगमिष्यन्ति देशज्ञाः सुसमाहिताः। अहं चानुगमिष्यामि राजपुत्र महाबल ६ कच्चिन्न दुष्टो व्रजसि रामस्याक्लिष्टकर्मणः। इयं ते महती सेना शङ्कां जनयतीव मे ७तमेवमभिभाषन्तमाकाश इव निर्मलः।

---

संपादन करून आणिलेलीं हीं मुळें, फळें, ओलेंकोरडें मांस आणि इतरही बरेवाईट वन्य पदार्थ तयार आहेत १७. करितां, ही सेना चांगलें भोजन करून आजची रात्र येथेंच वास्तव्य करील आणि नानाप्रकारच्या भोग्य वस्तूंनीं मीं आदरातिथ्य केल्यावर तूं सैन्यासहवर्तमान उदयीक पुढें जाशील अशी माझी इच्छा आहे " १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौऱ्यांशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८४ ॥

ह्याप्रमाणें गुहानें सांगितलें असतां महाबुद्धिमान् भरतानें सहेतुक आणि सकारण असें भाषण निषधराज गुहाशीं केलें कीं १, " हे गुरुमित्रा, माझ्या ह्या अशाप्रकारच्या सैन्याचें आदरातिथ्य करण्याचें तूं इच्छित आहेस हा तुझा मनोरथ फार उत्तम आहे आणि असें ह्मणण्यानेंच माझा सत्कार झाला आहे " २. असें उत्कृष्ट भाषण गुहाशीं केल्यानंतर तो महातेजस्वी व वैभवशाली भरत मार्गाकडे बोट दाखवून पुनरपि त्याला ह्मणाला ३ " कोणत्या मार्गानें मीं भरद्वाज मुनींच्या आश्रमाला जावें? गंगातीरचा हा देश अतिशय गहन असून जाण्याला दुर्घट आहे " ४. हें त्या विचारी राजपुत्र भरताचें भाषण श्रवण केल्यावर गहन वनप्रदेशांत रहाणारा गुह हात जोडून त्याला ह्मणाला ५ " हे महाबलाढ्य राजपुत्रा, कर्तव्याविषयीं अतिशय दक्ष आणि ह्या प्रदेशांतील माहीतगार असे धीवर तुझ्याबरोबर येतील आणि मीही तुझ्याबरोबर येईन ६; परंतु, उत्कृष्ट कर्म करणाऱ्या रामाविषयीं कांहीं दुष्टभाव मनांत धरून तर तूं जात नाहींस नां? ह्या तुझ्या प्रचंड सेनेमुळें मला अशी शंका येत आहे " ७. ह्याप्रमाणें

भरतः श्लक्ष्णया वाचा गुहं वचनमब्रवीत् ८ मा भूत्स कालो यत्कष्टं न मां शङ्कितुमर्हसि । राघवः स हि मे भ्राता ज्येष्ठः पितृसमो मतः ९ तं निवर्तयितुं यामि काकुत्स्थं वनवासिनम् । बुद्धिरन्या न मे कार्या गुह सत्यं ब्रवीमि ते १० स तु संहृष्टवदनः श्रुत्वा भरतभाषितम् । पुनरेवाब्रवीद्वाक्यं भरतं प्रति हर्षितः ११ धन्यस्त्वं न त्वया तुल्यं पश्यामि जगतीतले । अयत्नादागतं राज्यं यस्त्वं त्यक्तुमिहेच्छसि १२ शाश्वती खलु ते कीर्तिर्लोकाननु चरिष्यति । यस्त्वं कृच्छ्रगतं रामं प्रत्यानयितुमिच्छसि १३ एवं संभाषमाणस्य गुहस्य भरतं तदा । बभौ नष्टप्रभः सूर्यो रजनी चाभ्यवर्तत १४ संनिवेश्य स तां सेनां गुहेन परितोषितः । शत्रुघ्नेन समं श्रीमाञ्छयनं पुनरागमत् १५ रामचिन्तामयः शोको भरतस्य महात्मनः । उपस्थितो ह्यनर्हस्य धर्मप्रेक्षस्य तादृशः १६ अन्तर्दाहेन दहनः संतापयति राघवम् । वनदाहाग्निसंतप्तं गूढोऽग्निरिव पादपम् १७ प्रसृतः सर्वगात्रेभ्यः स्वेदं शोकाग्नि-

---

बोलत असलेल्या त्या गुहाला आकाशाप्रमाणें निर्मल असलेला भरत मृदु वाणीनें ह्मणाला ८ " तुला शंका आणिलेलें पाप माझ्या मनांत येईल अशी वेळ न येवो; माझ्यासंबंधानें तूं शंका घेऊं नको. तो राम माझा ज्येष्ठ भ्राता असून मला पित्याप्रमाणें मान्य आहे ९. त्या ककुत्स्थकुलोत्पन्न वनवासी रामाला परत आणण्याकरितां मी जात आहें. माझ्यासंबंधानें तूं दुसरा कांहीं एक विचार मनामध्यें आणूं नको. हे गुहा, मी तुला खरें सांगत आहें " १०. ह्याप्रमाणें भरताचें भाषण श्रवण केल्यावर त्या गुहाचें मुख आनंदित झालें आणि आनंदित झालेला तो गुह पुनरपि भरताला ह्मणाला ११ " तूं धन्य आहेस; तुझ्यासारिखा ह्या भूतलामध्यें मला कोणी दिसत नाहीं. कारण, अनायासानें येथें प्राप्त झालेलें राज्य तूं टाकून देण्याची इच्छा करीत आहेस १२ व संकटांत सांपडलेल्या रामाला परत आणण्याची तूं इच्छा करीत आहेस ह्यामुळें तुझी कीर्ति लोकांमध्यें अक्षय राहील " १३. ह्याप्रमाणें गुह भरताशीं भाषण करीत असतांना सूर्य निस्तेज होऊन रात्र पडूं लागली १४. तेव्हां गुहानें संतुष्ट केलेल्या त्या वैभवशाली भरतानें सैन्याची व्यवस्था लाविली आणि शत्रुघ्नासह्वर्तमान तो पुनरपि शय्येवर येऊन पडला १५. धर्मावर दृष्टि ठेऊन वागणाऱ्या आणि दुःखाचा अनुभव नसलेल्या महात्म्या भरताला रामचिंतामय अनिर्वचनीय शोक प्राप्त झाला १६ आणि दावाग्नीनें शुष्क होऊन गेलेल्या वृक्षाला आंत गुप्त असलेला अग्नि ज्याप्रमाणें दग्ध करीत असतो त्याप्रमाणें तो शोकाग्नि रघुवंशज भरताला अंतस्थदाहानें संतप्त करूं लागला १७. ज्याप्रमाणें सूर्यतापानें संतप्त झालेल्या

संभवम् । यथा सूर्याग्निसंतप्तो हिमवान्प्रसृतो हिमम् १८ ध्यानसंदरशैलेन विनिःश्वसितधातुना । दैन्यपादपसङ्घेन शोकायासाधिशृङ्गिणा १९ प्रमोहानन्तसत्त्वेन संतापौषधिवेणुना । आक्रान्तो दुःखशैलेन मज्जता कैकयीसुतः २० विनिःश्वसन्वै भृशदुर्मनास्ततः प्रमूढसंज्ञः परमापदं गतः । शमं न लेभे हृदयज्वरार्दितो नरर्षभो यूथहतो यथर्षभः २१ गुहेन सार्धं भरतः समागतो महानुभावः सजनः समाहितः । सुदुर्मनास्तं भरतं तदा पुनः शनैः समाश्वासयदग्रजं प्रति २२ [३२०१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे पञ्चाशीतितमः सर्गः ॥ ८५ ॥

आचचक्षेऽथ सद्भावं लक्ष्मणस्य महात्मनः । भरतायाप्रमेयाय गुहो गहनगोचरः १ तं जाग्रतं गुणैर्युक्तं वरचापेषुधारिणम् । भ्रातृगुप्त्यर्थमत्यन्तमहं लक्ष्मणमब्रुवम् २ इयं तात सुखा शय्या त्वदर्थमुपकल्पिता । प्रत्याश्वसिहि शेष्वास्यां सुखं राघवनन्दन ३ उचितोऽयं जनः सर्वो दुःखानां त्वं

---

हिमालय पर्वतापासून बर्फ वाहूं लागतें त्याप्रमाणें भरताच्या शरीरापासून घाम वाहूं लागला १८. रामसंबंधीं चिंता हेच ज्यांतील अभंग खडक, दुःखाचे सुस्कार हेच ज्यांतील धातु, इंद्रियांचें दैन्य हेच ज्यांतील वृक्षसमुदाय, शोकजन्य आयास हींच ज्याचीं शिखरें १९, मोह हेच ज्यावरील असंख्य वनपशु, संताप हाच ज्यावरील वनस्पति आणि वेळू असा जो अधोगतीला नेणारा दुःखरूप पर्वत त्यानें कैकयीचा पुत्र भरत घेरून टाकिला होता २०. मनाच्या हुरहुरीनें व्याकुल, अत्यंत खिन्न व अतिशय मूर्छित अशा त्या दुःखाचे सुस्कार टाकीत असलेल्या पुरुषश्रेष्ठ भरताला कळपांतून चुकलेल्या बैलाप्रमाणें चैन पडेनासें झालें २१. सारांश, परिवारासहवर्तमान असलेल्या त्या एकाग्रचित्त व महापराक्रमी भरताची गुहाशीं गांठ पडल्यावर तो रामासंबंधानें अतिशयच खिन्न झाला व तशा प्रकारच्या त्या भरताचें गुहानें सांत्वन केलें २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं पंच्यांशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८५ ॥

तदनंतर वनप्रदेशांत रहाणारा गुह महात्म्या लक्ष्मणाचा चांगुलपणा सांगण्याच्या उद्देशानें अचिंत्य भरताला ह्मणाला १ "अत्यंत गुणसंपन्न व श्रेष्ठ धनुर्बाण धारण करून भ्रात्याच्या रक्षणार्थ जागत बसलेल्या त्या लक्ष्मणाला मी ह्मणालों २ 'हे राघवनंदना, तुझ्याकरितां ही सुखशय्या तयार केली आहे; तूं निर्धास्त रहा आणि ह्या शय्येवर सुखानें शयन कर ३. ह्या आह्मां सर्व लोकांना दुःखें भोगण्याची संवय आहे व तूं आजपर्यंत सुखाचाच उपभोग घेत आला आहेस. तस्मात्, हे धर्मज्ञा, त्या रामाच्या

सुखोचितः । धर्मात्मस्तस्य गुप्त्यर्थं जागरिष्यामहे वयम् ४ न हि रामात्प्रियतरो ममास्ति भुवि कश्चन । मोत्सुको भूर्ब्रवीम्येतदथ सत्यं तवाग्रतः ५ अस्य प्रसादादाशंसे लोकेस्मिन्सुमहद्यशः । धर्मावाप्तिं च विपुलामर्थकामौ च केवलौ ६ सोहं प्रियसखं रामं शयानं सह सीतया । रक्षिष्यामि धनुष्पाणिः सर्वैः स्वैर्ज्ञातिभिः सह ७ न हि मेविदितं किंचिद्वनेस्मिंश्चरितः सदा । चतुरङ्गं ह्यपि बलं प्रसहेम वयं युधि ८ एवमस्माभिरुक्तेन लक्ष्मणेन महात्मना । अनुनीता वयं सर्वे धर्ममेवानुपश्यता ९ कथं दाशरथौ भूमौ शयाने सह सीतया । शक्या निद्रा मया लब्धुं जीवितानि सुखानि वा १० यो न देवासुरैः सर्वैः शक्यः प्रसहितुं युधि । तं पश्य गुह संविष्टं तृणेषु सह सीतया ११ महता तमसा लब्धो विविधैश्च परिश्रमैः । एको दशरथस्यैष पुत्रः सदृशलक्षणः १२ अस्मिन्प्रव्राजिते राजा न चिरं वर्तयिष्यति । विधवा मेदिनी नूनं क्षिप्रमेव भविष्यति १३ विनद्य सुमहानादं श्रमेणोपरताः स्त्रियः । निर्घोषो विरतो नूनमद्य राजनिवेशने १४

---

रक्षणार्थ आह्मी जागत बसूं ४. रामाहून अधिक प्रिय असा ह्या पृथ्वीवर मला कोणीही नाहीं. तेव्हां तूं त्याच्या रक्षणासंबंधानें काळजी करूं नको. मी हें तुझ्यासमोर खरें बोलत आहें ५. ह्या रामाच्या कृपेमुळेंच ह्या जगतामध्यें अतिशय मोठी कीर्ति आणि धर्म, अर्थ व काम ह्यांची समृद्धि हीं प्राप्त होत असतात असें मी समजतों ६. तेव्हां सीतेसहवर्तमान शयन करणाऱ्या प्रिय मित्र रामाचें मी आपल्या सर्व ज्ञातीसहवर्तमान हातांत धनुष्य घेऊन रक्षण करीन ७. नेहमीं या वनांत संचार करणाऱ्या माझ्या गैरमाहितींतलें असें कांहींएक नाहीं. शत्रूचें चतुरंग सैन्यही मी युद्धामध्यें जिंकून टाकीन ' ८. ह्याप्रमाणें आह्मीं सांगितलें असतां धर्मावर दृष्टि ठेऊन वागणाऱ्या महात्म्या लक्ष्मणानें आमचें सर्वांचें सांत्वन केलें ९. ( तो ह्मणाला) " दाशरथि राम सीतेसहवर्तमान भूमीवर शयन करीत असतांना मला निद्रा, निर्घोर जीवित अथवा सुख प्राप्त होणें कसें बरें शक्य आहे? १०. हे गुहा, सर्व देवदैत्यांनाही ज्याचा पराक्रम युद्धामध्यें सहन होणें अशक्य आहे तो राम सीतेसहवर्तमान तृणावर निजला आहे हें पहा ११. मोठें तप आणि कष्टानें केलेलीं नानाप्रकारचीं अनुष्ठानें ह्यामुळें लक्षणानें स्वतःसारिखाच असलेला हा अद्वितीय पुत्र दशरथाला प्राप्त झाला आहे १२. हा वनांत गेल्यावर राजा फार दिवस वांचणार नाहीं; खरोखर पृथ्वी सत्वरच विध्वा होऊन जाईल १३; बा, गुहा, राजवाड्यांतील आणि अयोध्यानगरींतील स्त्रिया अतिशयच मोठा आक्रोश करून श्रम झाल्यामुळें स्वस्थ पडल्या असतील आणि राजवाड्यांतही आज विलाप शब्द बंद होऊन खरोखर

कौसल्या चैव राजा च तथैव जननी मम । नाशंसे यदि ते सर्वे जीवेयुः शर्वरीमिमाम् १५ जीवेदपि च मे माता शत्रुघ्नस्यान्ववेक्षया । दुःखिता या हि कौसल्या वीरसूर्विनशिष्यति १६ अतिक्रान्तमतिक्रान्तमनवाप्य मनोरथम् । राज्ये राममनिक्षिप्य पिता मे विनशिष्यति १७ सिद्धार्था पितरं वृत्तं तस्मिन्काले ह्युपस्थिते । प्रेतकार्येषु सर्वेषु संस्करिष्यन्ति भूमिपम् १८ रम्यचत्वरसंस्थानां सुविभक्तमहापथाम् । हर्म्यप्रासादसंपन्नां सर्वरत्नविभूषिताम् १९ गजाश्वरथसंबाधां तूर्यनादविनादिताम् । सर्वकल्याणसंपूर्णां हृष्टपुष्टजनाकुलाम् २० आरामोद्यानसंपूर्णां समाजोत्सवशालिनीम् । सुखिता विचरिष्यन्ति राजधानीं पितुर्मम २१ अपि सत्यप्रतिज्ञेन सार्धं कुशलिना वयम् । निवृत्ते समये ह्यस्मिन्सुखिताः प्रविशेमहि २२ परिदेवयमानस्य तस्यैवं हि महात्मनः । तिष्ठतो राजपुत्रस्य शर्वरी सात्यवर्तत २३ प्रभाते विमले सूर्ये कारयित्वा जटा उभौ । अस्मिन्भागीरथीतीरे सुखं संतारितौ मया २४ जटाधरौ तौ द्रुमचीरवाससौ

---

सामसूम झालें असेल १४. कौसल्या, राजा आणि त्याचप्रमाणें माझी माता हे सर्व आजची रात्र सुद्धां जिवंत रहातील असें मला वाटत नाहीं १५ शत्रुघ्नाकडे पाहून कदाचित् माझी माता जिवंत राहील; परंतु, दुःखित झालेली वीरमाता कौसल्या तर मृत्यु पावणारच १६. रामराज्याभिषेकरूप मनोरथ प्राप्त न झाल्यामुळें "घात झाला घात झाला" असें ह्मणत ह्मणत माझा पिता परत आलेल्या रामाला राज्यावर न बसवितांच नाश पावेल १७. तो समय प्राप्त झाला असतां मृत झालेल्या भूपति पित्याचे ज्यांच्या हातून सर्व प्रकारचे और्ध्वदेहिक संस्कार होतील ते खरोखर धन्य होत १८. रमणीय चव्हाटे, धर्मशाला, वेगवेगळे राजमार्ग, वाडे आणि देवालयें ह्यांनीं संपन्न, सर्व प्रकारच्या रत्नांनीं भूषित १९, गज, अश्व आणि रथ ह्यांनीं व्याप्त, तूर्यवाद्यांच्या ध्वनीनें नादित, सर्वप्रकारच्या कल्याणांनीं संपूर्ण, आनंदित व पुष्ट जनांनीं व्याप्त २०, उपवनें व बागा ह्यांनीं पूर्ण व समाजविषयक उत्सवांनीं शोभणारी जी माझ्या पित्याची राजधानी तिच्यामध्यें भरतप्रभृति सुखी होऊन संचार करितील २१. हा वनवासाचा काल निघून गेल्यावर सत्यप्रतिज्ञ व क्षेमसंपन्न रामासहवर्तमान आ[illegible] सुखी होऊन अयोध्येमध्यें प्रविष्ट होण्याचा संभव आहे काय? २२. ह्याप्रमाणें तो राजपुत्र महात्मा लक्ष्मण शोक करीत बसला असतांना ती रात्र निघून गेली २३. तदनंतर प्रभातकाल होऊन स्पष्ट सूर्योदय झाल्यावर ह्या भागीरथीच्या तीरीं उभयतांनाही जटिल करून मीं अनायासें पलीकडे तारून नेलें २४ आणि जटा धारण करणार, वृक्षांच्या

महाबलौ कुञ्जरयूथपोपमौ। वरेषुधीचापधरौ परंतपौव्यपेक्षमाणौ सह सीतया गतौ २५ [३२२६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षडशीतितमः सर्गः ॥ ८६ ॥

गुहस्य वचनं श्रुत्वा भरतो भृशमप्रियम्। ध्यानं जगाम तत्रैव यत्र तच्छ्रुतमप्रियम् १ सुकुमारो महासत्त्वः सिंहस्कन्धो महाभुजः। पुण्डरीकविशालाक्षस्तरुणः प्रियदर्शनः २ प्रत्याश्वस्य मुहूर्तं तु कालं परमदुर्मनाः ससाद सहसा तोत्रैर्हृदि विद्ध इव द्विपः ३ भरतं मूर्च्छितं दृष्ट्वा विवर्णवदनो गुहः। बभूव व्यथितस्तत्र भूमिकम्पे यथा द्रुमः ४ तदवस्थं तु भरतं शत्रुघ्नोऽनन्तरस्थितः। परिष्वज्य रुरोदोच्चैर्विसंज्ञः शोककर्शितः ५ ततः सर्वाः समापेतुर्मातरो भरतस्य ताः। उपवासकृशा दीना भर्तृव्यसनकर्शिताः ६ ताश्च तं पतितं भूमौ रुदत्यः पर्यवारयन्। कौसल्या त्वनुसृत्यैनं दुर्मनाः परिषस्वजे ७ वत्सला स्वं

---

साली नसणारे, हत्तीचें कळप रक्षण करणाऱ्या महागजाप्रमाणें असलेले आणि उत्कृष्ट भाते व धनुष्य धारण करणारे ते महाबलाढ्य शत्रुतापन राम परत येण्याच्या आशेनें सीतेसहवर्तमान निघून गेले २५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शहाशींवा सर्ग समाप्त झाला ॥ ८६ ॥

अत्यंत अप्रिय असलेलें तें गुहाचें भाषण श्रवण केल्यावर ज्या ठिकाणीं तें अप्रिय भाषण श्रुत झालें तेथेंच भरत चिंताक्रांत होऊन बसला १. सुकुमार, महाधैर्यवान्, महापराक्रमी, स्तंभासारिखे स्कंध आणि कमलपत्राप्रमाणें विशाल नयन ह्यांनीं युक्त, तरुण व आल्हादकारक मुद्रेनें युक्त २ असा तो मुहूर्तपर्यंत अत्यंत खिन्न झालेला भरत पुनरपि सावध झाला आणि अंकुशांनीं हृदयाचे ठिकाणीं विद्ध झालेल्या गजाप्रमाणें त्याचें एकाएकीं देहभान नाहींसें झालें ३. तेव्हां भूकंप होऊं लागला असतां वृक्ष ज्याप्रमाणें कंपित होतात त्याप्रमाणें भरत मूर्छित झालेला अवलोकन करितांक्षणीं गुहाचें मुख निस्तेज होऊन तो व्यथित झाला ४. तेव्हां शेजारीच बसलेल्या शत्रुघ्नानें भरताची तशी अवस्था झालेली पाहून त्याला कवटाळून धरिलें आणि शोकाकुल होऊन उच्च स्वरानें रोदन केल्यावर तोही मूर्छित झाला ५. हें पाहून उपवासानें कृश, दीन आणि पतिमरणदुःखानें जर्जर झालेल्या त्या सर्व भरताच्या माता समीप धांवल्या ६. या भूमीवर पडलेल्या भरताच्या भोंवतीं त्या गरका घालून बसल्या आणि खिन्न झालेल्या कौसल्येनें त्याच्या समीप जाऊन त्याला कवटाळून धरिलें ७. नंतर आपल्या पुत्राप्रमाणें त्याला पोटाशीं धरिल्यावर ती बिचारी दयाळु रडत रडत शोकाकुल झालेल्या

यथा वत्समुपगुह्य तपस्विनी । परिपप्रच्छ भरतं रुदती शोकलालसा ८ पुत्र व्याधिर्न ते कच्चिच्छरीरं प्रति बाधते । अस्य राजकुलस्याद्य त्वदधीनं हि जीवितम् ९ त्वां दृष्ट्वा पुत्र जीवामि रामे सभ्रातृके गते । वृत्ते दशरथे राज्ञि नाथ एकस्त्वमद्य नः १० कच्चिन्न लक्ष्मणे पुत्र श्रुतं ते किंचिदप्रियम् । पुत्रे वा ह्येकपुत्रायाः सहभार्ये वनं गते ११ स मुहूर्तं समाश्वस्य रुदन्नेव महायशाः । कौसल्यां परिसान्त्व्येदं गुहं वचनमब्रवीत् १२ भ्राता मे क्वावसद्रात्रिं क्व सीता क्व च लक्ष्मणः । अस्वपच्छयने कस्मिन्किं भुक्त्वा गुह शंस मे १३ सोऽब्रवीद्भरतं हृष्टो निषादाधिपतिर्गुहः । यद्विधं प्रतिपेदे च रामे प्रियहितेऽतिथौ १४ अन्नमुच्चावचं भक्ष्याः फलानि विविधानि च । रामायाभ्यवहारार्थं बहुशोपहृतं मया १५ तत्सर्वं प्रत्यनुज्ञासीद्रामः सत्यपराक्रमः । न हि तत्प्रत्यगृह्णात्स क्षत्रधर्ममनुस्मरन् १६ नह्यस्माभिः प्रतिग्राह्यं सखे देयं तु सर्वदा । इति तेन वयं सर्वे अनुनीता महात्मना १७

---

भरताला विचारूं लागली कीं ८, "हे पुत्रा, तुझ्या शरीराला कांहीं व्याधी तर पीडा देत नाहीं नां ? अरे, आज ह्या राजकुलाचें जीवित तुझ्या आधीन आहे ९ हे पुत्रा, भ्रात्यासहवर्तमान राम वनांत गेला असतां तुझ्याकडे पाहून मी प्राण धारण करीत आहे व दशरथराजा मरण पावल्यावर आतां तूंच एक आमचें रक्षण करणारा आहेस १०. हे पुत्रा, लक्ष्मणासंबंधानें तर तूं कांहीं अप्रिय वार्ता ऐकिली नाहींस ना ? अथवा एक पुत्रानेंच युक्त असलेल्या माझा जो पुत्र भार्येसहवर्तमान वनांत गेला आहे त्याच्याविषयीं तर कांहीं अनिष्ट वृत्तांत तुझ्या कानावर आला नाहीं नां ?" ११. ( ह्याप्रमाणें कौसल्या विचारूं लागली असतां ) मुहूर्तभर मूर्छित पडलेला तो महायशस्वी भरत सावध झाला आणि रडत रडत कौसल्येचें सांत्वन करून गुहाला ह्मणाला १२ "हे गुहा, माझा भ्राता राम रात्रीं कोठें राहिला होता ? सीता कोठें राहिली होती? लक्ष्मण कोठें होता ? कोणत्या शय्येवर रामानें शयन केलें आणि काय भक्षण करून त्यानें ती रात्र काढिली हें मला सांग" १३. ह्यावर प्रिय व आपलें हित करणारा असा अतिथि राम प्राप्त झाला असतां गुहानें त्याच्याशीं जो व्यवहार केला होता तो व्यवहार त्या निषाधराज गुहानें आनंदित होऊन भरताला सांगितला १४. ( तो ह्मणाला ) "सरसनिरस अन्न, भक्ष्य पदार्थ आणि नानाप्रकारचीं फळें असे रामाच्या भोजनाकरितां मीं पुष्कळ आणिलें होतें १५; परंतु, सत्यपराक्रमी रामानें त्याला मान देऊन तें सर्व मला परत दिलें; सत्यधर्माला स्मरून त्यानें तें घेतलें नाहीं १६ हे मित्रा गुहा, आह्माला आपला प्रतिग्रह करितां येत नाहीं. आह्मीं नहमीं लोकांना द्यावें—अशी त्या

लक्ष्मणेन यदानीतं पीतं वारि महात्मना । औपवास्यं तदाकार्षीद्राघवः सह सीतया १८ ततस्तु जलशेषेण लक्ष्मणोऽप्यकरोत्तदा । वाग्यतास्ते त्रयः संध्यां समुपासन्त संहिताः १९ सौमित्रिस्तु ततः पश्चादकरोत्स्वास्तरं शुभम् । स्वयमानीय बर्हींषि क्षिप्रं राघवकारणात् २० तस्मिन्समाविशद्रामः स्वास्तरे सह सीतया । प्रक्षाल्य च तयोः पादौ अपचक्राम सलक्ष्मणः २१ एतत्तदिङ्गुदीमूलमिदमेव च तत्तृणम् । अस्मिन्रामश्च सीता च रात्रिं तां शयितावुभौ २२ नियम्य पृष्ठे तु तलाङ्गुलित्रवान्शरैः सुपूर्णाविषुधी परंतपः । महद्धनुः सज्जमुपोह्य लक्ष्मणो निशामतिष्ठत्परितोऽस्य केवलम् २३ ततस्त्वहं चोत्तमबाणचापभृत्स्थितोऽभवं तत्र स यत्र लक्ष्मणः । अतन्द्रितैर्ज्ञातिभिरात्तकार्मुकैर्महेन्द्रकल्पं परिपालयं तदा २४ [ ३२१० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्ताशीतितमः सर्गः ॥ ८७ ॥

तच्छ्रुत्वा निपुणं सर्वं भरतः सह मन्त्रिभिः । इङ्गुदीमूलमागम्य रामशय्यामवैक्षत १ अब्रवीज्जननीः सर्वा इह तस्य महात्मनः । शर्वरी शयिता

---

महात्म्यानें आमची सर्वांची समजूत केली १७. लक्ष्मणानें जें उदक आणिलें होतें तें महात्म्या रामानें पिऊन टाकिलें आणि सीतेसहवर्तमान रघुवंशज रामाला त्या रात्रीं असाच उपवास पडला १८. नंतर अवशिष्ट राहिलेलें उदक लक्ष्मणानेंही ग्रहण केलें आणि तदनंतर मौन धारण करून स्वस्थ चित्तानें बसलेल्या त्या त्रिवर्गांनीं संध्यावंदन केलें १९. संध्यावंदन आटोपल्यानंतर सुमित्रापुत्र लक्ष्मणानें स्वतः सत्वर जाऊन दर्भ आणिले आणि रामाकरितां त्यानें उत्कृष्ट शय्या तयार केली २०. त्या उत्कृष्ट शय्येवर सीतेसहवर्तमान रामानें शयन केलें असतां त्याचें पादप्रक्षालन केल्यावर तो लक्ष्मण तेथून पलीकडे आला २१. हेंच तें इंगुदी वृक्षाचें मूल आणि हेंच तें तृण. ह्या ठिकाणीं राम व सीता ह्या उभयतांनीं त्या रात्रीं शयन केलें २२. हातामध्यें अंगुलित्राण धारण करून बाणांनीं भरलेले अक्षय्य भाते आणि सज्ज केलेलें प्रचंड धनुष्य हातांत घेऊन तो शत्रुतापन लक्ष्मण रामाच्या भोंवतालीं सर्व रात्रभर हिंडत राहिला २३. तेव्हां जेथें लक्ष्मण होता तेथें मीही उत्कृष्ट बाण व धनुष्य घेऊन उभा राहिलों आणि धनुष्य घेऊन दक्ष असलेल्या ज्ञातीसहवर्तमान त्या इंद्रतुल्य रामाचें रक्षण केलें" २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्यांशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८७ ॥

गुहानें सांगितलेलें तें सर्व पूर्णपणें श्रवण केल्यानंतर मंत्र्यांसहवर्तमान भरत इंगुदीवृक्षाच्या मुळाशीं येऊन रामाच्या शय्येकडे पाहूं लागला १ आणि सर्व मातांना ह्मणाला

भूमाविदमस्य विमर्दितम् २ महाराजकुलीनेन महाभागेन धीमता। जातो दशरथेनोर्व्यां न रामः स्वप्तुमर्हति ३ अजिनोत्तरसंस्तीर्णे वरास्तरणसंचये। शयित्वा पुरुषव्याघ्रः कथं शेते महीतले ४ प्रासादाग्रविमानेषु वलभीषु च सर्वदा। हैमराजतभौमेषु वरास्तरणशालिषु ५ पुष्पसंचयचित्रेषु चन्दनागुरुगन्धिषु। पाण्डुराभ्रप्रकाशेषु शुकसङ्घरुतेषु च ६ प्रासादवरवर्येषु शीतवत्सु सुगन्धिषु। उषित्वा मेरुकल्पेषु कृतकाञ्चनभित्तिषु ७ गीतवादित्रनिर्घोषैर्वराभरणनिःस्वनैः। मृदङ्गवरशब्दैश्च सततं प्रतिबोधितः ८ बन्दिभिर्वन्दितः काले बहुभिः सूतमागधैः। गाथाभिरनुरूपाभिः स्तुतिभिश्च परंतपः ९ अश्रद्धेयमिदं लोके न सत्यं प्रतिभाति मा। मुह्यते खलु मे भावः स्वप्नोऽयमिति मे मतिः १० न नूनं दैवतं किंचित्कालेन

"ह्या ठिकाणीं त्या महात्म्यानें रात्रीं भूमीवर शयन केलें. हें त्याचें शरीर घांसटल्याचें स्थान होय २. सार्वभौमकुलामध्यें महाभाग्यवान् विवेकी दशरथापासून उत्पन्न झालेल्या रामानें भूमीवर शयन करणें योग्य नाहीं ३. मोठमोठीं अजिनें ज्याच्यावर अंथरलीं आहेत आणि उत्कृष्ट अस्तरणांचा समूह ज्याचे ठिकाणीं आहे अशा मंचकावर आजपर्यंत शयन करून पुरुषश्रेष्ठ राम आतां भूतलावर कसें शयन करीत आहे? ४. विमानाप्रमाणें असलेल्या प्रासादांवरील गृहामध्यें आणि शेवटल्या गच्चांवरून आजपर्यंत शयन करीत असतांना हा राम आतां भूतलावर कसें शयन करीत आहे? सोन्यारुप्याच्या भुयां ज्यामध्यें आहेत, उत्कृष्ट उत्कृष्ट आस्तरणें पसरलेलीं असल्यामुळें ५ जे सुशोभित झाले आहेत, पुष्पांच्या राशीमुळें जे चित्रविचित्र दिसत आहेत, चंदन आणि अगुरु ह्यांचा जेथें सुवास चालला आहे, जे दिसण्यांत श्वेतवर्ण अभ्राप्रमाणें दिसत आहेत, राघूंच्या झुंडी ज्यामध्यें शब्द करीत आहेत ६ व ज्यांतील भिंती सुवर्णाच्या केलेल्या आहेत असे जे मेरुपर्वताप्रमाणेंं शीतल, सुगंध व उत्तमोत्तम राजवाडे त्यांमध्यें आजपर्यंत शयन केलेला हा राम आतां भूमीवर कसें शयन करीत आहे? ७. गीत आणि वाद्य ह्यांचे ध्वनि, उत्कृष्ट भूषणांचे अवाज आणि सर्वोत्कृष्ट मृदंगांचे शब्द ह्यांच्या योगानें जो नेहमीं जागा केला जातो ८, प्रभातकालीं भाट ज्याला वंदन करितात आणि योग्य अशा गद्यपद्यात्मक स्तुतींनीं असंख्य सूत व मागध ज्याची प्रशंसा करीत असतात तो शत्रुतापन राम आज भूमीवर कसें शयन करीत आहे? ९. ह्या लोकामध्यें ऐकिलेलें हें विश्वासास पात्र नाहीं व हें मला खरें दिसत नाहीं. तस्मात्, (रामानें भूमीवर शयन केलें वगैरे जें हें तूं सांगत आहेस त्याविषयीं) मला मोह उत्पन्न होत आहे, अथवा हा वृत्तांत ह्यांच्या तोंडून मीं

बलवत्तरम् । यत्र दाशरथी रामो भूमावेवमशेत सः ११ यस्मिन्विदेहराजस्य सुता च प्रियदर्शना । दयिता शयिता भूमौ स्नुषा दशरथस्य च १२ इयं शय्या मम भ्रातुरिदमावर्तितं शुभम् । स्थण्डिले कठिने सर्वं गात्रैर्विमृदितं तृणम् १३ मन्ये साभरणा सुप्ता सीतास्मिञ्शयने शुभा । तत्र तत्र हि दृश्यन्ते सक्ताः कनकबिन्दवः १४ उत्तरीयमिहासक्तं सुव्यक्तं सीतया तदा । तथा ह्येते प्रकाशन्ते सक्ताः कौशेयतन्तवः १५ मन्ये भर्तुः सुखा शय्या येन बाला तपस्विनी । सुकुमारी सती दुःखं न विजानाति मैथिली १६ हा हतोस्मि नृशंसोस्मि यत्सभार्यः कृते मम । ईदृशीं राघवः शय्यामधिशेते ह्यनाथवत् १७ सार्वभौमकुले जातः सर्वलोकसुखावहः । सर्वप्रियकरस्त्यक्त्वा राज्यं प्रियमनुत्तमम् १८ कथमिन्दीवरश्यामो रक्ताक्षः प्रियदर्शनः । सुखभागी न दुःखार्हः शयितो भुवि राघवः १९ धन्यः खलु

---

स्वप्नामध्यें एकिला असावा असें मला वाटत आहे. कारण, स्वप्नामध्यें असंभाव्य गोष्टीही दृष्टीं पडतात.१०. खरोखर कालापेक्षां कोणत्याही दैवाचें सामर्थ्य अधिक नाहीं असें मला वाटतें. कारण, काल प्राप्त झाला असतां त्या दाशरथि रामालाही ह्याप्रमाणें भूमीवर शयन करण्याचा प्रसंग आला ११. ज्या कालामध्यें जिचें दर्शनही आल्हादकारक आहे अशी विदेहराजकन्या दशरथाची प्रिय स्नुषा सीता भूमीवर पडून राहिली त्या कालापेक्षां कोणाचेंही सामर्थ्य जास्त नाहीं १२. ही माझ्या भ्रात्याची शय्या. ह्या शुभस्थानावर तो लोळला आणि आपल्या अवयवांच्या योगानें ह्या कठिण प्रदेशावर त्यानें सर्व तृण चुरगळून टाकिलें १३. ठिकठिकाणीं सुवर्णकण बिलगलेले दृष्टीं पडत आहेत ह्यावरून त्या कल्याणी सीतेनें भूषणांसहवर्तमान ह्या शय्येवर शयन केलें असावें असें वाटतें १४. ह्या ठिकाणीं सीतेचा शेला अडकला होता असें स्पष्ट होत आहे. कारण, चिकटून राहिलेले हे रेशमाचे तंतू येथें झळकत आहेत १५. ज्याअर्थीं अशा प्रकारच्या शय्येवर शयन केलें असतांही बाला, निरपराधी, सुकुमार व साध्वी मैथुलकन्येला दुःख झालें नाहीं त्याअर्थीं भर्त्याची शय्या जशी असेल तशी स्त्रियांना सुखकरच होते असें मला वाटतें १६. अरे, मी नीच आहें; मी दुष्ट आहें. कारण, माझ्याकरितां राम भार्येसहवर्तमान अनाथाप्रमाणें असल्या शय्येवर शयन करीत आहे १७. सार्वभौम कुलामध्यें उत्पन्न झालेला, सर्व लोकांना सुखावह असलेला, सर्व लोकांचें प्रिय करणारा, नीलवर्णाप्रमाणें श्यामवर्ण असलेला, आल्हादकारक मुद्रा आणि आरक्तवर्ण नेत्र ह्यांनीं युक्त असलेला व सुखाचा उपभोक्ता असून दुःख भोगण्यास अयोग्य असलेला हा राम उत्कृष्ट अशा

महाभागो लक्ष्मणः शुभलक्षणः । भ्रातरं विषमे काले यो राममनुवर्तते २० सिद्धार्था खलु वैदेही पतिं यानुगता वनम् । वयं संशयिताः सर्वे हीनास्तेन महात्मना २१ अकर्णधारा पृथिवी शून्येव प्रतिभाति मे । गते दशरथे स्वर्गं रामे चारण्यमाश्रिते २२ न च प्रार्थयते कश्चिन्मनसापि वसुंधराम् । वने निवसतस्तस्य बाहुवीर्याभिरक्षिताम् २३ शून्यसंवरणारक्षामयन्त्रितहयद्विपाम् । अनावृतपुरद्वारां राजधानीमरक्षिताम् २४ अप्रहृष्टबलां शून्यां विषमस्थामनावृताम् । शत्रवो नाभिमन्यन्ते भक्ष्यान्विषकृतानिव २५ अद्यप्रभृति भूमौ तु शयिष्येऽहं तृणेषु वा । फलमूलाशनो नित्यं जटाचीराणि धारयन् २६ तस्याहमुत्तरं कालं निवत्स्यामि सुखं वने । तत्प्रतिश्रुतमार्यस्य नैव मिथ्या भविष्यति २७ वसन्तं भ्रातुरर्थाय शत्रुघ्नो मानुवत्स्यति । लक्ष्मणेन सहायोध्यामार्यो मे पालयिष्यति २८ अभिषे-

---

प्रिय राज्याचा त्याग करून भूमीवर कसा निजला ? १८, १९. संकटकालीं भ्रात्या रामाबरोबर असणारा महाभाग्यवान् शुभलक्षणसंपन्न असा लक्ष्मण खरोखर धन्य आहे २०. पतीबरोबर जी वनांत गेली ती विदेहराजकन्या सीताही खरोखर कृतकृत्य झाली आहे आणि त्या महात्म्याचा वियोग झालेले आह्मी मात्र ( रामाची सेवा घडेल किंवा नाहीं ह्याविषयीं ) संशयित आहोंत २१. रामानें अरण्याचें अवलंबन केल्यावर दशरथराजाही स्वर्गाला गेला असतां नायकरहित झालेली ही पृथ्वी नाविकरहित झालेल्या त्या नौकेप्रमाणें मला शून्य दिसत आहे २२. तो राम वनामध्यें वास्तव्य करीत असतांना त्याच्या बाहुवीर्यानेंच परिपालित असलेल्या ह्या पृथ्वीची, माझ्यासारिखा मनामध्यें तरी काय इच्छा करणार आहे ? २३. जिच्या सभोंवतीं असलेल्या कोटाचें रक्षण होत नाहीं; जिच्यांतील अश्व व गज ह्यांचें कोणी नियमन करीत नाहीं; जिचीं द्वारें कोणी लावीत नाहींत; जिच्यांतील सैन्य हर्षयुक्त नसल्यामुळें जी शून्य झालली आहे व कोणी रक्षण करणारा नसल्यामुळें जी मोकळी पडलेली आहे आणि जी विपन्न स्थितीमध्यें आहे अशी ती अरक्षित राजधानी विषमिश्र भक्ष्याप्रमाणें स्वीकारण्याचें शत्रूही मनांत आणीत नाहींत. ( हा सर्व त्या रामाच्या बाहुबलाचाच प्रताप होय ) २४;२५. आजपासून मी जटा व वल्कलें धारण करून नेहमीं फलमूलांवर उपजीविका करीत जाईन आणि भूमीवर अथवा तृणावर शयन करीत जाईन २६. त्या रामाचें व्रत स्वतः मीच घेईन आणि तें परिपालन करण्याकरितां पुढचीं चवदा वर्षें वनामध्यें वास्तव्य करीन ह्मणजे आर्य रामाची ती प्रतिज्ञा मिथ्या होणार नाहीं २७. भ्रात्याकरितां मी वनामध्यें वास्तव्य करूं लागलों असतां शत्रुघ्नही माझ्याबरोबर वनामध्यें वास्तव्य

क्ष्यन्ति काकुत्स्थमयोध्यायां द्विजातयः । अपि मे देवताः कुर्युरिमं सत्यं मनोरथम् २९ प्रसाद्यमानः शिरसा मया स्वयं बहुप्रकारं यदि न प्रपत्स्यते । ततोऽनुवत्स्यामि चिराय राघवं वनेचरं नार्हति मामुपेक्षितुम् ३० [१२८०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टाशीतितमः सर्गः ॥ ८८ ॥

व्युष्य रात्रिं तु तत्रैव गङ्गाकूले स राघवः । काल्यमुत्थाय शत्रुघ्नमिदं वचनमब्रवीत् १ शत्रुघ्नोत्थाय किं शेषे निषादाधिपतिं गुहम् । शीघ्रमानय भद्रं ते तारयिष्यति वाहिनीम् २ जागर्मि नाहं स्वपिमि तथैवार्यं विचिन्तयन् । इत्येवमब्रवीद्भ्राता शत्रुघ्नो विप्रचोदितः ३ इति संवदतोरेवमन्योन्यं नरसिंहयोः । आगम्य प्राञ्जलिः काले गुहो वचनमब्रवीत् ४ कच्चित्सुखं नदीतीरेऽवात्सीः काकुत्स्थ शर्वरीम् । कच्चिच्च सहसैन्यस्य तव नित्यमनामयम् ५ गुहस्य तत्तु वचनं श्रुत्वा स्नेहादुदीरितम् । रामस्यानुवशो वाक्यं भरतोऽपीदमब्रवीत् ६ सुखा नः शर्वरी धीमन्पूजिताश्चापि ते वयम् । गङ्गां तु

---

करील; माझा श्रेष्ठ भ्राता राम लक्ष्मणासहवर्तमान अयोध्येचें परिपालन करील २८ आणि ककुत्स्थकुलोत्पन्न रामाला अयोध्येमध्यें ब्राह्मण अभिषेक करतील; परंतु, हा माझा मनोरथ देवता शेंवटास नेतील काय ? २९. मी चरणावर मस्तक ठेऊन अनेक प्रकारांनीं त्याचें मन वनांतून परत येण्याविषयीं वळवीत असतांनाही जर तो कृपा न करील तर मीही वनामध्यें संचार करणाऱ्या त्या राघवाबरोबर तेथेंच चिरकाल वास्तव्य करीन; तो भक्तवत्सल असल्यामुळें माझा त्याग करणार नाहीं ३०. याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्यायशीवा सर्ग समाप्त झाला ॥ ८८ ॥

त्याच ठिकाणीं गंगातीरीं रात्रीं राहिल्यावर रघुवंशज भरत पहाटेस उठला आणि शत्रुघ्नाला ह्मणाला १ " हे शत्रुघ्ना, ऊठ; निजतो आहेस काय ? तुझें देव बरें करो; निषाधराज गुहाला सत्वर घेऊन ये ह्मणजे तो आपली सेना गंगेतून पलीकडे नेईल २. रामाचें तसेंच चिंतन करीत करीत मी रात्रभर जागाच आहें; मला झोंप येत नाहीं " याप्रमाणें भरतानें शत्रुघ्नाला सांगितलें असतां शत्रुघ्नानेंही तसेंच त्याला सांगितलें ३. तेव्हां याप्रमाणें ते पुरुषश्रेष्ठ भरतशत्रुघ्न एकमेकाला सांगत आहेत तोंच प्रातःकालीं गुह त्यांचे समीप आला आणि " हे ककुत्स्थकुलोत्पन्न भरता, नदीतीरीं तुमचें रात्रीं वास्तव्य सुखानें झालें नां ? आणि सैन्यासहवर्तमान तुझी प्रकृति नेहमीं बरी असते नां ? " असें त्यांना विचारूं लागला ४,५. हें प्रेमानें केलेलें गुहाचें भाषण श्रवण करून रामाचें

नौभिर्बह्वीभिर्दाशाः संतारयन्तु नः ७ ततो गुहः संत्वरितः श्रुत्वा भरतशासनम् । प्रतिप्रविश्य नगरं तं ज्ञातिजनमब्रवीत् ८ उत्तिष्ठत प्रबुध्यध्वं भद्रमस्तु हि वः सदा । नावः समुपकर्षध्वं तारयिष्यामि वाहिनीम् ९ ते तथोक्ताः समुत्थाय त्वरिता राजशासनात् । पञ्च नावां शतान्येव समानिन्युः समन्तत १० अन्याः स्वस्तिकविज्ञेया महाघण्टाधराधराः । शोभमानाः पताकिन्यो युक्तवाहाः सुसंहताः ११ ततः स्वस्तिकविज्ञेयां पाण्डुकम्बलसंवृताम् । सनन्दिघोषां कल्याणीं गुहो नावमुपाहरत् १२ तामारुरोह भरतः शत्रुघ्नश्च महाबलः । कौसल्या च सुमित्रा च याश्चान्या राजयोषितः १३ पुरोहितश्च तत्पूर्वं गुरवो ब्राह्मणाश्च ये । अनन्तरं राजदारास्तथैव शकटापणाः १४ आवासमादीपयतां तीर्थं चाप्यवगाहताम् । भाण्डानि चाददानानां घोषस्तु दिवमस्पृशत् १५ पताकिन्यस्तु ता नावः स्वयं दाशैरधिष्ठिताः । वहन्त्यो जनमारूढं तदा संपेतुराशुगाः १६ नारी-

---

अधीन असलेला भरतही त्याला ह्मणाला ६ “ हे विचारी गुहा, ही रात्र आह्मांला सुखावह झाली आणि तूही आमचा सत्कार केलास. आतां धीवरांनीं पुष्कळ नौकांच्या योगानें आह्मांला गंगेतून पलीकडे तारून न्यावें ” ७. ही भरताची आज्ञा ऐकिल्यानंतर गुह तेथून परत फिरून सत्वर आपल्या नगरामध्यें गेला आणि आपल्या त्या ज्ञातींना ह्मणाला ८ “ तुमचें नेहमीं कल्याण असो. उठा; जागे व्हा आणि नावा घेऊन या. मी भरताची सेना पलीकडे पोंचवून देतों ” ९. ह्याप्रमाणें गुहानें त्यांना सांगितल्याबरोबर राजाज्ञेप्रमाणें ते सत्वर उठले आणि चोहोंकडून पांचशें नौका घेऊन आले १०. ह्याशिवाय मोठमोठ्या घंटा लाविलेल्या पताका, शिडें आणि नावाडी ज्यावर आहेत व चित्रादिकांच्या योगानें सुशोभित असून ज्यांचे सांधे बळकट आहेत अशा स्वस्तिकसंज्ञक नावाही ते घेऊन आले ११. तेव्हां पांढऱ्या बनातीनें आच्छादिलेली आणि मंगलावह वाद्यांच्या घोषानें युक्त असलेली अशी एक स्वस्तिकसंज्ञक शुभ नौका गुह जवळ घेऊन आला असतां १२, भरत, महाबलाढ्य शत्रुघ्न, कौसल्या, सुमित्रा, व इतरही राजस्त्रिया ह्यांनीं त्या नौकेवर आरोहण केलें १३. तदनंतर पुरोहित वसिष्ठ, गुरु, ब्राह्मण व बरोबर आलेल्या सरदारांच्या स्त्रिया त्या नौकेवर आरूढ झाल्यानंतर गाडे व सामानसुमान दुसऱ्या नौकांवर लादलें १४. सेनेंतील लोक आपलें रात्रीचें वसतिस्थान पेटवूं लागले असतां, नावेच्या उतारापाशीं गंगेंत शिरूं लागले असतां आणि सामानसुमान घेऊं लागले असतां जो ध्वनि झाला त्यानें आकाश व्यापून टाकिलें १५. तदनंतर स्वतः धीवर लोक ज्यावर बसले आहेत अशा त्या वर बसलेल्या लोकांना

णामभिपूर्णास्तु काश्चित्काश्चित्तु वाजिनाम् । काश्चित्तत्र वहन्ति स्म यानयुग्यं महाधनम् १७ तास्तु गत्वा परं तीरमवरोप्य च तं जनम् । निवृत्ताः काण्डचित्राणि क्रियन्ते दाशबन्धुभिः १८ सवैजयन्तास्तु गजा गजारोहैः प्रचोदिताः । तरन्तः स्म प्रकाशन्ते सपक्षा इव पर्वताः १९ नावश्चारुरुहुस्त्वन्ये प्लवैस्तेरुस्तथापरे । अन्ये कुम्भघटैस्तेरुरन्ये तेरुश्च बाहुभिः २० सा पुण्या ध्वजिनी गङ्गां दाशैः संतारिता स्वयम् । मैत्रे मुहूर्ते प्रययौ प्रयागवनमुत्तमम् २१ आश्वासयित्वा च चमूं महात्मा निवेशयित्वा च यथोपजोषम् । द्रष्टुं भरद्वाजमृषिप्रवर्यं ऋत्विक्सदस्यैर्भरतः प्रतस्थे २२ स ब्राह्मणस्याश्रममभ्युपेत्य महात्मनो देवपुरोहितस्य । ददर्श रम्योटजवृक्षदेशं महद्वनं विप्रवरस्य रम्यम् २३ [३३०३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोननवतितमः सर्गः ॥८९॥

भरद्वाजाश्रमं गत्वा क्रोशादेव नरर्षभः । जनं सर्वमवस्थाप्य जगाम सह मन्त्रिभिः १ पद्भ्यामेव तु धर्मज्ञो न्यस्तशस्त्रपरिच्छदः । वसानो वाससी

---

वाहून नेणाऱ्या शीघ्रगामी शिडांच्या नावा एकदम चालूं लागल्या १६. कांहीं नावा स्त्रियांनीं भरलेल्या होत्या, कांहीं अश्वांनीं खचलेल्या होत्या आणि कांहीं बहुमूल्यवान् गाड्या ओढणारे बैल वगैरे वाहन नेत होत्या १७. त्या नावा पलीकडल्या तीराला पोंचून आणि त्या लोकांना तेथें उतरून परत फिरल्या असतां धीवर लोक त्यांवर आरूढ झाले आणि उदकांतून चित्रविचित्र गतीनें येऊं लागले १८. माहुतांनीं प्रेरणा केलेले ध्वजासहवर्तमान गज नावांतून तरून जाऊं लागले असतां पक्षयुक्त पर्वताप्रमाणें दिसूं लागले १९. परत येतांना कांहीं धीवर नावावर बसून आले, कांहीं पेटाऱ्यांच्या योगानें तरून आले, कांहीं लहान मोठ्या घंटांचा आश्रय करून आले, आणि कांहीं तर पोहूनच आले २०. असो. स्वतः धीवरांनीं गंगेपलीकडे नेऊन पोंचविलेली ती पवित्र सेना ( चार घटिका दिवस आल्यानंतर ) मैत्रमुहूर्तावर उत्कृष्ट प्रयागवनामध्यें गेली २१. तव्हां सुखानें त्या सेनेला विश्रांति देऊन आणि तिला प्रयागवनामध्यें ठेवून मुनिश्रेष्ठ भरद्वाजांचें दर्शन घेण्याकरितां ऋत्विज आणि सदस्य ह्यांसहवर्तमान भरत पुढें निघाला २२. महात्मा देव पुरोहित जो भरद्वाज ब्राह्मण त्याच्या आश्रमाला गेल्यावर रमणीय पर्णकुटिका, वृक्ष व प्रदेश ह्यांनीं युक्त असलेलें त्या श्रेष्ठ विप्राचें रम्य महावन भरतानें अवलोकन केलें २३. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकूणनव्वदावा सर्ग समाप्त झाला ॥८९॥

भरद्वाज मुनींच्या आश्रमासमीप गेल्यानंतर सर्व लोकांना एक कोसभर दूरच ठेवून

क्षौमे पुरोधाय पुरोहितम् २ ततः संदर्शने तस्य भरद्वाजस्य राघवः । मन्त्रिणस्तानवस्थाप्य जगामानुपुरोहितम् ३ वसिष्ठमथ दृष्ट्वैव भरद्वाजो महातपाः । संचचालासनात्तूर्णं शिष्यानर्घ्यमिति ब्रुवन् ४ समागम्य वसिष्ठेन भरतेनाभिवादितः । अबुध्यत महातेजाः सुतं दशरथस्य तम् ५ ताभ्यामर्घ्यं च पाद्यं च दत्त्वा पश्चात्फलानि च । आनुपूर्व्याच्च धर्मज्ञः पप्रच्छ कुशलं कुले ६ अयोध्यायां बले कोशे मित्रेष्वपि च मन्त्रिषु । जानन्दशरथं वृत्तं न राजानमुदाहरत् ७ वसिष्ठो भरतश्चैनं पप्रच्छतुरनामयम् । शरीरेऽग्निषु शिष्येषु वृक्षेषु मृगपक्षिषु ८ तथेति तु प्रतिज्ञाय भरद्वाजो महायशाः । भरतं प्रत्युवाचेदं राघवस्नेहबन्धनात् ९ किमिहागमने कार्यं तव राज्यं प्रशासतः । एतदाचक्ष्व सर्वं मे न हि मे शुध्यते मनः १० सुषुवे यममित्रघ्नं कौसल्यानन्दवर्धनम् । भ्रात्रा सह सभार्यो यश्चिरं प्रव्राजितो वनम् ११ नियुक्तः स्त्रीनिमित्तेन पित्रा योऽसौ महायशाः । वन-

---

भरत आपल्या मंत्र्यांसहवर्तमान त्यांच्या दर्शनाला निघाला १. तो धर्मवेत्ता भरत शस्त्रें व लवाजमा मागें ठेवून देऊन व सोळ्याचीं वस्त्रं परिधान करून पुरोहित वसिष्ठांना पुढें घालून पायांनींच निघाला २. तदनंतर त्या भरद्वाज मुनींचें दर्शन घेतेवेळीं मंत्र्यांना मागें ठेवून वसिष्ठमुनींच्या मागोमाग तो भरत त्यांचेकडे जाऊं लागला ३. तेव्हां वसिष्ठमुनींना अवलोकन करितांक्षणीं महातपस्वी भरद्वाज " पूजासाहित्य पूजासाहित्य " असें शिष्यांना सांगत सांगत सत्वर आसनावरून उठले ४ व वसिष्ठांनीं भेट झाल्यावर भरतानें अभिवंदन केलें असतां तो दशरथाचा पुत्र म्हणून त्या महातेजस्वी भरद्वाजांना समजून आलें ५. तदनंतर अर्घ्य, पाद्य आणि फळें त्या उभयतांना दिल्यावर धर्मवेत्त्या भरद्वाज मुनींनीं इक्ष्वाकुकुल, अयोध्या, सैन्य, कोश, मित्र आणि मंत्री ह्यांविषयीं क्रमानें कुशल प्रश्न केला आणि दशरथ मृत झाल्याचें ते ( योगबलानें ) जाणीतच असल्यामुळें त्या राजाचा त्यांनीं उल्लेखच केला नाहीं ६,७. नंतर शरीरप्रकृति, अग्नि, शिष्य, वृक्ष, मृग आणि पक्षी ह्यासंबंधानें वसिष्ठ व भरत ह्यांनीं त्यांना कुशल प्रश्न केला असतां ८ " ठीक आहे " असें म्हणून रामाचे ठिकाणीं असलेल्या प्रेमबंधनामुळें ते महायशस्वी भरद्वाज मुनि भरताला म्हणाले ९ " राज्य चालवीत असतांना तुला येथें येण्याचें प्रयोजन काय हें सर्व मला सांग. ( तुझ्या येण्यांतील हेतु चांगला असेलच अशाबद्दल ) माझ्या मनाला विश्वास वाटत नाहीं १०. ज्या शत्रुनाशक व आनंदवर्धक रामाला कौसल्येनें जन्म दिला, भ्राता लक्ष्मण आणि भार्या सीता ह्यांसहवर्तमान ज्याला बहुकालपर्यंत रहाण्याच्या उद्देशानें वनांत हांकून दिलें ११ आणि ज्या महायशस्वी रामाला " ह्या

वासी भवेतीह समाः किल चतुर्दश १२ कच्चिन्न तस्यापापस्य पापं कर्तुमिहेच्छसि । अकण्टकं भोक्तुमना राज्यं तस्यानुजस्य च १३ एवमुक्तो भरद्वाजं भरतः प्रत्युवाच ह । पर्यश्रुनयनो दुःखाद्वाचा संसज्जमानया १४ हतोस्मि यदि मामेवं भगवानपि मन्यते । मत्तो न दोषमाशङ्क मैवं मामनुशाधि हि १५ न चैतदिष्टं माता मे यदवोचन्मदन्तरे । नाहमेतेन तुष्टश्च न तद्वचनमाददे १६ अहं तु तं नरव्याघ्रमुपयातः प्रसादकः प्रतिनेतुमयोध्यायां पादौ चास्याभिवन्दितुम् १७ तं मामेवंगतं मत्वा प्रसादं कर्तुमर्हसि । शंस मे भगवन्रामः क्व संप्रति महीपतिः १८ वसिष्ठादिभिरृत्विग्भिर्याचितो भगवांस्ततः । उवाच तं भरद्वाजः प्रसादाद्भरतं वचः १९ त्वय्येतत्पुरुषव्याघ्र युक्तं राघववंशजे । गुरुवृत्तिर्दमश्चैव साधूनां चानुयायिता २० जाने चैतन्मनस्थं ते दृढीकरणमस्त्विति । अपृच्छं त्वां तवात्यर्थं कीर्तिं समभिवर्धयन् २१ जाने च रामं धर्मज्ञं ससीतं सह-

---

दंडकारण्यामध्यें चवदा वर्षेपर्यंत रहा " ह्मणून पित्यानें स्त्रीकरितां आज्ञा केली १२ त्या निष्पाप रामाचें व लक्ष्मणाचें कांहीं वाईट करण्याची तर—निष्कंटक राज्याचा उपभोग घेण्याचें मनांत येऊन—तुला इच्छा झाली नाहीं नां ? १३. ह्याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं विचारिलें असतां अश्रूंनीं ज्याचे नेत्र भरून आले आहेत असा तो भरत अडखळत अडखळत दुःखानें त्यांना ह्मणाला १४ "भगवानूही जर मला असेंच समजत असतील तर मी नीचच आहें; परंतु, झालेल्या गोष्टीचा दोष माझ्याकडे नाहीं हें मी स्वानुभवावरून जाणीत आहें करितां, आपण मला असें बोलूं नका १५. माझ्यासंबंधानें मातेनें जें राजाला सांगितलें तें हें मला इष्ट नाहीं, ह्याच्या योगानें मी संतुष्टही झालों नाहीं आणि तिच्या सांगण्याचा मी स्वीकारही करीत नाहीं १६. मी रामाच्या चरणांना वंदन करण्याकरितां अयोध्येंत परत येण्याविषयीं त्याचें मन वळवावें ह्मणून त्या पुरुषश्रेष्ठाकडे निघालों आहें १७. तेव्हां असा उद्देश मनांत धरून मी आलों आहें असें समजा आणि माझ्यावर कृपा करा. हे भगवन्, सांप्रत भूपति राम कोठें आहे तें आपण मला कळवा ' १८. ह्यानंतर ( भरतावर कृपा करण्याविषयीं ) वसिष्ठप्रभृति ऋत्विजांनींही विनंति केली असतां भगवान् भरद्वाजमुनि कृपा करून त्या भरताला ह्मणाले १९ " हे पुरुषश्रेष्ठ भरता, राघववंशांत उत्पन्न झालेल्या तुझे ठिकाणीं गुरुसेवा, इंद्रियदमन आणि सज्जनांचें अनुकरण हें योग्यच आहे २०. हें तुझ्या मनांतील मला ठाऊकच आहे; परंतु, तुझी कीर्ति अत्यंत वृद्धिंगत करण्याच्या उद्देशानें त्याचें दृढीकरण व्हावें ह्मणून मीं तुला असें विचारिलें २१. सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान

लक्ष्मणम्। अयं वसति ते भ्राता चित्रकूटे महागिरौ २२ श्वस्तु गन्तासि तं देशं वसाद्य सह मन्त्रिभिः। एतं मे कुरु सुप्राज्ञ कामं कामार्थकोविद २३ ततस्तथेत्येवमुदारदर्शनः प्रतीतरूपो भरतोऽब्रवीद्वचः। चकार बुद्धिं च तदाश्रमे तदा निशानिवासाय नराधिपात्मजः २४ [३३२७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे नवतितमः सर्गः॥ ९०॥

कृतबुद्धिं निवासाय तत्रैव स मुनिस्तदा। भरतं कैकयीपुत्रमातिथ्येन न्यमन्त्रयत् १ अब्रवीद्भरतस्त्वेनं नन्विदं भवता कृतम्। पाद्यमर्घ्यमथातिथ्यं वने यदुपपद्यते २ अथोवाच भरद्वाजो भरतं प्रहसन्निव। जाने त्वां प्रीतिसंयुक्तं तुष्येस्त्वं येनकेनचित् ३ सेनायास्तु तवैवास्याः कर्तुमिच्छामि भोजनम्। मम प्रीतिर्यथारूपा त्वमर्हो मनुजर्षभ ४ किमर्थं चापि निक्षिप्य दूरे बलमिहागतः। कस्मान्नेहोपयातोसि सबलः पुरुषर्षभ ५ भरतः प्रत्युवाचेदं प्राञ्जलिस्तं तपोधनम्। न सैन्येनोपयातोस्मि भगवन्भगवद्भ-

---

धर्मज्ञ राम कोठें रहात आहे हें मी जाणीत आहें; हा तुझा भ्राता चित्रकूट महापर्वतावर वास्तव्य करीत आहे २२. तूं उद्यीक त्या प्रदेशाला जाशील; आज मंत्र्यांसहवर्तमान येथें वास्तव्य कर आणि, हे अर्थकामसंपन्न अत्यंत ज्ञानवान् भरता, हा माझा मनोरथ तूं परिपूर्ण कर" २३. ह्याप्रमाण भरद्वाजांनीं सांगितल्यानंतर महाविचारी आणि प्रख्यात् कीर्तिमान् भरतानें "ठीक आहे" ह्मणून त्यांना सांगितलें आणि त्या भरद्वाज मुनींच्याच आश्रमामध्यें वास्तव्य करण्याचें त्या राजकुमारानें मनामध्यें आणिलें २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं नव्वदावा सर्ग समाप्त झाला॥ ९०॥

त्या भरद्वाजाश्रमामध्येंच त्या रात्रीं वास्तव्य करण्याचा निश्चय केलेल्या त्या कैकेयींपुत्र भरताला त्या भरद्वाज मुनींनीं आदरातिथ्य करण्याकरितां (भोजनाचें) निमंत्रण केलें १. तेव्हां "पाद्य, अर्घ्य वगैरे हें जें वनामध्यें मिळणें संभवनीय आहे त्याच्यायोगानें आपण हें आदरातिथ्य केलेंच आहेत" असें भरत त्यांना ह्मणाला असतां २ भरद्वाजमुनि हंसत हंसत भरताला ह्मणाले "तूं माझे ठिकाणीं प्रेम करणारा आहेस हें मी जाणत आहें व ह्यामुळें तूं कशानेंही संतुष्ट होशील अशी माझी खात्री आहे ३; परंतु, ह्या तुझ्या सेनेला भोजन घालण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां, हे पुरुषश्रेष्ठा, माझी जशी इच्छा आहे तसा तिचा अंगिकार करणें तुला योग्य आहे ४. हे पुरुषश्रेष्ठा, सैन्य दूर ठेवून तूं येथें कशाकरितां आलास; सैन्यासहवर्तमानच तूं येथें कां आला नाहींस" ५. ह्याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं विचारिलें असतां भरत हात जोडून

यात् ६ राज्ञा हि भगवन्नित्यं राजपुत्रेण वा तथा। यत्नतः परिहर्तव्या विषयेषु तपस्विनः ७ वाजिमुख्या मनुष्याश्च मत्ताश्च वरवारणाः। प्रच्छाद्य भगवन्भूमिं महतीमनुयान्ति माम् ८ ते वृक्षानुदकं भूमिमाश्रमेषूटजांस्तथा। न हिंस्युरिति तेनाहमेक एवागतस्ततः ९ आनीयतामितः सेनेत्याज्ञप्तः परमर्षिणा। तथानुचक्रे भरतः सेनायाः समुपागमम् १० अग्निशालां प्रविश्याथ पीत्वापः परिमृज्य च। आतिथ्यस्य क्रियाहेतोर्विश्वकर्माणमाह्वयत् ११ आह्वये विश्वकर्माणमहं त्वष्टारमेव च। आतिथ्यं कर्तुमिच्छामि तत्र मे संविधीयताम् १२ आह्वये लोकपालांस्त्रीन्देवाञ्शक्रपुरोगमान्। आतिथ्यं कर्तुमिच्छामि तत्र मे संविधीयताम् १३ प्राक्स्रोतसश्च या नद्यस्तिर्यक्स्रोतस एव च। पृथिव्यामन्तरिक्षे च समायान्त्वद्य सर्वशः १४ अन्याः स्रवन्तु मैरेयं सुरामन्याः सुनिष्ठिताम्। अपराश्चोदकं शीतमिक्षुकाण्डरसोपमम् १५ आह्वये देवगन्धर्वान्विश्वावसु-

---

त्या तपोधन भरद्वाज महामुनींना ह्मणाला " हे भगवन्, भगवानांच्या आश्रमाला पीडा होईल ह्या भीतीनें मी सैन्यासहवर्तमान येथें आलों नाहीं ६. कारण, राजानें अथवा राजपुत्रानें आपल्या देशामध्यें असलेल्या तपस्वी लोकांना पीडा देण्याचें प्रयत्नपूर्वक टाळिलें पाहिजे ७. हे भगवन्, श्रेष्ठ अश्व, मनुष्यें आणि मत्त गज मोठा प्रदेश व्यापून माझ्या मागोमाग येत आहेत ८. त्यांनीं वृक्ष, उदक, भूमि आणि आश्रमांतील पर्णकुटिका ह्यांचा नाश करूं नये एतदर्थ मी एकटाच त्यांना तेथें ठेवून येथें आलों आहें " ९. ह्यावर " येथें सेना घेऊन ये " अशी त्या महर्षींची आज्ञा होतांक्षणींच भरत सेनेसहवर्तमान तेथें आला १०. तदनंतर अग्निशालेमध्यें प्रवेश करून आणि ओष्ठ-परिमार्जनासह आचमन करून आतिथ्य करण्याकरितां भरद्वाजमुनींनीं विश्वकर्म्याला आह्वान केलें ११. (ते ह्मणाले) " ह्या सैन्याचें आदरातिथ्य करण्याची माझी इच्छा आहे. ह्यास्तव, मी विश्वकर्म्याला व त्वष्ट्याला आह्वान करितों. या आदरातिथ्यासंबंधानें माझी सर्व तयारी होऊं द्या १२. त्याचप्रमाणें यम, वरूण व कुबेर ह्या तीन लोकपालांना आणि इंद्रप्रभृति देवांना मी आह्वान करितों. सैन्याचें आदरातिथ्य करण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां त्या माझ्या आदरातिथ्याविषयीं तयारी होऊं द्या १३. पूर्ववाहिन्या आणि उत्तरवाहिन्या अशा ज्या कांहीं नद्या पृथ्वीवर व आकाशामध्यें असतील त्या सर्व आज येथें येवोत १४. त्यांपैकीं कांहीं नद्या मैरेयसंज्ञक मद्याचे प्रवाह सुरू करोत. दुसऱ्या कांहीं नद्या उत्तम रीतीनें तयार केलेल्या सुरेचा प्रवाह उत्पन्न करोत आणि कांहीं नद्या इक्षुरसाप्रमाणें मधुर व शीत उदक

हहाहुहून् । तथैवाप्सरसो देवगन्धर्वैश्चापि सर्वशः १६ घृताचीमथ विश्वाचीं मिश्रकेशीमलम्बुषाम् । नागदत्तां च हेमां च सोमामद्रिकृतस्थलीम् १७ शक्रं याश्चोपतिष्ठन्ति ब्रह्माणं याश्च भामिनीः । सर्वास्तुम्बुरुणा सार्धमाह्वये सपरिच्छदाः १८ वनं कुरुषु यद्दिव्यं वासोभूषणपत्रवत् । दिव्यनारीफलं शश्वत्तत्कौबेरमिहैव तु १९ इह मे भगवान्सोमो विधत्तामन्नमुत्तमम् । भक्ष्यं भोज्यं च चोष्यं च लेह्यं च विविधं बहु २० विचित्राणि च माल्यानि पादपप्रच्युतानि च । सुरादीनि च पेयानि मांसानि विविधानि च २१ एवं समाधिना युक्तस्तेजसाप्रतिमेन च । शिक्षास्वरसमायुक्तं सुव्रतश्चाब्रवीन्मुनिः २२ मनसा ध्यायतस्तस्य प्राङ्मुखस्य कृताञ्जलेः । आजग्मुस्तानि सर्वाणि दैवतानि पृथक्पृथक् २३ मलयं दर्दुरं चैव ततः स्वेदनुदोऽनिलः । उपस्पृश्य ववौ युक्त्या सुप्रियात्मा सुखं शिवः २४ ततोऽभ्यवर्षन्त घना दिव्याः कुसुमवृष्टयः । देवदुन्दुभिघोषश्च दिक्षु सर्वासु शुश्रुवे २५ प्रववुश्चोत्तमा वाता ननृतुश्चाप्सरोगणाः । प्रज-

वाजून नऊं लागोत १५. विश्वावसु, हाहा व हूहू ह्या देवगंधर्वांना आणि त्याचप्रमाणें देवगंधर्वांसहवर्तमान सर्व अप्सरांना मी आह्वान करीत आहें १६. घृताची, विश्वाची, मिश्रकेशी, अलंबुषा, नागदत्ता, हेमा, पर्वतावर वसतिस्थान केलेली सोमा १७ आणि त्याचप्रमाणें इंद्र व ब्रह्मदेव ह्यांची सेवा करणाऱ्या अशा सर्व सालंकार अप्सरांना तुंबुरूसहवर्तमान मी आह्वान करीत आहें १८. वस्त्रें व भूषणें हींच ज्यांतील वृक्षांचीं पानें आहेत आणि दिव्य स्त्रिया हींच ज्यांतील वृक्षांचीं फळें आहेत असें जें उत्तर कुरुदेशामध्यें असलेलें कुबेराचें दिव्य व शाश्वत चैत्ररथ वन तेंच येथें येवो. (सारांश, त्या वनांतील देवतांनाच मी येथें आह्वान केलें असल्यामुळें हें वनच तसें होवो ) १९. भगवान् सोम उत्कृष्ट अन्न ह्मणजे नानाप्रकारचें विपुल भक्ष्य, भोज्य, चोष्य, लेह्य, सुराप्रभृति पेयें आणि नानाप्रकारचीं मांसें तयार करो व वृक्षांना आपोआप आलेलीं अद्भुत पुष्पें तयार ठेवो " २०,२१. ह्याप्रमाणें अप्रतिम तेज आणि समाधि ह्यांनीं युक्त व उत्तम व्रतस्थ असलेल्या त्या भरद्वाजमुनींनीं शिक्षेंत सांगितल्याप्रमाणें वर्णोच्चारानें संपन्न असें आह्वान केलें २२. तेव्हां हात जोडून व पराङ्मुख होऊन ते मुनि मनामध्यें ध्यान करीत बसले असतांना त्या सर्व देवता एकेक त्यांचे समीप येऊं लागल्या २३. मलय आणि दर्दुर ह्या चंदनयुक्त पर्वतांना स्पर्श करून घाम नाहींसा करणारा कल्याणकारक व मनाला अत्यंत आल्हाद देणारा वारा योग्यरीतीनें सुखकारक वाहूं लागला २४. मेघ दिव्य पुष्पांची वृष्टि करूं लागले आणि सर्व दिशांमध्यें देवदुंदुभी-

गुर्देवगन्धर्वा वीणाः प्रमुमुचुःस्वरान् २६ स शब्दो द्यां च भूमिं च प्राणिनां श्रवणानि च । विवेशोच्चावचः श्लक्ष्णः समो लयगुणान्वितः २७ तस्मिन्नेवं गते शब्दे दिव्ये श्रोत्रसुखे नृणाम् । ददर्श भारतं सैन्यं विधानं विश्वकर्मणः २८ बभूव हि समाभूमिः समन्तात्पञ्चयोजनम् । शाद्वलैर्बहुभिश्छन्ना नीलवैदूर्यसंनिभैः २९ तस्मिन्बिल्वाः कपित्थाश्च पनसा बीजपूरकाः । आमलक्यो बभूवुश्च चूताश्च फलभूषिताः ३० उत्तरेभ्यः कुरुभ्यश्च वनं दिव्योपभोगवत् । आजगाम नदी सौम्या तीरजैर्बहुभिर्वृता ३१ चतुःशालानि शुभ्राणि शालीश्च गजवाजिनाम् । हर्म्यप्रासादसंयुक्ततोरणानि शुभानि च ३२ सितमेघनिभं चापि राजवेश्म सुतोरणम् । शुक्लमाल्यकृताकारं दिव्यगन्धसमुक्षितम् ३३ चतुरस्रमसंबाधं शयनासनयानवत् । दिव्यैः सर्वरसैर्युक्तं दिव्यभोजनवस्त्रवत् ३४ उपकल्पितसर्वान्नं धौतनिर्मलभाजनम् । कॢप्तसर्वासनं श्रीमत्स्वास्तीर्णशयनोत्तमम् ३५ प्रवि-

---

ऐकूं येऊं लागल्या २५. दुसरे उत्कृष्ट वारे वाहूं लागले, अप्सरांचे समुदाय नृत्य करूं लागले, देव व गंधर्व गायन करूं लागले आणि वीणावाद्यांचे ध्वनि होऊं लागले २६. तेव्हां मधुर, सम आणि मिलाफानें असलेला तो वाद्यांचा ध्वनि स्वर्ग, भूमि आणि प्राणिमात्रांचे कर्ण व्यापून राहिला २७ व ह्याप्रमाणें मनुष्यांच्या कानाला सुखावह असा दिव्य ध्वनि सुरू झाला असतां भरताच्या सैन्याला विश्वकर्म्याची ती तयारी दृष्टीं पडली २८. आसपास पांच योजनेंपर्यंत ( ह्मणजे वीसकोसपर्यंत ) भूमि साफ झाली आणि नील व वैदूर्य मण्यासारिख्या कोमल तृणांनीं ती आच्छादित झाली २९. त्या प्रदेशामध्यें बिल्व, कपित्थ, पनस, बीजपूरक, आमलक व आम्र हे वृक्ष फलांनीं भूषित झाले ३०. दिव्य व भोग्य वस्तूंनीं युक्त असलेलें वन उत्तर कुरुदेशापासून तेथें आल्यासारखें झालें आणि तीरावरील अनेक वृक्षांनीं व्याप्त अशी सौम्य नदीही तेथें उत्पन्न झाली ३१. शुभ्रवर्ण चौसोपीं घरें, हत्ती व घोडे ह्यांच्या पागा आणि वाडे व प्रासाद ह्यांनीं युक्त अशा शुभ वेशी हीं तेथें उत्पन्न झालीं ३२. त्या टिकाणीं एक राजगृह उत्पन्न झालें. तें शुभ्रवर्ण मेघासारिखें होतें; त्याला उत्कृष्ट तोरणें लाविलेलीं होतीं, श्वेतपुष्पांनीं तें शृंगारिलेलें होतें, दिव्य चंदनाचे त्यांत सडे टाकिले होते ३३. ते चतुरस्र होतें, शांत होतें, शय्या, आसनें आणि यानें ह्यांनीं तें युक्त होतें, सर्व प्रकारचे दिव्य रस त्यांत होते, दिव्य भोग्य वस्तु आणि वस्त्रेंही तेथें होतीं ३४, सर्व प्रकारचें अन्न त्यांत तयार केलेलें होतें, आंतील पात्रें धुतलेलीं व निर्मल होतीं, सर्व प्रकारचीं आसनें तेथें तयार होतीं आणि तें सुशोभित असून उत्कृष्ट प्रकारच्या शय्या त्यांत पसरलेल्या

वेश महाबाहुरनुज्ञातो महर्षिणा । वेश्म तद्रत्नसंपूर्णं भरतः कैकयीसुतः ३६ अनुजग्मुश्च ते सर्वे मन्त्रिणः सपुरोहिताः । बभूवुश्च मुदा युक्तास्तं दृष्ट्वा वेश्मसंविधिम् ३७ तत्र राजासनं दिव्यं व्यजनं छत्रमेव च । भरतो मन्त्रिभिः सार्धमभ्यवर्तत राजवत् ३८ आसनं पूजयामास रामायाभिप्रणम्य च । वालव्यजनमादाय न्यषीदत्सचिवासने ३९ आनुपूर्व्यान्निषेदुश्च सर्वे मन्त्रिपुरोहिताः । ततः सेनापतिः पश्चात्प्रशास्ता च न्यषीदत ४० ततस्तत्र मुहूर्तेन नद्यः पायसकर्दमाः । उपातिष्ठन्त भरतं भरद्वाजस्य शासनात् ४१ आसामुभयतः कूलं पाण्डुमृत्तिकलेपनाः । रम्याश्चावसथा दिव्या ब्राह्मणस्य प्रसादजाः ४२ तेनैव च मुहूर्तेन दिव्याभरणभूषिताः । आगुर्विंशतिसाहस्रा ब्रह्मणा प्रहिताः स्त्रियः ४३ सुवर्णमणिमुक्तेन प्रवालेन च शोभिताः । आगुर्विंशतिसाहस्राः कुबेरप्रहिताः स्त्रियः ४४ याभिर्गृहीतः पुरुषः सोन्माद इव लक्ष्यते । आगुर्विंशतिसाहस्रा नन्दनादप्सरोगणाः ४५ नारदस्तुम्बुरुर्गोपः प्रभया सूर्यवर्चसः । एते गन्धर्वराजानो भरतस्याग्रतो

---

होत्या ३५. अशा प्रकारच्या त्या रत्नांनीं भरलेल्या घरामध्यें तो कैकेयीपुत्र महापराक्रमी भरत भरद्वाजमहर्षींची अनुज्ञा झाल्यावर प्रविष्ट झाला ३६ व पुरोहितासहवर्तमान ते सर्व मंत्रीही त्याच्या मागोमाग गेले आणि तो गृहनिर्माण प्रकार अवलोकन करून आनंदित झाले ३७. तेथें राजाला योग्य असें जें दिव्य सिंहासन, चामर व छत्र होतें त्याला मंत्र्यांसहवर्तमान प्रदक्षिणा केली ३८, हें रामाचें आहे असें समजून प्रथम रामाला प्रणाम केल्यावर त्यानें त्या सिंहासनाचें पूजन केलें आणि सिंहासनाच्या अधोभागीं सचिवांकरितां तयार केलेल्या आसनावर तो चौरी घेऊन बसला ३९. तेव्हां सर्व मंत्री व पुरोहित योग्यतेप्रमाणें तेथें बसले आणि तदनंतर सैनाधिपति व शिबिररक्षक हेही तेथें येऊन बसले ४०. नंतर एका मुहूर्तानें भरद्वाजमुनींच्या आज्ञेवरून पायसरूप कर्दमानें युक्त असलेल्या नद्या भरतासमीप येऊन तयार राहिल्या ४१. ह्या नद्यांच्या दोन्ही तीरांवर भरद्वाज ब्राह्मणाच्या प्रसादामुळें उत्पन्न झालेलीं दिव्य व रम्य वसतिस्थानें होतीं आणि सफेती देऊन तीं तयार ठेविलेलीं होतीं ४२. त्याचवेळीं दिव्य अलंकार घातलेल्या अशा ब्रह्मदेवानें पाठविलेल्या वीस हजार स्त्रिया तेथें आल्या ४३. सुवर्ण, रत्नें, मोत्यें व पोंवळीं ह्यांनीं शोभित झालेल्या अशा कुबेरानें पाठविलेल्याही वीस हजार स्त्रिया तेथें आल्या ४४. ज्यांनीं पुरुषाला झपाटिलें असतां पुरुष उन्माद झाल्यासारिखा दिसूं लागतो असे वीस हजार अप्सरांचे समुदाय नंदनवनांतून तेथें आले ४५. प्रभेनें सूर्याप्रमाणें असलेले नारद तुंबरु व गोप हे

जगुः ४६ अलम्बुषा मिश्रकेशी पुण्डरीकाथ वामना । उपानृत्यन्त भरतं भरद्वाजस्य शासनात् ४७ यानि माल्यानि देवेषु यानि चैत्ररथे वने । प्रयागे तान्यदृश्यन्त भरद्वाजस्य तेजसा ४८ बिल्वा मार्दङ्गिका आसञ्शम्याग्राहा बिभीतकाः । अश्वत्था नर्तकाश्चासन्भरद्वाजस्य तेजसा ४९ ततः सरलतालाश्च तिलकाः सतमालकाः । प्रहृष्टास्तत्र संपेतुः कुब्जा भूत्वाथ वामनाः ५० शिंशपामलकी जम्बूर्याश्चान्याः कानने लताः । प्रमदाविग्रहं कृत्वा भरद्वाजाश्रमेवसन् ५१ सुरां सुरापाः पिबत पायसं च बुभुक्षिताः । मांसानि च सुमेध्यानि भक्ष्यन्तां यो यदिच्छति ५२ उच्छोद्य स्नापयन्ति स्म नदीतीरेषु वल्गुषु । अप्येकमेकं पुरुषं प्रमदाः सप्त चाष्ट च ५३ संवाहन्त्यः समापेतुर्नार्यो विपुललोचनाः । परिमृज्य तदान्योन्यं पाययन्ति वराङ्गनाः ५४ हयान्गजान्खरानुष्ट्रांस्तथैव सुरभेः सुतान् । अभोजयन्वाहनपास्तेषां भोज्यं यथाविधि ५५ इक्षूंश्च मधुलाजांश्च भोज-

---

गंधर्वराज भरतापुढें गायन करूं लागले ४६. अलंबुषा, मिश्रकेशी, पुंडरीका आणि वामना ह्या अप्सरा भरद्वाज मुनींच्या आज्ञेवरून भरतासमीप नृत्य करूं लागल्या ४७. देवांपाशीं आणि चैत्ररथ वनामध्यें जीं पुष्पें असतात तीं भरद्वाज मुनींच्या तपःसामर्थ्यानें प्रयागामध्यें दृष्टीं पडूं लागलीं ४८; इतकेंच नव्हे परंतु, त्या भरद्वाज मुनींच्या तपःप्रभावानें बिल्ववृक्ष मृदंग वाजवूं लागले, बिभीतकवृक्ष शम्यासंज्ञक ताल धरूं लागले आणि अश्वत्थ वृक्ष नृत्य करूं लागले ४९. तेव्हां देवदारू, ताल, तिलक आणि तमालक हे वृक्षही आनंदित होऊन कुब्ज व खुज ह्यांच्या रूपानें तेथें लोटले ५०. शिंशपा, आवळ्या, जांभळ्या आणि अरण्यांतील ज्या कांहीं दुसऱ्या लता त्या सर्व स्त्रीरूप धारण करून भरद्वाजांच्या आश्रमामध्यें त्या वेळीं वास्तव्य करूं लागल्या ५१ आणि " सुरापान करणाऱ्यांनीं सुरापान करावें, बुभुक्षितांनीं खीर ओरपावी आणि मांसभक्षकांनीं चांगलीं पवित्र मांसें भक्षण करावीं. सारांश, ज्यांना ज्याची इच्छा असेल त्याचा त्यांनीं स्वीकार करावा " असें ह्मणूं लागल्या ५२. मनोहर नदीतीरावर सात सात आठ आठ तरुण स्त्रिया एकेका पुरुषाला अंगाला लावून स्नान घालूं लागल्या ५३. भव्य नेत्रांनीं युक्त असलेल्या स्त्रिया पुरुषांचे पाय चेपण्याकरितां तेथें आल्या आणि स्नान घातल्यामुळें आपलें भिजलेलें शरीर वस्त्रादिकांच्या योगानें भूषित करून त्या श्रेष्ठ स्त्रिया एकमेकीला मद्य वगैरे पाजूं लागल्या ५४. अश्व, गज, गर्दभ, उष्ट्र आणि वृषभ ह्यांना वाहनसंरक्षक लोकांनीं त्यांचें त्यांचें भक्ष्य यथाविधि दिलें ५५ आणि इक्ष्वाकूंमधील श्रेष्ठ श्रेष्ठ योध्यांच्या वाहनांना खाण्याकरितां

यन्ति स्म वाहनान् । इक्ष्वाकुवरयोधानां चोदयन्तो महाबलाः ५६ नाश्व-
बन्धोश्वमाजानन्न गजं कुञ्जरग्रहः । मत्तप्रमत्तमुदिता सा चमूस्तत्र
संबभौ ५७ तर्पिताः सर्वकामैश्च रक्तचन्दनरूषिताः । अप्सरोगणसंयुक्ताः
सैन्या वाचमुदीरयन् ५८ नैवायोध्यां गमिष्यामो न गमिष्यामि दण्डकान् ।
कुशलं भरतस्यास्तु रामस्यास्तु तथा सुखम् ५९ इति पादातयोधाश्च हस्त्य-
श्वारोहबन्धकाः । अनाथास्तं विधिं लब्ध्वा वाचमेतामुदीरयन् ६० संप्र
हृष्टा विनेदुस्ते नरास्तत्र सहस्रशः । भरतस्यानुयातारः स्वर्गोयमिति
चाब्रुवन् ६१ नृत्यन्तश्च हसन्तश्च गायन्तश्चैव सैनिकाः । समन्तात्परि-
धावन्तो माल्योपेताः सहस्रशः ६२ ततो भुक्तवतां तेषां तदन्नममृतोपमम् ।
दिव्यानुद्वीक्ष्य भक्ष्यांस्तानभवद्भक्षणे मतिः ६३ प्रेष्याश्चेट्यश्च वध्वश्च
बलस्थाश्चापि सर्वशः । बभूवुस्ते भृशं प्रीताः सर्वे चाहतवाससः ६४
कुञ्जराश्च खरोष्ट्राश्च गोश्वाश्च मृगपक्षिणः । बभूवुः सुभृतास्तत्र नातो
ह्यन्यमकल्पयन् ६५ नाशुक्लवासास्तत्रासीत्क्षुधितो मलिनोपि वा । रजसा

---

हांकून नेणाऱ्या त्या महाबलाढ्य वाहनरक्षकांनीं इक्षु, मध आणि लाह्या वाहनांना
खायाला घातल्या ५६. मोतद्दाराला घोड्याचें भान राहिलें नाहीं व माहूतांचें लक्ष्य
हत्तीकडे राहिलें नाहीं. सारांश, त्या सैन्यांतील लोक कांहीं मादकद्रव्य सेवन केल्या-
मुळें मत्त झाले होते, कांहीं मद्यपानानें विवेकशून्य बनले होते आणि कांहीं स्त्रियांच्या
वगैरे उपभोगानें आनंदांत दंग होऊन गेले होते ५७. तेव्हां सर्व इच्छा परिपूर्ण
झालेले, रक्तचंदनाची उटी लाविलेले आणि अप्सरांच्या समुदायांनीं युक्त झालेले
सैनिक ह्मणाले ५८ " आह्मी आतां अयोध्येमध्येंही जात नाहीं व दंडका-
रण्यांतही जाणार नाहीं. भरताचें कुशल होवो आणि रामालाही सुख प्राप्त होवो " ५९.
ह्याप्रमाणें पदाति, योद्धे, स्वार, माहुत आणि मोतद्दार तो आदरातिथ्याचा प्रकार
प्राप्त झाल्यामुळें स्वतंत्र झाल्यासारिखे होऊन असें भाषण करूं लागले ६०. भरताच्या
मागोमाग जाणारे ते हजारों लोक अत्यंत हर्षित होऊन गर्जना करूं लागले व
हा स्वर्ग आहे असें ह्मणूं लागले ६१ आणि पुष्पमाला धारण केलेले असे हजारों
सैनिक नाचत, हंसत व गात गात चोहोंकडे धावूं लागले ६२. तदनंतर तें अमृत-
तुल्य अन्न भक्षण केलेल्या त्या सैनिकांना दिव्य भक्ष्य पदार्थ अवलोकन करून पुन-
रपि भोजन करण्याची इच्छा झाली ६३. सैन्यांतील दास, दासी व स्त्रिया ह्या सर्वांनीं
नूतन वस्त्रें परिधान केलेलीं होतीं आणि त्या सर्वांना अत्यंत आनंद झालेला होता ६४.
गज, गर्दभ, उष्ट्र, वृषभ, अश्व, मृग आणि पक्षी ह्यांनीं त्या ठिकाणीं इतकें कांहीं भक्षण

ध्वस्तकेशो वा नरः कश्चिददृश्यत ६६ आजैश्चापि च वाराहैर्निष्ठानवरसंचयैः । फलनिर्यूहसंसिद्धैः सूपैर्गन्धरसान्वितैः ६७ पुष्पध्वजवतीः पूर्णाः शुक्लस्यान्नस्य चाभितः । ददृशुर्विस्मितास्तत्र नरा लौहीः सहस्रशः ६८ बभूवुर्वनपार्श्वेषु कूपाः पायसकर्दमाः ताश्च कामदुघा गावो द्रुमाश्चासन्मधुश्च्युतः ६९ वाप्यो मैरेयपूर्णाश्च मृष्टमांसचयैर्वृताः । प्रतप्तपैठरैश्चापि मार्गमायूरकौक्कुटैः ७० पात्रीणां च सहस्राणि स्थालीनां नियुतानि च । न्यर्बुदानि च पात्राणि शातकुम्भमयानि च ७१ स्थाल्यः कुम्भ्यः करम्भ्यश्च दधिपूर्णाः सुसंस्कृताः । यौवनस्थस्य गौरस्य कपित्थस्य सुगन्धिनः ७२ ह्रदाः पूर्णाः रसालस्य दध्नः श्वेतस्य चापरे । बभूवुः पयसश्चान्ये शर्कराणां च संचयाः ७३ कल्कांश्चूर्णकषायांश्च स्नानानि विविधानि च । ददृशुर्भाजनस्थानि तीर्थेषु सरितां नराः ७४ शुक्लानंशुमतश्चापि दन्तधावनसंचयान् ।

---

केलें कीं, मुनींनीं दिलेल्या अन्नाशिवाय त्यांना दुसरें कांहींच भक्षण करण्याची इच्छा झाली नाहीं ६५. त्या ठिकाणीं शुभवस्त्ररहित, क्षुधित, मलिन अथवा केसांत धूळ उडालेला असा एकही पुरुष दिसत नव्हता ६६. बोकड व वराह एतत्संबंधीं, उत्कृष्ट मसाला घातलेलीं, फळांच्या रसांनीं तयार केलेलीं आणि स्वाद व रस ह्यांनीं युक्त असलेलीं जीं वरणें त्यांच्या योगानें ६७ भाताच्या भोंवतीं भरून ठेविलेलीं आणि वर फुलें घातलेलीं अशीं हजारों सुवर्णादि धातूंचीं पात्रें त्या ठिकाणीं सैन्यांतील पुरुषांनीं विस्मयपूर्वक अवलोकन केलीं ६८. त्या वनप्रदेशामध्यें पायसरूप कर्दमांनीं युक्त असलेले कूप, कामधेनू, गायी आणि मधुर रस स्रवणारे वृक्ष उत्पन्न झालेले होते ६९. मैरेयसंज्ञक मद्यानें परिपूर्ण असलेल्या वापी तेथें उत्पन्न झाल्या असून फक्त तापवून तयार केलेल्या व खापरावर भाजून तयार केलेल्या अशा मृग, मयूर व कुक्कुट पक्ष्यांच्या रुचिकर मांससमुदायांनीं त्या परिवेष्टिलेल्या होत्या ७०. भातानें भरलेल्या सुवर्णाच्या हजारों पराता, भाज्या व कोशिंबिरी ह्यांनीं भरलेलीं सुवर्णाचीं लाखों पातेलीं आणि सुवर्णाचीं कोट्यावधि ताटें तेथें उत्पन्न झालीं होतीं ७१. पीतवर्ण आणि सुगंधि द्रव्यांनीं युक्त अशा ताज्या मठ्ठ्यानें भरलेलीं व उत्कृष्ट रीतीनें अलंकृत केलेलीं अशीं भांडीं तेथें होतीं आणि कुपेलीं दह्यानें भरलेलीं होतीं व पाणी पिण्याचीं भांडींही तेथें होतीं ७२. जिरें घातलेल्या ताकाचे कांहीं डोह भरलेले होते, शुभ्रवर्ण दह्यांचीं कांहीं तळीं भरलेलीं होतीं, दुधानें भरलेलीं कांहीं टाकीं तेथें होतीं आणि साखरेचा साठा असलेलीं कांहीं भुयारेंही तेथें होतीं ७३. कल्क, चूर्ण, कषाय व स्नानाकरितां नानाप्रकारचीं उदकें पात्रांतून ठेविलेलीं नदीतीर्थावर त्या सैन्यांतील लोकांनीं अवलोकन

शुक्लांश्चन्दनकल्कांश्च समुद्गेष्ववतिष्ठतः ७५ दर्पणान्परिमृष्टांश्च वाससां चापि संचयान् । पादुकोपानहं चैव युग्मान्यत्र सहस्रशः ७६ आञ्जनीः कङ्कतान्कूर्चाञ्छत्त्राणि च धनूंषि च । मर्मत्राणानि चित्राणि शयनान्यासनानि च ७७ प्रतिपानह्रदान्पूर्णान्खरोष्ट्रगजवाजिनाम् । अवगाह्य सुतीर्थांश्च ह्रदान्सोत्पलपुष्करान् ७८ आकाशवर्णप्रतिमान्स्वच्छतोयान्सुखाप्लवान् ७९ नीलवैडूर्यवर्णांश्च मृदून्यवससंचयान् । निर्वापार्थं पशूनां ते ददृशुस्तत्र सर्वशः ८० व्यस्मयन्त मनुष्यास्ते स्वप्नकल्पं तदद्भुतम् । दृष्ट्वातिथ्यं कृतं तावद्भरद्वाजमहर्षिणा ८१ इत्येवं रममाणानां देवानामिव नन्दने । भरद्वाजाश्रमे रम्ये सा रात्रिर्व्यत्यवर्तत ८२ प्रतिजग्मुश्च ताः सर्वा गन्धर्वाश्च यथागतम् । भरद्वाजमनुज्ञाप्य ताश्च सर्वा वराङ्गनाः ८३ तथैव मत्ता मदिरोत्कटा नरास्तथैव दिव्यागुरुचन्दनोक्षिताः । तथैव दिव्या विविधाः स्रगुत्तमाः पृथग्विकीर्णा मनुजैः प्रमर्दिताः ८४ [३४११] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकनवतितमः सर्गः ॥ ९१ ॥

---

केलीं ७४. निर्मल आणि टांकाला कुंचली केलेले असे दंतधावनकाष्ठांचे समुदाय, पुढांतून उगाळून ठेविलेलीं शुभ्र गंध ७५, निर्मल आरसे, वस्त्रसमुदाय, हजारों जोड खडावा व वहाणा ७६, काजळाच्या डब्या, फण्या, कुंचल्या, छत्रें, धनुष्यें, आश्चर्यकारक कवचें, शय्या, आसनें ७७ आणि खर, उष्ट्र, गज व अश्व ह्यांना आंतून जातां येईल अशा उतारानें युक्त, आकाशाप्रमाणें नीलवर्ण, स्वच्छ जलानें भरलेलीं आणि सुखानें स्नान करितां येण्याजोगीं जलपूर्ण सरोवरें त्यांनीं अवलोकन केलीं ७८,७९ पशूंनीं भक्षण करण्याकरितां नील व वैडूर्यमणि ह्याप्रमाणें दिसत असलेले गवताचे हजारों मृदु ढीग त्यांनीं तेथें अवलोकन केले ८०. अशाप्रकारें भरद्वाजमहर्षींनीं केलेलें तें स्वप्नतुल्य अद्भुत आदरातिथ्य अवलोकन करून ते लोक विस्मित झाले ८१ व अशारीतीनें नंदनवनामध्यें रममाण होणाऱ्या देवांप्रमाणें भरद्वाजमुनींच्या रम्य आश्रमामध्येंच रममाण होणाऱ्या लोकांची ती रात्र निघून गेली ८२. तेव्हां ते सर्व गंधर्व आणि त्या सर्व दिव्य स्त्रिया भरद्वाज मुनींची अनुज्ञा घेऊन आल्या मार्गानें परत गेल्या ८३; परंतु दिव्य अगुरु आणि चंदन ह्यांची उटि ज्यांच्या अंगाला लाविली आहे असे मदिरापानानें मत्त झालेले पुरुष आणि लोकांनीं चुरगळून टाकिलेल्या व इकडे तिकडे पडलेल्या अशा नानाप्रकारच्या उत्कृष्ट दिव्य पुष्पमाला हीं मात्र जागच्याजागीं तेथें तशींच राहिलीं ८४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एक्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९१ ॥

ततस्तां रजनीं व्युष्य भरतः सपरिच्छदः। कृतातिथ्यो भरद्वाजं कामादभिजगाम ह १ तमृषिः पुरुषव्याघ्रं प्रेक्ष्य प्राञ्जलिमागतम्। हुताग्निहोत्रे भरतं भरद्वाजोऽभ्यभाषत २ कच्चिदत्र सुखा रात्रिस्तवास्मद्विषये गता। समग्रस्ते जनः कच्चिदातिथ्ये शंस मेऽनघ ३ तमुवाचाञ्जलिं कृत्वा भरतोऽभिप्रणम्य च। आश्रमादुपनिष्क्रान्तमृषिमुत्तमतेजसम् ४ सुखोषितोऽस्मि भगवन्समग्रबलवाहनः। बलवत्तर्पितश्चाहं बलवान्भगवंस्त्वया ५ अपेतक्लमसंतापाः सुभिक्षाः सुप्रतिश्रयाः। अपि प्रेष्यानुपादाय सर्वे स्म सुसुखोषिताः ६ आमन्त्रयेऽहं भगवन्कामं त्वामृषिसत्तम। समीपं प्रस्थितं भ्रातुर्मैत्रेणेक्षस्व चक्षुषा ७ आश्रमं तस्य धर्मज्ञ धार्मिकस्य महात्मनः। आचक्ष्व कतमो मार्गः कियानिति च शंस मे ८ इति पृष्टस्तु भरतं भ्रातृदर्शनलालसम्। प्रत्युवाच महातेजा भरद्वाजो महातपाः ९ भरतार्धतृतीयेषु योजनेष्वजने वने। चित्रकूटगिरिस्तत्र रम्यनिर्दरकाननः १० उत्तरं पार्श्वमासाद्य तस्य मन्दाकिनी नदी। पुष्पितद्रुमसंछन्ना रम्य-

तदनंतर ती रात्र तेथें वास्तव्य केल्यावर परिवारासह आदरातिथ्य झालेला भरत रामप्राप्तीच्या इच्छेनें भरद्वाजमुनींकडे गेला १. तेव्हां अग्निहोत्र होम आटोपून बसलेले ते भरद्वाजमुनि हात जोडून आलेल्या त्या पुरुषश्रेष्ठ भरताला अवलोकन करून ह्मणाले २ " हे निष्पापा, ह्या आमच्या प्रदेशामध्यें तुझी रात्र सुखानें गेली काय ? आणि तुझे सर्व लोक आमच्या आतिथ्यानें तृप्त झाले काय ? हें तूं आह्मांला साग " ३. ह्याप्रमाणें त्यांनीं विचारिलें असतां आश्रमांतून बाहेर निघत असलेल्या त्या उत्कृष्ट तेजस्वी भरद्वाज ऋषींना हात जोडून व प्रणाम करून भरत ह्मणाला ४ " हे भगवन्, मी संपूर्ण सैन्य आणि वाहनें ह्यांसहवर्तमान सुखानें राहिलों आणि, हे भगवन्, सैन्यासहवर्तमान मी अत्यंत तृप्त झालों ५. दासांसहवर्तमानही आह्मी सर्व अत्यंत सुखानें येथें राहिलों; आमचे श्रम व ताप ह्यांचा परिहार झाला; अन्नपानांची आह्मांला समृद्धि झाली आणि आह्मांला वसतिस्थानही चांगलें मिळालें ६. आतां, हे भगवन्, मी आपली अनुज्ञा घेतों. हे ऋषिश्रेष्ठ, भ्रात्याचे समीप निघालेल्या माझ्याकडे आपण अधिकच कृपादृष्टीनें पहात जा ७ आणि, हे धर्मज्ञ, त्या महात्म्या धर्मनिष्ठ रामाच्या आश्रमाला कोणता मार्ग जातो व तो मार्ग किती दूर आहे हें आपण मला सांगा " ८. ह्याप्रमाणें भरतानें विचारिलें असतां ते महातेजस्वी व महातपस्वी भरद्वाजमुनि भ्रात्याच्या दर्शनाकरितां उत्सुक झालेल्या भरताला ह्मणाले ९ " हे भरता, येथून अडीच योजनांवर ( ह्मणजे दहा कोसांवर ) निर्जन वनामध्यें रम्य पाषाण आणि अरण्यें ह्यांनीं

पुष्पितकानना ११ अनन्तरं तत्सरितश्चित्रकूटं च पर्वतम्। तयोः पर्णकुटीं तात तत्र तौ वसतो ध्रुवम् १२ दक्षिणेन च मार्गेण सव्यदक्षिणमेव च। गजवाजिसमाकीर्णां वाहिनीं वाहिनीपते १३ वाहयस्व महाभाग ततो द्रक्ष्यसि राघवम्। प्रयाणमिति च श्रुत्वा राजराजस्य योषितः १४ हित्वा यानानि यानार्हा ब्राह्मणं पर्यवारयन्। वेपमाना कृशा दीना सह देव्या सुमित्रया १५ कौसल्या तत्र जग्राह कराभ्यां चरणौ मुनेः। असमृद्धेन कामेन सर्वलोकस्य गर्हिता १६ कैकेयी तत्र जग्राह चरणौ सव्यपत्रपा। तं प्रदक्षिणमागम्य भगवन्तं महामुनिम् १७ अदूराद्भरतस्यैव तस्थौ दीनमनास्तदा। तत्र पप्रच्छ भरतं भरद्वाजो महामुनिः १८ विशेषं ज्ञातुमिच्छामि मातॄणां तव राघव। एवमुक्तस्तु भरतो भरद्वाजेन धार्मिकः १९ उवाच

---

युक्त असलेला चित्रकूट पर्वत आहे १०. त्या पर्वताच्या उत्तर बाजूचें अवलंबन करून मंदाकिनी नदी वहात आहे. ती नदी प्रफुल्लित वृक्षांनीं आच्छादित झालेली असून मनोहर अशा प्रफुल्लित वनांनीं युक्त आहे ११. त्या नदीच्या पलीकडल्या बाजूला चित्रकूट पर्वत आणि, रामलक्ष्मणांची पर्णकुटिका हीं तुला दृष्टीं पडतील. त्या पर्वतावरच ते निःसंशय वास्तव्य करीत आहेत १२. तेव्हां यमुनेच्या दक्षिण तीरावरून जो मार्ग जातो त्या मार्गानें तूं जा आणि कांहींसा दूर गेल्यावर त्या मार्गाच्या दोन बाजूनें दोन रस्ते जातात, त्या दोन रस्त्यांपैकीं डाव्या अंगाला दक्षिणदिशेला जाणारा जो रस्ता आहे त्या रस्त्यानें, हे सेनाधिपते, गज व अश्व ह्यांनीं भरलेली तूं आपली सेना ने; म्हणजे, हे महाभाग्यवान् भरता, तुला रामाचें दर्शन होईल". ह्याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं सांगितल्यावर पुढें जाण्याची तयारी झाली हें ऐकतांक्षणीं राजाधिराज दशरथाच्या स्त्रिया १३,१४ रथामध्यें बसून जाण्याला योग्य असतांनाही आपआपले रथ सोडून ब्राह्मण भरद्वाज मुनींना नमस्कार करण्याकरितां त्यांच्या सभोंवतीं जमल्या. प्रथमतः कंपयुक्त, कृश व दीन अशा कौसल्येनें राजपत्नी सुमित्रेसहवर्तमान भरद्वाजमुनींचे पाय त्या आश्रमामध्यें आपल्या हातांनीं धरिले. तदनंतर मनोरथ परिपूर्ण न झालेल्या व सर्व लोकांच्या निंदेस पात्र झालेल्या १५,१६ कैकेयीनेंही लज्जित होऊन त्यांचे पाय धरिले आणि त्या भगवान् महर्षींना प्रदक्षिणा करून १७ ती मनामध्यें खिन्न झालेली कैकेयी भरताच्या जवळच उभी राहिली. तेव्हां "हे राघवा, तुझ्या मातांसंबंधानें विशेष हकीकत जाणण्याची माझी इच्छा आहे" म्हणून महर्षि भरद्वाज भरताला म्हणाले, व ह्याप्रमाणें भरद्वाज त्याला म्हणाले असतां तो धर्मनिष्ठ व संभाषणनिपुण भरत हात जोडून त्यांना म्हणाला "हे भगवन्, शोक आणि

प्राञ्जलिर्भूत्वा वाक्यं वचनकोविदः । यामिमां भगवन्दीनां शोकानशनकर्शिताम् २० पितुर्हि महिषीं देवीं देवतामिव पश्यसि । एषा तं पुरुषव्याघ्रं सिंहविक्रान्तगामिनम् २१ कौसल्या सुषुवे रामं धातारमदितिर्यथा । अस्या वामभुजं श्लिष्टा या सा तिष्ठति दुर्मनाः २२ इयं सुमित्रा दुःखार्ता देवी राज्ञश्च मध्यमा । कर्णिकारस्य शाखेव शीर्णपुष्पा वनान्तरे २३ एतस्यास्तौ सुतौ देव्याः कुमारौ देववर्णिनौ । उभौ लक्ष्मणशत्रुघ्नौ वीरौ सत्यपराक्रमौ २४ यस्याः कृते नरव्याघ्रौ जीवनाशमितो गतौ । राजा पुत्रविहीनश्च स्वर्गं दशरथो गतः २५ क्रोधनामकृतप्रज्ञां दृप्तां सुभगमानिनीम् । ऐश्वर्यकामां कैकेयीमनार्यामार्यरूपिणीम् २६ ममैतां मातरं विद्धि नृशंसां पापनिश्चयाम् । यतो मूलं हि पश्यामि व्यसनं महदात्मनः २७ इत्युक्त्वा नरशार्दूलो बाष्पगद्गदया गिरा । विनिःश्वस्य स ताम्राक्षः क्रुद्धो नाग इव श्वसन् २८ भरद्वाजो महर्षिस्तं ब्रुवन्तं भरतं तदा । प्रत्युवाच महाबुद्धिरिदं वचनमर्थवित् २९ न दोषेणावगन्तव्या

---

उपवास ह्यांच्या योगानें कृश व दीन अशी जी ही देवतेप्रमाणें असलेली माझ्या पित्याची पट्टाभिषिक्त स्त्री आपण पहात आहांत त्या ह्या कौसल्येनें सिंहाप्रमाणें पराक्रमदर्शक गतीनें युक्त असलेल्या पुरुषश्रेष्ठ रामाला—विष्णूला जन्म देणाऱ्या अदितीप्रमाणें—जन्म दिला आहे. तिच्या डाव्या हाताला चिकटून जी ही खिन्न होऊन उभी राहिली आहे १८,१९,२०,२१,२२ ती ही सुमित्रा राजाची मध्यम स्त्री होय. ही दुःखाकुल झाली असल्यामुळें पुष्पें गळून जाऊन वनांत पडलेल्या कर्णिकार वृक्षाच्या शाखेप्रमाणें दिसत आहे २३. वीर, अमोघ पराक्रमी आणि देवतुल्य असे ते उभयतां राजकुमार लक्ष्मण व शत्रुघ्न ह्याच राजपत्नीचे पुत्र होत २४. जिच्याकरितां पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मणांना मरणतुल्य विपत्ति प्राप्त झाली आणि जिच्याकरितां दशरथराजा पुत्रवियोग होऊन स्वर्गाला चालता झाला २५ ती ही क्रुद्ध, अविचारी, गर्विष्ठ, स्वतःला भाग्यवती मानणारी, ऐश्वर्यलुब्ध, सज्जनासारिखी परंतु दुर्जन, दुष्ट आणि पापबुद्धि माझी माता कैकेयी असें आपण समजा. हिच्याचमुळें स्वतःवर आलेलें संकट पहाण्याचा मला प्रसंग आला आहे " २६,२७. ह्याप्रमाणें बाष्पांच्या योगानें अस्पष्ट उच्चार होत असलेल्या वाणीनें भरद्वाजांना सांगितल्यावर डोळे लाल झालेला तो पुरुषश्रेष्ठ भरत क्रुद्ध होऊन सर्पाप्रमाणें सुस्कारे टाकूं लागला २८. तेव्हां तशाप्रकारें भाषण करणाऱ्या त्या भरताला महाबुद्धिमान् आणि रामानें वनवासांत जाण्याचा हेतु जाणणारे महर्षि भरद्वाज ह्मणाले २९ " हे भरता, तूं कैकेयीला

कैकेयी भरत त्वया । रामप्रव्राजनं ह्येतत्सुखोदर्कं भविष्यति ३० देवानां दानवानां च ऋषीणां भावितात्मनाम् । हितमेव भविष्यद्धि रामप्रव्राजनादिह ३१ अभिवाद्य तु संसिद्धः कृत्वा चैनं प्रदक्षिणम् । आमन्त्र्य भरतः सैन्यं युज्यतामिति चाब्रवीत् ३२ ततो वाजिरथान्युक्त्वा दिव्यान्हेमविभूषितान् । अध्यारोहत्प्रयाणार्थी बहून्बहुविधो जनः ३३ गजकन्या गजाश्चैव हेमकक्ष्याः पताकिनः । जीमूता इव घर्मान्ते सघोषाः संप्रतस्थिरे ३४ विविधान्यपि यानानि महान्ति च लघूनि च । प्रययुः सुमहार्हाणि पादैरपि पदातयः ३५ अथ यानप्रवेकैस्तु कौसल्याप्रमुखाः स्त्रियः । रामदर्शनकाङ्क्षिण्यः प्रययुर्मुदितास्तदा ३६ चन्द्रार्कतरुणाभासां नियुक्तां शिबिकां शुभाम् । आस्थाय प्रययौ श्रीमान्भरतः सपरिच्छदः ३७ सा प्रयाता महासेना गजवाजिसमाकुला । दक्षिणां दिशमावृत्य महामेघ इवोत्थितः ३८ वनानि च व्यतिक्रम्य जुष्टानि मृगपक्षिभिः । गङ्गायाः परवेलायां गिरिष्वथ नदीष्वपि ३९ सा संप्रहृष्टद्विपवाजियूथा वित्रासयन्ती मृगपक्षिसंघान् । महद्वनं तत्प्रविगाहमाना रराज सेना भरतस्य तत्र ४० [ ३४५१ ]

---

ह्याबद्दल दोष देऊं नको. ह्या रामाच्या वनवासांत जाण्याचा परिणाम सुखावह होईल ३०. कारण, ह्या रामाच्या वनवासांत जाण्यावरच देव, दानव आणि जितेंद्रिय ऋषि ह्यांचें हित अवलंबून आहे " ३१. ह्याप्रमाणें भरद्वाज मुनींनीं सांगितल्यानंतर भरत त्यांना अभिवंदन करून जाण्याला तयार झाला आणि प्रदक्षिणा करून व त्यांचा निरोप घेऊन ( सैन्याची तयारी करा ह्मणून ) त्यानें हुकूम दिला ३२. तेव्हां दिव्य आणि सुवर्णभूषित असे अश्वरथ तयार करून नानाप्रकारचे लोक तेथून प्रयाण करण्याकरितां त्यावर आरूढ झाले ३३; सुवर्णाच्या झुलि व पताका धारण केलेल्या हत्तिणी व हत्ती हे पर्जन्यकालीं गर्जना करणाऱ्या मेघाप्रमाणें गर्जना करीत करीत चालू लागले ३४; नानाप्रकारचे व मोठमोठे मूल्यवान् लहान मोठे रथ जाऊं लागले आणि पदाति पायांनींच चालूं लागले ३५; रामदर्शनाची इच्छा करणाऱ्या कौसल्याप्रभृति स्त्रिया आनंदानें उत्कृष्ट रथांत बसून जाऊं लागल्या ३६ आणि नुकताच उदय पावलेल्या चंद्रसूर्याप्रमाणें भासमान व वाहकांनीं युक्त अशा पालखींत बसून वैभवशाली भरत लवाजम्यासह चालला ३७. ह्याप्रमाणें आकाशामध्यें उत्पन्न झालेल्या मोठ्या मेघाप्रमाणें दक्षिण दिशा व्याप्त करून गजांनीं व अश्वांनीं गजबजलेली ती प्रचंड सेना चालती झाली ३८ आणि गंगेच्या पश्चिम तीरावर असलेली ती सेना पर्वतावरील व नदीतीरावरील वनें ओलांडून पुढें गेली ३९. सारांश, आनंदित गज व अश्व ह्यांच्या पागांनीं

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्विनवतितमः सर्गः ॥ ९२ ॥

तया महत्या यायिन्या ध्वजिन्या वनवासिनः । अर्दिता यूथपा मत्ताः सयूथाः संप्रदुद्रुवुः १ ऋक्षाः पृषतमुख्याश्च रुरवश्च समन्ततः । दृश्यन्ते वनवाटेषु गिरिष्वपि नदीषु च २ स संप्रतस्थे धर्मात्मा प्रीतो दशरथात्मजः । वृतो महत्या नादिन्या सेनया चतुरङ्गया ३ सागरौघनिभा सेना भरतस्य महात्मनः । महीं संछादयामास प्रावृषि द्यामिवाम्बुदः ४ तुरंगौघैरवतता वारणैश्च महाबलैः । अनालक्ष्याचिरं कालं तस्मिन्काले बभूव सा ५ स गत्वा दूरमध्वानं संपरिश्रान्तवाहनः । उवाच वचनं श्रीमान्वसिष्ठं मन्त्रिणां वरम् ६ यादृशं लक्ष्यते रूपं यथा चैव मया श्रुतम् । व्यक्तं प्राप्ताः स्म तं देशं भरद्वाजो यमब्रवीत् ७ अयं गिरिश्चित्रकूटस्तथा मन्दाकिनी नदी । एतत्प्रकाशते दूरान्नीलमेघनिभं वनम् ८ गिरेः सानूनि रम्याणि चित्रकूटस्य संप्रति । वारणैरवमृद्यन्ते मामकैः

---

युक्त व पशुपक्ष्यांच्या समुदायांना घाबरून सोडणारी ती भरताची सेना त्या महावनामध्यें प्रविष्ट होतांना शोभूं लागली ४०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं ब्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥९२ ॥

ती प्रचंड सेना जाऊं लागली असतां वनचर आणि आपआपल्या कळपांतील पुढारी त्रस्त होऊन व घाबरून जाऊन आपआपल्या कळपासहवर्तमान धाऊं लागले १ आणि अस्वलें, मुख्य मुख्य पृषद संज्ञक मृग आणि रुरु संज्ञक मृग वनप्रदेश, पर्वत आणि नद्या ह्यांचे ठिकाणीं त्रस्त झालेले दृष्टोत्पत्तीस येऊं लागले २, व ह्याप्रमाणें मोठ्या चतुरंग सेनेनें परिवेष्टित झालेला तो धर्मनिष्ठ दशरथपुत्र भरत प्रसन्न होऊन जाऊं लागला ३. महात्म्या भरताच्या त्या सागरतुल्य सेनेनें पर्जन्यकालीं आकाश व्याप्त करणाऱ्या मेघाप्रमाणें त्या प्रदेशांतील पृथ्वी व्याप्त करून टाकिली ४ आणि अश्वसमुदाय व महाबलाढ्य गज ह्यांच्या योगानें ती सेना थोडा वेळपर्यंत त्यावेळीं अदृश्य झाली ५. तेव्हां बराच दूर मार्ग आतिक्रमण केल्यावर वाहनें श्रांत झालेला तो वैभवशाली भरत मंत्रिश्रेष्ठ वसिष्ठांना ह्मणाला ६ " भरद्वाज मुनींनीं जो प्रदेश जशा प्रकारचा सांगितला आहे आणि जशाप्रकारें आह्मीं ऐकिलें आहे तशाचप्रकारचें ह्या प्रदेशाचें रूप दिसत आहे. ह्यावरून त्या प्रदेशावर आपण आलों हें अगदीं स्पष्ट होत आहे ७. हा चित्रकूट पर्वत असून त्याचप्रमाणें ही मन्दाकिनी नदी आहे आणि हें नीलमेघाप्रमाणें असलेलें वन दुरून दिसत आहे ८. सांप्रत माझे पर्वततुल्य

पर्वतोपमैः ९ मुञ्चन्ति कुसुमान्येते नगाः पर्वतसानुषु। नीला इवातपापाये तोयं तोयधरा घनाः १० किंनराचरितं देशं पश्य शत्रुघ्न पर्वते ॥ हयैः समन्तादाकीर्णं मकरैरिव सागरम् ११ एते मृगगणा भान्ति शीघ्रवेगाः प्रचोदिताः। वायुप्रविद्धाः शरदि मेघजाला इवाम्बरे १२ कुर्वन्ति कुसुमापीडाञ्शिरःसु सुरभीनमी। मेघप्रकाशैः फलकैर्दाक्षिणात्या नरा यथा १३ निष्कूजमिव भूत्वेदं वनं घोरप्रदर्शनम् । अयोध्येव जनाकीर्णा संप्रति प्रतिभाति मे १४ खुरैरुदीरितो रेणुर्दिवं प्रच्छाद्य तिष्ठति। तं वहत्यनिलः शीघ्रं कुर्वन्निव मम प्रियम् १५ स्यन्दनांस्तुरगोपेतान्सूतमुख्यैरधिष्ठितान् । एतान्संपततः शीघ्रं पश्य शत्रुघ्न कानने १६ एतान्वित्रासितान्पश्य बर्हिणः प्रियदर्शनान्। एवमापततः शैलमधिवासं पतत्रिणाम् १७ अतिमात्रमयं देशो मनोज्ञः प्रतिभाति मे। तापसानां निवासोऽयं व्यक्तं स्वर्गपथोऽनघ १८ मृगा मृगीभिः सहिता बहवः पृषता वने । मनोज्ञरूपा लक्ष्यन्ते कुसुमैरिव चित्रिताः १९

गज चित्रकूट पर्वताचीं रम्य शिखरें तुडवीत चालले आहेत.आणि उन्हाळा संपल्यानंतर उदक धारण करणारे नील मेघ ज्याप्रमाणें उदकाची वृष्टि करि त त्याचप्रमाणें हे वृक्ष पर्वतशिखरांवर पुष्पांची वृष्टि करीत आहेत २०. हे शत्रुघ्ना, मगरांनीं व्याप्त झालेल्या सागराप्रमाणें अश्वांनीं सभोंवतीं गजबजून गेलेला व किन्नरांनीं आक्रमण केलेला हा प्रदेश पर्वतावर अवलोकन कर ११. वायूनें हांकून लाविलेले मेघसमूह ज्याप्रमाणें शरदृतूमध्यें आकाशांत भासूं लागतात त्याचप्रमाणें सैनिकांनीं पळवून लाविलेले ते महावेगवान् पशुसमुदाय दिसत आहेत १२; मेघतुल्य ढालांनीं युक्त असलेले हे सैनिक दक्षिणकडील लोकांप्रमाणें फुलांचे सुवासिक तुरे मस्तकांत घालीत आहेत १३; पूर्वी ध्वनिरहित आणि ह्मणूनच दिसण्यांतही भयंकर असलेलें हें वन सांप्रत लोकांनीं भरलेल्या अयोध्येप्रमाणें गजबजलेलें दिसत आहे १४; अश्वांच्या खुरांनीं उडालेली धूळ आकाश व्याप्त करून राहिली आहे आणि माझें प्रिय करण्याकरितांच की काय वायु तिला सत्वर वाहून नेत आहे १५. हे शत्रुघ्ना, अश्वांनीं युक्त व मुख्य मुख्य सारथ्यांनीं अधिष्ठित असे हे रथ वनांतून सत्वर चाललेले तूं अवलोकन कर १६ आणि ह्याप्रमाणें ज्यांचें दर्शन प्रिय आहे असे हे मयूरपक्षी त्रस्त होऊन पक्ष्यांचें निवासस्थान जो पर्वत त्यावर उडून जात आहेत ते पहा १७. हा प्रदेश मला फारच मनोहर दिसत आहे. तस्मात्, हे निष्पापा शत्रुघ्ना, हा स्वर्गतुल्य प्रदेश तापसांचें निवासस्थान असल्याचें स्पष्ट होत आहे १८. मृगीसहवर्तमान असलेले हे पृषदसंज्ञक मृग ( शरीरावरील बिंदूंच्या योगानें ) नानाप्रकारच्या पुष्पांनीं शृंगारिल्यासारखे वनामध्यें मनोहर

साधु सैन्याः प्रतिष्ठन्तां विचिन्वन्तु च काननम् । यथा तौ पुरुषव्याघ्रौ दृश्येते रामलक्ष्मणौ २० भरतस्य वचः श्रुत्वा पुरुषाः शस्त्रपाणयः । विविशुस्तद्वनं शूरा धूमाग्रं ददृशुस्ततः २१ ते समालोक्य धूमाग्रमूचुर्भरतमागताः । नामनुष्ये भवत्यग्निर्व्यक्तमत्रैव राघवौ २२ अथ नात्र नरव्याघ्रौ राजपुत्रौ परंतपौ । अन्ये रामोपमाः सन्ति व्यक्तमत्र तपस्विनः २३ तच्छ्रुत्वा भरतस्तेषां वचनं साधुसंमतम् । सैन्यानुवाच सर्वांस्तानमित्रबलमर्दनः २४ यत्ता भवन्तस्तिष्ठन्तु नेतो गन्तव्यमग्रतः । अहमेव गमिष्यामि सुमन्त्रो धृतिरेव च २५ एवमुक्तास्ततः सैन्यास्तत्र तस्थुः समन्ततः । भरतो यत्र धूमाग्रं तत्र दृष्टिं समादधत् २६ व्यवस्थिता या भरतेन सा चमूर्निरीक्षमाणापि च भूमिमग्रतः । बभूव हृष्टा न चिरेण जानती प्रियस्य रामस्य समागमं तदा २७ [ ३४७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्रिनवतितमः सर्गः ॥ ९३ ॥

दीर्घकालोषितस्तस्मिन्गिरौ गिरिवरप्रियः । वैदेह्याः प्रियमाकाङ्क्षन्स्वं

---

दिसत आहेत १९. तस्मात्, आतां सैनिकांनां खुशाल पुढें जाऊं द्या आणि ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण दृष्टोत्पत्तीस येतील अशारीतीनें वन शोधूं द्या " २०. हें भरताचें भाषण श्रवण केल्यावर हातांमध्यें शस्त्र घेतलेले शूर पुरुष त्या वनामध्यें प्रविष्ट झाले असतां त्यांना धूर दृष्टीं पडला २१. तेव्हां तो धूर अवलोकन करून ते भरतापाशीं आले आणि त्याला म्हणाले " (कोठें वणवा लागल्याचें जर प्रत्यक्ष दृष्टोत्पत्तीस येत नाहीं तर) निर्जनप्रदेशामध्यें अग्नि असण्याचा संभवच नाहीं. ह्यावरून ह्याच ठिकाणीं रघुवंशज रामलक्ष्मण असल्याचें स्पष्ट होत आहे २२. अथवा ते पुरुषश्रेष्ठ शत्रुतापन राजकुमार जर येथें नसतील तर ह्या ठिकाणीं रामासारिखे इतर तपस्वी असल्याचें उघड होत आहे " २३. हें त्यांचें सज्जनांना संमत होणारें भाषण श्रवण करून शत्रुसैन्याचें मर्दन करणारा भरत त्या सर्व सैनिकांना ह्मणाला २४ " तुह्मी येथें सज्ज होऊन रहा; येथून पुढें जाऊं नका. सुमंत्र व धृति ह्यांना बरोबर घेऊन मीच तिकडे जातों " २५. ह्याप्रमाणें भरतानें सांगितल्यावर ते सैनिक तेथेंच सभोंवतीं उभे राहिले आणि जिकडे तो धूम दिसत होता तिकडे भरतानें दृष्टि दिली २६. असो. भरतानें उभी केलेली ती सेना निवाराकरितां पुढें भूमी पाहूं लागली आणि प्रिय रामाशीं भरताची भेट झाल्याचें समजून आल्यामुळें ती लवकरच आनंदित झाली २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं ञ्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९३ ॥

उत्कृष्ट पर्वतावर वास्तव्य करणें ज्याला प्रिय आहे आणि ज्याला त्या चित्रकूटपर्वतावर

च चित्तं विलोभयन् १ अथ दाशरथिश्चित्रं चित्रकूटमदर्शयत्। भार्याममरसंकाशः शचीमिव पुरंदरः २ न राज्यभ्रंशनं भद्रे न सुहृद्भिर्विनाभवः। मनो मे बाधते दृष्ट्वा रमणीयमिमं गिरिम् ३ पश्येममचलं भद्रे नानाद्विजगणायुतम्। शिखरैः खमिवोद्विद्धैर्धातुमद्भिर्विभूषितम् ४ केचिद्रजतसंकाशाः केचित्क्षतजसंनिभाः। पीतमाञ्जिष्ठवर्णाश्च केचिन्मणिवरप्रभाः ५ पुष्पार्ककेतकाभाश्च केचिज्ज्योतीरसप्रभाः। विराजन्तेचलेन्द्रस्य देशा धातुविभूषिताः ६ नानामृगगणैर्द्वीपितरक्ष्वृक्षगणैर्वृतः। अदुष्टै-

---

राहून बरेच दिवस झाले आहेत असा तो देवतुल्य दशरथपुत्र राम सीतेचा संतोष करण्याची इच्छा धरून स्वतःच्या व तिच्या चित्ताला करमणूक करण्याच्या उद्देशानें त्या आपल्या भार्येला, इंद्र ज्याप्रमाणें इंद्राणीला दर्शवितो त्याप्रमाणें, तो अद्भुत चित्रकूट पर्वत दाखवूं लागला १,२. (तो ह्मणाला) "हा रमणीय पर्वत अवलोकन करून, हे कल्याणि, राज्यभ्रंश आणि सुहृदांचा वियोग ह्यांच्या योगानें माझ्या मनाला पीडा होत नाहीं ३. हे भद्रे, धातूंनीं युक्त असलेल्या गगनचुंबित शिखरांनीं विभूषित आणि नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं संपन्न असलेला हा पर्वत पहा ४. धातूंनीं विभूषित झालेले ह्या श्रेष्ठ पर्वतावरील प्रदेश कांहीं रुप्यासारिखे, कांहीं रक्तासारिखे, कांहीं पीतवर्ण व मांजिष्ठवर्ण, कांहीं उत्कृष्ट रत्नांच्या प्रभेनें युक्त, कांहीं पुष्पराग, स्फटिक आणि केतक पुष्पें ह्यांसारिखे आणि कांहीं नक्षत्रें व पारद ह्यांसारिखे दिसत आहेत ५,६. नानाप्रकारचे निरुपद्रवी मृगगण आणि व्याघ्र, तरस व अस्वलें ह्यांचे समुदाय ह्यांच्या योगानें व्याप्त असलेला आणि अनेक पक्ष्यांनीं गजबजून गेलेला हा पर्वत सुशोभित

---

१ मूळामध्यें "रस" हा शब्द आहे व तो धातूंनीं विभूषित झालेले पर्वतावरील प्रदेश कसे दिसतात हें वर्णन चाललें असतांना आलेला आहे, तेव्हां टीकाकारांच्या मताप्रमाणें त्याचा अर्थ पारदरस आहे. दुसरा होणें शक्य नाहीं तेव्हां हजारों वर्षांपासून प्रसिद्ध असलेल्या अत्यंत प्राचीन रामायण ग्रंथांतील हें पारदाचें नांव, प्राचीन ग्रंथांत आढळत नाहीं असें ह्मणणाऱ्यांनीं, लक्ष्यांत ठेवावें.

२ व्याघ्रादि श्वापदांना ह्या ठिकाणीं "अदुष्टैः" ह्मणजे हिंसादिदोषरहित असें जें विशेषण दिलें आहे तें योग्यच आहे. कारण, ज्या प्रदेशामध्यें अहिंसासिद्धि प्राप्त झालेले तपस्वी असतात त्या प्रदेशांतील प्राण्यांचे ठिकाणीं हिंसादोष रहात नाहीं आणि परस्परांतील वैरभाव नाहींसा होतो असें पातंजल योगशास्त्रामध्यें सांगितलें आहे. भगवद्भक्त तुकाराम महाराजांनींही आपल्या एका अभंगांत हें दर्शविलें आहे. कूर्मपुराणामध्यें "कर्मणा मनसा वाचा सर्व भूतेषु सर्वदा। अक्लेशजननं प्रोक्तं त्वहिंसा परमर्षिभिः" ह्या श्लोकांत अहिंसेचें लक्षण सांगितलें असून त्याचा अर्थ—काया, वाचा आणि मन ह्यांपैकीं कशानेंही कोणत्याच प्राण्याला कधींही पीडा न देणें ह्याला महर्षींनीं अहिंसा असें ह्मटलें आहे—असा आहे.

भात्ययं शैलो बहुपक्षिसमाकुलः ७ आम्रजम्ब्वसनैर्लोध्रैः प्रियालैः पनसैर्धवैः। अङ्कोलैर्भव्यतिनिशैर्बिल्वतिन्दुकवेणुभिः ८ काश्मर्यारिष्टवरणैर्मधूकैस्तिलकैरपि। बदर्यामलकैर्नीपैर्वेत्रधन्वनबीजकैः ९ पुष्पवद्भिः फलोपेतैश्छायावद्भिर्मनोरमैः। एवमादिभिराकीर्णः श्रियं पुष्यत्ययं गिरिः १० शैलप्रस्थेषु रम्येषु पश्येमान्कामहर्षणान्। किंनरान्द्वन्द्वशो भद्रे रममाणान्मनस्विनः ११ शाखावसक्तान्खड्गांश्च प्रवराण्यम्बराणि च। पश्य विद्याधरस्त्रीणां क्रीडोद्देशान्मनोरमान् १२ जलप्रपातैरुद्भेदैर्निष्पन्दैश्च क्वचित्क्वचित्। स्रवद्भिर्भात्ययं शैलः स्रवन्मद इवः द्विपः १३ गुहासमीरणो गन्धान्नानापुष्पभवान्बहून्। घ्राणतर्पणमभ्येत्य कं नरं न प्रहर्षयेत् १४ यदीह शरदोनेकास्त्वया सार्धमनिन्दिते। लक्ष्मणेन च वत्स्यामि न मां शोकः प्रधर्षति १५ बहुपुष्पफले रम्ये नानाद्विजगणायुते। विचित्रशिखरे ह्यस्मिन्रतवानस्मि भामिनि १६ अनेन वनवासेन मम प्राप्तं फलद्वयम्। पितुश्चानृण्यता धर्मे भरतस्य प्रियं तथा १७ वैदेहि रमसे कच्चि-

---

दिसत आहे ७. आंबा, जांभळी, आसणा, लोध्र, खिरणी, फणस, धव, अक्रोड, भव्य तिवस, बिल्व, टेंबुर्णी, कळक ८, शिवणी, निंबे, वायवरणा, मोहा, तिळवा, बोरी, आंवळी, कळंब, वेत, इंद्रयव व ईडलिंबू ९ इत्यादि प्रकारच्या फुलें, पुष्पें आणि छाया ह्यांनीं युक्त असलेल्या मनोहर वृक्षांनीं व्याप्त झालेला हा पर्वत शोभा देत आहे १०. रम्य पर्वतशिखरावर असलेल्या ह्या कामोद्दीपक प्रदेशांना व त्या प्रदेशावर जोडप्यांनीं रममाण होत असलेल्या विचारी किन्नरांना, हे कल्याणि, तूं अवलोकन कर ११. वृक्ष शाखांत लटकलेले किन्नरांचें खड्ग विद्याधरांच्या स्त्रियांचे मनोहर क्रीडाप्रदेश आणि त्यांचीं उत्कृष्ट वस्त्रें तूं अवलोकन कर १२. उच्च प्रदेशांवरून वहात येणारे धबधबे व भूमि फोडून वहात जाणारे झरे ह्यांच्या योगानें हा पर्वत मलस्राव चाललेल्या गजाप्रमाणें दिसत आहे १३. गुहेच्या द्वारांतून येणारा, नानाप्रकारच्या पुष्पांचे अनेक गंध वाहून नेणारा आणि घ्राणेंद्रिय तृप्त करणारा हा वायू समीप आला असतां कोणत्या बरें पुरुषाला हर्षयुक्त करणार नाहीं ? १४. हे निर्दोष स्त्रिये, ह्या ठिकाणीं तूं आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान जरी मी पुष्कळ वर्षे राहिलों तरी मला दुःख होणार नाहीं १५. हे स्त्रिये, विपुल पुष्पें व फलें, नानाप्रकारचे पक्षिगण आणि अद्भुत शिखरें ह्यांनीं युक्त असलेल्या ह्या पर्वतावर माझें चित्तरंजन होत आहे १६. ह्या वनवासाच्या योगानें मला दोन फलें प्राप्त झालीं. सत्यपरिपालनस्वरूप धर्मासंबंधानें पित्याच्या ऋणापासून मुक्तता हें एक व भरताचा मनोरथ परिपूर्ण होणें हें दुसरें १७. हे वैदेहि, काया, वाचा आणि

चित्रकूटे मया सह । पश्यन्ती विविधान्भावान्मनोवाक्कायसंमतान् १८ इदमेवामृतं प्राहू राज्ञि राजर्षयः परे । वनवासं भवार्थाय प्रेत्य मे प्रपितामहाः १९ शिलाः शैलस्य शोभन्ते विशालाः शतशोभितः । बहुला बहुलैर्वर्णैर्नीलपीतसितारुणैः २० निशि भान्त्यचलेन्द्रस्य हुताशनशिखा इव । ओषध्यः स्वप्रभालक्ष्म्या भ्राजमानाः सहस्रशः २१ केचित्क्षयनिभा देशाः केचिदुद्यानसंनिभाः । केचिदेकशिला भान्ति पर्वतस्यास्य भामिनि २२ भित्त्वेव वसुधां भाति चित्रकूटः समुत्थितः । चित्रकूटस्य कूटोयं दृश्यते सर्वतः शुभः २३ कुष्ठस्थगरपुंनागभूर्जपत्रोत्तरच्छदान् । कामिनां स्वास्तरान्पश्य कुशेशयदलायुतान् २४ मृदिताश्चापविद्धाश्च दृश्यन्ते कमलस्रजः । कामिभिर्वनिते पश्य फलानि विविधानि च २५ वस्वौकसारां नलिनीमतीत्यैवोत्तरान्कुरून् । पर्वतश्चित्रकूटोसौ बहुमूलफलोदकः २६ इमं तु कालं वनिते विजह्रिवां-

---

मन ह्यांना संमत असे अनेक प्रकार अवलोकन करून चित्रकूट पर्वतावर माझ्यासहवर्तमान दिवस काढणें तुला चांगलें वाटत आहे काय ? १८. हे राजपत्नि, माझे पूर्वज जे प्राचीन राजर्षि त्यांनीं, वनांत रहाणें हेंच मोक्षसाधन ह्मटलें आहे. कारण, वनामध्यें ( विधिपूर्वक ) वास्तव्य करणें हें देहत्यागानंतर हिरण्यगर्भस्थान प्राप्त होण्याचें साधन आहे असें ह्मणतात १९. असो. नील, पीत, श्वेत आणि अरुण ह्या वर्णांच्या योगानें पर्वताच्या शेंकडों असंख्य विशाल शिला शोभत आहेत २० आणि ह्या श्रेष्ठ पर्वतावर झळकत असलेल्या हजारों औषधि आपल्या तेजःसंपत्तीनें अग्नीच्या ज्वालाप्रमाणें भासत आहेत २१. हे स्त्रिये, ह्या पर्वतावरील कांहीं प्रदेश गृहासारिखे दिसत असून कांहीं बागांसारिखे दिसत आहेत आणि कांहीं प्रदेश तर पुष्कळ लोकांना रहातां येईल अशा एकेकाच शिलेनें युक्त असलेले दिसत आहेत २२. हा चित्रकूट पर्वत पृथ्वी फोडून बाहेर निघाल्यासारिखा दिसत आहे आणि चित्रकूट पर्वताचें हें शिखर सर्व बाजूंनीं शुभ दिसत आहे २३. कुष्ठ, स्थगर, पुन्नाग आणि भूर्जपत्र ह्या वृक्षांचीं पानें हींच ज्यावरील आस्तरणें आहेत आणि पद्मदलांनीं ज्या युक्त आहेत अशा विषयी जनांच्या उत्कृष्ट शय्या तूं अवलोकन कर २४. हे स्त्रिये, कमलपुष्पांच्या माला ह्या ठिकाणीं चुंगळून जाऊन इकडे तिकडे उडवलेल्या दिसत आहेत आणि त्याचप्रमाणें नानाप्रकारचीं फळें विषयी जनांनीं उपभोग घेऊन टाकिलेलीं दिसत आहेत २५. कुबेरनगरी व इंद्रनगरी ह्यांना व उत्तर कुरुदेशाला मागें टाकून विपुल मुळें, फळें व उदक ह्यांनीं युक्त असलेला हा चित्रकूट पर्वत शोभत आहे २६. हे स्त्रिये सीते, श्रेष्ठ अशा स्वकीय

स्त्वया च सीते सह लक्ष्मणेन । रतिं प्रपत्स्ये कुलधर्मवर्धिनीं सतां पथि स्वैर्नियमैः परैः स्थितः २७ [३५०५] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुर्नवतितमः सर्गः ॥ ९४ ॥

अथ शैलाद्विनिष्क्रम्य मैथिलीं कोशलेश्वरः । अदर्शयच्छुभजलां रम्यां मन्दाकिनीं नदीम् १ अब्रवीच्च वरारोहां चन्द्रचारुनिभाननाम् । विदेहराजस्य सुतां रामो राजीवलोचनः २ विचित्रपुलिनां रम्यां हंससारससेविताम् । कुसुमैरुपसंपन्नां पश्य मन्दाकिनीं नदीम् ३ नानाविधैस्तीररुहैर्वृतां पुष्पफलद्रुमैः । राजन्तींराजराजस्य नलिनीमिव सर्वतः ४ मृगयूथनिपीतानि कलुषाम्भांसि सांप्रतम् । तीर्थानि रमणीयानि रतिं संजनयन्ति मे ५ जटाजिनधराः काले वल्कलोत्तरवाससः । ऋषयस्त्ववगाहन्ते नदीं मन्दाकिनीं प्रिये ६ आदित्यमुपतिष्ठन्ते नियमादूर्ध्वबाहवः । एते परे विशालाक्षि मुनयः संशितव्रताः ७ मारुतोद्धूतशिखरैः प्रनृत्त इव पर्वतः । पादपैः पुष्पपत्राणि सृजद्भिरभितो नदीम् ८ क्वचि-

---

नियमांनीं सज्जनांच्या मार्गाचें अवलंबन करून राहिलेला हा मी चतुर्दशसंवत्सरात्मक काल लोटेपर्यंत तूं आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान जर येथें विहार करून राहिलों तर कुलधर्म वृद्धिंगत करणारें असें सौख्य मला प्राप्त होईल" २७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं चौऱ्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९४ ॥

तदनंतर पर्वतावरून निघून तो कोशलाधिपति राम शुभ जलानें युक्त व रम्य अशी मंदाकिनी नदी सीतेला दाखवूं लागला १ आणि तो कमलनयन राम चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त अशा त्या सुंदरी विदेहराजकन्येला ह्मणाला २ " हंस आणि सारस पक्ष्यांनीं जिचा आश्रय केलेला आहे आणि पुष्पांनीं व आश्चर्यकारक वाळवंटांनीं जी युक्त आहे अशी ही रम्य मंदाकिनी नदी तूं अवलोकन कर ३. तीरावरील नानाप्रकारच्या प्रफुल्लित व फलसंपन्न वृक्षांनीं ही व्याप्त झाली असल्यामुळें कुबेराच्या सौगंधिक सरोवराप्रमाणें दिसत आहे ४. मृगांचे कळप तहान भागवून गेल्यामुळें त्यांतील उदक खडूळ झालें आहे अशीं हीं रमणीय तीर्थें माझे ठिकाणीं आनंद उत्पन्न करीत आहेत ५. हे प्रिये, जटा व अजिनें धारण करून वल्कलें परिधान केलेले ऋषि वेळेवर मंदाकिनी नदीमध्यें स्नान करीत आहेत ६ आणि, हे विशालनयने, निर्मल आचरणानें युक्त असलेले हे दुसरे ऋषि हात वर करून सूर्याचें उपस्थान करीत आहेत ७. वायूच्या योगानें ज्यांचीं अग्रें हललीं आहेत आणि ह्मणूनच

न्मणिनिकाशोदां क्वचित्पुलिनशालिनीम् । क्वचित्सिद्धजनाकीर्णां पश्य मन्दाकिनीं नदीम् ९ निर्धूतान्वायुना पश्य विततान्पुष्पसंचयान् । पोप्लूयमानानपरान्पश्य त्वं तनुमध्यमे १० पश्यैतद्वल्गुवचसो रथाङ्गाह्वयना द्विजाः । अधिरोहन्ति कल्याणि निष्कूजन्तः शुभा गिरः ११ दर्शनं चित्रकूटस्य मन्दाकिन्याश्च शोभने । अधिकं पुरवासाच्च मन्ये तव च दर्शनात् १२ विधूतकल्मषैः सिद्धैस्तपोदमशमान्वितैः । नित्यविक्षोभितजलां विगाहस्व मया सह १३ सखीवच्च विगाहस्व सीते मन्दाकिनीं नदीम् । कमलान्यवमज्जन्ती पुष्कराणि च भामिनि १४ त्वं पौरजनवद्व्यालानयोध्यामिव पर्वतम् । मन्यस्व वनिते नित्यं सरयूवदिमां नदीम् १५ लक्ष्मणश्चैव धर्मात्मा मन्निदेशे व्यवस्थितः । त्वं चानुकूला वैदेहि प्रीतिं जनयती मम १६ उपस्पृशंस्त्रिषवणं मधुमूलफलाशनः । नायोध्यायै न राज्याय स्पृहये च त्वया सह १७ इमां हि रम्यां गजयूथलोडितां निपी-

ज्यांच्यापासून पुष्पें व पत्रें गळत आहेत अशा नदीच्या दोहों बाजूला असलेल्या वृक्षांच्या योगानें हा पर्वत जसा कांहीं नृत्य करण्याकरितांच प्रवृत्त झाल्यासारिखा दिसत आहे ८. कोठें कोठें मोत्याप्रमाणें असलेल्या उदकानें, कोठें कोठें वाळवंटांनीं आणि कोठें कोठें इकडे तिकडे बसलेल्या सिद्ध जनांनीं युक्त असलेली ही मंदाकिनी नदी तूं अवलोकन कर ९. वायूनें उडून आलेले एक आणि उदकामध्यें पुन्हां पुन्हां बुडत असलेले दुसरे पुष्पसमुदाय, हे कृशोदरि, तूं अवलोकन कर १०. हे कल्याणि, पहा; मनोहर शब्द करणारे आणि शुभ शब्द उच्चारीत असलेले हे चक्रवाक पक्षी वाळवंटावर बसत आहेत ११. हे कल्याणि, चित्रकूट पर्वत आणि मंदाकिनी नदी ह्यांचें दर्शन अयोध्या नगरींतील वास्तव्यापेक्षांच नव्हे परंतु, तुझ्या दर्शनापेक्षांही अधिक सुखावह आहे असें मला वाटतें १२. पापक्षालन झालेल्या आणि तप, दम व शम ह्यांनीं युक्त असलेल्या सिद्धांनीं जिचें उदक नेहमीं क्षुब्ध आलेलें असतें त्या मंदाकिनी नदीमध्यें तूं माझ्याबरोबर स्नान कर १३. हे सीते प्रिये, मंदाकिनी तुझी सखी आहे असें समजून आरक्तवर्ण व श्वेतवर्ण कमलें पलीकडे करीत करीत तूं ह्या मंदाकिनी नदीमध्यें स्नान कर १४. हे प्रिये, तूं येथील अजगरांना नागरिक लोकांप्रमाणें समज, चित्रकूट पर्वताला अयोध्येप्रमाणें लेख आणि ह्या मंदाकिनी नदीला नेहमीं सरयूप्रमाणें मान १५. धर्मात्मा लक्ष्मण माझ्या आज्ञेंत आहे; हे वैदेहि, तूं मला अनुकूल असून, माझे ठिकाणीं आनंद उत्पन्न करीत आहेस १६ आणि त्रिकाल स्नान करून स्वादिष्ट मुळें व फळें भक्षण करून तुझ्यासहवर्तमान मी रहात आहें

ततोयां गजसिंहवानरैः । सुपुष्पितां पुष्पभरैरलंकृतां न सोस्ति यः स्यान्न गतक्लमः सुखी १८ इतीव रामो बहुसंगतं वचः प्रियासहायः सरितं प्रति ब्रुवन् । चचार रम्यं नयनाञ्जनप्रभं स चित्रकूटं रघुवंशवर्धनः १९ [३५२४]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे पञ्चनवतितमः सर्गः ॥ ९५ ॥

रामस्तु नलिनीं रम्यां चित्रकूटं च पर्वतम् । उत्तरे तु गिरेः पादे चित्रकूटस्य राघवः १ ददर्श कन्दरं रम्यं शिलाधातुसमन्वितम् । सुखप्रसेकैस्तरुभिः पुष्पभारावलम्बिभिः २ संवृतं च रहस्यं च मत्तद्विजगणायुतम् । तद्दृष्ट्वा सर्वभूतानां मनोदृष्टिहरं वनम् ३ उवाच सीतांकाकुत्स्थो वनदर्शनविस्मितः । वैदेहि रमते चक्षुस्तवास्मिन्गिरिकंदरे ४ परिश्रमविघातार्थं साधु तावदिहास्यताम् । त्वदर्थमिह विन्यस्ता त्वियं श्लक्ष्णसमा शिला ५ यस्याः पार्श्वे तरुः पुष्पैः प्रविष्ट इव केसरैः । राघवेणैवमुक्ता

---

ह्यामुळें अयोध्येची अथवा राज्याचीही मला इच्छा होत नाहीं १७. गज, सिंह आणि वानर ह्यांनीं जिच्या उदकाचें पान केलें आहे, हत्तीच्या कळपांनीं जिला उधासून टाकिलेली आहे आणि पुष्पराशींनीं व प्रफुल्लित वनप्रदेशांनीं जी युक्त आहे अशा ह्या रम्य मंदाकिनी नदीमध्यें स्नान करून श्रमपरिहारपूर्वक सुखी न झालेला असा कोणीही पुरुष नाहीं " १८. ह्याप्रमाणें प्रियारूप मित्रानें युक्त असलेला रघुवंशवर्धक राम मंदाकिनी नदीसंबंधानें बरेच सुसंगत भाषण करीत करीत कज्जलतुल्य, नीलवर्ण व रम्य अशा चित्रकूट पर्वतावर संचार करूं लागला १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं पंचाणवावा सर्ग समाप्त झाला ॥९५॥

* चित्रकूटपर्वत आणि कुबेराच्या सौगंधिक सरोवराप्रमाणें असणारी रम्य मंदाकिनी नदी सीतेला दाखविल्यानंतर रघुवंशज रामानें चित्रकूटपर्वताच्या पायथ्याशीं १ असलेली एक गुहा अवलोकन केली. ती गुहा मनोहर असून शिलांनीं व धातूंनीं युक्त होती आणि सुखावह मकरंदाचा स्राव करणाऱ्या व पुष्पभारांनीं वाकलेल्या वृक्षांनीं ती २ व्याप्त झालेली होती आणि अगदीं एकांत प्रदेशामध्यें असून मत्त पक्षिगणांनीं ती युक्त होती. तेव्हां सर्व भूतांच्या मनाला व दृष्टीला वेधून टाकणारा तो वनप्रदेश अवलोकन करून ३ त्याच्या अवलोकनानें विस्मित झालेला तो ककुत्स्थकुलोत्पन्न राम सीतेला ह्मणाला " हे वैदेहि, गिरिकंदराचे ठिकाणीं तुझी दृष्टि रमत आहे काय ? ४. रमत असेल तर श्रमपरिहार होण्याकरितां तूं आधीं खुशाल येथें बैस तर खरी.

---

* ह्या सर्गावर टीका नाहीं व कांहीं लोक ह्या सर्ग प्रक्षिप्त आहे असेंही ह्मणतात.

सा सीता प्रकृतिदक्षिणा ६ उवाच प्रणयस्निग्धमिदं श्लक्ष्णतरं वचः। अवश्यकार्यं वचनं तव मे रघुनन्दन ७ बहुशो भ्रमितश्चाद्य तव चैवं मनोरथः। एवमुक्त्वा वरारोहा शिलां तामुपसर्प ह ८ सह भर्त्रानवद्याङ्गी-रन्तुकामा मनस्विनी। तामेवं ब्रुवतीं सीतां रामो वचनमब्रवीत् ९ रम्यं पश्यसि भूतार्थं वनं पुष्पितपादपम्। पश्य देवि गिरौ रम्ये रम्यपुष्पाङ्कितानिमान् १० गजदन्तक्षतान्वृक्षान्पश्य निर्यासवर्षिणः। झिल्लिकाविरुतैर्दीर्घै रुदतीव समन्ततः ११ पुत्रप्रियोसौ शकुनिः पुत्रपुत्रेति भाषते। मधुरां करुणां वाचं पुरेव जननी मम १२ विहगो भृङ्गराजोयं शालस्कन्धसमास्थितः। संगीतमिव कुर्वाणः कोकिलेनावकूजति १३ अयं वा बालकः शङ्के कोकिलानां विहंगमः। सुसबद्धमसंबद्धं तथा ह्येष प्रभाषते १४ एषा कुसुमिता नूनं पुष्पभारानता लता। दृश्यते मामिवात्यर्थं श्रमाद्देवि त्वमाश्रिता १५ एवमुक्ता प्रियस्याङ्के

गुळगुळीत आणि सारखी अशी ही शिळा तुझ्याकरितां येथें ठेविली आहे ५ आणि हिच्या बाजूला परागयुक्त पुष्पांनीं व्याप्त झालेला एक वृक्ष आहे ". ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां जातीचीच सरल असलेली ती सीता ६ प्रेमामुळें स्निग्ध आणि अत्यंत मधुर अशा शब्दांनीं रामाला ह्मणाली " हे रघुनंदन, आपल्या वचनाला मला अवश्य मान दिला पाहिजे ७; हा मनोरथ आपल्या अंतःकरणामध्यें आज वारंवार घोळत आहे ". ह्याप्रमाणें रामाला सांगून निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली ती सुंदरी विचारी सीता चित्तरंजन करण्याकरितां त्या शिलेसमीप गेली. तेव्हां त्याप्रमाणें ती सीता रामाशीं भाषण करीत असतांनाच राम तिला ह्मणाला ८,९ " विपुल वनसंपत्तीनें व पुष्पित वृक्षांनीं युक्त असलेलें रमणीय वन तर तूं पहात आहेसच; परंतु, हे देवि, ह्या रम्य पर्वतावर मनोहर पुष्पांनीं अंकित, गजदंतांचीं क्षतें पडलेले व डिंकाचा स्राव करीत असलेले हे वृक्ष तूं अवलोकन कर. आसमंतातभागीं होत असलेल्या झिल्लिकांच्या दीर्घ ध्वनीमुळें हा पर्वत रोदन करीत असल्यासारिखा भासत आहे १०,११. पूर्वी माझी माता ज्याप्रमाणें मधुर व करुण स्वरानें " पुत्रा, पुत्रा, " असें ह्मणत होती त्याप्रमाणें हा पुत्रवत्सल पक्षी " पुत्रा, पुत्रा, " असें ह्मणत आहे १२. शालवृक्षाच्या स्कंदावर आरूढ झालेला हा भृंगराज पक्षी गायन करण्याकरितांच कीं काय कोकिल पक्ष्यासहवर्तमान शब्द करीत आहे १३. मला वाटतें हा पक्षी कोकिलांचा बालक असावा. कारण, कांहीं सुसंबद्ध आणि कांहीं असंबद्ध असा ध्वनी हा त्यांच्याप्रमाणें करीत आहे. १४ आणि, हे देवि, श्रम झाले असतां ज्याप्रमाणें तूं मला अति चिकटून

मैथिली प्रियभाषिणी । भूयस्तरां त्वनिद्याङ्गी समारोहत भामिनी १६ अङ्कं तु परिवर्तन्ती सीता सुरसुतोपमा । हर्षयामास रामस्य मनो मनसिजार्पितम् १७ स निघृष्याङ्गुलिं रामो धाते मनःशिलोच्चये । चकार तिलकं तस्या ललाटे रुचिरं तदा १८ बालार्कसमवर्णेन तेजसा गिरिधातुना । चकासे विनिविष्टेन ससंध्येव निशा सिता १९ केसरस्य च पुष्पाणि करेणामृद्य राघवः । अलकं पूरयामास मैथिल्याः प्रीतमानसः २० अभिरम्य तदा तस्यां शिलायां रघुनन्दनः । अन्वीयमानो वैदेह्या देशमन्यं जगाम ह २१ विचरन्ती तदा सीता ददर्श हरियूथपम् । वने बहुमृगाकीर्णे वित्रस्ता राममाश्लिषत् २२ रामस्तां परिरब्धाङ्गीं परिरभ्य महाभुजः । सान्त्वयामास वामोरूमवभर्त्स्याथ वानरम् २३ मनःशिलायास्तिलकः सीतायाः सोऽथ वक्षसि । समदृश्यत संक्रान्तो रामस्य विपुलौजसः २४ प्रजहास तदा सीता गते वानरपुंगवे । दृष्ट्वा भर्तरि संक्रान्तमपाङ्गं समनःशिलम् २५ नातिदूरं त्वशोकानां प्रदीप्तमिव काननम् ।

---

रहातेस त्याप्रमाणें पुष्पभारानें लवलेली ही प्रफुल्लित लता खरोखर वृक्षाला लगटून राहिल्यासारखी दिसत आहे " १५. ह्याप्रमाणें रामानें भाषण केलें असतां प्रिय भाषण करणारी व निर्दोष अवयवांनीं युक्त असलेली ती स्त्री सीता प्रियाच्या मांडीवर अगदीं लगटून बसली १६ आणि देवकन्येप्रमाणें असलेली ती सीता रामाच्या मांडीवर बसली असतांना कामविकारानें युक्त झालेल्या रामाच्या मनाला आनंद देऊं लागली १७. तेव्हां निर्मल आणि उन्नत अशा मनःशीलेवर आपलें बोट घासून त्या सीतिच्या कपाळीं रामानें मनोहर तिलक लाविला १८. तेव्हां संधिकाळच्या आभ्रानें युक्त असलेली रात्रि जशी शोभूं लागते तशी बालसूर्यतुल्य वर्णानें युक्त आणि तेजस्वी अशा त्या कपाळीं लाविलेल्या पर्वतधातूच्या तिलकानें सीता शोभूं लागली १९. तेव्हां नागचाफ्यानीं फुलें आपल्या हातांनीं तोडून रामानें प्रसन्न मनानें सीतिच्या बुचड्यांत भरलीं २० आणि ह्याप्रमाणें त्या शिलेवर क्रीडा करून वैदेही मागोमाग येत असतांना तो राम दुसऱ्या प्रदेशामध्यें निघून गेला २१. तेव्हां नानाप्रकारच्या मृगांनीं व्याप्त झालेल्या वनामध्यें संचार करितां करितां एक हुप्प्या सीतिच्या दृष्टीस पडला आणि तो दृष्टीं पडतांक्षणीं भयभीत झालेल्या सीतेनें रामाला कवटाळून धरिलें २२. असें झालें असतां आपणांला आलिंगन दिलेल्या सीतेला आजानुबाहु रामानेंही आलिंगन दिलें आणि वानराची निर्भर्त्सना करून त्या सुंदरीचें सांत्वन केलें २३. त्या धांदलीमध्यें सीतेचे ललाटीं मनःशिला धातूचा जो तिलक रामानें लाविलेला होता तो महापराक्रमी रामाच्या

ददर्श पुष्पस्तबकैस्तर्जद्भिरिव वानरैः २६ वैदेही त्वब्रवीद्राममशोककुसुमार्थिनी । वयं तदभिगच्छामो वनमिक्ष्वाकुनन्दन २७ तस्याः प्रिये स्थितो रामो देव्या दिव्यार्थरूपया । सहितस्तदशोकानां विशोकः प्रययौ वनम् २८ तदशोकवनं रामः सभार्यो व्यचरत्तदा । गिरिपुत्र्या पिनाकीव सह हैमवतं वनम् २९ तावन्योन्यमशोकस्य पुष्पैः पल्लवधारिभिः । समलंचक्रतुरुभौ कामिनौ नीललोहितौ ३० आबद्धवनमालौ तौ कृतापीडावतंसकौ । भार्यापती तावचलं शोभयांचक्रतुर्भृशम् ३१ एवं स विविधान्देशान्दर्शयित्वा प्रियां प्रियः । आजगामाश्रमपदं सुसंश्लिष्टमलंकृतम् ३२ प्रत्युज्जगाम तं भ्राता लक्ष्मणो गुरुवत्सलः । दर्शयन्विविधं धर्मं सौमित्रिः सुकृतं तदा ३३ शुद्धबाणहतांस्तत्र मेध्यान्कृष्णमृगान्दश । राशीकृताञ्शुष्यमाणानन्यान्कांश्चन कांश्चन ३४ तद्दृष्ट्वा कर्म सौमित्रेर्भ्राता प्रीतोऽभवत्तदा । क्रियन्तां बलयश्चेति रामः सीतामथाब्रवीत् ३५ अग्रं प्रदाय

---

वक्षस्थलावर उमटलेला दिसूं लागला २४. तेव्हां तो पुसून गेल्यावर भर्त्याचे ठिकाणीं मनःशिलेसहवर्तमान उमटलेला तो अस्ताव्यस्त तिलक अवलोकन करून सीतेला हसूं आलें २५. नंतर भय दाखवीत असलेले वानरच कीं काय अशा पुष्पगुच्छांनीं जसें कांहीं पेटून गेलेलें एक अशोकवन तिनें जवळच अवलोकन केलें २६ आणि अशोक पुष्पें मिळण्याच्या उद्देशानें ती वैदेही " हे इक्ष्वाकुनंदन, आपण त्या वनामध्यें जाऊं " ह्मणून रामाला ह्मणाली २७. तेव्हां तिचें प्रिय करण्याविषयीं तत्पर असलेला शोकरहित राम दिव्य आणि दिव्य संपत्तीनेंच युक्त असलेल्या सीतेसहवर्तमान अशोकवनामध्यें गेला २८ आणि पार्वतीसहवर्तमान हिमालय पर्वतावरील वनामध्यें विहार करणाऱ्या पिनाकपाणी शंकराप्रमाणें भार्येसहवर्तमान राम त्या वनामध्यें संचार करूं लागला २९. वनामध्यें विहार करूं लागल्यानंतर अनुक्रमें आरक्तवर्ण व नीलवर्ण असलेल्या त्या उभयतां स्त्रीपुरुष सीतारामांनीं पल्लवयुक्त पुष्पांच्या योगानें एकमेकाला भूषित केलें ३० आणि वनमाला घालून व शिरोभूषणें आणि कर्णभूषणें धारण करून त्या स्त्रीपुरुषांनीं त्या पर्वताला अतिशयच शोभा आणिली ३१. ह्याप्रमाणें नानाप्रकारचे देश प्रियेला दाखवून तो प्रिय राम अतिशयच जवळ असलेल्या आणि शृंगारिलेल्या आश्रमस्थानामध्यें गेला ३२. तेव्हां अनेक प्रकारचा धर्म उत्तम रीतीनें आचरून दाखविणारा सुमित्रापुत्र व गुरुवत्सल भ्राता लक्ष्मण त्याला सामोरा गेला ३३. त्यावेळीं शुद्ध बाणानें मारिलेले दहा पवित्र कृष्ण मृग आणि रास घालून सुकत ठेविलेले आणखी कांहीं मृग रामाच्या दृष्टीं पडले ३४ आणि सुमित्रापुत्र लक्ष्मणाचें तें कर्म पाहून भ्राता राम संतुष्ट झाला असतां " बलि होऊं द्या " ह्मणून

**मस्त्रं तत्काकस्य नयनेपतत् । वैदेही विस्मिता तत्र काकस्य नयने हते ५६ निपत्य शिरसा काको जगामाशु यथेप्सितम् । लक्ष्मणानुचरो रामश्च-कारानन्तरक्रियाः ५७ [ ३५८१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येयोध्याकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ १ ॥**

**तां तदा दर्शयित्वा तु मैथिलीं गिरिनिम्नगाम् । निषसाद गिरिप्रस्थे सीतां मांसेन छन्दयन् १ इदं मेध्यमिदं स्वादु निष्टप्तमिदमग्निना । एव-मास्ते स धर्मात्मा सीतया सह राघवः २ तथा तत्रासतस्तस्य भरतस्यो-पयायिनः । सैन्यरेणुश्च शब्दश्च प्रादुरास्तां नभस्पृशौ ३ एतस्मिन्नन्तरे त्रस्ताः शब्देन महता ततः । अर्दिता यूथपा मत्ताः स्वयूथाद्द्रुवुर्दिशः ४ स तं सैन्यसमुद्भूतं शब्दं शुश्राव राघवः । तांश्च विप्रद्रुतान्सर्वान्यूथपान-न्ववैक्षत ५ तांश्च विप्रद्रुतान्दृष्ट्वा तं च श्रुत्वा महास्वनम् । उवाच रामः सौमित्रिं लक्ष्मणं दीप्ततेजसम् ६ हन्त लक्ष्मण पश्येह सुमित्रासुप्रजास्त्वया ।**

---

नेत्राचा त्याग करितों. हे प्रजाधिपते, तुझ्या प्रसादानें मी एकाक्षही जिवंत राहीन" ५५. असें काकपक्ष्यानें सांगितल्यानंतर रामानें अनुज्ञा दिलेलें तें ऐषीक अस्त्र काकपक्ष्याच्या नेत्रावर जाऊन पडलें आणि अशा रीतीनें काकपक्ष्याचा नेत्र अस्त्रानें नाहींसा झालेला पाहून सीता विस्मयचकित झाली ५६ तदनंतर रामाला मस्तकानें प्रणाम करून तो काकपक्षी इच्छेप्रमाणें सत्वर निघून गेला आणि लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या रामानें आपलीं पुढलीं कामें करण्यास आरंभ केला. ५७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं प्रक्षिप्तसर्ग समाप्त झाला ॥१॥

ती पर्वतावरील नदी दाखविल्यानंतर वेगवेगळें मांस दाखवून सीतेचें सांत्वन करणारा राम पर्वताच्या शिखरावर बसला १. सारांश, हें मांस पवित्र आहे, हें स्वादिष्ट आहे. आणि हें अग्नीवर तापविलेलें आहे असें सांगत सांगत तो धर्मनिष्ठ राम सीतेसहवर्त-मान बसला २. तो तेथें बसला असतांना आणि भरत समीप येऊं लागला असतांना त्याच्या सैन्यांतील धूळ व सैन्याचा ध्वनि उत्पन्न होऊन आकाश व्याप्त होऊं लागले ३. व ह्यावेळीं त्या मोठ्या शब्दानें त्रस्त आणि घाबरून गेलेले असे आपआपल्या कळ-पाचें परिपालन करणारे मस्त पशु आपला कळप सोडून चारी दिशेस होऊं लागले ४. तेव्हां सैन्यापासून उत्पन्न झालेला तो शब्द श्रवण करून आपआपल्या कळपांचें रक्षण करणारे ते सर्व पशु पळालेलेही रामानें अवलोकन केले ५ आणि त्या धावूं लाग-लेल्या पशूंना अवलोकन करून व तो मोठा शब्द श्रवण करून राम उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला ह्मणाला ६ " हे लक्ष्मणा, इकडे पहा; तुझ्या

पक्षी हारान्तरचरो लघुः ४५ यत्र यत्रागमत्काकस्तत्र तत्र ददर्श ह । इषीकां भूतसंकाशां स रामं पुनरागमत् ४६ स मूर्ध्नि न्यपतत्काको राघवस्य महात्मनः । सीतायास्तत्र पश्यन्त्या मानुषीमीरयन्गिरम् ४७ प्रसादं कुरु मे राम प्राणः सामर्थ्यमस्तु मे । अस्त्रस्यास्य प्रभावेण शरणं न लभे क्वचित् ४८ तं काकमब्रवीद्रामः पादयोः शिरसा गतम् । सानुक्रोशतया धीमानिदं वचनमर्थवत् ४९ मया रोषपरीतेन सीताप्रियहितार्थिना । अस्त्रमेतत्समाधाय त्वद्वधायाभिमन्त्रितम् ५० यत्तु मे चरणौ मूर्ध्ना गतस्त्वं जीवितेप्सया । अत्रास्त्यपेक्षा त्वयि मे रक्ष्यो हि शरणागतः ५१ अमोघं क्रियतामस्त्रमेकमङ्गं परित्यज । किमङ्गं शातयतु ते शरैषीका ब्रवीहि मे ५२ एतावद्धि मया शक्यं तव कर्तुं प्रियं खग । एकाङ्गहीनं श्रेयेण जीवितं मरणाद्वरम् ५३ एवमुक्तस्तु रामेण संप्रधार्य स वायसः । अभ्यगच्छद्धयोरक्ष्णस्त्यागमेकस्य पण्डितः ५४ सोऽब्रवीद्राघवं काको नेत्रमेकं त्यजाम्यहम् । एकनेत्रोऽपि जीवेहं त्वत्प्रसादान्नराधिप ५५ रामानुज्ञात-

---

एषीकास्त्राने पछाडिलेला तो काकपक्षी त्रैलोक्यामध्यें फिरला. देवांनीं वर दिल्यामुळें रतिच्या हारामध्यें संचार करणारा तो क्षुद्र पक्षी ४५ जिकडे जिकडे जाऊं लागला तिकडे तिकडे भूताप्रमाणें मागें लागलेली ती काडी त्याच्या दृष्टीं पडूं लागला असतां तो पुनरपि रामाकडे आला ४६, सीता पहात असतांना रामाच्या मस्तकावर बसला आणि मनुष्य वाणीनें ह्मणाला ४७ " हे रामा, मजवर कृपा कर; माझे प्राण असूं दे. ह्या अस्त्राच्या प्रभावामुळें मला कोठेंही आश्रय मिळत नाहीं " ४८. ह्याप्रमाणें काकपक्ष्यानें सांगितल्यावर पायांवर मस्तक ठेविलेल्या त्या काकपक्ष्याशीं तो विचारी राम दयेमुळें अर्थयुक्त भाषण करूं लागला कीं ४९, " सीतेचें प्रिय व हित करण्याच्या उद्देशानें क्रुद्ध होऊन मी हें अस्त्र योजून तुझ्या वधाकरितां अभिमंत्रण केलेलें आहे; ५०. परंतु, ज्याअर्थीं जीविताची इच्छा धरून तूं माझ्या चरणांवर मस्तक ठेविलें आहेस त्याअर्थीं तुझ्याकडेही माझें लक्ष्य आहेच. कारण, शरणागताचें रक्षण मला करणें आहे ५१. तस्मात्, तूं आपल्या एका अवयवाची आशा सोडून दे आणि माझ्या अस्त्राचें सार्थक कर; ह्या बाणाच्या काडीनें तुझा कोणता अवयव तोडावा तें मला सांग ५२. हे पक्ष्या, फार तर इतकेंच माझ्या हातून तुझें प्रिय होणें शक्य आहे आणि मरणापेक्षां एक अवयव कमी होऊन जिवंत रहाणें बरें आहे " ५३. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां मनामध्यें विचार करून त्या विचारी काकपक्ष्यानें दोहोंपैकीं एका नेत्राचा त्याग करण्याचें ठरविलें ५४ आणि नंतर तो काकपक्षी रामाला ह्मणाला " मी एका

**मस्त्रं तत्काकस्य नयनेपतत् । वैदेही विस्मिता तत्र काकस्य नयनं हृते ५६ निपत्य शिरसा काको जगामाशु यथेप्सितम् । लक्ष्मणानुचरो रामश्च- कारानन्तरक्रियाः ५७ [ ३५८१ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ययोध्याकाण्डे प्रक्षिप्तः सर्गः ॥ १ ॥**

**तां तदा दर्शयित्वा तु मैथिलीं गिरिनिम्नगाम् । निषसाद गिरिप्रस्थे सीतां मांसेन छन्दयन् १ इदं मेध्यमिदं स्वादु निष्टप्तमिदमग्निना । एव- मास्ते स धर्मात्मा सीतया सह राघवः २ तथा तत्रासतस्तस्य भरतस्यो- पयायिनः । सैन्यरेणुश्च शब्दश्च प्रादुरास्तां नभस्पृशौ ३ एतस्मिन्नन्तरे त्रस्ताः शब्देन महता ततः । अर्दिता यूथपा मत्ताः स्वयूथाद्द्रुवुर्दिशः ४ स तं सैन्यसमुद्भूतं शब्दं शुश्राव राघवः । तांश्च विप्रद्रुतान्सर्वान्यूथपान- न्ववैक्षत ५ तांश्च विप्रद्रुतान्दृष्ट्वा तं च श्रुत्वा महास्वनम् । उवाच रामः सौमित्रिं लक्ष्मणं दीप्ततेजसम् ६ हन्त लक्ष्मण पश्येह सुमित्रासुप्रजास्त्वया ।**

---

नेत्राचा त्याग करितों. हे प्रजाधिपा, तुझ्या प्रसादानें मी एकाक्षही जिवंत राहीन" ५५. असें काकपक्ष्यानें मागितल्यानंतर रामानें अनुज्ञा दिलेलें तें ऐषीक अस्त्र काकपक्ष्याच्या नेत्रावर जाऊन पडलें आणि अशारीतीनें काकपक्ष्याचा नेत्र अस्त्रानें नाहींसा झालेला पाहून सीता विस्मयचकित झाली ५६ तदनंतर रामाला मस्तकानें प्रणाम करून तो काकपक्षी इच्छेप्रमाणें सत्वर निघून गेला आणि लक्ष्मणासहवर्तमान असलेल्या रामानें आपलीं पुढलीं कामें करण्यास आरंभ केला. ५७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं प्रक्षिप्तसर्ग समाप्त झाला ॥१॥

ती पर्वतावरील नदी दाखविल्यानंतर वेगवेगळें मांस दाखवून सीतेचें सांत्वन करणारा राम पर्वताच्या शिखरावर बसला १. सारांश, हें मांस पवित्र आहे, हें स्वादिष्ट आहे. आणि हें अग्नीवर तापविलेलें आहे असें सांगत सांगत तो धर्मनिष्ठ राम सीतेसहवर्त- मान बसला २. तो तेथें बसला असतांना आणि भरत समीप येऊं लागला असतांना त्याच्या सैन्यांतील धूळ व सैन्याचा ध्वनि उत्पन्न होऊन आकाश व्याप्त होऊं लागले ३. व ह्यावेळीं त्या मोठ्या शब्दानें त्रस्त आणि घाबरून गेलेले असे आपआपल्या कळ- पाचें परिपालन करणारे मस्त पशु आपला कळप सोडून चारी दिशेस होऊं लागले ४. तेव्हां सैन्यापासून उत्पन्न झालेला तो शब्द श्रवण करून आपआपल्या कळपांचें रक्षण करणारे ते सर्व पशु पळालेलेही रामानें अवलोकन केले ५ आणि त्या धावूं लाग- लेल्या पशूंना अवलोकन करून व तो मोठा शब्द श्रवण करून राम उज्ज्वल तेजानें युक्त असलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणाला म्हणाला ६ " हे लक्ष्मणा, इकडे पहा; तुझ्या

भीमस्तनितगम्भीरं तुमुलः श्रूयते स्वनः ७ गजयूथानि वारण्ये महिषा वा महावने । वित्रासिता मृगाः सिंहैः सहसा प्रद्रुता दिशः ८ राजा वा राजपुत्रो वा मृगयामटते वने । अन्यद्वा श्वापदं किंचित्सौमित्रे ज्ञातुमर्हसि ९ सुदुश्चरो गिरिश्चायं पक्षिणामपि लक्ष्मण । सर्वमेतद्यथातत्त्वमभिज्ञातुमिहार्हसि १० स लक्ष्मणः संत्वरितः सालमारुह्य पुष्पितम् । प्रेक्षमाणो दिशः सर्वाः पूर्वां दिशमवैक्षत ११ उदङ्मुखः प्रेक्षमाणो ददर्श महतीं चमूम् । गजाश्वरथसंबाधां यत्तैर्युक्तां पदातिभिः १२ तामश्वरथसंपूर्णां रथध्वजविभूषिताम् । शशंस सेनां रामाय वचनं चेदमब्रवीत् १३ अग्निं संशमयत्वार्यः सीता च भजतां गुहाम् । सज्जं कुरुष्व चापं च शरांश्च कवचं तथा १४ तं रामः पुरुषव्याघ्रो लक्ष्मणं प्रत्युवाच ह । अङ्गावेक्षस्व सौमित्रे कस्येमां मन्यसे चमूम् १५ एवमुक्तस्तु रामेण लक्ष्मणो वाक्यमब्रवीत् । दिधक्षन्निव तां सेनां रुषितः पावको यथा १६ संपन्नं राज्यमिच्छंस्तु व्यक्तं प्राप्याभिषेचनम् । आवां हन्तुं समभ्येति

योगानें सुमित्रा सुपुत्रवती झाली आहे असा, भयंकर मेघगर्जनेप्रमाणें गंभीर तुमुल ध्वनि ऐकूं येत आहे ७ हत्तींचे कळप, महिष आणि मृग एकाएकीं महावनामध्यें चारी दिशेस पळत सुटले आहेत. तेव्हां सिंहांनीं त्यांना घाबरून सोडिलें आहे ८ किंवा एखादा राजा अथवा राजकुमार वनामध्यें मृगया करीत आहे अथवा दुसरें कांहीं श्वापद तेथें आलें आहे ह्याचा शोध, हे लक्ष्मणा, तूं कर ९. हे लक्ष्मणा, ह्या पर्वतावर पक्ष्यांनाही आक्रमण करितां येणें अत्यंत दुष्कर आहे. तेव्हां हें सर्व काय आहे तें इत्थंभूत तूं समजून घे " १०. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यावर लक्ष्मण त्वरा करून सर्व दिशा निरखून पहाण्याकरितां एका प्रफुल्लित सालवृक्षावर चढला आणि प्रथम त्यानें पूर्वदिशेकडे दृष्टि दिली ११ व नंतर उत्तरेकडे तोंड करून पाहूं लागला असतां सज्ज झालेल्या पायदळानें युक्त व गज, अश्व आणि रथ ह्यांनीं गजबजलेली प्रचंड सेना त्यानें अवलोकन केली १२. नंतर अश्व व रथ ह्यांनीं भरलेली आणि रथ व ध्वज ह्यांनीं भूषित असलेली ती सेना रामाला सांगून तो पुनरपि त्याला ह्मणाला १३ " आपण अग्नि विझवून टाका, सीतेला गुहेंत जाऊन बसूं द्या आणि आपण धनुष्य, बाण आणि कवच सिद्ध करून तयार असा " १४. ह्यावर पुरुषश्रेष्ठ राम त्या लक्ष्मणाला ह्मणाला " हे लक्ष्मणा, हें कोणाचें सैन्य तुला वाटत आहे हें तर पहा " १५. ह्याप्रमाणें रामानें आज्ञा केली असतां त्या सैन्याला दग्ध करण्यास प्रवृत्त झालेला अग्निच कीं काय अशा रीतीनें क्रुद्ध झालेला लक्ष्मण रामाला

कैकेय्या भरतः सुतः १७ एष वै सुमहाञ्छ्रीमान्विटपी संप्रकाशते । विराजत्युज्ज्वलस्कन्धः कोविदारध्वजो रथे १८ भजन्त्येते यथाकाममश्वानारुह्य शीघ्रगान् । एते भ्राजन्ति संहृष्टा गजानारुह्य सादिनः १९ गृहीतधनुषावावां गिरिं वीर श्रयावहे । अथ वेहैव तिष्ठावः संनद्धावुद्यतायुधौ २० अपि नौ वशमागच्छेत्कोविदारध्वजो रणे । अपि द्रक्ष्यामि भरतं यत्कृते व्यसनं महत् २१ त्वया राघव संप्राप्तं सीतया च मया तथा । यन्निमित्तं भवान्राज्याच्च्युतो राघव शाश्वतात् २२ संप्राप्तोयमरिर्वीर भरतो वध्य एव हि । भरतस्य वधे दोषं नाहं पश्यामि राघव २३ पूर्वापकारिणं हत्वा न ह्यधर्मेण युज्यते । पूर्वापकारी भरतस्त्यागे धर्मश्च राघव । एतस्मिन्निहते कृत्स्नामनुशाधि वसुंधराम् २४ अद्य पुत्रं हतं संख्ये कैकेयी राज्यकामुका । मया पश्येत्सुदुःखार्ता हस्तिभिन्नमिव द्रुमम् २५ कैकेयीं च वधिष्यामि सानुबन्धां सबान्धवाम् । कलुषेणाद्य

म्हणाला १६ " राज्याभिषेक प्राप्त झाल्यानंतर निष्कंटक राज्य प्राप्त करून घेण्याच्या इच्छेनें कैकेयीचा पुत्र भरत आपणांला मारण्याकरितां इकडे येत आहे ह्यांत संशय नाहीं १७. कारण, उज्ज्वल स्कंधांनीं युक्त असा हा जो फारच मोठा भव्य वृक्ष दिसत आहे त्याच्या शेजारी रथावर कोविदारध्वज झळकत आहे १८. हे स्वार शीघ्रगामी अश्वांवर आरूढ होऊन स्वेच्छेनें इकडे येत आहेत आणि आनंदित होऊन गजांवर आरूढ झालेले हे गजारोहक झळकत आहेत १९. तस्मात्, हे वीरा, आपण धनुष्य घेऊन पर्वताचा आश्रय करूं अथवा आयुधें सज्ज करून येथेंच तयारीनें उभे राहूं २०. हे राघवा. कोविदारध्वज रणामध्यें आपल्या हातीं लागून ज्याच्याकरितां मी व सीता ह्यांसहवर्तमान आपणांला हें मोठें संकट प्राप्त झालें तो भरत माझ्या दृष्टीं पडेल तर फार चांगलें. हे राघवा, त्याच्याचकरितां आपण अक्षय्य राज्याला मुकला आहांत २१.२२. हे वीरा, हा भरत शत्रु प्राप्त झाला आहे आणि ह्याचा वध करणें अवश्यच आहे. हे राघवा, भरताचा वध करण्यांत मला दोष दिसत नाहीं २३. प्रथम जो अपकार करील त्याचा वध केल्यानें अधर्म होत नाहीं आणि भरत प्रथम अपकार करणारा आहे. तस्मात्, हे राघवा, त्याचा वध करण्यांत धर्मच होणार आहे. ह्याचा वध झाला असतां नंतर तूं संपूर्ण पृथ्वीचें राज्य कर २४. राज्याचा अभिलाष धरणारी ही कैकेयी हत्तीनें मोडून पाडिलेल्या वृक्षाप्रमाणें रणामध्यें माझ्या योगानें आपला पुत्र वध पावलेला अत्यंत दुःखित होऊन पाहील २५. मी अनुयायी आणि बांधव ह्यांसहवर्तमान कैकेयीचा वध करीन. आज ह्या मोठ्या

महता मेदिनी परिमुच्यताम् २६ अद्येमं संयतं क्रोधमसत्कारं च मानद। मोक्ष्यामि शत्रुसैन्येषु कक्षेष्विव हुताशनम् २७ अद्यैव चित्रकूटस्य काननं निशितैः शरैः। छिन्दञ्छत्रुशरीराणि करिष्ये शोणितोक्षितम् २८ शरैर्निर्भिन्नहृदयान्कुंजरांस्तुरगांस्तथा। श्वापदाः परिकर्षन्तु नरांश्च निहतान्मया २९ शराणां धनुषश्चाहमनृणोऽस्मिन्महावने। ससैन्यं भरतं हत्वा भविष्यामि न संशयः ३० [३८११] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे षण्णवतितमः सर्गः॥ ९६॥

सुसंरब्धं तु भरतं लक्ष्मणं क्रोधमूर्छितम्। रामस्तु परिसान्त्व्याथं वचनं चेदमब्रवीत् १ किमत्र धनुषा कार्यमसिना वा सचर्मणा। महाबले महोत्साहे भरते स्वयमागते २ पितुः सत्यं प्रतिश्रुत्य हत्वा भरतमाहवे। किं करिष्यामि राज्येन सापवादेन लक्ष्मण ३ यद्द्रव्यं बान्धवानां वा मित्राणां वा क्षये भवेत्। नाहं तत्प्रतिगृह्णीयां भक्ष्यान्विषकृतानिव ४ धर्ममर्थं च कामं च पृथिवीं चापि लक्ष्मण। इच्छामि भवतामर्थे एत-

---

पापापासून ही पृथ्वी एकदां मुक्त होऊं दे २६. हे मानी राघवा, आजपर्यंत आवरून धरिलेला हा क्रोध आणि अपमान, ज्याप्रमाणें गवताच्या गंजीत अग्नि टाकून द्यावयाचा त्याप्रमाणें मी ह्या शत्रुसैन्यावर आज, सोडून देतों २७. तीक्ष्ण बाणांनीं शत्रूंच्या शरीरांचे तुकडे करीत करीत मी आज चित्रकूट पर्वताच्या वनामध्यें रक्ताचा सडा घालून टाकितों २८. बाणाच्या योगानें हृदय फोडून मी मारून टाकिलेले हत्ती, अश्व आणि मानव ह्यांना आज श्वापदें ओढून नेवोत २९ ह्या महावनामध्यें सैन्यासहवर्तमान भरताचा वध करून मी निःसंशय बाणांच्या व धनुष्याच्या ऋणांतून मुक्त होईन" ३०. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शहाण्णवावा सर्ग समाप्त झाला॥ ९६॥

भरताविषयीं अतिशय क्रोधानें व्याप्त झालेल्या आणि युद्ध करण्याकरितां फारच उतावीळ झालेल्या लक्ष्मणाचें सांत्वन करून राम म्हणाले १ "महाबलाढ्य भरत मोठ्या उत्साहानें स्वतः इकडे आला असतां आपणाला धनुष्याशीं अथवा ढालीसहवर्तमान तरवारीशीं तरी काय कर्तव्य आहे? २. हे लक्ष्मणा, पित्याचें सत्य परिपालन करीन अशी प्रतिज्ञा करून मी जर युद्धामध्यें भरताचा वध केला तर लोकापवादानें युक्त झालेल्या राज्याशीं मला काय कर्तव्य आहे? ३. बांधवांचा अथवा मित्रांचा नाश होऊन जें द्रव्य मिळणार असेल तें मी विषमय भक्ष्याप्रमाणें स्वीकार करणार नाहीं ४. हे लक्ष्मणा, धर्म, अर्थ, काम आणि पृथ्वी ह्या सर्वांची तुमच्याकरितांच मी

त्प्रतिशृणोमि ते ५ भ्रातॄणां संग्रहार्थं च सुखार्थं चापि लक्ष्मण । राज्यमप्यहमिच्छामि सत्येनायुधमालभे ६ नेयं मम मही सौम्य दुर्लभा सागराम्बरा । नहीच्छेयमधर्मेण शक्रत्वमपि लक्ष्मण ७ यद्विना भरतं त्वां च शत्रुघ्नं वापि मानद । भवेन्मम सुखं किंचिद्भस्म तत्कुरुतां शिखी ८ मन्येऽहमागतोऽयोध्यां भरतो भ्रातृवत्सलः । मम प्राणैः प्रियतरः कुलधर्ममनुस्मरन् ९ श्रुत्वा प्रव्राजितं मां हि जटावल्कलधारिणम् । जानक्या सहितं वीर त्वया च पुरुषोत्तम १० स्नेहेनाक्रान्तहृदयः शोकेनाकुलितेन्द्रियः । द्रष्टुमभ्यागतो ह्येष भरतो नान्यथा गतः ११ अम्बां च कैकयीं रुष्य भरतश्चाप्रियं वदन् । प्रसाद्य पितरं श्रीमान्राज्यं मे दातुमागतः १२ प्राप्तकालं यथैषोऽस्मान्भरतो द्रष्टुमर्हति । अस्मासु मनसाप्येष नाहितं किंचिदाचरेत् १३ विप्रियं कृतपूर्वं ते भरतेन कदा नु किम् । ईदृशं वा भयं तेऽद्य भरतं यद्विशङ्कसे १४ नहि ते निष्ठुरं वाच्यो भरतो नाप्रियं वचः । अहं ह्यप्रियमुक्तः स्यां भर-

---

पर्वा करीत आहें हें तुला प्रतिज्ञेनें सांगून ठेवतों ५. हे लक्ष्मणा, भ्रात्यांचें उत्तम रीतीनें परिपालन करण्याकरितां व त्यांच्या सुखाकरितां मी राज्याची पर्वा करीत आहें हें मी हातांत आयुध घेऊन तुला सत्य सांगतों ६. हे सौम्या, सागररूप वस्त्र परिधान केलेली ही पृथ्वी प्राप्त करून घेणें मला कठिण नाहीं; परंतु, हे लक्ष्मणा, अधर्मानें प्राप्त होणाऱ्या देवांच्या अधिपत्याचीही मला इच्छा नाहीं ७. भरताचा, शत्रुघ्नाचा अथवा, हे मानी लक्ष्मणा, तुझा वियोग होऊन जें कांहीं सुख मला होणार असेल त्याचें अग्नि भस्म करून टाको ८. मला वाटतें मला प्राणापेक्षांही अधिक प्रिय असा भ्रातृवत्सल भरत अयोध्येमध्यें आला आणि (ज्येष्ठ भ्रात्याचें राज्य ह्या) कुलधर्माला स्मरून ९ व, हे पुरुषश्रेष्ठा वीरा लक्ष्मणा, जटा व वल्कलें धारण करून जानकी व तूं ह्यांसहवर्तमान मी वनांत गेल्याचें श्रवण केल्यावर १० प्रेमानें हृदय भरून येऊन व शोकानें चित्त व्याकूल होऊन हा भरत आपली भेट घेण्याकरितां येथें आला आहे; दुसऱ्या हेतूनें आलेला नाहीं ११. कैकेयी मातेवर क्रुद्ध होऊन तिला अप्रिय भाषण करणारा वैभवशाली भरत पित्याला प्रसन्न करून घेऊन मला राज्य देण्याकरितां येथें आला आहे १२. ह्या भरताला वेळेवर आपली भेट होणें योग्य आहे. आपलें हा मनानें सुद्धां कांहींएक वाईट करणार नाहीं १३. अरे, भरतानें पूर्वीं कधीं तरी कांहीं तुला अप्रिय असलेली गोष्ट केली आहे काय ? मग अशाप्रकारचें भय उत्पन्न होऊन भरताविषयीं शंका घेण्याचें आज तुला कारण काय ? १४. तूं भरताशीं निष्ठुर अथवा अप्रिय भाषण करूं नको. कारण, भरताशीं जर तूं अप्रिय भाषण केलेंस तर तें माझ्याशीं

तस्याप्रिये कृते १५ कथं नु पुत्राः पितरं हन्युः कस्यांचिदापदि । भ्राता वा भ्रातरं हन्यात्सौमित्रे प्राणमात्मनः १६ यदि राज्यस्य हेतोस्त्वमिमां वाचं प्रभाषसे । वक्ष्यामि भरतं दृष्ट्वा राज्यमस्मै प्रदीयताम् १७ उच्यमानो हि भरतो मया लक्ष्मण तद्वचः । राज्यमस्मै प्रयच्छेति बाढमित्येव मंस्यते १८ तथोक्तो धर्मशीलेन भ्रात्रा तस्य हिते रतः । लक्ष्मणः प्रविवेशेव स्वानि गात्राणि लज्जया १९ तद्वाक्यं लक्ष्मणः श्रुत्वा व्रीडितः प्रत्युवाच ह । त्वां मन्ये द्रष्टुमायातः पिता दशरथः स्वयम् २० व्रीडितं लक्ष्मणं दृष्ट्वा राघवः प्रत्युवाच ह । एष मन्ये महाबाहुरिहास्मान्द्रष्टुमागतः २१ अथवा नौ ध्रुवं मन्ये मन्यमानः सुखोचितौ । वनवासमनुध्याय गृहाय प्रतिनेष्यति २२ इमां चाप्येष वैदेहीमत्यन्तसुखसेविनीम् । पिता मे राघवः श्रीमान्वनादादाय यास्यति २३ एतौ तौ संप्रकाशेते गोत्रवन्तौ मनोरमौ । वायुवेगसमौ वीरौ जवनौ तुरगोत्तमौ २४ स एष सुमहाकायः कम्पते वाहिनीमुखे । नागः शत्रुंजयो नाम वृद्धस्तातस्य

---

अप्रिय भाषण केल्यासारिखें होईल १५. हे लक्ष्मणा, कोणतीही जरी विपत्ति प्राप्त झाली तरी पुत्र पितराचा वध कसा करतील अथवा भ्राता तरी स्वप्राणतुल्य भ्रात्याचा वध कसा करील ? १६. जर राज्याकरितां तूं ही भाषा बोलत असशील तर भरत दृष्टीं पडतांक्षणीं "मी ह्या लक्ष्मणाला राज्य देऊन टाक" असें त्याला सांगेन १७. हे लक्ष्मणा, "ह्याला राज्य दे" असें मी भरताला बोलूं लागलों असतां "ठीक आहे" अशीच तो त्या माझ्या भाषणाला संमति देईल" १८. ह्याप्रमाणें धर्मशील भ्रात्यानें सांगितलें असतां त्याच्या हिताविषयीं तत्पर असलेला लक्ष्मण लज्जेनें ( अगदीं संकुचित झाल्यामुळें ) जसा कांहीं आपल्या अवयवांमध्यें शिरूं लागला १९ आणि तें रामाचें भाषण श्रवण करून "पिता दशरथ स्वतःच तुला भेटण्याकरितां आला आहे असें वाटतें" ह्मणून लज्जित झालेला लक्ष्मण रामाला ह्मणाला असतां २० त्या लज्जित झालेल्या लक्ष्मणाकडे पाहून राम ह्मणाला " मला वाटतें हा अजानुबाहु दशरथ आपणांला भेटण्याकरितां येथें आला आहे २१. अथवा सुखाचाच अनुभव असलेल्या आपणांला वनवास कष्टदायक होणार आहे असा विचार करून हा राजा आपणांला निःसंशय घरीं परत नेईल असें मला वाटतें २२. अत्यंत सुखाचा उपभोग घेणाऱ्या ह्या वैदेहीलाही माझा वैभवशाली पिता रघुवंशज दशरथ वनांतून घेऊन घरीं जाईल २३. वेगामध्यें वायूची बरोबरी करणारे असे ते हे वेगवान्, मनोहर, शूर, कुलीन व उत्कृष्ट अश्व झळकत आहेत २४. आपल्या विचारी पित्याचा तो हा शत्रुंजयनामक अतिशय धिप्पाड वृद्ध गज सैन्यापुढें

श्रीमतः २५ न तु पश्यामि तच्छत्रं पाण्डुरं लोकविश्रुतम् । पितुर्दिव्यं महाभाग संशयो भवतीह मे २६ वृक्षाग्रादवरोह त्वं कुरु लक्ष्मण मद्वचः । इतीव रामो धर्मात्मा सौमित्रिं तमुवाच ह २७ अवतीर्य तु सालाग्रात्तस्मात्स समितिंजयः । लक्ष्मणः प्राञ्जलिर्भूत्वा तस्थौ रामस्य पार्श्वतः २८ भरतेनाथ संदिष्टा संमर्दो न भवेदिति । समन्तात्तस्य शैलस्य सेना वासमकल्पयत् २९ अध्यर्धमिक्ष्वाकुचमूर्योजनं पर्वतस्यह । पार्श्वे न्यविशदावृत्य गजवाजिनराकुला ३० सा चित्रकूटे भरतेन सेना धर्मं पुरस्कृत्य विधूय दर्पम् । प्रसादनार्थं रघुनन्दनस्य विरोचते नीतिमना प्रणीता ३१ [३६४२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे सप्तनवतितमः सर्गः ॥ ९७ ॥

निवेश्य सेनां तु विभुः पद्भ्यां पादवतां वरः । अभिगन्तुं स काकुत्स्थमियेष गुरुवर्तकम् १ निविष्टमात्रे सैन्ये तु यथोद्देशं विनीतवत् । भरतो भ्रातरं वाक्यं शत्रुघ्नमिदमब्रवीत् २ क्षिप्रं वनमिदं सौम्य नरसंघैः समन्ततः । लुब्धैश्च सहितैरभिस्त्वमन्वेषितुमर्हसि ३ गुहो ज्ञातिसहस्रेण

---

चालत आहे २५; परंतु, हे महाभाग्यवान् लक्ष्मणा, पित्याचें तें जगद्विख्यात, दिव्य व श्वेतवर्ण छत्र माझ्या दृष्टीं पडत नाहीं ह्यामुळें ( पिताच आला आहे किंवा नाहीं ) ह्याविषयीं मला संशय आहे २६. आतां, हे लक्ष्मणा, माझें ऐक आणि तूं ह्या शालवृक्षाच्या अग्रापासून खालीं उतर. " ह्याप्रमाणें धर्मनिष्ठ रामानें लक्ष्मणाला सांगितलें असतां २७ तो शत्रुसमूह जिंकणारा लक्ष्मण त्या सालवृक्षाच्या टोंकापासून खालीं उतरला आणि हात जोडून रामाच्या बाजूला उभा राहिला २८. तदनंतर गर्दी होऊं नये ह्मणून भरतानें आज्ञा केलेल्या त्या सेनेनें पर्वताच्या असमंतात भागीं दूर तळ दिला २९; गज, अश्व आणि पदाति ह्यांनीं भरलेली ती इक्ष्वाकु सेना पर्वताच्या बाजूचा दीडयोजन प्रदेश व्यापून राहिली ३० आणि धर्माकडेच लक्ष्य देऊन व गर्व सोडून देऊन नीतिमान भरतानें रघुनंदन रामाला प्रसन्न करण्याकरितां नेलेली ती सेना चित्रकूटपर्वतावर झळकूं लागली ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं सत्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९७ ॥

चरप्राण्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या त्या प्रभु भरतानें सेना तेथें ठेवून गुरुशुश्रूषेविषयीं तत्पर असलेल्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामाकडे जाण्याचें मनामध्यें आणिलें १. नंतर मनाप्रमाणें सेनेची व्यवस्था लागतांक्षणीं तो भरत भ्रात्या शत्रुघ्नाला विनयपूर्वक ह्मणाला २ " हे सौम्या, लोकांच्या टोळ्या आणि हे गुहाचे सेवक निषाध ह्यांना

शरचापासिपाणिना। समन्वेषतु काकुत्स्थावस्मिन्परिवृतः स्वयम् ४ अमात्यैः सह पौरैश्च गुरुभिश्च द्विजातिभिः। सह सर्वं चरिष्यामि पद्भ्यां परिवृतः स्वयम् ५ यावन्न रामं द्रक्ष्यामि लक्ष्मणं वा महाबलम्। वैदेहीं वा महाभागां न मे शान्तिर्भविष्यति ६ यावन्न चन्द्रसंकाशं तद्द्रक्ष्यामि शुभाननम्। भ्रातुः पद्मविशालाक्षं न मे शान्तिर्भविष्यति ७ सिद्धार्थः खलु सौमित्रिर्यश्चन्द्रविमलोपमम्। मुखं पश्यति रामस्य राजीवाक्षं महाद्युति ८ यावन्न चरणौ भ्रातुः पार्थिवव्यञ्जनान्वितौ। शिरसा प्रग्रहीष्यामि न मे शान्तिर्भविष्यति ९ यावन्न राज्ये राज्यार्हः पितृपैतामहे स्थितः। अभिषिक्तो जलक्लिन्नो न मे शान्तिर्भविष्यति १० कृतकृत्या महाभागा वैदेही जनकात्मजा। भर्तारं सागरान्तायाः पृथिव्या यानुगच्छति ११ सुशुभश्चित्रकूटोऽसौ गिरिराजसमो गिरिः। यस्मिन्वसति काकुत्स्थः कुबेर इव नन्दने १२ कृतकार्यमिदं दुर्गवनं व्यालनिषेवितम्।

---

बरोबर घेऊन तूं हें वन सत्वर धुंडून काढ ३ आणि बाण, धनुष्य व खड्ग घेतलेल्या आपल्या ज्ञातीच्या हजार लोकांनीं परिवेष्टित असलेल्या गुहानें स्वतः ह्या वनामध्यें ककुत्स्थकुलोत्पन्न रामलक्ष्मणांना शोधून काढावें ४. अमात्य, नगरवासी जन आणि द्विज ह्यांसहवर्तमान असलेल्या गुरूंनीं मी परिवेष्टित होऊन स्वतः ह्या सर्व वनामध्यें पायांनीं संचार करीन ५. जोंपर्यंत राम, महाबलाढ्य लक्ष्मण अथवा महाभाग्यवती वैदेही दृष्टीं पडणार नाहीं तोंपर्यंत मला स्वस्थता वाटणार नाहीं ६. जोंपर्यंत चंद्राप्रमाणें आल्हादकारक आणि कमलपत्रासारिख्या विशाल नयनांनीं युक्त असें भ्रात्याचें शुभ मुख माझ्या दृष्टीं पडणार नाहीं तोंपर्यंत माझा जीव खालीं पडणार नाहीं ७. खरोखर सुमित्रापुत्र लक्ष्मण कृतकृत्य आहे. कारण, चंद्राप्रमाणें निर्मल आणि कमलासारिख्या विशाल नयनांनीं युक्त असें रामाचें महातेजस्वी मुख तो अवलोकन करीत आहे ८. राजचिन्हांनीं युक्त अशा आपल्या भ्रात्याच्या चरणांवर मस्तक ठेवीपर्यंत माझ्या मनाला आराम वाटणार नाहीं ९; इतकेंच नव्हे परंतु, जोंपर्यंत राज्याचा उपभोग घेण्याला योग्य असलेला राम वाडवडिलांपासून चालत आलेल्या राज्यावर बसून राज्याभिषेक झाल्यामुळें उदकानें भिजला नाहीं तोंपर्यंत माझें मन स्थिर होणार नाहीं १०. समुद्रमर्यादित पृथ्वीवर भर्त्याच्या मागोमाग जाणारी महाभाग्यवती जनककन्या वैदेहि कृतकृत्य आहे ११. नंदनवनामध्यें वास्तव्य करणाऱ्या कुबेराप्रमाणें ज्याच्यावर ककुत्स्थकुलोत्पन्न राम वास्तव्य करीत आहे तो हा पर्वतराज हिमालयाची बरोबरी करणारा चित्रकूटपर्वत फारच पवित्र आहे १२ व शस्त्रधरांमध्यें श्रेष्ठ अग-

यदध्यास्ते महाराजो रामः शस्त्रभृतां वरः १३ एवमुक्त्वा महाबाहुर्भरतः पुरुषर्षभः । पद्भ्यामेव महातेजाः प्रविवेश महद्वनम् १४ स तानि द्रुमजालानि जातानि गिरिसानुषु । पुष्पिताग्राणि मध्येन जगाम वदतां वरः १५ स गिरेश्चित्रकूटस्य सालमारुह्य सत्वरम् । रामाश्रमगतस्याग्नेर्ददर्श ध्वजमुच्छ्रितम् १६ तं दृष्ट्वा भरतः श्रीमान्मुमोद सहबांधवः । अत्र राम इति ज्ञात्वा गतः पारमिवाम्भसः १७ स चित्रकूटे तु गिरौ निशम्य रामाश्रमं पुण्यजनोपपन्नम् । गुहेन सार्धं त्वरितो जगाम पुनर्निवेश्यैव चमूं महात्मा १८ [३६६०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे अष्टनवतितमः सर्गः ॥ ९८ ॥

निविष्टायां तु सेनायामुत्सुको भरतस्ततः । जगाम भ्रातरं द्रष्टुं शत्रुघ्नमनुदर्शयन् १ ऋषिं वसिष्ठं संदिश्य मातॄर्मे शीघ्रमानय इति त्वरितमग्रे स जगाम गुरुवत्सलः २ सुमन्त्रस्त्वपि शत्रुघ्नमदूरादन्वपद्यत । रामदर्शनजस्तर्षो भरतस्येव तस्य च ३ गच्छन्नेवाथ भरतस्तापसालयसंस्थिताम् ।

---

लेला महाराज राम जेथें बसत आहे तें हें सर्पांनीं सेवित असलेलें गहन वनही कृतकृत्य आहे " १३. ह्याप्रमाणें शत्रुघ्नाला सांगून तो महापराक्रमी व महातेजस्वी पुरुषश्रेष्ठ भरत पायांनींच त्या महावनामध्यें प्रविष्ट झाला १४ आणि वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो भरत पर्वतशिखरावर उत्पन्न झालेल्या व प्रफुल्लित अग्रांनीं युक्त असलेल्या वृक्षजालामधून चालला १५. तदनंतर चित्रकूटपर्वतावरील सालवृक्षावर सत्वर आरूढ झाल्यावर रामाच्या आश्रमांत असलेल्या अग्नीचा ऊंच गेलेला धूर त्या भरताच्या दृष्टीं पडला १६. तो धूर दृष्टीं पडतांक्षणीं ह्या ठिकाणीं राम आहे असें जाणून उदकाच्या पार तरून गेल्याप्रमाणें वैभवशाली भरताला बांधवांसहवर्तमान आनंद झाला १७ आणि चित्रकूट पर्वतावर तपस्वी लोकांनीं युक्त असा रामाचा आश्रम आहे असें ऐकिल्यावर तो महात्मा भरत शोधण्याकरितां पाठविलेलेंही सैन्य तेथेंच ठेवून गुहासहवर्तमान सत्वर तेथें चालता झाला १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं अठ्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥९८॥

सेनेचा तळ पडल्यानंतर भ्रात्याचें दर्शन घेण्याकरितां उत्सुक झालेला भरत (राम जवळ असल्याबद्दलचीं चिन्हें ) शत्रुघ्नाला दर्शवीत दर्शवीत तेथून पुढें चालला १ आणि " माझ्या मातांना सत्वर घेऊन या " असें वसिष्ठ ऋषींना सांगून तो गुरुवत्सल भरत सत्वर पुढें निघाला २. तेव्हां सुमंत्रानेंही जवळच येऊन शत्रुघ्नाला गांठलें. कारण, रामाच्या दर्शनासंबंधानें भरताप्रमाणें शत्रुघ्नाला व त्यालाही उत्कंठा

भ्रातुः पर्णकुटीं श्रीमानुटजं च ददर्श ह ४ शालायास्त्वग्रतस्तस्या ददर्श भरतस्तदा । काष्ठानि चावभग्नानि पुष्पाण्यपचितानि च ५ स लक्ष्मणस्य रामस्य ददर्शाश्रममेयुषः । कृतं वृक्षेष्वभिज्ञानं कुशचीरैः क्वचित्क्वचित् ६ ददर्श भवने तस्मिन्महतः संचयान्कृतान् । मृगाणां महिषाणां च करीषैः शीतकारणात् ७ गच्छन्नेव महाबाहुर्द्युतिमान्भरतस्तदा । शत्रुघ्नं चाब्रवीद्धृष्टस्तानमात्यांश्च सर्वशः ८ मन्ये प्राप्ताः स्म तं देशं भरद्वाजो यमब्रवीत् । नातिदूरे हि मन्येहं नदीं मन्दाकिनीमितः ९ उच्चैर्बद्धानि चीराणि लक्ष्मणेन भवेदयम् । अभिज्ञातकृतः पन्था विकाले गन्तुमिच्छता १० इतश्चोदात्तदन्तानां कुञ्जराणां तरस्विनाम् । शैलपार्श्वे परिक्रान्तमन्योन्यमभिगर्जताम् ११ यमेवाधातुमिच्छन्ति तापसाः सततं वने । तस्यासौ दृश्यते धूमः संकुलः कृष्णवर्त्मनः १२ अत्राहं पुरुषव्याघ्रं गुरुसत्कार-

---

प्राप्त झालेली होती ३. असो. जातां जातां तपस्वी लोकांच्या गृहासहवर्तमान असलेली आपल्या भ्रात्याची पर्णकुटिका आणि एक झोंपडी वैभवशाली भरतानें पाहिली ४ व त्या पर्णकुटिकेच्या पुढें मोडलेलीं काष्ठें आणि पूजेकरितां जुळविलेलीं पुष्पें भरतानें अवलोकन केलीं . नंतर राम आणि लक्ष्मण ह्यांच्या आश्रमासमीप पोंचल्यावर दर्भ आणि वल्कलें ह्यांच्या योगानें वृक्षांचे ठिकाणीं मार्गाचें ज्ञान होण्याकरितां कोठें कोठें चिन्ह केलेलें त्या भरतानें पाहिलें ६. त्या गृहामध्यें थंडीकरितां मृग आणि महिष ह्यांच्या शेणाचे मोठमोठे संचय करून ठेविलेले त्यानें पाहिले ७ आणि तो महापराक्रमी तेजस्वी भरत जातां जातां आनंदित होऊन शत्रुघ्नाला व त्या सर्व अमात्यांना म्हणाला ८ " भरद्वाज मुनींनीं जो प्रदेश आपणांला सांगितला त्या प्रदेशावर आपण आलों असें मला वाटतें. आतां येथून मंदाकिनी नदी फार दूर असलसें वाटत नाहीं ९. ज्याअर्थीं वल्कलें उंच बांधिलेलीं दिसत आहेत त्याअर्थीं वेळीं अवेळीं उदक वगैरे आणण्याचा प्रसंग पडल्यास आपणांला जातां यावें ह्या उद्देशानें लक्ष्मणानें खुणा करून ठेविलेला हा मार्ग आश्रमालाच जात असला पाहिजे १०. ह्या बाजूला एकमेकाला अनुलक्षून गर्जना करणारे मोठमोठ्या दंतांचे महाबलाढ्य गज पर्वताच्या बाजूला संचार करीत असतात. ( तेव्हां चुकून तिकडे जाण्याचा प्रसंग न यावा एतदर्थ मार्ग लक्ष्यांत रहाण्याकरितां ह्या खुणा करून ठेविलेल्या असल्या पाहिजेत ११. सकाळ संध्याकाळ होम देण्याकरितां तपस्वी लोक ज्याला ठेवण्याची इच्छा करितात त्या अग्नीचा हा अस्ताव्यस्त धूर वनामध्यें दिसत आहे १२ व ह्याच ठिकाणीं वडिलांचा सत्कार करणाऱ्या पुरुषश्रेष्ठ सज्जन रामाला

कारिणम् । आर्यं द्रक्ष्यामि संहृष्टं महर्षिमिव राघवम् १३ अथ गत्वा मुहूर्तं तु चित्रकूटं स राघवः । मन्दाकिनीमनु प्राप्तस्तं जनं चेदमब्रवीत् १४ जगत्यां पुरुषव्याघ्र आस्ते वीरासने रतः । जनेन्द्रो निर्जनं प्राप्य धिङ्मे जन्म सजीवितम् १५ मत्कृते व्यसनं प्राप्तो लोकनाथो महाद्युतिः । सर्वान्कामान्परित्यज्य वने वसति राघवः १६ इति लोकसमाक्रुष्टः पादेष्वद्य प्रसादयन् । रामं तस्य पतिष्यामि सीताया लक्ष्मणस्य च १७ एवं स विलपंस्तस्मिन्वने दशरथात्मजः । ददर्श महतीं पुण्यां पर्णशालां मनोरमाम् १८ सालतालाश्वकर्णानां पर्णैर्बहुभिरावृताम् । विशालां मृदुविस्तीर्णां कुशैर्वेदिमिवाध्वरे १९ शक्रायुधनिकाशैश्च कार्मुकैर्भारसाधनैः । रुक्मपृष्ठैर्महासारैः शोभितां शत्रुबाधकैः २० अर्करश्मिप्रतीकाशैर्घोरैस्तूणगतैः शरैः । शोभितां दीप्तवदनैः सर्पैर्भोगवतीमिव २१ महारजतवासोभ्यामसिभ्यां च विराजिताम् । रुक्मबिन्दुविचित्राभ्यां चर्मभ्यां चापि

---

महर्षीप्रमाणें आनंदित असल्याचें मी पाहीन " १३. असें बोलून एक मुहूर्तपर्यंत चित्रकूटपर्वतावर चालून गेल्यानंतर मंदाकिनी नदीजवळ आलेला तो रघुवंशज भरत आपल्याजवळ असलेल्या त्या लोकांना म्हणाला १४ " पुरुषश्रेष्ठ राम पृथ्वीमध्यें लोकांचा अधिपति असूनही आज निर्जन वनामध्यें येऊन व योगिजनांना योग्य असें वीरासन घालून तपश्चर्या करण्याविषयीं तत्पर होऊन राहिला आहे. तस्मात्, धिक्कार असो माझ्या ह्या जन्माला व जिविताला १५. माझ्याकरितां हा लोकाधिपति महातेजस्वी राम संकटांत सांपडला आहे आणि सर्व भाग्य वस्तूंचा त्याग करून वनामध्यें वास्तव्य करीत आहे १६. तस्मात्, लोकनिंदेस पात्र झालेला मी रामाला प्रसन्न करून घेण्याकरितां आज त्याच्या, सीतेच्या व लक्ष्मणाच्या चरणांवर मस्तक ठेवीन " १७. ह्याप्रमाणें तो दशरथपुत्र भरत विलाप करीत करीत जाऊं लागला असतां एक मोठी, मनोहर व पवित्र पर्णकुटिका त्याच्या दृष्टीं पडली १८. ती विशाल, मृदु व विस्तीर्ण पर्णकुटिका दर्भांनीं अच्छादिलेल्या यज्ञांतील वेदीप्रमाणें साल, ताल आणि अश्वकर्ण ह्या वृक्षांच्या असंख्य पानांनीं आच्छादिलेली होती १९. इंद्रचापतुल्य, मोठें कार्य करण्याला साधनभूत, फारच बळकट, सुवर्णभूषित पृष्ठभागांनीं युक्त आणि शत्रुनाशक धनुष्यांनीं तिला शोभा आलेली होती २०. उज्ज्वल मुखांनीं युक्त असलेल्या सर्पांच्या योगानें शोभणाऱ्या नागलोकाप्रमाणें सूर्यकिरणतुल्य तेजस्वी असलेल्या भात्यांतील भयंकर बाणांनीं ती सुशोभित झालेली होती २१. सुवर्णाच्या म्यानांतून असलेल्या खड्गांच्या योगानें ती झळकत असून सुवर्ण-

शोभिताम् २२ गोधाङ्गुलित्रैरासक्तैश्चित्रकाञ्चनभूषितैः । अरिसंघैरनाधृष्यां मृगैः सिंहगुहामिव २३ प्रागुदक्प्रवणां वेदिं विशालां दीप्तपावकाम् । ददर्श भरतस्तत्र पुण्यां रामनिवेशने २४ निरीक्ष्य स मुहूर्तं तु ददर्श भरतो गुरुम् । उटजे राममासीनं जटामण्डलधारिणम् २५ कृष्णाजिनधरं तं तु चीरवल्कलवाससम् । ददर्शराममासीनमभितः पावकोपमम् २६ सिंहस्कन्धं महाबाहुं पुण्डरीकनिभेक्षणम् । पृथिव्याः सागरान्ताया भर्तारं धर्मचारिणम् २७ उपविष्टं महाबाहुं ब्रह्माणमिव शाश्वतम् । स्थण्डिले दर्भसंस्तीर्णे सीतया लक्ष्मणेन च २८ तं दृष्ट्वा भरतः श्रीमान्दुःखमोहपरिप्लुतः । अभ्यधावत धर्मात्मा भरतः कैकयीसुतः २९ दृष्ट्वैव विललापार्तो बाष्पसंदिग्धया गिरा । अशक्नुवन्वारयितुं धैर्याद्वचनमब्रुवन् ३० यः संसदि प्रकृतिभिर्भवेद्युक्त उपासितुम् । वन्यैर्मृगैरुपासीनः सोऽयमास्ते ममाग्रजः ३१ वासोभिर्बहुसाहस्रैर्यो महात्मा पुरोचितः ।

---

बिंदूंच्या योगानें चित्रविचित्र दिसणाऱ्या ढालांनीं तिला शोभा आलेली होती २२ व मृगांना ज्याप्रमाणें सिंहाच्या गुहेमध्यें जाणें अशक्य असतें त्याचप्रमाणें सुवर्णभूषित आणि वृक्षाला लटकलेल्या बाहुत्राणांनीं व अंगुलित्राणांनीं युक्त असलेल्या त्या पर्णकुटिकेवर शत्रुसमूहांनाही चाल करून जातां येणें अशक्य होतें २३. असो. तदनंतर जिच्यावर अग्नि प्रदीप्त झाला आहे असें एक पूर्वेकडे व उत्तरेकडे उतरतें असलेलें पवित्र व विशाल स्थंडिल रामाच्या निवासस्थानामध्यें त्या ठिकाणीं भरतानें अवलोकन केलें २४ आणि क्षणभर तिकडे दृष्टि दिल्यावर झोंपडीमध्यें जटामंडल धारण करून बसलेला ज्येष्ठ भ्राता राम भरताच्या दृष्टीं पडला २५. कृष्णाजिन धारण करून आणि साली व वल्कलें परिधान करून बसलेल्या अग्नितुल्य रामाला भरतानें समीपच अवलोकन केलें २६ आणि सिंहासारिखे स्कंध, आजानुबाहु व कमलासारिखे नेत्र ह्यांनीं युक्त, समुद्रमर्यादित पृथ्वीचा अधिपति, धर्मनिष्ठ, महापराक्रमी आणि दर्भ पसरलेल्या स्थंडिलावर सीता व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान अनादि ब्रह्मदेवाप्रमाणें बसलेल्या २७,२८ त्या रामाला अवलोकन करितांक्षणीं त्या वैभवशाली भरताला दुःखाचें व मोहाचें भरतें आलें आणि तो धर्मनिष्ठ कैकयीपुत्र भरत त्याच्याकडे धावला २९. राम दृष्टीं पडतांक्षणीं भरत दुःखाकुल होऊन विलाप करूं लागला आणि तें दुःख आंवरून धरण्यास असमर्थ होऊन अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अडखळत अडखळत धैर्यानें तो ह्मणाला ३० "राजसभेमध्यें मंत्र्यांनीं सेवा करण्यास जो योग्य आहे तो हा माझा ज्येष्ठ भ्राता वनांतील पशुंसहवर्तमान येथें बसला आहे ३१. पूर्वी हजारों

मृगाजिने सोयमिह प्रवस्ते धर्ममाचरन् ३२ अधारयद्यो विविधाश्चित्राः सुमनसः सदा। सोयं जटाभारमिमं महते राघवः कथम् ३३ यस्य यज्ञैर्यथादिष्टैर्युक्तो धर्मस्य संचयः। शरीरक्लेशसंभूतं स धर्मं परिमार्गते ३४ चन्दनेन महार्हेण यस्याङ्गमुपसेवितम्। मलेन तस्याङ्गमिदं कथमार्यस्य सेव्यते ३५ मन्निमित्तमिदं दुःखं प्राप्तो रामः सुखोचितः। धिग्जीवितं नृशंसस्य मम लोकविगर्हितम् ३६ इत्येवं विलपन्दीनः प्रस्विन्नमुखपङ्कजः। पादावप्राप्य रामस्य पपात भरतो रुदन् ३७ दुःखाभितप्तो भरतो राजपुत्रो महाबलः। उक्त्वार्येति सकृद्दीनं पुनर्नोवाच किंचन ३८ बाष्पैः पिहितकण्ठश्च प्रेक्ष्य रामं यशस्विनम्। आर्येत्येवाभिसंक्रुश्य व्याहर्तुं नाशकत्ततः ३९ शत्रुघ्नश्चापि रामस्य ववन्दे चरणौ रुदन्। तावुभौ च समालिङ्ग्य रामोप्यश्रूण्यवर्तयत् ४० ततः सुमन्त्रेण गुहेन चैव समीयतू राजसुतावरण्ये। दिवाकरश्चैव निशाकरश्च यथाम्बरे शुक्रबृहस्पतिभ्याम् ४१

---

रुपये किमतीच्या वस्त्रांनीं जो महात्मा आपलें शरीर भूषित करीत असे तो आज सत्यरूप धर्माचें परिपालन करण्याकरितां कृष्णाजिनें परिधान करीत आहे ३२. अरे, नानाप्रकारच्या आश्चर्यकारक पुष्पमाला जो पूर्वीं नेहमीं धारण करीत असे तो हा राघव हा जटाभार कसा बरें सहन करीत आहे! ३३. शास्त्रविहित ( आणि ऋत्विजांच्याच क्लेशांनीं साध्य अशा ) यज्ञांनीं ज्याचा धर्मसंचय होणें योग्य आहे तो हा स्वतःच्या शारीरिक क्लेशांपासून प्राप्त होणाऱ्या धर्माच्या मागोमाग आला आहे ३४. मोठ्या मूल्यवान् चंदनानें ज्याच्या शरीराचा उपचार पूर्वीं होत असे त्या सज्जनाच्या शरीराची सेवा आज मळ कशी बरें करीत आहे! ३५. सुखाचा उपभोग घेत आलेल्या रामाला माझ्याकरितां हें दुःख प्राप्त झालें आहे. तस्मात्, मज दुष्टाच्या लोकनिंदेस पात्र झालेल्या जीविताला धिक्कार असो" ३६. ह्याप्रमाणें मुखकमल घामानें डवडवून जाऊन विलाप करीत असलेला दीन भरत रडत रडत रामाच्या पायांपर्यंतही जाऊन न पोंचतां मध्येंच पडला ३७ आणि दुःखानें संतप्त झालेला तो महाबलाढ्य राजकुमार भरत "हे आर्य," असें एकदांच दीन स्वरानें ह्मणून स्वस्थ राहिला व पुढें त्याच्या तोंडांतून कांहींच शब्द निघेनासा झाला ३८. अश्रूंनीं कंठ दाटून आलेल्या भरतानें आर्य रामाकडे पाहून "आर्य" इतकेंच ह्मणून टाहो फोडिल्यावर पुढें कांहींच भाषण करण्याला तो समर्थ होईना ३९. असो. भरतानें वंदन केल्यानंतर शत्रुघ्नानेंही रडत रडत रामाच्या चरणांना वंदन केलें आणि त्या उभयतांना कवटाळून धरिल्यावर रामही अश्रू ढाळूं लागला ४०. तदनंतर आकाशामध्यें गुरुशुक्राचा समागम होणाऱ्या

तान्पार्थिवान्वारणयूथपार्हान्समागतांस्तत्र महत्यरण्ये। वनौकसस्तेभिसमीक्ष्य सर्वे त्वश्रूण्यमुञ्चन्प्रविहाय हर्षम् ४२ [३७०२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येयोध्याकाण्डे नवनवतितमः सर्गः ॥ ९९ ॥

जटिलं चीरवसनं प्राञ्जलिं पतितं भुवि। ददर्श रामो दुर्दर्शं युगान्ते भास्करं यथा १ कथंचिदभिविज्ञाय विवर्णवदनं कृशम्। भ्रातरं भरतं रामः परिजग्राह पाणिना २ आघ्राय रामस्तं मूर्ध्नि परिष्वज्य च राघवम्। अङ्के भरतमारोप्य पर्यपृच्छत सादरम् ३ क्व नु तेभूत्पिता तात यदरण्यं त्वमागतः। न हि त्वं जीवतस्तस्य वनमागन्तुमर्हसि ४ चिरस्य बत पश्यामि दूराद्भरतमागतम्। दुष्प्रतीकमरण्येस्मिन्किं तात वनमागतः ५ कच्चिन्नु धरते तात राजा यत्त्वमिहागतः। कच्चिन्न दीनः सहसा राजा लोकान्तरं गतः ६ कच्चित्सौम्य न ते राज्यं भ्रष्टं बालस्य शाश्वतम्। कच्चिच्छुश्रूषसे तात पितुः सत्यपराक्रम ७ कच्चिद्दशरथो राजा कुशली

---

चंद्राप्रमाणें अरण्यामध्यें त्या राजकुमार रामलक्ष्मणांचा सुमंत्र व गुह यांच्याशीं समागम झाला ४१. तेव्हां कळपांतील मुख्य मुख्य गजांवर आरोहण करण्यास योग्य असलेले ते राजकुमार महावनामध्यें एकत्र झाल्याचें पाहून वनामध्यें वास्तव्य करणाऱ्या त्या सर्व लोकांनीं हर्षाचा त्याग करून अश्रु ढाळण्याला आरंभ केला ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं नव्याण्णवावा सर्ग समाप्त झाला ॥ ९९ ॥

युगसमाप्तिकालीं भूमीवर पडणाऱ्या सूर्याप्रमाणें जटा धारण करून वल्कलें परिधान केलेला व दुःखाकुल झाल्यामुळें मोठ्या कष्टानें ओळखूं येणारा भरत हात जोडून पृथ्वीवर पडलेला रामानें अवलोकन केला १ आणि मुखावरील कांति नाहींशी होऊन कृश झालेल्या त्या भ्रात्या भरताला मोठ्या कष्टानें ओळखिल्यावर रामानें त्याचा हात धरिला २. नंतर त्याचें मस्तकीं अवघ्राण करून, त्याला कवटाळून धरून आणि त्याला मांडीवर बसवून राम आदरपूर्वक त्या भरताला ह्मणाला ३ " बा भरता, ज्याअर्थीं तूं वनामध्यें आला आहेस त्याअर्थीं तुझा पिता कोणीकडे गेला आहे ? तो जिवंत असतांना वनांत येणें तुला योग्य नाहीं ४. खरोखर मोठ्या कष्टानें ओळखूं येणारा भरत दुरून ह्या अरण्यामध्यें आलेला आज मी पुष्कळ दिवसांनीं पहात आहें. बा भरता, कां रे वनामध्यें आलास ! ५. बा भरता, राजा प्राण धारण करीत आहे नां ! अरे, ज्याअर्थीं तूं येथें आला आहेस त्याअर्थीं तो दीन राजा एकाएकीं परलोकीं तर गेला नाहीं नां ! ६. हे सौम्या, तुज बाळाचें अक्षय्य राज्य भ्रष्ट होण्याचा तर प्रसंग आला

सत्यसंगरः । राजसूयाश्वमेधानामाहर्ता धर्मनिश्चितः ८ स कच्चिद्ब्राह्मणो विद्वान्धर्मनित्यो महाद्युतिः । इक्ष्वाकूणामुपाध्यायो यथावत्तात पूज्यते ९ तात कच्चिच्च कौसल्या सुमित्रा च प्रजावती । सुखिनी कच्चिदार्या च देवी नन्दति कैकयी १० कच्चिद्विनयसंपन्नः कुलपुत्रो बहुश्रुतः । अनसूयरनुद्रष्टा सत्कृतस्ते पुरोहितः ११ कच्चिदग्निषु ते युक्तो विधिज्ञो मतिमानृजुः । हुतं च होष्यमाणं च काले वेदयते सदा १२ कच्चिद्देवान्पितॄन्भृत्यान्गुरून्पितृसमानपि । वृद्धांश्च तात वैद्यांश्च ब्राह्मणांश्चाभिमन्यसे १३ इष्वस्त्रवरसंपन्नमर्थशास्त्रविशारदम् । सुधन्वानमुपाध्यायं कच्चित्त्वं तात मन्यसे १४ कच्चिदात्मसमाः शूराः श्रुतवन्तो जितेन्द्रियाः । कुलीनाश्चेङ्गितज्ञाश्च कृतास्ते तात मन्त्रिणः १५ मन्त्रो विजयमूलं हि राज्ञां भवति राघव । सुसंवृतो मन्त्रिधुरैरमात्यैः शास्त्रकोविदैः १६ कच्चिन्निद्रावशं नैषि कच्चित्कालेवबुध्यसे । कच्चिच्चापररात्रेषु चिन्तयस्यर्थनैपुणम् १७ कच्चि-

नाहीं नां ? बा असत्यपराक्रमी भरता, तूं पित्याची शुश्रूषा करीत असतोस नां ? ७. राजसूय आणि अश्वमेध याग करणारा व धर्माविषयीं निश्चय असलेला सत्यप्रतिज्ञ दशरथ राजा कुशल आहे नां ? ८ बा भरता, नेहमीं धर्मानें वागणाऱ्या त्या इक्ष्वाकुवंशजांच्या महातेजस्वी विद्वान् ब्राह्मण उपाध्यायाची पूर्णपणें मानमान्यता रहात असते नां ? ९. बा भरता, कौसल्या, पुत्रवती सुमित्रा आणि त्याचप्रमाणें सुखांत असलेली राजपत्नी भार्या कैकयी आनंदांत आहे नां ? १०. विनयसंपन्न, कुलीन, बहुश्रुत मत्सररहित आणि राजकुलाचें हित पहाणाऱ्या अशा पुरोहित वसिष्ठपुत्राचा तूं सत्कार करीत असतोस नां ? ११. अग्नींना होम देण्याकरितां तूं बुद्धिमान्, सरळ व सर्व होमविधि जाणणारा ऋत्विज नेमिला आहेस नां ? आणि वेळेवर होम झाल्याचें व होम होत असल्याचें तो तुला नेहमीं कळवीत असतो नां ? १२. बा भरता, देव, पितर, सेवक, पितृतुल्य गुरु, वृद्ध आणि विद्वान् ब्राह्मण ह्यांचा तूं मान ठेवीत असतोस नां ? १३. उत्कृष्ट बाण व अस्त्रें सोडण्यामध्यें निपुण व राजनीतीमध्यें पंडित अशा सुधन्वासंज्ञक धनुर्वेदाचार्याचा तूं मान राखीत असतोस नां १४. बा भरता, तूं आपले मंत्रि, आपणांसारिखे, शूर, बहुश्रुत, जितेंद्रिय, कुलीन आणि इंगित जाणणारे केले आहेस नां ? १५. हे राघवा, मसलत हें राजांच्या विजयाचें मूळ आहे. तेव्हां श्रेष्ठ मंत्रि आणि नीतिशास्त्रज्ञ अमात्य ह्यांसहवर्तमान तुझी मसलत अगदीं गुप्तपणें चालत असते नां ? १६. तूं निद्रेच्या अधीन होत नाहींस नां ? वेळेवर जागा होत असतोस नां ? आणि अर्थप्राप्तीच्या उपायाविषयीं उत्तर रात्रीं चिंतन करीत असतोस नां ? १७. तूं कधीं एकटाच

न्मन्त्रयसे नैकः कच्चिन्न बहुभिः सह । कच्चित्ते मन्त्रितो मन्त्रो राष्ट्रं न परिधावति १८ कच्चिदर्थं विनिश्चित्य लघुमूलं महोदयम् । क्षिप्रमारभसे कर्म न दीर्घयसि राघव १९ कच्चित्तु सुकृतान्येव कृतरूपाणि वा पुनः । विदुस्ते सर्वकार्याणि न कर्तव्यानि पार्थिवाः २० कच्चिन्न तर्कैर्युक्त्या वा ये चाप्यपरिकीर्तिताः । त्वया वा तव वामात्यैर्बुध्यते तात मन्त्रितम् २१ कच्चित्सहस्रैर्मूर्खाणामेकमिच्छसि पण्डितम् । पण्डितो ह्यर्थकृच्छ्रेषु कुर्यान्निःश्रेयसं महत् २२ सहस्राण्यपि मूर्खाणां यद्युपास्ते महीपतिः । अथवाप्ययुतान्येव नास्ति तेषु सहायता २३ एकोऽप्यमात्यो मेधावी शूरो दक्षो विचक्षणः । राजानं राजपुत्रं वा प्रापयेन्महतीं श्रियम् २४ कच्चिन्मुख्या महत्स्वेव मध्यमेषु च मध्यमाः । जघन्याश्च जघन्येषु भृत्यास्ते तात

बेत करीत नसतोस नां ? अथवा पुष्कळांनाही बरोबर घेऊन कधीं बेत करीत नाहींस नां ? आणि त्याचप्रमाणें तूं ठरविलेली मसलत अमलांत येण्यापूर्वीच राष्ट्रामध्यें विदित होत नाहीं नां १८. अल्प प्रयत्नानें साध्य आणि महाफलदायक अशी एकादी गोष्ट करण्याचा निश्चय झाल्यावर, हे राघवा, विलंब न करितां तूं लवकर ती करण्याला आरंभ करीत असतोस नां ? १९. मांडलिक राजांना तुझीं कृत्यें अमलांत आल्यावर अथवा अमलांत आल्यासारखीं झाल्यावरच समजत असून पुढें होणारीं तुझीं कृत्यें त्यांना समजत नाहींत नां ? २०. तुझ्या मसलती तूं अथवा तुझ्या अमात्यांनीं जरी बाहेर फोडिल्या नाहींत तरी युक्तीनें अथवा अनुमानांनीं त्या इतरांच्या समजण्यांत येत नाहींत नां ? आणि त्याचप्रमाणें इतरांनीं केलेली मसलत, बा भरता, तुला अथवा तुझ्या अमात्यांना समजत असते नां ? २१. द्रव्याच्या अडचणी आल्या असतां ( त्यांतून पार पडण्याचा निश्चित उपाय सांगण्यानें ) पंडित मोठेंच कल्याण करीत असतो. ह्यास्तव, हजारों मूर्खांची पर्वा न करितां तूं एका पंडिताची इच्छा करीत असतोस नां ? २२. हजारोंच नव्हे परंतु, लाखों[१] मूर्ख लोक जरी राजाजवळ असले तरी त्यांची राजाला मदत होत नाहीं २३ आणि बुद्धिमान्, शूर, दक्ष व नीतिशास्त्रवेत्ता असा एक जरी अमात्य जवळ असला तरी तो राजाला अथवा राजपुत्राला मोठें वैभव प्राप्त करून देईल २४. बा भरता, मोठ्या कार्याकडे मुख्य, मध्यम कृत्याकडे मध्यम आणि क्षुल्लक कामाकडे हलक्या सेवकांची तूं योजना केली आहेस

१ मूळ शब्द "अयुतानी" असा आहे व अयुत शब्दाचा अर्थ दहाहजार असा आहे; परंतु, दहाहजारों असें ह्मणण्याचा परिपाठ नसल्यामुळें "अयुतानि" ह्याचें भाषांतर भाषेंत जुळण्याकरितां "लाखों" असें केलें आहे.

योजिताः २५ अमात्यानुपधातीतान्पितृपैतामहाञ्शुचीन् । श्रेष्ठाञ्छ्रेष्ठेषु कच्चित्त्वं नियोजयसि कर्मसु २६ कच्चिन्नोग्रेण दण्डेन भृशमुद्वेजिताः प्रजाः । राष्ट्रे तवावजानन्ति मन्त्रिणः कैकयीसुत २७ कच्चित्त्वां नावजानन्ति याजकाः पतितं यथा । उग्रप्रतिग्रहीतारं कामयानमिव स्त्रियः २८ उपायकुशलं वैद्यं भृत्यं संदूषणे रतम् । शूरमैश्वर्यकामं च यो न हन्ति स हन्यते २९ कच्चिद्धृष्टश्च शूरश्च धृतिमान्मतिमाञ्छुचिः । कुलीनश्चानुरक्तश्च दक्षः सेनापतिः कृतः ३० बलवन्तश्च कच्चित्ते मुख्या युद्धविशारदाः । दृष्टापदाना विक्रान्तास्त्वया सत्कृत्य मानिताः ३१ कच्चिद्बलस्य भक्तं च वेतनं च यथोचितम् । संप्राप्तकालं दातव्यं ददासि न विलम्बसे ३२ कालातिक्रमणे ह्येव भक्तवेतनयोर्भृताः । भर्तुरप्यतिकुप्यन्ति सोऽनर्थः सुमहान्कृतः ३३ कच्चि-

नां ? २५. वाडवडिलांपासून चालत आलेले, आचरणानें शुद्ध आणि निष्कपट अशा श्रेष्ठ अमात्यांची तूं श्रेष्ठ कार्यांकडेच योजना करीत असतोस नां ? २६. हे कैकयीपुत्रा भरता, क्षुल्लक अपराधाला कडक शिक्षा केल्यामुळें क्षुब्ध करून टाकिलेले प्रजाजन व मंत्रि राष्ट्रामध्यें तुझा अवमान करीत नाहींत नां ? २७. याजक ज्याप्रमाणें पतिताचा अपमान करितात आणि बलात्कारासारिखें भयंकर कृत्य करून स्त्रीचा स्वीकार करणाऱ्या कामिक पुरुषाचा स्त्रिया अपमान करितात त्याप्रमाणें प्रजा तुझा अपमान करीत नाहींत नां? २८. सामादि उपायांविषयीं चतुर, राजनीतिशास्त्र जाणणारा, विश्वासु सेवकाशीं राजाचें वाकडें आणण्याविषयीं तत्पर, शूर आणि राज्याभिलाषी सेवकाचा जो वध करीत नाहीं त्याचाच वध होतो २९. धीट, शूर, धैर्यवान्, बुद्धिमान्, आचरणानें पवित्र, कुलीन, राजनिष्ठ आणि चतुर असा सेनापति तूं केला आहेस नां ? ३०. तुझ्या सेनेंतील मुख्य लोक पराक्रमाविषयीं कसोटीला उतरलेले बलाढ्य, युद्धाविषयीं निपुण आणि पराक्रमी असून सत्कारानें तूं त्यांची मानमान्यता राखीत असतोस नां ? ३१. वेळेवरच देण्यास योग्य असा सैन्याचा भत्ता आणि पगार तूं विलंब न करितां देत असतोस नां? ३२. कारण, भत्त्याची व पगाराची वेळ टळून गेली ह्मणजे हातावर पोट भरणारे सेवक लोक धन्यावर फारच क्रुद्ध होतात आणि त्यामुळें मोठाच अनर्थ ओढवतो ३३. तुझ्या कुलांतील लोक आणि प्रधान हे

१ हुरद्याच्या चोराला फांशीची शिक्षा अशासारिखे प्रकार जरी सध्यां अनेक प्रसंगीं ह्या देशांत दृष्टोत्पत्तीस येऊन ते प्रजेच्या क्षोभाला साधन होऊन बसतात तरी विनाकारण कडक शिक्षा देऊन प्रजा क्षुब्ध करणें हें एक राज्याला अपाय होण्याचें कारण ह्मणून अति प्राचीन कालापासूनच ह्या देशांतील राजे मानीत आले असल्याचें दिसतें.

त्सर्वेऽनुरक्तास्त्वां कुलपुत्राः प्रधानतः । कच्चित्प्राणांस्तवार्थेषु संत्यजन्ति समाहिताः ३४ कच्चिज्जानपदो विद्वान्दक्षिणः प्रतिभानवान् । यथोक्तवादी दूतस्ते कृतो भरत पण्डितः ३५ कच्चिदष्टादशान्येषु स्वपक्षे दश पञ्च च । त्रिभिस्त्रिभिरविज्ञातैर्वेत्सि तीर्थानि चारणैः ३६ कच्चिद्व्यपास्तानहितान्प्रतियातांश्च सर्वदा । दुर्बलाननवज्ञाय वर्तसे रिपुसूदन ३७ कच्चिन्न लोकायतिकान्ब्राह्मणांस्तात सेवसे । अनर्थकुशला ह्येते बालाः पण्डितमानिनः ३८ धर्मशास्त्रेषु मुख्येषु विद्यमानेषु दुर्बुधाः । बुद्धिमान्वीक्षिकीं प्राप्य निरर्थं प्रवदन्ति ते ३९ वीरैरध्युषितां पूर्वमस्माकं तात पूर्वकैः । सत्यनामां दृढद्वारां हस्त्यश्वरथसंकुलाम् ४० ब्राह्मणैः क्षत्रियैर्वैश्यैः स्वकर्मनिरतैः सदा । जितेन्द्रियैर्महोत्साहैर्वृतामार्यैः सहस्रशः ४१

सर्व तुझे ठिकाणीं अनुरक्त व तुझ्या हिताविषयीं तत्पर असून तुझ्या कार्याकरितां प्राण देण्यास तयार असतात नां? ३४. हे भरता, देशांतील रहाणारा, विद्वान्, सरळ, समयसूचक, सांगितलेलाच निरोप सांगणारा आणि चतुर असा दूत तूं केला आहेस नां? ३५. (मंत्री, पुरोहित, युवराजा, सेनापति, दौवारिक, अंतःपुराध्यक्ष, तुरुंगावरील अधिकारी, खजीनदार, राजाची आज्ञा कळविणारा, न्यायाधीश, धर्माध्यक्ष, पंच, सैन्याला पगार वाटणारा, काम झाल्यावर पगार घेणारे, नगररक्षक, राष्ट्रसीमारक्षक, दुष्टांना दंड करणारा अधिकारी आणि जल, पर्वत, वन व स्थल येथील किल्ले राखणारे अशा) शत्रुपक्षाकडील अठरा प्रकारच्या अधिकाऱ्यांच्या आणि (मंत्री, पुरोहित व युवराज हे पहिले तीन वजा करून बाकी राहिलेल्या ) आपणांकडील पंधरा हुद्देदारांच्या प्रत्येका मागें परस्परांना माहीत नसलेले असे तीन तीन हेर ठेवून तूं शोध आणवीत असतोस नां ? ३६. हे शत्रुनाशका भरता, राज्याला अपाय करणारे लोक घालवून दिल्यावर परत आले असतां ते दुर्बल आहेत असें समजून तूं कधींही त्यांची उपेक्षा करीत नसतोस नां ? ३७. बा भरता, केवल प्रत्यक्ष प्रमाणाचेंच अवलंबन करून चालणारे ब्राह्मण तूं जवळ ठेवीत नसतोस नां ? कारण, हे पंडितंमन्य मूर्ख अनर्थ उत्पन्न करण्याविषयीं मात्र कुशल असतात ३८ आणि मुख्य प्रमाणभूत अशीं धर्मशास्त्रें विद्यमान असतांना शुष्क तर्कशास्त्रामुळें सुचणाऱ्या बुद्धीचें अवलंबन करून ते दुर्बुद्धि निरर्थक बडबड करीत असतात ३९. बा भरता, वीरांनीं जिच्यामध्यें वास्तव्य केलें आहे, आमच्या पूर्वजांनीं जिचें नांव खरें करून दाखविलें आहे, दृढ द्वारांनीं जी युक्त आहे, गज, अश्व आणि रथ ह्यांनीं जी भरलेली आहे ४०, जितेंद्रिय, मोठे उत्साही, सभ्य व सत्कर्माविषयीं तत्पर अशा हजारों

प्रासादैर्विविधाकारैर्वृतां वैद्यजनाकुलाम् । कच्चित्समुदितां स्फीतामयोध्यां परिरक्षसि ४२ कच्चिच्चैत्यशतैर्जुष्टः सुनिविष्टजनाकुलः । देवस्थानैः प्रपाभिश्च तटाकैश्चोपशोभितः ४३ प्रहृष्टनरनारीकः समाजोत्सवशोभितः । सुकृष्टसीमापशुमान्हिंसाभिरभिवर्जितः ४४ अदेवमातृको रम्यः श्वापदैः परिवर्जितः । परित्यक्तो भयैः सर्वैः खनिभिश्चोपशोभितः ४५ विवर्जितो नरैः पापैर्मम पूर्वैः सुरक्षितः । कच्चिज्जनपदः स्फीतः सुखं वसति राघव ४६ कच्चित्ते दयिताः सर्वे कृषिगोरक्ष्यजीविनः । वार्तायां संप्रतं तात लोकोयं सुखमेधते ४७ तेषां गुप्तिपरीहारैः कच्चित्ते भरणं कृतम् । रक्ष्या हि राज्ञा धर्मेण सर्वे विषयवासिनः ४८ कच्चित्स्त्रियः सान्त्वयसे कच्चित्तास्ते सुरक्षिताः । कच्चिन्न श्रद्दधास्यासां कच्चिद्गुह्यं न भाषसे ४९ कच्चिन्नागवनं गुप्तं कच्चित्ते सन्ति धेनुकाः । कच्चिन्न गणिकाश्वानां कुञ्जराणां च तृप्यसि ५० कच्चिद्दर्शयसे नित्यं मानुषाणां विभू-

---

ब्राह्मणांनीं, क्षत्रियांनीं व वैश्यांनीं जी व्याप्त झालेली आहे ४१, अनेक आकारांच्या प्रासादांनीं जी परिवेष्टित झालेली आहे आणि विद्वान् लोकांनीं जी गजबजलेली आहे अशा अभ्युदयावस्थेंत असलेल्या समृद्ध अयोध्येचें तूं रक्षण करीत आहेस नां ? ४२. उत्तर ऋतूमध्यें अग्निचयन केलेल्या शेंकडों प्रदेशांनीं व्याप्त, फारच व्यवस्थित रीतीनें राहिलेल्या लोकांनीं खेंचलेला, देवस्थानें, पाणपोयी आणि तटाक ह्यांनीं सुशोभित ४३, आनंदित स्त्रीपुरुषांनीं युक्त, समाज आणि उत्सव ह्यांनीं सुशोभित, सीमेपर्यंत नांगरलेल्या शेतांनीं व पशूंनीं युक्त, हिंसारहित ४४, नद्यांच्या उदकावर पिकें येणारा, रम्य, श्वापदांनीं रहित, सर्व भयशून्य, सुवर्णादिकांच्या खाणींनीं सुशोभित ४५, पापी लोकांनीं वर्ज्य केलेला आणि माझ्या पूर्वजांनीं सुरक्षित ठेविलेला असा आपला देश समृद्ध असून, हे रघुवंशजा भरता, सुखानें रहात आहे नां ? ४६. कृषिकर्म, पशुपालन वगैरेवर उपजीविका करणारे वैश्य लोक तुला प्रिय आहेत नां ? कारण, बा भरता, सांप्रत ह्या लोकांना आपल्या धंद्यामध्यें सुख होत आहे नां ? ४७. इष्ट गोष्टींची प्राप्ति आणि अनिष्ट गोष्टींचा परिहार ह्यांच्या योगानें तूं त्या लोकांचें पोषण केलें आहेस नां ? अरे राजानें देशांत राहणाऱ्या सर्व लोकांचें धर्मानें परिपालन केलें पाहिजे ४८. स्त्रियांचें तूं सांत्वन करीत असतोस नां ? त्या तूं सुरक्षित ठेवल्या आहेस नां? त्यांच्यावर विश्वास ठेवीत नाहींस नां ? आणि गुह्य गोष्टी त्यांना सांगत नाहींस नां ? ४९. हत्तींचें वन तूं सुरक्षित ठेविलें आहेस नां ? तुझ्यापाशीं धेनू आहेत नां ? आणि हत्तीणी, अश्व व गज संपादन करण्याविषयीं तुझी तृप्ति झाली नाहीं नां ? ५०.

पितम् । उत्थायोत्थाय पूर्वाह्णे राजपुत्र महापथे ५१ कच्चिन्न सर्वे कर्मान्ताः प्रत्यक्षास्तेविशङ्कया । सर्वे वा पुनरुत्सृष्टा मध्यमेवात्र कारणम् ५२ कच्चिद्दुर्गाणि सर्वाणि धनधान्यायुधोदकैः । यन्त्रैश्च प्रतिपूर्णानि तथा शिल्पिधनुर्धरैः ५३ आयस्ते विपुलः कच्चित्कच्चिदल्पतरो व्ययः । अपात्रेषु न ते कच्चित्कोशो गच्छति राघव ५४ देवतार्थे च पित्रर्थे ब्राह्मणाभ्यागतेषु च । योधेषु मित्रवर्गेषु कच्चिद्गच्छति ते व्ययः ५५ कच्चिदार्योपि शुद्धात्मा क्षारितश्चापकर्मणा । अदृष्टः शास्त्रकुशलैर्न लोभाद्बध्यते शुचिः ५६ गृहीतश्चैव पृष्टश्च काले दृष्टः सकारणः । कच्चिन्न मुच्यते चोरो धनलोभान्नरर्षभ ५७ व्यसने कच्चिदाढ्यस्य दुर्बलस्य च राघव । अर्थं विरागाः पश्यन्ति तवामात्या बहुश्रुताः ५८ यानि मिथ्याभिशस्तानां पतन्त्यश्रूणि राघव । तानि पुत्रपशून्घ्नन्ति प्रीत्यर्थमनुशासतः ५९ कच्चिद्वृद्धांश्च

---

हे राजपुत्रा, प्रत्यहीं सकाळीं उठून राजमार्गांतील लोकांना स्वतःला नित्य आलंकृत करून दाखवीत असतोस नां ? ५१. सर्व कामगार लोक निर्भयपणें तुझ्यासमक्ष वावरत नाहींत नां ? अथवा ते सर्वही कामगार अगदीं तुझें दर्शनही टाकीत नाहींत नां ? निर्भयपणें पुढें न येतां अथवा मुळीं दृष्टीं पडण्याचेंही न टाळतां कामगार लोकांनीं मध्यम वृत्ति स्वीकारणें हेंच अर्थप्राप्तीचें कारण आहे ५२. तुझे सर्व किल्ले,—धनधान्य, आयुधें, उदक, यंत्रें कारागीर आणि धनुर्धर ह्यांनीं — भरलेले असतात नां ? ५३. हे रघवंशजश्रेष्ठ भरता, तुझा आदा मोठा असून खर्च कमी आहे नां ? आणि अयोग्य ठिकाणीं तुझा खजिना खर्च होत नाहीं नां ? ५४. देवता, पितर, ब्राह्मण, अभ्यागत, योद्धे आणि मित्रवर्ग ह्यांकडेच तुझा खर्च होत आहे नां ? ५५. शुद्ध मनानें युक्त अशा एकाद्या सभ्य गृहस्थावर दुष्कृत्याचा आरोप आला असतां शास्त्रनिपुण लोकांकडून त्याचा निर्णय न होतां तो शुद्ध असतांनाच लोभामुळें त्याला दंड होत नाहीं नां ? ५६. हे पुरुषश्रेष्ठा भरता, एकादा चोर धरला गेला असून तो सकारण धरला गेला आहे असें दृष्टोत्पत्तीस आलें असतांना व त्याच्या जबानीवरूनही त्यानें चोरी केली असें निश्चित असतांना द्रव्यलोभामुळें तो कधीं सुटून जात नाहीं नां ? ५७. हे रघवंशज भरता, एखाद्या धनाढ्य गृहस्थावर अथवा दरिद्री गृहस्थावर कांहीं खटले उपस्थित झाले असतां तुझे बहुश्रुत आमात्य निर्लोभी राहून त्या खटल्याचा निकाल लावीत असतात नां ? ५८. हे राघवा, निष्कारण दोषारोप केलेल्या प्रजांच्या नेत्रांतून जे अश्रु पडतात ते राज्योपभोगजन्य सुखाकडेच दृष्टि देऊन राज्य करणाऱ्या राजाच्या पुत्रांचा व पशूंचा घात करितात ५९. हे रघुवंशजा, वृद्ध आणि बाल अशा श्रेष्ठ वैद्यांना—

बालांश्च वैद्यान्मुख्यांश्च राघव। दानेन मनसा वाचा त्रिभिरेतैर्बुभूषसे ६० कच्चिद्गुरूंश्च वृद्धांश्च तापसान्देवतातिथीन्। चैत्यांश्च सर्वान्सिद्धार्थान्ब्राह्मणांश्च नमस्यसि ६१ कच्चिदर्थेन वा धर्ममर्थं धर्मेण वा पुनः। उभौ वा प्रीतिलोभेन कामेन न विबाधसे ६२ कच्चिदर्थं च कामं च धर्मं च जयतां वर। विभज्य काले कालज्ञ सर्वान्वरद सेवसे ६३ कच्चित्ते ब्राह्मणः शर्म सर्वशास्त्रार्थकोविदः। आशंसते महाप्राज्ञ पौरजानपदैः सह ६४ नास्तिक्यमनृतं क्रोधं प्रमादं दीर्घसूत्रताम्। अदर्शनं ज्ञानवतामालस्यं पञ्चवृत्तिताम् ६५ एकचिन्तनमर्थानामनर्थज्ञैश्च मन्त्रणम्। निश्चितानामनारम्भं मन्त्रस्यापरिरक्षणम् ६६ मङ्गलाद्यप्रयोगं च प्रत्युत्थानं च सर्वतः। कच्चित्त्वं वर्जयस्येतान्राजदोषांश्चतुर्दश ६७ दशपञ्चचतुर्वर्गान्सप्तवर्गं च तत्त्वतः। अष्टवर्गं त्रिवर्गं च विद्यास्तिस्रश्च राघव ६८ इन्द्रियाणां जयं

---

इष्टवस्तूचें दान स्नेहयुक्त मन आणि माधुर्ययुक्त वाणी ह्या तीन साधनांनी—आपलेसे करून घेत असतोस नां ? ६०. गुरु, वृद्ध, तपस्वी, देवता अतिथि, देवतानिवासस्थानभूत असलेले चवाठ्यावरील मोठमोठे वृक्ष आणि जन्माचें सार्थक केलेले ब्राह्मण ह्या सर्वांना तूं वंदन करीत असतोस नां? ६१. अर्थानें धर्माला, धर्मानें अर्थाला किंवा त्या उभयतांनाही विषयलोभरूप कामानें कधीं बाध आणीत नाहींस ना ? ६२. हे इष्टवस्तु देणाऱ्या विजयीश्रेष्ठ कालवेत्त्या भरता, धर्म, अर्थ, आणि काम ह्या सर्वांचें तूं वेळा नेमून योग्य कालीं सेवन करीत असतोस नां? ६३. हे महाज्ञानवान् भरता, सर्व शास्त्रांमध्यें निष्णात असलेले ब्राह्मण राजधानींतील व देशांतील इतर लोकांसहवर्तमान तुझ्या सुखाची इच्छा करीत असतात नां ? ६४. नास्तिकपणा, असत्य भाषण, क्रोध, हयगय, चेंगटपणा, ज्ञानवानांची भेट न घेणें, आळस, इंद्रियाधीनत्व ६५, एकट्यानेंच राज्यकारणाचा विचार करणें, विपरीत समजूत असलेल्या लोकांच्या साहाय्यानें मसलत करणें, कर्तव्य ह्मणून ठरलेल्या गोष्टी करण्यास आरंभ न करणें, गुप्त मसलतीचें रक्षण न करणें ६६. उठल्याबरोबर प्रातःकालीं अथीं मंगलावह कृत्याचें अनुष्ठान न करणें आणि चोहोंकडील शत्रूंवर एकदम हल्ला करणें ह्या चौदा राजदोषांपासून तूं आलग रहात असतोस नां? ६७. हे राघवा, (मृगया, द्यूत, दिवसा निद्रा, निंदा, स्त्रीसेवा, मद, नृत्य, गीत, वाद्य, आणि निष्कारण पर्यटण हा ) दशवर्ग, ( उदकावरील, पर्वतावरील, वृक्षावरील, उखर प्रदेशावरील आणि माळ जमिनीवरील असे पांच प्रकारचे किल्ले हा) पंचवर्ग, (साम, दान, भेद, आणि दंड हा ) चतुर्वर्ग, (स्वामी, अमात्य, राष्ट्र, किल्ले, खजिना, सैन्य आणि मित्र हा),

बुद्ध्या षाड्गुण्यं दैवमानुषम् । कृत्यं विंशतिवर्गं च तथा प्रकृतिमण्डलम् ६९ यात्रादण्डविधानं च द्वियोनी संधिविग्रहौ । कच्चिदेतान्महाप्राज्ञ यथावदनुमन्यसे ७० मन्त्रिभिस्त्वं यथोद्दिष्टं चतुर्भिस्त्रिभिरेव वा । कच्चित्समस्तैर्व्यस्तैश्च मन्त्रं मन्त्रयसे बुध ७१ कच्चित्ते सफला वेदाः कच्चित्ते सफलाः क्रियाः । कच्चित्ते सफला दाराः कच्चित्ते सफलं श्रुतम् ७२ कच्चिदेषैव

---

सप्तमवर्ग, ( पैशून्य, साहस, द्रोह, ईर्षा, मत्सर, अर्थदूषण, कठोर वाणी आणि कडक शिक्षा हा ) अष्टवर्ग, ( उत्साहशक्ति, प्रभुशक्ति आणि मंत्रशक्ति हा ) त्रिवर्ग आणि ( तीन वेद, व्यापार व नीतिशास्त्र ह्या ) तीन विद्या ह्यांना तूं तत्त्वतः समजून घेऊनच अनुमोदन देत असतोस ना ? ६८. विचारपूर्वक इंद्रियदमनाचा उपाय ( ह्मणजे योगाभ्यास, हेर, अमात्य इत्यादिकांना यथायोग्य काम सांगणें, शत्रुदमन वगैरे करण्याविषयीं उत्साह दाखविणें, तर्क करण्यांत प्राविण्य असणें, झालेल्या गोष्टींची विस्मृति न पडणें, पुढें घडणारी गोष्ट अनुमानानें जाणणें आणि नीतिशास्त्रांत निपुण असणें हे ) सहा गुण, ( अग्नि, जल, व्याधि, दुर्भिक्ष, मारक रोग हें ) दैविक संकट, ( अधिकारी, चोर, शत्रु, राजाच्या मर्जींतील लोक आणि राजाचा लोभ हें ) मानुष व्यसन, ( पगार न मिळालेला लोभी मनुष्य, अवमान झालेला मानी पुरुष, अकस्मात् कोपविलेला रागीट गृहस्थ आणि भिवविलेला भित्रा इसम असे चार प्रकारचे शत्रुपक्षाकडील लोक फितूर करणें हें ) राजकृत्य, ( बाल, वृद्ध, दीर्घरोगी, ज्ञातिबहिष्कृत, भित्रा, दुसऱ्यांना भय दाखविणारा, लुब्ध, लोकांना फसविणारा, विरक्त, अत्यंत विषयासक्त, अनेक गोष्टींकडे लक्ष्य लावून मसलत करणारा, देवब्राह्मणांची निंदा करणारा, दुर्दैवी, दैववादी, दुर्भिक्षसंकटांत सांपडलेला, महा व्यसनी, स्वदेशांत न रहाणारा, अनेक शत्रु असलेला, काळानें ग्रासिलेला आणि सत्यधर्माविषयीं तत्पर असलेला हा ) विंशति वर्ग, मंत्रिमंडळ ६९, स्वारी, सैन्यरचना आणि ( द्वैधीभाव व समाश्रय आणि यान व आसन ह्या ) दोहों दोहोंना कारण असलेले संधि आणि विग्रह ह्यांना, हे महाबुद्धिमान् भरता, तूं योग्य रीतीनें अनुमोदन देत आहेस ना ? ७०. हे ज्ञानवान्, भरता, नीतिशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें चार मंत्र्यांबरोबर, तीन मंत्र्यांबरोबर सर्व मंत्र्यांबरोबर अथवा एकेकाबरोबर तूं मसलत करीत असतोस ना ? ( कारण, दुसऱ्याच्या देखत एखादा आपल्या मनांतील उद्देश सांगत नाहीं. त्याकरितां, एकच मसलत एकेकट्याचा, अनेकांचा आणि सर्वांचा विचार घेऊन करावी लागते ) ७१. ( विहित कर्मप्रवृत्तीनें ) तुझे वेद सफल झाले आहेत ना ? ( फलप्राप्तीनें ) तुझीं कर्में सफल झालीं आहेत ना ? ( धर्माला अनुसरून विषयोपभोग व संतान यांच्या योगानें ) तुझी

ते बुद्धिर्यथोक्ता मम राघव । आयुष्या च यशस्या च धर्मकामार्थसंहिता ७३ यां वृत्तिं वर्तते तातो यां च नः प्रपितामहः । तां वृत्तिं वर्तसे कच्चिया च सत्पथगा शुभा ७४ कच्चित्स्वादुकृतं भोज्यमेको नाश्नासि राघव । कच्चिदाशंसमानेभ्यो मित्रेभ्यः संप्रयच्छसि ७५ राजा तु धर्मेण हि पालयित्वा महीपतिर्दण्डधरः प्रजानाम् । अवाप्य कृत्स्नां वसुधां यथावदितश्च्युतः स्वर्गमुपैति विद्वान् ७६ [ ३७७८ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे शततमः सर्गः ॥ १०० ॥

तं तु रामः समाज्ञाय भ्रातरं गुरुवत्सलम् । लक्ष्मणेन सह भ्रात्रा प्रष्टुं समुपचक्रमे १ किमेतदिच्छेयमहं श्रोतुं प्रव्याहृतं त्वया । यस्मात्त्वमागतो देशमिमं चीरजटाजिनी २ यन्निमित्तमिमं देशं कृष्णाजिनजटाधरः । हित्वा राज्यं प्रविष्टस्त्वं तत्सर्वं वक्तुमर्हसि ३ इत्युक्तः केकयीपुत्रः काकुत्स्थेन महात्मना । प्रगृह्य बलवद्भूयः प्राञ्जलिर्वाक्यमब्र-

---

स्त्री सफल झाली आहे नां ? आणि ( विनयानें ) तुझी विद्या सफल झाली आहे नां ? ७२. हे रघुवंशज भरता, आयुर्वर्धक, यशस्कारक आणि धर्म, अर्थ व काम ह्यांना अनुसरून असलेली ही जी सांगितलेली माझी बुद्धि आहे तशीच तुझी आहे नां ? ७३. पित्याचें जसें वर्तन आहे, आपल्या पूर्वजांचें जसें वर्तन होतें आणि सन्मार्गाला अनुसरून जें शुभ वर्तन असतें तेंच वर्तन तुझें आहे नां ? ७४. हे रघुवंशज भरता, तयार केलेलें मिष्टान्न तूं कधीं एकटाच भक्षण न करितां त्याची इच्छा करणाऱ्या आपल्या मित्रांना तूं तें देत असतोस नां ? ७५. सारांश, दंड धारण करून प्रजाजनांना मर्यादित ठेवणारा पृथ्वीपति ज्ञानी क्षत्रिय संपूर्ण पृथ्वी प्राप्त करून घेऊन व धर्मानें तिचें परिपालन करून ह्या लोकाचा त्याग केल्यानंतर स्वर्गाला जातो " ७६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं शंभरावा सर्ग समाप्त झाला ॥ १०० ॥

तो आपला भ्राता भरत वडिलांविषयीं अंतःकरणामध्यें प्रेम धरणारा आहे असें जाणून राम भ्रात्या लक्ष्मणासहवर्तमान त्याला विचारूं लागला कीं १, " हे काय ! ज्याअर्थी तूं ह्या प्रदेशाला वल्कलें, जटा आणि अजिन धारण करून आला आहेस त्याअर्थी असें येण्याचें कारण काय हें तुझ्या तोंडांतून माझी ऐकण्याची इच्छा आहे २. ह्यास्तव, तूं कशाकरितां राज्याचा त्याग करून व, कृष्णाजिन आणि जटा धारण करून ह्या प्रदेशाला आला आहेस तें सर्व सांग " ३. ह्याप्रमाणें महात्म्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें कैकेयीपुत्र भरताला विचारिलें असतां मोठ्या आयासानें पुनरपि

वीत् ४ आर्य तातः परित्यज्य कृत्वा कर्म सुदुष्करम् । गतः स्वर्गं महाबाहुः पुत्रशोकाभिपीडितः ५ स्त्रिया नियुक्तः कैकेय्या मम मात्रा परंतप । चकार सा महत्पापमिदमात्मयशोहरम् ६ सा राज्यफलमप्राप्य विधवा शोककर्शिता । पतिष्यति महाघोरे नरके जननी मम ७ तस्य मे दासभूतस्य प्रसादं कर्तुमर्हसि । अभिषिञ्चस्व चाद्यैव राज्येन मघवानिव ८ इमाः प्रकृतयः सर्वा विधवा मातरश्च याः । त्वत्सकाशमनुप्राप्ताः प्रसादं कर्तुमर्हसि ९ तथानुपूर्व्या युक्तश्च युक्तं चात्मनि मानद । राज्यं प्राप्नुहि धर्मेण सकामान्सुहृदः कुरु १० भवत्वविधवा भूमिः समग्रा पतिना त्वया । शशिना विमलेनेव शारदी रजनी यथा ११ एभिश्च सचिवैः सार्धं शिरसा याचितो मया । भ्रातुः शिष्यस्य दासस्य प्रसादं कर्तुमर्हसि १२ तदिदं शाश्वतं पित्र्यं सर्वं सचिवमण्डलम् । पूजितं पुरुषव्याघ्र नातिक्रमितुमर्हसि १३ एवमुक्त्वा महाबाहुः सबाष्पः कैकयीसुतः । रामस्य शिरसा पादौ जग्राह भरतः पुनः १४ तं मत्तमिव मातङ्गं निःश्वसन्तं पुनः-

---

दुःख आंवरून धरून व हात जोडून तो त्याला ह्मणाला ४ "हे आर्य, माझी कैकेयी माता जी त्याची स्त्री तिनें प्रेरणा केल्यामुळें अत्यंत दुष्कर कर्म करून पुत्रशोकाकुल झालेला तो महापराक्रमी राजा स्वर्गाला गेला आणि त्या माझ्या मातेनें आपल्या कीर्तीला बट्टा लावणारें हें मोठें पाप केलें ५,६. आतां ती शोकानें कृश झालेली माझी विधवा माता राज्यफल प्राप्त न होतां महाभयंकर नरकामध्यें जाऊन पडेल ७. तेव्हां दासरूप बनलेल्या मजवर तूं कृपा कर आणि आजच्याआजच इंद्राप्रमाणें स्वतःला राज्याभिषेक करून घे ८. हे सर्व अमात्य आणि विधवा माता हे तुझ्याजवळ आले आहेत. ह्यास्तव, तूं कृपा कर ९ आणि परंपरागत चालत आलेल्या पद्धतीनें ज्याअर्थी तूंच राजा होण्यास योग्य आहेस आणि ज्याअर्थी तुलाच राज्याभिषेक होणें योग्य आहे त्याअर्थी तूं धर्मानें राज्याचा स्वीकार करून सुहृदांचा मनोरथ परिपूर्ण कर १०. शरदृतूंतील रात्र ज्याप्रमाणें निर्मल चंद्राच्या योगानें सनाथ होते त्याप्रमाणें ही संपूर्ण पृथ्वी तुज पतीमुळें सनाथ होवो ११. ह्या सचिवांसहवर्तमान चरणीं मस्तक ठेवून मी तुझी प्रार्थना करीत आहें. ह्यास्तव, ह्या भ्रात्यावर, शिष्यावर आणि दासावर कृपा कर १२. हे पुरुषश्रेष्ठ, परंपरागत चालत आलेल्या आणि पूर्वजांनीं मान दिलेल्या ह्या मंत्रिमंडळाचें अतिक्रमण करणें तुला योग्य नाहीं" १३. ह्याप्रमाणें प्रार्थना करून डोळ्यांमध्यें अश्रु आलेल्या त्या महापराक्रमी कैकेयीपुत्र भरतानें पुनरपि रामाच्या चरणांवर मस्तक ठेविलें १४. तेव्हां मत्त गजाप्रमाणें वारंवार सुस्कार टाकीत असलेल्या त्या भ्रात्या भर-

पुनः । भ्रातरं भरतं रामः परिष्वज्येदमब्रवीत् १५ कुलीनः सत्वसंपन्नस्तेजस्वी चरितव्रतः । राज्यहेतोः कथं पापमाचरेन्मद्विधो जनः १६ न दोषं त्वयि पश्यामि सूक्ष्ममप्यरिसूदन । न चापि जननीं बाल्यात्त्वं विगर्हितुमर्हसि १७ कामकारो महाप्राज्ञ गुरूणां सर्वदानघ । उपपन्नेषु दारेषु पुत्रेषु च विधीयते १८ वयमस्य यथा लोके संख्याताः सौम्य साधुभिः । भार्याः पुत्राश्च शिष्याश्च त्वमपि ज्ञातुमर्हसि १९ वने वा चीरवसनं सौम्य कृष्णाजिनाम्बरम् । राज्ये वापि महाराजो मां वासयितुमीश्वरः २० यावत्पितरि धर्मज्ञ गौरवं लोकसत्कृते । तावद्धर्मकृतां श्रेष्ठ जनन्यामपि गौरवम् २१ एताभ्यां धर्मशीलाभ्यां वनं गच्छेति राघव । मातापितृभ्यामुक्तोऽहं कथमन्यत्समाचरे २२ त्वया राज्यमयोध्यायां प्राप्तव्यं लोकसत्कृतम् । वस्तव्यं दण्डकारण्ये मया वल्कलवाससा २३ एवमुक्त्वा महाराजो विभागं लोकसंनिधौ । व्यादिश्य च महाराजो दिवं दशरथो गतः २४ स च प्रमाणं धर्मात्मा राजा लोकगुरुस्तव । पित्रा दत्तं यथा-

---

ताला आलिंगन देऊन राम ह्मणाला १५ " कुलीन, सत्वस्थ, तेजस्वी आणि व्रत ग्रहण केलेला माझ्यासारिखा पुरुष राज्याकरितां पाप कसें करील ? १६. हे शत्रुनाशका भरता, झालेल्या गोष्टींबद्दल तुझ्याकडे मला कांहीं सूक्ष्मसुद्धां दोष दिसत नाहीं आणि वेडेपणामुळें आपल्या मातेची निंदा करणें तुला योग्य नाहीं १७. हे निरपराधी व महाज्ञानी भरता, संमत असलेल्या स्त्रियांना आणि पुत्रांना इच्छेस येईल त्याप्रमाणें आज्ञा करण्याचा वडिलांना सर्वदां अधिकार आहे १८. भार्या, पुत्र आणि शिष्य ह्यांची गणना ज्याप्रमाणें पित्यानें अथवा गुरूनें इच्छेस येईल ती आज्ञा करण्यास योग्य ह्मणून सज्जनांनीं ह्या जगतामध्यें केलेली आहे त्याचप्रमाणें, हे सौम्या, आपणां सर्वांचें ह्या ( स्वर्गस्थ झालेल्या ) दशरथराजाशीं नातें आहे हें तूंही समजून ठेव १९. सारांश, हे सौम्या, वल्कलें आणि कृष्णाजिनें परिधान करवून मला अरण्यांत पाठविण्याला अथवा राज्यावर बसविण्याला महाराज दशरथ मालक आहे २०. हे धर्मनिष्ठांमध्यें श्रेष्ठ व धर्मज्ञ भरता, लोकमान्य पित्याप्रमाणें मातेचीही मानमान्यता ठेविली पाहिजे २१. तेव्हां ह्या उभयतां धर्मशील मातापितरांनीं " वनांत जा " ह्मणून मला आज्ञा केली असतां, हे रघुवंशज भरता, मी दुसरें कसें बरें करीन ? २२. अयोध्येमध्यें लोकमान्य राज्य तुला प्राप्त करून घेतलें पाहिजे आणि वल्कलें परिधान करून मला दंडकारण्यामध्यें वास्तव्य केलें पाहिजे २३ असा विभाग सर्व लोकांसमक्ष सांगून आणि ह्याप्रमाणें वागा अशी आज्ञा करून महाराज दशरथ स्वर्गाला गेला आहे २४ आणि तोच

भागमुपभोक्तुं त्वमर्हसि २५ यदब्रवीन्मां नरलोकसत्कृतः पिता महात्मा विबुधाधिपोपमः । तदेव मन्ये परमात्मनो हितं न सर्वलोकेश्वरभावमव्ययम् २६ [३८०४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्डे एकाधिकशततमः सर्गः ॥ १०१ ॥

रामस्य वचनं श्रुत्वा भरतः प्रत्युवाच ह । किं मे धर्माद्विहीनस्य राजधर्मः करिष्यति १ शाश्वतोऽयं सदा धर्मः स्थितोऽस्मासु नरर्षभ । ज्येष्ठे पुत्रे स्थिते राजा न कनीयान्भवेन्नृपः २ स समृद्धां मया सार्धमयोध्यां गच्छ राघव । अभिषेचय चात्मानं कुलस्यास्य भवाय नः ३ राजानं मानुषं प्राहुर्देवत्वे संमतो मम । यस्य धर्मार्थसहितं वृत्तमाहुरमानुषम् ४ केकयस्थे च मयि तु त्वयि चारण्यमाश्रिते । धीमान्स्वर्गं गतो राजा यायजूकः सतां मतः ५ निष्क्रान्तमात्रे भवति सहसीते सलक्ष्मणे । दुःखशोकाभिभूतस्तु राजा त्रिदिवमभ्यगात् ६ उत्तिष्ठ पुरुषव्याघ्र क्रिय-

---

जगद्गुरु धर्मनिष्ठ राजा तुला प्रमाण आहे. करितां, पित्यानें विभागाप्रमाणें दिलेल्या राज्याचा तूं उपभोग घे २५. सर्व मनुष्यलोकांना मान्य अशा महात्म्या देवराजतुल्य पित्यानें जें मला सांगितलें आहे त्यांतच माझें सर्वोत्कृष्ट हित आहे असें मला वाटतें; अक्षय्य स्वर्गलोकाधिपत्य मला हितकारक वाटत नाहीं " २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकशेंएकावा सर्ग समाप्त झाला ॥ १०१ ॥

रामाचें भाषण श्रवण करून भरत ह्मणाला " तूं विचारिलेल्या राजधर्माचा मज धर्महीनाला उपयोग काय होणार आहे ? १. हे पुरुषश्रेष्ठा, ज्येष्ठ पुत्र विद्यमान असतांना कनिष्ठ राजपुत्र राजा होत नाहीं हा धर्म आपणांमध्यें नेहमीं परंपरागत चालत आलेला आहे २. तस्मात्, हे राघवा, माझ्यासहवर्तमान तूं समृद्ध अयोध्येमध्यें चल आणि ह्या आमच्या कुलाच्या अभ्युदयाकरितां तूं आपल्याला राज्याभिषेक करून घे ३. सर्व लोक जरी राजाला मनुष्य ह्मणत असतात तरी धर्म आणि अर्थ ह्याला अनुसरून असलेलें आणि मनुष्याचें ठिकाणीं न संभवणारें असें ज्याचें वर्तन असल्याबद्दल लोक सांगतात त्या राजाला मी देवच समजत आहें ४. मी केकय देशामध्यें असतांना आणि तूं अरण्याचा आश्रय केला असतांना सज्जनांना संमत आणि यज्ञशील असा विचारी दशरथराजा स्वर्गाला गेला ५. ह्यारांश, सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान आपण नगरांतून बाहेर पडतांक्षणीं दुःख आणि शोक ह्यांनीं धरलेला राजा स्वर्गाला गेला ६. हे पुरुषश्रेष्ठा, ऊठ; आणि पित्याची उदकक्रिया कर; मीं आणि ह्या शत्रुघ्नानें पूर्वींच क्रिया-

तामुदकं पितुः । अहं चायं च शत्रुघ्नः पूर्वमेव कृतोदकौ ७ प्रियेण किल दत्तं हि पितृलोकेषु राघव । अक्षयं भवतीत्याहुर्भवांश्चैव पितुः प्रियः ८ त्वामेव शोचंस्तव दर्शनेप्सुस्त्वय्येव सक्तामनिवर्त्य बुद्धिम् । त्वया विहीनस्तव शोकरुग्णस्त्वां संस्मरन्नेव गतः पिता ते ९ [ ३८१३ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे द्व्युत्तरशततमः सर्गः ॥ १०२ ॥

तां श्रुत्वा करुणां वाचं पितुर्मरणसंहिताम् । राघवो भरतेनोक्तां बभूव गतचेतनः १ तं तु वज्रमिवोत्सृष्टमाहवे दानवारिणा । वाग्वज्रं भरतेनोक्तममनोज्ञं परंतपः २ प्रगृह्य रामो बाहू वै पुष्पिताङ्ग इव द्रुमः । वने परशुना कृत्तस्तथा भुवि पपात ह ३ तथा हि पतितं रामं जगत्यां जगतीपतिम् । कूलघातपरिश्रान्तं प्रसुप्तमिव कुञ्जरम् ४ भ्रातरस्ते महेष्वासं सर्वतः शोककर्शितम् । रुदन्तः सह वैदेह्या सिषिचुः सलिलेन वै ५ स तु संज्ञां पुनर्लब्ध्वा नेत्राभ्यामश्रुमुत्सृजन् । उपाक्रामत काकुत्स्थः कृपणं बहु भाषितुम् ६ स रामः स्वर्गतं श्रुत्वा पितरं पृथिवीपतिम् । उवाच भरतं वाक्यं धर्मात्मा धर्मसंहितम् ७ किं करिष्याम्ययोध्यायां

---

केलेली आहे ७. हे राघवा, प्रिय पुत्रानें दिलेली कोणतीही वस्तु पितृलोकामध्यें त्या प्राण्याला अक्षय्य पोंचत असतें असें ह्मणतात आणि तूंच पित्याला प्रिय होतास ८. तुझ्याकडेच खिळून गेलेलें मन परत न फिरवितां तुझा वियोग होऊन तुझ्या शोकानें जर्जर झालेला तुझा पिता तुझ्याचकरितां शोक करीत करीत आणि तुझेंच स्मरण करीत करीत स्वर्गाला गेला " ९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंदुसरा सर्ग समाप्त झाला ॥ १०२ ॥

पित्याच्या मरणासंबंधानें भरतानें केलेलें तें दीन भाषण श्रवण केल्यावर रामाला भान नाहींसें झालें १. संग्रामामध्यें इंद्रानें सोडिलेल्या वज्राप्रमाणें भरतानें तोंडांतून काढिलेलें तें मनाला नीट न वाटणारें वाग्रूप वज्र श्रवण करितांक्षणीं शत्रुतापन रामानें २ हात वर केले आणि कुऱ्हाडीनें तोडिल्यामुळें वनामध्यें पडणाऱ्या प्रफुल्लित वृक्षाप्रमाणें तो राम भूमीवर पडला ३. तेव्हां नदीचें तीर पाडून टाकिल्यामुळें श्रमून जाऊन निद्रिस्थ झालेल्या गजाप्रमाणें तो महाधनुर्धारी पृथ्वीपति राम शोकानें जर्जर होऊन पृथ्वीवर पडला असतां सीतेसहवर्तमान रडूं लागलेले ते तिघेही भ्राते त्याच्यावर पाणी शिंपडूं लागले ४,५. तदनंतर पुनरपि शुद्धीवर येऊन नेत्रांतून अश्रु ढाळीत ढाळीत त्या ककुत्स्थकुलोत्पन्न रामानें दीन स्वरानें पुष्कळच विलाप करण्याला आरंभ केला ६. सारांश, आपला पृथ्वीपति पिता स्वर्गस्थ झाल्याचें श्रवण करून तो धर्मात्मा

ताते दिष्टां गतिं गते। कस्तां राजवराद्धीनामयोध्यां पालयिष्यति ८ किं नु तस्य मया कार्यं दुर्जातेन महात्मनः। यो मृतो मम शोकेन स मया न च संस्कृतः ९ अहो भरत सिद्धार्थो येन राजा त्वयानघ। शत्रुघ्नेन च सर्वेषु प्रेतकृत्येषु सत्कृतः १० निष्प्रधानामनेकाग्रां नरेन्द्रेण विना कृताम्। निवृत्तवनवासोऽपि नायोध्यां गन्तुमुत्सहे ११ समाप्तवनवासं मामयोध्यायां परंतप। कोऽनुशासिष्यति पुनस्ताते लोकान्तरे गते १२ पुरा प्रेक्ष्य सुवृत्तं मां पिता यान्याह सान्त्वयन्। वाक्यानि तानि श्रोष्यामि कुतः कर्णसुखान्यहम् १३ एवमुक्त्वाथ भरतं भार्यामभ्येत्य राघवः। उवाच शोकसंतप्तः पूर्णचन्द्रनिभाननाम् १४ सीते मृतस्ते श्वशुरः पित्रा हीनोऽसि लक्ष्मण। भरतो दुःखमाचष्टे स्वर्गतिं पृथिवीपतेः १५ ततो बहुगुणं तेषां बाष्पं नेत्रेष्वजायत। तथा ब्रुवति काकुत्स्थे कुमाराणां यशस्विनाम् १६ ततस्ते भ्रातरः सर्वे भृशमाश्वास्य दुःखि-

---

राम भरताशीं धर्माला अनुसरून असलेलें भाषण करूं लागला कीं ७, "दैवविहित गतीला पिता गेला असतां मी अयोध्येंत येऊन काय करूं! त्या नृपश्रेष्ठाचा वियोग झालेल्या त्या अयोध्येचें परिपालन कोण बरें करणार आहे! ८. जो माझ्या शोकानें मरण पावला आणि ज्याचा संस्कार माझ्या हातून झाला नाहीं अशा त्या महात्म्याला व्यर्थ जन्मास आलेल्या माझा काय बरें उपयोग आहे! ९. हे निष्पापा भरता, तूं व शत्रुघ्न हे दोघे कृतकृत्य आहांत. कारण, तुझ्या हातून व शत्रुघ्नाच्या हातून त्याचीं सर्व उत्तरकार्यें सत्कारपूर्वक झालीं आहेत १०. आतां माझा वनवास जरी समाप्त झाला तरी राजाचा वियोग झाल्यामुळें अप्रधान होऊन अनेक नायकांनीं युक्त झालेल्या अयोध्येमध्यें गमन करण्याची माझी इच्छा नाहीं ११. हे शत्रुतापना भरता, पिता परलोकीं गेला असतां वनवास समाप्त करून मी अयोध्येमध्यें गेल्यावर मला कोण रे, आज्ञा करील! १२. मी सद्वर्तनी आहें असें अवलोकन करून पूर्वी पिता सांत्वन करीत करीत जीं भाषणें माझ्याशीं करीत असे तीं कर्णसुखावह भाषणें मला आतां कोठून बरें ऐकावयाला सांपडतील!" १३. ह्याप्रमाणें भरताशीं बोलून आणि पूर्ण चंद्राप्रमाणें आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या आपल्या भार्येसमीप जाऊन शोकसंतप्त झालेला रघुवंशज राम तिला ह्मणाला १४ "हे सीते, तुझा सासरा मरण पावला. हे लक्ष्मणा, तुझा पिता, नाहींसा झाला. अरे, पृथ्वीपति राजाच्या स्वर्गगमनरूप दुःखाची वार्ता भरत सांगत आहे" १५. ह्याप्रमाणें ककुत्स्थकुलोत्पन्न राम विलाप करूं लागला असतां त्या यशस्वी राजकुमारांच्या नेत्रांतून फारच अश्रु आले १६.

तम् । अब्रुवञ्जगतीभर्तुः क्रियतामुदकं पितुः १७ सा सीता स्वर्गतं श्रुत्वा श्वशुरं तं महानृपम् । नेत्राभ्यामश्रुपूर्णाभ्यां न शशाकेक्षितुं प्रियम् १८ सान्त्वयित्वा तु तां रामो रुदतीं जनकात्मजाम् । उवाच लक्ष्मणं तत्र दुःखितो दुःखितं वचः १९ आनयेङ्गुदिपिण्याकं चीरमाहर चोत्तरम् । जलक्रियार्थं तातस्य गमिष्यामि महात्मनः २० सीता पुरस्ताद्व्रजतु त्वमेनामभितो व्रज । अहं पश्चाद्गमिष्यामि गतिर्ह्येषा सुदारुणा २१ ततो नित्यानुगस्तेषां विदितात्मा महामतिः । मृदुर्दान्तश्च कान्तश्च रामे च दृढभक्तिमान् २२ सुमन्त्रस्तैर्नृपसुतैः सार्धमाश्वास्य राघवम् । अवतारयदालम्ब्य नदीं मन्दाकिनीं शिवाम् २३ ते सुतीर्थां ततः कृच्छ्रादुपगम्य यशस्विनः । नदीं मन्दाकिनीं रम्यां सदा पुष्पितकाननाम् २४ शीघ्रस्रोतसमासाद्य तीर्थं शिवमकर्दमम् । सिषिचुस्तूदकं राज्ञे तत एतद्भवत्विति २५ प्रगृह्य तु महीपालो जलापूरितमञ्जलिम् । दिशं याम्यामभिमुखो रुदन्वचनमब्रवीत् २६ एतत्ते

---

नंतर तें सर्व तिघेही अति दुःखाकुल झालेल्या रामाचें वारंवार सांत्वन करून "पित्याची उदक क्रिया कर" असें त्याला ह्मणाले १७. सीता तर तो आपला महाराज श्वशुर स्वर्गस्थ झाल्याचें श्रवण केल्यावर अश्रुपरिपूर्ण नेत्रांनीं आपल्या प्रियाकडे पहाण्यासही समर्थ झाली नाहीं १८. तेव्हां त्या रडत असलेल्या जनककन्येचें सांत्वन करून तो दुःखित राम दुःखानें लक्ष्मणाला ह्मणाला १९ "वाटलेल्या इंगुदी फलांचा गोळा आणि एक उत्तम नवें वल्कल तूं घेऊन ये; मी महात्म्या पित्याची उदकक्रिया करण्याकरितां जातों २०. सीतेला पुढें होऊं दे; तूं तिच्या मागून चाल आणि मी तुमच्याही मागून येईन. कारण, शोक वगैरे करण्याचे वेळीं अशाच क्रमानें (सर्वे कनिष्ठप्रथमा इतरे तु स्त्रियोऽग्रतः ह्या वचनाला अनुसरून) गेलें पाहिजे" २१. तदनंतर त्या राजकुमारांना ज्याचा स्वभाव माहीत आहे असा तो मृदु, जितेंद्रिय, मनोहर, रामाचे ठिकाणीं दृढ भक्ति करणारा आणि रामाबरोबर नित्य असणारा महाविचारी लक्ष्मण त्याच्या सांगण्याप्रमाणें इंगुदी फलांचा गोळा घेऊन आला २२. नंतर त्या राजकुमारासहवर्तमान रामाचें सांत्वन केल्यावर सुमंत्रानें रामाचा हात धरून पवित्र अशा मंदाकिनी नदीमध्यें त्याला उतरविलें २३. तदनंतर जिला चांगला उतार आहे व जिचे तीरीं नेहमीं प्रफुल्लित वृक्षांचीं वनें आहेत अशा त्या रमणीय मंदाकिनी नदीसमीप ते यशस्वी मोठ्या कष्टानें आले २४ आणि कर्दमरहित, शीघ्र प्रवाहानें युक्त व पवित्र अशा उताराबर येऊन त्यांनीं "हें तुला समर्पण असो" ह्मणून राजाला उदक दिलें २५. सारांश, भूपाल राम उदकानें अंजलि भरून घेऊन

राजशार्दूल विमलं तोयमक्षयम् । पितृलोकगतस्याद्य मद्दत्तमुपतिष्ठतु २७ ततो मन्दाकिनीतीरं प्रत्युत्तीर्य स राघवः । पितुश्चकार तेजस्वी निर्वापं भ्रातृभिः सह २८ ऐङ्गुदं बदरैर्मिश्रं पिण्याकं दर्भसंस्तरे । न्यस्य रामः सुदुःखार्तो रुदन्वचनमब्रवीत् २९ इदं भुङ्क्ष्व महाराज प्रीतो यदशना वयम् । यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः ३० ततस्तेनैव मार्गेण प्रत्युत्तीर्य सरित्तटात् । आरुरोह नरव्याघ्रो रम्यसानुं महीधरम् ३१ ततः पर्णकुटीद्वारमासाद्य जगतीपतिः । परिजग्राह पाणिभ्यामुभौ भरतलक्ष्मणौ ३२ तेषां तु रुदतां शब्दात्प्रतिशब्दोऽभवद्गिरौ । भ्रातृणां सह वैदेह्या सिंहानां नर्दतामिव ३३ महाबलानां रुदतां कुर्वतामुदकं पितुः । विज्ञाय तुमुलं शब्दं त्रस्ता भरतसैनिकाः ३४ अब्रुवंश्चापि रामेण भरतः संगतो ध्रुवम् । तेषामेव महाञ्शब्दः शोचतां पितरं मृतम् ३५ अथ वाहान्परित्यज्य तं सर्वेऽभिमुखाः स्वनम् । अप्येकमनसो जग्मुर्यथास्थानं प्रधाविताः ३६ हयैरन्ये गजैरन्ये रथैरन्ये स्वलंकृतैः । सुकुमारास्तथैवान्ये

---

आणि दक्षिणेकडे तोंड करून रडत रडत ह्मणाला २६ " हे नृपश्रेष्ठा, हें मीं दिलेलें निर्मल उदक पितृलोकीं गेलेल्या तुला अक्षय्य प्राप्त होवो " २७. तदनंतर पात्रांतून मंदाकिनीच्या तीरावर येऊन त्या तेजस्वी रामानें भ्रात्यांसहवर्तमान पित्याला उद्देशून पिंडदान केलें २८. बदरी फलांनीं मिश्रित केलेला इंगुदी फलांचा गोळा दर्भास्तरणावर ठेवून अत्यंत दुःखाकुल झालेला राम रडत रडत ह्मणाला २९ " हे महाराज, जें अन्न भक्षण करून आह्मी निर्वाह करितों तें हें तूं स्वीकार. कारण, जें अन्न पुरुष भक्षण करीत असेल तेंच अन्न त्यानें आपल्या देवतांना द्यावें ( असें आहे ) " ३०. तदनंतर त्याच मार्गानें नदीतीरावरून वर आल्यावर पुरुषश्रेष्ठ राम रमणीय शिखरांनीं युक्त असलेल्या त्या चित्रकूट पर्वतावर आरूढ झाला ३१. नंतर पर्णकुटिकेच्या द्वारसमीप आल्यावर त्या पृथ्वीपति रामानें उभयतां भरत लक्ष्मणांना हातांत धरिलें ३२. तेव्हां गर्जना करणाऱ्या सिंहाप्रमाणें सीतेसहवर्तमान ते भ्राते रोदन करूं लागले असतां त्यांच्या ध्वनीचा प्रतिध्वनि पर्वतावर होऊं लागला ३३ व पित्याला उदक देऊन ते महाबलाढ्य भ्राते रोदन करूं लागले असतां तो तुमुल ध्वनि ऐकून भरताचे सैनिक त्रस्त झाले ३४ आणि ह्मणाले " रामाशीं भरताची निःसंशय भेट झाली. कारण, मृत पित्याबद्दल शोक करणाऱ्यांचाच हा मोठा शब्द आहे " ३५. तदनंतर वाहनें सोडून देऊन त्या सर्वही सैनिकांनीं जिकडून तो ध्वनि येत होता तिकडे तोंड केलीं आणि एकचित्तानें ते वाट सांपडली तसे तिकडे धांवले ३६. कांहीं लोक अश्वावर

पद्भिरेव नरा ययुः ३७ अचिरप्रोषितं रामं चिरविप्रोषितं यथा । द्रष्टुकामो जनः सर्वो जगाम सहसाश्रमम् ३८ भ्रातॄणां त्वरितास्ते तु द्रष्टुकामाः समागमम् । ययुर्बहुविधैर्यानैः खुरनेमिसमाकुलैः ३९ सा भूमिर्बहुभिर्यानै रथनेमिसमाहता । मुमोच तुमुलं शब्दं द्यौरिवाभ्रसमागमे ४० तेन वित्रासिता नागाः करेणुपरिवारिताः । आवासयन्तो गन्धेन जग्मुरन्यद्वनं ततः ४१ वराहमृगसिंहाश्च महिषाः सृमरास्तथा । व्याघ्रगोकर्णगवया वित्रेसुः पृषतैः सह ४२ रथाङ्गहंसानत्यूहाः प्लवाः कारण्डवाः परे । तथा पुंस्कोकिलाः क्रौञ्चा विसंज्ञा भेजिरे दिशः ४३ तेन शब्देन वित्रस्तैराकाशं पक्षिभिर्वृतम् । मनुष्यैरावृता भूमिरुभयं प्रबभौ तदा ४४ ततस्तं पुरुषव्याघ्रं यशस्विनमकल्मषम् । आसीनं स्थण्डिले रामं ददर्श सहसा जनः ४५ विगर्हमाणः कैकेयीं मन्थरासहितामपि । अभिगम्य जनो रामं बाष्पपूर्णमुखोऽभवत् ४६ तान्नरान्बाष्पपूर्णाक्षान्समीक्ष्याथ

---

आरोहण करून गेले, कांहीं गजावर बसून गेले, अत्यंत सुकुमार असलेले कांहीं लोक उत्तम रीतीनें विभूषित केलेल्या रथामध्यें आरूढ होऊन निघाले आणि कांहीं लोक तर पायांनींच चालते झाले ३७. रामाला जाऊन जरी फार दिवस झाले नव्हते तरी त्याला वनवासाला जाऊन फारच दिवस झाले आहेत असें समजून सर्वही लोक त्याला पहाण्याकरितां एकदम आश्रमाकडे निघाले ३८ आणि खुर व धावा ह्यांनीं व्याप्त झालेल्या अनेक प्रकारच्या यानांमध्यें आरूढ होऊन भ्रात्यांचा समागम पहाण्याकरितां सत्वर चालते झाले ३९. तेव्हां मेघांचा समागम झाला असतां ज्याप्रमाणें आकाशामध्यें तुमुल ध्वनि होऊं लागतो त्याप्रमाणें अनेक यानांनीं व रथांच्या धावांनीं ताडित झालेल्या पृथ्वींतून तुमुल ध्वनि होऊं लागला असतां ४० हस्तिणींनीं परिवेष्टित असलेले हत्ति त्या ध्वनींनीं त्रस्त झाले आणि आपल्या मदगंधानें दिशा सुवासिक करीत करीत ते तेथून दुसऱ्या वनामध्यें निघाले ४१. वराह, मृग, सिंह, महिष, सृमर, व्याघ्र, गोकर्ण, गवे आणि पृषत हेही दुसऱ्या वनामध्यें शिरले ४२. चक्रवाक, हंस, जलकुक्कुट, प्लवसंज्ञक बक, कारंडव, कोकिल आणि क्रौंच हे पक्षी भान नाहींसें होऊन रानोमाळ भडकूं लागले ४३. त्या शब्दाच्या योगानें त्रस्त झालेल्या पक्ष्यांनीं व्याप्त झालेलें आकाश आणि मनुष्यांनीं व्याप्त झालेली भूमि हीं दोन्हीं शोभूं लागलीं ४४. तदनंतर यशस्वी व निष्पाप असा तो पुरुषश्रेष्ठ राम ओट्यावर बसलेला त्या लोकांच्या एकदम दृष्टीं पडला असतां ४५ मंथरेसहवर्तमान कैकयीची निंदा करीत करीत रामासमीप आल्यावर लोकांचीं मुखें अश्रूंनीं भरून

सुदुःखितान् । पर्यष्वजत धर्मज्ञः पितृवन्मातृवच्च सः ४७ स तत्र कांश्चित्परिषस्वजे नरान्नराश्च केचित्तु तमभ्यवादयन् । चकार सर्वान्सवयस्यबान्धवान्यथार्हमासाद्य तदा नृपात्मजः ४८ ततः स तेषां रुदतां महात्मनां भुवं च खं चानुविनादयन्स्वनः । गुहागिरीणां च दिशश्च संततं मृदङ्गघोषप्रतिमो विशुश्रुवे ४९ [३८६२] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे त्र्युत्तरशततमः सर्गः ॥ १०३ ॥

वसिष्ठः पुरतः कृत्वा दारान्दशरथस्य च । अभिचक्राम तं देशं रामदर्शनतर्षितः १ राजपत्न्यश्च गच्छन्त्यो मन्दं मन्दाकिनीं प्रति । ददृशुस्तत्र तत्तीर्थं रामलक्ष्मणसेवितम् २ कौसल्याबाष्पपूर्णेन मुखेन परिशुष्यता । सुमित्रामब्रवीद्दीनां याश्चान्या राजयोषितः ३ इदं तेषामनाथानां क्लिष्टमक्लिष्टकर्मणाम् । वने प्राक्कलनं तीर्थं ये ते निर्विषयीकृताः ४ इतः सुमित्रे पुत्रस्ते सदा जलमतन्द्रितः । स्वयं हरति सौमित्रिर्मम पुत्रस्य कारणात् ५ जघन्यमपि ते पुत्रः कृतवान्न तु गर्हितः । भ्रातुर्यदर्थरहितं सर्वं तद्ग-

---

गेलीं ४६. तेव्हां अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या त्या अत्यंत दुःखित लोकांना अवलोकन करून तो धर्मज्ञ राम मातापितरांप्रमाणें त्यांना कवटाळूं लागला ४७. त्या ठिकाणीं कांहीं लोकांना त्यानें कवटाळिलें, कांहीं लोकांनीं त्याला अभिवंदन केलें आणि त्या राजकुमार रामानें योग्यतेप्रमाणें भेटी घेऊन त्या सर्वांना मित्र आणि बांधव करून सोडिलें ४८ व तदनंतर रोदन करूं लागलेल्या त्या महात्म्यांचा तो ध्वनि पृथ्वी, आकाश आणि पर्वतसंबंधीं गुहांच्या सर्व बाजू एकसारख्या नादित करीत करीत मृदंगध्वनीप्रमाणें ऐकूं येऊं लागला ४९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकशें तिसरा सर्ग समाप्त झाला ॥ १०३ ॥

दशरथाच्या स्त्रियांना पुढें घालून रामदर्शनाकरितां उत्सुक झालेले वसिष्ठमुनि त्या प्रदेशाकडे चालले १ व त्या राजपत्न्या हळू हळू जाऊं लागल्या असतां मंदाकिनीच्या तीरीं राम आणि लक्ष्मण हे जेथें येऊन गेले होते तो उतार त्यांनीं पाहिला २. तेव्हां अश्रुपूर्ण आणि शुष्क मुखानें युक्त असलेली कौसल्या दीन सुमित्रेला आणि इतरही ज्या राजस्त्रिया होत्या त्यांना ह्मणाली ३ " ज्यांना राज्यापासून हांकून दिलें त्या उत्कृष्ट कर्म करणाऱ्या अनाथांचा हा वनांतील जल वगैरे नेण्याचा निःसंशय क्लिष्ट मार्ग होय ४. हे सुमित्रे, सावध असलेला तुझा पुत्र लक्ष्मण माझ्या पुत्राकरितां येथून नेहमीं स्वतः उदक घेऊन जातो ५. हें हलकें काम जरी तुझ्या पुत्रानें केलें आहे

र्हितं गुणैः ६ अग्रायमपि ते पुत्रः क्लेशानामतथोचितः । नीचानर्थसमाचारं सज्जं कर्म प्रमुञ्चतु ७ दक्षिणाग्रेषु दर्भेषु सा ददर्श महीतले । पितुरिङ्गुदिपिण्याकं न्यस्तमायतलोचना ८ तं भूमौ पितुरार्तेन न्यस्तं रामेण वीक्ष्य सा । उवाच देवी कौसल्या सर्वा दशरथस्त्रियः ९ इदमिक्ष्वाकुनाथस्य राघवस्य महात्मनः । राघवेण पितुर्दत्तं पश्यतैतद्यथाविधि १० तस्य देवसमानस्य पार्थिवस्य महात्मनः । नैतदौपयिकं मन्ये भुक्तभोगस्य भोजनम् ११ चतुरन्तां महीं भुक्त्वा महेन्द्रसदृशो भुवि । कथमिङ्गुदिपिण्याकं स भुङ्क्ते वसुधाधिपः १२ अतो दुःखतरं लोके न किंचित्प्रतिभाति मे । यत्र रामः पितुर्दद्यादिङ्गुदीक्षोदमृद्धिमान् १३ रामेणेङ्गुदिपिण्याकं पितुर्दत्तं समीक्ष्य मे । कथं दुःखेन हृदयं न स्फोटति सहस्रधा १४ श्रुतिस्तु खल्वियं सत्या लौकिकी प्रतिभाति मे । यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः १५ एवमार्ता सपत्न्यस्ता जग्मुराश्वास्यतां

---

तरी तो निंदेस पात्र झाला नाहीं. कारण, गुणसंपन्न आत्याचें कार्य ज्याच्या योगानें होत नाहीं तें सर्व निंदास्पद आहे ६. भोगाव्या लागणाऱ्या क्लेशांचा ज्यांना अनुभव नाहीं असा हा तुझा पुत्र शत्रुघ्नही नीच मनुष्यालाच योग्य असें दुःखजनक अनुष्ठान ज्याचें आहे तें हें प्राप्त झालेलें जल वगैरे नेण्याचें काम करूं लागूं दे " ७. नंतर पित्याला उद्देशून रामानें भूमीवर दक्षिणाग्र दर्भ अंथरून इंगुदी फलांच्या पिठाचा जो पिंड ठेविला होता तो दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या कौसल्येनें अवलोकन केला आणि दुःखाकुल रामानें पित्याला उद्देशून भूमीवर ठेविलेला तो पिंड अवलोकन करून राजपत्नि कौसल्या दशरथाच्या इतर सर्व स्त्रियांना ह्मणाली ८,९ "रामानें आपल्या इक्ष्वाकुकुलाधिपति महात्म्या रघुवंशज पित्याला यथाविधि दिलेला हा पिंड अवलोकन करा १०. ज्यानें राज्यभोग भोगिले त्या देवतुल्य महात्म्या राजाला हें भोजन मला योग्य दिसत नाहीं ११. चारी समुद्रांनीं मर्यादित असलेल्या पृथ्वीचा ज्या महेंद्रतुल्य भूपतीनें उपभोग घेतला तो भूतलावर ठेविलेला इंगुदी फलांचा पिंड कसा बरें भक्षण करीत आहे ! १२. वैभवसंपन्न रामालाही ज्याअर्थीं पित्याला उद्देशून इंगुदींचें पीठ देण्याचा प्रसंग आला त्याअर्थीं ह्यापेक्षां ह्या जगतामध्यें मला कोणतीही गोष्ट अधिक दुःखदायक वाटत नाहीं १३. अहो, रामानें पित्याला उद्देशून दिलेला हा इंगुदीपिष्ट पिंड अवलोकन करून दुःखानें माझ्या हृदयाचें हजारों तुकडे कसे होत नाहींत ! १४. जें अन्न पुरुष भक्षण करितो तेंच अन्न त्याच्या देवतांना भक्षण करावें लागतें ही लोकांतील ह्मणच खरोखर मला सत्य वाटत आहे "१५.

तदा । ददृशुश्चाश्रमे रामं स्वर्गच्युतमिवामरम् १६ तं भोगैः संपरित्यक्तं रामं संप्रेक्ष्य मातरः । आर्ता मुमुचुरश्रूणि सस्वरं शोककर्षिताः १७ तासां रामः समुत्थाय जग्राह चरणाम्बुजान् । मातॄणां मनुजव्याघ्रः सर्वासां सत्यसंगरः १८ ताः पाणिभिः सुखस्पर्शैर्मृद्वङ्गुलितलैः शुभैः । प्रममार्जू रजः पृष्ठाद्रामस्यायतलोचनाः १९ सौमित्रिरपि ताः सर्वा मातॄः संप्रेक्ष्य दुःखितः । अभ्यवादयदासक्तं शनै रामादनन्तरम् २० यथा रामे तथा तस्मिन्सर्वा ववृतिरे स्त्रियः । वृत्तिं दशरथाज्जाते लक्ष्मणे शुभलक्षणे २१ सीतापि चरणांस्तासामुपसंगृह्य दुःखिता । श्वश्रूणामश्रुपूर्णाक्षी संबभूवाग्रतः स्थिता २२ तां परिष्वज्य दुःखार्ता माता दुहितरं यथा । वनवासकृतां दीनां कौसल्यावाक्यमब्रवीत् २३ वैदेहराजन्यसुता स्नुषा दशरथस्य च । रामपत्नी कथं दुःखं संप्राप्ता विजने वने २४ पद्ममातपसंतप्तं परिक्लिष्टमिवोत्पलम् । काञ्चनं रजसा ध्वस्तं क्लिष्टं चन्द्रमिवाम्बुदैः २५ मुखं ते

ह्याप्रमाणें दुःखाकुल झालेल्या त्या कौसल्येकडे तिच्या त्या सवती गेल्या आणि तिचें सांत्वन केल्यावर स्वर्गांतून च्युत झालेल्या देवाप्रमाणें राम आश्रमामध्यें त्यांच्या दृष्टीं पडला १६ आणि भोगांचा त्याग केलेल्या त्या रामाला अवलोकन करून शोकानें कृश झालेल्या त्या दुःखाकुल माता रोदन करीत करीत अश्रु ढाळूं लागल्या १७. तेव्हां पुरुषश्रेष्ठ सत्यप्रतिज्ञ रामानें आसनावरून उठून त्या सर्व मातांचीं चरणकमलें धरिलीं असतां १८ दीर्घ नेत्रांनीं युक्त असलेल्या त्या मातांनीं सुखावह स्पर्श आणि मृदु अंगुलि ह्यांनीं युक्त असलेल्या आपल्या शुभ हातांच्या योगानें रामाच्या पाठीवरून हात फिरवून धुरळा झाडून टाकिला १९. तदनंतर त्या सर्व मातांना अवलोकन करून दुःखाकुल झालेल्या लक्ष्मणानेंही रामाच्या मागून हळूं हळूं प्रेमानें त्यांना अभिवंदन केलें २० व त्या सर्व स्त्रियांनीं दशरथापासून उत्पन्न झालेल्या त्या सुलक्षणी लक्ष्मणाचे ठिकाणीं रामाप्रमाणेंच वर्तन ठेविलें २१. नंतर दुःखाकुल झालेल्या सीतेनेंही त्या सासवांचे पाय धरिले आणि अश्रूंनीं नेत्र भरून आलेली ती सीता त्यांच्या समोर उभी राहिली २२. तेव्हां कन्येला कवटाळून धरणाऱ्या मातेप्रमाणें दीन व वनवास केलेल्या त्या सीतेला कवटाळून धरून दुःखाकुल झालेली कौसल्या ह्मणाली २३ "विदेहदेशाधिपति जनक राजाच्या कन्येला, दशरथाच्या स्नुषेला आणि रामाच्या पत्नीला निर्जन वनामध्यें दुःख प्राप्त होण्याचा प्रसंग कसा बरें आला ? २४. हे विदेहराजकन्ये, सूर्याच्या तापानें संतप्त झालेल्या श्वेत[illegible] कमलाप्रमाणें, चुरगळून गेलेल्या आरक्तवर्ण कमलाप्रमाणें धुळीनें भरलेल्या, सुवर्णाप्रमाणें अथवा मेघांनीं घेरलेल्या चंद्राप्रमाणें, अस-

प्रेक्ष्य मां शोको दहत्यग्निरिवाश्रयम् । भृशं मनसि वैदेहि व्यसनारणिसंभवः २६ ब्रुवन्त्यामेवमार्तायां जनन्यां भरताग्रजः । पादावासाद्य जग्राह वसिष्ठस्य च राघवः २७ पुरोहितस्याग्निसमस्य तस्य वै बृहस्पतेरिन्द्र इवामराधिपः । प्रगृह्य पादौ सुसमृद्धतेजसः सहैव तेनोपविवेश राघवः २८ ततो जघन्यं सहितैः स्वमन्त्रिभिः पुरप्रधानैश्च तथैव सैनिकैः । जनेन धर्मज्ञतमेन धर्मवानुपोपविष्टो भरतस्तदाग्रजम् २९ उपोपविष्टस्तु तदातिवीर्यवांस्तपस्विवेषेण समीक्ष्य राघवम् । श्रिया ज्वलन्तं भरतः कृताञ्जलिर्यथा महेन्द्रः प्रयतः प्रजापतिम् ३० किमेष वाक्यं भरतोद्य राघवं प्रणम्य सत्कृत्य च साधु वक्ष्यति । इतीव तस्यार्यजनस्य तत्त्वतो बभूव कौतूहलमुत्तमं तदा ३१ स राघवः सत्यधृतिश्च लक्ष्मणो महानुभावो भरतश्च धार्मिकः । वृताः सुहृद्भिश्च विरेजिरेध्वरे यथा सदस्यैः सहितास्त्रयोग्नयः ३२ [३८९४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे चतुरुत्तरशततमः सर्गः ॥ १०४ ॥

---

लेलें तुझें मुख अवलोकन करून दुःखरूप अरणीपासून उत्पन्न झालेला शोक घ जाळून टाकणाऱ्या अग्नीप्रमाणें मनामध्यें माझा अतिशय दाह करित आहे " २५,२६ ह्याप्रमाणें दुःखाकुल होऊन कौसल्या माता विलाप करीत असतांना भरताग्रज रामा समीप येऊन वसिष्टांचे पाय धरिले २७ आणि देवराज इंद्र ज्याप्रमाणें बृहस्पती पाय धरितो त्याप्रमाणें अत्यंत विपुल तेजानें युक्त असलेल्या त्या अग्नितुल्य पुरोहि वसिष्ठांचे पाय धरून रघुवंशज राम त्यांच्याचबरोबर बसला २८ आणि तदनंतर आप मंत्रि, नगरांतील मुख्य मुख्य लोक, सैनिक आणि अत्यंत धर्मनिष्ठ लोक ह्यांसहवर्त मान भरत त्या ज्येष्ठ भ्रात्याच्या पृष्ठभागाचा आश्रय करून समीपच बसला २९ कांतीनें झळकत असलेल्या रामाकडे पाहून शुचिर्भूत इंद्र ज्याप्रमाणें ब्रह्मदेवापाशी बसतो त्याप्रमाणें अत्यंत वीर्यवान् भरत हात जोडून रामाचे जवळ बसला असतां ३० " हा भरत प्रणामपूर्वक व सत्कारपूर्वक रामाशीं आतां काय चांगलें भाषण करण आहे ? " अशा प्रकारची तेथें जुळलेल्या सभ्य लोकांना खरोखर अगदीं पराकाष्ठे चिंता लागून राहिली ३१. असो. सदस्यांसह वर्तमान असलेले तीन अग्नि ज्याप्रमा यज्ञामध्यें शोभूं लागतात त्याप्रमाणें सुहृदांनीं परिवेष्टित झालेले ते त्रिवर्ग— ह्मण सत्यनिष्ठ राम, महापराक्रमी लक्ष्मण आणि धर्मनिष्ठ भरत— शोभूं लागले ३२ ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकीप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्या कांडापैकीं एकशें चौथा सर्ग समाप्त झाला ॥ १०४ ॥

ततः पुरुषसिंहानां वृतानां तैः सुहृद्गणैः । शोचतामेव रजनी दुःखेन व्यत्यवर्तत १ रजन्यां सुप्रभातायां भ्रातरस्ते सुहृद्वृताः । मन्दाकिन्यां हुतं जप्यं कृत्वा राममुपागमन् २ तूष्णीं ते समुपासीना न कश्चित्किंचिदब्रवीत् । भरतस्तु सुहृन्मध्ये रामं वचनमब्रवीत् ३ सान्त्विता मामिका माता दत्तं राज्यमिदं मम । तद्ददामि तवैवाहं भुङ्क्ष्व राज्यमकण्टकम् ४ महतेवाम्बुवेगेन भिन्नः सेतुर्जलागमे । दुरावरं त्वदन्येन राज्यखण्डमिदं महत् ५ गतिं खर इवाश्वस्य तार्क्ष्यस्येव पतत्रिणः । अनुगन्तुं न शक्तिर्मे गतिं तव महीपते ६ सुजीवं नित्यशस्तस्य यः परैरुपजीव्यते । राम तेन तु दुर्जीवं यः परानुपजीवति ७ यथा तु रोपितो वृक्षः पुरुषेण विवर्धितः । ह्रस्वकेन दुरारोहो रूढस्कन्धो महाद्रुमः ८ स यदा पुष्पितो भूत्वा फलानि न विदर्शयेत् । स तां नानुभवेत्प्रीतिं यस्य हेतोः प्ररोपितः ९ एषोपमा महाबाहो तदर्थं वेत्तुमर्हसि । यत्र त्वमस्मान्वृषभो भर्ता भृत्यान्न शाधि

---

तदनंतर त्या सुहृद्गणांनीं परिवेष्टित होऊन ते पुरुषश्रेष्ठ शोक करूं लागले असतां दुःखानें शोक करितां करितांच रात्र निघून गेली १ व रात्र चांगली उजाडल्यावर सुहृद्गणांनीं परिवेष्टित असलेले ते भ्राते मंदाकिनी नदीचे तिरीं होमहवन व जपजाप्य आटोपून रामाकडे गेले २ आणि तेथें स्वस्थ बसले. कोणीही कांहींही बोलला नाहीं. तेव्हां सुहृदांमध्यें भरत रामाला ह्मणाला ३ " राजानें माझ्या मातेचें सांत्वन करून मला हें राज्य दिलें आहे तें आतां मी तुला देतों आणि तूंच ह्या निष्कंटक राज्याचा उपभोग घे ४. वर्षाकाळीं मोठ्या जलवेगानें फुटून गेलेला बांध जसा आवरणें अशक्य आहे तसें हें भरतखंडसंज्ञक प्रचंड राज्य तुझ्यावांचून इतराला आवरतां येणें अशक्य आहे ५. हे भूपते, ज्याप्रमाणें अश्वाच्या गतीचें अवलंबन करण्यास गर्दभ असमर्थ आहे अथवा ज्याप्रमाणें गरुडाची गति स्वीकारण्यास पक्ष्याचें सामर्थ्य नाहीं त्याचप्रमाणें तुझ्या राज्यपालन शक्तीचें अवलंबन करण्यास मी समर्थ नाहीं ६. हे रामा, ज्याच्यावर दुसऱ्यांची उपजीविका चालते त्याचेंच जीवन चांगलें आहे; परंतु, जो उपजीविकेकरितां दुसऱ्यावर अवलंबून असतो त्याचें जीवन दुःखमय आहे. ( तस्मात्, तूंच राज्य करणें योग्य आहे ) ७. एकाद्या पुरुषानें लाविलेला व वाढविलेला वृक्ष शाखा फुटून ठेंगण्या पुरुषाला सहज चढतां न येईल अशा रीतीनें मोठा होऊन ८ आणि पुष्पांनीं युक्त होऊनही जेव्हां फलें दाखविणार नाहीं आणि असें झालें असतां ज्या फलाच्या हेतूनें तो वृक्ष लाविला त्या फलप्राप्तीचा आनंद ज्याप्रमाणें त्या लावणाऱ्यास अनुभवण्यास सांपडत नाहीं त्याचप्रमाणें तुझी अवस्था झाली आहे ९. कारण, ज्याअर्थी तूं श्रेष्ठ व

हि १० श्रेणयस्त्वां महाराज पश्यन्त्वग्र्याश्च सर्वशः । प्रतपन्तमिवादित्यं राज्यस्थितमरिंदमम् ११ तथा नु याने काकुत्स्थ मत्ता नर्दन्तु कुञ्जराः । अन्तःपुरगता नार्यो नन्दन्तु सुसमाहिताः १२ तस्य साध्वनुमन्यन्त नागरा विविधा जनाः । भरतस्य वचः श्रुत्वा रामं प्रत्यनुयाचतः १३ तमेवं दुःखितं प्रेक्ष्य विलपन्तं यशस्विनम् । रामः कृतात्मा भरतं समाश्वासयदात्मवान् १४ नात्मनः कामकारो हि पुरुषोयमनीश्वरः । इतश्चेतरतश्चैनं कृतान्तः परिकर्षति १५ सर्वे क्षयान्ता निचयाः पतनान्ताः समुच्छ्रयाः । संयोगा विप्रयोगान्ता मरणान्तं च जीवितम् १६ यथा फलानां पक्वानां नान्यत्र पतनाद्भयम् । एवं नरस्य जातस्य नान्यत्र मरणाद्भयम् १७ यथागारं दृढस्थूणं जीर्णं भूत्वोपसीदति । तथावसीदन्ति

---

परिपालन करण्यास समर्थ असूनही आह्मां सेवकांचें परिपालन करीत नाहींस त्याअर्थी हीच उपमा तुला योग्य आहे आणि, हे महापराक्रमी रामा, ( राजा दशरथाचे प्रयत्न व्यर्थ गेले हा ) त्या उपमेचा अर्थही तूं जाणीत आहेत १०. हे महाराजा, अनेक जातींच्या लोकांचे मुख्य मुख्य सर्व समुदाय शत्रुदमन करणारा तूं राज्यावर बसून सूर्याप्रमाणें प्रकाशत आहेस असें पाहोत ११ व त्याचप्रमाणें, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, स्वारी निघाली असतां मत्त गज गर्जना करोत आणि अंतःपुरांतील स्त्रिया मनामध्यें अतिशय स्वस्थ होऊन तुझें अभिनंदन करोत" १२. ह्याप्रमाणें भरत रामाची प्रार्थना करूं लागला असतां तें त्याचें भाषण श्रवण केल्यावर "उत्तम उत्तम" ह्मणून नानाप्रकारच्या नागरिक लोकांनीं त्या भाषणाला अनुमोदन दिलें १३; परंतु, ह्याप्रकारें यशस्वी भरत दुःखाकुल होऊन विलाप करीत आहे असें पाहून धैर्यवान् व जितेंद्रिय राम भरताचें सांत्वन करूं लागला १४. ( तो ह्मणाला ) " जीवाला स्वेच्छेनें कांहींएक करण्याचें सामर्थ्य नाहीं. कारण, हा पुरुष स्वातंत्र्यरहित आहे. ह्यामुळें ह्याला अंतर्यामिरूप काल इकडून तिकडे ( कर्माप्रमाणें ) ओढून नेत असतो. ( तस्मात्, माझ्या वनवासाला कैकेयी किंवा राजा ह्यांपैकीं कोणीही कारण नसून अदृष्टच मुख्य कारण आहे ) १५. नाश हाच सर्व संग्रहांचा परिणाम आहे, पतन हाच सर्व उन्नतींचा शेवट आहे, वियोग हाच सर्व संयोगांचा अंत आहे आणि मरण हाच जीविताचा शेवट आहे. तेव्हां राजाच्या मृत्यूबद्दल अथवा राज्यापासून मी वनामध्यें आल्याबद्दल शोक करण्यांत कांहीं अर्थ नाहीं १६. ज्याप्रमाणें पक्व फलांना पतनावांचून दुसरें भय नाहीं त्याचप्रमाणें जन्मास आलेल्या पुरुषांना मरणावांचून दुसरें भय नाहीं १७. ज्याप्रमाणें दृढ खांबांनीं युक्त असलेलेंही घर जीर्ण होऊन नाहींसें

नरा जरामृत्युवशंगताः १८ अत्येति रजनी या तु सा न प्रतिनिवर्तते । यात्येव यमुना पूर्णं समुद्रमुदकार्णवम् १९ अहोरात्राणि गच्छन्ति सर्वेषां प्राणिनामिह । आयूंषि क्षपयन्त्याशु ग्रीष्मे जलमिवांशवः २० आत्मानमनुशोच त्वं किमन्यमनुशोचसि । आयुस्तु हीयते यस्य स्थितस्याथ गतस्य च २१ सहैव मृत्युर्व्रजति सह मृत्युर्निषीदति । गत्वा सुदीर्घमध्वानं सह मृत्युर्निवर्तते २२ गात्रेषु वलयः प्राप्ताः श्वेताश्चैव शिरोरुहाः । जरया पुरुषो जीर्णः किं हि कृत्वा प्रभावयेत् २३ नन्दन्त्युदित आदित्ये नन्दन्त्यस्तमितेहनि । आत्मनो नावबुध्यन्ते मनुष्या जीवितक्षयम् २४ हृष्यन्त्यृतुमुखं दृष्ट्वा नवं नवमिवागतम् । ऋतूनां परिवर्तेन प्राणिनां प्राणसंक्षयः २५ यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महार्णवे । समेत्य तु

---

होतें त्याचप्रमाणें लोक जरा आणि मृत्यु ह्यांच्या तावडींत सांपडून नाश पावतात १८. ज्याप्रमाणें जलानें परिपूर्ण असलेल्या समुद्रामध्यें जाणारी यमुना तेथून कधींही परत फिरत नाहीं त्याप्रमाणें जी रात्र गेली ती फिरून परत येत नाहीं १९. ग्रीष्मऋतुमध्यें ज्याप्रमाणें सूर्यकिरणें उदक शोषून टाकितात त्याचप्रमाणें जाणारीं अहोरात्रें ह्या जगतांतील सर्व प्राण्यांच्या आयुष्यांचा सत्वर क्षय करीत असतात २०. तस्मात्, तूं आपल्या स्वतः-बद्दल शोक कर; दुसऱ्याकरितां तूं कां शोक करीत आहेस ? उभा अथवा चालणारा असा कोणी जरी असला तरी त्याचें आयुष्य कमी होतच असतें. (तेव्हां अनिवार मृत्यु जवळ जवळ येत चालला; आतां माझी अवस्था काय होईल ह्मणून स्वतःबद्दलच शोक करीत बसणें तुला योग्य आहे ) २१. अरे, प्राणी जाऊं लागला तरी मृत्यु त्याच्याबरोबर जातोच; तो बसला तरी मृत्यु त्याच्याबरोबर बसतोच आणि दूर मार्ग चालून प्राणी परत फिरूं लागला तरीही मृत्यु त्याच्याबरोबरच चालत जाऊन त्याच्याबरोबरच परत फिरतो. सारांश, ( मृत्यु प्राण्याचे संनिध एकसारिखा आहेच आहे )२२. अरे, अवयवांवर सुरकुत्या पडतात, केश पांढरे होऊन जातात आणि जरेनें पुरुष जीर्ण होऊन जातो. तेव्हां कोणता उपाय करून हें सर्व टाळण्याला प्राणी समर्थ होणार आहे ? २३. पुरुष सुर्योदय झाला असतांही आनंदित होतात आणि दिवस मावळला तरीही आनंदितच होतात; परंतु, आपल्या जीविताचा क्षय होत आहे हें त्यांना समजत नाहीं २४. फिरून फिरून ऋतूला आरंभ झालेला पाहून व तो ऋतु पूर्वी कधीं न आलेला असा नवानवाच प्राप्त झाला आहे असें वाटून प्राण्यांना हर्ष होतो; परंतु, ऋतूंच्या फेऱ्यानें प्राण्यांचा नाश होत असतो हें त्यांना समजत नाहीं २५. ज्याप्रमाणें महासागरामध्यें एक काष्ठ आणि दुसरें काष्ठ ह्यांचा समागम होतो आणि समागम झाल्यावर ज्याप्रमाणें कांहीं वेळानें

व्यपेयातां कालमासाद्य कंचन २६ एवं भार्याश्च पुत्राश्च ज्ञातयश्च वसूनि च। समेत्य व्यवधावन्ति ध्रुवो ह्येषां विनाभवः २७ नात्र कश्चिद्यथाभावं प्राणी समतिवर्तते। तेन तस्मिन्न सामर्थ्यं प्रेतस्यास्त्यनुशोचतः २८ यथा हि सार्थं गच्छन्तं ब्रूयात्कश्चित्पथि स्थितः। अहमप्यागमिष्यामि पृष्ठतो भवतामिति २९ एवं पूर्वैर्गतो मार्गः पितृपैतामहैर्ध्रुवः। तमापन्नः कथं शोचेद्यस्य नास्ति व्यतिक्रमः ३० वयसः पतमानस्य स्रोतसो वानिवर्तिनः। आत्मा सुखे नियोक्तव्यः सुखभाजः प्रजाः स्मृताः ३१ धर्मात्मा सुशुभैः कृत्स्नैः क्रतुभिश्चाप्तदक्षिणैः। न स शोच्यः पिता तात स्वर्गतः सत्कृतः सताम् ३२ स जीर्णमानुषं देहं परित्यज्य पिता हि नः। दैवीमृद्धिमनुप्राप्तो ब्रह्मलोकविहारिणीम् ३३ तं तु नैवंविधः कश्चित्प्राज्ञः शोचितुमर्हति। त्वद्विधो मद्विधश्चापि श्रुतवान्बुद्धिमत्तरः ३४ एते बहु-

---

त्यांचा वियोग होतो २६ त्याचप्रमाणें भार्या, पुत्र, ज्ञाती व संपत्ति ह्यांचा समागम होत असून नंतर ते एकमेकांपासून दूर धावूं लागतात. कारण, ह्यांचा वियोग हा ठरलेलाच आहे २७. ह्या संसारामध्यें कोणत्याही प्राण्याला जन्ममरणरूप स्वभावाचें अतिक्रमण करितां येत नाहीं व ह्यामुळेंच प्रेताकरितां शोक करीत असलेल्या कोणत्याही प्राण्याचे ठिकाणीं प्रेतत्व नाहींसें करण्याविषयीं सामर्थ्य नाहीं २८. ज्याप्रमाणें एकादा तांडा जाऊं लागला असतां "तुमच्या मागून मीही येतों" असें मार्गामध्यें असलेला दुसरा कोणी त्या तांड्याला ह्मणतो (आणि त्याच्या मागोमाग जातो) २९ त्याचप्रमाणें पूर्वीचे वाडवडील ज्या अवश्य प्राप्त होणाऱ्या मार्गानें गेले आणि ज्या मार्गाचें उल्लंघन करितां येत नाहीं त्याच मार्गाला स्वतः लागलेल्या पुरुषानें (पितरादिकांकरितां) कां बरें शोक करावा? ३०. जलप्रवाहाप्रमाणें परत न फिरतां सतत उडत जाणाऱ्या पक्ष्यांचा नाशच होतो हें लक्ष्यांत घेऊन आत्मा सुखसाधनरूप धर्माकडे लावावा हें बरें; कारण, सुखसाधन प्राप्त होण्याचें कारण जो जन्म तो प्राण्यांना प्राप्त होतो असें ह्मणतात ३१. बा भरता, सज्जनांना पूज्य असा आपला धर्मात्मा पिता उत्कृष्ट आणि विपुल दक्षिणांनीं युक्त असे सर्व क्रतु करून स्वर्गाला गेला आहे. तस्मात्, त्याच्याकरितां शोक करणें योग्य नाहीं ३२. कारण, जीर्ण झालेल्या ह्या मनुष्य देहाचा त्याग करून जिच्या योगानें ब्रह्मलोकामध्यें विहार करितां येतो अशी दैवी संपत्ति आपल्या पित्याला प्राप्त झाली आहे ३३. तेव्हां अशा प्रकारें तुझ्यासारिख्या अथवा माझ्यासारिख्या कोणाही समंजस, आत्मविद्येचें अध्ययन केलेल्या आणि बुद्धिमान् अशा पुरुषानें त्याच्याकरितां शोक करणें योग्य

विधाः शोका विलापरुदिते तदा । वर्जनीया हि धीरेण सर्वावस्थासु धीमता ३५ स स्वस्थो भव मा शोको यात्वा चावस तां पुरीम् । तथा पित्रा नियुक्तोसि वशिना वदतां वर ३६ यत्राहमपि तेनैव नियुक्तः पुण्यकर्मणा । तत्रैवाहं करिष्यामि पितुरार्यस्य शासनम् ३७ न मया शासनं तस्य त्यक्तुं न्याय्यमरिंदम । स त्वयापि सदा मान्यः स वै बन्धुः स नः पिता ३८ तद्वचः पितुरेवाहं संमतं धर्मचारिणाम् । कर्मणा पालयिष्यामि वनवासेन राघव ३९ धार्मिकेणानृशंसेन नरेण गुरुवर्तिना । भवितव्यं नरव्याघ्र परलोकं जिगीषता ४० आत्मानमनुतिष्ठ त्वं स्वभावेन नरर्षभ । निशाम्य तु शुभं वृत्तं पितुर्दशरथस्य नः ४१ इत्येवमुक्त्वा वचनं महात्मा पितुर्निदेशप्रतिपालनार्थम् । यवीयसं भ्रातरमर्थवच्च प्रभुर्मुहूर्ताद्विरराम रामः ४२ [३९३६] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे पञ्चोत्तरशततमः सर्गः ॥ १०५ ॥

एवमुक्त्वा तु विरते रामे वचनमर्थवत् । ततो मन्दाकिनीतीरे रामं

---

नाहीं ३४. कशीही अवस्था प्राप्त झाली तरी विचारी धीर पुरुषानें हे नानाप्रकारचे शोक, विलाप आणि रोदन ह्यांपासून अलग राहिले पाहिजे ३५. सारांश, तूं स्वस्थ हो; शोक करूं नको आणि येथून जाऊन त्या अयोध्यानगरीमध्यें रहा. कारण, हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ भरता, सत्यानें आधीन असलेल्या पित्यानें तुला त्याप्रमाणें आज्ञा केली आहे ३६. जिकडे त्याच पुण्यकर्मी पित्यानें माझी योजना केली आहे त्याच-कृत्यामध्यें प्रवृत्त होऊन मी आपल्या सज्जन पित्याची आज्ञा शेवटास नेईन ३७. हे शत्रूंचें दमन करणाऱ्या भरता, त्याची आज्ञा मी झुगारून देणें न्याय्य नाहीं आणि तो तुलाही सर्वदां मान्यच आहे. कारण, तोच आपला बंधु व पिता आहे ३८. सारांश, हे रघुवंशजा भरता, धर्मनिष्ठांना संमत अशी त्या पित्याचीच आज्ञा वनवासरूप कर्माच्या योगानें मी परिपालन करीन ३९. हे पुरुषश्रेष्ठा भरता, परलोकप्राप्तीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें धार्मिक, सज्जन व सद्वर्तनी असलें पाहिजे ४०. आपल्या पित्या दशरथाला मरण चांगलें आलें आहे ( ह्मणजे त्याला उत्तम गति प्राप्त झाली आहे ) हें लक्ष्यांत आणून, हे पुरुषश्रेष्ठा भरता, सुस्वभावानें युक्त असलेला तूं आपल्या हिताचा विचार कर " ४१. ह्याप्रमाणें पित्याची आज्ञा परिपालन करण्याकरितां कनिष्ठ भ्रात्याशीं एक मुहूर्तभर अर्थपरिपूर्ण भाषण करून तो महात्मा समर्थ राम स्वस्थ बसला ४२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशेंपांचवा सर्ग समाप्त झाला ॥ १०५ ॥

प्रकृतिवत्सलम् १ उवाच भरतश्चित्रं धार्मिको धार्मिकं वचः । को हि स्यादीदृशो लोके यादृशस्त्वमरिंदम २ न त्वां प्रव्यथयेद्दुःखं प्रीतिर्वा न प्रहर्षयेत् । संमतश्चापि वृद्धानां तांश्च पृच्छसि संशयान् ३ यथा मृतस्तथा जीवन्यथासति तथा सति । यस्यैष बुद्धिलाभः स्यात्परितप्येत केन सः ४ परावरज्ञो यश्च स्याद्यथा त्वं मनुजाधिप । स एव व्यसनं प्राप्य न विषीदितुमर्हति ५ अमरोपमसत्वस्त्वं महात्मा सत्यसंगरः । सर्वज्ञः सर्वदर्शी च बुद्धिमांश्चासि राघव ६ न त्वामेवंगुणैर्युक्तं प्रभवाभवकोविदम् । अविषह्यतमं दुःखमासादयितुमर्हति ७ प्रोषिते मयि यत्पापं मात्रा मत्कारणात्कृतम् । क्षुद्रया तदनिष्टं मे प्रसीदतु भवान्मम ८ धर्मबन्धेन बद्धोस्मि तेनेमां नेह मातरम् । हन्मि तीव्रेण दण्डेन दण्डार्हां पापकारिणीम् ९ कथं दशरथाज्जातः शुभाभिजनकर्मणः । जानन्धर्म-

---

ह्याप्रमाणें अर्थपरिपूर्ण भाषण करून राम स्वस्थ बसला असतां मंदाकिनीचे तीरीं प्रकृतिवत्सल रामाला अनुलक्षून १ धर्मनिष्ठ भरत धर्माला अनुसरून असलेलें विस्मयजनक भाषण करूं लागला कीं " हे शत्रुदमना, तुझ्यासारिखा ह्या जगतामध्यें कोण बरें असेल ? २. वृद्धांना ( धर्मविषयामध्यें ) तूं संमत असतांनाही ( लोकमर्यादेला अनुसरून ) त्या वृद्धांना तूं संशयास्पद धर्म विचारीत असतोस. तेव्हां ( ह्याप्रमाणें तूं सर्वज्ञ व मनोरथ परिपूर्ण झालेला असल्यामुळें ) दुःखदायक गोष्ट घडली असतां तुला दुःख होत नाहीं अथवा आनंदकारक प्रकार घडला असतां तुला हर्षही होत नाहीं ३. देहाच्या जीवनावस्थेंत आणि मरणावस्थेंत जीव हा सारखाच असून बरा अथवा वाईट कसाही प्रसंग प्राप्त झाला तरी त्यांत भेद होत नाहीं, अशी बुद्धि ज्याची होईल त्याला कोणत्या बरें कारणांनीं दुख होणार आहे ? ४. हे प्रजाधिपते, तुझ्याप्रमाणें जो संसाररहित आत्मतत्त्व जाणणारा असेल त्याला अशा प्रकारचें संकट प्राप्त झालें असतां खेद होणार नाहीं ५. हे राघवा, तूं महात्मा, सत्यप्रतिज्ञ, सर्वज्ञ, सर्वांकडे दृष्टि देणारा, बुद्धिमान् आणि देवांप्रमाणें सत्वगुणी आहेस ६. तेव्हां ह्या गुणांनीं युक्त आणि उत्पत्ति विनाश जाणणाऱ्या तुला अत्यंत दुःसह दुःखही घाबरून टाकण्यास समर्थ होणार नाहीं ७. मी परदेशामध्यें गेलों असतांना माझ्याकरितां क्षुद्र मातेनें जें पातक केलें तें मला संमत नाहीं. ह्यास्तव, आपण माझ्यावर कृपा करा ( आणि राज्याचा स्वीकार करा ) ८. मी धर्मरूप बंधनानें बद्ध झालों आहें आणि ह्मणून दंडाला योग्य अशा ह्या पाप कर्म करणाऱ्या मातेचा तीक्ष्ण दंडानें मी ह्या ठिकाणीं वध करीत नाहीं ९. कारण, महाकुलीन आणि सत्कर्मी अशा दशरथापासून उत्पन्न झालों असून

मधर्मं च कुर्यां कर्म जुगुप्सितम् १० गुरुः क्रियावान्वृद्धश्च राजा प्रेतः पितेति च । तातं न परिगर्हेऽहं दैवतं चेति संसदि ११ को हि धर्मार्थयोर्हीनमीदृशं कर्म किल्बिषम् । स्त्रियः प्रियचिकीर्षुः सन्कुर्याद्धर्मज्ञ धर्मवित् १२ अन्तकाले हि भूतानि मुह्यन्तीति पुरा श्रुतिः । राज्ञैवं कुर्वता लोके प्रत्यक्षा सा श्रुतिः कृता १३ साध्वर्थमभिसंधाय क्रोधान्मोहाच्च साहसात् । तातस्य यदतिक्रान्तं प्रत्याहरतु तद्भवान् १४ पितुर्हि समतिक्रान्तं पुत्रो यः साधु मन्यते । तदपत्यं मतं लोके विपरीतमतोऽन्यथा १५ तदपत्यं भवानस्तु मा भवान्दुष्कृतं पितुः । अति यत्तत्कृतं कर्म लोके धीरविगर्हितम् १६ कैकेयीं मां च तातं च सुहृदो बान्धवांश्च नः । पौरजानपदान्सर्वांस्त्रातु सर्वमिदं भवान् १७ क्व चारण्यं क्व च क्षात्रं क्व जटाः क्व च पालनम् । ईदृशं व्याहतं कर्म न भवान्कर्तुमर्हति १८ एष हि प्रथमो धर्मः क्षत्रियस्याभिषेचनम् [१९] येन शक्यं

---

धर्म व अधर्म जाणणारा मी निंद्य कर्म कसें करूं ? १०. पिता दशरथराजा वृद्ध व मोठमोठे क्रतु केलेला आणि गुरु असून आतां मरण पावला आहे ह्मणून देव असें मानून मी त्याला सभेमध्यें दोष देत नाहीं ११. हे धर्मवेत्त्या रामा, कोण रे धर्मवेत्ता पुरुष स्त्रीचें प्रिय करण्याकरितां अशाप्रकारचें धर्मार्थशून्य पापकर्म करील ? १२. अंतकालीं प्राण्यांना मोह होतो ही सनातन श्रुति आह्मी ऐकत होतों; परंतु ती श्रुति असा प्रकार करणाऱ्या राजानें जगतामध्यें लोकांच्या प्रत्यक्ष पुराव्याला आणून दिली १३. क्रोधामुळें, मोहामुळें आणि साहसामुळें पित्याच्या हातून जें होऊन गेलें तें चांगला युक्तायुक्त विचार करून आपण सुधारावें १४. पित्याच्या हातून कांहीं अतिक्रम झाला असतां जो पुत्र तो सुधरून घेतो तोच अपत्य ह्मणून लोकांना संमत असतो; ह्या विरूद्ध असलेला पुत्र लोकांना संमत होत नाहीं. (कारण, पतनाला हेतुभूत अशी गोष्ट पित्याच्या हातून घडली असतां जो ती आपल्या आचरणानें सुधरीत नाहीं त्याला अपत्य ही अन्वर्थक संज्ञा लागतच नाहीं ) १५. तस्मात्, आपण अपत्य व्हा; पित्याच्या दुष्कृत्याला आपण संमति देऊं नका. कारण, धर्माचें अतिक्रमण करून जें कर्म दशरथानें केलें आहे तें जगतांतील विद्वान् लोकांनीं निंद्य मानिलें आहे १६. कैकयी, मी, पिता, सुहृद, आमचे बांधव आणि अयोध्यानगरींतील व देशांतील सर्व लोक ह्यांना तारण्याकरितां आपण माझें हें सर्व मागणें मान्य करा १७. अरण्यवास कोणीकडे व क्षत्रधर्म कोणीकडे आणि त्याचप्रमाणें जटा धारण करणें कोणीकडे व प्रजापालन कोणीकडे. सारांश, अशा प्रकारचें हें घोटाळ्याचें कृत्य

महाप्राज्ञ प्रजानां परिपालनम् १९ कथं प्रत्यक्षमुत्सृज्य संशयस्थमलक्षणम् । आयतिस्थं चरेद्धर्मं क्षत्रबन्धुरनिश्चितम् २० अथ क्लेशजमेव त्वं धर्मं चरितुमिच्छसि । धर्मेण चतुरो वर्णान्पालयन्क्लेशमाप्नुहि २१ चतुर्णामाश्रमाणां हि गार्हस्थ्यं श्रेष्ठमुत्तमम् । आहुर्धर्मज्ञधर्मज्ञास्तं कथं त्यक्तुमिच्छसि २२ श्रुतेन बालः स्थानेन जन्मना भवतो ह्यहम् । स कथं पालयिष्यामि भूमिं भवति तिष्ठति २३ हीनबुद्धिगुणो बालो हीनस्थानेन चाप्यहम् । भवता च विना भूतो न वर्तयितुमुत्सहे २४ इदं निखिलमप्यग्र्यं राज्यं पित्र्यमकण्टकम् । अनुशाधि स्वधर्मेण धर्मज्ञः सह बान्धवैः २५ इहैव त्वाभिषिञ्चन्तु सर्वाः प्रकृतयः सह । ऋत्विजः सवसिष्ठाश्च मन्त्रविन्मन्त्रकोविदाः २६ अभिषिक्तस्त्वमस्माभिरयोध्यां पालने व्रज । विजित्य तरसा लोकान्मरुद्भिरिव वासवः २७ ऋणानि त्रीण्यपाकुर्वन्दुर्हृदः साधु निर्दहन् । सुहृदस्तर्पयन्कामैस्त्वमेवात्रानुशाधि

---

आपण करूं नका १८. राज्याभिषेक करून घेणें हाच क्षत्रियांचा मुख्य धर्म आहे आणि, हे महाबलवान्, त्याच्याच योगानें प्रजेचें परिपालन होणें शक्य आहे १९. तेव्हां प्रत्यक्ष सुखसाधन असलेल्या प्रजापालनरूप धर्माचा त्याग करून संशयित, सुखलक्षणरहित, अनावश्यक आणि उत्तर वयालाच योग्य अशा धर्माचें आचरण कोणता बरें निंद्य क्षात्रिय करणार आहे? २०. आतां कष्टसाध्य धर्माचेंच आचरण करण्याची जर तुम्ही इच्छा असेल तर धर्मानें चार वर्णांचें परिपालन करितांना तुला क्लेश होतील २१. धर्मवेत्ते लोक चारी आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम श्रेष्ठ ह्मणतात. तस्मात्, हे धर्मज्ञा, तूं त्या आश्रमाचा त्याग करण्याचें कसें मनामध्यें आणीत आहेस? २२. विद्येनें, नात्यानें आणि वयानेंही मी आपल्यापेक्षां लहान आहें. तेव्हां आपण असतांना मी पृथ्वीचें पालन कसें करूं २३. बुद्धीनें हीन आणि नात्यानेंही हीन असलेल्या मला आपणावांचून जिवंत रहाणेंही शक्य नाहीं. ( मग राज्य चालविण्याची गोष्ट कशाला पाहिजे ) २४. तेव्हां परंपरेनें चालत आलेलें हें संपूर्ण श्रेष्ठ व निष्कंटक राज्य बांधवांसहवर्तमान स्वधर्मानें तूं धर्मज्ञ परिपालन कर २५. हे मंत्रवेत्त्या, सर्व अमात्य आणि मंत्रामध्यें प्रवीण असलेले वसिष्ठासहवर्तमान ऋत्विज हे एकत्र जुळून येथेंच तुला राज्याभिषेक करोत २६ आणि राज्याभिषेक झाल्यावर मरुद्गणासहवर्तमान ज्याप्रमाणें इंद्र जातो त्याप्रमाणें आपल्या सामर्थ्यानें शत्रुपक्षीय लोकांना जिंकून तूं प्रजेचें परिपालन करण्याकरितां आमच्या बरोबर अयोध्येमध्यें चल २७ व तिन्ही ऋणांची फेड करीत करीत, दुष्टांचा चांगला नाश करीत करीत

माम् २८ अद्यार्य मुदिताः संतु सुहृदस्तेभिषेचने । अद्य भीताः पलायन्तु दुष्प्रदास्ते दिशो दश २९ आक्रोशं मम मातुश्च प्रमृज्य पुरुषर्षभ । अद्य तत्रभवन्तं च पितरं रक्ष किल्बिषात् ३० शिरसा त्वाभियाचेहं कुरुष्व करुणां मयि । बान्धवेषु च सर्वेषु भूतेष्विव महेश्वरः ३१ अथवा पृष्ठतः कृत्वा वनमेव भवानितः । गमिष्यति गमिष्यामि भवता सार्धमप्यहम् ३२ तथाभिरामो भरतेन ताम्यता प्रसाद्यमानः शिरसा महीपतिः । न चैव चक्रे गमनाय सत्त्ववान्मतिं पितुस्तद्वचने प्रतिष्ठितः ३३ तदद्भुतं स्थैर्यमवेक्ष्य राघवे समं जनो हर्षमवाप दुःखितः । न यात्ययोध्यामिति दुःखितोभवत्स्थिरप्रतिज्ञत्वमवेक्ष्य हर्षितः ३४ तमृत्विजो नैगमयूथवल्लभास्तथा विसंज्ञाश्रुकलाश्च मातरः । तथा ब्रुवाणं भरतं प्रतुष्टुवुः प्रणम्य रामं च ययाचिरे सह ३५ [३९७१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे षडुत्तरशततमः सर्गः ॥ १०६ ॥

---

आणि सुहृदांना इष्ट वस्तु देऊन तृप्त करीत करीत तूं ह्या अयोध्येमध्य राहून मला आज्ञा करीत जा २८. हे आर्य, आज तुला राज्याभिषेक होऊन तुझे सुहृद आनंदित होवोत आणि तुला दुःख देणारे भयभीत होऊन रानोमाळ पळत सुटोत २९. हे पुरुषश्रेष्ठा, माझ्या मातेचें निंद्य कर्म नाहींसें करून तूं आज त्या पूज्य पित्याचें नरकापासून रक्षण कर ३०. मी चरणीं मस्तक ठेवून तुझी प्रार्थना करीत आहें. ह्यास्तव भूतावर कृपा करणाऱ्या महेश्वराप्रमाणें तूं माझ्यावर आणि सर्व बांधवांवर कृपा कर ३१. अथवा माझ्या प्रार्थनेकडे दुर्लक्ष्य करून आपण जर इतउत्तर वनामध्येंच जाणार असाल तर मीही आपणाबरोबर वनामध्यें येईन "३२. ह्याप्रमाणें खेद करीत करीत चरणीं मस्तक ठेवून भरत पृथ्वीपति रामाची प्रार्थना करूं लागला असतांही पित्याच्या आज्ञेला धरून राहिलेल्या सत्वशील रामानें अयोध्येला जाण्याचें मनांत आणिलें नाहीं ३३. तेव्हां रामाचे ठिकाणीं तें अद्भुत स्थैर्य अवलोकन करून पूर्वी तेथें आलेल्या दुःखी लोकांना दुःखाबरोबर हर्षही झाला. राम अयोध्येला येत नाहीं ह्मणून त्यांना दुःख झालें आणि त्याची दृढ प्रतिज्ञा अवलोकन करून त्यांना हर्ष झाला ३४. असो. ऋत्विज, नागरिक लोकांच्या समुदायांतील मुख्य आणि भान नाहींसें होऊन अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या माता, ह्या सर्वांनीं तशाप्रकारें बोलत असलेल्या त्या भरताची प्रशंसा केली आणि एकत्र जुळून त्या ऋत्विज प्रभृतींनीं अयोध्येला येण्याविषयीं रामाची प्रणामपूर्वक विनवणी केली ३५. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें सहावा सर्ग समाप्त झाला ॥ १०६ ॥

पुनरेवं ब्रुवाणं तं भरतं लक्ष्मणाग्रजः । प्रत्युवाच ततः श्रीमाञ्ज्ञातिमध्ये सुसत्कृतः १ उपपन्नमिदं वाक्यं यस्त्वमेवमभाषथाः । जातः पुत्रो दशरथात्कैकेय्यां राजसत्तमात् २ पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् । मातामहे समाश्रौषीद्राज्यशुल्कमनुत्तमम् ३ देवासुरे च संग्रामे जनन्यै तव पार्थिवः । संप्रहृष्टो ददौ राजा वरमाराधितः प्रभुः ४ ततः सा संप्रतिश्राव्य तव माता यशस्विनी । अयाचत नरश्रेष्ठं द्वौ वरौ वरवर्णिनी ५ तव राज्यं नरव्याघ्र मम प्रव्राजनं तथा । तच्च राजा तथा तस्यै नियुक्तः प्रददौ वरम् ६ तेन पित्राहमप्यत्र नियुक्तः पुरुषर्षभ । चतुर्दश वने वासं वर्षाणि वरदानिकम् ७ सोऽहं वनमिदं प्राप्तो निर्जनं लक्ष्मणान्वितः । सीतया चाप्रतिद्वन्द्वः सत्यवादे स्थितः पितुः ८ भवानपि तथेत्येव पितरं सत्यवादिनम् । कर्तुमर्हसि राजेन्द्र क्षिप्रमेवाभिषिञ्चनात् ऋणान्मोचय राजानं मत्कृते भरत प्रभुम् । पितरं त्राहि धर्मज्ञ मातरं

---

अशाप्रकारें पुनरपि भाषण करणाऱ्या त्या भरताला ज्ञातीमध्यें अत्यंत मान्य असलेला वैभवशाली राम ह्मणाला १ " ह्याप्रमाणें तूं भाषण केलेस हें तुला योग्यच आहे. कारण, नृपश्रेष्ठ दशरथापासून कैकेयीचे ठिकाणीं तूं पुत्र झाला आहेस २. हे भ्रात्या भरता, पूर्वीं आपल्या पित्यानें जेव्हां तुझ्या मातेचें पाणिग्रहण केलें तेव्हां तुझ्या आजापाशीं " हिचे ठिकाणीं जो पुत्र होईल त्याला मी राज्य देईन " अशी आपल्या पित्यानें प्रतिज्ञा केलेली आहे. सारांश, कन्येबद्दल राज्यरूप उत्कृष्ट द्रव्य आपल्या पित्यानें तुला देण्याची प्रतिज्ञा तुझ्या आजापाशीं करून तुझ्या मातेचें पाणिग्रहण केलें होतें ३. शिवाय, देवदैत्यांच्या संग्रामामध्यें तुझ्या मातेनें पृथ्वीपति राजाची सेवा केली असतां त्या प्रभूनें संतुष्ट होऊन तुझ्या मातेला दोन वर देऊं केले होते ४. तेव्हां दोन वर देण्याची प्रतिज्ञा त्या वेळीं त्याच्याकडून करवून घेऊन स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेल्या तुझ्या यशस्विनी मातेनें, हे पुरुषश्रेष्ठा भरता, तुला राज्य आणि मला वनवास • असे दोन वर त्या पुरुषश्रेष्ठ दशरथराजापाशीं मागून घेतले आणि त्याप्रमाणें वचनबद्ध झालेल्या त्या राजानें तिला तसा वर दिला ५,६ आणि, हे पुरुषश्रेष्ठा भरता, वरप्रदाननिमित्तक चवदा वर्षे वनामध्यें वास्तव्य करण्याविषयीं त्या पित्यानें मला आज्ञा केली ७. तेव्हां पित्याचें सत्य वचन परिपालन करण्याविषयीं स्थित व स्पर्धारहित असलेला मी सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान ह्या निर्जन वनामध्यें प्राप्त झालों ८. तुलाही पित्याची राज्य करण्याविषयीं तशी आज्ञाच झालेली आहे. तेव्हां, हे राजेंद्रा भरता, स्वतः सत्वर राज्याभिषेक करून घेऊन तूं आपल्या पित्याला

चाभिनन्दय १० श्रूयते धीमता तात श्रुतिर्गीता यशस्विना । गयेन यजमानेन गयेष्वेव पितॄन्प्रति ११ पुन्नाम्नो नरकाद्यस्मात्पितरं त्रायते सुतः । तस्मात्पुत्र इति प्रोक्तः पितॄन्यः पाति सर्वतः १२ एष्टव्या बहवः पुत्रा गुणवन्तो बहुश्रुताः । तेषां वै समवेतानामपि कश्चिद्गयां व्रजेत् १३ एवं राजर्षयः सर्वे प्रतीता रघुनन्दन । तस्मात्त्राहि नरश्रेष्ठ पितरं नरकात्प्रभो १४ अयोध्यां गच्छ भरत प्रकृतीरुपरञ्जय । शत्रुघ्नसहितो वीर सह सर्वैर्द्विजातिभिः १५ प्रवेक्ष्ये दण्डकारण्यमहमप्यविलम्बयन् । आभ्यां तु सहितो वीर वैदेह्या लक्ष्मणेन च १६ त्वं राजा भरत भव स्वयं नराणां वन्यानामहमपि राजराण्मृगाणाम् । गच्छ त्वं पुरवरमद्य संप्रहृष्टः संहृष्टस्त्वहमपि दण्डकान्प्रवेक्ष्ये १७ छायां ते दिनकरभाः प्रबाधमानं वर्षत्रं भरत करोतु मूर्ध्नि शीताम् । एतेषामहमपि काननद्रुमाणां छायां तामतिशयिनीं शनैः श्रयिष्ये १८ शत्रुघ्नस्त्वतुलमतिस्तु ते सहायः सौमित्रिर्मम विदितः प्रधानमित्रम् । चत्वारस्तनयवरा वयं नरेन्द्रं सत्यस्थं

---

सत्य वचनी कर ९. हे भरता, माझ्याकरितां प्रभु राजाला तूं ऋणांतून मुक्त कर आणि हे धर्मवेत्त्या, पित्याला तारून मातेचें अभिनंदन कर १०. बा भरता, गयाप्रदेशामध्यें यशस्वी व विचारी गय याग करीत असतांना पितरांना उद्देशून त्यानें एक श्रुति ( अर्थरूपानें ) उच्चारिलेली ऐकण्यांत आहे ११ " पुन्नामक नरकापासून सुत ज्याअर्थी पित्याचें रक्षण करितो त्याअर्थी त्याला पुत्र असें ह्मणतात. कारण, ( पितरांकरितां यज्ञयाग वगैरे करून तो सर्वस्वी पितरांचें रक्षण करितो १२. गुणी आणि बहुश्रुत असे पुष्कळ पुत्र प्राप्त होण्याची इच्छा धरावी; ह्मणजे त्या सर्वांपैकीं एकादा तरी गयेला जाईल. " ( ही ती अर्थरूप श्रुति होय ) १३. हे रघुनंदना, ह्याप्रमाणें सर्व राजर्षि विश्वास धरून चाललेले आहेत. तस्मात्, हे प्रभो पुरुषश्रेष्ठा भरता, तूं नरकापासून पित्याचें रक्षण कर १४. हे वीर भरता, सर्व द्विजांबरोबर शत्रुघ्नाला घेऊन तूं अयोध्येला जा आणि प्रजाजनांचें चित्तरंजन कर १५. हे वीरा, सीता आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान मी आतां विलंब न करितां दंडकारण्यामध्यें प्रवेश करितों १६. हे भरता, तूं स्वतः मनुष्यांचा राजा हो आणि मीही वनांतील पशूंचा राजाधिराज होईन. तूं आज आनंदित होऊन श्रेष्ठ नगरीमध्यें जा आणि मीही आनंदित होऊन दंडकारण्यामध्यें प्रवेश करितों १७. सूर्यकिरणें निवारण करणारें छत्र, हे भरता, तुझ्या मस्तकावर शीतल छाया करो आणि मीही त्या छायेलाही मागें टाकणाऱ्या ह्या वनवृक्षांच्या छायेचा हळू हळू आश्रय करितों १८. महामति शत्रुघ्न तुझा मित्र आहे आणि सुमि

भरत चराम मा विषीद १९ [३९९०] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे सप्तोत्तरशततमः सर्गः ॥ १०७ ॥

आश्वासयन्तं भरतं जाबालिर्ब्राह्मणोत्तमः । उवाच रामं धर्मज्ञं धर्मापेतमिदं वचः १ साधु राघव मा भूत्ते बुद्धिरेवं निरर्थिका । प्राकृतस्य नरस्येव ह्यार्यबुद्धेस्तपस्विनः २ कः कस्य पुरुषो बन्धुः किमाप्यं कस्य केनचित् । एको हि जायते जन्तुरेक एव विनश्यति ३ तस्मान्माता पिता चेति राम सज्जेत यो नरः । उन्मत्त इव स ज्ञेयो नास्ति कश्चिद्धि कस्यचित्४ यथा ग्रामान्तरं गच्छन्नरः कश्चिद्बहिर्वसेत् । उत्सृज्य च तमावासं प्रतिष्ठेतापरेहनि ५ एवमेव मनुष्याणां पिता माता गृहं वसु । आवासमात्रं काकुत्स्थ सज्जन्ते नात्र सज्जनाः ६ पित्र्यं राज्यं समुत्सृज्य स नार्हसि नरोत्तम । आस्थातुं कापथं दुःखं विषमं बहुकण्टकम् ७ समृद्धायामयोध्यायामात्मानमभिषेचय । एकवेणीधरा हि त्वा नगरी संप्रतीक्षते ८ राजभोगाननुभवन्महार्हान्पा-

---

त्रापुत्र लक्ष्मण माझा मुख्य मित्र विदितच आहे. हे भरता, आपण चौघे पुत्र राजाला सत्यप्रतिज्ञ करूं; तूं खेद करू नको १९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायण-संज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकशें सातवा सर्ग समाप्त झाला ॥ १०७॥

भरताचें सांत्वन करीत असलेल्या धर्मज्ञ रामाशीं द्विजश्रेष्ठ जाबालि असें धर्मविरुद्ध भाषण करूं लागला कीं १, " हे राघवा, आर्यमति आणि तपस्वी अशा तुझी प्राकृत जनाप्रमाणें अशी निरर्थक बुद्धि होणें योग्य नाहीं २. कोण कोणाचा बंधु आहे आणि एकाचा दुसऱ्याशीं संबंध होऊन कोणाला काय प्राप्त होणार आहे ? अरे, प्राणी हा एकटाच जन्मास येतो आणि एकटाच नाश पावतो ३. तस्मात्, हे रामा, ही माता आणि हा पिता अशा समजुतीनें जो पुरुष आसक्त होऊन राहतो त्याला उन्मत्ताप्रमाणें जाणावें. कारण, कोणी कुणाचा नाहीं ४. ज्याप्रमाणें परगांवीं जाण्याला निघालेला कोणी पुरुष कोठें तरी बाहेर रहातो आणि तें निवासस्थान सोडून दुसऱ्या दिवशीं पुढें चालता होतो ५ त्याप्रमाणें, हे ककुत्स्थकुलोत्पन्ना रामा, पिता, माता, घर व द्रव्य हीं मनुष्यांना प्रवासी लोकांच्या निवासस्थानासारिखीं आहेत आणि ह्मणून ह्यांचे ठिकाणीं सज्जन आसक्ति ठवीत नाहींत ६. तस्मात्, हे पुरुषोत्तमा, परंपरागत राज्याचा त्याग करून दुःखदायक, गहन आणि असंख्य कंटकांनीं भरलेला वनमार्ग स्वीकारणें तुला योग्य नाहीं ७. समृद्ध अयोध्येमध्यें तूं स्वतःला राज्याभिषेक करून घे. विरहचिन्हांनीं युक्त असलेली ती अयोध्यानगरी तुझी वाट पहात आहे ८. तस्मात्, हे राजपुत्रा, स्वर्गामध्ये विहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें मोठमोठ्या राजभोगांचा अनुभव घेत घेत तूं

र्थिवात्मज । विहर त्वमयोध्यायां यथा शक्रस्त्रिविष्टपे ९ न ते कश्चिद्दशरथस्त्वं च तस्य न कश्चन । अन्यो राजा त्वमन्यस्तु तस्मात्कुरु यदुच्यते १० बीजमात्रं पिता जन्तोः शुक्रं शोणितमेव च । संयुक्तमृतुमन्मात्रा पुरुषस्येह जन्म तत् ११ गतः स नृपतिस्तत्र गन्तव्यं यत्र तेन वै । प्रवृत्तिरेषा भूतानां त्वं तु मिथ्या विहन्यसे १२ अर्थधर्मपरा ये ये तांस्ताञ्शोचामि नेतरान् । ते हि दुःखमिह प्राप्य विनाशं प्रेत्य लेभिरे १३ अष्टकापितृदैवत्यमित्ययं प्रसृतो जनः । अन्नस्योपद्रवं पश्य मृतो हि किमशिष्यति १४ यदि भुक्तमिहान्येन देहमन्यस्य गच्छति । दद्यात्प्रवसतो श्राद्धं न तत्पथ्यशनं भवेत् १५ दानसंवनना ह्येते ग्रन्था मेधाविभिः कृताः । यजस्व देहि दीक्षस्व तपस्तप्यस्व संत्यज १६ स नास्ति परमित्येतत्कुरु

---

अयोध्येमध्यें क्रीडा कर ९. दशरथ तुझा कोणी नव्हे व तूंही त्याचा कोणी नव्हेस. राजा वेगळा तूं वेगळा. तस्मात्, मी सांगतों तें कर १०. पिता हें प्राण्याचें केवल निमित्त कारण आहे. ऋतुमति मातेनें गर्भामध्यें धारण केलेलें आणि एकमेकांत मिश्र झालेलें जें शुक्र व शोणित हेंच इहलोकीं पुरुषाच्या जन्माचें साधन होय ११. राजाला जिकडे जावयाचें होतें तिकडे तो गेला आणि अशा रीतीनें जाण्याविषयीं प्राण्यांची प्रवृत्तिच आहे; परंतु, तूं मात्र विनाकारण राज्यरूप पुरुषार्थाला विकत आहेस १२. प्रत्यक्ष अर्थ प्राप्त झाला असतां त्याचा त्याग करून ज्यांनीं ज्यांनीं धर्माचें अवलंबन केलेलें आहे त्या त्या पुरुषांबद्दल मला वाईट वाटतें; इतरांबद्दल वाटत नाहीं. कारण, अर्थाचा त्याग करून धर्माच्यामागें लागलेले ते लोक इहलोकीं दुःख भोगून शेवटींही नाशच पावले आहेत १३. अष्टकाप्रभृति श्राद्धें करण्याकडे ह्या लोकांची प्रवृत्ति झालेली आहे; परंतु, हे लोक अशा रीतीनें अन्नाचा केवल नाश करीत आहेत; हें तूं पहा. कारण, मेल्यानंतर कोणाला काय खातां येईल १४. इहलोकीं एकानें भोजन केलेलें जर दुसऱ्याच्या देहामध्यें जात असेल तर प्रवासाला निघालेल्या लोकांकरितां घरीं श्राद्ध करून लोकांना जेवावयाला घालावें म्हणजे झाले; प्रवाशयाबरोबर शिधा वगैरे देण्याचें कारणच नाहीं १५ ( व्यापार वगैरे करून उपजीविका करण्यांत कांहीं कष्ट करावे लागतात असें समजून गरिबांना फसविण्याकरितां लुच्चा ) बुद्धिमान् लोकांनीं दानाकडे लोकांची प्रवृत्ति करणारे असे हे "यज्ञयाग करा, दान द्या, दीक्षा घ्या, तपश्चर्या करा, द्रव्यत्याग करा" वगैरे प्रकारच्या विधींनीं भरलेले ग्रंथ करून ठेविले आहेत १६. तव्हां, हे महामते, परलोकसाधन असें धर्म म्हणून कांहींही नाहीं. हें तूं मनामध्यें आण. जें जें प्रत्यक्ष

बुद्धिं महामते । प्रत्यक्षं यत्तदातिष्ठ परोक्षं पृष्ठतः कुरु १७ सतां बुद्धिं पुरस्कृत्य सर्वलोकनिदर्शिनीम् । राज्यं स त्वं निगृह्णीष्व भरतेन प्रसादितः १८ [४००८] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डेष्टोत्तरशततमः सर्गः ॥१०८॥

जाबालेस्तु वचः श्रुत्वा रामः सत्यपराक्रमः । उवाच परया सूक्त्या बुद्ध्या विप्रतिपन्नया १ भवान्मे प्रियकामार्थं वचनं यदिहोक्तवान् । अकार्यं कार्यसंकाशमपथ्यं पथ्यसंनिभम् २ निर्मर्यादस्तु पुरुषः पापाचारसमन्वितः । मानं न लभते सत्सु भिन्नचारित्रदर्शनः ३ कुलीनमकुलीनं वा वीरं पुरुषमानिनम् । चारित्रमेव व्याख्याति शुचिं वा यदि वाशुचिम् ४ अनार्यस्त्वार्यसंस्थानः शौचाद्धीनस्तथा शुचिः । लक्षण्यवदलक्षण्यो दुःशीलः शीलवानिव ५ अधर्मं धर्मवेषेण यद्यहं लोकसंकरम् । अभिपत्स्ये शुभं हित्वा क्रियां विधिविवर्जिताम् ६ कश्चेतयानः पुरुषः

---

असेल तें तें करीत जा आणि परोक्ष असेल तिकडे दुर्लक्ष्य करीत जा १७. सारांश, सर्वलोकसंमत अशा प्रत्यक्ष प्रमाणवादी सज्जनांच्या विचारालाच मान देऊन भरतानें प्रार्थना केल्याप्रमाणें तूं राज्याचा स्वीकार कर " १८. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें आठवा सर्ग समाप्त झाला! ॥ १०८ ॥

जाबालीचें भाषण श्रवण केल्यानंतर जाबालीनें प्रतिपादन केलेल्या अर्थाचें ग्रहण न करणाऱ्या बुद्धीनें युक्त असलेला अमोघ पराक्रमी राम श्रुतीचें अवलंबन करून ह्मणाला १ " प्रीतीला हेतुभूत असलेला विषयोपभोग मला प्राप्त व्हावा एतदर्थ आपण जें येथें भाषण केलें तें जरी करण्याला योग्य भासणारें आहे तरी वस्तुतः करण्याला अयोग्य आहे आणि दिसण्यांत जरी तें सुखकारक आहे तरी त्याचा परिणाम दुःखकारक होणार आहे २. कारण, शास्त्रविरुद्ध आचरण प्रतिपादन करणाऱ्या चार्वाकादिकांच्या ग्रंथांवर विश्वास ठेवून जो निर्मर्याद पुरुष पापाचरण करूं लागतो त्याला सज्जनांमध्यें मान मिळत नाहीं ३. पुरुष चांगल्या कुलांतला आहे किंवा वाईट कुलांतला आहे; वीर आहे किंवा अधीर आहे आणि शुचि आहे किंवा अशुचि आहे हें सर्व त्याच्या वर्तनावरून समजून येतें ४. ( तुमचें ह्मणणें मान्य करणारा पुरुष ) वस्तुतः दुष्ट असून सज्जनासारिखा भासत असतो, अशुचि असूनही शुचिर्भूत दिसत असतो, लक्षणरहित असूनही लोकांना लक्षणसंपन्न वाटतो आणि दुःशील असूनही सुशीलाप्रमाणें भासमान होतो ५. तस्मात्, धर्माच्या मिषानें मी

कार्याकार्यविचक्षणः । बहु मन्येत मां लोके दुर्वृत्तं लोकदूषणम् ७ कस्य यस्याम्यहं वृत्तं केन वा स्वर्गमाप्नुयाम् । अनया वर्तमानोहं वृत्त्या हीनप्रतिज्ञया ८ कामवृत्तोन्वयं लोकः कृत्स्नः समुपवर्तते । यद्वृत्ताः सन्ति राजानस्तद्वृत्ताः सन्ति हि प्रजाः ९ सत्यमेवानृशंसं च राजवृत्तं सनातनम् । तस्मात्सत्यात्मकं राज्यं सत्ये लोकः प्रतिष्ठितः १० ऋषयश्चैव देवाश्च सत्यमेव हि मेनिरे । सत्यवादी हि लोकेस्मिन्परं गच्छति चाक्षयम् ११ उद्विजन्ते यथा सर्पान्नरादनृतवादिनः । धर्मः सत्यपरो लोके मूलं सर्वस्य चोच्यते १२ सत्यमेवेश्वरो लोके सत्ये धर्मः सदाश्रितः । सत्यमूलानि सर्वाणि सत्यान्नास्ति परं पदम् १३ दत्तमिष्टं हुतं चैव तप्तानि च तपांसि च । वेदाः सत्यप्रतिष्ठानास्तस्मात्सत्यपरो भवेत् १४ एकः

---

, जर लोकसंकर करणाऱ्या अधर्माचें अवलंबन करीन आणि शुभ कर्माचा त्याग करून विधि विरुद्धकर्म जर मी करूं लागेन ६ तर सदसद्विचार करणारा कोण बरें शुद्धीवर असलेला पुरुष मज दुराचारी लोकदूषकाला बहुमान देईल ? ७. ज्यामध्यें सत्यपालनरूप प्रतिज्ञेचा भंग होणार अशा ह्या तुह्मीं सांगितलेल्या वृत्तीनें मी वागूं लागलों असतां कोणत्या साधनानें मी स्वर्गाला जाईन ? आणि मी कोणाच्या वर्तनाचें अनुकरण करीन ? ( सारांश, तुह्मी सांगितल्याप्रमाणें वागूं लागलों ह्मणजे स्वर्गप्राप्तीचें साधनच रहाणार नाहीं आणि असें वर्तन सन्मार्गवर्ती पुरुषानें कोणी कधीं केलेलेंही नाहीं ) ८. शिवाय, ( तुमच्या सांगण्याप्रमाणें वागूं लागलों असतां मी स्वेच्छाचारी होईन आणि मला पाहून ) हें संपूर्ण जगत् स्वेच्छाचारी होईल. कारण, जसें राजांचें आचरण असतें तसेंच त्यांच्या प्रजाजनांचें आचरण होतें ९. सत्यवचन आणि भूतदया हाच राजांचा सनातन आचार होय आणि ज्याअर्थी राजवृत्त सत्यरूप आहे त्याअर्थी त्या राजांचें राज्यही सत्यावरच अवलंबून आहे; इतकेंच नव्हे परंतु, सर्व जगत्ही सत्याच्या आधारावरच चाललेलें आहे १०. ऋषि आणि देव ह्यांनीं सत्यालाच मान दिला असून सत्यवादी पुरुषालाच इहलोकीं अक्षय्य आणि श्रेष्ठ अशा ब्रह्मलोकाची प्राप्ति होते ११. सूर्यापासून ज्याप्रमाणें लोक उद्विग्न होतात त्याप्रमाणें असत्यवादी लोकांपासून होतात. सत्य ज्यामध्यें प्रधान आहे तोच धर्म सर्वांचें मूळ होय १२. जगतामध्यें ईश्वर सत्य ह्याच संज्ञेनें प्रसिद्ध आहे, धर्म नेहमीं सत्याचेंच अवलंबन करून राहिलेला आहे, सर्व गोष्टी सत्यमूलकच आहेत आणि सत्यापेक्षां कोणतेंही स्थान श्रेष्ठ नाहीं १३. दिलेलें दान, केलेलें हवन आणि आचरिलेलीं तपें

पालयते लोकमेकः पालयते कुलम् । मज्जत्येको हि निरय एकः स्वर्गे महीयते १५ सोहं पितुर्निदेशं तु किमर्थं नानुपालये । सत्यप्रतिश्रवः सत्यं सत्येन समयी कृतम् १६ नैव लोभान्न मोहाद्वा न चाज्ञानात्तमोन्वितः । सेतुं सत्यस्य भेत्स्यामि गुरोः सत्यप्रतिश्रवः १७ असत्यसंधस्य सतश्चलस्यास्थिरचेतसः । नैव देवा न पितरः प्रतीच्छन्तीति नः श्रुतम् १८ प्रत्यगात्ममिमं धर्मं सत्यं पश्याम्यहं ध्रुवम् । भारः सत्पुरुषैश्चीर्णस्तदर्थमभिनन्द्यते १९ क्षात्रं धर्ममहं त्यक्ष्ये ह्यधर्मं धर्मसंहितम् । क्षुद्रैर्नृशंसैर्लुब्धैश्च सेवितं पापकर्मभिः २० कायेन कुरुते पापं मनसा संप्रधार्य तत् । अनृतं जिह्वया चाह त्रिविधं कर्म पातकम् २१ भूमिः कीर्तिर्यशो लक्ष्मीः पुरुषं प्रार्थयन्ति हि । सत्यं समनुवर्तन्ते सत्यमेव भजेत्ततः २२ श्रेष्ठं ह्यनार्यमेव स्याद्यद्भवानवधार्य माम् । आह युक्तिकरैर्वाक्यैरिदं भद्रं

---

हीं सर्व सत्याच्याच आधारावर झालेलीं असून वेद हे सत्याच्याच आधारावर आहेत. तस्मात्, पुरुषानें सत्यनिष्ठ असावें १४. एक राज्याचें परिपालन करीत असतो, एक कुलाचें रक्षण करीत असतो, एक दुःखाचा अनुभव घेत असतो आणि एक सुखाचा उपभोग घेत असतो १५. तेव्हां ज्याअर्थीं माझ्या सत्यप्रतिज्ञ व सदाचारी पित्यानें सत्यपरिपालन करण्याकरितां माझ्याशीं सत्य भाषण केलें त्या पित्याची आज्ञा मी कां ह्मणून पाळूं नये? १६. पित्यासमक्ष सत्यपरिपालन करण्याची प्रतिज्ञा केली असतांना मी लोभानें, विस्मरणानें अथवा अज्ञानानें मोहित होऊन सत्याच्या मर्यादेचें अतिक्रमण करणार नाहीं १७. असत्यवचनी आणि चंचल ह्मणजे असत्य बुद्धि असलेल्या पुरुषानें दिलेलें हव्य व कव्य देव आणि पितर घेत नाहींत असें आह्मीं ऐकिलें आहे १८. जीवांना उद्देशून प्रवृत्त झालेला हा सत्यपालनरूप धर्म सर्व धर्मामध्यें मी मुख्य समजत आहें व ह्या सत्यपालनरूप भाराचा स्वीकार पुरुषांनीं केला असल्यामुळें मीही त्याचा आदर करीत आहें १९. क्षुद्र, दुष्ट, लुब्ध आणि पापकर्मी पुरुषांनीं सेविलेला हा वस्तुतः अधर्म असून धर्मासारिखा भासणारा पित्राज्ञाभंगपूर्वक राज्योपभोगरूप क्षात्रधर्म मी टाकून देतों २०. मनामध्यें प्रथम विचार करून आणि जिव्हेनें उच्चार करून नंतर पुरुष शरीरानें पातक करीत असतो. तेव्हां क्रियारूप पाप त्रिविध पापांचें उत्पादक आहे २१. भूमि, कीर्ति, यश व लक्ष्मी सत्यनिष्ठ पुरुषांची अपेक्षा करीत असतात व शिष्ट लोकही सत्यालाच अनुसरून वागत असतात. तस्मात्, पुरुषानें सत्याचेंच अवलंबन करावें २२. राज्यच कर ह्मणून जें आपण केवळ तर्कमूलक वाक्यांनीं विचारपूर्वक माझ्याशीं उत्तम भासणारें भाषण केलेंत तें

कुरुष्व ह २३ कथं ह्यहं प्रतिज्ञाय वनवासमिमं गुरोः। भरतस्य करिष्यामि वचो हित्वा गुरोर्वचः २४ स्थिरा मया प्रतिज्ञाता प्रतिज्ञा गुरुसंनिधौ । प्रहृष्टमानसा देवी कैकेयी चाभवत्तदा २५ वनवासं वसन्नेव शुचिर्नियतभोजनः । मूलपुष्पफलैः पुण्यैः पितॄन्देवांश्च तर्पयन् २६ संतुष्टपञ्चवर्गोऽहं लोकयात्रां प्रवाहये । अकुहः श्रद्दधानः सन्कार्याकार्यविचक्षणः २७ कर्मभूमिमिमां प्राप्य कर्तव्यं कर्म यच्छुभम् । अग्निर्वायुश्च सोमश्च कर्मणां फलभागिनः २८ शतं क्रतूनामाहृत्य देवराट् त्रिदिवं गतः । तपांस्युग्राणि चास्थाय दिवं प्राप्ता महर्षयः २९ अमृष्यमाणः पुनरुग्रतेजा निशम्य तन्नास्तिकवाक्यहेतुम् । अथाब्रवीत्तं नृपतेस्तनूजो विगर्हमाणो वचनानि तस्य ३० सत्यं च धर्मं च पराक्रमं च भूतानुकम्पां प्रियवादितां च । द्विजातिदेवातिथिपूजनं च पन्थानमाहुस्त्रिदिवस्य सन्तः ३१ तेनैवमाज्ञाय यथावदर्थमेकोदयं संप्रतिपद्य विप्राः । धर्मं चरन्तः सकलं यथावत्काङ्क्षन्ति लोकागममप्रमत्ताः ३२ निन्दाम्यहं कर्म कृतं पितुस्त-

अन्याय्यच आहे २३. पित्याशीं मी ह्या वनवासाची प्रतिज्ञा केली असून त्या पित्याच्य वचनाची पर्वा न करितां भरताच्या सांगण्याप्रमाणें मी कसा वागूं ? २४. पित्यासंनिध मी केलेली प्रतिज्ञा निश्चयपूर्वक केलेली आहे आणि देवि कैकयीच्याही मनाला त्या वेळीं आनंद झालेला आहे २५. तस्मात्, पवित्र मुळें, पुष्पें आणि फलें ह्यांनीं देवपितरांचें संतर्पण करीत करीत मी नियमीत आहार करून व शुचि राहून वनामध्येंच वास्तव्य करीन २६ आणि इंद्रियें संतुष्ट ठेवून व सदसद्विचार करून निष्कपटपणानें श्रद्धापूर्वक मी स्वतःच्या आचरणानें पित्याचें वचन पाळण्याची प्रवृत्ति सुरू ठेवीन २७. ह्या कर्मभूमीमध्यें आल्यावर जें शुभकर्म असेल तेंच करावें. अग्नि, वायु आणि चंद्र हे शुभकर्माच्याच योगानें आपआपल्या योग्यतेला आले आहेत २८. इंद्र शंभर क्रतु करून स्वर्गाला गेला आणि महर्षींनाही उग्र तपश्चर्या करून स्वर्गप्राप्ति झाली " २९ असो. नास्तिक भाषण करणाऱ्या जाबालीचें भाषण श्रवण केल्यावर तें सहन न झाल्यामुळें तो उग्र तेजानें युक्त असलेला राजकुमार राम त्याच्या भाषणाचें खंडण करीत करीत त्याला ह्मणाला ३० " सत्य, धर्म, पराक्रम, भूतदया, प्रियवादित्व आणि द्विज, देव व अतिथी ह्यांचें पूजन ह्यांना ज्याअर्थीं संतांनीं स्वर्गमार्ग ह्मटलें आहे ३१ आणि ज्याअर्थीं त्या संतांच्या वचनावरूनच ह्याप्रमाणें मुख्य फलप्रद धर्म कोणता तो यथायोग्य रीतीनें जाणून व त्याचा निर्णय करून लक्ष्यपूर्वक त्या धर्माचें यथाविधि पूर्णपणें आचरण करणारे विप्र उत्तम लोक प्राप्त होण्याची इच्छा करितात ३२ त्या-

यस्त्वामगृह्णाद्विषमस्थबुद्धिम् । बुद्ध्यानयैवंविधया चरन्तं सुनास्तिकं धर्मपथादपेतम् ३३ यथा हि चोरः स तथा हि बुद्धस्तथागतं नास्तिकमत्र विद्धि । तस्माद्धि यः शक्यतमः प्रजानां स नास्तिकनाभिमुखो बुधः स्यात् ३४ त्वत्तो जनाः पूर्वतरे द्विजाश्च शुभानि कर्माणि बहूनि चक्रुः । छित्त्वा सदेमं च परं च लोकं तस्माद्द्विजाः स्वस्ति कृतं हुतं च ३५ धर्मे रताः सत्पुरुषैः समेतास्तेजस्विनो दानगुणप्रधानाः । अहिंसका वीतमलाश्च लोके भवन्ति पूज्या मुनयः प्रधानाः ३६ इति ब्रुवन्तं वचनं सरोषं रामं महात्मानमदीनसत्त्वम् । उवाच पथ्यं पुनरास्तिकं च सत्यं वचः सानुनयं च विप्रः ३७ न नास्तिकानां वचनं ब्रवीम्यहं न नास्तिकोऽहं न च नास्ति किंचन । समीक्ष्य कालं पुनरास्तिकोऽभवं भवेय काले पुनरेव नास्तिकः ३८ स चापि कालोऽयमुपागतः शनैर्यथा मया नास्तिकवा-

अर्थी अत्यंत नास्तिक, धर्ममार्गविरुद्ध, वेदविरुद्ध बुद्धीनें युक्त आणि अशाप्रकारचें मत स्वीकारून लोकनाशाकरितां पृथ्वीवर हिंडणाऱ्या आपणाला याजक ह्मणून माझ्या पित्यानें स्वीकारिलें हें मी त्या आपल्या पित्याचें कर्म निंद्य समजत आहें ३३. ज्याप्रमाणें चोर त्याचप्रमाणें बौद्ध मतानुयायी समजावा आणि तथागतसंज्ञक नास्तिक हाही तसाच समजावा. तस्मात् लोकांमध्यें जी कांहीं अतिशय मोठी शिक्षा शक्य असेल ती नास्तिकांना द्यावी आणि शिक्षा देण्याचा अधिकार नसेल तर समंजस पुरुषानें नास्तिकापासून पराङ्मुख व्हावें ३४. आपणांपेक्षां श्रेष्ठ असलेल्या लोकांनीं आणि द्विजांनीं ऐहिक व पारलौकिक फलाची अपेक्षा न धरितां ( हा वेदोक्त धर्म आहे असें समजूनच ) पुष्कळ शुभ कर्मे केलीं आहेत. तस्मात्, वेद प्रमाण मानूनच जे द्विज अहिंसा, सत्य वगैरे, तप, दान, परोपकार वगैरे आणि यज्ञ वगैरे करीत असतात ३५ आणि त्याचप्रमाणें धर्मनिष्ट, दानरूप गुणाचें मुख्यत: अवलंबन करणारे, हिंसाशून्य, निर्मल आणि सत्पुरुषांशीं समागम करणारे असे जे असतात तेच श्रेष्ठ तेजस्वी मुनि लोकांमध्यें मान्य होतात. ( तुह्मांसारिखे मान्य होत नाहींत " ३६. ह्याप्रमाणें तो महात्मा उदार राम जाबालीला उद्देशून निंदायुक्त भाषण करूं लागला असतां तो विप्र जाबालि पुनरपि उत्कृष्ट अर्थानें युक्त, आस्तिक आणि सत्य भाषण त्याच्याशीं करूं लागला ३७. ( तो ह्मणाला ) " मी नास्तिकांची भाषा बोलणारा नाहीं, मीहा नास्तिक नाहीं आणि परलोक वगैरे कांहीं नाहीं असें माझें मतही नाहीं. प्रसंग पाहून मी पुन्हा आस्तिक झालों आहें आणि प्रसंग आल्यास फिरूनही नास्तिक होईन ३८. तशी ही वेळ आली होती ह्मणून मी तुला

गुर्दीरिता । निवर्तनार्थं तव राम कारणात्प्रसादनार्थं च मयैतदीरितम् ३९ [ ४०४७ ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्डे नवोत्तरशततमः सर्गः ॥ १०९ ॥

क्रुद्धमाज्ञाय रामं तु वसिष्ठः प्रत्युवाच ह । जाबालिरपि जानीते लोकस्यास्य गतागतिम् १ निवर्तयितुकामस्तु त्वामेतद्वाक्यमब्रवीत् । इमां लोकसमुत्पत्तिं लोकनाथ निबोध मे २ सर्वं सलिलमेवासीत्पृथिवी तत्र निर्मिता । ततः समभवद्ब्रह्मा स्वयंभूर्दैवतैः सह ३ स वराहस्ततो भूत्वा प्रोज्जहार वसुंधराम् । असृजच्च जगत्सर्वं सह पुत्रैः कृतात्मभिः ४ आकाशप्रभवो ब्रह्मा शाश्वतो नित्य अव्ययः । तस्मान्मरीचिः संजज्ञे मरीचेः कश्यपः सुतः ५ विवस्वान्कश्यपाज्जज्ञे मनुर्वैवस्वतः स्वयम् । स तु प्रजापतिः पूर्वमिक्ष्वाकुस्तु मनोः सुतः ६ यस्येयं प्रथमं दत्ता समृद्धा मनुना मही । तमिक्ष्वाकुमयोध्यायां राजानं विद्धि पूर्वकम् ७ इक्ष्वाकोस्तु सुतः श्रीमान्कुक्षिरित्येव विश्रुतः । कुक्षेरथात्मजो वीर विकुक्षिरुदपद्यत ८ विकु-

---

वनवासांतून परत फिरविण्याकरितां नास्तिकाचें भाषण केलें आणि आतां तुला प्रसन्न करून घेण्याकरितां मीं हें असें भाषण केलें ३९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें नववा सर्ग समाप्त झाला ॥ १०९ ॥

राम क्रुद्ध झालेला पाहून वसिष्ठ त्याला ह्मणाले "हे लोक परलोकीं जाऊन पुनरपि येथें येत असतात हें जाबालीही जाणीत आहे १; परंतु, वनांतून तुला परत फिरविण्याच्या उद्देशानें त्यानें असें भाषण केलें. आतां, हे लोकनाथा, ही जगदुत्पत्ति तूं माझ्यापासून श्रवण कर २. पूर्वी नुसतें उदकच होतें आणि त्या उदकामध्यें जलस्वरूप भगवानानें पृथ्वी निर्माण केली तदनंतर ब्रह्मदेव इतर देवांसुद्धवर्तमान उत्पन्न झाला ३. नंतर विराटस्वरूप ब्रह्मदेवाच्या विष्णुरूप अंशानें वराहरूप धारण करून पृथ्वीचा उद्धार केला आणि त्याच विराटपुरुषाच्या रजोगुण प्रधान अंशानें दक्षप्रभृति जितेंद्रिय पुत्रासहवर्तमान सर्व जगत् उत्पन्न केलें ४. मायोपाधिक ईश्वरापासून शाश्वत, नित्य आणि अव्यय असा ब्रह्मदेव उत्पन्न झाला. त्या ब्रह्मदेवापासून मरीचि उत्पन्न झाला आणि मरीचीपासून कश्यप हा पुत्र उत्पन्न झाला ५. कश्यपापासून विवस्वान झाला. स्वतः मनु हाच विवस्वानाचा पुत्र असून तोच पूर्वीचा प्रजापति होय. इक्ष्वाकु हा मनूचा पुत्र होय ६., ज्याला मनूनें पूर्वीं ही समृद्ध पृथ्वी दिली तो इक्ष्वाकु अयोध्येंतील पहिला राजा असें तूं समज ७. इक्ष्वाकूला कुक्षि ह्मणून प्रसिद्ध असलेला एक

क्षेस्तु महातेजा बाणः पुत्रः प्रतापवान् । बाणस्य च महाबाहुरनरण्यो महातपाः ९ नानावृष्टिर्बभूवास्मिन्न दुर्भिक्षः सतां वरे । अनरण्ये महाराजे तस्करो वापि कश्चन १० अनरण्यान्महाराज पृथू राजा बभूव ह । तस्मात्पृथोर्महातेजास्त्रिशङ्कुरुदपद्यत ११ स सत्यवचनाद्वीरः सशरीरो दिवं गतः । त्रिशङ्कोरभवत्सूनुर्धुन्धुमारो महायशाः १२ धुन्धुमारान्महातेजा युवनाश्वो व्यजायत । युवानाश्वसुतः श्रीमान्मांधाता समपद्यत १३ मांधातुस्तु महातेजाः सुसंधिरुदपद्यत । सुसंधेरपि पुत्रौ द्वौ ध्रुवसंधिः प्रसेनजित् १४ यशस्वी ध्रुवसंधेस्तु भरतो रिपुसूदनः । भरतात्तु महाबाहोरसितो नाम जायत १५ यस्यैते प्रतिराजान उदपद्यन्त शत्रवः । हैहयास्तालजङ्घाश्च शूराश्च शशबिन्दवः १६ तांस्तु सर्वान्प्रतिव्यूह्य युद्धे राजा प्रवासितः । स च शैलवरे रम्ये बभूवाभिरतो मुनिः १७ द्वे चास्य भार्ये गर्भिण्यौ बभूवतुरिति श्रुतिः । तत्र चैका महाभागा भार्गवं देववर्चसम् १८ ववन्दे पद्मपत्राक्षी काङ्क्षिणी पुत्रमुत्तमम् । एका गर्भवि-

---

श्रीमान् पुत्र होता आणि, हे वीरा, कुक्षीपासून विकुक्षी ह्मणून पुत्र उत्पन्न झाला ८. प्रतापी व महातेजस्वी बाण हा विकुक्षीचा पुत्र होय आणि महापराक्रमी व महातपस्वी अनरण्य हा बाणाचा पुत्र होय ९. हा सज्जनश्रेष्ठ महाराज अनरण्य राज्य करीत असतांना अनावृष्टि, दुर्भिक्ष आणि तस्कर ह्यांचा अभाव होता १०. हे महाराजा, अनरण्यापासून पृथुराजा झाला व त्या पृथूपासून महातेजस्वी त्रिशंकु उत्पन्न झाला ११. तो वीर त्रिशंकु स्वतःच्या सत्यवचनामुळें आणि विश्वामित्र मुनींच्या सत्यप्रतिज्ञेमुळें शरीरासहवर्तमान स्वर्गाला गेला. महायशस्वी धुंधुमार हा त्रिशंकूला पुत्र झाला १२. धुंधुमारापासून महातेजस्वी युवनाश्व उत्पन्न झाला आणि वैभवशाली मानधाता हा युवनाश्वपुत्र झाला १३. मानधात्यापासून महातेजस्वी सुसंधि उत्पन्न झाला आणि सुसंधीपासून ध्रुवसंधि व प्रसेनजित् असे दोन पुत्र उत्पन्न झाले १४. शत्रुनाशक यशस्वी भरत ध्रुवसंधीपासून झाला आणि महापराक्रमी भरतापासून असितनामक पुत्र झाला १५. त्या असिताला हैहय, तालजंग, शूर आणि शशबिंदु असे प्रतिपक्षि राजे ह्मणजे शत्रु उत्पन्न झाले १६. त्या सर्वांशीं संग्रामामध्यें युद्ध सुरू करून तो राजा पराजित झाला व त्यांनीं त्याला हांकून दिल्यावर तो राजर्षि रम्य अशा उत्कृष्ट पर्वतावर जाऊन मरण पावला १७. त्यावेळीं त्याच्या दोन भार्या गर्भिणी होत्या असें ऐकण्यांत आहे. त्यांपैकीं कमलपत्रासारिख्या नेत्रांनीं युक्त असलेल्या एका महाभाग्यवती स्त्रीनें उत्कृष्ट पुत्र प्राप्त होण्याचा उद्देश मनांत धरून देवतुल्य तेजस्वी भार्गव-

नाशाय सपत्न्यै गरलं ददौ १९ भार्गवश्च्यवनो नाम हिमवन्तमुपाश्रितः। तमृषिं साभ्युपागम्य कालिंदी त्वभ्यवादयत् २० स तामभ्यवदत्प्रीतो वरेप्सुं पुत्रजन्मनि । पुत्रस्ते भविता देवि महात्मा लोकविश्रुतः २१ धार्मिकश्च सुभीमश्च वंशकर्तारिसूदनः । श्रुत्वा प्रदिक्षणं कृत्वा मुनिं तमनुमान्य च २२ पद्मपत्रसमानाक्षं पद्मगर्भसमप्रभम् । ततः सा गृहमागम्य पत्नी पुत्रमजायत २३ सपत्न्या तु गरस्तस्यै दत्तो गर्भजिघांसया । गरेण सह तेनैव तस्मात्स सगरोभवत् २४ स राजा सगरो नाम यः समुद्रमखानयत् । इष्ट्वा पर्वणि वेगेन त्रासयान इमाः प्रजाः २५ असमञ्जस्तु पुत्रोभूत्सगरस्येति नः श्रुतम् । जीवन्नेव स पित्रा तु निरस्तः पापकर्मकृत् २६ अंशुमानपि पुत्रोभूदसमञ्जस्य वीर्यवान् । दिलीपोंशुमतः पुत्रो दिलीपस्य भगीरथः २७ भगीरथात्ककुत्स्थश्च काकुत्स्था येन तु स्मृताः। काकुत्स्थस्य तु पुत्रोभूद्रघुर्येन तु राघवाः २८

---

मुनींना वंदन केलें आणि दुसरीनें गर्भाचा नाश करण्याकरितां त्या सवतीला विष घातलें १८,१९. च्यवनभार्गव नांवाचे एक ऋषि हिमालय पर्वताचा आश्रय करून राहिले होते त्यांच्या समीप जाऊन त्या कालिंदीनामक स्त्रीनें त्यांना अभिवंदन केलें २०. तेव्हां पुत्रजन्माविषयीं वरप्राप्तीची इच्छा करणाऱ्या त्या कालिंदीला ते ऋषि ह्मणाले "हे राजभार्ये, तुला महात्मा, जगद्विख्यात्, धार्मिक, फारच भयंकर, वंश चालविणारा आणि शत्रुनाशक असा पुत्र होईल" हें मुनींचें भाषण श्रवण करून ती कालिंदी स्त्री त्या मुनींना प्रदक्षिणा करून व त्यांची अनुमति घेऊन तेथून निघाली २१,२२. नंतर घरीं आल्यावर कमलपत्रासारिख्या नेत्रांनीं आणि कमलाच्या गाभ्यासारिख्या प्रभेनें युक्त असलेला त्या राजपत्नीला पुत्र झाला २३. सवतीनें गर्भाचा नाश करण्याकरितां तिला गर ह्मणजे विष दिलें होतें. ह्यामुळें तो पुत्र गरासहवर्तमान उत्पन्न झाला आणि स–गर असें त्याचें नांव पडलें २४. त्या सगरनामक राजानें यज्ञदीक्षा घेतली असतां पर्वदिवशीं समुद्रस्थल खणून काढिलें. तेव्हां त्या खणण्याच्या वेगामुळें ह्या प्रजा त्रस्त झाल्या २५. सगराला असमंज ह्मणून एक पुत्र होता असें आमच्या ऐकण्यांत आहे. तो दुष्कृत्यें करणारा असल्यामुळें पित्यानें त्याला पराक्रमी असतानांच हांकून दिलें होतें २६. त्या असमंजालाही अंशुमान ह्मणून एक वीर्यवान् पुत्र झाला. दिलीप हा अंशुमानाचा पुत्र होय आणि भगीरथ दिलीपाचा पुत्र होय २७. भगीरथापासून ककुत्स्थ झाला त्याच्यामुळें त्याच्या वंशजांना काकुत्स्थ ही संज्ञा प्राप्त झाली. त्या काकुत्स्थाला रघु पुत्र झाला व त्याच्या योगानें त्याच्या पुढील वंशजांना राघव

रघोस्तु पुत्रस्तेजस्वी प्रवृद्धः पुरुषादकः । कल्माषपादः सौदास इत्येवं प्रथितो भुवि २९ कल्माषपादपुत्रोभूच्छङ्खणस्त्विति नः श्रुतम् । यस्तु तद्वीर्यमासाद्य सहसैन्यो व्यनीनशत् ३० शङ्खणस्य तु पुत्रोभूच्छूरः श्रीमान्सुदर्शनः । सुदर्शनास्याग्निवर्ण अग्निवर्णस्य शीघ्रगः ३१ शीघ्रगस्य मरुः पुत्रो मरोः पुत्रः प्रशुश्रुवः । प्रशुश्रुवस्य पुत्रोभूदम्बरीषो महामतिः ३२ अम्बरीषस्य पुत्रोभून्नहुषः सत्यविक्रमः । नहुषस्य च नाभागः पुत्रः परमधार्मिकः ३३ अजश्च सुव्रतश्चैव नाभागस्य सुतावुभौ । अजस्य चैव धर्मात्मा राजा दशरथः सुतः ३४ तस्य ज्येष्ठोसि दायादो राम इत्यभिविश्रुतः । तद्गृहाण स्वकं राज्यमवेक्षस्व जगन्नृप ३५ इक्ष्वाकूणां हि सर्वेषां राजा भवति पूर्वजः । पूर्वजे नावरः पुत्रो ज्येष्ठो राजाभिषिच्यते ३६ स राघवाणां कुलधर्ममात्मनः सनातनं नाद्य विहन्तुमर्हसि । प्रभूतरत्नामनुशाधि मेदिनीं प्रभूतराष्ट्रां पितृवन्महायशाः ३७ [४०८४] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीय आदिकाव्येयोध्याकाण्डे दशोत्तरशततमः सर्गः ॥ ११० ॥

---

अशी संज्ञा प्राप्त झाली २८. रघूला जो तेजस्वी पुत्र झाला तो प्रवृद्ध, पुरुषादक, कल्माषपाद आणि सौदास ह्या चार नांवांनीं पृथ्वीवर प्रसिद्ध आहे २९. शंखण ह्मणून एक कल्माषपादाचा पुत्र होता असें आमच्या ऐकण्यांत आहे. तो शंखण त्या आपल्या पित्याच्या तावडींत सांपडून सैन्यासहवर्तमान नाश पावला ३०. श्रीमान् आणि शूर असा एक सुदर्शन ह्मणून शंखणाचा पुत्र होता. त्या सुदर्शनाचा अग्निवर्ण पुत्र होता आणि अग्निवर्णाचा शीघ्रग ह्मणून पुत्र होता ३१. शीघ्रगाला मरु, मरूला प्रशुश्रुव आणि प्रशुश्रुवाला महामति अंबरीष पुत्र झाला ३२. अमोघपराक्रमी नहुष अंबरीषाला पुत्र झाला आणि नहुषाला नाभाग ह्मणून अत्यंत धार्मिक पुत्र झाला ३३. अज आणि सुव्रत हे उभयतां नाभागाचे पुत्र होत आणि धर्मात्मा दशरथराजा हा अजाचा पुत्र होय ३४ व त्या दशरथराजाचा तूं राम ह्मणून प्रसिद्ध पुत्र आहेस. तस्मात्, हे भूपते, आपल्या राज्याचा स्वीकार कर आणि जगताचें परिपालन कर ३५. सर्व इक्ष्वाकुवंशजांमध्यें ज्येष्ठ पुत्रच राजा होत आलेला आहे. ज्येष्ठ पुत्र विद्यमान असतांना कनिष्ठ पुत्राला राज्याभिषेक न होतां ज्येष्ठालाच होत असतो ३६. तस्मात्, हे महाकीर्तिमान् रामा, आपल्या रघुवंशजांचा सनातन कुलधर्म आज नाहींसा न करितां रत्नांनीं व राष्ट्रांनीं संपन्न असलेल्या पृथ्वीचें तूं परिपालन कर. ३७. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें दहावा सर्ग समाप्त झाला ॥ ११० ॥

वसिष्ठः स तदा राममुक्त्वा राजपुरोहितः। अब्रवीद्धर्मसंयुक्तं पुनरेवापरं वचः १ पुरुषस्येह जातस्य भवन्ति गुरवः सदा। आचार्यश्चैव काकुत्स्थ पिता माता च राघव २ पिता ह्येनं जनयति पुरुषं पुरुषर्षभ। प्रज्ञां ददाति चाचार्यस्तस्मात्स गुरुरुच्यते ३ स तेऽहं पितुराचार्यस्तव चैव परंतप। मम त्वं वचनं कुर्वन्नातिवर्तेः सतां गतिम् ४ इमा हि ते परिषदो ज्ञातयश्च नृपास्तथा। एषु तात चरन्धर्मं नातिवर्तेः सतां गतिम् ५ वृद्धाया धर्मशीलाया मातुर्नार्हस्यवर्तितुम्। अस्या हि वचनं कुर्वन्नातिवर्तेः सतां गतिम् ६ भरतस्य वचः कुर्वन्याचमानस्य राघव। आत्मानं नातिवर्तेस्त्वं सत्यधर्मपराक्रम ७ एवं मधुरमुक्तः स गुरुणा राघवः स्वयम्। प्रत्युवाच समासीनं वसिष्ठं पुरुषर्षभः ८ यन्मातापितरौ वृत्तं तनये कुरुतः सदा। न सुप्रतिकरं तत्तु मात्रा पित्रा च यत्कृतम् ९ यथाशक्तिप्रदानेन स्वापनोच्छादनेन च। नित्यं च प्रियवादेन तथा संवर्धनेन च १० स हि राजा दशरथः पिता जनयिता मम।

ह्याप्रमाणें रामाशीं भाषण केल्यानंतर ते राजगुरु वसिष्ठ पुनरपि धर्मयुक्त असें दुसरें भाषण त्याच्याशीं करूं लागले कीं १, "हे काकुत्स्था राघवा, येथें उत्पन्न झालेल्या पुरुषाला गुरु, आचार्य, पिता आणि माता पूज्य आहेत २. हे पुरुषश्रेष्ठा, पुरुषाला पिता जन्म देतो; परंतु, वेदविषयक बुद्धि आचार्य देतो; म्हणून त्याला गुरु असें म्हणतात ३. सारांश, हे शत्रुतापना, मी तुझाच नव्हे तर, तुझ्या पित्याचाही आचार्य आहे. तस्मात्, तूं माझ्या सांगण्याप्रमाणें वागूं लागलास तर सज्जनांच्या मार्गाचें अतिक्रमण करीत आहेस असें होणार नाहीं ४. हे तुझे सभासद, ज्ञातिबांधव आणि मांडलिक राजे आहेत. ह्यांचे ठिकाणीं रक्षणरूप धर्माचें तूं पालन केलेंस तर, बा रामा, सज्जनांच्या मार्गाचें तूं अतिक्रमण करीत आहेस असें होणार नाहीं ५. वृद्ध आणि धर्मशील मातेचें अतिक्रमण करणें तर तुला योग्य नाहीं आणि तिच्या सांगण्याप्रमाणें वागूं लागलास तर सन्मार्गाचें उल्लंघन केल्यासारखें होणारसें नाहीं ६. हे अमोघपराक्रमी सत्यधर्मनिष्ठ राघवा, प्रत्यक्ष भरतच जर राज्य करण्याविषयीं तुझी प्रार्थना करीत आहे तर स्वतःचें वचन पाळल्याचा दोष तुझ्याकडे येणार नाहीं" ७. ह्याप्रमाणें गुरूंनीं स्वतः मधुर शब्दांनीं त्या राघवाला सांगितलें असतां तो पुरुषश्रेष्ठ त्या समीप बसलेल्या वसिष्ठांना ह्मणाला ८ "मातापितर पुत्रावर जो उपकार नेहमीं करीत असतात त्या मातापितरांना केलेल्या उपकाराचा प्रत्युपकार करितां येणें अगदीं अशक्य आहे ९. यथाशक्ति दान, निजविणें, अंगाला लावणें, प्रिय भाषण करणें

अज्ञापयन्मां यत्तस्य न तन्मिथ्या भविष्यति ११ एवमुक्तेन रामेण भरतः प्रत्यनन्तरम् । उवाच विपुलोरस्कः सूतं परमदुर्मनाः १२ इह तु स्थण्डिले शीघ्रं कुशानास्तर सारथे । आर्यं प्रत्युपवेक्ष्यामि यावन्मे संप्रसीदति १३ निराहारो निरालोको धनहीनो यथा द्विजः । शये पुरस्ताच्छालायां यावन्मां प्रतियास्यति १४ स तु राममवेक्षन्तं सुमन्त्रं प्रेक्ष्य दुर्मनाः । कुशोत्तरमुपस्थाप्य भूमावेवास्थितः स्वयम् १५ तमुवाच महातेजा रामो राजर्षिसत्तमः । किं मां भरत कुर्वाणं तात प्रत्युपवेक्ष्यसे १६ ब्राह्मणो ह्येकपार्श्वेन नरान्रोद्धुमिहार्हति । न तु मूर्धाभिषिक्तानां विधिः प्रत्युपवेशने १७ उत्तिष्ठ नरशार्दूल हित्वैतद्दारुणं व्रतम् । पुरवर्यामितः क्षिप्रमयोध्यां याहि राघव १८ आसीनस्त्वेव भरतः पौरजानपदं जनम् । उवाच सर्वतः प्रेक्ष्य किमार्यं नानुशासथ १९ ते तदोचुर्महात्मानं पौरजानपदा जनाः ।

---

खेळविणें इत्यादिकांच्या योगानें मातापितरांचें झालेले उपकार पुत्राच्या हातून फिटणें अशक्य आहे १०. त्या माझ्या जनक पित्या दशरथ राजानें जी मला आज्ञा केली आहे ती असत्य होणार नाहीं" ११. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां विपुल वक्षस्थलानें युक्त असलेला भरत अत्यंत खिन्न होऊन जवळच असलेल्या सारथ्याला ह्मणाला १२ " हे सारथ्या, ह्या ओट्यावर अगदीं द्वारासमीपच दर्भ पसर ह्मणजे, हे आर्या, रामाकरितां तो मजवर प्रसन्न होईपर्यंत मी येथें दारांतच पडून रहातों १३. कांहीं एक न खातां आणि दुसरीकडे न पहातां एखादा द्रव्यहीन द्विज जसें आपलें द्रव्य उगविण्याकरितां कुळाच्या दारांत धरणें घेऊन बसतो तसा मी ह्या पर्णशालेमध्यें पुढेंच माझ्या ह्मणण्याचा अंगिकार करून राम माझ्या बरोबर अयोध्येला परत निघेपर्यंत पडून राहीन " १४. ह्याप्रमाणें भरतानें सांगितलें असतांही सुमंत्र रामाच्याच तोंडाकडे पहात आहे असें अवलोकन करून खिन्न झालेला भरत भूमीवर स्वतःच दर्भासन पसरून बसला १५. तेव्हां राजर्षिश्रेष्ठ व महातेजस्वी राम त्याला ह्मणाला "बा भरता, मी काय तुझा अपराध केला आहे ह्मणून तूं येथें धरणें घेऊन पडण्याचें मनांत आणिलें आहेस ? १६. एकाच कुशीवर राहून धरणें घेऊन पडण्यानें ब्राह्मणाला ह्या ठिकाणीं लोकांना अडथळा करण्याचा अधिकार आहे; परंतु, क्षत्रियांना हा धरणें घेऊन बसण्याचा प्रकार शास्त्रसंमत नाहीं १७. ह्यास्तव, हे पुरुषश्रेष्ठा, हे भयंकर व्रत सोडून देऊन येथून ऊठ आणि, हे राघवा, येथून सत्वर श्रेष्ठ अयोध्या नगरीमध्यें जा " १८. असें राम ह्मणाला असतां भरत तेथें बसला असतांनाच अयोध्या नगरींतील व देशांतील सर्व लोकांकडे पाहून " अरे आर्य रामाला तुह्मी कां कांहीं सांगत

काकुत्स्थमभिजानीमः सम्यग्वदति राघवः २० एषोपि हि महाभागः पितुर्वचसि तिष्ठति । अत एव न शक्ताः स्म व्यावर्तयितुमञ्जसा २१ तेषामाज्ञाय वचनं रामो वचनमब्रवीत् । एवं निबोध वचनं सुहृदां धर्मचक्षुषाम् २२ एतच्चैवोभयं श्रुत्वा सम्यक्संपश्य राघव । उत्तिष्ठ त्वं महाबाहो मां च स्पृश तथोदकम् २३ अथोत्थाय जलं स्पृष्ट्वा भरतो वाक्यमब्रवीत् । शृण्वन्तु मे परिषदो मन्त्रिणः शृणुयुस्तथा २४ न याचे पितरं राज्यं नानुशासामि मातरम् । एवं परमधर्मज्ञं नानुजानामि राघवम् २५ यदि त्ववश्यं वस्तव्यं कर्तव्यं च पितुर्वचः । अहमेव निवत्स्यामि चतुर्दश वने समाः २६ धर्मात्मा तस्य सत्येन भ्रातुर्वाक्येन विस्मितः । उवाच रामः संप्रेक्ष्य पौरजानपदं जनम् २७ विक्रीतमाहितं क्रीतं यत्पित्रा जीवता मम । न तल्लोपयितुं शक्यं मया वा भरतेन वा २८ उपाधिर्न मया कार्यो वनवासे जुगुप्सितः । युक्तमुक्तं च कैकय्या

---

नाहीं ? " असें ह्मणाला १९. तेव्हां तें अयोध्यानगरींतील व देशांतील लोक महात्म्याला ह्मणाले " काकुत्स्थाला भरत चांगलें सांगत आहे हें आह्मी समजून आहोंत २०;परंतु, हा महाभाग्यवान् राम पित्याची आज्ञाच धरून बसला आहे ह्यामुळें त्याचें मन सहज फिरविण्यास आह्मी समर्थ नाहीं. " २१. हें त्यांचें भाषण श्रवण करून राम भरताला ह्मणाला " धर्माकडे दृष्टि देणाऱ्या सुहृदांचें हें वचन ऐक २२. आणि तूं केलेलें व मीं केलेलें ह्या दोहोंकडेही लक्ष्य दे आणि चांगला विचार कर. सारांश, हे महापराक्रमी भरता; ऊठ आणि ( हें भलतेंच कर्म केल्याचा दोष निरसन होण्याकरितां ) मला स्पर्श करून आचमन कर " २३. ह्याप्रमाणें रामानें सांगितल्यानंतर भरत आचमन करून ह्मणाला " सभ्यांनीं व मंत्र्यांनीं माझें ह्मणणें ऐकावें २४. मी राज्याकरितां पित्याची प्रार्थना केली नाहीं, असा वर माग ह्मणून मातेला सांगितलें नाहीं आणि ह्याप्रमाणें ह्या परम धर्मवेत्त्या रामालाही मी वनांत जाण्याची अनुज्ञा दिली नाहीं २५. तथापि, वनामध्यें वास्तव्य करून पित्याची आज्ञाच जर शेंवटास नेणें असेल तर मीच चवदा वर्षेंपर्यंत वनामध्यें वास्तव्य करीन " २६. ह्या भ्रात्या भरताच्या सत्य वचनानें धर्मात्मा राम विस्मित होऊन नगरांतील व देशांतील लोकांना ह्मणाला २७ " माझा पिता जिवंत असतांना त्यानें जें कांहीं कोणाला विकलें असेल, त्यानें जी कांहीं कोणापाशीं ठेव ठेविली असेल अथवा जें कांहीं किंमत देऊन विकत घेतलें असेल तें भरताला अथवा मला नाहींसें करितां येणार नाहीं २८. तेव्हां वनवाससंबंधानें गौण प्रतिनिधि मला करितां

पित्रा मे सुकृतं कृतम् २९ जानामि भरतं क्षान्तं गुरुसत्कारकारिणम् । सर्वमेवात्र कल्याणं सत्यसंधे महात्मनि ३० अनेन धर्मशीलेन वनात्प्रत्यागतः पुनः । भ्रात्रा सह भविष्यामि पृथिव्याः पतिरुत्तमः ३१ वृतो राजा हि कैकेय्या मया तद्वचनं कृतम् । अनृतान्मोचयानेन पितरं तं महीपतिम् ३२ [४११६]इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येयोध्याकाण्ड एकादशोत्तरशततमः सर्गः ॥ १११ ॥

तमप्रतिमतेजोभ्यां भ्रातृभ्यां रोमहर्षणम् । विस्मिताः संगमं प्रेक्ष्य समुपेता महर्षयः १ अन्तर्हिता मुनिगणाः स्थिताश्च परमर्षयः । तौ भ्रातरौ महाभागौ काकुत्स्थौ प्रशशंसिरे २ सदार्यौ राजपुत्रौ द्वौ धर्मज्ञौ धर्मविक्रमौ । श्रुत्वा वयं हि संभाषामुभयोः स्पृहयामहे ३ ततस्त्वृषिगणाः क्षिप्रं दशग्रीववधैषिणः । भरतं राजशार्दूलमित्यूचुः संगता वचः ४ कुले जात महाप्राज्ञ महावृत्त महायशः । ग्राह्यं रामस्य वाक्यं ते पितरं यद्यवेक्षसे ५ सदानृणमिमं रामं वयमिच्छामहे पितुः । अनृणत्वाच्च कैकेय्याः

---

येणार नाहीं. कैकेयीनेंही सांगितलें तें योग्यच सांगितलें आहे आणि पित्यानेंही जें केलें तें माझें कल्याणच केलें आहे २९. भरत हा क्षमाशील आणि वडिलांचा सत्कार करणारा आहे हें मी जाणीत आहें; इतकेंच नव्हे परंतु, महात्म्या सत्यवचनी भरताचे ठिकाणीं राज्य चालविण्याला अवश्यक असे सर्व कांहीं चांगले गुण आहेत हें मला विदित आहे ३०. मी वनांतून परत आलों ह्मणजे ह्या धर्मशील भ्रात्यासहवर्तमान पृथ्वीचा मुख्य अधिपति होईन ३१. सारांश, कैकेयीनें राजापाशीं वर मागितला आणि मीं तें वचन मान्य केलें. तेव्हां ह्या माझ्या सांगण्याप्रमाणें वागून तूं त्या भूपति पित्याला अनृणापासून मुक्त कर " ३२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकशें अकरावा सर्ग समाप्त झाला ॥ १११.॥

त्या अप्रतिम तेजस्वी भ्रात्यांच्या अंगावर रोमांच उठविणारा तो समागम अवलोकन करून ( गुप्तपणें ) तेथें जुळलेले महर्षि विस्मित झाले १ आणि गुप्तपणें तेथें आलेले ते महर्षि व मुनिगण त्या महाभाग्यवान् ककुत्स्थकुलोत्पन्न उभयतां राम व भरत ह्या भ्रात्यांची प्रशंसा करूं लागले २. (ते ह्मणाले ) " हे दोन्ही राजपुत्र नेहमीं धर्म मार्गानें वागणारे असून सभ्य व धर्मज्ञ आहेत आणि ह्या उभयतांचें संभाषण ऐकून आह्मी ह्यांवर प्रसन्न झालों आहोंत ३." तदनंतर रावणवधाची इच्छा धरणारे ऋषिगण एकत्र जुळून नृपश्रेष्ठ भरताला सत्वर ह्मणाले ४ " हे कुलीन, हे महाज्ञानवान्, हे सदाचरणसंपन्न, हे महाकीर्तिमान्, पित्याच्या सुखाची जर तुला अपेक्षा असेल तर रामाच्या

स्वर्गं दशरथो गतः ६ एतावदुक्त्वा वचनं गन्धर्वाः समहर्षयः। राजर्षयश्चैव तथा सर्वे स्वां स्वां गतिं गताः ७ ह्लादितस्तेन वाक्येन शुशुभे शुभदर्शनः। रामः संहृष्टवदनस्तानृषीनभ्यपूजयत् ८ त्रस्तगात्रस्तु भरतः स वाचा मज्जमानया। कृताञ्जलिरिदं वाक्यं राघवं पुनरब्रवीत् ९ राम धर्ममिमं प्रेक्ष्य कुलधर्मानुसंततम्। कर्तुमर्हसि काकुत्स्थ मम मातुश्च याचनाम् १० रक्षितुं सुमहद्राज्यमहमेकस्तु नोत्सहे। पौरजानपदांश्चापि रक्तान्रञ्जयितुं तदा ११ ज्ञातयश्चापि योधाश्च मित्राणि सुहृदश्च नः। त्वामेव हि प्रतीक्षन्ते पर्जन्यमिव कर्षकाः १२ इदं राज्यं महाप्राज्ञ स्थापय प्रतिपद्य हि। शक्तिमानसि हि काकुत्स्थ लोकस्य परिपालने १३ एवमुक्त्वापतद्भ्रातुः पादयोर्भरतस्तदा। भृशं संप्रार्थयामास राघवेऽतिप्रियं वदन् १४ तमङ्के भ्रातरं कृत्वा रामो वचनमब्रवीत्। श्यामं नलिनपत्राक्षं मत्तहंसस्वरः स्वयम् १५ आगता त्वामियं बुद्धिः स्वजा वैनयिकी च या।

---

सांगण्याचा तू स्वीकार कर ५. हा राम कधींही पित्याच्या ऋणांत राहू नये अशी आमची इच्छा आहे आणि दशरथही ( राम वनवासांत आल्यानें ) कैकयीच्या ऋणांतून मुक्त झाल्यामुळें स्वर्गाला गेला आहे " ६. इतकें बोलून गंधर्व, महर्षि व राजर्षि हे सर्व आपआपल्या मार्गानें चालते झाले ७. तेव्हां त्यांच्या त्या सांगण्यानें शुभमुद्रेनें युक्त असलेल्या रामाच्या मुखावर तेज आलें आणि आनंदित मुद्रेनें त्यानें त्या ऋषींचें अभिनंदन केलें ८. तेव्हां भरताचे हातपाय अगदीं मोडून गेले आणि अडखळत अडखळत पुनरपि तो रामाला ह्मणाला ९ " हे काकुत्स्था, कुलधर्म ह्मणून नेहमीं चालत आलेल्या ह्या ( ज्येष्ठ राज्याभिषेकरूप ) धर्माकडे दृष्टि देऊन माझ्या व माझ्या मातेच्या विनंतीला तूं मान दे १०. हें प्रचंड राज्य रक्षण करण्याला आणि तुझे ठिकाणीं अनुरक्त असलेल्या प्रजाजनांचें रंजन करण्याला माझ्या एकट्याचें धैर्य होत नाहीं ११. शिवाय, शेतकरी ज्याप्रमाणें पर्जन्याची वाट पहात असतात त्याचप्रमाणें आपले बांधव, योद्धे, मित्र आणि सुहृद हे तुझ्याकडेच डोळे लावून राहिले आहेत १२. ह्यास्तव, हे महाज्ञानसंपन्न काकुत्स्था, तूं राज्याचा स्वीकार कर आणि मग तें कोणाला तरी देऊन टाक ह्मणजे तो लोकांचें परिपालन करण्यास समर्थ होईल " १३. ह्याप्रमाणें भाषण केल्यावर भरतानें आपल्या भ्रात्याच्या चरणांवर लोटांगण घातलें आणि रामाशीं अति प्रिय भाषण करीत करीत त्यानें वारंवार त्याची प्रार्थना केली १४. तेव्हां मत्त हंसाप्रमाणें ज्याचा स्वर आहे असा तो राम त्या श्यामवर्ण व कमलनयन भ्रात्याला स्वतःच्या मांडीवर घेऊन ह्मणाला १५ " बा भरता, ही जी विनयामुळें

भृशमुत्सहसे तात रक्षितुं पृथिवीमपि १६ अमात्यैश्च सुहृद्भिश्च बुद्धिमद्भिश्च मन्त्रिभिः । सर्वकार्याणि संमन्त्र्य महान्त्यपि हि कारय १७ लक्ष्मीश्चन्द्रादपेयाद्वा हिमवान्वा हिमं त्यजेत् । अतीयात्सागरो वेलां न प्रतिज्ञामहं पितुः १८ कामाद्वा तात लोभाद्वा मात्रा तुभ्यमिदं कृतम् । न तन्मनसि कर्तव्यं वर्तितव्यं च मातृवत् १९ एवं ब्रुवाणं भरतः कौसल्यासुतमब्रवीत् । तेजसादित्यसंकाशं प्रतिपच्चन्द्रदर्शनम् २० अधिरोहार्यपादाभ्यां पादुके हेमभूषिते । एते हि सर्वलोकस्य योगक्षेमं विधास्यतः २१ सोऽधिरुह्य नरव्याघ्रः पादुके व्यवमुच्य च । प्रायच्छत्सुमहातेजा भरताय महात्मने २२ स पादुके संप्रणम्य रामं वचनमब्रवीत् । चतुर्दश हि वर्षाणि जटाचीरधरो ह्यहम् २३ फलमूलाशनो वीर भवेयं रघुनन्दन । तवागमनमाकाङ्क्षन्वसन्वै नगराद्बहिः २४ तव पादुकयोर्न्यस्य राज्यतन्त्रं परंतप । चतुर्दशे हि संपूर्णे वर्षेऽहनि रघूत्तम २५ न

---

( चौदा वर्षेपर्यंत दुःसह वनवास करण्याविषयीं )स्वाभाविक बुद्धि तुझे ठिकाणीं उत्पन्न झाली तिचा विचार केला असतां तूं पृथ्वीचेंही रक्षण करण्यास अत्यंत समर्थ असल्याचें सिद्ध होत आहे १६. ह्यास्तव, अमात्य, सुहृद आणि बुद्धिमान् मंत्रि ह्यांच्या मसलतीनें तूं मोठमोठींही सर्व कार्यें करवीत जा. १७. फारतर काय कांति चंद्राला सोडून जाईल, हिमालयपर्वतावरीलही बर्फ नाहींसें होईल व समुद्रही मर्यादेचें उल्लंघन करील परंतु,मी आपल्या पित्याच्या प्रतिज्ञेचा त्याग करणार नाहीं १८. बा भरता, प्रेमामुळें असो अथवा राज्याच्या अभिलाषामुळें असो तुझ्या मातेनें जें हें केलें आहे तें मनांत न ठेवितां तूं मातेप्रमाणेंच तिच्याशीं आपलें वर्तन ठेवीत जा" १९. सूर्यासमान तेजस्वी आणि प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें प्रिय मुद्रेनें युक्त असलेला कौसल्यापुत्र राम ह्याप्रमाणें बोलूं लागला असतां भरत त्याला ह्मणाला २० "हे आर्य, ह्या सुवर्णभूषित पादुकांवर तूं आपले पाय ठेव ह्मणजे ह्या पादुकाच सर्व जगताचा योगक्षेम चालवितील" २१. (असें भरतानें सांगितल्यावर) अत्यंत महातेजस्वी पुरुषश्रेष्ठ रामानें पादुकांवर पाय ठेवून आणि त्यावरून फिरून खालीं उतरून त्या पादुका महात्म्या भरताला दिल्या २२. नंतर आपल्याला दिलेल्या त्या पादुकांना प्रणाम करून भरत रामाला ह्मणाला "हे वीर रघुनंदना, जटा व वल्कलें धारण करून आणि फलमूलें भक्षण करून तुझ्या आगमनाची वाट पहात पहात मी नगराच्या बाहेर चवदा वर्षेपर्यंत राहीन २३,२४ आणि, हे शत्रुतापना, सर्व राज्यकारभाराची भिस्त तुझ्या पादुकांवर ठेवून मी राहीन; परंतु, हे रघुवंशजश्रेष्ठा, चवदावें वर्ष ज्या दिवशीं २५

द्रक्ष्यामि यदि त्वां तु प्रवेक्ष्यामि हुताशनम् । तथेति च प्रतिज्ञाय तं परिष्वज्य सादरम् २६ शत्रुघ्नं च परिष्वज्य वचनं चेदमब्रवीत् । मातरं रक्ष कैकेयीं मा रोषं कुरु तां प्रति २७ मया च सीतया चैव शप्तोऽसि रघुनन्दन । इत्युक्त्वाश्रुपरीताक्षो भ्रातरं विससर्ज ह २८ स पादुके ते भरतः स्वलंकृते महोज्ज्वले संपरिगृह्य धर्मवित् । प्रदक्षिणं चैव चकार राघवं चकार चैवोत्तमनागमूर्धनि २९ अथानुपूर्व्यात्प्रतिपूज्य तं जनं गुरूंश्च मन्त्रीन्प्रकृतीस्तथानुजौ । व्यसर्जयद्राघववंशवर्धनः स्थितः स्वधर्मे हिमवानिवाचलः ३० तं मातरो बाष्पगृहीतकण्ठ्यो दुःखेन नामन्त्रयितुं हि शेकुः । स चैव मातॄरभिवाद्य सर्वा रुदन्कुटीं स्वां प्रविवेश रामः ३१ [४१४७] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्डे द्वादशाधिकशततमः सर्गः ॥ ११२ ॥

ततः शिरसि कृत्वा तु पादुके भरतस्तदा । आरुरोह रथं हृष्टः शत्रुघ्नसहितस्तदा १ वसिष्ठो वामदेवश्च जाबालिश्च दृढव्रतः । अग्रतः प्रययुः सर्वे मन्त्रिणो मन्त्रपूजिताः २ मन्दाकिनीं नदीं रम्यां प्राङ्मुखास्ते

संपूर्ण होईल त्या दिवशीं जर तुझें दर्शन झालें नाहीं तर मी अग्नीमध्यें प्रवेश करीन " ह्यावर " ठीक आहे " असें त्याला कबूल करून आणि आदरपूर्वक त्याला व शत्रुघ्नाला कडकडून भेटून राम त्याला ह्मणाला " कैकेयी मातेचें रक्षण कर; तिच्यावर क्रोध करूं नको २६, २७. हे रघुनंदना, तुला माझी व सीतेची शपथ आहे. " असें ह्मणून अश्रूंनीं नेत्र भरून आलेल्या रामानें भ्रात्या भरताला घातलेली मिठी सोडिली २८. तेव्हां अत्यंत उज्ज्वल आणि उत्तमप्रकारें भूषित असलेल्या त्या पादुका घेऊन त्या धर्मवेत्त्या भरतानें रामाला प्रदक्षिणा केली आणि त्या पादुका एका उत्कृष्ट गजाच्या मस्तकावर ठेविल्या २९. तदनंतर ते लोक, गुरु, मंत्री, प्रजाजन आणि कनिष्ठ भ्राते भरतशत्रुघ्न ह्यांचा रीतीप्रमाणें अनुक्रमानें संमान करून स्वधर्माचे ठिकाणीं हिमालयपर्वताप्रमाणें अचल असलेल्या रघुवंशवर्धक रामानें त्यांना निरोप दिला ३०. दुःखामुळें अश्रूंनीं कंठ दाटून आल्याकारणानें माता त्याला विचारण्यास समर्थ झाल्या नाहींत. तेव्हां सर्व मातांना नमस्कार करून तो राम रडत रडत आपल्या पर्णकुटिकेमध्यें गेला ३१. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें बारावा सर्ग समाप्त झाला ॥ ११२ ॥

तदनंतर रामानें दिलेल्या पादुका मस्तकाला लावून सम्न शत्रुघ्नासह वर्तमान आनंदित होऊन रथावर आरूढ झाला १ आणि वसिष्ठ, वामदेव, जाबालि, दृढव्रत आणि

ययुस्तदा । प्रदक्षिणं च कुर्वाणाश्चित्रकूटं महागिरिम् ३ पश्यन्धातुसहस्राणि रम्याणि विविधानि च । प्रययौ तस्य पार्श्वेन ससैन्यो भरतस्तदा ४ अदूराच्चित्रकूटस्य ददर्श भरतस्तदा । आश्रमं यत्र स मुनिर्भरद्वाजः कृतालयः ५ स तमाश्रममागम्य भरद्वाजस्य वीर्यवान् । अवतीर्य रथात्पादौ ववन्दे कुलनन्दनः ६ ततो हृष्टो भरद्वाजो भरतं वाक्यमब्रवीत् । अपि कृत्यं कृतं तात रामेण च समागतम् ७ एवमुक्तः स तु ततो भरद्वाजेन धीमता । प्रत्युवाच भरद्वाजं भरतो धर्मवत्सलः ८ स याच्यमानो गुरुणा मया च दृढविक्रमः । राघवः परमप्रीतो वसिष्ठं वाक्यमब्रवीत् ९ पितुः प्रतिज्ञां तामेव पालयिष्यामि तत्त्वतः । चतुर्दश हि वर्षाणि या प्रतिज्ञा पितुर्मम १० एवमुक्तो महाप्राज्ञो वसिष्ठः प्रत्युवाच ह । वाक्यज्ञो वाक्यकुशलं राघवं वचनं महत् ११ एते प्रयच्छ संहृष्टः पादुके हेमभूषिते । अयोध्यायां महाप्राज्ञ योगक्षेमकरो भव १२ एवमुक्तो वसिष्ठेन राघवः प्राङ्मुखः स्थितः । पादुके हेमविकृते मम राज्याय ते

---

मसलतीविषयीं मान्य असलेले सर्व मंत्री त्याच्या पुढें निघाले २. चित्रकूट महापर्वताला उजवी घालणारे ते वसिष्ठप्रभृति प्राङ्मुख होऊन रमणीय मंदाकिनी नदीकडे गेले ३ व नानाप्रकारचे हजारों रमणीय धातु अवलोकन करीत करीत भरत सैन्यासहवर्तमान त्या पर्वताच्या उत्तर बाजूनें चालला ४. नंतर चित्रकूट पर्वताच्या जवळच भरतानें भरद्वाज मुनींनीं वसति केलेला तो आश्रम अवलोकन केला ५ आणि भरद्वाज मुनींच्या त्या आश्रमाजवळ आल्यानंतर कुलनंदन वीर्यवान् भरत रथांतून उतरला आणि त्यानें त्या मुनींच्या चरणांना वंदन केलें ६ तदनंतर "बा भरता, आपलें कर्तव्य केलेंस कां आणि रामाची भेट झाली का" असें भरद्वाजमुनींनीं आनंदित होऊन भरताला विचारिलें ७ व ह्याप्रमाणें बुद्धिमान् भरद्वाज मुनींनीं विचारिलें असतां तो धर्मवत्सल भरत त्यांना ह्मणाला ८ "मी व गुरु, त्या अमोघ पराक्रमी रामाची प्रार्थना करूं लागलों असतां तो राघव अत्यंत प्रसन्न होऊन वसिष्ठांना ह्मणाला ९ "चवदा वर्षें वनवास करावयाचा ही जी माझ्या पित्याची प्रतिज्ञा तिचेंच मी खरें खरें परिपालन करणार" १०. ह्याप्रमाणें रामानें सांगितलें असतां महाज्ञानी आणि संभाषण करण्यामध्यें निपुण असलेले वसिष्ठ वक्त्या रामाला गंभीर शब्दानें ह्मणाले ११ "आनंदित होऊन तूं ह्या सुवर्णभूषित पादुका दे आणि, हे महाज्ञानवान् रामा, ह्या पादुकांच्या द्वारानें अयोध्येमध्यें राहून तूं लोकांचा योगक्षेम चालीव" १२. ह्याप्रमाणें वसिष्ठांनीं सांगितलें असतां रामानें पूर्वेकडे तोंड केलें आणि सुवर्णानें

ददौ १३ निवृत्तोहमनुज्ञातो रामेण सुमहात्मना । अयोध्यामेव गच्छामि गृहीत्वा पादुके शुभे १४ एतच्छ्रुत्वा शुभं वाक्यं भरतस्य महात्मनः । भरद्वाजः शुभतरं मुनिर्वाक्यमुदाहरत् १५ नैतच्चित्रं नरव्याघ्रे शीलवृत्तविदां वरे । यदार्यं त्वयि तिष्ठेत्तु निम्नोत्सृष्टमिवोदकम् १६ अनृणः स महाबाहुः पिता दशरथस्तव । यस्य त्वमीदृशः पुत्रो धर्मात्मा धर्मवत्सलः १७ तमृषिं तु महाप्राज्ञमुक्तवाक्यं कृताञ्जलिः । आमन्त्रयितुमारेभे चरणावुपगृह्य च १८ ततः प्रदक्षिणं कृत्वा भरद्वाजं पुनः पुनः । भरतस्तु ययौ श्रीमानयोध्यां सह मन्त्रिभिः १९ यानैश्च शकटैश्चैव हयैर्नागैश्च सा चमूः । पुनर्निवृत्ता विस्तीर्णा भरतस्यानुयायिनी २० ततस्ते यमुनां दिव्यां नदीं तीर्त्वोर्मिमालिनीम् । ददृशुस्तां पुनः सर्वे गङ्गां शिवजलां नदीम् २१ तां रम्यजलसंपूर्णां संतीर्य सहबान्धवः । शृङ्गवेरपुरं रम्यं प्रविवेश ससैनिकः । शृङ्गवेरपुराद्भूय अयोध्यां संददर्श ह २२ अयोध्यां तु तदा दृष्ट्वा पित्रा भ्रात्रा विवर्जिताम् । भरतो दुःखसंतप्तः सारथिं

---

मढविलेल्या त्या पादुका राज्य चालविण्याकरितां त्यानें मला दिल्या १३ व मीही त्या महात्म्या रामाची अनुज्ञा घेऊन तथून परतलों. आतां त्या शुभ पादुका घेऊन मी अयोध्येंतच जाणार " १४. हें महात्म्या भरताचें शुभ भाषण श्रवण करून भरद्वाजमुनींनीं त्याच्यापेक्षांही उत्कृष्ट असें भाषण भरताशीं केलें १५. (ते ह्मणाले) " टाकिलेलें उदक सखल प्रदेशांत येऊन स्तब्ध रहातें हें जसें आश्चर्य नव्हे तसेंच पुरुषश्रेष्ठ आणि शील व सद्वर्तन जाणणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ अशा तुझे ठिकाणीं सदाचरण असणें हेंही कांहीं आश्चर्य नव्हे १६. ज्याचा तूं अशा प्रकारचा धर्मात्मा व धर्मवत्सल पुत्र आहेस तो तुझा महापराक्रमी पिता दशरथ पितरांच्या ऋणांतून मुक्त आहे " १७. ह्याप्रमाणें भाषण करून ते भरद्वाजऋषि बसले असतां त्याचे पाय धरून आणि हात जोडून भरतानें त्यांची अनुज्ञा घेतली १८ व नंतर पुन्हां पुन्हां भरद्वाजांना नमस्कार करून तो श्रीमान् भरत मंत्र्यांसहवर्तमान अयोध्येकडे निघाला असतां १९ रथ, गाडे अश्व आणि गज. ह्यांसहवर्तमान भरताच्या बरोबर जाणारी ती विस्तीर्ण सेनाही पुनरपि अयोध्येकडे वळली २०. तदनंतर लाटांनी भरलेली दिव्य यमुना नदी तरून गेल्यावर पवित्र उदकानें युक्त असलेली गंगा नदीही त्या सर्वांनीं पुनरपि अवलोकन केली २१ मनोहर उदकानें परिपूर्ण असलेली ती गंगा उतरून बांधव आणि सैनिक ह्यांसहवर्तमान तो भरत रमणीय अशा शृंगवेर पुरामध्यें प्रविष्ट झाला आणि शृंगवेर पुरांतून निघाल्यावर त्यानें पुनरपि अयोध्या अवलोकन केली २२; परंतु, पिता

चेदमब्रवीत् २३ सारथे पश्य विध्वस्ता अयोध्या न प्रकाशते । निराकारा निरानन्दा दीना प्रतिहतस्वना २४ [४१७१] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे त्रयोदशाधिकशततमः सर्गः ॥ ११३ ॥

स्निग्धगम्भीरघोषेण स्यन्दनेनोपयान्प्रभुः । अयोध्यां भरतः क्षिप्रं प्रविवेश महायशाः १ बिडालोलूकचरितामालीननरवारणाम् । तिमिराभ्याहतां कालीमप्रकाशां निशामिव २ राहुशत्रोः प्रियां पत्नीं श्रिया प्रज्वलितप्रभाम् । ग्रहेणाभ्युदितेनैकां रोहिणीमिव पीडिताम् ३ अल्पोष्णक्षुब्धसलिलां घर्मतप्तविहंगमाम् । लीनमीनझषग्राहां कृशां गिरिनदीमिव ४ विधूमामिव हेमाभां शिखामग्नेः समुत्थिताम् । हविरभ्युक्षितां पश्चाच्छिखां विप्रलयं गताम् ५ विध्वस्तकवचां रुग्णगजवाजिरथध्वजाम् । हतप्रवीरामापन्नां चमूमिव महाहवे ६ सफेनां सस्वनां भूत्वा सागरस्य समुत्थिताम् । प्रशा-

---

दशरथ आणि भ्राता राम ह्यांनीं रहित असलेली ती अयोध्या अवलोकन करून भरत दुःखसंतप्त झाला आणि सारथ्याला ह्मणाला २३ " हे सारथ्या, पहा, उध्वस्त झालेली ही अयोध्या नगरी आतां प्रकाशत नाहीं. ही दीन अयोध्या नगरी अलंकार रहित व आनंदहीन झाली असून हिच्यांतील गडबडही अगदीं नाहींशी झाली आहे " २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें तेरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११३ ॥

स्निग्ध व गंभीर घोषानें युक्त असलेल्या रथांत आरूढ होऊन जाणारा महायशस्वी प्रभु भरत सत्वर अयोध्येमध्यें प्रविष्ट झाला १. त्या अयोध्येमध्यें मांजरें व घुबडें संचार करीत होतीं, लोकांचीं दारें लाविलीं होतीं आणि प्रकाशरहित झाली असल्यामुळें ती नगरी अंधःकारानें व्याप्त झालेली कालरात्रिच कीं काय अशी भासत होती २. दिव्य ऐश्वर्यानें संपन्न असल्यामुळें उज्ज्वल तेजानें युक्त असलेली चंद्राची प्रिय पत्नि रोहिणी ज्याप्रमाणें राहूनें भक्षिला पीडिलें असतां साहाय्यरहित असते त्याप्रमाणें रामरहित झालेली ती अयोध्या अनाथ दिसत होती ३. अल्प, उष्ण व कलुषित उदक सूर्याच्या तापानें संतप्त झालेले पक्षी आणि लीन झालेले मत्स्य, झष व मकर ह्यांनीं युक्त असलेल्या पर्वतावरील प्रवाह लहान झालेल्या नदीप्रमाणें ती दिसत होती ४. धूमरहित असल्यामुळें सुवर्णवत दिसणाऱ्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें पूर्वीं राम असतांना भासत असलेली अयोध्या राम अरण्यांत गेल्यानंतर वर दूध शिंपडल्यामुळें नाश पावलेल्या अग्नीच्या ज्वालेप्रमाणें तेजोहीन दिसत होती ५. जिच्यांतील कवचांचा विध्वंस झालेला आहे, जिच्यांतील गज व अश्व, जखमी होऊन रथ व ध्वज मोडून

न्तमारुतोद्धूतां जलोर्मिमिव निःस्वनाम् ७ त्यक्तां यज्ञायुधैः सर्वैरभिरूपैश्च याजकैः । सुत्याकाले सुनिर्वृत्ते वेदिं गतस्वामिव ८ गोष्ठमध्ये स्थितामार्तामचरन्तीं नवं तृणम् । गोवृषेण परित्यक्तां गवां पत्नीमिवोत्सुकाम् ९ प्रभाकराद्यैः सुस्निग्धैः प्रज्वलद्भिरिवोत्तमैः । वियुक्तां मणिभिर्जात्यैर्नवां मुक्तावलीमिव १० सहसाचरितां स्थानान्महीं पुण्यक्षयाद्गताम् । संहृतद्युतिविस्तारां तारामिव दिवश्च्युताम् ११ पुष्पनद्धां वसंतान्ते मत्तभ्रमरशालिनीम् । द्रुतदावाग्निविप्लुष्टां क्लान्तां वनलतामिव १२ संमूढनिगमां सर्वां संक्षिप्तविपणापणाम् । प्रच्छन्नशशिनक्षत्रां द्यामिवाम्बुधरैर्युताम् १३ क्षीणपानोत्तमैर्भग्नैः शरावैरभिसंवृताम् । हतशौण्डामिव ध्वस्तां पानभूमिमसंस्कृताम् १४ वृक्णभूमितलां निम्नां वृक्णपात्रैः समावृताम् । उपयु-

गेले आहेत आणि जिच्यांतील मोठमोठ्या वीरांचा वध झाला आहे अशा महासंग्रामामध्यें विपन्नावस्थेला पोंचलेल्या सेनेप्रमाणें ती अयोध्या भासत होती ' ६. समुद्रांतन निघालेली पाण्याची लाट ज्याप्रमाणें प्रचंड वायूनें उसळल्यामुळें फेनयुक्त व ध्वनियुक्त होऊन नंतर शांत वायूनें किंचित् कंपित होऊं लागली असतां ध्वनिरहित होऊन जाते त्याप्रमाणें ती अयोध्या शब्दरहित झालेली होती ७. यागकाल समाप्त झाल्यावर सर्व यज्ञपात्रें आणि योग्य याजक ह्यांनीं रहित झालेली यज्ञभूमि जशी ध्वनिशून्य होते तशी ती अयोध्या ध्वनिशून्य झालेली होती ८. तरुण बैलांची पत्नीच कीं काय अशा रीतीनें उत्सुक होऊन राहिलेली माजास आलेली गाय बैलानें सोडून दिली असतां कोमल तृणही भक्षण न करितां जशी गोठ्यामध्यें आर्त व उत्सुक होऊन राहिलेली असते तशी ती अयोध्या आर्त व रामाकरितां उत्सुक झालेली होती ९. अतिशय पाणीदार आणि उज्ज्वल अशा पद्मरागप्रभृति जातीच्या उत्कृष्ट रत्नांनीं वियुक्त झालेल्या मोत्यांच्या नव्या माळेप्रमाणें ती अयोध्या शोभारहित दिसत होती १०. पुण्यक्षय झाल्यामुळें फांकणारें तेज नाहींसें होऊन एकाएकीं स्थानापासून चलित व स्वर्गापासून भ्रष्ट होऊन पृथ्वीवर पडलेल्या ताऱ्याप्रमाणें ती अयोध्या दिसत होती ११. पुष्पांनीं जखडलेली आणि ह्मणूनच मत्त भ्रमरांनीं युक्त असलेली वनलता वसंताचे शेवटीं प्रचंड दावाग्नीनें होरपळल्यामुळें जशी कोमेजलेली दिसते तशी ती अयोध्या दिसत होती १२. आकाश मेघांनीं व्याप्त झालें असतां चंद्र व नक्षत्रें दिसेनाशीं होऊन ज्याप्रमाणें मार्गांतील रहदारी नाहींशी होते आणि बाजारांतील दुकानें बंद होतात त्याप्रमाणें राम वनवासांत गेल्यामुळें सर्व अयोध्येंतील मार्ग मोकळे पडून दुकानें बंद झालेलीं होतीं १३. मद्यपान करणाऱ्यांचा नाश होऊन मद्यरहित व भग्न पानपात्रांनीं व्याप्त

त्तोदकां भग्नां प्रपां निपतितामिव १५ विपुलां विततां चैव युक्तपाशां तरस्विनाम्। भूमौ बाणैर्विनिकृत्तां पतितां ज्यामिवायुधात् १६ सहसा युद्धशौण्डेन हयारोहेण वाहिताम्। निहतां प्रतिसैन्येन वडवामिव पातिताम् १७ भरतस्तु रथस्थः सञ्श्रीमान्दशरथात्मजः। वाहयन्तं रथश्रेष्ठं सारथिं वाक्यमब्रवीत् १८ किं नु खल्वद्य गम्भीरो मूर्छितो न निशाम्यते। यथापुरमयोध्यायां गीतवादित्रनिःस्वनः १९ वारुणीमदगन्धश्च माल्यगन्धश्च मूर्छितः। चन्दनागुरुगन्धश्च न प्रवाति समन्ततः २० यानप्रवरघोषश्च सुस्निग्धहयनिःस्वनः। प्रमत्तगजनादश्च महांश्च रथनिःस्वनः २१ नेदानीं श्रूयते पुर्यामस्यां रामे विवासिते। चन्दनागुरुगन्धांश्च महार्हाश्च वनस्रजः २२ गते रामे हि तरुणाः संतप्ता नोपभुञ्जते। बहिर्यात्रां न गच्छन्ति चित्रमाल्यधरा नराः २३ नोत्सवाः संप्रवर्तन्ते रामशोकार्दिते पुरे। सा हि नूनं मम

---

व उध्वस्त झालेल्या असंस्कृत पानभूमीप्रमाणें ती अयोध्या दिसत होती १४. जिच्यांतील भूमीला भेगा पडलेल्या आहेत, भग्नपात्रांनीं जी व्याप्त झालेली आहे, जिच्यांतील उदक संपून गेलें आहे आणि जी मोडून पडली आहे अशा सखल प्रदेशावर असलेल्या पाणपोईप्रमाणें ती अयोध्या दिसत होती १५. बलाढ्य योद्ध्यांच्या बाणांनीं तुटून गेल्यामुळें धनुष्यापासून भूमीवर पडलेल्या विशाल पाशयुक्त आणि ताणलेल्या दोरीप्रमाणें ती अयोध्या भासत होती १६. आणि युद्धनिपुणस्वरानें बलात्कारानें पिटाळून लाविलेल्या व शत्रुसैन्यानें मारून पाडिलेल्या घोडीप्रमाणें ती अयोध्या दिसत होती १७. अयोध्येंत प्रवेश केल्यानंतर रथामध्यें बसलेला श्रीमान् दशरथपुत्र भरत तो श्रेष्ठ रथ हांकणाऱ्या सारथ्याला ह्मणाला १८ " पूर्वीप्रमाणें गायनाचा व वाद्याचा लय लावून गेलेला गंभीर ध्वनि अयोध्येमध्यें आज कां बरें ऐकूं येत नाहीं? १९. सुरेचा मादक गंध, पुष्पगंध आणि चंदन व अगरु ह्यांचा गंध ह्यांनीं युक्त असलेला प्रबल वायु आसमंतात भागीं वहात नाहीं २०. श्रेष्ठ श्रेष्ठ यानांचा घोष, उत्तम पाणीदार अश्वांचा शब्द, मत्त गजांची गर्जना आणि रथांचा मोठा ध्वनि २१ राम वनवासांत गेल्यामुळें आज ह्या नगरीमध्यें ऐकूं येत नाहीं. मोठमोठ्या मूल्यवान् वनमाला आणि चंदन व अगुरु ह्यांचे गंध २२ ह्यांचा उपभोग संतप्त झालेले तरुण पुरुष राम वनांत गेल्यामुळें घेत नाहींत. चित्रविचित्र पुष्पमाला धारण करून लोक बाहेर फिरावयास जात नाहींत २३ आणि रामसंबंधीं शोकानें व्याप्त झालेल्या नगरामध्यें उत्सव सुरू नाहींत. खरोखर या नगराची ती शोभा माझ्या भ्रात्यांसहवर्तमान

भ्राजा पुरस्यास्य द्युतिर्गता २४ नहि राजत्ययोध्येयं सासारेवार्जुनी क्षपा । कदा नु खलु मे भ्राता महोत्सव इवागतः २५ जनयिष्यत्ययोध्यायां हर्षं ग्रीष्म इवाम्बुदः । तरुणैश्चारुवेषैश्च नरैरुन्नतगामिभिः २६ संपतद्भिरयोध्यायां नाभिभान्ति महापथाः । इति ब्रुवन्सारथिना दुःखितो भरतस्तदा २७ अयोध्यां संप्रविश्यैव विवेश वसतिं पितुः । तेन हीनां नरेन्द्रेण सिंहहीनां गुहामिव २८ तदा तदन्तःपुरमुज्झितप्रभं सुरैरिवोत्कृष्टमभास्करं दिनम् । निरीक्ष्य सर्वत्र विभक्तमात्मवान्मुमोच बाष्पं भरतः सुदुःखितः २९ [४२००] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे चतुर्दशाधिकशततमः सर्गः ॥ ११४ ॥

ततो निक्षिप्य मातॄस्ता अयोध्यायां दृढव्रतः । भरतः शोकसंतप्तो गुरूनिदमथाब्रवीत् १ नन्दिग्रामं गमिष्यामि सर्वानामन्त्रयेऽत्र वः । तत्र दुःखमिदं सर्वं सहिष्ये राघवं विना २ गतश्चाहो दिवं राजा वनस्थः स गुरुर्मम । रामं प्रतीक्षे राज्याय स हि राजा महायशाः ३ एतच्छ्रुत्वा

---

निघून गेली आहे २४ आणि त्यामुळेंच ही अयोध्या पर्जन्यधारांनीं युक्त झालेल्या शुक्लपक्षांतील रात्रीप्रमाणें शोभेनाशी झाली आहे. महोत्सवाप्रमाणें आणि ग्रीष्म ऋतूंतील मेघाप्रमाणें माझा भ्राता केव्हां बरें येऊन अयोध्येमध्यें हर्ष उत्पन्न करील ? तरुण व मनोहर वेष धारण करून छाती काढून चालणाऱ्या आणि लगबगीनें जात असलेल्या तरुण पुरुषांच्या योगानें अयोध्येंतील राजमार्ग शोभत नाहींत ". अशारीतीनें तो दुःखाकुल झालेला भरत सारथ्याशीं बोलत असतांना २५,२६,२७ अयोध्येंत शिरतांक्षणीं सिंहरहित झालेल्या गुहेप्रमाणें त्या दशरथराजानें रहित झालेल्या पित्याच्या वसतिस्थानामध्यें गेला २८ आणि देवांनीं सोडून दिलेल्या सूर्यरहित स्वर्गाप्रमाणें प्रभाशून्य झालेलें तें अंतःपुर सर्व ठिकाणीं संस्काररहित असलेलें अवलोकन करून तो भरत मनोनिग्रही असतांनाही अत्यंत दुःखित होऊन अश्रु ढाळूं लागला २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें चवदावा सर्ग समाप्त झाला ॥ ११४॥

तदनंतर स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणारा तो भरत अयोध्येमध्यें त्या मातांना ठेविल्यावर शोकाकुल होऊन गुरूंना ह्मणाला १ " मी येथें तुह्मां सर्वांचा निरोप घेऊन नंदिग्रामाला जातों. तेथें मी हें सर्व रामवियोग दुःख सोशीत बसेन २. अहो, राजा तर स्वर्गाला गेला आणि वडिलाप्रमाणें असलेला तो माझा भ्राता राम वनांत वास्तव्य करूं लागला; परंतु, मी राज्याकरितां रामाकडेच डोळे लावून बसलों आहें.

शुभं वाक्यं भरतस्य महात्मनः। अब्रुवन्मन्त्रिणः सर्वे वसिष्ठश्च पुरोहितः ४ सुभृशं श्लाघनीयं च यदुक्तं भरत त्वया । वचनं भ्रातृवात्सल्यादनुरूपं तवैव तत् ५ नित्यं ते बन्धुलुब्धस्य तिष्ठतो भ्रातृसौहृदे । मार्गमार्यं प्रपन्नस्य नानुमन्येत कः पुमान् ६ मन्त्रिणां वचनं श्रुत्वा यथाभिलषितं प्रियम् । अब्रवीत्सारथिं वाक्यं रथो मे युज्यतामिति ७ प्रहृष्टवदनः सर्वा मातॄः समभिभाष्य च । आरुरोह रथं श्रीमाञ्शत्रुघ्नेन समन्वितः ८ आरुह्य तु रथं क्षिप्रं शत्रुघ्नभरतावुभौ । ययतुः परमप्रीतौ वृतौ मन्त्रिपुरोहितैः ९ अग्रतो गुरवः सर्वे वसिष्ठप्रमुखा द्विजाः। प्रययुः प्राङ्मुखाः सर्वे नन्दिग्रामो यतो भवेत् १० बलं च तदनाहूतं गजाश्वरथसंकुलम् । प्रययौ भरते याते सर्वे च पुरवासिनः ११ रथस्थः स तु धर्मात्मा भरतो भ्रातृवत्सलः । नन्दिग्रामं ययौ तूर्णं शिरस्याधाय पादुके १२ भरतस्तु ततः क्षिप्रं नन्दिग्रामं प्रविश्य सः । अवतीर्य रथात्तूर्णं गुरूनिदमभाषत १३ एतद्राज्यं मम भ्रात्रा दत्तं संन्यासमुत्तमम् । योगक्षेम-

---

कारण, तोच महायशस्वी राजा आहे " ३. हें महात्म्या भरताचें शुभ भाषण श्रवण केल्यावर सर्व मंत्रि आणि पुरोहित वसिष्ठ त्याला ह्मणाले ४ " हे भरता, तूं जें हें भाषण केलेंस तें अतिशयच प्रशंसनीय आहे आणि बंधुप्रेमामुळें केलेलें हें भाषण तुला योग्य आहे ५. अशा भ्रातृप्रेमाचें अवलंबन करून व सन्मार्गाचा आश्रय करून बंधुजनांचें परिपालन करण्याविषयीं लुब्ध असलेल्या तुझ्या भाषणाला कोणता बरें पुरुष अनुमोदन देणार नाहीं ? " ६. इच्छेप्रमाणें प्रिय झालेलें हें मन्त्र्यांचें भाषण श्रवण केल्यावर " माझा रथ जोड " ह्मणून भरत सारथ्याला ह्मणाला ७ आणि आनंदित मुद्रेनें युक्त होऊन सर्व मातांचा निरोप घेतल्यावर तो श्रीमान् भरत शत्रुघ्नासहवर्तमान रथावर आरूढ झाला ८ व ह्याप्रमाणें मंत्रि आणि पुरोहित ह्यांनीं परिवेष्टित व अत्यंत आनंदित झालेले ते उभयतां भरतशत्रुघ्न रथावर आरूढ होऊन सत्वर चालते झाले ९. वसिष्ठप्रभृति सर्व गुरु आणि इतरही सर्व द्विज पराङ्मुख होऊन भरताच्या पुढें नंदिग्राम जिकडे होतें तिकडे चालले १०. तेव्हां भरताचें सांगणें नसतांनाच गज, अश्व आणि रथ ह्यांनीं गजबजलेलें सैन्य भरत चालूं लागला असतां निघालें आणि सर्व नगरवासी लोकही त्याच्या मागोमाग चालले ११. रथामध्यें बसलेला तो धर्मात्मा भ्रातृवत्सल भरत रामाच्या पादुका मस्तकीं घेऊन सत्वर नंदिग्रामासमीप गेला १२. तदनंतर नंदिग्रामामध्यें सत्वर प्रविष्ट झाल्यावर रथांतून लवकर खालीं उतरून तो गुरूंना ह्मणाला १३ "हें राज्य एक उत्कृष्ट ठेव ह्मणून भ्रात्यानें माझ्या स्वाधीन

वहे चेमे पादुके हेमभूषिते १४ भरतः शिरसा कृत्वा संन्यासं पादुके ततः । अब्रवीद्दुःखसंतप्तः सर्वं प्रकृतिमण्डलम् १५ छत्रं धारयत क्षिप्रमार्यपादाविमौ मतौ । आभ्यां राज्ये स्थितो धर्मः पादुकाभ्यां गुरोर्मम १६ भ्रात्रा तु मयि संन्यासो निक्षिप्तः सौहृदादयम् । तमिमं पालयिष्यामि राघवागमनं प्रति १७ क्षिप्रं संयोजयित्वा तु राघवस्य पुनः स्वयम् । चरणौ तौ तु रामस्य द्रक्ष्यामि सह पादुकौ १८ ततो निक्षिप्तभारोहं राघवेण समागतः । निवेद्य गुरवे राज्यं भजिष्ये गुरुवर्तिताम् १९ राघवाय च संन्यासं दत्त्वेमे वरपादुके । राज्यं चेदमयोध्यां च धूतपापो भवाम्यहम् २० स वल्कलजटाधारी मुनिवेषधरः प्रभुः । नन्दिग्रामेवसद्वीरः ससैन्यो भरतस्तदा २१ सवालव्यजनं छत्रं धारयामास स स्वयम् । भरतः शासनं सर्वं पादुकाभ्यां निवेदयन् २२ ततस्तु भरतः श्रीमानभिषिच्यार्यपादुके । तदधीनस्तदा राज्यं कारयामास सर्वदा २३ तदा हि यत्कार्यमुपैति किंचिदुपायनं चोपहृतं महार्हम् । स

केलें आहे व ह्या सुवर्णभूषित पादुका योगक्षेम चालविणाऱ्या आहेत " १४. असें बोलून त्या पादुकारूप ठेवीला त्यानें प्रणाम केला आणि दुःखसंतप्त झालेला तो भरत सर्व मंत्रिमंडळाला ह्मणाला १५ " ह्या पादुकांवर लवकर छत्र धारण करा; ह्या पादुकांना मी आर्य रामच समजत आहें. राज्यसंबंधीं माझ्या ज्येष्ठ भ्रात्याचा जो धर्मव्यवहार हा सर्व ह्या पादुकांचेच ठिकाणीं आहे (ह्मणजे ह्या पादुकाच राज्यव्यवहार पहाणाऱ्या आहेत. तस्मात्, तुह्मी ह्यांच्यावर छत्र धरा ) १६. भ्रात्यानें प्रेमामुळें ही (राज्यरूप ) ठेव माझ्यापाशीं ठेविली आहे. तेव्हां रामाचें आगमन होईपर्यंत मी तिचें परिपालन करीन १७. राम येतांक्षणीं मी पुनरपि स्वतः ह्या पादुकांचा त्याच्या चरणाशीं समागम करवीन आणि पादुकांसहवर्तमान रामाचे ते पाय मी अवलोकन करीन १८. नंतर रामाचा समागम होऊन माझी जबाबदारी संपली ह्मणजे मी त्या श्रेष्ठ रामाच्या स्वाधीन राज्य करून त्याच्याशीं गुरुवृत्तीनें वागेन १९ व ह्या श्रेष्ठ पादुका आणि हें राज्य ही उत्कृष्ट ठेव रामाला अयोध्येमध्यें परत दिल्यावर मी निष्पाप होईन " २०. ह्याप्रमाणें गुरूंना सांगितल्यावर वल्कलें, जटा आणि मुनिवेष धारण केलेला तो प्रभु विचारी भरत सैन्यासहवर्तमान नंदिग्रामामध्यें राहिला २१ आणि केलेला सर्व कारभार त्या पादुकांना निवेदन करण्याचा क्रम ठेवून तो भरत स्वतः चामर व छत्र त्या पादुकांवर धरूं लागला २२. सारांश, नंदिग्रामाला गेल्यानंतर आर्यरामाच्या पादुकांना अभिषेक करून आणि नेहमीं त्यांच्या आधीन होऊन तो श्रीमान् भरत राज्य करू

पादुकाभ्यां प्रथमं निवेद्य चकार पश्चाद्भरतो यथावत् २४ [४२२४]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येयोध्याकाण्डे पञ्चदशाधिकशततमः सर्गः ॥ ११५ ॥

प्रतियाते तु भरते वसन्रामस्तदा वने । लक्षयामास सोद्वेगमथौत्सुक्यं तपस्विनाम् १ ये तत्र चित्रकूटस्य पुरस्तात्तापसाश्रमे । राममाश्रित्य निरतास्तानलक्षयदुत्सुकान् २ नयनैर्भ्रुकुटीभिश्च रामं निर्दिश्य शङ्किताः । अन्योन्यमुपजल्पन्तः शनैश्चक्रुर्मिथः कथाः ३ तेषामौत्सुक्यमालक्ष्य रामस्त्वात्मनि शङ्कित । कृताञ्जलिरुवाचेदमृषिं कुलपतिं ततः ४ न कच्चिद्भगवन्किंचित्पूर्ववृत्तमिदं मयि । दृश्यते विकृतं येन विक्रियन्ते तपस्विनः ५ प्रमादाच्चरितं किंचित्कच्चिन्नावरजस्य मे । लक्ष्मणस्यर्षिभिर्दृष्टं नानुरूपं महात्मनः ६ कच्चिच्छुश्रूषमाणा वः शुश्रूषणपरा मयि । प्रमदाभ्युचितां वृत्तिं सीतायुक्तां न वर्तते ७ अथर्षिर्जरया वृद्धस्तपसा च जरां

---

लागला २३. कांहीं राज्यविषयक कार्य उपस्थित झालें असतां किंवा कोणी कांहीं मोठा नजराणा आणून दिला असतां तो भरत प्रथम पादुकांना निवेदन करून नंतर त्या राज्यकार्याची वगैरे यथायोग्य रीतीनें व्यवस्था लावीत असे २४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें पंधरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११५ ॥

भरत परत गेल्यावर राम वनामध्यें वास्तव्य करूं लागला असतां तपस्वी लोक दुसरीकडे जाण्याकरितां भयभीत होऊन उत्सुक झाले आहेत असें त्याच्या दृष्टीं पडलें १. पूर्वी चित्रकूट पर्वतावरील त्या आश्रमामध्यें जे तपस्वी रामाचा आश्रय करून आनंदानें रहात होते तेच जाण्याकरितां उत्सुक झाले आहेत असें रामाच्या लक्ष्यांत आलें २. कारण, नेत्र व भ्रूकुटि रामाकडे करून शंकित झालेले ते तपस्वी एकमेकांशीं कुजबुजत कुजबुजत आपआपसांत हळूं हळूं बोलूं लागले ३. तेव्हां त्यांची उत्सुकता पाहून रामाला स्वतःविषयीं शंका आली आणि हात जोडून तो त्या आश्रमाधिपति ऋषींना म्हणाला ४ " हे भगवन्, माझे ठिकाणीं पूर्वीप्रमाणें राजासारिखें कांहीं वर्तन अथवा तपस्व्यांना पीडा होईल अशा प्रकारचें कांहीं विरुद्ध वर्तन आपल्या दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं ना ? ५. प्रमादामुळें माझ्या महात्म्या कनिष्ठ भ्रात्या लक्ष्मणाच्या हातून कांहीं अयोग्य आचरण घडल्याचें ऋषींच्या दृष्टोत्पत्तीस आलेलें नाहीं ना ? ६. अथवा अर्घ्यपाद्यादिकांनीं तुमची शुश्रूषा करीत असलेली सीता माझ्या शुश्रूषेविषयीं तत्पर असल्यामुळें स्त्रियांना उचित असें तिचें योग्य वर्तन तुमचे ठिकाणीं, नाहीं कीं

गतः। वेपमान इवोवाच रामं भूतदयापरम् ८ कुतः कल्याणसत्त्वायाः कल्याणाभिरतेः सदा। चलनं तात वैदेह्यास्तपस्विषु विशेषतः ९ त्वन्निमित्तमिदं तावत्तापसान्प्रतिवर्तते। रक्षोभ्यस्तेन संविग्नाः कथयन्ति मिथः कथाः १० रावणावरजः कश्चित्खरो नामेह राक्षसः। उत्पाट्य तापसान्सर्वाञ्जनस्थाननिवासिनः ११ धृष्टश्च जितकाशी च नृशंसः पुरुषादकः। अवलिप्तश्च पापश्च त्वां च तात न मृष्यते १२ त्वं यदाप्रभृति ह्यस्मिन्नाश्रमे तात वर्तसे। तदाप्रभृति रक्षांसि विप्रकुर्वन्ति तापसान् १३ दर्शयन्ति हि बीभत्सैः क्रूरैर्भीषणकैरपि। नानारूपैर्विरूपैश्च रूपैरसुखदर्शनैः १४ अप्रशस्तैरशुचिभिः संप्रयुज्य च तापसान्। प्रतिघ्नन्त्यपरांक्षिप्रमनार्याः पुरतः स्थितान् १५ तेषु तेष्वाश्रमस्थानेष्वबुद्धमवलीय च। रमन्ते तापसांस्तत्र नाशयन्तोल्पचेतसः १६ अवक्षिपन्ति स्रुग्भाण्डानग्नीन्सिञ्चन्ति वारिणा। कलशांश्च प्रमर्दन्ति हवने समुपस्थिते १७ तैर्दुरात्मभिराविष्टानाश्रमान्प्रजिहासवः।

---

काय ?"७. (ह्याप्रमाणें रामानें विचारिल्या) नंतर वार्धक्य प्राप्त झालेले ते तपोवृद्ध ऋषि जरेनें कांपत कांपत भूतदयेविषयीं तत्पर असलेल्या रामाला ह्मणाले८ "सुस्वभावी आणि परहिताविषयीं तत्पर अशा सीतेच्या वृत्तीमध्यें आणि विशेषत: तपस्व्यांसंबंधानें तर फरक कोठून असणार ? ९; परंतु, तुझ्यामुळें राक्षसांपासून हें भय तपस्वी लोकांना प्राप्त झालेलें आहे आणि ह्यामुळें ते तपस्वी उद्विग्न होऊन आपआपसांत बोलत आहेत १०. रावणाचा कोणी कनिष्ठ भ्राता खरनामक राक्षस ह्मणून येथें आहे. त्यानें जनस्थानामध्यें राहणारे सर्व तपस्वी उध्वस्त केले असून ११ त्या धीट, निर्भय, दुष्ट, मनुष्यभक्षक, गर्विष्ठ आणि पापी राक्षसाला, बा रामा, तुझें येथें रहाणें सहन होईनासें झालें आहे १२. बा रामा, तूं जेव्हांपासून ह्या आश्रमामध्यें रहात आहेस तेव्हांपासून राक्षस तपस्वी लोकांना उपद्रव देत आहेत १३. बीभत्स, क्रूर, भयंकर, कुरूप आणि दर्शन झालें असतां दु:ख देणारीं, अशीं रूपें धारण केलेले ते दृष्टीं पडतात १४. अमंगल व अपवित्र पदार्थांचा तपस्वी लोकांशीं संयोग करून ते दुष्ट राक्षस कांहीं गरीब तपस्व्यांना अतिशय पीडाही देतात १५. आश्रमामध्यें ठिकठिकाणीं कोणाच्या लक्ष्यांत न येतां ते दडून बसतात आणि ते मंदबुद्धि राक्षस तपस्व्यांचा नाश करण्यांत आनंद मानितात १६. होम सुरू झाला असतां ते स्रुचि वगैरे यज्ञपात्रें सांडून टाकितात, अग्नीवर पाणी शिंपडतात आणि कलश फोडून टाकितात १७. तेव्हां त्या दुष्टांनीं व्याप्त केलेले आश्रम सोडण्याच्या उद्देशानें दुसऱ्या देशाला जाण्याकरितां ऋषि मला आज प्रेरणा

गमनायान्यदेशस्य चोदयन्त्यृषयोऽद्य माम् १८ तत्पुरा राम शारीरीमुपहिंसां तपस्विषु । दर्शयन्ति हि दुष्टास्ते त्यक्ष्याम इममाश्रमम् १९ बहुमूलफलं चित्रमविदूरादितो वनम् । अश्वस्याश्रममेवाहं श्रयिष्ये सगणः पुनः २० खरस्त्वय्यपि चायुक्तं पुरा राम प्रवर्तते । सहास्माभिरितो गच्छ यदि बुद्धिः प्रवर्तते २१ सकलत्रस्य संदेहो नित्यं युक्तस्य राघव । समर्थस्यापि सहितो वासो दुःखमिहाद्य ते २२ इत्युक्तवन्तं रामस्तं राजपुत्रस्तपस्विनम् । न शशाकोत्तरैर्वाक्यैरवबद्धुं समुत्सुकम् २३ अभिनन्द्य समापृच्छ्य समाधाय च राघवम् । स जगामाश्रमं त्यक्त्वा कुलैः कुलपतिः सह २४ रामः संसाध्य ऋषिगणमनुगमनाद्देशात्तस्मात्कुलपतिमभिवाद्य ऋषिम् । सम्यक्प्रीतैस्तैरनुमत उपदिष्टार्थः पुण्यं वासाय स्वनिलयमुपसंपेदे २५ आश्रममृषिविरहितं प्रभुः क्षणमपि न जहौ स राघवः । राघवं हि सततमनुगतास्तापमाश्चार्षचरिते धृत-

---

करीत आहेत १८. तेव्हां, हे रामा, अजून ते दुष्ट तपस्व्यांचा प्राण घेऊं लागले नाहींत तोंच आह्मी हा आश्रम सोडून जाणार १९. येथून जवळच विपुल फलमूलांनीं युक्त असें मनोहर वन आहे. त्या वनांत अश्वमहर्षींच्या आश्रमाचाच मी ह्या ऋषिगणासहवर्तमान आश्रय करणार आहें २०. हे रामा, तो खर राक्षस अद्यापपर्यंत तुझ्याशीं अयोग्य वर्तन करूं लागला नाहीं तोंच तुझी इच्छा असल्यास तूं आह्मांबरोबर येथून चल २१. हे राघवा, अशा ठिकाणीं नेहमीं भार्येसहवर्तमान आणि धर्माविषयीं तत्पर राहणाऱ्याला भय आहे. तेव्हां तूं समर्थ जरी असलास तरी सांप्रत भार्येसहवर्तमान येथें तुझें वास्तव्य दुःखरूपच होणार आहे" २२. ह्याप्रमाणें ते तपस्वी मुनि बोलले असतां तो राम आपल्या उत्कृष्ट भाषणांनींही त्या जाण्याकरितां उत्सुक झालेल्या मुनींना थोपवून धरण्यास समर्थ झाला नाहीं २३. तेव्हां ते आश्रमाधिपति मुनि रामाची स्तुति करून, त्याचें समाधान करून आणि त्याचा निरोप घेऊन आपल्या ऋषिगणासहवर्तमान तो आश्रम सोडून गेले २४. तेव्हां रामानें बरोबर जाऊन त्या ऋषिगणाला त्या प्रदेशांतून पुढें पोंचविल्यावर त्या आश्रमाधिपति ऋषींना वंदन केलें आणि नंतर सुप्रसन्न झालेल्या त्या ऋषींनीं परत जाण्याची अनुज्ञा देऊन तेथें न राहण्याचा उपदेश केल्यावर तो राम आपल्या पवित्र निवासस्थानामध्यें वास्तव्य करण्याकरितां परत आला २५. आश्रमांतून ऋषि निघून गेल्यानंतर तो प्रभु राम (सीतेचें रक्षण होण्याकरितां) क्षणभरही तो आश्रम सोडून कोठें गेला नाहीं आणि ऋषींप्रमाणें वर्तन असलेल्या रामाचे ठिकाणीं आपलें रक्षण होण्याला अवश्य असणारे गुण आहेत असा निश्चय धरून

गुणाः २६ [ ४२५० ] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्ये-योध्याकाण्डे षोडशाधिकशततमः सर्गः ॥ ११६॥

राघवस्त्वपयातेषु सर्वेष्वनुविचिन्तयन् । न तत्रारोचयद्वासं कारणैर्बहुभिस्तदा १ इह मे भरतो दृष्टो मातरश्च सनागराः । सा च मे स्मृतिरन्वेति तान्नित्यमनुशोचतः २ स्कन्धावारनिवेशेन तेन तस्य महात्मनः । हयहस्तिकरीषैश्च उपमर्दः कृतो भृशम् ३ तस्मादन्यत्र गच्छाम इति संचिन्त्य राघवः । प्रातिष्ठत स वैदेह्या लक्ष्मणेन च संगतः ४ सोऽत्रेराश्रममासाद्य तं ववन्दे महायशाः । तं चापि भगवानत्रिः पुत्रवत्प्रत्यपद्यत ५ स्वयमातिथ्यमादिश्य सर्वमस्य सुसत्कृतम् । सौमित्रिं च महाभागं सीतां च समसान्त्वयत् ६ पत्नीं च तमनुप्राप्तां वृद्धामामन्त्र्य सत्कृताम् । सान्त्वयामास धर्मज्ञः सर्वभूतहिते रतः ७ अनसूयांमहाभागां तापसीं धर्मचारिणीम् । प्रतिगृह्णीष्व वैदेहीमब्रवीदृषिसत्तमः ८ रामाय चाचचक्षे तां तापसीं धर्मचारिणीम् । दश वर्षाण्यनावृष्ट्या दग्धे लोके

---

कांहीं तपस्वी आश्रम सोडून न जातां नेहमीं रामाच्याच बरोबर तेथें राहूं लागले २६. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें सोळावा सर्ग समाप्त झाला ॥ ११६ ॥

तेथून सर्व ऋषि निघून गेल्यानंतर राम विचार करूं लागला असतां पुष्कळ कारणांमुळें तेथें वस्तव्य करणें त्याला रुचेना १. ह्या ठिकाणीं भरत, माता आणि नगरवासी लोक माझ्या दृष्टीं पडले आहेत तेव्हां त्यांच्याकरितां नेहमीं शोक करीत असलेल्या मला वारंवार तें स्मरण होतें २. शिवाय त्या महात्म्या भरताच्या त्या सैन्याचा तळ येथें पडला असल्यामुळें घोड्यांच्या लिदीनें व हत्तींच्या लेंड्यांनीं भूप्रदेश फारच अशुचि करून टाकिलेला आहे ३. तस्मात्, दुसरीकडे जावें ( हें बरें ) " असा विचार करून राम सीता व लक्ष्मण ह्यांसहवर्तमान तेथून निघाला ४. नंतर अत्रिमुनींच्या आश्रमाला येऊन महायशस्वी रामानें त्यांना वंदन केलें असतां भगवान् अत्रिमुनींनींही पुत्राप्रमाणें त्याचा स्वीकार केला ५ आणि स्वतः त्याच्या आदरातिथ्याची आज्ञा करून व तें सर्व सत्कारपूर्वक करून महाभाग्यवान् रामाचें, लक्ष्मणाचें व सीतेचें त्यांनीं सांत्वन केलें ६. तदनंतर सर्वांना मान्य असलेली आपली वृद्ध पत्नि अनसूया तेथें आली असतां प्रेमानें तिला त्यांनीं सीता दर्शविली ७ आणि " महाभाग्यवति, निरुपद्रवी व धर्मनिष्ठ अशा ह्या सीतेचा तूं स्वीकार कर " असें त्या श्रेष्ठ ऋषींनीं त्या अनसूयेला सांगितलें ८ व नंतर ते त्या धर्मनिष्ठ तापसि अन-

निरन्तरम् ९ यया मूलफले सृष्टे जाह्नवी च प्रवर्तिता । उग्रेण तपसा युक्ता नियमैश्चाप्यलंकृता १० दश वर्षसहस्राणि यया तप्तं महत्तपः । अनसूयाव्रतैस्तात प्रत्यूहाश्च निबर्हिताः ११ देवकार्यनिमित्तं च यया संत्वरमाणया । दशरात्रं कृता रात्रिः सेयं मातेव तेनघ १२ तामिमां सर्वभूतानां नमस्कार्यां तपस्विनीम् । अभिगच्छतु वैदेही वृद्धामक्रोधनां सदा १३ एवं ब्रुवाणं तमृषिं तथेत्युक्त्वा स राघवः । सीतामालोक्य धर्मज्ञामिदं वचनमब्रवीत् १४ राजपुत्रि श्रुतं त्वेतन्मुनेरस्य समीरितम् । श्रेयोर्थमात्मनः शीघ्रमभिगच्छ तपस्विनीम् १५ अनसूयेति या लोके कर्मभिः ख्यातिमागता । तां शीघ्रमभिगच्छ त्वमभिगम्यां तपस्विनीम् १६ सीता त्वेतद्वचः श्रुत्वा राघवस्य यशस्विनी । तामत्रिपत्नीं धर्मज्ञामभिचक्राम मैथिली १७ शिथिलां वलितां वृद्धां जरापाण्डुरमूर्धजाम् । सततं वेपमानाङ्गीं प्रवाते कदलीमिव १८ तां तु सीता महाभागामनसूयां पतिव्रताम् । अभ्यवादयदव्यग्रा स्वं नाम समुदाहरत् १९ अभिवाद्य च वैदेही

---

सूयेची हकीकत रामाला सांगू लागले. ( ते ह्मणाले ) " दहा वर्षें पर्जन्य न पडल्यामुळें लोक एकसारिखे दग्ध होऊं लागले असतां ९ ह्या अनसूयेनें फळें व मुळें उत्पन्न करून ह्या आश्रमामध्यें गंगा आणिली. ही उग्र तपश्चर्या करणारी असून नियमांनींही भूषित झाली आहे १०. दहा हजार वर्षेपर्यंत हिनें मोठें तप केलें आहे आणि, बा रामा, ह्या अनसूयेच्याच व्रतांच्या योगानें ऋषींच्या तपाला येणारीं विघ्नें नाहींशीं झालीं आहेत ११. देवकार्याकरितां झटत असतांना जिनें त्वरा करून दहा रात्रींची एक रात्र केली ती ही अनसूया, हे निष्पापा रामा, तुला मातेप्रमाणें आहे १२. तेव्हां सर्व प्राण्यांनीं नमस्कार करण्यास योग्य अशा क्रोधरहित वृद्ध तपस्वीचें दर्शन घेण्याकरितां सीतेला जाऊं दे " १३. ह्याप्रमाणें ते अत्रिऋषि सांगूं लागले असतां त्यांना " ठीक आहे " असें ह्मणून आणि धर्मवेत्त्या सीतेकडे पाहून तो राम ह्मणाला १४ " हे राजकन्ये, ह्या मुनींनीं काय सांगितलें हें ऐकिलेस ना? तूं आपल्या कल्याणाकरितां सत्वर त्या तपस्विनीकडे जा १५. कर्मांच्या योगानें जी अनसूया ह्या नांवानें लोकांमध्यें प्रसिद्धीला आली आहे आणि जी समीप जाण्यास योग्य आहे अशा त्या तपस्विनीकडे सत्वर जा " १६. हें रामाचें भाषण श्रवण केल्यावर जनककन्या सीता त्या धर्मवेत्त्या अत्रिपत्नीकडे गेली १७. त्या वृद्ध अत्रिपत्नीचीं गात्रें शिथिल झालीं होतीं, अंगावर सुरकुत्या पडल्या होत्या, जरेमुळें केश पांढरे झाले होते आणि वारा सुटला असतां हलणाऱ्या केळीप्रमाणें तिचें शरीर कांपत होतें १८. त्या कर्तव्यदक्ष सीतेनें महाभाग्यवति पतिव्रता अनसूयेला

तापसीं तां दमान्विताम्। बद्धाञ्जलिपुटा हृष्टा पर्यपृच्छदनामयम् २० ततः सीतां महाभागां दृष्ट्वा तां धर्मचारिणीम्। सान्त्वयन्त्यब्रवीद्वृद्धा दिष्ट्या धर्ममवेक्षसे २१ त्यक्त्वा ज्ञातिजनं सीते मानवृद्धिं च मानिनि। अवरुद्धं वने रामं दिष्ट्या त्वमनुगच्छसि २२ नगरस्थो वनस्थो वा शुभो वा यदि वाशुभः। यासां स्त्रीणां प्रियो भर्ता तासां लोका महोदयाः २३ दुःशीलः कामवृत्तो वा धनैर्वा परिवर्जितः। स्त्रीणामार्यस्वभावानां परमं दैवतं पतिः २४ नातो विशिष्टं पश्यामि बान्धवं विमृशन्त्यहम्। सर्वत्र योग्यं वैदेहि तपः कृतमिवाव्ययम् २५ न त्वेवमनुगच्छन्ति गुणदोषमसत्स्त्रियः। कामवक्तव्यहृदया भर्तृनाथाश्चरन्ति याः २६ प्राप्नुवन्त्ययशश्चैव धर्मभ्रंशं च मैथिलि। अकार्यवशमापन्नाः स्त्रियो याः खलु तद्विधाः २७ त्वद्विधास्तु गुणैर्युक्ता दृष्टलोकपरावराः। स्त्रियः स्वर्गे चरिष्यन्ति यथा पुण्यकृतस्तथा २८ तदेवमेतं त्वमनुव्रता सती पतिप्रधाना समयानुवर्तिनी

---

अभिवंदन केलें आणि आपलें नांव उच्चारिलें १९. ह्याप्रमाणें त्या मनोनिग्रही तापसीला अभिवंदन केल्यावर आनंदित झालेल्या सीतेनें हात जोडून तिला आरोग्याविषयीं प्रश्न केला २०. तेव्हां त्या महाभाग्यवती धर्मचारिणी सीतेला अवलोकन करून ती वृद्ध अनसूया सांत्वन करीत करीत तिला ह्मणाली " धर्माकडे तुझें लक्ष्य आहे हें मोठें सुदैवच समजलें पाहिजे २१. हे सीते, हे मानिनि, मानवृद्धीची आणि बांधवांची पर्वा न करितां पित्यानें वनांत जाण्याची आज्ञा केलेल्या रामाच्या मागोमाग तूं जात आहेस हें मोठें सुदैवच आहे २२. नगरांत असो अथवा वनांत असो आणि त्याचप्रमाणें अनुकूल असो अथवा प्रतिकूल असो ज्या स्त्रियांना भर्ता प्रिय आहे त्यांना महाफलदायक लोक प्राप्त होतात २३. पति दुःशील असो, स्वच्छाचारी असो अथवा निर्धन असो सुस्वभावी स्त्रियांचें तेंच मुख्य दैवत होय २४. हे सीते, विचार करून पाहूं लागलें असतां भर्त्यापेक्षां इष्ट बांधव मला दुसरें कोणीही आढळत नाहीं. अक्षय तपाचें अनुष्ठान ज्याप्रमाणें इहलोकीं आणि परलोकीं इष्टप्राप्तीचें साधन होतें त्याचप्रमाणें भर्ताच इहलोकीं आणि परलोकीं इष्टप्राप्तीचें साधन असल्यामुळें सेवेला योग्य आहे २५. भर्त्यावरच अधिकार चालविणाऱ्या, विषयोपभोगाकडेच मनाचा कल असलेल्या आणि स्वेच्छेनें संचार करणाऱ्या ज्या दुष्ट स्त्रिया असतात त्या ह्या गुणदोषाकडेच लक्ष्य देत नाहींत २६ आणि, हे सीते, खरोखर निषिद्ध कर्माचेच आधीन होऊन राहिलेल्या ज्या तशाप्रकारच्या स्त्रिया असतात त्या धर्माला विकून अपकीर्तीला पात्र होतात २७; परंतु, तुझ्यासारिख्या जगतांतील बऱ्या वाईट गोष्टींचा विचार करणाऱ्या ज्या गुण-

भव स्वभर्तुः सहधर्मचारिणी यशश्च धर्मं च ततः समाप्स्यसि २९[४२७९]
इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डे सप्तदशाधिकशततमः सर्गः ॥ ११७ ॥

सा त्वेवमुक्ता वैदेही त्वनसूयानसूयया । प्रतिपूज्य वचो मन्दं प्रवक्तुमुपचक्रमे १ नैतदाश्चर्यमार्यायां यन्मां त्वमनुभाषसे । विदितं तु ममाप्येतद्यथा नार्याः पतिर्गुरुः २ यद्यप्येष भवेद्भर्ता अनार्यो वृत्तिवर्जितः । अद्वैधमत्र वर्तव्यं तथाप्येष मया भवेत् ३ किं पुनर्यो गुणश्लाघ्यः सानुक्रोशो जितेन्द्रियः । स्थिरानुरागो धर्मात्मा मातृवत्पितृवत्प्रियः ४ तां वृत्तिं वर्तते रामः कौसल्यायां महाबलः । तामेव नृपनारीणामन्यासामपि वर्तते ५ सकृद्दृष्टास्वपि स्त्रीषु नृपेण नृपवत्सलः । मातृवद्वर्तते वीरो मानमुत्सृज्य धर्मवित् ६ आगच्छन्त्याश्च विजनं वनमेवं भयावहम् । समाहितं हि मे श्वश्र्वा हृदये यत्स्थिरं मम ७ पाणिप्रदानकाले च यत्पुरा त्वग्नि-

संपन्न स्त्रिया असतात त्या पुण्यवान् लोकांप्रमाणें स्वर्गामध्यें संचार करितात २८. तस्मात्, ह्याप्रमाणें पति हेंच मुख्य दैवत समजून सदाचरणाला अनुसरून वागणारी आणि पतिसेवेविषयीं तत्पर असलेली तूं आपल्या भर्त्याची सहधर्मचारिणी हो; ह्मणजे तुला यश व पुण्य प्राप्त होईल २९. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडांपैकीं एकशें सतरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११७ ॥

ह्याप्रमाणें अनसूयेनें सांगितलें असतां ती अनसूया ( ह्मणजे निर्मत्सर ) सीता तिच्या भाषणाची प्रशंसा करून हळू हळू बोलूं लागली कीं १, " आपण जें मला सांगत आहांत तें हें सदाचरणी स्त्रीसंबंधानें पाहूं गेलें असतां कांहीं आश्चर्यकारक नाहीं. कारण, स्त्रीचा गुरु पति हें आपल्या उपदेशाप्रमाणें मलाही विदित आहे २. भर्ता हा जरी दुष्ट आणि दरिद्री असला तरी माझ्यासारख्या स्त्रीनें त्याचे ठिकाणीं एकनिष्ठेनेंच वागलें पाहिजे ३. तेव्हां गुणामुळें प्रशंसेस पात्र, दयाळू, जितेंद्रिय, दृढ प्रेम करणारा, धर्मात्मा आणि मातापितरांप्रमाणें माझ्या प्रीतीस पात्र असलेला जो भर्ता त्याच्याशीं एकनिष्ठेनें वागणें अवश्य आहे ह्यांत शंका कशाची ? ४. महाबलाढ्य राम जें कौसल्येचे ठिकाणीं आपलें वर्तन ठेवीत आहे तेंच इतरही राजभार्यांचे ठिकाणीं ठेवीत आहे ५; इतकेंच नव्हे परंतु, उपभोग्य ह्या बुद्धीनें ज्या स्त्रीयांकडे दशरथराजानें एकदां पाहिलें आहे त्या स्त्रीयांचे ठिकाणींही हा नृपवत्सल धर्मवेत्ता वीर अभिमान सोडून देऊन मातेप्रमाणें वर्तन ठेवीत असतो ६. मी निर्जन व भयंकर वनामध्यें येऊं लागलें असतां सासूनें मला जो ह्याप्रमाणें उपदेश केला तो माझ्या हृदया-

संनिधौ। अनुशिष्टं जनन्या मे वाक्यं तदपि मे ध्रुवम् ८ न विस्मृतं तु मे सर्वं वाक्यैः स्वैर्धर्मचारिणि। पतिशुश्रूषणान्नार्यास्तपो नान्यद्विधीयते ९ सावित्री पतिशुश्रूषां कृत्वा स्वर्गे महीयते। तथावृत्तिश्च याता त्वं पतिशुश्रूषया दिवम् १० वरिष्ठा सर्वनारीणामेषा च दिवि देवता। रोहिणी न विनाचन्द्रं मुहूर्तमपि दृश्यते ११ एवंविधाश्च प्रवराः स्त्रियो भर्तृदृढव्रताः। देवलोके महीयन्ते पुण्येन स्वेन कर्मणा १२ ततोनसूया संहृष्टा श्रुत्वोक्तं सीतया वचः। शिरस्याघ्राय चोवाच मैथिलीं हर्षयन्त्युत १३ नियमैर्विविधैराप्तं तपो हि महदस्ति मे। तत्संश्रित्य बलं सीते छन्दये त्वां शुचिव्रते १४ उपपन्नं च युक्तं च वचनं तव मैथिलि। प्रीता चास्म्युच्यतां सीते करवाणि प्रियं च किम् १५ तस्यास्तद्वचनं श्रुत्वा विस्मिता मन्दविस्मया। कृतमित्यब्रवीत्सीता तपोबलसमन्विताम् १६ सा त्वेवमुक्ता धर्मज्ञा तया प्रीततराभवत्। सफलं च प्रहर्षं ते हन्त

---

मध्यें अगदीं स्थिर राहिलेला आहे ७. पूर्वी पाणिग्रहणसमयीं अग्निसंनिध मातेनें जो मला उपदेश केला तोही मीं लक्ष्यांत ठेविला आहे ८. हे धर्मचारिणि, माझ्या बांधवांनीं जो मला आपआपल्या भाषणांनीं उपदेश केला आहे त्यांपैकींही मी कांहींएक विसरलें नाहीं. स्त्रीला पतिसेवेहून दुसरें तप विहित नाहीं ९. सावित्री पतिसेवा करून आतां स्वर्गामध्यें पूज्य होऊन बसली आहे आणि त्या सावित्रीप्रमाणेंच वागणाऱ्या आपणही पतिसेवेनें स्वर्ग हस्तगत करून घेतला आहेत १०. सर्व स्त्रियांमध्यें श्रेष्ठ असलेली ही देवता रोहिणी चंद्रावांचून एक क्षणभरही स्वर्गामध्यें दिसत नाहीं. ( सारांश, पूर्वजन्मीं एकनिष्ठपणानें पतिसेवा केल्यामुळेंच तिला हें पतिसांनिध्य प्राप्त झालें आहे ) ११. ह्याप्रमाणें आशाच प्रकारच्या महापतिव्रता श्रेष्ठ स्त्रिया स्वतःच्या पुण्य कर्मानें देवलोकामध्यें पूज्य होऊन बसल्या आहेत " १२. सीतेनें केलेलें हें भाषण श्रवण करून अनसूया आनंदित झाली आणि सीतेचें मस्तक हुंगून तिला आनंद होण्याकरितां ह्मणाली १३ " नानाप्रकारच्या नियमांनीं मीं मोठें तप संपादन करून ठेविलें आहे. तेव्हां त्या तपोबलाचा आश्रय करून, हे सदाचरणसंपन्न सीते, तूं माझ्यापाशीं वर मागावास अशी माझी इच्छा आहे १४. हे मैथिलि, तुझें भाषण अर्थयुक्त असून योग्य आहे. ह्यास्तव, हे सीते, मी तुझें काय प्रिय करावें तें सांग " १५. तें तिचें भाषण श्रवण करून किंचित् हास्य करणारी सीता विस्मित झाली आणि तपःसामर्थ्यानें युक्त असलेल्या त्या अनसूयेला ह्मणाली " आपल्या अनुग्रहानेंच माझें सर्व कांहीं यथास्थित आहे; मला कशाचीही उणीव नाहीं " १६.

सीते करोम्यहम् १७ इदं दिव्यं वरं माल्यं वस्त्रमाभरणानि च । अङ्गरागं च वैदेहि महार्हमनुलेपनम् १८ मया दत्तमिदं सीते तव गात्राणि शोभयेत् । अनुरूपमसंक्लिष्टं नित्यमेव भविष्यति १९ अङ्गरागेण दिव्येन लिप्ताङ्गी जनकात्मजे । शोभयिष्यसि भर्तारं यथा श्रीर्विष्णुमव्ययम् २० सा वस्त्रमङ्गरागं च भूषणानि स्रजस्तथा । मैथिली प्रतिजग्राह प्रीतिदानमनुत्तमम् २१ प्रतिगृह्य च तत्सीता प्रीतिदानं यशस्विनी । श्लिष्टाञ्जलिपुटा धीरा समुपास्त तपोधनाम् २२ तथा सीतामुपासीनामनसूया दृढव्रता । वचनं प्रष्टुमारेभे कथां कांचिदनु प्रियाम् २३ स्वयंवरे किल प्राप्ता त्वमनेन यशस्विना । राघवेणेति मे सीते कथा श्रुतिमुपागता २४ तां कथां श्रोतुमिच्छामि विस्तरेण च मैथिलि । यथाभूतं च कार्त्स्न्येन तन्मे त्वं वक्तुमर्हसि २५ एवमुक्ता तु सा सीता तापसीं धर्मचारिणीम् । श्रूयतामिति चोक्त्वा वै कथयामास तां कथाम् २६ मिथिलाधिपतिर्वीरो जनको नाम धर्मवित् । क्षत्रकर्मण्यभिरतो न्यायतः शास्ति मेदि-

---

ह्याप्रमाणें त्या सीतेनें सांगितलें असतां ती अनसूया तिच्यावर अधिकच प्रसन्न झाली आणि ह्मणाली " हे सीते, हा मी तुझा हर्ष सफल करितें १७. ही दिव्य श्रेष्ठ माला, वस्त्र, भूषणें, उटि आणि मोठें मूल्यवान् अनुलेपन मी तुला देतें १८. हे सीते, हें मीं दिलेलें तुझ्या अवयवांना शोभा आणील आणि नेहमीं ताजें राहून तुला साजेल १९. हे जनककन्ये, ही दिव्य उटि तूं आपल्या अंगाला लाविलीस ह्मणजे अक्षय विष्णूला शोभविणाऱ्या लक्ष्मीप्रमाणें तूं आपल्या भर्त्याला शोभविशील " २०. ह्याप्रमाणें अनसूयेनें सांगितल्यावर वस्त्र, उटि, भूषणें आणि माला अशा ज्या उत्कृष्ट वस्तु तिनें प्रेमपूर्वक दिल्या होत्या त्या सीतेनें घेतल्या २१ आणि प्रेमानें दिलेल्या त्या वस्तु घेतल्यावर यशस्विनी व उदार सीता हात जोडून त्या तपस्विनीच्या जवळ बसली २२. तेव्हां तशाप्रकारें ती सीता बसली असतांना स्वीकारिलेलें व्रत नेटानें चालविणारी अनसूया कांहीं प्रिय कथा श्रवण करण्याच्या उद्देशानें तिला विचारूं लागली २३ " हे सीते, ह्या यशस्वी रामानें स्वयंवरामध्यें तुला प्राप्त करून घेतली अशी गोष्ट माझ्या कानावर आली आहे २४ व, हे मैथिलि, ती हकीकत सविस्तर श्रवण करण्याची माझी इच्छा आहे. तेव्हां तूं हें इत्थंभूत वर्तमान मला पूर्णपणें कथन कर " २५. ह्याप्रमाणें अनसूयेनें सीतेची विनंति केली असतां ती सीता त्या धर्मचारिणी तापसीला " ऐका " असें ह्मणून ती हकीकत सांगूं लागली २६. ( ती ह्मणाली ) " जनक ह्मणून एक मिथिलानगरीचा धर्मवेत्ता वीर राजा आहे. तो क्षात्रधर्माविषयीं तत्पर असून न्यायानें

नीम् २७ तस्य लाङ्गलहस्तस्य कृषतः क्षेत्रमण्डलम् । अहं किलोत्थिता भित्त्वा जगतीं नृपतेः सुता २८ स मां दृष्ट्वा नरपतिर्मुष्टिविक्षेपतत्परः । पांसुगुण्ठितसर्वाङ्गीं विस्मितो जनको भवत् २९ अनपत्येन च स्नेहादङ्कमारोप्य च स्वयम् । ममेयं तनयेत्युक्त्वा स्नेहो मयि निपातितः ३० अन्तरिक्षे च वागुक्ता प्रतिमामानुषी किल । एवमेतन्नरपते धर्मेण तनया तव ३१ ततः प्रहृष्टो धर्मात्मा पिता मे मिथिलाधिपः । अवाप्तो विपुलामृद्धिं मामवाप्य नराधिपः ३२ दत्ता चास्मीष्टवद्देव्यै ज्येष्ठायै पुण्यकर्मणे । तया संभाविता चास्मि स्निग्धया मातृसौहृदात् ३३ पतिसंयोगसुलभं वयो दृष्ट्वा तु मे पिता । चिन्तामभ्यगमद्दीनो वित्तनाशादिवाधनः ३४ सदृशाच्चापकृष्टाच्च लोके कन्यापिता जनात् । प्रधर्षणमवाप्नोति शक्रेणापि समो भुवि ३५ तां धर्षणामदूरस्थां संदृश्यात्मनि पार्थिवः । चिन्तार्णवगतः पारं नाससादाप्लवो यथा ३६ अयोनिजां हि मां ज्ञात्वा नाध्यगच्छत्स चिन्तयन् । सदृशं

पृथ्वीचें परिपालन करीत आहे २७. ( यज्ञदीक्षा घेतल्यावर ) तो जनकराजा हातांत नांगर घेऊन यज्ञभूमि नांगरूं लागला असतां मी भूमि भेदून वर निघालें येवढ्याच कारणानें मी त्या जनक राजाची कन्या आहें २८. तेव्हां बीजमुष्टि जमिनींत टाकण्यामध्यें गढून गेलेला तो जनकराजा धुळीनें सर्वांग भरलेल्या मला अवलोकन करून विस्मित झाला २९ आणि त्याला संतति नसल्यामुळें त्यानें प्रेमानें स्वतः मला मांडीवर घेऊन आणि "ही माझी कन्या" असें ह्मणून माझे ठिकाणीं प्रेम केलें ३०. इतक्यांत आकाशामध्यें "हे भूपते, ह्या तुझ्या ह्मणण्याप्रमाणें न्यायानें ही तुझी कन्याच आहे" अशी मनुष्यवाणीसारखी वाणी झाली ह्मणून ह्मणतात ३१. अशी आकाशवाणी झाल्यानंतर माझा पिता धर्मात्मा मिथिलाधिपति आनंदित झाला आणि यज्ञभूमीपासून मी त्याला प्राप्त झाल्यावर त्याची मोठी अभिवृद्धि झाली ३२. राजानें आपल्या सत्कर्मनिष्ठ आणि संतानेच्छु अशा ज्येष्ठ पत्नीचे स्वाधीन मला केलें व त्या दयाळु राजपत्नीनें मातृप्रेमानें माझें परिपालन केलें ३३. नंतर पाणिग्रहण होण्याला योग्य असें माझें वय अवलोकन करून माझा पिता, वित्तनाशामुळें चिंताक्रांत होणाऱ्या दरिद्री पुरुषाप्रमाणें दीन, होऊन चिंताक्रांत झाला ३४. कारण, कन्येचा पिता इंद्राप्रमाणें जरी पृथ्वीमध्यें असला तरी सारख्या योग्यतेच्या अथवा कमी योग्यतेच्याही वरपक्षाकडून त्याचा अपमान होतो ( मग योग्यतेनें अधिक असलेल्या वरपक्षाची तर गोष्ट पाहिजे कशाला ) ३५.[१] तेव्हां अपल्या अपमानाचा समय जवळच आलेला पाहून

१ वरपक्षानें स्वतला श्रेष्ठ समजण्याची पद्धत अतिप्राचीन कालापासूनच सुरू आहे असें दिसतें.

चाभिरूपं च महीपालः पतिं मम ३७ तस्य बुद्धिरियं जाता चिन्तयानस्य संततम् । स्वयंवरं तनूजायाः करिष्यामीति धर्मतः ३८ महायज्ञे तदा तस्य वरुणेन महात्मना । दत्तं धनुर्वरं प्रीत्या तूणी चाक्षय्यसायकौ ३९ असंचाल्यं मनुष्यैश्च यत्नेनापि च गौरवात् । तन्न शक्ता नमयितुं स्वप्नेष्वपि नराधिपाः ४० तद्धनुः प्राप्य मे पित्रा व्याहृतं सत्यवादिना । समवाये नरेन्द्राणां पूर्वमामन्त्र्य पार्थिवान् ४१ इदं च धनुरुद्यम्य सज्यं यः कुरुते नरः । तस्य मे दुहिता भार्या भविष्यति न संशयः ४२ तच्च दृष्ट्वा धनुःश्रेष्ठं गौरवाद्गिरिसंनिभम् । अभिवाद्य नृपा जग्मुरशक्तास्तस्य तोलने ४३ सुदीर्घस्य तु कालस्य राघवोयं महाद्युतिः । विश्वामित्रेण सहितो यज्ञं द्रष्टुं समागतः ४४ लक्ष्मणेन सह भ्रात्रा रामः सत्यपराक्रमः । विश्वामित्रस्तु धर्मात्मा मम पित्रा सुपूजितः ४५ प्रोवाच पितरं तत्र राघवौ रामलक्ष्मणौ । सुतौ दशरथस्येमौ धनुर्दर्शनकाङ्क्षिणौ ४६ इत्युक्तस्तेन

---

चिंतासागरांत पडलेला जनकराजा, समुद्रांत पडलेला मनुष्य तरून जाण्याचें साधन नसल्यामुळें जसा परतीराला जाऊन पोंचत नाहीं तसा, त्या चिंतासागरांतून पार जाईना ३६. मी अयोनिसंभव आहें हें लक्ष्यांत घेऊन तो भूपति विचार करूं लागला असतां कुलीन आणि योग्यतेनें तुल्य असा पति त्याला कोणीही आढळेना ३७. तेव्हां एकसारिखें चिंतन करितां करितां " क्षत्रधर्माला अनुसरून असलेलें मी आपल्या कन्येचें स्वयंवर करीन " हा विचार त्याला सुचला ३८. दक्षयज्ञामध्यें माझ्या पित्याचा पूर्वज जो देवराज त्याला महात्म्या वरुणानें प्रेमपूर्वक एक श्रेष्ठ धनुष्य आणि दोन अक्षय भाते दिले होते ३९. तें धनुष्य जड असल्यामुळें मनुष्यांना प्रयत्नानेंही हलवितां येत नव्हतें; इतकेंच नव्हे परंतु, राजे स्वप्नामध्येंही तें धनुष्य वाकविण्यास समर्थ नव्हते ४०. तेव्हां पूर्वी राजांना अमंत्रण करून त्या राजांच्या समाजामध्यें माझ्या त्या सत्यवादी पित्यानें तें धनुष्य घेतलें आणि " हें धनुष्य उचलून ह्याला जो पुरुष प्रत्यंचा चढवील त्याची भार्या माझी कन्या निःसंशय होईल " असें ह्मटलें ४१,४२. तेव्हां जडपणामुळें पर्वतप्राय असलेलें तें श्रेष्ठ धनुष्य अवलोकन करितांक्षणीं तें तोलण्याविषयीं असमर्थ असलेले राजे त्याला नमस्कार करून जाऊं लागले ४३. ह्याला बराच काल लोटल्यावर हा महातेजस्वी व अमोघपराक्रमी रघुवंशज राम भ्रात्या लक्ष्मणाला बरोबर घेऊन विश्वामित्र मुनींसहवर्तमान यज्ञ अवलोकन करण्याकरितां तेथें आला. तेव्हां माझ्या पित्यानें धर्मात्म्या विश्वामित्र मुनींचें चांगलें पूजन केल्यावर ४४,४५ ते त्या ठिकाणीं माझ्या पित्याला ह्मणाले " हे रघु-

विप्रेण तद्धनुः समुपानयत् । तद्धनुर्दर्शयामास राजपुत्राय दैविकम् ४७ निमेषान्तरमात्रेण तदानम्य महाबलः । ज्यां समारोप्य झटिति पूरयामास वीर्यवान् ४८ तेनापूरयता वेगान्मध्ये भग्नं द्विधा धनुः । तस्य शब्दोऽभवद्भीमः पतितस्याशनेर्यथा ४९ ततोऽहं तत्र रामाय पित्रा सत्याभिसंधिना । उद्यता दातुमुद्यम्य जलभाजनमुत्तमम् ५० दीयमानां न तु तदा प्रतिजग्राह राघवः । अविज्ञाय पितुश्छन्दमयोध्याधिपतेः प्रभोः ५१ ततः श्वशुरमामन्त्र्य वृद्धं दशरथं नृपम् । मम पित्रा त्वहं दत्ता रामाय विदितात्मने ५२ मम चैवानुजा साध्वी ऊर्मिला शुभदर्शना । भार्यार्थे लक्ष्मणस्यापि दत्ता पित्रा मम स्वयम् ५३ एवं दत्तास्मि रामाय तथा तस्मिन्स्वयंवरे । अनुरक्तास्मि धर्मेण पतिं वीर्यवतां वरम् ५४ [४३३३] इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीय आदिकाव्येऽयोध्याकाण्डेऽष्टादशाधिकशततमः सर्गः ॥ ११८ ॥

अनसूया तु धर्मज्ञा श्रुत्वा तां महतीं कथाम् । पर्यष्वजत बाहुभ्यां शिरस्याघ्राय मैथिलीम् १ व्यक्ताक्षरपदं चित्रं भाषितं मधुरं त्वया ।

---

वंशज रामलक्ष्मण दशरथ राजाचे पुत्र आहेत व धनुष्य पहाण्याची यांची इच्छा आहे " ४६. ह्याप्रमाणें त्या विप्र विश्वामित्रांनीं राजाला सांगितलें असतां त्यानें तें धनुष्य आणविलें आणि तें दिव्य धनुष्य राजकुमाराला दाखविलें ४७. तेव्हां डोळ्याचें पातें लवलें नाहीं तोंच महाबलाढ्य वीर्यवान राघवानें तें वाकवून व प्रत्यंचा चढवून कर्णापर्यंत ओढून दाखविलें ४८. तेव्हां वेगानें तो तें धनुष्य ओढूं लागला असतां मध्यें मोडून त्याचे दोन तुकडे झाले व वीज पडल्याप्रमाणें त्याचा भयंकर आवाज झाला ४९. तदनंतर त्या सत्यवचनी पित्यानें हातामध्यें उत्तम उदकपात्र धरून मला रामाला देण्याकरितां पुढें केलें ५०; परंतु, अयोध्याधिपति प्रभु पित्या दशरथराजाचा अभिप्राय समजला नसल्यामुळें माझा पिता जरी मला देऊं लागला तरी राघवानें त्या वेळीं माझा स्वीकार केला नाहीं ५१. तेव्हां माझा श्वशुर जो वृद्ध दशरथराजा त्याला बोलावून आणून आत्मज्ञानी रामाला पित्यानें मला दिलें ५२ व शुभ नेत्रांनीं युक्त असलेली माझी कनिष्ठ भगिनी साध्वी ऊर्मिला स्वतः माझ्या पित्यानें लक्ष्मणालाही भार्येकरितां दिली ५३. असो. ह्याप्रमाणें त्या स्वयंवरामध्यें मी रामाला दिलेली आहे आणि वीर्यवानांमध्यें श्रेष्ठ असलेल्या पतीच्या ठिकाणीं मी धर्मानें अनुरक्त आहें ५४. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें अठरावा सर्ग समाप्त झाला ॥ ११८ ॥

ती मोठी कथा श्रवण केल्यावर सीतेचें मस्तकीं अवघ्राण करून धर्मवेत्त्या अन-

**यथा स्वयंवरं वृत्तं तत्सर्वं च श्रुतं मया २ रमेयं कथया ते तु दृढं मधुरभाषिणि । रविरस्तंगतः श्रीमानुपोह्य रजनीं शुभाम् ३ दिवसं परिकीर्णानामाहारार्थं पतत्त्रिणाम् । संध्याकाले निलीनानां निद्रार्थं श्रूयते ध्वनिः ४ एते चाप्यभिषेकार्द्रा मुनयः कलशोद्यताः । सहिता उपवर्तन्ते सलिलाप्लुतवल्कलाः ५ अग्निहोत्रे च ऋषिणा हुते च विधिपूर्वकम् । कपोताङ्गारुणो धूमो दृश्यते पवनोद्धुतः ६ अल्पपर्णा हि तरवो घनीभूताः समन्ततः । विप्रकृष्टेन्द्रिये देशे न प्रकाशन्ति वै दिशः ७ रजनीचरसत्त्वानि प्रचरन्ति समन्ततः । तपोवनमृगा ह्येते वेदितीर्थेषु शेरते ८ संप्रवृत्ता निशा सीते नक्षत्रसमलंकृता । ज्योत्स्नाप्रावरणश्चन्द्रो दृश्यतेऽभ्युदितोऽम्बरे ९ गम्यतामनुजानामि रामस्यानुचरी भव । कथयन्त्या हि मधुरं त्वयाहमपि तोषिता १० अलंकुरु च तावत्त्वं प्रत्यक्षं मम मैथिलि । प्रीतिं जनय मे वत्से**

---

सूयनें आपल्या हातांनीं तिला कवटाळून धरिलें ( आणि ती तिला ह्मणाली ) १ " स्वयंवर कसें झालें हें तूं स्पष्ट शब्दांनीं आणि आश्चर्यकारक व मधुर वाणीनें सांगितलेंस आणि तें सर्व मीं ऐकिलें २. हे मधुरभाषिणि सीते, ह्या तुझ्या कथेनें मला फारच बरें वाटत आहे; परंतु, आतां तेजस्वी सूर्य शुभरात्रीला समीप आणवून अस्ताला गेला आहे ३. सर्व दिवसभर आहाराकरितां संचार करून संध्यासमयीं निद्रेकरितां निवासस्थानांत जाऊन बसलेल्या पक्ष्यांचा ध्वनि कानावर येत आहे ४. उदकामध्यें ज्यांनीं आपलीं वल्कलें धुतलीं आहेत आणि स्नानामुळें ज्यांचीं शरीरें आर्द्र झालेलीं आहेत असे हे हातांत कलश घेतलेले मुनि एकत्र जुळून येत आहेत ५. ऋषींनीं विधिपूर्वक अग्निहोत्र होम दिला असल्यामुळें पारव्यांच्या कंठासारिख्या वर्णानें युक्त असलेला आणि वायूनें हालविलेला धूम दृष्टीं पडत आहे ६. बारीक पानांचे वृक्ष आसमंतात भागीं सर्व बाजूंनीं अगदीं दाट झाल्यासारिखे दिसत आहेत आणि दृष्टीला दूर असलेले प्रदेश प्रकाशत नाहींसे झाले आहेत ७. निशाचर प्राणी चोहोंकडे संचार करूं लागले आहेत आणि हे तपोवनांतील मृग पुण्यक्षेत्ररूप आश्रमप्रदेशामध्यें पडले आहेत ८. हे सीते, नक्षत्रांनीं भूषित झालेली रात्र प्राप्त झाली आहे आणि चंद्रिकारूप प्रावरणानें युक्त असलेला चंद्र आकाशामध्यें उदय पावलेला दिसत आहे ९. आतां जा; मी तुला अनुज्ञा देतें; रामाच्या शुश्रूषेमध्यें तत्पर रहा. मधुर गोष्टी सांगून तूं मलाही संतुष्ट केलें आहेस. हे सीते, माझ्यासमक्ष तूं अलंकार धारण कर आणि दिव्य अलंकारांनीं शोभित होऊन, हे वत्से, मला आनंद दे " १० ह्याप्रमाणें अनसूयेनें सांगितल्यावर देवकन्येसमान असलेल्या सीतेनें

दिव्यालंकारशोभिनी ११ सा तदा समलंकृत्य सीता सुरसुतोपमा । प्रणम्य शिरसा पादौ रामं त्वभिमुखी ययौ १२ तथा तु भूषितां सीतां ददर्श वदतां वरः । राघवः प्रीतिदानेन तपस्विन्या जहर्ष च १३ न्यवेदयत्ततः सर्वं सीता रामाय मैथिली । प्रीतिदानं तपस्विन्या वसनाभरणस्रजाम् १४ प्रहृष्टस्त्वभवद्रामो लक्ष्मणश्च महारथः । मैथिल्याः सत्क्रियां दृष्ट्वा मानुषेषु सुदुर्लभाम् १५ ततः स शर्वरीं प्रीतः पुण्यां शशिनिभाननाम् । अर्चितस्तापसैः सर्वैरुवास रघुनन्दनः १६ तस्यां रात्र्यां व्यतीतायामभिषिच्य हुताग्निकान् । आपृच्छेतां नरव्याघ्रौ तापसान्वनगोचरान् १७ तावूचुस्ते वनचरास्तापसा धर्मचारिणः । वनस्य तस्य संचारं राक्षसैः समभिप्लुतम् १८ रक्षांसि पुरुषादानि नानारूपाणि राघव । वसन्त्यस्मिन्महारण्ये व्यालाश्च रुधिराशनाः १९ उच्छिष्टं वा प्रमत्तं वा तापसं ब्रह्मचारिणम् । अदन्त्यस्मिन्महारण्ये तान्निवारय राघव २० एष पन्था महर्षीणां फलान्याहरतां वने । अनेन तु वनं दुर्गं गन्तुं राघव ते क्षमम् २१ इतीरितः प्राञ्जलिभिस्तपस्विभिर्द्विजैः कृतस्वस्त्ययनः परंतपः ।

---

अलंकार घातले आणि अनसूयेच्या चरणांना मस्तकानें प्रणाम करून ती रामाकडे निघाली १२. तेव्हां ऋषिपत्नी अनसूयेनें प्रेमपूर्वक दिलेल्या अलंकारानें भूषित झालेल्या सीतेला अवलोकन करून वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या रामाला हर्ष झाला १३ तदनंतर ऋषिपत्नीनें वस्त्रें, भूषणें व पुष्पमाला प्रेमपूर्वक दिल्याचें सर्व जनककन्या सीतेनें रामाला निवेदन केलें १४. तेव्हां मनुष्य लोकामध्यें अत्यंत दुर्लभ असा सीतेचा सत्कार झालेला पाहून रामाला व महारथि लक्ष्मणाला हर्ष झाला १५. नंतर सर्व तपस्वी जनांनीं सत्कार केलेला तो रघुनंदन राम प्रसन्न होऊन आणि चंद्रासारिख्या आल्हादकारक मुखानें युक्त असलेल्या पवित्र रात्रीला अवलोकन करून ती रात्र तेथेंच राहिला १६. ती रात्र निघून गेल्यावर स्नान करून ते पुरुषश्रेष्ठ रामलक्ष्मण अग्नींना होम देऊन वसलेल्या वनांतील तपस्वी मुनींचा पुढें जाण्याकरितां निरोप घेऊ लागले १७. तेव्हां वनामध्यें संचार करणारे ते धर्मनिष्ठ तपस्वी त्यांना ह्मणाले "ह्या वनांतील प्रदेशाला राक्षसांचा फारच उपद्रव आहे १८. हे राघवा, नाना प्रकारचे मनुष्यभक्षक राक्षस आणि रुधिरपान करणारीं श्वापदें ह्या महारण्यामध्यें वास्तव्य करीत असतात १९ आणि एकादा तपस्वी अथवा ब्रह्मचारी अशुचि किंवा असावध असला ह्मणजे ह्या महारण्यामध्यें राक्षस त्याला खाऊन टाकतात. तेव्हां, हे राघवा, तूं त्यांचें निवारण कर २०. फळें वेऊन येणाऱ्या महर्षींचा हा वनांतील मार्ग आहे

वनं सभार्यः प्रविवेश राघवः सलक्ष्मणः सूर्य इवाभ्रमण्डलम् २२ [४३५५]

इत्यार्षे श्रीमद्रामायणे वाल्मीकीये आदिकाव्येऽयोध्याकाण्ड एकोनविंशाधिकशततमः सर्गः ॥ ११९ ॥

समाप्तमिदमयोध्याकाण्डम् ॥ २ ॥

---

व ह्याच मार्गानें, हे राघवा, गहन वनामध्यें जाणें तुला योग्य आहे " २१. ह्याप्रमाणें आशीर्वादपूर्वक तपस्वी ब्राह्मणांनीं हात जोडून रामाला सांगितलें असतां तो शत्रुतापन राम मेघमंडळांत प्रविष्ट होणाऱ्या सूर्याप्रमाणें भार्या आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान वनामध्यें प्रविष्ट झाला २२. ह्याप्रमाणें महामुनिवाल्मीकिप्रणीत श्रीमद्रामायणसंज्ञक आदिकाव्यांतील अयोध्याकांडापैकीं एकशें एकोणिसावा सर्ग समाप्त झाला ॥ ११९ ॥

येथें अयोध्याकांडही संपूर्ण झालें ॥ २ ॥